

देखें प्राप्तार्थ जाहले। जे निष्कामता पावले।
तयाही कर्तव्य असे उरले। लोकालागीं॥

# डॉ. हेडगेवार

## चरित्र

लेखक

नारायण हरि पालकर

# प्रस्तावना

॥ ॐ ॥

परमपूजनीय डॉ. हेडगेवार यांचें हें चरित्र थोड्या विस्तारानें लिहून प्रसिद्ध होत आहे. त्यांच्या जीवनाचें ओझरतें दर्शन घडविणारें एक लहानसें पुस्तक त्यांच्या निधनानंतर थोड्याच दिवसांनीं वाचकांसमोर ठेवलें गेलें होतें. त्यांतून त्यांच्या जीवनाचा व विचारांचा अल्पसा बोध व्हावा, अशी योजना होती. कांहीं प्रमाणांत ती योजना सफलहि होत होती. पण परमपूजनीय डॉक्टरांना जाणणारे व त्यांच्यासंबंधीं हृदयांत श्रद्धा बाळगणारे जे असंख्य बंधु देशभर विखुरलेले आहेत, त्यांचें त्या त्रोटक वृत्तान्तानें समाधान होणें शक्य नव्हतें. म्हणून असें विस्तृत चरित्र प्रसिद्ध व्हावें, अशी अनेकांची आग्रहपूर्वक मागणी एकसारखी होत होती. तिचा परिणाम म्हणून हें पुस्तक प्रसिद्ध होत आहे.

'याचे लेखक श्री. नाना पालकर हे बाल्यकालापासून राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे निष्ठावान् स्वयंसेवक आहेत. परमपूजनीय डॉक्टरांसंबंधीं त्यांच्या अंतः-करणांत नितान्त श्रद्धा व आदर आहे. लेखनकलाहि त्यांना अवगत आहे. म्हणून हें जिकिरीचें कार्य त्यांच्याकडे सोपविण्यांत आल्यास तें यशस्वी रीत्या पूर्ण होईल, या विश्वासानें त्यांच्यावर हा भार सोपविण्यांत आला. अखंड परिश्रम करून जेथें जेथें व ज्या ज्या व्यक्तींशीं आणि कार्यांशीं परमपूजनीय डॉक्टरांचा संबंध आल्याचें त्यांना कळूं शकलें, त्या त्या ठिकाणीं जाऊन त्या व्यक्तींकडून व त्या कार्यासंबंधीं शक्य तितकी पूर्ण माहिती काढून, जुने कागद-पत्र गोळा करून ती सर्व माहिती क्रमवार लावून त्यांनीं या चरित्रग्रंथाची जुळवाजुळव केली.

ग्रंथाच्या निर्मितींतील अडचणींचा उल्लेख करण्याचें विशेष कारण नाहीं. तरीपण थोडीबहुत कल्पना यावी म्हणून कांहीं ठळक अडचणींचा निर्देश करणें अस्थानीं होणार नाहीं. सगळ्यांत महत्त्वाची अडचण म्हणजे चरित्रनायकाची प्रसिद्धिपराङ्मुखता. यामुळें त्यांची माहिती स्वतः त्यांच्याकडून फारच कमी मिळत असे. याच गुणामुळें त्यांच्यासंबंधींचे उल्लेख वृत्तपत्रादींतून अत्यल्प आलेले होते. त्यांनीं स्वतःहि जवळजवळ कांहींच लिहून ठेवलें नाहीं. स्वीकृत कार्यांतच यावज्जीव निमग्न असल्यानें व स्वतःचें व्यक्तित्व कार्यांत पूर्णतः विलीन केलेलें असल्यानें स्वतःच्या वैयक्तिक जीवनाचें ' आत्मवृत्त ' म्हणून कांहीं लिहिणें वा त्याचीं नुसतीं टांचणेंहि करून ठेवणें त्यांच्या स्वभावांत बसण्यासारखें नव्हतें. त्यांतून त्यांचें बरेंचसें पूर्वायुष्य क्रांतिकारी म्हणून गेलें असल्यानें परकीय शासनकर्त्यांच्या गृध्र-

दृष्टीलाहि स्वतः व स्वतःसंबंधींचें कांहीं पडूं शकूं नये, अशी दक्षता घेणें आवश्यक होते व म्हणून त्यांनीं तशी दक्षता घेऊन स्वतःचे अस्तित्वच जणूं पुसून टाकण्याचा आपला स्वभाव बनविला होता.

त्यांचे अनेक सहकारी त्याच्या विविध उलाढालींत त्यांच्यासह असल्यानें माहिती देऊ शकले असते. पण हा ग्रथ लिहिण्यास लागणारी अनुकूलता त्याच्या निधनानंतर जवळजवळ वीस वर्षानी उपलब्ध झाली व या दीर्घ कालात त्या सहकाऱ्यापैकीं बहुतेक इहलोकीची यात्रा सपवून तिरोहित झाले. अशा बिकट अवस्थेत केवळ तुटपुंजी व आनुमानिक माहिती प्राप्त होणे अपरिहार्यच होतें. तरीहि त्याचे जे जे सहकारी-मित्र वा परिचित सुदैवाने अस्तित्वात होते व आहेत, तसेच ठिकठिकाणीं विखुरलेले जे जे अल्पस्वल्प उल्लेख आहेत, त्या सर्वांची जुळणी करून लेखकाने हे सुसबद्ध व प्रामाणिक चरित्र लिहिले आहे. दीर्घकालपर्यंत हा एकच ध्यास घेऊन चिकाटीने पायपिटी करीत सर्व सामग्री एकत्र करण्यांत त्याना शारीरिक व मानसिक कष्ट किती पडले असतील, याची कल्पनाच केलेली बरी.

अर्थातच परमपूजनीय डॉक्टरांचें परिपूर्ण चित्रण यात असेल, असे म्हणणे कठीण आहे. कितीतरी लहानमोठ्या घटना अनेकाच्या स्मृतींतून गळून गेल्या असतील. त्यातून त्याच्या गुणाचें व स्वभावाचे दिग्दर्शन होण्याची शक्यता नष्ट झाली असेल. पण त्याला उपाय नाहीं असें म्हणून, आहे याच चरित्र-वर्णनावर आपल्या सगळ्याना समाधान मानणे भाग आहे.

परमपूजनीय डॉक्टरांच्या कष्टपूर्ण, परिश्रमी व कर्मठ जीवनातून सर्व-साधारण व्यक्तींना एक आशापूर्ण सदेश प्राप्त होतो : " दारिद्र्य, प्रसिद्धिविहीनता, थोरामोठ्याचें औदासीन्य, परिस्थितीची प्रतिकूलता, पावलोपावलीं अडचणी, विरोध, उपेक्षा, उपहास आदींचा कटु अनुभव येणें, तसेंच स्वीकृत कार्याच्या पूर्तीस्तव आवश्यक अशा साधनाचा आत्यंतिक अभाव असणे इत्यादि कितीहि बाधा मार्गांत असल्या तरी स्वकार्याशीं तन्मय होऊन 'मुक्तसंगोऽनहंवादी......' वृत्तीनें सुखदुःख, मानापमान, यशापयश आदि कशाचीहि चिन्ता न करतां कोणी प्रयत्नरत होईल तर त्याला यशःप्राप्ति होईलच." 'क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे' हें सुभाषित परमपूजनीय डॉक्टराच्या प्रथमप्रसिद्ध त्रोटक जीवनवृत्ताच्या शीर्षभागीं जें दिलेले आहे, तें त्याच्याविषयीं पूर्णतः अन्वर्थक असेंच आहे; किंबहुना त्याचे प्रत्यक्ष चालतें-बोलते उदाहरणच त्याचें समग्र जीवन होते. स्वतःच्या घरगुती कर्तव्यांतहि हताश होऊन हातपाय गाळणाऱ्याना, कोणतेंहि सामाजिक कार्य करीत असताना अडचणींनीं गागरून जाऊन निराशेनें कार्यपराङ्मुख होणाऱ्याना या पवित्र जीवनांतून आशेचा संदेश प्राप्त होऊन त्यांना सदैव कार्यरत राहण्याची प्रेरणा मिळूं शकेल.

अशा प्रेरक जीवनांतील प्रेरक सिद्धान्त व गुण पाहून स्वतःच्या आयुष्य-क्रमांत त्यांना स्थान देणें हिताचें असल्यानें कांहीं ठळक गोष्टींचा उल्लेख करणें लाभदायक होईल.

सर्वप्रथम उल्लेखनीय गुण म्हणजे त्यांच्या ठिकाणीं वसत असलेली राष्ट्रविमोचनाची, राष्ट्रोन्नतीची तळमळ. ही राष्ट्रभक्ति त्यांच्या ठिकाणीं केवळ बाह्य परिस्थितीमुळें उत्पन्न झालेली नव्हती, तर ती त्यांचा अभिजात स्थायी स्वभावच होती. बाल्यकालापासूनच ती व्यक्त होत होती. तिचा आविर्भाव तत्कालीन इंग्रजी शासनाच्या पारतंत्र्यामुळें एका विशिष्ट स्वरूपांत होणें अपरिहार्य होतें. कांहींहि करून या परकीय राज्यकर्त्यांचें आपल्या देशांतून उच्चाटन केलें पाहिजे, ही त्यांची इच्छा या उत्कट भक्तींतूनच उत्पन्न झाली होती. निर्भय पौरुष अन्तरीं असल्याकारणानें शस्त्राचाराचा अवलंब करण्याकडे त्यांचा सहजच ओढा होता. पण अन्य मार्गांचाहि सत्कार न करण्याची क्षुद्रता त्यांच्या ठिकाणीं नव्हती. " सगळ्यांनींच आपआपल्या परीनें या परकीय राज्याच्या उच्चाटनाकरितां झटावें, त्यांत वावगें असें कांहींच नाहीं, आपल्याच मार्गाचा हेका धरून अन्य सर्व प्रकारच्या कार्य करणाऱ्यांना हीन व हेय न मानतां, सगळ्यांचें शक्य तितकें परस्परांना सहकार्य असावें, " अशी त्यांची उदात्त भूमिका होती. सद्यःकालीन राजकीय पक्षोपपक्षांचे हेवेदावे पाहिले म्हणजे परमपूजनीय डॉक्टरांच्या जीवनांतील हा बोध थोरामोठ्यांनाहि स्वतःच्या अंतःकरणांत ठसवून, सार्वजनीन जीवनांत सलोख्याचें, खेळीमेळीचें, परस्परपूरकतेचें वातावरण उत्पन्न करण्यास्तव झटणें किती आवश्यक आहे, हें समजूं शकेल.

स्वतःच्या उग्र स्वभावानुकूल अशी शस्त्राचाराची चळवळ त्यांना प्रिय असली तरी त्यांत प्रेरणा ही केवळ राष्ट्रभक्तीचीच असल्यानें, इंग्रज हा परका, शत्रु, शोषक असूनहि त्याला विरोध करणें हाच केवळ विचार त्यांच्या कार्यांत असणें शक्य नव्हतें. म्हणूनच त्यांनीं, ज्याची भक्ति अन्तःकरणांत आहे, तें राष्ट्र कसें आहे, त्याचें स्वरूप काय, त्याचें शरीर म्हणजेच दृश्य रूप कोणामुळें बनलें आहे, त्याची प्रकृति, त्याची परंपरा, त्याचे आदर्श कसे व कोणते आहेत, या मूलभूत प्रश्नांचें गहन चिन्तन केलें. प्राचीनतम भूतकालापासून घडत आलेल्या व प्रत्यक्ष डोळ्यासमोर घडणाऱ्या विविध प्रसंगांतून, ' आपल्या या पुण्यभूमीचें राष्ट्रजीवन हें हिंदुराष्ट्रजीवनच आहे, ' या त्रिकालाबाधित सत्याचा साक्षात्कार—बाल्यदशेंत ज्याची अनुभूति सप्रमाण, असंदिग्ध व स्पष्टपणें त्यांना सांगता आली नसती—त्या सत्याचा साक्षात्कार त्यांना पूर्णपणें झाला. त्यांच्या जीवनकालांत व आजहि ज्या अनैतिहासिक व असत्य अशा तथाकथित संमिश्र-राष्ट्रवादाचा पुरस्कार व उदो उदो केला जात होता व आहे, तो राष्ट्रवाद बुद्धीला व तर्काला न पटणारा व विशुद्ध राष्ट्रभावनांना दुखावणारा आहे. त्यांत स्वकीय व परकीय;

राष्ट्रीय समाज व त्याचे शत्रु; परकीय आक्रमक व त्याच्या आक्रमणांपासून स्वदेश, स्वसमाज व स्वजीवनाचें वैशिष्ट्य याचें रक्षण करण्यास्तव प्राणपणाने झुंजणारे; यांची अक्षम्य गल्लत झाली आहे. जोवर आपले राष्ट्र या भ्रमाची व असत्याची कास धरून चालण्याचा अट्टाहास करीत राहील, तोवर त्याच्यावर एकामागून एक मोठ्या अनर्थपरपरा कोसळत राहतील. राष्ट्रजीवन अपमानित, असुरक्षित व संकट-ग्रस्त राहून त्याचा उत्तरोत्तर ऱ्हास होऊन अन्ततः क्वचित् विनाशहि त्याच्यावर ओढवूं शकेल, ही गोष्ट मागच्या चाळीस-पन्नास वर्षांच्या घटनानी सर्वांच्या निदर्शनास आणून दिलीच आहे. पक्षाभिनिवेश, दुराग्रह आणि अन्य समाजाची भीति हृदयांतून काढून टाकून आपल्या राष्ट्रजीवनाचा विचार केल्यास परम-पूजनीय डॉक्टरांचा मागोवा घेत आपण सर्वच असे म्हणू लागू की, हे आपले हिंदुराष्ट्रच आहे, मागे होतें व स्वपराक्रमाने आपल्याला ते नित्याकरिता सर्वश्रेष्ठ अवस्थेंत राखावयाचे आहे. वास्तविकपणे स्वराष्ट्रासंबधीं पूर्वपक्ष–उत्तरपक्ष करून, त्याला वादाचा विषय बनवून, आपला ‘ हिंदुराष्ट्रवाद ’ आहे हे म्हणणेंहि परम-पूजनीय डॉक्टरांच्या उत्कट अनुभूतीशीं विसंगत आहे. हा ‘ वाद ’ असूंच शकत नाहीं. हिंदुराष्ट्र हें वादातीत सत्य आहे.

आपलें आराध्य जे हिंदुराष्ट्र त्याचा असा परिपूर्ण साक्षात्कार झाल्यामुळेच त्यांना सर्व संकटे, सर्व अडचणी सुसह्य वाटल्या व आपल्या उपास्याच्या भक्तीच्या प्रखर धगींत, वैयक्तिक व कौटुंबिक जीवनाचे आकर्षण व सर्व प्रकारचा स्वार्थ जाळून भस्म करण्याचें अलौकिक सुख त्यांना अनुभवितां आले. त्याच्या या जीवनवृत्तान्तात त्यांची ही स्वराष्ट्रशरण, निःस्वार्थ, भव्य मूर्ति आपल्याला पहावयास मिळेल. व्यक्तिगत आशा-आकांक्षा, मान-सन्मान आदि समस्त स्वार्थांना दग्ध करून राष्ट्रसेवकाच्या जीवनाच्या विशुद्ध, बावनकशी स्वरूपाचे आपल्याला दर्शन होईल. त्यांच्या सदैव प्रसन्न हंसतमुख जीवनाचा अभ्यास करून, स्वार्थशून्यतेंतच खरें सुख व जीवनसाफल्याचे समाधान निहित आहे, याचा स्पष्ट बोध आपल्या अन्तःकरणावर ठसेल.

स्वार्थशून्य, ध्येयशरण जीवनच विशुद्ध, पवित्र व चारित्र्यसंपन्न असूं शकतें. आणि परमपूजनीय डॉक्टर म्हणजे अन्तर्बाह्य शुचितेची साक्षात् मूर्तीच होते, हे स्वाभाविकच आहे. शुचिता जणूं मानवरूप धरून वावरत होती, असे त्यांच्याकडे पाहून वाटत असे. सार्वजनीन कार्य करणाऱ्यांत चारित्र्याची जोपासना करण्यासंबंधीं उदासीनताच केवळ नव्हे, तर चारित्र्य आदींविषयी अवहेलना करण्याची संवय असल्यासारखे जें चोहींकडे दिसते, त्या पृष्ठभूमीवर हे धगधगीत पावित्र्याच्या तेजानें तळपत असलेले जीवन अधिकच उठावदार दिसून आपलीं मनें आकृष्ट करण्यांत समर्थ व आपल्यातहि स्वतःचे जीवन शुचिता व मांगल्ययुक्त करण्याची प्रेरणा आणि विश्वास निर्माण करणारे ठरतें.

कर्तृत्वसंपन्न, गुणवान् व्यक्ति अनेक आपत्तींतून यशाकडे वाटचाल करण्यांत सफल झाली म्हणजे तिच्यांत आत्मविश्वासाच्या ठिकाणीं अहंकार उत्पन्न होतो; स्वभाव उग्र होतो; इतरांना तुच्छ लेखण्याची प्रवृत्ति उत्पन्न होते; असें अनेकदां दृष्टोत्पत्तीस येतें. असें होणें व त्यांतून एकलकोंडेपणा उत्पन्न होणें स्वाभाविक असलें तरी इष्ट नाहीं. विशेषतः राष्ट्रसेवेचें व्रत घेणाऱ्यांना तर अशा प्रवृत्तींना थारा देणें सर्वथा अनुचित आहे. परमपूजनीय डॉक्टरांना कुलपरंपरेनें उग्र-रागीट स्वभाव व आत्मनिर्भर राहण्याचा स्वाभिमान प्राप्त झालेला होताच. त्यांतच अगदीं एकाकीपणें, अनेकविध संकटांना तोंड देऊन, त्यांच्यावर मात करून, राष्ट्रीय स्वयंसेवक संघासारखें अतुलनीय संघटित सामर्थ्य उभें करण्यांत त्यांना कल्पनातीत सफलता प्राप्त झाली होती. अशा स्थितींत अहंकार, तुसडेपणा आदि अवगुणांना त्यांच्या अंतःकरणांत प्रवेश करण्यास पुष्कळच अनुकूलता होती. पण त्यांच्या जीवनाकडे पाहतां या सर्व अवगुणांपासून ते सदैव अलिप्त होते. सौजन्य, निरभिमानिता, अहंकारराहित्य, मनमिळाऊपणा, स्वभावाचें व वाणीचें मार्दव, कशाहि परिस्थितींत क्षोभरहितता यांचाच परिपोष त्यांच्या ठिकाणीं झालेला होता, असें आपणांला दिसून येतें. वंशपरंपरेनें प्राप्त झालेला उग्र-क्रोधी स्वभावहि त्यांच्या उत्तर आयुष्यांत दिसेनासा झाला होता. ‘ स्वभावो दुरतिक्रमः ’ असें म्हणतात, पण त्याच्यावरहि त्यांनीं जय संपादन करून नियंत्रण घातलें होतें, असें अनुभवाला येतें. त्यांचें हें स्वभाव-परिवर्तन, एक मानसशास्त्रीय चमत्कारच वाटावा, असें विलक्षण होतें. हें घडलें कसें ? त्यांनीं हें विचारपूर्वक घडविलें तें कशामुळें ? हें समजून घेतलें तर या चमत्काराचा थोडाबहुत उलगडा होऊं शकेल.

स्वराष्ट्र-स्वरूपाचा निश्चित व स्पष्ट साक्षात्कार अनुभवाला येऊं लागतांच आपल्या राष्ट्राच्या अवनतीची, ऱ्हासाची, पराभवाची मीमांसा सत्यमार्गदर्शक इतिहासाच्या प्रकाशांत त्यांनीं केली. “ आपल्या समाजांतील व्यक्तींमध्यें सामाजिक भावनांचा अभाव; मातृभूमि, धर्म, संस्कृति यांचें केवळ तांत्रिक, औपचारिक स्मरण-पालन करण्यानें भागत नाहीं, तर शिर तळहातावर घेऊन सर्व परकीय आघातांपासून त्यांचें रक्षण करण्यास उद्यत असण्याच्या जाणिवेचा अभाव; सामाजिक व राष्ट्रीय कर्तव्यांसंबंधीं उदासीनता; परस्परांना नित्य साहाय्य करण्याची तत्परता नसणें; क्षुद्र स्वार्थलोलुपता; या व अशा अनेकविध अवगुणांनीं समाज पोखरला जाऊन तो असंघटित व दुबळा बनला आहे, या शक्तिहीनतेंतूनच त्याला पराभव, पारतंत्र्य व सर्व प्रकारची निकृष्टावस्था प्राप्त झाली आहे; ” हें सत्य हृदयंगम करून त्यांनीं तें सर्व समाजासमोर मांडलें व यावर एकच उपाय आहे तो म्हणजे, “ व्यक्तीव्यक्तीला, सामाजिक व राष्ट्रीय जीवनाचे सत्संस्कार करून एक सूत्रबद्ध, अनुशासित शक्तीचें अंग म्हणून सिद्ध करावयाचें आणि अशा सर्व व्यक्तींच्या स्नेहमय व्यवहारांतून, ऐकमत्यांतून,

स्वतःचें व्यक्तित्व राष्ट्राच्या समष्टींत विलीन करण्याच्या गुणांतून, अखिल देश-व्यापी, शिस्तबद्ध आणि संघटित सामर्थ्य उभें करावयाचें, " हा निष्कर्ष काढून ' हिंदुसमाज सुसंघटित करणें, ' हेंच सर्वश्रेष्ठ कर्तव्य म्हणून त्यानीं सर्व देशासमोर मांडले.

संघटन करावयाचे हें म्हणणे सोपें आहे, पण ते प्रत्यक्षात आणण्याकरितां शुद्ध राष्ट्रीय संस्कार व राष्ट्रसमर्पित जीवनाचा संस्कार अंतःकरणावर बिंबेल व दृढ राहील; परस्परानुकूल स्नेहमयता स्वभावाचा स्थायी धर्म बनेल, असे सस्कार निर्माण करणारे तंत्र उभारणे आवश्यक होते. या आवश्यकतेतूनच राष्ट्रीय स्वयसेवक संघाच्या दैनंदिन शाखाचें विशिष्ट तंत्र त्यानीं निर्माण केलें; तदंगभूत व्यवहार बसविले व स्वतःच्या उदाहरणाने—त्या व्यवहाराला अनुरूप असे स्वतःच्या दुरतिक्रम स्वभावाच्या गुणाना वळण देऊन—अशक्य तें शक्य करून दाखविले. समर्पित जीवनाचें सामर्थ्य काय काय चमत्कार करूं शकेल, हे कोण सागूं शकणार ? त्याच्या सर्वस्वार्पणातूनच त्याना, वाशिक संस्कारानाहि शुद्ध करून, अनिष्ट ते नष्ट करून, इष्ट व आवश्यक गुणाची सस्थापना व जोपासना करण्याची अतिमानवीय शक्ति प्राप्त झालेली होती.

आणि या असामान्य शक्तीचे परिपूर्ण दर्शन आपल्याला देणारी आणखी एक महत्त्वाची गोष्ट माडणे आवश्यक आहे. प्रस्तुत चरित्र वाचताना परमपूजनीय डॉक्टराच्या असंख्य राजकीय उलाढाली आपल्या ध्यानांत येतात. इंग्रज हा परका प्रत्यक्ष दिसत होता. त्याचे अत्याचारी शासन असह्यपणे अनुभवाला येत होते. अशा परिस्थितींत इग्रजाला घालवून लावणे व पूर्ण स्वातंत्र्य प्राप्त करणे हेच प्रामुख्याने जीवित-कर्तव्य आहे, असें प्रत्येक श्रेष्ठ विचारवन्ताला वाटत होते. लोकमान्याच्या काळीं ' राजकारण कीं समाजकारण ' या वादात लोकमान्यानीं असंदिग्धपणे राजकारणाचाच स्वीकार व पुरस्कार केला होता, तो याच विचारातून. आणि याच विचारातून परमपूजनीय डॉक्टरहि म्हणत असत कीं, " परतंत्र राष्ट्राला स्वातंत्र्यार्थ झटण्याव्यतिरिक्त अन्य कोणतेच राजकारण असूं शकत नाहीं. " आणि म्हणूनच निवडणुका, कौन्सिलें इत्यादींकडे त्यानीं उपेक्षेनेच पाहिले होते. अन्यान्य सामाजिक कार्यातहि, स्वातंत्र्याच्या झगड्यांत त्याचा उपयोग व्हावा, याच हेतूनें ते लक्ष घालताना दिसतात.

परिस्थित्यनुरूप राजकारणाचा ध्यासता जरी त्याना लागलेला होता तरी राष्ट्राच्या उत्कर्षापकर्षाच्या कारणाची मीमासा करून चिरकालिक राष्ट्रोत्थानाकरिता प्रचलित, अर्थात् चालू असलेले स्पर्धा-ईर्षादिमय राजकारण उपयुक्त नाहीं; पुरेशी दक्षता न घेतली तर क्वचित् ते हानिकारकहि ठरू शकेल; हें ध्यानात घेतले व राष्ट्राच्या उज्ज्वल भवितव्याची आधारशिला त्याचे जागृत, अनुशासित सुसंघटित सामर्थ्यच आहे, हें सत्य हृदयंगम करून त्यांनीं परिस्थितीचे आघात व कधीं कधीं

स्वकीयांची टीका, हेटाळणीहि हंसत हंसत सहन करून; तें सामर्थ्य उभें करण्याचें तंत्रच जीवनसर्वस्वानें अवलंबिलें आणि आपल्या पूर्वायुष्यांतील क्रान्तिकारी, शस्त्राचारी, तसेंच काँग्रेस, हिंदुमहासभा आदींतील आपले सर्व संबंध हळुवारपणें त्यांनीं दूर सारले. त्या त्या क्षेत्रांतील राष्ट्रभक्त श्रेष्ठींविषयीं व त्यांच्या कार्यकलापाविषयीं आदर ठेवून; त्यांच्यासंबंधीं अनादराचे विचार क्षणमात्रहि मनांत येऊं न देण्याची दक्षता घेण्यास्तव सर्व स्वयंसेवकांनाहि त्यांनीं शिकविलें; पण "त्या सर्व कार्यपद्धतीपासून अलिप्त राहूनच समाज-संघटना करणें शक्य आहे व तसेंच प्रत्येक कार्यकर्त्यानें असलें पाहिजे," असा स्वतःचा आदर्श सगळ्यांपुढें ठेवून ती शिकवण दिली.

बालपणापासून विविध राजकीय उलाढाली केलेल्याला, परकीय राज्यकर्त्यांच्या नामोल्लेखमात्रेंकरून क्षुब्ध व क्रुद्ध होणाऱ्या अतीव संवेदनाक्षम व उत्कट भावनापूर्ण व्यक्तीला प्रचलित राजकीय कार्यकलापांतून अंग काढून घेणें, मन काढून घेणें व सर्वतोपरी बुद्धीला पटलेल्या कार्याला स्वतःची बुद्धि, भावभावना अनुकूल करणें किती दुर्घट झालें असेल व असें अति कठिण परिवर्तन स्वतःमध्यें घडवून आणणाऱ्याची विवेकशक्ति किती पराकोटीची सामर्थ्यवान् असेल; स्वतःच्या निष्कर्षावर व तदनुरूप स्वीकृत कार्य आणि कार्यपद्धति यांवर किती अविचल निष्ठा असेल, याची कल्पनाहि करणें कठिण आहे. असा कल्पनातीत शक्तिसंपन्न विवेक व कार्यैकनिष्ठा त्यांच्या पवित्र, निःस्वार्थ व राष्ट्रसमर्पित जीवनांतूनच प्राप्त होणें शक्य होतें. हा त्यांच्या जीवनांतील अति भव्य व अनाकलनीय असा चमत्कार आहे.

या व अशा दृष्टीनें प्रस्तुत चरित्र वाचणें लाभदायक होईल. सामान्य दिसणाऱ्या बाह्य स्वरूपांत असामान्यत्वाचें तेज येथें दिसेल व प्रत्येकाच्या मनांत आत्मविश्वासाचें बीजारोपण होईल कीं, "मीहि राष्ट्रसमर्पितत्वाचे संस्कार अन्तःकरणांत उमटवून, त्यांना दृढ राखून, स्वतःच्या विकृतींना नष्ट करून, स्वभाव शुद्ध करून, राष्ट्राच्या चिरंजीव वैभवाच्या निर्मितीस्तव व बाह्य वातावरणाच्या आकर्षणांना जिंकून, राष्ट्राच्या चिरकालिक शक्तीचा एक अढळ अंश म्हणून यावज्जीव परिश्रम करीत आपलें जीवन सफल करूं शकेन."

परमपूजनीय डॉ. हेडगेवार यांच्या दिव्य जीवनाचा हाच आशादायी, स्फूर्तिप्रद संदेश आहे व या ग्रंथाची, मला वाटतें, हीच फलश्रुति आहे. हा संदेश घरोघर, व्यक्तीव्यक्तीच्या अन्तःकरणांत पोहोंचो व लेखकाचे परिश्रम सफल होवोत. इति.

श्रीमच्छंकराचार्य-जयंती :<br>वैशाख शुद्ध ५, शके १८८२

— मा. स. गोळवलकर

## हृद्गत

राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे संस्थापक परमपूजनीय डॉ. केशव बळिराम हेडगेवार यांचें हे चरित्र आज सर्वाच्या हातात देतांना अत्यत आनंद होत आहे. महान् विभूतीच्या चरित्र-ग्रथाला तितक्याच तोलामोलाच्या व्यक्तीकडून प्रस्तावना मिळणे हा मणिकाचनयोग मानला पाहिजे. प्रस्तुत चरित्राच्या बाबतींत परमपूजनीय श्रीगुरुजींची प्रस्तावना लाभली, हे माझे महद्भाग्य आहे.

परमपूजनीय डॉक्टराचे विस्तृत चरित्र वस्तुतः यापूर्वींच प्रसिद्ध व्हावयास हवें होते. त्याच्या निधनाला वीस वर्षें पूर्ण होऊन गेली. एवढ्या अवधीत त्यांचें एक ' ओझरते दर्शन ' घडविणारे चरित्र प्रसिद्ध होऊन त्याच्या हिंदुस्थानातील कांहीं भाषांतून दोन-तीन आवृत्त्याहि प्रसृत झाल्या. त्याचप्रमाणे त्याच्या निधनानंतर त्यांच्यासंबंधीं वृत्तपत्रातून आलेल्या गौरवपर लेखाचे सकलनात्मक असे एक पुस्तक प्रसिद्ध झाले. तसेच त्याच्या आठवणीचीहि दोन पुस्तके नि एक छोटा पत्रसंग्रह हीं निघाली. याव्यतिरिक्त गेल्या अठरा-एकोणीस वर्षात प्रसगाप्रसंगानें त्याच्यासंबंधीं ' विवेक ', ' केसरी ', ' राष्ट्रशक्ति ', ' भारत ', ' ऑर्गनायझर ' ( Organiser ) आदि नियतकालिकातून बरेच लेख व आठवणी प्रसिद्ध झाल्या आहेत. या सर्व साहित्याचा हे चरित्र लिहिताना मीं सढळ हातानें उपयोग केलेला आहे.

या चरित्राची समग्र जुळणी करण्यासाठीं प. पू. डॉक्टराशी घनिष्ठ संबंध आलेल्या अनेक जणाची गेल्या काहीं वर्षात गाठ घेतली. त्या वेळीं असा अनुभव आला कीं, प पू. डॉक्टराच्या सघपूर्व जीवनातील व विशेषतः क्रातिकाळातील माहिती देणारे अनेक लोक कालवश झालेले आहेत आणि त्या काळातील जे कोणी उरले आहेत, त्याची स्मृतिहि पुसट होऊ लागली आहे. अर्थात् चरित्राचे साहित्य जमविण्याचे काम इतक्या उशिरानें हाती घेतले गेले, याविषयी चुटपुट लागल्यावांचून राहत नाही !

पण याहिपेक्षा अधिक खत जर कशाविषयीं वाटत असेल, तर ती १९४८ या वर्षीं भस्मसात् झालेल्या कागदपत्राची ! महात्मा गाधींच्या हत्येनंतर जी ठिकठिकाणीं जाळपोळ झाली त्यांत अनेक जणाजवळ असलेलीं प. पू. डॉक्टराच्या भाषणाचीं प्रतिवृत्तें व त्यांचीं पत्रे हीं नष्ट झालीं ! चरित्राच्या दृष्टीने उपयुक्त असलेली किती तरी माहिती व हिंदुस्थानातील अग्रगण्य सघटकाचे मननीय विचार ह्यांना त्या घटनेने आपण शाश्वतचेच अंतरलो ! त्या वेळी सरकारकडून जप्त करण्यांत आलेले अनेक जणांचे कागद परत मिळाले नाहींत, तर काहीं

जणांचे परत आलेले कागद कसरीनें चाळण करून टाकलेले आढळले ! त्यांतूनहि बरीचशी माहिती लुप्त झाली.

मृत्यु, विस्मृति, जाळपोळ, हेळसांड व दिरंगाई यांतून उरून जें साहित्य माझ्या हातास लागलें त्याच्याच आधारावर या चरित्रग्रंथाची ही उभारणी झालेली आहे.

प्रत्यक्ष प. पू. डॉक्टरांशीं माझा संबंध फारच थोडा आला व तोहि शाळकरी असतांना. त्यामुळें मीं प्रत्यक्ष अनुभविलेल्या गोष्टींपेक्षां इतरांकडून ऐकलेल्या गोष्टीच या लेखनांत अधिक आहेत. अशा गोष्टींची मांडणी मीं शक्य तितकी नेमकी व अचूक करण्याचा यत्न केला आहे. पण त्यांतूनहि चुका राहिल्या नसतीलच असें नाहीं.

संघस्थापनेनंतरची म्हणजे १९२५ पासूनची माहिती सांगणारे कार्यकर्ते अनेक भेटले. पण तत्पूर्वीची माहिती सांगणाऱ्या व्यक्ति फारशा आढळल्या नसल्या तरी ती उणीव नागपूरच्या 'महाराष्ट्र' वृत्तपत्राच्या जुन्या अंकांनीं बऱ्याच प्रमाणांत भरून काढली, ही गोष्ट कृतज्ञतापूर्वक व्यक्त करणें हें मी माझें कर्तव्य समजतों. ते अंक न मिळते तर १९१८ पासून १९२५ पर्यंतच्या त्यांच्या महत्त्वपूर्ण हालचाली समजूं शकल्या नसत्या.

ते जुने, पिवळे पडलेले व हात लावतांच पुरणपोळीप्रमाणें तुकडे पडणारे 'महाराष्ट्रा'चे अंक हळुवारपणानें महिनाभर हाताळतांना मनांत एक विचार सारखा घोळत होता, तो असा कीं, ऐतिहासिक दृष्टीनें महत्त्वाची माहिती पुरविणारें हें साधन अधिक टिकाऊ केलें पाहिजे. हें काम राजसत्तेकडूनच होण्यासारखें आहे. यासाठीं सत्तेकडून सर्व वृत्तपत्रांचे अंक व्यवस्थितपणें जतन केले जाऊन ते संदर्भासाठीं लागतील तेव्हां उपलब्ध होतील, अशी व्यवस्था झाली पाहिजे. यासाठीं वर्षानुवर्षें टिकूं शकेल असा चिवट कागद घेऊन त्यावर कांहीं अंक स्वतंत्रपणें छापून काढून त्यांचीं नीट बांधीव पुस्तकें बनविण्याची खटपट झाली पाहिजे. अस्तु.

स्वाभिमानी लोकांचें सामूहिक व सुसंघटित जीवन हाच कोणत्याहि राष्ट्राचा खरा पाया असतो. पण तोच पाया गेलीं अनेक शतकें वेळोवेळीं विसकटून गेल्यानें आपल्या राष्ट्राला नव-नवीन संकटांना अव्याहतपणें तोंड द्यावें लागलें आहे. आतांपर्यंत हा पाया नीट सुसूत्र नि भक्कमपणें रचावा यासाठीं अनेक जणांनीं प्रयत्न केले. पण ते प्रयत्न कांहीं वेळां चुकीच्या दिशेनें झालेले असले, तरी जे योग्य दिशेनें झाले ते सुद्धां बहुतेक वेळां अपुरे ठरले, असें स्पष्टपणें दिसून येतें. राष्ट्राच्या उभारणीचे ते प्रयत्न सातत्यानें व चढत्या-वाढत्या उत्साहानें होत राहणें नितांत आवश्यक होतें. पण तळमळ असलेली एखादी व्यक्ति गेली कीं तिनें चालू केलेलें कार्य बहुतेक वेळां बिकट परिस्थितींत विरून जातें, असाच सार्वत्रिक अनुभव

म्हणून बहुधा सांगावा लागेल. अशा स्थितींत जर कोणाचे प्रयत्न पहिल्या दिवसापासून आजच्या घटकेपर्यंत प्रगति व कौशल्य या दृष्टीनीं प्रभावी ठरले असतील तर ते परमपूजनीय डॉक्टर हेडगेवार याचेच होत. समाजाच्या नैमित्तिक उत्साहाला नित्याचे टिकाऊ स्वरूप आणून देणारे व समाजातील दोष मूलतःच दूर करून सामूहिक जीवनाचे दिव्य दर्शन घडविणारे असे सरकार त्याच्यावर करण्याची प्रभावी यत्रणा संघरूपानें त्यानीच उभी केली यात सदेह नाही. देशाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत लक्षावधि स्वयसेवकानी फुलून गेलेल्या सघशाखा या येथे निर्देशिलेल्या गोष्टीची साक्ष पटविण्यास पुरेशा आहेत. सघातील स्वयसेवकाची देशभक्ति, त्याची ध्येयनिष्ठा, प्रयत्नांतील चिकाटी व वृत्तीतील विजयाकाक्षा या गोष्टी आज लोकाच्या कौतुकाचा विषय झाल्या आहेत. ही गोष्टच डॉक्टराच्या असामान्य यशाची साक्षात् निशाणी होय.

हे जें संघाच्या प्रयत्नातील सामर्थ्य आहे ते सर्व परमपूजनीय डॉक्टरानीं स्वतःच्या जीवनातून प्रभावित केलेल्या हिन्दुराष्ट्राच्या पुनरुत्थानाच्या आकाक्षेचे व सघशाखेच्या रूपाने प्रचलित केलेल्या अचूक कार्यपद्धतीचे सामर्थ्य आहे. डॉक्टराची आकांक्षा आज लक्षावधि तरुणाच्या अंतःकरणातून धगधगत आहे व संघशाखाच्या वाढत्या प्रसारानें उत्तरोत्तर ती आकाक्षा विस्तारत–विस्तारत देशव्यापी होण्याच्या मार्गावर आहे. अशा वेळीं केवळ ज्या पुण्यपुरुषाच्या असाधारण प्रातिभेतून व पुण्याईतून हा राष्ट्रीय कायापालट आपल्या डोळ्यादेखत घडत आहे, त्याच्या उद्बोधक व स्फूर्तिदायक जीवनाचे जवळून दर्शन घडविण्याचा हे चरित्र म्हणजे एक अल्पसा प्रयत्न आहे.

हे चरित्र लिहिताना प. पू. डॉक्टराच्या बोलण्याचालण्यातील बारकावे कटाक्षपूर्वक दिले आहेत. ‘ लोकसंग्रह करणे ’ हा ज्यांचा स्वभाव होता, त्याची इतराशीं वागण्याची पद्धति कशी होती, हे अभ्यासणे सर्व दृष्टीनीं उपयुक्त ठरेल, हीच त्यामागील कल्पना आहे. समर्थ रामदासाचे “ शहाणे करूनि सोडावे । सकल जन ॥ ” हें वचन एका भिंतीवर लावलेले पाहून डॉक्टर उद्गारले होते कीं, “ माझ्या मतें, शहाणे करून धरावे । सकल जन ॥ ” असे लोकाना स्वाभिमानी व डोळस बनवून त्याना एका अनुशासनात वा नियत्रणात सुयोग्य दिशेने चालविण्याचें तत्रच त्याच्या वागण्या-बोलण्यातून ध्यानी येईल. तसेच, देशभक्तीने प्रेरित होऊन निःस्वार्थपणे काम करताना कधी चंदनाप्रमाणे झिजण्याचें, तर कधी कापराप्रमाणें क्षणात जळून जाण्याचेहि वांटयाला येईल; पण यापैकी परिस्थित्यनुसार जे वांटयाला येईल त्याला धिटाईनें तोड देत असतानाहि मनाची वृत्ति आनंदी नि विजयाकांक्षीच असली पाहिजे, हे त्यांचे जीवनसूत्र होते. त्यांच्या छायाचित्राखाली एकानें ‘ Teach me how to die ’ असें लिहिलेले त्यांना रुचले नव्हतें. ते म्हणाले की, ‘ Teach me how to live ! ’ असे वाक्य

येथें असावयास पाहिजे. कारण खरें शिकावयास पाहिजे आहे तें कसें जगावयाचें हेंच. ही त्यांच्या ठायींची विजयाकांक्षी जीवननिष्ठा व लोकसंग्राहक वृत्ति याच या चरित्रांतील बारीक-सारीक गोष्टींतूनहि डोकावतांना दिसतील.

परमपूजनीय डॉक्टरांनीं सुरू केलेला ' राष्ट्रीय स्वयंसेवक संघ ' सारखा बलवान् होतो आहे व त्यांतून हिंदुराष्ट्राच्या वैभवाचा काल जवळ येतो आहे, यांत शंका नाहीं. अशा वेळीं राष्ट्रदर्शी डॉक्टरांच्या या चरित्रांतून आपलें राष्ट्रीय कर्तव्य करण्याची प्रेरणा सर्वांना सतत मिळो, हीच इच्छा.

गुरुपौर्णिमा :<br>शके १८८२

—ना. ह. पालकर

# अनुक्रमणिका

✤ ✤ ✤



**परिशिष्टें**



✤ ✤ ✤

# १ : शैशव

राष्ट्रांचें पुनरुत्थान कशाच्या बळावर होतें नि कशाच्या बळावर राष्ट्रें वैभवशाली व अजिंक्य ठरतात? भूमि, लोकसंख्या, पैसा, बुद्धिमत्ता व पराक्रम या सर्व गोष्टी असूनहि राष्ट्रें धुळीला मिळाल्याची साक्ष इतिहास देतो व साम्राज्याचे मनोरे उभारणारे समाज नामशेष झालेले आपण पाहतों! रोमन गेले, ग्रीक गेले नि बाबिलोनियनांचें नांव सांगणाराहि आज कोणी उरला नाहीं! विमल व उत्कट देशभक्ति, परंपरेवरील अतूट श्रद्धा व सांघिक जीवनाचें वळण समाजांत सातत्यानें टिकविणारे महापुरुष ज्या समाजांत उदयाला येतात, तेच समाज स्वतः सुखानें जगतात नि साऱ्या जगालाहि सुखासमाधानांत जगवतात!

जगाचा सारा व्यवहार हा संघर्षमय आहे. श्रीसमर्थ रामदासांनीं त्याचें ‘ धकाधकीचा मामला ’ असें अगदीं मार्मिक वर्णन केलें आहे. या संघर्षांत कधीं जय लाभेल तर कधीं पराजय झेलावा लागेल. पण राष्ट्राची सांघिकता, देशभक्ति व विजयाकांक्षा सतेज ठेवणारे थोर पुरुष ज्या राष्ट्रांतून एकामागून एक उभे राहतात त्यांचा पराभव हा शिशिर ऋतूंत वृक्षांचीं पानें कांहीं काळ गळून जावींत तसा अल्पजीवि ठरतो व थोड्याच दिवसांत चैत्रपालवीनें राष्ट्राचा जीवनवृक्ष सळसळूं लागतो. अशा चिवट व पराक्रमी समाजासाठींच अमरता जगत असते!

सुदैवानें अशा अमरतेचा वारसा आमच्या हिन्दु समाजानें मिळविला आहे. मानवी इतिहासाचें पहिलें पान आमच्याच यशाचें गुणगान करतांना दिसेल नि तेव्हांपासून असंख्य जय-पराजयांना झेलीत व माणुसकीचा नंदादीप उजळीत या घटकेपर्यंत हिन्दुराष्ट्र आत्मविश्वासानें पुढें पुढेंच सरत आलेलें आढळेल. वेद-काळाच्याहि आधींपासून तों आजच्या खिस्ताच्या विसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत भारतांत उदयास आलेल्या कर्तृत्ववान् नररत्नांची व युगप्रवर्तकांची पुण्याईच या आमच्या परंपरेची संचालक शक्ति आहे. असें राष्ट्रचैतन्य आजच्या पडत्या काळांत प्रकर्षानें जागविणाऱ्या भारतमातेच्या अगदीं अलीकडील एका थोर सुपुत्राचें जीवन प्रस्तुत आपण पाहणार आहोंत. डॉ. हेडगेवार हे ते महापुरुष. डॉ. केशव बळिराम हेडगेवार हें त्यांचें संपूर्ण नांव.

‘ हेडगेवार ’ हें आडनांव तेलंगी असलें तरी तें घराणें ऋग्वेदांतर्गत आश्वलायन सूत्राच्या शाकलशाखीय महाराष्ट्रीय तैलंग म्हणजे देशस्थ ब्राह्मणांतील

असून काश्यप हे त्याचे गोत्र आहे. तेलंगणातील म्हणजेच आध्र प्रातातील कंदकुर्ती हे त्या घराण्याचे पूर्वीचे गाव. साधारण दीडशे वर्षापूर्वी बळिरामपंत हेडगेवाराचे आजोबा नरहरशास्त्री हे त्याच्या त्या मूळ ठिकाणाहून प्रथम नागपुरास आले व त्यानतरच्या दोन-तीन पिढ्या नागपुरातच वाढल्या.

कंदकुर्ती हा गाव आंध्र व महाराष्ट्र यांच्या जवळजवळ सीमेवर आहे. इंदूर ( निजामाबाद ) या जिल्ह्यातील बोधन तालुक्यात हा गाव मोडतो. या दोन सहस्र वस्तीच्या गावाजवळ गोदावरी, वजरा व हरिद्रा या नद्याचा त्रिवेणी सगम झालेला असून पुराणांत या तीर्थराज वंजरा-सगमाचा उल्लेख आढळतो. या नद्यांप्रमाणेच भारतातील तीन भाषाचाहि या ठिकाणी मेळावा झालेला आहे. मराठी, तेलगू व कानडी या तीनहि भाषा पाठच्या बहिणीप्रमाणे येथे प्रेमाने नादतात. पाठच्या बहिणी असे म्हणण्याचे कारण मराठी ही येथे सर्वात अधिक प्रचलित असून त्याखालोखाल तेलगू व कानडी या भाषा चालतात.

अशा तीर्थाच्या ठिकाणी एके काळी अनेक विद्वान् ब्राह्मणाची घराणी भरभराटीत होती व त्यांत हेडगेवाराचे घराणे हे अग्रेसर असल्याचे दिसून येते. वेदाचे अध्ययन व अध्यापन ही त्याची कुलपरंपरा होती. तसेच अग्निहोत्र घेण्याची प्रथाहि या घराण्याचे एक वैशिष्टय म्हणून सागावे लागेल. ज्या ज्या वेळी जगद्गुरु शंकराचार्य या भागात सचारार्थ येत, त्या त्या वेळी हेडगेवार कुटुबातील विद्वानाना त्यानी धर्मरक्षणार्थ आपले प्रतिनिधि म्हणून नियुक्त केलेले आढळते. तशा आशयाची मानपत्रे अजूनहि इंदूर ( निजामाबाद ) येथील त्याच्या वशजाच्या सग्रही आढळतात. कंदकुर्तीला श्रीधरमहाराज म्हणून एक सत होऊन गेले. त्याचे व इतर काही जणाचे कुलगुरुपद हेडगेवारानी मडित केलेले होते. “ हेडगे कुलगुरु पूर्वापार । जैसे सूर्यवशा वसिष्ठवर ॥ ” असे त्यासबधीचे वर्णन आढळते.

विद्येतील नैपुण्याबरोबरच शारीरिक सुदृढता ही देखील या घराण्यात वंशपरंपरेनेच चालत आलेली दिसते. गावातील विविध कुटुबाचे गुणदोषात्मक वैशिष्टय सामान्यतः लोकाच्या बोलण्यात येत असते. एखादे घराणे कजुष तर एखादे उधळे, एखादे रागीट तर एखादे भोळसट, अशी विशेषता निरनिराळ्या घराण्याच्या सबंधात आपणास वारवार ऐकू येते. हेडगेवार घराण्याच्या सबधातहि अशा गोष्टी कदकुर्ती भागात प्रचलित आहेत.

या घराण्यातील मंडळींचा आहार चागला भक्कम असे व त्यातील सर्व माणसे अंगापिडाने प्रायः चागली धष्टपुष्ट व बलवान् असावयाची. एकदा अवचित पावसाची सर आल्याने अगणात असलेली ज्वारीची कणगी भिजू लागली. तीत चार-पाच मण धान्य होते. तेव्हा हेडगेवारवशीय एका जोडप्याने ती कणगी सहज उचलून घरात आणली. तसेच गोदावरीच्या तटाकावर कुस्ती खेळण्याचा छंद या घराण्यांतील पुरुषांना असे. त्याच्यांतील कांहींजण इतके बलवान् होते की, ते

आपल्या घराचे लाकडी खांब खालील दगडी बैठकीवरून हंसत हंसत उचलीत असत, असें सांगतात.

आपलीं घरेंदारें सोडून अनेक ब्राह्मण कुटुंबें दीडशें-पावणेदोनशें वर्षांपूर्वी तेलंगणांतून बाहेर पडलीं. मोंगलाईत हिंदूंची होणारी उपेक्षा, छळणूक व दारिद्र्य हींच तीन कारणें प्रामुख्यानें त्यामागें होतीं. नागपूर भागांत भोंसल्यांचें घराणें स्वतःच्या पराक्रमावर उदयाला आलें होतें व त्यांच्या राजधानींत वेदविद्येला प्रतिष्ठा प्राप्त झाल्याचा लौकिक त्या काळांतहि केवळ चार दिवसांच्या टप्प्यावर असलेल्या कंदकुर्ती भागांत जाऊन पोहोंचणें सहज शक्य होतें. अशा वेळीं विद्या असून घरांत अर्धपोटी उपासमार काढीत राहण्यापेक्षां बाहेर जाऊन नागपूर-सारख्या ठिकाणीं नांव काढण्याची महत्त्वाकांक्षा हेडगेवारांसारख्या कर्तृत्ववान् मंडळींना न होती तरच नवल !

अशी महत्त्वाकांक्षा बाळगून नागपूरला आलेल्या हेडगेवार घराण्यानें थोड्याच काळांत आपल्या विद्येंतील नैपुण्यावर तेथें उत्तम लौकिक मिळविला व सुखाचा संसार थाटला. साधारणतः १९ व्या शतकाच्या मध्यापर्यंत या कुटुंबाची चांगलीच भरभराट झाली. पण १८५३ मध्यें इंग्रजी सत्तेच्या कृष्णछायेखालीं नागपूर भाग गेल्यावर इतर ठिकाणांप्रमाणेंच तेथील वेदविद्येला वाईट दिवस आले. पट्टीचे दशग्रंथी वैदिक नि शास्त्रीपंडित देखील निरुपाय झाल्यानें भिक्षुकी वृत्ति स्वीकारून दारोदार हिंडूं लागले. इंग्रजी विद्या त्या काळांत सिंहासनाधिष्ठित झाली होती व वेदविद्येला दुर्दैवानें उपेक्षा, उपहास व अज्ञातवास यांना तोंड द्यावें लागलें होतें. पण खडतर अशा त्या पडत्या काळांतहि वेदमूर्ति बळिरामपंत हेडगेवार हे नागपुरांत अत्यंत दक्षतेनें व कांटेकोरपणें वागून प्रतिष्ठेनें नांदत होते व मोठ्या चिकाटीनें त्यांनीं आपली कुलपरंपरा राखली होती.

त्यांची पत्नी ही पैठणकर घराण्यांतील होती. हें पैठणकर घराणें मूळचें तैलंगी व हेडगेवारांप्रमाणेंच नागपूर भागांत दोन-तीन पिढ्यांपूर्वींच स्थायिक झालेलें होतें. त्यांच्या पत्नीचें नांव रेवतीबाई असें होतें. ( कांहींच्या स्मरणाप्रमाणें त्यांना यमुनाबाईहि म्हणत असत. ) त्यांचा वर्ण कांहींसा उजळ व स्वभाव अत्यंत मनमिळाऊ नि शांत होता. त्या मानानें बळिरामबुवा हे स्वभावानें तापट होते. घरांत गरिबी असूनहि काटकसरीनें कोंड्याचा मांडा करून नेकीनें संसार करण्याचें कौशल्य उभयतांतहि असल्यानें घरांत समाधान असे.

त्यांना एकूण सहा अपत्यें झालीं. त्यांतील थोरल्या मुलाचें नांव महादेव असें ठेवण्यांत आलें. त्याच्या पाठीवर दोन मुली झाल्या. त्यांचीं नांवें अनुक्रमें राजू व शरयू अशीं होतीं. त्यानंतर झालेल्या मुलाचें नांव सीताराम असें ठेवण्यांत आलें. या मुलांच्या बाललीलांनीं त्यांच्या सांसारिक जीवनांत वाढता आनंद प्रवेशला होता. घराणें आधींच सुसंस्कृत वैदिकाचें व त्यांत बालमनावर आपल्या

सोज्ज्वल परंपरेचे संस्कार करण्यात बळिरामबुवा व त्याच्या पत्नी अत्यंत दक्ष होत्या. सकाळी मुलाकडून देवाला नमस्कार करून घेण्यापासून तिन्ही साजेला दिवे लावतांच 'शुभ करोति कल्याणम्' म्हणून घेईपर्यंतच्या अनेक गोष्टी कुटुबाच्या परिपाठांतील होत्या व त्यातून सहजपणे मुलाना इष्ट असे वळण मिळत होते.

असा नेटका ससार चालू असतानाच शके १८११ च्या चैत्र शुद्ध १ ला म्हणजे वर्षप्रतिपदेसारख्या अगदी साडेतीन मुहूर्तातल्या शुभदिनीच पहाटेस सौ. रेवतीबाई प्रसूत होऊन त्याना पुत्ररत्न झाले. वारहि त्या दिवशी रविवार हा महान् तेजोराशि सूर्याचाच होता. इग्रजी गणनेप्रमाणे ख्रिस्ताब्द १८८९ या वर्षाच्या एप्रिल महिन्याचा दिनाक १ त्या दिवशी होता. जन्मासवेच विजयाची गुढी उभारीत भोसल्याच्या राजधानीत त्या शुभसमयी जन्मलेले हे बालक म्हणजे या हिदुराष्ट्राच्या सघटनेचे द्रष्टे नि प्रस्तुतच्या चरित्राचे नायक डॉ. केशवराव हेडगेवार हे होत.

नवीन जन्माला येणारे मूल हे आपल्या भावभावना व आकाक्षा याना अनुरूप अशा माता-पित्याची निवड करीत असते असे म्हणतात. पण शककर्त्या शालिवाहनाच्या विजयाचे स्मरण करून देणारी गुढी घराघरावर डोलत असता जन्माला येऊन जन्मकाळचीहि निवड करण्यात आपली मार्मिक समयज्ञता जणूं त्या वेळी या मुलाने प्रकट केली होती.

शिशिरऋतु सपून निष्पर्ण वृक्षाना सळसळत्या कोमल पालवीचा साज चढविणारा व वृक्षलताना सुगंधित व मोहक पुष्पानी मण्डित करणारा ऋतुराज वसंत त्या वेळी प्रवेशत होता. रात्रीचा अधकार दूर करून दशदिशाना आशेची लाली चढवणारा उषःकाल जवळ आला होता. निसर्गातील अशा गोड संक्रमणाची सुसंधि साधून आलेले ते मूल जणू आपली मनीषाच सूचित करीत आले असावे. भारतीय जीवनातील औदासीन्याचा हिवाळा सपून भारतीय मनाला महन्मंगल आकाक्षाची पालवी फुटूं लागणार, असे दिव्य व उज्ज्वल भवितव्य रेखाटीतच जणूं या मुलाने जीवनात प्रवेश केलेला दिसतो. कारण साध्या मातीच्या घोडेस्वारांत प्राण नि त्राण फुंकून त्याचे दिग्विजयी सैन्य उभे करणाऱ्या व त्याच्या बळावर शकासारख्या प्रबळ परशत्रूंचा पुरा बीमोड करणाऱ्या सम्राट् शालिवाहनाचा विजयदिन हाच नेमका गलितगात्र व आत्मविस्मृत हिन्दुसमाजात विजयाकांक्षी संघटना उभी करणाऱ्या महापुरुषाचा जन्मदिन ठरावा, हा योगायोग तोच पडताळा मनोमन पटविणारा नाही काय ?

बळिरामबुवा हेडगेवार हे त्या काळात नागपुरात पट्टीचे विद्वान् म्हणून ओळखले जात. त्याचे सासारिक जीवन गरिबीचें पण वृत्ति सात्त्विक व स्वाभिमानी होती. या ब्राह्मण कुलात परंपरेने चालत आलेले वेदाध्ययन तर त्यानीं केलेच होते, पण त्या जोडीनें त्यांनीं अग्निहोत्र स्वीकारून कांटेकोरपणाने व भक्तीने श्रीअग्नि-

नारायणाची उपासना मोठ्या निष्ठेनें चालविली होती. पहिलीं कांहीं वर्षे त्यांनीं ' स्मार्ताग्नी 'चें पूजन केलें व पुढें तीन कुंडांच्या ' अग्निहोत्रा 'चा स्वीकार केला. श्री. बळिरामबुवांचें ऋग्वेदाचें उत्तम अध्ययन झालेलें होतें व त्यांच्या कुलपरंपरे-नुसार त्यांनीं उपजीविकेसाठीं भिक्षुकी नि कर्तव्याच्या पवित्र जाणिवेनें विद्यादान या दोनहि गोष्टी चालविल्या होत्या. पुढें पुढें मात्र ते कोणाकडे जेवावयास जात नसत. त्या काळांत शास्त्रविहित पद्धतीनें ते ठराविक घरीं प्रत्यहीं कोरान्नाची भिक्षा घेत. लाल कानटोपी घातलेली, भालप्रदेशावर भस्म चर्चिलेली, हातांत तांब्याचा कटोरा घेतलेली, हंसतमुख अशी ती बळिरामबुवांची कृश व कृष्ण मूर्ति अजूनहि कांहीं वृद्धांना आठवते. धोतर व शुभ्र उत्तरीय असा त्यांचा अगदीं साधा वेष असे.

वेदमूर्ति बळिरामबुवांच्या मुलांपैकीं सर्वांत थोरले चिरंजीव महादेवशास्त्री. हे त्यांच्या नांवाप्रमाणेंच स्वभावानें रुद्रावतारी होते. दुसरे सीतारामबुवा व तिसरे केशवराव हे दोघेहि त्यांच्या मानानें वृत्तीनें कांहींसे शांतच होते असें म्हणावें लागेल. मुलांप्रमाणें मुलीहि एकूण तीनच : सरू, राजू नि रंगू. त्यांच्यापैकीं सरू म्हणजे शरयू हिचें सासर नागपुरांतील देव यांजकडे व राजूचेंहि तेथीलच विंचुरे या घराण्यांत होतें. तिसरी रंगूताई ही पट्टलवारांकडे दिलेली होती.

मुलांमध्यें महादेवशास्त्री हे सर्वांत वडील होते. आणि ते व सीताराम नि केशव यांच्या वयांत, त्यांचे क्रम विचारांत घेतां, बरेंच अंतर होतें. महादेव यास वेदाध्ययनाकरितां संस्कृत विद्येचें आगर म्हणून विख्यात असलेलें जें काशी नगर तेथें ठेवण्यांत आलेलें होतें. ते तेथील आपलें अध्ययन पूर्ण करून नि त्यांत प्रावीण्य संपादून नागपुरांत आले व तेथें त्यांनीं आपला व्यवसायहि थाटला. त्या सुमारास सीताराम नि केशव हे नुकतेच कोठें शाळकरी म्हणून वावरूं लागलेले होते. त्यामुळें हळूहळू महादेवशास्त्री यांचा वचक त्या दोनहि धाकट्या भावांना जाणवूं लागावा, हें साहजिकच होतें व त्याप्रमाणें तो जाणवूंहि लागलेला होता.

महादेवशास्त्री हे पहिलवानी थाटांत राहत. अंगांत मलमलीचा सदरा असे व गळ्यांत सामर्थ्याची निशाणी म्हणून गंडा व ताईत रुळतांना दिसे. वर्णानें काळेसांवळे आणि मनानें व मनगटानें ते पोलादी नि खणखणीत होते. त्यांनीं आपल्या घरांतील एका भागांत एक आखाडाच थाटला होता. त्यांत करेले, मुद्गल, मलखांब, वेताचा मलखांब, गदा यांसारखीं व्यायामाचीं मुख्य मुख्य साधनेंहि जमविलेलीं होतीं. घरांत गरिबी होती तरीहि मिळकतीपैकी घरांत कांहीं दिल्यानंतर उरलेल्या पैशांतून आपल्याबरोबर आखाड्यांत दंड-बैठका काढणाऱ्या व मलखांबावर पकडी घेणाऱ्या आळींतील सवंगड्यांना महादेवशास्त्री हौसेनें थंडाई व खिलाई देत. उन्हाळ्याच्या दिवसांत तर केव्हां केव्हां भ ग घोटून ही मंडळी धुंदहि होऊन जाई.

सीताराम व केशव हे रामलक्ष्मण शाळेत जाऊन धुळाक्षरे गिरवूं लागले. घरात त्यांना वडिलाचा धाक होताच, पण महादेवशास्त्र्याची लहर साभाळण्याकडेहि त्यांना दुर्लक्ष करून चालण्यासारखे नव्हते. थोरल्या बधूच्या जोडीने आखाड्यात ‘ घुमणे ’ हे तर सहजच घडत होते. पण महादेवशास्त्र्यानी आळीतील एखाद्या नाठाळ कपूंतील मुलाला ‘ मारा ’ म्हणून सागितल्यावर या दोघानी बाह्या न सरसावल्यास “ तुम्ही त्याला ठोकून न आल्यास तुम्हाला माझ्या हातचा खरपूस मार खावा लागेल ! ” अशी धमकी त्याना ऐकावी लागे. आणि ती धमकी तेवढ्यापुरती किवा वरवरची नाही याचीहि त्याना पुरेपूर जाणीव होती. अर्थात् ते दोघेहि कोणाशी दोन हात करण्यास कचरणारे नव्हते, हेहि तितकेच खरे. महादेवशास्त्र्याचा तापट स्वभाव अन्याय वा अपमान होताच ज्वालामुखीसारखा उसळून उठे. एकदा एका निरपराधी व्यक्तीला काही गुड रस्त्यात सतावत असल्याचे त्यानी माडीवरून पाहिले. त्याचा सताप अनावर झाला व त्या भरात त्यानी थेट माडीवरून रस्त्यात उडी झोकली व आपल्या वज्रमुष्टीचे तडाखे कसे असतात याची चुणूक दाखवून त्या गुडाना पागविले. ‘ स्वभावाने हे फार रागीट असतात ’ असे ज्ञानकोशकारानी केलेले तेलगी ब्राह्मणाचे वर्णन या रागीट हेडगेवाराकडे पाहिल्यावर सार्थ वाटे.

बाल केशव शाळेत नुकताच जाऊ लागला होता. घरातहि स्तोत्रे, श्लोक, रामरक्षा आदि गोष्टीची सथा त्याला मिळू लागली होती. अभ्यास केल्यावर मित्रमडळीत मिसळून चेडू आपटण्याची चढाओढ खेळण्यात त्याचे मन रमून जाई. वऱ्हाड-मध्यप्रातातील त्या वेळच्या विलक्षण सुबत्तेच्या दृष्टीने हेडगेवाराची स्थिति गरिबीची होती हे खरे असले, तरी खाण्यापिण्यास कमी पडावे इतकी ती निकृष्टहि नव्हती, हेहि ध्यानात ठेवले पाहिजे. त्या वेळी असलेल्या स्वस्ताईने गरिबाना हात दिला होता. त्या वेळी एक रुपयाला पक्क्या सव्वामणाहून अधिक ज्वारी मिळे. दूध रुपयाला बारा ते पंधरा शेर व तूप बारा आण्याला पक्का शेर अशी विपुलता होती. त्या काळात पाच-सात वर्षापासूनच मुले धोतरे नेसू लागत व धोतराचे एक पान केवळ बारा आण्याला मिळे, व जरा तलम धोतरजोडी घ्यावयाची म्हणजे अडीच रुपये पुरे पडत. या स्वस्ताईच्या जोडीने धार्मिक कृत्ये करण्याकडेहि त्या पिढीचा ओढा होता व सुबत्तेमुळे दक्षिणा देणाऱ्याचा हातहि जरा सढळच राही.

या अनुकूलतेमुळेच बळिरामबुवानी आपल्या घरात गाय बाळगली होती. व त्यामुळे त्याची पत्नी रेवतीबाई हीसहि आपल्या मुलाना व्यायाम केल्यावर प्रेमाने दूध देण्याचे कोडकौतुक पुरविणे परवडत असे. प्राथमिक शिक्षण यथाक्रम चालू असतांनाच नागपुरात देवीची सांथ आली. आठ-नऊ वर्षाचा केशव तर देवींनी फुलून गेला. आई-वडिलांनी घेतलेल्या योग्य काळजीमुळे केशव त्यांतून बरा झाला. पण देवींनी आपल्या आगमनाच्या खुणा मात्र त्याच्या मुखावर कायमच्य

उठवून ठेवल्या. त्यानंतर लवकरच केशवचें मौंजीबंधन झालें व त्याला संध्या, पूजा, रुद्र इत्यादि ब्रह्मकर्मविषयक पाठ नित्य-नियमानें शिकविण्यांत येऊं लागला. बळिरामबुवांकडे भिक्षुकांची बरीच ये-जा असे. त्यांनीं केशवच्या वेदपठनांतील स्वच्छ नि शुद्ध उच्चारांचें कौतुक केलें कीं, त्याच्या आईवडिलांना मनस्वी समाधान वाटे.

केशव हलके हलके आपल्या बाल सवंगड्यांबरोबर हातांत चकोरी ( Ring ) घेऊन पहांटे मैलच्या मैल पळून येऊं लागला व थोरल्या बंधूंच्या संगतीनें मलखांबावरच्या कांहीं पकडीहि त्यानें आत्मसात् केल्या. केशवचें प्राथमिक शिक्षण संपण्यापूर्वींच सीतारामबुवा यांना इंग्रजी शाळेंत न घालतां नागपुरांतील श्रीरुक्मिणीमंदिरांतील वेदशाळेंत प्रविष्ट करण्यांत आलें. ती वेदशाळा श्री. नानाजी वझे या प्रसिद्ध घनपाठी विद्वानाच्या नेतृत्वाखालीं चालू होती. प्राथमिक शिक्षण संपल्यावर वास्तविक केशवची पाठवणी देखील त्याच वेदशाळेंत होणें हें त्या कुटुंबांतील परंपरेच्या दृष्टीनें स्वाभाविक ठरलें असतें. पण त्याच्या मनाचा ओढा तिकडे विशेष दिसेना. आपल्या मित्रांकडून ऐकलेल्या बाहेरील राजकारणांतील गोष्टी त्याच्या बोलण्यांत उमटूं लागल्या होत्या व ' केसरी 'चें वाचनहि मोठ्या हौसेनें तो करतांना दिसे. केशवचा हा कल त्याच्या वडिलांच्याहि ध्यानीं आल्या-वांचून कसा राहिला असेल ? अर्थातच त्या दिशेनेंच त्याचे विचार चालू होणें अगदीं स्वाभाविक होतें. तसेंच आपल्या एका मुलाला तरी नवें शिक्षण दिलेलें चांगलें, असा विचार सुचण्याइतका कालाचा ओघहि त्यांनीं ओळखला असण्याची शक्यता आहे. तसेंच घरांतील सर्वांत लहान मुलाचें कौतुक हें स्वाभाविकपणेंच घरांतील सर्वांकडून प्रायः अधिक होतें व बाल केशवची दिसूं लागलेली बुद्धिहि सर्वांकडून तसें कौतुक केलें जाण्यासारखीच होती. यामुळें केशवला इंग्रजी शाळेंत घालण्याचा विचार निश्चित होऊन त्याचें नांव महालाजवळील ' नील सिटी प्रशाळे ' ( Neill City High School ) मध्यें प्रविष्ट करण्यांत आलें.

इंग्रजी शाळेंत प्रवेश करण्यापूर्वींच बाल केशवच्या मनांत देशभक्तीचे विचार डोकावूं लागले होते. वर्गांत इतिहासाच्या तासाला शिकविलें जाणारें छत्रपति शिवाजीमहाराजांचें चरित्र तो अत्यंत तन्मयतेनें ऐके व त्यांतील रोमांचकारी अद्भुत घटनांचीं चित्रें आपल्या मनःपटलावर कोरून ठेवीत असतां, आपणहि असा पराक्रम करावा, अशी प्रेरणा त्याच्या बालमनांत प्रकर्षानें उमटत असे. लहानपणीं नागपुरांत पहांटे दुमदुमणारी तोफ, कधीं कधीं नागपूरकर भोसल्यांच्या हत्ती, घोडे व चौघडे यांच्या ऐश्वर्यांत थाटामाटांत निघणाऱ्या स्वाऱ्या, ' सरकार ' या शब्दांत केला जाणारा महाराजांचा उल्लेख, महालांतील राजवाडा, जुन्या महालांच्या सीमांवरील दगडी राजशाही वेशी, इत्यादि गोष्टींवरून नागपुरांत भोसल्यांचें राज्य आहे असाच समज कांहीं दिवस बाल केशवच्या मनांत घर करून

होता. पण वृत्तपत्रांचें वाचन, शाळेतील शिक्षकांचे शिवचरित्राच्या अनुषगानें ऐकावयास मिळालेले विचार व त्या कालात डॉ. खानखोजे, श्री. रामलाल बाजपेयी आदि तरुण क्रातिकारकाच्या विदित होणाऱ्या हालचाली यामुळे त्याच्या त्या भ्रमाचा निरास होण्यास वेळ लागला नाही. परिस्थिति कित्येक वेळा माणसाला नवी दृष्टि देत असली, तरी ती कोणाला ? तर तिचा गर्भित सदेश जाणण्याची भावनात्मक पात्रता ज्याची असेल त्यालाच. त्या दृष्टीने विचार करता देशाच्या विपरीत परिस्थितीचे सादपडसाद मनावर उमटण्याइतकी क्षमता वयाच्या नवव्या वर्षीच बाल केशवच्या सबंधात दिसू लागली होती, असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही.

इंग्लंडची राणी व्हिक्टोरिया हिच्या राज्यारोहणाला १८९७ च्या २२ जूनला ६० वर्षे पूर्ण होत होती. त्या निमित्ताने आपला जेतेपणाचा डका दलिताच्या कानावर पुनः घुमविण्यासाठी ही आलेली सधि परक्या सरकारने साधावी यात त्या सरकारच्या दृष्टीने कांहींच चुकीचे नव्हते. सर्व देशभर राज्यारोहणाच्या दिवशीं सरकारी आज्ञेने गांवोगाव समारभ साजरे झाले. प्रत्येक शाळेतहि राजनिष्ठा प्रकट करणारे समारंभ ठरविण्यात आले होते. झेंडे, पताका, हार-तुरे, वाद्ये, अत्तर-गुलाब व राजनिष्ठा प्रकट करणारीं स्वाभिमानशून्य भाषणे अशा थाटात समारभ पार पडल्यावर मुलाना मेवामिठाई वाटण्यात आली. लहान मुलाना ‘ खाऊ ’ चे केवढे आकर्षण असते हे सागण्याची आवश्यताच नाही. त्या वेळी आपल्या समाजांतील मोठमोठ्या लोकानीहि, जेथें धोरण म्हणून नव्हे, तर स्वाभिमान या विषयाची काहीच चाड राहिली नसल्यामुळे इंग्रज सम्राटाचीं भाटाप्रमाणे स्तवनें गायिली होती, तेथे त्याच घरातून वाढलेल्या अजाण मुलानीं अशा समारंभातून हाती पडलेल्या खाऊच्या पुड्यानी उल्हसित होऊन उड्या माराव्या यात आश्चर्य ते कोणते ?

पण या मेवामिठाईवरील दास्याची मुद्रा ज्या काही थोड्या जणाच्या दृष्टीला दिसली त्यात बाल केशवहि होता. त्याने तो पुडा घरी आणला व फोडून केराच्या कोपऱ्यात फेकून दिला. शेजार-पाजारची मुले खाऊचे पुडे घरी दाखवून हर्षित झालेली असता केशव तेवढा गंभीर का, असा प्रश्न पडून त्याच्या बधूंनी विचारले, “ केशव, तुला नाही वाटते मिठाई मिळाली ? ” त्यावर केशवने उत्तर दिले, “ मिळाली तर ! पण आपल्या भोसल्याचे राज्य जिकणाऱ्या राजाच्या समारभाचा आनद कसला ? ” या उत्तराचे मर्म केराच्या कोपऱ्यात अस्ताव्यस्त पडलेल्या मिठाईने सर्वांच्याच नीट ध्यानात आणून दिले असेल.

हाच स्वाभिमान १९०१ मध्येहि इग्लंडच्या सातव्या एडवर्डच्या राज्यारोहणाच्या दिवशीं बाल केशवच्या वर्तनांतून प्रकट झाला होता. त्या दिवशीं तेथील ‘ एम्प्रेस ’ गिरणीच्या चालकांनी मोठ्या थाटामाटात शोभेचे दारूकाम लावून

आपली राजनिष्ठा प्रकट केली होती. तें पाहण्यासाठीं ज्या वेळीं केशवचे बाल सवंगडी निघाले तेव्हां त्यानें उत्तर दिलें कीं, "आपण परक्या राजाचा राज्यारोहणसमारंभ साजरा करणें हें आपणांला लाजिरवाणें आहे. तेव्हां मी येणार नाहीं."

या काळांत केशव व त्याचे सवंगडी यांच्या बालमनावर स्वराज्यसंस्थापक छत्रपति शिवाजी महाराज यांच्या जीवनाचा विलक्षण प्रभाव होता. नागपुरांतील सीताबर्डीच्या किल्ल्यावर दिवसभर 'युनियन जॅक' फडकतांना दिसे. तें पाहून या मुलांना असें वाटे कीं, तें काढून टाकून तेथें भगवा झेंडा रोवला कीं तो किल्ला सर होईल. त्या कल्पनेप्रमाणें त्या मुलांनीं ठरवलें कीं, आपण त्यावर आपला झेंडा रोवावयाचा. पण तेथें तर पहारा! तेव्हां त्यावर युक्ति म्हणून घरापासून तेथपर्यंत एक भुयार खणण्याचा विचार त्यांच्यांत निश्चित झाला. झालें! दुसऱ्या दिवसापासून श्री. वझे शिक्षकांच्या घरांतील अभ्यासाच्या खोलींत कुदळी-फावडी घेऊन या लहान मुलांनीं उत्खनन चालू केलें. हें काम अर्थातच वडीलधाऱ्या मंडळींचें लक्ष नाहीं अशा वेळीं व दार लावून घेऊनच चाले. पण दोनतीन दिवसांतच–मुलांच्या अभ्यासाच्या खोलीचें दार बरेचदां बंद कां दिसतें, अशी शंका वझे गुरुजींच्या मनांत उभी राहिली नि त्यांनीं आंत जाऊन पाहिलें तों त्यांना एका कोपऱ्यांत मातीचा ढिगारा व दुसऱ्या कोपऱ्यांत खड्डा दिसून आला. आतां त्यांच्या हातचा खरपूस मार खावा लागणार या कल्पनेनें केशव व त्याचे सवंगडी खोलींतच चपापून उभे होते. वझे यांनीं 'हा काय नसता उद्योग आरंभिला आहे?' अशी पृच्छा करतांच 'खरा हेतु' मुलांनीं सांगून टाकला. तेव्हां वरकरणीं असल्या नसत्या फंदांत वेळ न घालविण्याची समज पालक या नात्यानें त्यांनीं त्या वेळीं मुलांना दिली. पण मनांतून मात्र या पोरखेळामागील उदात्त देशभक्तीच्या दर्शनानें त्यांना धन्यता वाटल्यावांचून राहिली नाहीं. पुढें मोठे होऊन केशवराव उच्च शिक्षणासाठीं कलकत्त्याला गेल्यावर ही घटना श्री. वझे मोठ्या कौतुकानें इतरांना सांगत असत.

अशी परिस्थितीची जाणीव ही केवळ वयावर व शालेय शिक्षणावर का अवलंबून असते? परक्यापुढें 'लववेना हें शिर माते!' हे उद्गार बाल-शिवाजीच्या मुखांतून निघतात नि 'चिंता करितों विश्वाची' असें बाल रामदास बोलून जातात. एवढेंच कशाला? योगविद्येच्या सामर्थ्यानें चौदाशें वर्षें जगलेल्या नि तरीहि अहंता न सुटलेल्या योगी चांगदेवाला उपदेश करण्याचा अधिकार नि उमज लहानग्या ज्ञानदेवांत असते; पण त्याच्याहि पुढें तोच ज्ञानराज लोकांच्या टवाळीला कंटाळून नि चिडून खोलीचें दार लावून फुरंगटून बसल्यावर "रागें भरावें कवणासी? । आपण ब्रह्म सर्वदेशीं ॥" असा वेदान्त त्याच्याहूनहि लहान अशा चिमुरड्या मुक्ताबाईच्या मुखांतून त्याला ऐकावा लागतो. कांहीं माणसें

स्वार्थापलीकडे कधीं जाऊंच शकत नाहींत, कांहीजण परिस्थितीने हळूहळू जाणतीं होतात—पण काहींचा जाणतेपणा हा त्यांच्या पूर्वपुण्याईने त्यांना उपजतच, अभिजातच प्राप्त झालेला केव्हा केव्हा अनुभवास येतो. त्यांतलेच हे उदाहरण नव्हे काय ?

घरची कामे करण्यात तिघेहि बंधु तत्पर असत व कष्ट करण्याला त्यातील कोणीच कोणाला हार जाणारा नव्हता. त्याच्या घरामागे नवी विहीर खणली गेली तेव्हाचा एक प्रसग या दृष्टीने उल्लेखनीय आहे. त्या नव्या विहिरीचे पाणी वापरावयास आरभ करण्यापूर्वी एक धार्मिक विधि होणार होता. या त्रिमूर्तींच्या मनात आले की, या विधीपूर्वी विहीर एकदा नीट उपसून स्वच्छ करावी. पण घरातून या गोष्टीला सहजासहजी समति मिळेल असे दिसेना. तेव्हा त्याच दिवशीं रात्री घरात निजानीज झाल्यावर सकाळसाठीं लागणारे पाणी घरात भरून ठेवून या तिघानी आपला संकल्प तडीस नेला. अशी रात्रीचा दिवस करण्याला त्याची सदैव सिद्धता असे. पण घरच्या कामाच्या जोडीने अनेकदा इतराकडेहि त्याना जावे लागे. केशवला ही गोष्ट मनातून रुचत नसे, पण वयाने सर्वात लहान असल्याने महादेवशास्त्र्यानी डोळे वटारले की त्याला जाणे भाग पडे.

एके दिवशीं पूजा आटोपून घरी परतत असता ‘ विक्रम-शशिकला ’ नाटकाची भित्तिपत्रके ठिकठिकाणी लागलेली केशवने पाहिली. मनातील आत्म-विश्वासाची जाणीव ते भित्तिपत्रक वाचून मनात बोलूं लागली कीं, “ हा कोण विक्रम ? तो नुसता ‘ श ’ शिकला तो त्याचा केवढा गाजावाजा ! माझे इतके मराठीचे शिक्षण झाले आहे की, मी पुस्तके घडाघड वाचू शकतो. पण त्याकरिता माझी कोणीच पाठ थोपटीत नाही. ” बालपणी सहज घडलेला हा अर्थविपर्यास मोठेपणी डॉ. हेडगेवाराच्या करमणुकीचा विषय कसा झाला होता, ते अनेकाच्या परिचयाचे आहे.

त्या काळच्या सर्वसामान्य रीतीप्रमाणेच त्याच्या घरातहि सोवळ्या-ओवळ्याचे कडक नियम असत. ते जाणून बुजून मोडण्याकडे केशवचा कल नसला तरी त्याविषयी विशेष आस्था मात्र त्याच्या ठायी दिसत नसे. क्वचित् प्रसंगीं घरातील कर्मठतेचे त्याला हंसू येई. ‘ Egg–ई डबल् जी, एग् म्हणजे अंडे ’ अशासारखे इंग्रजी शब्द केशव पाठ करूं लागला कीं त्याच्या थोरल्या बधूचे मस्तक केव्हा केव्हा भडके व एखाद्या वेळी त्याच्या हातातील वही देखील बाहेर अंगणात भिरकावून दिली जाई ! अर्थात् अशा वेळी रेवतीबाई पुढे येऊन महादेवशास्त्र्याना बोलत व केशवचा कैवार घेत.

आईवडिलाच्या कृपाछत्राखालीं चाललेले जीवन हे खरोखरीच अत्यंत सुखद असते. कोणी मातृच्छायेला कोकिल-कूजनाने घुमणाऱ्या व पाडाला आलेल्या घनदाट आंबराईच्या शीतल छायेची उपमा देतात, तर कोणी “ माउली माउली !

कल्पवृक्षाची साउली ।। " अशा ओवीनें माउलीचें गुणगान करतात. पण या अतिमधुर सावलीला वंचित करून पोरकेपणाच्या रखरखीत उन्हांत अत्यंत निरागस बालकांना फरपटत ओढून काढून त्यांची मौज पाहण्याची लहर कधीं कधीं नियतीला येते. अशा निर्दय लहरीची शिकार होण्याचा प्रसंग लवकरच केशववर येऊन गुदरला. या वेळीं त्याचें वय केवळ तेरा-चौदा वर्षांचें व सीताराम‌बुवांचें अठरा वर्षांचें होतें.

या घटनेचें वर्ष निश्चित समजत नाहीं; पण सन १९०२ किंवा १९०३ मधील ती घटना असावी. त्या वर्षीं नागपूर भागांत प्लेगनें भीषण थैमान घातलें होतें. एकोणिसाव्या शतकांतील शेवटचीं चार वर्षें व विसाव्या शतकाचें प्रारंभींचें दशक एवढ्या चौदा वर्षांच्या काळांत प्लेगनें हिंदुस्थानांत एक कोटीहून अधिक लोकांचा स्वाहाकार केला होता ! त्याच प्लेगच्या युगांतील हे दिवस होते. त्या वेळच्या प्लेगमधील हाल प्रत्यक्ष पाहिलेलीं वृद्ध माणसें सांगतात कीं, नागपूरच्या एक लक्ष वस्तीच्या नगरांत प्रत्येक दिवशीं तीन-तीनशें माणसें मरत ! एका परिचिताला पोहोंचवून यावें तों दुसरा अडलेला मनुष्य दारांत येऊन ' चला ' म्हणून विनंति करी. कर्तव्यदक्ष व्यक्तीला अशा आपत्कालीं पडणारे श्रम त्याचा तोच जाणे. एकाद्या दिवशीं दहा-पंधरा वेळांहि स्मशानाच्या वाऱ्या कराव्या लागत व अनेकदां सामाजिक कर्तव्याची बूज असलेल्या अशा व्यक्तीला त्या रोगाची बाधा होऊन त्यांतच त्याचाहि मृत्यु ठेवलेला असे. गांवांत राहावें तरी पंचाईत, बाहेर माळावर झोंपड्या बांधून राहावयास जावें, तर चोराचिलटांची भीति म्हणून पंचाईतच !

त्या काळीं आजकालच्याप्रमाणें प्रभावी औषधयोजनाहि होऊं शकत नव्हती व भांबावलेलें परकीय सरकार लोकांच्या दुःखांत आपल्या प्रयत्नांनीं जाणून व अजाणतां भरच घालीत होतें. त्यासंबंधीं प्रसिद्ध क्रान्तिकारक डॉ. पांडुरंगराव खानखोजे म्हणतात कीं, " कोणाला थोडा आजार झाला व सरकारला कळलें तर चटकन् शहराबाहेर तट्ट्यांच्या खोपट्यांत त्याला टाकून अधिकारी त्याला तेथेंच मरूं देत. पुष्कळ प्रसंगीं सरकारी डॉक्टरांना देखील प्लेगची इतकी भीति वाटत असे कीं, रोग्याला स्पर्शहि न करतां व आजाऱ्याची चांगली परीक्षा न करतां त्याला जबरदस्तीनें प्लेगकॅंपमध्यें मरण्यास पाठविण्यांत येत असे. रोगी प्लेगनें मेला नाहीं, तर असल्या कॅंपमध्यें सरकारी निष्काळजीपणानें खात्रीनें मरत असे. " ( ' केसरी ', ७ ऑगस्ट १९५३. )

अशी भयानक सांथ थैमान घालीत असतां बळिरामबुवा हेडगेवार यांची स्थिति अत्यंत बिकट झाली. त्यांनीं आपल्या घरांत स्वच्छतेच्या दृष्टीनें शक्य तितकी दक्षता घेतली व झोपडी बांधून बाहेर राहावयास जाण्याचा विचार लांबणीवर टाकला. अग्निहोत्राची ओढ व गरिबी हींच बहुधा त्याचीं कारणें

असावीत. किंवा आपल्या घरांतील शुचिर्भूततेवरहि त्यांचा विश्वास असावा. त्या अस्वस्थतेच्या दिवसातहि त्यांचा पहाटे चारला उठणे व थंड पाण्याने स्नान करून उबराच्या झाडाखाली सहासात वाजेपर्यंत आन्हिक करीत बसणे हा क्रम अव्याहत चालू होता. तोंच एके दिवशी त्याच्या घरात काहीं उंदीर मरून पडले! आता अधिक ताणून धरण्यात अर्थ नाही, हे ओळखून त्यानी मुलामाणसासकट श्री. विचुरे या आपल्या जामाताकडे प्रस्थान ठेवले. श्री. विचुरे याचे घर नागपुरात बडकस चौकाजवळच आहे.

या ठिकाणी गेल्यावरहि ते देव-देवतार्चनासाठी घरी येत व अत्ययात्रेला केव्हांहि बोलावणे आले तरी अळटळ न करता कर्तव्य म्हणून अवश्य जात. एवढेच नव्हे तर एकेका दिवसात अनेक हेलपाटे व अनेकदा गार पाण्याच्या आघोळी कराव्या लागत होत्या, तरीहि त्यानीं आपल्या सामाजिक कर्तव्याची चुकूनहि टाळाटाळ केली नाही.

शेवटीं एके दिवशी बळिरामबुवा यानाच प्लेगने गाठले व त्याच्याच मागोमाग रेवतीबाईहि त्याच रोगाने आजारी पडल्या. श्री. विचुरे व महादेव-शास्त्री यानीं वैद्यकीय उपचार व शुश्रूषा याची पराकाष्ठा केली, पण त्याचा काहींहि उपयोग झाला नाही. माघ वद्य चतुर्थीला विचुरे याच्या घरी बाहेरील खोलींत बळिरामबुवा व आतील खोलींत रेवतीबाई यानी थोड्याच वेळाच्या अंतराने देह ठेवले. एकाचे विरहदुःख जणू दुसऱ्याला सहन करावयाला नको, अशीच ईश्वरी योजना होती. त्याच्या निधनानंतर एकाच ताटीवरून त्याची स्मशानयात्रा काढण्यात आली नि एकाच चितेवर त्याना अग्नि देण्यात आला. त्या माउलीने ‘सहचारिणी’ हा शब्द अक्षरशः खरा करून दाखविला म्हणायचा!

तीं दोघे गेलीं. त्याचे सोने झाले! पण मुलाचे काय? त्याच्यावर तर 'या प्रसंगानें प्रत्यक्ष आकाशच कोसळले होते.

★ ★ ★

वेदशास्त्रसंपन्न बळिरामबुवा व पाठोपाठच त्यांच्या पत्नी सौ. रेवतीबाई या उभयतांच्याहि आकस्मिक नि एकसमयीन निधनामुळें हेडगेवार कुटुंबाचा सर्व भार सहजक्रमानेंच त्यांचे ज्येष्ठ पुत्र महादेवशास्त्री ह्यांच्यावर येऊन पडला. बळिरामबुवांच्या निधनानंतर यज्ञयाग व वेदपठन या द्वारां घरांत येणाऱ्या पैशाचा ओघ साहजिकपणेंच मंदावला होता व एका खांबावर द्वारका उभी असावी, तशीच कुटुंबाची स्थिति आतां झाली होती. आतां बहुतेक दिवशीं घरांतील स्वयंपाकहि सीताराम व केशव यांनाच करावा लागे. ज्या दिवशीं कोणाचें तरी आमंत्रणच येऊन बाहेर कोठें जेवावयास जावयाचें असे, त्या दिवशींच त्यांत काय खळ पडेल तेवढाच. एरव्हीं सर्वसामान्यपणें घरासमोरील अंगणांत या दोघां बंधूंनीं लाकडें फोडावींत, घरांतील सारवण करावें, पाणी भरावें नि वर सांगितल्याप्रमाणें पाकनिष्पत्तीहि करावी; इतकेंच नव्हे तर इतर पडतील तीं कामें करण्याची सिद्धता ठेवावी, असाच त्यांचा आतां नित्याचा क्रम होऊन गेला होता.

वडीलधाऱ्या मंडळींचा असलेला वचक नाहींसा झाल्यानें थोड्याच दिवसांत, कांचेचें वा इतर दडपण काढल्यावर कागद जसे वाऱ्यावर वावडीसारखे फडफडूं नि उडूं लागावेत, तशीच बहुतांशीं महादेवशास्त्र्यांची अवस्था झाली. शारीरिक बल हें मानसिक बलाच्या संगतींत व नियंत्रणांत असेल तोंवरच तें सुखदायी नि हितकर असतें. नाहींतर विचारांच्या स्थिर प्रवाहांतून विकारांच्या भोवऱ्यांत वा वावटळींत तें केव्हां जाऊन पडेल हें सांगतां येत नाहीं. आई-वडील गेल्यावर आतां घरांत महादेवशास्त्री करतील तीच पूर्व दिशा होती ! अशा वेळीं तत्कालीन लोकविचारांत प्रचलित असलेल्यांपैकींच कळत वा न कळत जडलेल्या कांहीं अनिष्ट संवयींचें वा व्यसनांचें प्राबल्य त्यांच्या वागणुकींत झाल्यास त्याला दुसरें कोण काय करणार ? अशाच प्रकारचें एक उदाहरण येथें कल्पनेकरितां देतां येण्यासारखें आहे. साधारणतः केशव कोणत्याहि कामाला कधीं कंटाळणारा नव्हता, पण भांग वाटण्याचें काम हें त्याच्याच काय पण सीतारामबुवांच्याहि अभिरुचीला मानवणारें नव्हतें. त्यामुळें या वडील भावाशीं त्यांची केव्हां केव्हां उघडपणेंच धुसफूस होऊं लागली. शेवटीं तर त्यांच्याशीं पटेना म्हणून कंटाळून

नि त्रासून जाऊन सीतारामबुवा नागपूर सोडून वेदाध्ययनासाठी इंदूरकडे निघून गेले आणि केशव हलके हलके आपल्या मित्राकडेच जाऊं लागला. ह्या काळात त्या दोघानाहि काही काही वेळां उपासहि घडे व आपल्या असतील तशा फाटक्या कपड्यावरच भागवून सर्वत्र वावरावे लागे.

त्या तशा स्थितींतहि सीतारामबुवा व केशव दोन-तीन वर्षे एकमेकाना सावरून धरीत होते. एखाद्या दिवशी केशवला दुपारी उपास पडला असला तर सीताराम-बुवा सायंकाळी स्वतः खाडा करून आपल्या नेहमीच्या घरी म्हणजे श्री. तात्याजी फडणवीस ह्याजकडे त्यास जेवावयास पाठवीत. अशी आबाळ चालू होती तरीहि केशवचे अभ्यासावरील लक्ष कधींच कमी झाले नव्हते. वर्गात तो एकदम उठून दिसणारा नव्हता, तरीहि पहिल्या पाचसात क्रमाकातच तो असे. त्या वयातहि त्याच्या सहवासात येणाऱ्या मुलाना त्याचे अलौकिक ओढ लावणारे लोभस व्यक्तित्व प्रत्ययास येई. दुरून किंवा वरूनहि साजरे दिसण्यासारखे त्याच्याजवळ त्या वेळीं काहीच नव्हते. त्याचा वर्ण सावळा होता व त्याच्या मुखावर देवीचे वण होते. तसेंच त्याचे कपडे अगदी साधे नि केव्हा केव्हा तर फाटकेहि असत. पण असे असूनहि गभीर नि कमी बोलणारा हा विद्यार्थी आपल्यासभोवती मित्राचे एक वलय सतत फिरवू शकत होता, ही गोष्ट उल्लेखनीय आहे.

या मित्राना घेऊन शाळा सुटल्यावर केशव कधी फिरावयास जाई, तर कधी तीन-चार मैलावरील तेलगखेडी तलावापर्यंत चकोरी फिरवीत जाऊन तेथे मनसोक्त पोहण्यात मग्न होई. नागपुरातील शुक्रवार तलावाच्या पूर्वांगाला पूर्वी एक लहानसा उचवटा होता. उचवट्यावर ही मित्रमडळी दोन पक्ष करून 'ध्वज' जिंकून आणण्याचा खेळ अगदीं अटीतटीने व उत्साहाने खेळताना दिसत. सघर्ष-प्रियता ही मानवी मनाची एक सहज प्रवृत्ति आहे. पण महाराष्ट्रातील श्रीशिव-छत्रपतींच्या पराक्रमी परपरेचे लोण येथील रक्तात इतके मुरलेले आहे की, लहान मुलाच्या लुटूपुटूच्या खेळातहि जे दोन पक्ष पडतात, ते सुद्धा मोगल व मराठे असेच ! शिवछत्रपतींच्या काळातील मुले फड्या निवडुगावरील लाल बोंडे हीच मुसलमानाची शिरे असे समजून ती धडावेगळी करण्याच्या मिषाने आपल्या खेळातील लटक्या तलवारीने तीं ज्या आवेशात फोडीत असत, तोच आवेश त्या मुलाच्या त्या लुटूपुटूच्या सग्रामातहि सचरत असे. शुक्रवार तलावावरून परततानाच मग कोठे या मुलाना जाणीव होई की, आपला पाय मुरगळला आहे किंवा अंग खरचटले आहे ! असा रग त्या खेळांत चढे.

त्या खेळांतील तो एकूण रंग हा केवळ वरवरचा नव्हता. त्या वेळी एकूण देशात व त्याच्याच अनुषंगाने नागपूर भागातहि राष्ट्रीय उत्थानाच्या अशा ज्या चळवळी चालू होत्या, त्यातील स्फुरणाचाच तो बालमनांतील आविष्कार होता. त्या काळी लोकमान्य टिळकांच्या 'केसरी'ची जनमनांत घुमूं लागलेली स्वाभिमानी

गर्जना येथील राज्यकर्त्या इंग्रजांचा थरकांप उडवीत होती व शिवरामपंत परांजपे ह्यांच्या ' काळा 'चा येथील तरुणांच्या मनांत होत असलेला त्वेषपूर्ण संचार त्यांना केवळ कर्दनकाळासारखाच वाटत होता ! त्याच सुमारास आफ्रिकेंतील बोअर युद्धावरून परतलेले डॉक्टर बाळकृष्ण शिवराम मुंजे ह्यांनीं राष्ट्रीय भावनेनें प्रेरित होऊन प्रत्यक्ष नागपुरांतच आपल्या वैद्यकीय व्यवसायाच्या जोडीलाच राष्ट्रीय स्वरूपाचा एक नवीनच उपक्रम चालू केला होता. त्यांनीं तेथें राष्ट्रीय वृत्तीच्या मित्रांचा एक संच उभा केला होता व त्यांच्याच प्रेरणेनें लोकांत राष्ट्रीय विचारजागृति करण्याचें कार्य त्यांजकडून विविध प्रकारें केलें जात होतें. त्यांतच लोकमान्यांनीं पुरस्कारिलेल्या चळवळी व उत्सव यांचाहि अवश्य समावेश होताच. त्यामुळें त्या सर्व चळवळी नि ते सर्व उत्सव नागपुरांतहि होऊं लागले होते. अर्थातच अशा प्रकारें नव्या विचारांचे वारे वाहूं लागल्यावर त्या विचारांनीं जागृत नि प्रेरित झालेल्या तरुणांना सभोंवतींची परिस्थिति अंतर्बाह्य अवलोकन करण्याची दृष्टि नि तिचें नेमकें निदान करण्याची बुद्धिहि क्रमाक्रमानें प्राप्त होणें स्वाभाविक होतें. जों जों हे तरुण सभोंवतीं पहात, तों तों राष्ट्रोत्थानासाठीं आपण प्रयत्नांची पराकाष्ठा केली पाहिजे, हा विचार त्यांच्या मनांत बळावूं लागे. कारण त्या परिस्थितीचें स्वरूप विचारी माणसाला अस्वस्थ करणारें व भावनाशील व्यक्तीचें रक्त तापविणारें असेंच होतें. तत्कालीन तरुण-दृष्टीला नागपुराचें दर्शन कसें भेसूर वाटे, ह्याचें चित्रण गेलीं अनेक वर्षे क्रांतिकार्यासाठीं अमेरिकेंत असणारे प्रख्यात क्रांतिकारक श्री. रामलाल बाजपेयी ह्यांनीं आपल्या ' अप्रकाशित ' आत्मचरित्रांत स्पष्टपणें रेखाटलेलें आहे. ते लिहितात : " एक काबुली पठाण लाखांच्या वस्तींत येऊन गरीब लोकांना मारून व पैसे लुबाडून सुरक्षित जाऊं शकतो. हिस्लॉप कॉलेजच्या बाजूला सर्व चाळ घाणेरड्या लोकांची होती. दारू, चरस व गांजा पिऊन भिकार मुसलमान पोरें आम्ही कॉलेजमध्यें जात असतां शिव्या देतात व आम्ही त्या मुकाट्यानें ऐकून कॉलेजमध्यें जातों. एखादा इंग्रज शिपाई गांवांत येऊन हजारों लोकांसमोर एखाद्या गरिबाला हातांनीं मारून परत जातो. आम्ही सर्व पाहतों. कोणी प्रतिकार करीत नाहीं. आखाड्यांत तालीम करावयास आम्ही शिक्षित लोक गेलों तर इतर समाज घृणेनें पाहतों. असा मुर्दाड समाज पाहून काय करावें तें समजेना. "

डॉक्टर मुंजे ह्यांचें वय १९०४–५ च्या सुमारास बत्तीस-तेहतीस होतें व त्यांच्यासभोंवतीं गोळा झालेल्या मंडळींत नैर्बंधिक कक्षेंत काम करणाऱ्या सात्विकांपासून पिस्तुलाचें खेळणें बनविणाऱ्या राजस तरुणांपर्यंत सर्वांचाच अंतर्भाव होता. नागपुरांतील कोणत्याहि सरकारविरोधी व लोकजागृतीच्या चळवळीला त्यांचें प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष प्रोत्साहन असे. लो. टिळकांच्या ' केसरी '-तून ' पैसा फंडा ' ची कल्पना मांडली जातांच ती कल्पना साकार करण्यासाठीं

नागपुरात जे प्रयत्न झाले त्यांत विद्यार्थी केशव हेडगेवार मोठ्या आपुलकीने भाग घेऊ लागला. घरात अर्ध-उपाशी जीवन जगत असतां नुसते वार लावून जेवण्याची लाज वाटे, म्हणून जिवलग मित्रांकडे पूजा, शिकवणी यांसारखी कामे करून रहाणारा केशव घरोघर हिंडून 'पैसाफंडा' साठी निधि व धान्य जमविणाऱ्यांत अग्रेसर होता, ही गोष्ट उल्लेखनीय आहे. व्यक्तीच्या दृष्टीने "भिक्षापात्र अवलंबिणे। जळो जिणे लाजिरवाणे।" अशी वृत्ति; तर राष्ट्रकार्यार्थ मात्र अर्धउपाशी स्थितीतहि निरलसतेने दारोदार हिंडण्याची तत्परता त्याच्या व्यवहारातून तेव्हाहि दिसून येई.

आई-वडिलांच्या निधनानंतर हलके हलके घरांतील संबंध बिनसू लागले असल्याने केशवला आपल्या वझे ह्या मित्राकडे अभ्यासासाठी जावे लागत होते, तरीहि त्याचे अधूनमधून घरीं जाणे-येणे असे. पण १९०५ च्या सुमारास मात्र महादेवशास्त्र्याना आपल्या भावाच्या हालचाली अगदीच अप्रसन्न करू लागल्या. "झेंडा जिंकण्याचे खेळ, सभाना जाणे, मुष्टिफंड जमविणें व चळवळीविषयी मित्रमंडळीत चर्चा करणे या गोष्टी आपल्यासारख्या गरिबासाठी नाहीत. या नसत्या भानगडीत तूं कशाला पडतोस? खावे-प्यावे, घरचीं कामे करावीत, दंड-बैठका काढाव्यात; पण या नसत्या उठाठेवी कशाला? आपण बरे की आपले घर बरे!" असा त्याचा उपदेश असे. महादेवशास्त्र्यांच्या एकूण वागणुकीचीच आता तारुण्यात येत चाललेल्या केशवला अधिकाधिक शिसारी येऊ लागली होती व अशा ह्या थोरल्या बंधूंच्या लहरींवर राहण्यापेक्षा हालअपेष्टांत राहूनहि आपल्या शिक्षणाच्या व देशसेवेच्या इच्छा पूर्ण करण्याचा त्याचा आत्मविश्वास बळावू लागला होता. या आत्मविश्वासाच्या मागे त्याच्या जिवलग मित्राचे प्रेम व त्याच्या देशभक्त शिक्षकाचा त्याच्यावरील लोभ हाच प्रेरक होता. त्याचप्रमाणें डॉ. मुंजे यांचाहि त्याला मोठाच आधार वाटे.

केशवराव आता सोळा वर्षांचे झाले होते व त्यांना सभातून मांडल्या जाणाऱ्या विषयांची गोडी लागली होती. इतरांचे असे विचार ऐकता-ऐकतां आपणहि असे बोलावयास शिकले पाहिजे, अशी कल्पना कांही समवयस्क तरुणांच्या मनात येऊन त्यांनीं दोन-तीन वर्षे एक चर्चा-मंडळहि चालविले होते. त्या चर्चामंडळाला पुढे विख्यात झालेले डॉ. पांडुरंगराव खानखोजे ह्यांच्या 'स्वदेश-बांधव' ह्या क्रांतिकारक गटाकडूनहि प्रोत्साहन मिळाले होते असे दिसते. डॉ. खानखोजे 'केसरी'तील आपल्या लेखमालेत म्हणतात : "व्याख्यानमालेच्या व ह्या स्वदेशी-प्रचाराच्या कामात गणू जोशी, मोरू अभ्यंकर, खरे, सप्रे, बाबूराव सुतार, केशवराव हेडगेवार वगैरे पुष्कळ तरुण मंडळी पुढे आली." डॉ. खानखोजे ह्यांच्या 'स्वदेश-बांधव' संघटनेकडून महाल रस्त्यावर स्वदेशी वस्तूंच्या प्रचारासाठीं 'आर्यबांधववीथिका' काढण्यांत आली होती. तिच्यामध्यें

हाती बनावटीचा ओबडधोबड साबण, गुंड्या, कागद, लिफाफे इत्यादि वस्तू विक्रीसाठीं ठेवण्यांत येत. ह्या दुकानांतील वस्तूंवर 'पांच हत्यारांची खूण' डकविलेली असे, असें सांगतात. ह्यावरून त्या दुकानाच्या प्रवर्तकांचे विचार कोठें झुकत होते, हें सहज कळण्यासारखें आहे. त्या दुकानांतहि केशवराव कांहीं वेळ विक्रीसाठीं बसत असत व शाळेंत व इतरत्र या स्वदेशी वस्तूंचा वापर करण्याविषयीं मित्रमंडळींत प्रचार करीत.

केशवरावांचे एक बाल-मित्र श्री. बळवंतराव मंडलेकर ह्यांच्या आठवणीप्रमाणें १९०५-६ च्या आगें-मागें डॉ. मुंजे ह्यांजकडे निरनिराळ्या शाळांतील निवडक विद्यार्थ्यांची गुप्त बैठक झाली होती. त्या सभेंत 'बॉंब' बनविण्याची कृति सांगितली जाऊन महाराष्ट्र व बंगालमधील परिस्थितीचें कथन करण्यांत आलें होतें. ह्या बैठकींत केशवराव हेडगेवार, मंडलेकर इत्यादि तरुण उपस्थित होते. ही सभा नेमकी कोणाच्या प्रेरणेनें घेतली गेली, हें समजत नाहीं.

ही गुप्त बैठक म्हणजे त्या वेळीं सर्व देशांतच जें एक नवें वारें संचरूं लागलें होतें, त्याचाच नागपुरांतील एक उद्रेक होता. तें वारें क्रांतीचें होतें व त्याला तात्कालिक कारण 'वंगभंगा'चें म्हणजे इंग्रज सरकारनें जनतेची इच्छा तुडवून बंगालच्या केलेल्या फाळणीचें झालेलें होतें. बंगालमधील मुसलमानांना जवळ करण्याच्या हेतूनें इंग्रज सरकारनें १९०५ च्या २९ सप्टेंबरला बंगालचीं दोन छकलें करण्याचा निर्णय संमत केला. ही गोष्ट कोणाहि देशभक्ताला रुचणारी नव्हती. ह्या अप्रिय निर्णयाची प्रतिक्रिया कदाचित् मूठभर हिंदूंत दिसून येईल व दडपशाहीनें जरा उग्र डोळे वटारले कीं, ती प्रतिक्रियाहि लवकरच जागच्या जागीं विरून जाईल, अशी सरकारची अटकळ होती. पण राष्ट्रीय चळवळींतील हिंदूंचा उत्साह ह्या फाळणीच्या घटनेनें अर्धांग झाल्याप्रमाणें लुळा-पांगळा होऊन जाईल, ही इंग्रजांची कल्पना फोल ठरली. १६ ऑक्टोबर १९०५ हा दिवस सर्व बंगालनें 'दुःखदिन' म्हणून पाळला व तेथील लक्षावधि लोकांनीं सभा, मिरवणुका व निषेधाचे ठराव यांच्या द्वारां सरकारच्या त्या कृत्यानें आपल्या मनाला झालेली तीव्र व्यथा उग्रपणें व्यक्त केली. अनेकांनीं उपवास पाळला. सर्वसामान्य जनतेची ही प्रतिक्रिया झाली. पण उसळत्या भावनांच्या अनेक तरुणांनीं विदेशी कापडांच्या होळ्या करून शाळा-प्रशाळा व महाविद्यालयें सोडण्याच्या व इंग्रजी मालावर बहिष्कार घालून स्वदेशी वस्तू वापरण्याच्या शपथा घेतल्या. पण याच तरुणांतील कांहीं जणांना हा निषेध अगदींच वरवरचा नि फिका वाटूं लागला व त्यांनीं त्याहून कांहींतरी प्रत्यक्ष परिणामकारी कृति करण्याच्या हेतूनें कलकत्ता, डाक्का आदि ठिकाणीं सशस्त्र क्रांतिपक्षांची गुप्तपणें जुळणी करण्यास प्रारंभ केला.

अशा रीतीनें निरनिराळ्या अंगांनीं नि निरनिराळ्या प्रकारांनीं जनतेचा सरकारविरोधी प्रक्षोभ प्रकट होऊं लागून त्याची प्रखरता दिवसेंदिवस वाढत

चालली, तेव्हां जनतेचा तो उठाव जागच्या जागीच दडपून टाकण्यासाठीं सरकारनेहि अनेकदां कठोर उपायांचा वरवंटा फिरवण्याची पराकाष्ठा केली. पण प्रारंभी तरी असा प्रत्येक उपाय हा क्रांतियज्ञाच्या होमकुंडांतील धडाडूं लागलेल्या ज्वाला शमविण्याऐवजी भडकविणाराच ठरला. थोड्याच दिवसात वगभग हा केवळ पूर्वेकडील एवढ्याशा प्रांताचा जिव्हाळ्याचा प्रश्न न राहता तो अखिल हिंदुस्थानचा प्रश्न झाला. सर्व प्रांतांना आत्मीयतेच्या एकसूत्रात गुंफणारी देशभक्तीची सुप्त भावना बंगालवरील इंग्रजाच्या त्या आघाताने जागृत होऊ लागली व त्यातूनच त्या भावनेची दिव्यता प्रकट करणारा ‘ वंदे मातरम् ’ हा मत्र सर्व देशात निनादू लागला ! त्या काळांत ‘ वदे मातरम् ’ ह्या मंत्राने जनमनात केवढे परिवर्तन केलें होते, ह्याचे वर्णन करताना बाबू अरविद घोष लिहितात की, “ ‘वंदे मातरम्’ हा मंत्र दिला गेला व अवघ्या एका दिवसात सबध एका जनसमाजाला देशभक्तीची दीक्षा मिळाली.” ( “ The Mantra had been given and in a single day a whole people had been converted to the religion of patriotism ” ) देशभक्तीची दीक्षा देणारा हाच मंत्र आता नागपुरातहि घुमूं लागला होता.

१९०६ च्या डिसेबरात प्रभावी स्वदेशी आदोलनाच्या उठावदार पार्श्वभूमीवर कलकत्त्याला कॉंग्रेसचे अधिवेशन पार पडले. तेथे समत झालेली स्वराज्य, स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण ही प्रत्यक्ष क्रियात्मक चळवळीची चतुःसूत्री घेऊन लोक प्रातोप्रांती परतले. ती चतुःसूत्री त्या अधिवेशनात मुख्यतः ज्याच्या प्रेरणेने नि धडाडीच्या पुरस्काराने समत झालेली होती, ते लोकमान्य टिळक नागपूरला थांबले होते व तेथे त्यांचीं झालेली ओजस्वी भाषणे केशवराव हेडगेवारांसारख्या जागृत तरुणांनी अतिशय उत्सुकतेने नि तन्मयतेने ऐकली होती. त्याचा परिणाम राष्ट्रीय भावनोद्दीपनाच्या रूपानेंच त्याच्यावर व्हावा, ही अगदी स्वाभाविक अशीच प्रक्रिया होती.

बगालमधील ते प्रक्षोभाचे वारे आता हिदुस्थानच्या प्रातोप्रांती पसरूं लागले होते. पण महाराष्ट्रांत त्यासंबंधीचा उत्साह बंगालच्या इतकाच, किंबहुना थोडाफार अधिकच उफाळून आला होता, असे म्हटले तरी चालेल. घरांतील रहस्य कमी झाल्यापासून शाळेला सुट्टी झाली की केशवराव रामपायलीला आपल्या चुलत-चुलत्याकडे जात ! हे दिसावयास दूरचे नातें दिसते खरे, पण व्यवहारांत त्यात अत्यंत घनिष्ठता होती. चुलत्यांचे नांव मोरेश्वर श्रीधर हेडगेवार असे होते. पण त्यांना सर्वजण ‘ आबाजी ’ ह्या नावानेच संबोधीत. त्यांचे शिक्षण मॅट्रिकपर्यंत झाल्यावर ते तेथील महसूल खात्यांत नोकरी करीत होते. १९०६-७ ह्या काळांत ते ‘ रेव्हेन्यू इन्स्पेक्टर ’ म्हणून काम पाहत. रामपायलीला त्यांनी एक लहानसे घर व शेत खरीदले होतें. तेथें त्यांची चार बैलांची शेती होती व

तिच्यामधून गहूं, तांदूळ, हरभरा आदि धान्य पुरेसें मिळत असे. गोठ्यांत दुभत्या गायीहि असत. ह्या चुलत्यांकडे सुट्टींत आल्यावर केशवराव तेथील तरुणांना जमवून देशांत चालू असलेल्या स्वदेशी आंदोलनाविषयीं माहिती सांगत व आपणहि आपापल्या ठिकाणीं स्वस्थ न बसतां आपापल्या परीनें ह्या आंदोलनाला हातभार लावला पाहिजे, अशी इच्छा तेथील तरुणांत उत्पन्न करात. नरहरिसिंग ठाकूर, भगोरे व डबीर आदि मंडळी या बैठकींतून त्यांनीं आपल्या प्रभावी व्यक्तित्वानें हां हां म्हणतां भारून टाकून आत्मसात् केली असतील यांत नवल तें कोणतें ?

सन १९०७ किंवा १९०८ मधल्या दसऱ्याची एक घटना केशवरावांच्या त्या वेळच्या मनःस्थितीवर चांगलाच प्रकाश टाकणारी आहे. स्वदेशीचा पुरस्कार नि ' वंदे मातरम् 'चा प्रसार यांत त्यांचें मन अगदीं रंगून गेलें होतें व क्रांतिकारक गटांतील विचारांमुळें त्यांच्या वृत्तींत निर्भयता व वाणींत ओजस्विता ओसंडूं लागणें स्वाभाविक होतें. शाळेंतील पहिलीं कांहीं वर्षें त्यांच्या वागण्यांत गांभीर्य व मुग्धता दिसे; पण देशभक्तीची भावना धगधगूं लागल्यावर त्या गांभीर्याच्या जोडीला आतां उत्साह नि अंतरंगींचे विचार सांगण्याची उत्सुकता स्पष्ट दिसूं लागली होती. त्या वर्षीं ते दसऱ्याच्या आधींच रामपायलीला आले होते.

दसऱ्याचा दिवस उजाडला नि सायंकाळीं गांवांत होणाऱ्या सीमोल्लंघनाच्या मिरवणुकीचें वृत्त मित्रांकडून केशवरावांना समजलें. त्या मिरवणुकींत गांवांतील दोनतीनशें पुरुष मंडळी एकत्रित होणार ही गोष्ट ऐकून, ही आपल्या स्वदेशीच्या प्रचाराला अत्युत्तम संधि आहे, अशी कल्पना त्यांच्या मनांत चमकून गेली. लगेच त्यांनीं आपल्या मित्रांना आपला मानस सांगून मोठ्या संख्येनें त्या कार्यक्रमाला सर्व परिचितांना आणण्याची सूचना दिली व तेहि त्या दिशेनें उद्योगाला लागले.

सायंकाळीं नेहमींच्या प्रथेप्रमाणें गांवाबाहेर जाऊन रावण मारण्यासाठीं सीमोल्लंघनाची मिरवणूक निघाली. वाद्यांच्या निनादांत सरकारी अधिकारी व गांवांतील प्रतिष्ठित नागरिक आपल्या ठेवणींतले पोषाख घालून मोठ्या थाटामाटांत मंद गतीनें चालले होते. आज मिरवणुकींत मात्र प्रतिवर्षींपेक्षां तरुणांची संख्या व उत्साह जरा स्वाभाविकच अधिक होता. मिरवणूक नेहमींच्या जागीं जाऊन पोहोंचण्याच्या बेतांत आली तोंच केशवरावांनीं ' वंदे मातरम् ' चा उद्घोष केला व संकेताप्रमाणें इतर तरुणांनीं त्यांना साथ दिली. सर्व जण रावण मारण्याच्या जागीं मिरवणूक-विसर्जन करून थोडे थांबताहेत तोंच तरुणांच्या कोंडाळ्यांत उभे राहून केशवराव व त्यांचे दोन मित्र भगोरे व डबीर यांनीं खड्या आवाजांत ' वंदे मातरम् ' राष्ट्रगीत गायिलें, आणि त्याच्या मागोमाग केशवराव ह्यांनीं ' खरें रावण मारणें म्हणजे काय ? ' असा त्या दिवशींच्या मुख्य विधीचा विषय घेऊन त्यासंबंधींच्या अभिनव कल्पनेवर अत्यंत ज्वलज्जहाल असें भाषण केलें.

अर्थातच ते भाषण ऐकून अधिकारी चपापले नि पालक हादरले ! आणि गांवांत ज्याच्या त्याच्या तोंडी तोच विषय होऊन, कोठे झाल्या प्रकाराचे कौतुक होऊं लागले तर कोठे ' आता काय होणार ? ' अशी भीति उमटू लागली !

ठरलेल्या दिवशी ठरलेल्या रस्त्याने गावाबाहेर जाऊन निर्जीवपणाने एखादा उपचार म्हणून रावणाचा वध करणाऱ्या लोकाच्या बोथट वृत्तीना आज केशव-रावानी खरेच सीमोल्लघन घडविले होते ! १९२० च्या सामूहिक आंदोलनात व त्यानतर ' वंदे मातरम् ' ची घोषणा करणे ही अत्यत सुकर गोष्ट झाली होती. पण ही सुकरता म्हणजे विसाव्या शतकाच्या प्रारभापासून ज्यानी अत्यत विपरीत परिस्थितीत निर्भयपणाने उभे राहून, गारठून थड पडलेल्या समाजाच्या कर्णरध्रात हा संजीवक मत्र फुकून जागृति आणण्याचा यत्न केला होता, त्याच्या तपस्येची परिणति होती, हे विसरून चालणार नाही.

झाल्या प्रकाराचे वृत्त आरक्षकानी वर कळविले व राजद्रोहाचा खटला भरण्याची हालचाल चालू झाली. त्यासाठी नागपुराहून सरकारी विधिज्ञ श्री. आर्मस्ट्रॉग रामपायलीला आला. तत्पूर्वींच डबीर व भगोरे या दोन विद्यार्थ्याना तेथील शाळेतून काढून टाकण्यात आले. असा दावा भरला गेला तर तिन्ही मुलाच्या आयुष्याची हानि होणार म्हणून भडाऱ्याचे श्री. पुरुषोत्तम सीताराम देव, वकील हे पुढे सरले व त्यानी जिल्हाधिकारी श्री. रुस्तुमजी ह्याची गाठ घेऊन ' या मुलाना काय कळते ? त्याच्या वयाकडे लक्ष देऊन त्याच्यावर खटला भरण्याचा विचार सोडून द्या. शिवाय त्यानी गायिलेल्या पद्यात मातृभूमीचे नुसते वर्णन आहे ' इत्यादि युक्तिवाद केला. पण ह्या युक्तिवादापेक्षा हा युक्तिवाद करताना श्री. देव वकिलानी जी पडत्या आवाजात मनधरणी केली होती त्याचाच अधिक परिणाम झाला व त्या दोन्ही विद्यार्थ्याना पुन्हा शाळेत घेण्यात आले. खटल्याचा विचार विरल्याने केशवरावहि हा रामपायलीसारख्या तहशील केंद्रातील यशस्वी अनुभव घेऊन सुट्टी संपल्यावर नागपूरला परत आले. ह्या वेळी अभियोगाचे ओढवणारे संकट टळले खरे, पण नागपुरात आल्यापासून केशवरावाच्यामागे सरकारी गुप्तचराचा ससेमिरा मात्र चालू झाला तो कायमचाच !

केशवराव परत आले व त्याचे चुलते आबाजी ह्याच्याकडे सरकारची वक्रदृष्टि वळली. रामपायलीहून त्याची बदली करण्यांत आली. ही बदली म्हणजे वड्याचे तेल वांग्यावर काढावे अशांतलाच प्रकार होता. तेव्हा अशा सरकारची नोकरीच नको असा स्वाभिमानी विचार करून त्यांनी आपल्या जागेचे त्यागपत्र पाठवून दिले. त्या वेळीं जीवनाचा विचार केवळ रुपये-आणे-पैमध्ये करणाऱ्या त्यांच्या अनेक परिचितांनीं असे निश्चितपणे उद्गार काढले असतील की, ' केशवरावांची देशभक्ति चुलत्यांना एकूण फारच भोवली ! ' पण अशा कुजबुजीकडे लक्ष देण्याला त्यांना सवडच कोठें होती ?

वंगभंगापासून चालू झालेल्या स्वदेशी आंदोलनानें संजीवित झालेल्या वातावरणाचा रंग पालटविण्यासाठीं नागपूरलाहि सरकारचे प्रयत्न चालू झाले होते. स्वदेशी दुकानासाठीं जागा देण्याचें कोणीं आज मान्य करावें, तर रातोरात कळ फिरून दुसऱ्या दिवशीं 'ती जागा मला देतां येणार नाहीं' अशी अगतिकता त्याच घरधन्याकडून ऐकूं यावी. तरुणांना संघटित व व्यायामप्रेमी बनविण्यासाठीं आखाडा चालू करावा, तर आरक्षकांच्या धमकावण्यांमुळें तो फार दिवस चालविणें अशक्य होऊन जावें. एवढेंच कशाला, श्रीछत्रपति शिवाजीमहाराज ह्यांच्या जन्मोत्सवासाठीं केवळ एखादा दिवस जागा मिळविणें हेंहि कठिण होऊं लागलें होतें! लोकनायक माधवराव अणे ह्यांच्या चरित्र-ग्रंथांत ह्या काळाचें वर्णन करतांना चरित्रकार लिहितो : "'वंदे मातरम्' हा शब्द उच्चारणारे, शिवाजी-उत्सव, गणपति-उत्सव, रामदासनवमी उत्सव यांचें चालकत्व करणारे व प्रकट सार्वजनिक सभांतून भाग घेणारे असले लोक म्हणजे वाघाच्या विक्राळ दाढांत हात घालणारे असे धैर्यशाली समजले जात!"

पण केवळ अशा विक्राळ दाढांत हात घालण्याचेंच नव्हे तर त्या विक्राळ दाढा उपटून पाडून टाकण्याचा प्रयत्न करण्याचें धैर्यहि कांहीं तरुणांत वसत होतें व त्यांनींच नागपुरांतील सभामिरवणुकांतून सरकारी अवकृपेच्या तीव्रतेची कल्पना असतांहि 'वंदे मातरम्' राष्ट्रगीताचें गायन व मंत्राचा उद्घोष अखंड चालविला होता. विद्यार्थिवर्गांत दिसणारी ही ओढ सरकारला अस्वस्थ करणारी असल्यानें 'विद्यार्थ्यांना सभा-मिरवणुकांत भाग घेण्यास प्रतिबंध करणारें व विद्यार्थ्यांवर करडी दृष्टि ठेवून त्या सभांतून भाग घेणाऱ्यांचीं नांवें शिक्षकांनीं सरकारला कळवावींत असा आदेश देणारें परिपत्रक' सर्व शाळांतून ह्याच काळांत फिरविण्यांत आलें होतें. त्या परिपत्रकानुसार शाळांशाळांतून विद्यार्थ्यांना समजहि देण्यांत आली. हें परिपत्रक 'रिस्ले सर्क्युलर' ह्या नांवानें कुख्यात आहे.

'नील सिटी प्रशाळे'तहि हें परिपत्रक अर्थातच आलें होतें; पण त्या पत्रकानें तेथील शिक्षकवर्गाची मोठीच पंचाईत झाली. त्यांचें एक मन सरकारी कृपाछत्राखालीं चालणारी शाळा म्हणून ताटाखालच्या मांजराप्रमाणें त्या परिपत्रकानुसार व्यवस्था करणें अपरिहार्य आहे असें सांगत होतें, तर दुसरें मन त्यांना आंतून खात होतें. त्या वेळचे तेथील बहुतेक शिक्षक हे विद्यार्थ्यांच्या सुदैवानें राष्ट्रीय वृत्तीचे होते व त्यामुळें 'रिस्ले परिपत्रका'चा अर्थ जरी त्यांनीं विद्यार्थ्यांना विदित केला होता तरी तो तरुणांच्या योग्य दिशेनें झेंपावणाऱ्या मनाला मुळांत आवर पडणार नाहीं इतक्या बेतानेंच. त्या शिक्षकांसंबंधीं डॉ. हेडगेवारांचे एक वर्गमित्र चांद्याचे श्री. नानासाहेब भागवत म्हणतात कीं, "शाळेंतील शिक्षक वझलवार, सोमण व बाकरे यांची राहणी साधी व पोषाख पक्का हिंदु असून ते मराठी राज्याचा अभिमान धरणारे होते. शालेय शिक्षणाबरोबर भोसल्यांचें राज्य

से गेले, ह्याची अत्यंत हृदयद्रावक हकीकत ते सागत असत. ते सर्वजण अस्सल
देशी माल वापरणारे होते. ''

शिक्षक हे असे राष्ट्रीय वृत्तीचे असल्याने सभातून विद्यार्थ्यांची प्रचंड सख्या
से. त्यावरून रिस्ले–परिपत्रकानुसार शिक्षक हे विद्यार्थ्यांवर योग्य नियत्रण ठेवू
कत नाहींत किवा इच्छीत नाहीत, ही गोष्ट सरकारी शाळाखात्याच्या ध्यानी
ण्यास विलब लागला नाही. त्या खात्याकडून प्रथम शाळाना व शाळाकडून
द्यार्थ्यांना पुन्हा पुन्हा समज मिळू लागली. पण त्याची प्रतिक्रिया अशी झाली
ी, " शाळेच्या तासाव्यतिरिक्त विद्यार्थ्यांनी इतर वेळात काय करावे हे सरकार
ोण टरवणार ? " अशा तऱ्हेचा विचार विद्यार्थि-वर्गात उत्पन्न झाला व त्या
चाराचा सर्व शाळात प्रचार करून सरकारच्या अरेरावी धोरणाविरुद्ध चळवळ
भारण्याचे बेत रचले जाऊ लागले. शाळेतील सभाना जाणाऱ्या विद्यार्थ्यांची
विहि वर कळविण्यात आल्याची भुमका उठली. पण तिने तर चळवळीच्या
चाराना अधिकच गति मिळाली. ह्या आदोलनाचे नेतृत्व प्रायः शाळेच्या
वटच्या वर्षातील विद्यार्थिप्रिय तरुणाकडे जावे, हे स्वाभाविकच होते. त्यात
शवराव हे अगदी अग्रगण्य होते. ही घटना १९०८ मधील आहे.

त्या वेळी केशवरावाचे वय १९ वर्षांचे होते आणि वयाला अनुरूप अशी
णसणीत उफाड्याची प्रकृति, निर्भय हृदय, देशभक्तीने सळसळणारे रक्त व चार
णाना बरोबर घेऊन एखादी गोष्ट अचूकपणे पार पाडण्याचे कौशल्य या सर्वच
ष्टी त्याच्या ठायी एकवटल्या होत्या. या सर्व गुणाच्या जोडीने विद्यार्थ्यात प्रिय
सणारा हा विद्यार्थी शिक्षकवर्गाचाहि तितकाच लोभाचा विषय होऊन राहिला
ता. केशवराव व त्यांचे सवंगडी यानी आपापसात विचार करून लवकरच
ाळेच्या पाहणीसाठी येणाऱ्या सरकारी पर्यवेक्षकाच्या भेटीच्या वेळी ह्या 'रिस्ले–
रिपत्रका ' विरुद्ध निदर्शन करावयाचे, असा बेत निश्चित केला. मुगीला मुगी
ळून जसा एखाद्या ठिकाणी असलेल्या साखरेचा पत्ता सर्व वारुळाला बिनबोभाट
ागावा त्याप्रमाणे शाळेत हा निदर्शनाचा सकेत हा हा म्हणता सर्व वर्गातील
द्यार्थ्यात पसरला. आपल्या वर्गात पर्यवेक्षकाने पाऊल टाकले रे टाकले की सर्व
र्गाने एक-मुखाने ' वंदे मातरम् 'ची गर्जना करून उठावे, असा तो सकेत होता.
द्यार्थ्यांच्या दृष्टीने आवश्यक असलेल्या सूचनाहि प्रसृत करण्यात आल्या. त्यातील
मुख सूचना अशी होती की, या निदर्शनानतर चौकशी ही होईलच. त्या वेळी
ा बेत कोणी रचला, ह्याविषयी कोणाहि विद्यार्थ्याने कोणाचेहि नाव म्हणून
ागावयाचे नाही. अशी सर्व सिद्धता झाली व जो तो पर्यवेक्षकाच्या भेटीच्या
ग्नाकाची वाट पाहू लागला.

ठरलेल्या दिवशी शाळेचे मुख्याध्यापक श्री. जनार्दन विनायक ओक व
सलमान पर्यवेक्षक असे दोघेजण वर्गाची पाहणी करण्यासाठी निघाले. शालान्त

( मॅट्रिक ) परीक्षेच्या विद्यार्थ्यांच्या तुकडींत त्यांनीं प्रवेश करावयाला व सर्व विद्यार्थ्यांनीं ' वंदे मातरम् ' मंत्राच्या उद्घोषानें त्यांचें अकल्पित व अपूर्व स्वागत करावयाला एकच गांठ पडली ! विद्यार्थ्यांच्या मुखावर कृतकृत्यतेच्या संतृप्तीचा आनंद उमटला होता, तर पर्यवेक्षकाची मुद्रा ' हें काय ? ' अशा आश्चर्यानें चमकून गेली ! मुख्याध्यापक तर गोंधळलेच व त्यांनीं पर्यवेक्षकांना दुसऱ्या तुकडीकडे वळविलें. पण तेथें तरी दुसरें काय वांट्याला येणार ? पहिल्या तुकडीच्या घुमलेल्या ' वंदे मातरम् 'च्या घनगंभीर गर्जनेनें उत्साहित होऊन दुसऱ्या तुकडीनें जरा चढ्या आवाजांतच व वाढत्या आत्मविश्वासानें घोषणा केल्या !

झालें ! शाळेची पाहणी येथेंच संपली व संतप्त पर्यवेक्षक तणतणत निघून गेले ! विद्यार्थ्यांची खरी कसोटी ती आतांच चालू होणार होती. ज्या वर्गांतून हे प्रकार झाले होते, त्या वर्गांत चौकशीला प्रारंभ झाला. ही योजना कोणीं ठरविली, हें पाहण्यासाठीं खोदून खोदून प्रश्न विचारण्यांत आले. पण विद्यार्थ्यांनीं ठरल्याप्रमाणें ' मौनं सर्वार्थसाधनम् ' हाच हितोपदेश अनुसरला ! कोणी कांहीं सांगेचना !

शाळेच्या चालकांना या घोषणा करणाऱ्या विद्यार्थ्यांना शिक्षा देणें भागच होतें. पण तशी उपाययोजना करण्यापूर्वीं " अजून नांवें सांगा, नाहींतर या वर्गांतील सर्वांना त्रास होईल," असें सांगण्यांत आलें. तरीहि कोठूनच शब्द उमटेना ! शेवटीं नांवें सांगेपर्यंत त्या दोनहि वर्गांतील विद्यार्थ्यांना शाळेंत बसूं दिलें जाणार नाहीं, असें निक्षून सांगण्यांत आलें. झालें, शाळा सुटली तेव्हां विद्यार्थी मुक्तकंठानें ' वंदे मातरम् ' ह्या घोषणेनें आसमंताला हादरे देत बाहेर पडले.

आतां पुढें काय ? हा प्रश्न उभा होता. ' वंदे मातरम् 'च्या त्या घोषणेचा हादरा जितका सरकारला बसला असेल त्याहूनहि केवळ कुटुंबाच्या कोषांत रमलेल्या व कोणाच्याहि अध्यांत–मध्यांत न पडतां सरळ सीध्या मवाळ मार्गानें जाणाऱ्या पालक वर्गाला अधिक जाणवला असेल. सरकारशीं संघर्ष ही गोष्ट भल्या-भल्यांनाहि जेथें कंपित करणारी होती, तेथें सर्वसामान्य पालक वर्गावर त्या घटनेनें किती परिणाम झाला असेल तें सांगणें नकोच. अनेक पालक आपापल्या मुलाला " खऱ्या म्होरक्या चळवळ्यांचीं नांवें सांगून टाक नि मोकळा हो ! " असें सांगूं लागले. पण ही गोष्ट इतकी सोपी नव्हती.

शाळेंतून परतल्यावर केशवराव हेडगेवार व त्यांचे सहकारी यांनीं डॉ. मुंजे व तेथें 'देशसेवक' वृत्तपत्र चालवीत असलेले श्री. अच्युत बळवंत कोल्हटकर यांच्या गांठीं घेऊन त्यांच्याशीं विचारविनिमय केला व सर्वांना कांहीं एक शिक्षा न करतां शाळेंत घेईपर्यंत शाळेवरच सर्व विद्यार्थ्यांनीं बहिष्कार टाकावा असें धोरण ठरवून ते परत आले. दुसऱ्या दिवशीं शाळेकडे जाणाऱ्या विविध रस्त्यांवर विद्यार्थ्यांना अडवून त्यांना शाळेंत जाण्यापासून परावृत्त करण्यासाठीं योजना

करण्यांत आली. घरीं घरीं उघडपणे शक्य नसल्यामुळे ज्या ज्या प्रकारे गुप्तपणे शक्य होईल त्या त्या प्रकारे व्यक्तिशः विद्यार्थ्यांना भेटूनहि, ह्या आंदोलनात खंबीरपणे भाग घेण्याकडे त्यांना वळविण्याचे तंत्र हाताळण्यात आले होते.

हें आदोलन साधारण दीड-दोन महिने चालू होते. ह्या अवधीत शाळेकडे जाणाऱ्या रस्त्यावर आरक्षकाचे पहारे बसविण्यात येऊन ह्या संपांतून मारामाऱ्या उद्भवू नयेत म्हणून दक्षता घेण्यात आली होती. ही विद्यार्थ्यांची एकजूट टिकविण्यासाठी अर्थातच केशवरावांना सारखे प्रयत्नरत रहावे लागत होते. ह्या कामी त्यांना अच्युतराव कोल्हटकराचे फारच साहाय्य झाले. ते त्या काळात 'नागपुरातले टिळक' म्हणून ओळखले जात असत. ते विद्यार्थ्यांच्या सभातून भाषणे देऊन त्यांचें धैर्य अचल टिकवीत होते.

हा संप चालू ·होता त्यामुळे पालकाचा व स्वातंत्र्यवादी शिक्षकाचा जीव विद्यार्थ्यांची हानि होत आहे म्हणून खालींवर होणे स्वाभाविक होते. पालकाची मुलांच्या कानावर तर सारखी किटकिट चालू झाली की, "आता संप पुरे करा नि शाळेत जा!" त्यामुळे काही विद्यार्थी निदर्शकांच्या साखळ्या तोडून जाण्याचा विचार करूं लागले, पण लगेच त्याना बांगड्या दाखवून "या भरा नि मग आत जा" अशी उत्तरे मिळूं लागलीं! शाळाच्या चालकाना शाळेच्या प्रतिष्ठेच्या दृष्टीने हा प्रकार अधिक चालू देणे हे हितकारक होणार नाही हे स्पष्टच दिसत होते. तेव्हां मुलानीं चळवळ थाबवावी व चूक मान्य करून शाळेत यावे, अशी खटपट करण्यासाठीं त्या शिक्षणसस्थेचे कार्यवाह सर बिपिन कृष्ण बोस हे एकदा तेथे आले. पण निरोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांनीं विलक्षण गिल्ला केला. बोस हे वास्तविक शात व मवाळ वृत्तीचे. त्याना तो गोंगाट सहन झाला नाही व त्यानी आपले डोके चक्क नळाखाली धरले, असे सांप्रतच्या 'सर्वोदया'चे एक कार्यकर्ते कै. तात्याजी वझलदार हे सागत असत! शेवटी श्री. बिपिन कृष्ण बोस व मुख्याध्यापक श्री. जनार्दनपत ओक यानी काही पालकाना व विद्यार्थ्यांना विश्वासात घेऊन एक तडजोड सुचविली. ती अशी होती की, चालकानी एकेका विद्यार्थ्याला विचारावे की, 'चूक झाली ना?' व त्यावर विद्यार्थ्याने नुसती मान हालवून 'होकार' द्यावा. आपले वर्ष फुकट जाणार त्यापेक्षा असे थातुर-मातुर करून पुन्हा शाळेत जाऊं लागावे, असा विचार ह्या युक्तीने विद्यार्थि-वर्गात बळावला व थोड्याच दिवसात दोन विद्यार्थी सोडून बाकी तेरा-चौदाशे विद्यार्थ्यांची शाळा पुन्हा गजबजून गेली. त्या दोघा निग्रही विद्यार्थ्यांपैकी एकाचे नांव उपलब्ध नाहीं. पण दुसऱ्या विद्यार्थ्याचे नांव केशवराव हेडगेवार हे न सागताच लक्षांत येणारें आहे.

★ ★ ★

## ३ : यवतमाळच्या विद्यागृहांत

शाळेंतून केशवरावांचें नांव काढून टाकण्यापूर्वी शिक्षकांनीं व कांहीं हित-चिंतकांनीं त्यांना आपला हट्ट सोडून देण्याचा आग्रह करून पाहिला. पण त्यांचा निश्चय अगदीं अढळ होता. घरांत उपजीविकेची चिंता नाहीं, तेव्हां शाळा सुटली तर सुटली, अशा सुरक्षिततेंतून केशवरावांनीं हा निर्णय घेतलेला नव्हता. त्यांचें मनच त्यांना सांगत होतें कीं, " ज्या मातृभूमीनें आपल्या समाजाचें सहस्रावधि वर्षे धारण व पोषण केलें आहे त्या ' मातृभूमीला वंदन असो ' असा हृदयापासून स्वाभाविकपणें उत्पन्न होणारा भाव दडवून ठेवतां येणें वा दडपून टाकतां येणें शक्य नाहीं. परक्या सरकारच्या सत्तेमुळें मातृवंदन हा जर अपराध ठरत असेल तर एकदांच काय पण असंख्यदां हा अपराध मी करीन व त्यांतून उद्‌भवणाऱ्या संकटांना व यातनांना सहर्ष तोंड देईन. " ह्याच हृदयांतील उत्कट देशभक्तीच्या प्रेरणेनें त्यांनीं तें आंदोलन निर्माण केलेलें होतें व तिला साजेशा निश्चयानेंच ' वंदे मातरम् ' चा उद्‌घोष करणें हें पाप नव्हे तर पुण्य होय, असा निर्वाळा देणारा ताठरपणा त्यांनीं दाखविला. पतंगाप्रमाणें भावनेच्या वाऱ्यावर भराऱ्या मारणारी व त्या भावनेच्या परिस्थित्यनुसार आवेग कमी झाल्यावर गोता खाऊन शरणागतीच्या कांटेरी झुडपांत कोठें तरी गुंतून जाणारी त्यांची वृत्ति नव्हती. लक्ष्याच्या रोखानें स्वतःच्या आंतरिक बलाच्या पंखांवर निर्भर राहून झंझावातालाहि न जुमानतां झेंपावणाऱ्या प्रबल गरुडाचा दृढ विश्वासच त्यांच्या वृत्तीनें धारण केला होता. त्याआधींचीं दोन-तीन वर्षे केशवरावांचें डॉक्टर मुंजे ह्यांजकडे सारखें जाणें-येणें असे व मध्यंतरीं कांहीं दिवस ते त्यांच्या घरींहि राहत होते. डॉ. मुंजे ह्यांची लढाऊ वृत्ति ध्यानांत घेतां केशवराव हेडगेवारांच्या त्या धैर्यशाली वागणुकीनें त्यांच्यासारख्या कार्यकर्त्याविषयीं डॉ. मुंजे ह्यांना धन्यताच वाटली असेल.

ह्या काळांत केशवराव हे डॉ. मुंजे ह्यांच्याकडे राहत होते तरी जेवावयास ते तेथें नसत. आपल्या मागच्या गुप्तचरांच्या ससेमिऱ्याचा त्रास कांहीं प्रमाणांत कमी व्हावा हाच त्यांच्याकडे राहावयास जाण्यामागील त्यांचा प्रमुख हेतु होता व तो हेतु सफल झाला होता, असेंच दिसून येतें. मात्र ह्या दोन-तीन वर्षांत केशव-रावांची जेवणाची इतकी आबाळ झाली कीं, महिन्यांतून कांहीं दिवस एक वेळ जेवून तर कधीं नुसते चणे-फुटाणेहि खाऊन त्यांना काढावे लागले. पण ह्या

कष्टदायक जीवनाची वाच्यता त्याच्या मुखातून त्या काळांत कधीच झाली नाहीं. मात्र पुढे आपल्या काही निकटवर्ती मित्राजवळ बोलण्याच्या ओघातच त्याचे त्या काळातील हे संस्मरण क्वचित् डोकावे.

शाळेतून नाव काढले गेले होते व पुढे काय करावे ह्याविषयी विचार चालू होता. तेवढ्या अवधीत केशवराव मध्येच एकदा आपल्या चुलत्याचा विचार घेण्यासाठी रामपायलीला गेले. आबाजी याना आपल्या पुतण्याच्या देशभक्तीची धन्यता वाटून त्यानी त्याची पाठ थोपटली ! केशवराव तेथे गेले असता ( पुढे १९३१ पासून ' लोकनायक ' म्हणून सर्वांना सुपरिचित झालेले ) यवतमाळचे श्री. माधव श्रीहरि अणे व श्री. नारायणराव वैद्य हे रामपायली येथे व्याख्यानासाठी गेले होते. त्याची भाषणे झाल्यावर आबाजीनी या आपणाकडे आलेल्या पाहुण्याजवळ ' केशवरावाना अशा अशा कारणाने शाळेतून निघावे लागले आहे, तेव्हा आपल्या यवतमाळच्या राष्ट्रीय शाळेत त्याना प्रवेश देता आल्यास पाहावे ' असा विषय काढला व त्यास त्यानीहि तत्काळ होकार दिला.

चळवळीमुळे शाळा सोडलेला विद्यार्थी म्हणून स्वाभाविकपणेच केशवरावाकडे तेथे बहुतेक सर्व जण आदरानेच पाहत. तथापि काहीं पोक्त मडळी ह्या मुलाचा तोटा होणार म्हणून हळहळत. ह्याच काळात केशवरावाना एकदा आबाजीबरोबर भडारा येथे श्री. जकातदार ह्याजकडे जाण्याचा योग आला. त्या वेळी त्याच्याकडे असिस्टट कमिशनर श्री. अमृतराव बबावाले हे बसले होते. परस्परांचा परिचय करून देताना जकातदार ह्यानी " केशवरावाचे अभ्यासाकडे लक्ष नाही. ते विद्यार्थ्यांच्या आदोलनात गुंतून स्वतःची हानि करून घेत आहेत " असा उल्लेख केला. त्याच्यासारख्या सरकारी पद विभूषित करणाऱ्या व्यक्तीला केशवरावाचा हा बाणा हानिकारक वाटणे ह्यात नवल करण्यासारखे काहीच नव्हते. त्यांनीं केशवरावाना जरा विश्वासात घेऊन सागण्यास आरभ केला कीं, " बाबा रे, आता तुला काही जाणवणार नाही, पण पुढे पश्चात्ताप करण्याचा प्रसंग येईल. तेव्हां सरळ हा नाद सोडून अभ्यास पुरा कर. राजकारण हे काहीं विद्यार्थ्यांचे क्षेत्र नाहीं ! " ते ऐकून घेऊन शातपणेच केशवरावानी त्यांना ठणकावले की, " आपण म्हणता त्याप्रमाणे मी केवळ अभ्यास करावयाला एका पायावर सिद्ध आहे. पण राजकारण करण्यासाठी आपल्यासारख्या जाणत्या मडळीनी नोकऱ्या सोडून पुढे आले पाहिजे. ते जोपर्यंत घडत नाही तोपर्यंत माझ्यासारख्या तरुणांना अभ्यास करतां करतां व वेळप्रसगी अभ्यास सोडूनहि हे केल्यावाचून गत्यतरच नाही ! "

ह्या उत्तरामागील निश्चय व जिव्हाळा इतका प्रभावी होता की, श्री. अमृतराव मुग्धच झाले ! ह्या रामपायलीच्या खेपेतच त्यांनीं नारळाच्या करवंटीत एक ' अग्निगोलक ' बनविण्याचा प्रयत्न केला व आरक्षकांच्या कोठीजवळील

भिंतीजवळच रात्रीं ९ वाजतां अंधारांत धडाका उडवून दिला ! करून सवरून नामानिराळे राहाण्याइतकी दक्षता त्यांनीं पुरेपूर घेतलेली होती व त्यामुळें चौकशीचा सरेमिरा कांहीं दिवस जरी पाठीमागें लागला तरी त्यांतून अनिष्ट असें कांहींच घडलें नाहीं.

थोडे दिवस तेथें थांबून केशवराव नागपूरला आले व डॉ. मुंजे ह्यांच्या-जवळून श्री. माधवराव अणे ह्यांच्या नांवाची चिठ्ठी घेऊन वऱ्हाडमध्यें यवतमाळला गेले. यवतमाळला वंगभंगाच्या प्रारंभींच तपस्वी डॉ. बाबासाहेब तथा नरहर शिवराम परांजपे ह्यांच्या प्रयत्नांतून एक राष्ट्रीय शाळा चालू झाली होती. ' विद्यागृह ' असें त्या संस्थेचें नांव होतें. ह्या संस्थेंत केशवराव १९०९ च्या आरंभीं येऊन प्रविष्ट झाले.

त्या वेळच्या सरकारी शाळांतील विद्यार्थ्यांवर राष्ट्रीय चळवळींत भाग न घेण्यासंबंधीं जे निर्बंध लादण्यांत आले, त्यामुळें केशवराव हेडगेवारांसारखे विद्यार्थी व डॉ. परांजपे नि श्री. बापूजी अणे यांच्यासारखे पुढारी यांना तरुण पिढीच्या अनुपस्थितीमुळें चळवळीची प्रगति रोखली जात असल्याचा अनुभव येणें क्रम-प्राप्तच होतें. अशा प्रकारची कोंडी बंगालमध्यें अधिकच जाणवूं लागली होती व त्यांतून मार्ग म्हणून तेथें राष्ट्रीय विद्यालयें व त्यांच्या शिक्षणक्रमांची आंखणी करून परीक्षा घेणारें व पदवी देणारें एक राष्ट्रीय विद्यापीठ स्थापन करण्यांत आलें. बाबू अरविंद घोष, डॉ. रासबिहारी घोष, बॅ. सुरेन्द्रनाथ बंद्योपाध्याय आदि मंडळी त्या राष्ट्रीय चळवळीची संयोजक होती.

बंगालच्या मागोमाग महाराष्ट्र, पंजाब इत्यादि प्रांतांतूनहि कमी-अधिक प्रमाणांत राष्ट्रीय वृत्तीचें वळण नव्या पिढीला देण्यासाठीं अशी चळवळ हातीं घ्यावी लागली. वऱ्हाडांत अमरावतीला ' शिवाजी विद्यालय ' व यवतमाळला ' विद्यागृह ' हीं त्याच कल्पनेंतून चालू झालीं.

यवतमाळच्या विद्यागृहाचे संस्थापक तपस्वी बाबासाहेब परांजपे ह्यांनीं तर लोकमान्य टिळकांच्या चळवळींना इतकें वाहून घेतलें कीं, त्यांना १९०८ नंतर ' खाजगी ' असें जीवनच राहिलें नव्हतें. त्यांनीं यवतमाळ जिल्ह्यांत ' विद्यागृहा ' ची कल्पना काढतांच लोकांनीं धान्य व पैसे देऊन त्या कल्पनेला मूर्तता आणली. घरोघर ठेवण्यांत आलेल्या मडक्यांतून लोकांनीं हौसेनें टाकलेल्या धान्यांतून अनेक गरीब विद्यार्थ्यांची व्यवस्था करण्यांत आली होती व जिल्ह्यांतून वार्षिक ५० रुपये जमवून देणारे ५० तरुण, तपस्वी परांजपे ह्यांनीं उभे केले होते. त्या पैशांतून व इतर देणग्यांतून शिक्षकांच्या उपजीविकेचा व शाळेचा इतर वरखर्च भागविण्यांत येई.

' विद्यागृहा ' चे मुख्याध्यापक श्री. दत्तात्रय विष्णु आपटे हे तर लो. टिळकांच्या लोभाला पात्र झालेले एक निष्ठावान्, त्यागी व सात्त्विक कार्यकर्ते होते.

सन १८९६ च्या गाजलेल्या दुष्काळनिवारण-चळवळींत लोकमान्यांनी त्यांना शेतकऱ्यात जागृति करण्यासाठी प्रचारक म्हणून पाठविले होते व त्यात त्यांच्यावर अभियोगहि झाला होता. केशवराव यवतमाळला आल्यावर श्री. बापूजी अणे ह्यांजकडेच ते बहुतेक जेवावयास असत व अभ्यासासाठी वारवार श्री. दत्तोपंत आपटे ह्यांच्या खोलीवर जात. नागपुरात गेल्या दोन-तीन महिन्यांत ' रिस्ले परिपत्रका '-विरुद्ध केलेल्या आंदोलनातील धांवपळीमुळे त्यांचा अभ्यास बराच मागे पडला होता. पण अशा विद्यार्थ्याला इतरांच्या बरोबरीला आणून सोडण्यासाठी दत्तोपंतांनी विशेष लक्ष घातले. त्या वेळचे श्री. टकले, श्री. हरिभाऊ फाटक, श्री. दादासाहेब तथा विश्वनाथ गंगाधर केतकर आदि ' विद्यागृहा 'तील शिक्षकहि त्या काळाच्या दृष्टीने त्यागात अग्रेसरच होते. त्या सर्वांनीच उपजीविकेपुरते वेतन घेऊन कार्य चालविले होते. १९१६ मध्ये लो. टिळकांना प्रश्न विचारण्यात आला होता की, "आमच्या देशातील बुद्धिमान् लोकांनी कोणता धंदा स्वीकारावा ?" त्यावर त्यांनी जी वस्तुस्थिति चित्रित केली होती ती ध्यानी घेता, राष्ट्रीय शाळांना आपल्या त्यागाने नि देशभक्तीने तोलून धरणारे ते कांही कार्यकर्ते म्हणजे, मध्यम-वर्गातील सुशिक्षितांच्या त्यागी पिढीचे अग्रदूतच होते, असेच म्हणावे लागेल.

लोकमान्य म्हणाले होते की, " आमच्यांतील उत्तम बुद्धिमान् वर्ग अद्यापि सरकारी नोकरीच्या जाळ्यात गुरफटलेला आहे. पहिल्या क्रमांकाच्या विद्वान् माणसांना मी चांगला पगार देण्यास तयार आहे, पण त्यांचा ओढा सरकारी किंवा निमसरकारी संस्थांकडे दिसतो. ही स्थिति पालटण्याला अद्याप दहा-पंधरा वर्षे गेली पाहिजेत. "

केशवरावांना येथे शिक्षक म्हणून लाभलेले श्री. दत्तोपंत आपटे हे पुढे महाराष्ट्रात एक समतोल व चिकित्सक इतिहाससंशोधक व गणिती म्हणून विख्यात झाले. श्री. दादासाहेब केतकर ह्यांच्या परिश्रमातून पुणे व नाशिक येथील ' अनाथ विद्यार्थी गृह ' ही विख्यात संस्था उभी राहिली व श्री. हरिभाऊ फाटकहि कॉंग्रेसच्या चळवळीत अखंड पुढे राहिले. अशा शिक्षकांच्या सहवासात केशवरावांचा शालान्त परीक्षेचा अभ्यास चालू होता.

' विद्यागृह ' हे विठ्ठलमंदिराच्या जवळील खोल्यांत चालविले जाई. केशवराव हे बापूजी अणे ह्यांजकडे जेवावयाला जात, तरी त्यांचा अभ्यास दत्तोपंतांच्या खोलीवर किंवा विठ्ठल-मंदिराच्या माडीवर चाले, हे पूर्वी सांगितलेच आहे. ते सकाळीच उठून स्नान-संध्या करीत व साधारण १० वाजेपर्यंत त्यांचा अभ्यास चाले. दुपारी कांही वेळा बापूजींकडे जेवावयास उशीर होई. अर्थातच अशा वेळी ते न जेवताच शाळेत जात. पण आपण आज उपाशी आहोत, याची वाच्यता मात्र त्यांच्या तोंडून कधीच झाली नाही. कांही वेळा केशवराव उपाशी असतात, ही गोष्ट दत्तोपंतांच्या सूक्ष्म दृष्टींतून सुटली नाही. त्यांनी त्याच शाळेतील

गणेश सुळे ह्याला, केशवरावांचें जेवण झालें कीं नाहीं ह्याची चौकशी करीत जाण्यास सांगून ठेवलें होतें व त्याप्रमाणें कांहीं वेळां सुळे ह्यानें केशवरावांना श्री. टकले ह्यांजकडे जेवणासाठीं नेलेंहि होतें. दत्तोपंतांना ताजे फुटाणे आवडत व ते आठवणीनें त्यांतील वांटा केशवरावांसाठीं काढून ठेवीत असत. त्या दोघांचें चांगलेंच जमून गेलें होतें.

दुपारीं ११ ते ५ अशी शाळा झाल्यावर सायंकाळीं शाळेच्या आदर्श आखाड्यांत त्यांचा नित्य नियमानें व्यायाम चाले. मागें पडलेला अभ्यास भरून काढण्यासाठीं केशवराव रात्रीं फार जागत व त्यामुळें हरिभाऊ फाटक हे केव्हां केव्हां " आरोग्याच्या दृष्टीनें हें ठीक नाहीं " असें त्यांना बोलत. ह्या अशा अभ्यासांतूनहि 'काळ', 'भाला', 'केसरी' व 'देशसेवक' हीं वृत्तपत्रें वाचण्यास ते विसरत नसत. परीक्षेवर लक्ष ठेवून केशवरावांचा अभ्यास चालू होता, पण तत्पूर्वींच या विद्यार्थ्यांची परीक्षा पाहाण्याचा विचार सरकार आंखीत होतें !

'विद्यागृहा'सारख्या संस्था केवळ लोकांच्या सहानुभूतीवर तीन-साडेतीन वर्षे चालूं शकतात व त्यामुळें सरकारी शाळांतील विद्यार्थ्यांना ओहोटी लागून त्यांतील शिक्षकहि राष्ट्रीय शाळांना जाऊन मिळतात, ही गोष्ट सरकारला खपणें शक्य नव्हतें. तसेंच अशा शाळांतून राष्ट्रीय स्वाभिमानाचा परिपोष करणारे जे विचार प्रसृत होतात, तेहि परक्या सरकारच्या डोळ्यांत सलणें स्वाभाविक होतें. केशवरावांना यवतमाळला येऊन दोन-तीन महिने झाले असतील-नसतील तोंच हिंदुस्थान सरकारनें श्री. क्लीव्हलंड नांवाचा हेरखात्यांतील वरिष्ठ अधिकारी वऱ्हाडांतील राष्ट्रीय चळवळीचा बीमोड करण्यासाठीं नियुक्त केला. १९०५ मध्यें यवतमाळला लोकमान्य टिळकांनीं तेथील तरुण कार्यकर्त्यांचा उत्साह व कार्यकर्तृत्व पाहून भाषणांत असे उद्गार काढले होते कीं, " यवतमाळ हें लवकरच लोकमताचें ठाणें होईल ! " हें त्यांचें भाकित यवतमाळ जिल्ह्यांतील वाढत्या राष्ट्रीय आंदोलनानें किती तंतोतंत खरें ठरलें होतें, त्याचें प्रत्यंतर ही जी सरकारची वक्रदृष्टि लवकरच तिकडे वळली तिजवरून पुरेपूर मिळतें.

प्रथमतः कांहीं पालकांवर अप्रत्यक्षपणें दडपण आणण्याचा सरकारी यंत्रणेंतून प्रयत्न झाला व भावी ग्रहणाचा आगाऊ वेध लागावा त्याप्रमाणें शाळेच्या पुढें आरक्षकांची चौकी बसविण्यांत आली. त्याच्या जोडीला दडपशाहीला वाचा फुटूं नये, म्हणून तपस्वी बाबासाहेब परांजपे ह्यांजकडून १०८ कलमाखालीं प्रतिभू ( जामीन ) घेण्यांत येऊन त्यांना भाषणबंदी करण्यांत आली होती. प्रथमतः अमरावतीची शाळा धाक दाखवून क्लीव्हलंडनें बंद केली व त्यामागोमाग यवतमाळच्या शाळेवर त्याची संक्रांत वळली. ही १९०९ च्या एप्रिलमधील दुर्घटना आहे.

यवतमाळची शाळा सरकारने नाहीशी केली तरी केशवराव व त्याचे तेथील कांही सहकारी निराश झाले नाहीत. उलट संकटांनाच निराश करण्या-इतका चिवटपणा त्यांनी धारण करून जुलैमध्ये होणाऱ्या कलकत्त्याच्या ' राष्ट्रीय विद्यापीठा 'च्या शालान्त परीक्षेचा अभ्यास नेटाने चालविण्याचे त्यानी ठरविले. श्री. दत्तोपंत आपटे व श्री. हरिभाऊ फाटक याचा विचार त्यानी घेतला व ' अभ्यासाच्या दृष्टीने पुण्याला चला ' असा त्या दोघांचाहि आग्रह दिसल्यावरून श्री. रामगोपाल हरदेव बाजोरिया, महादेव शिवराम जयवंत व केशवराव असे तिघेजण पुण्याला आले. पुण्यात मुजाबाच्या बोळांत सध्यां ज्या वाड्यात श्रीमत् शकराचार्यांचा मठ आहे, त्या ठिकाणी माडीवर राहून तिघेजण अभ्यास करू लागले. केशवराव व जयवत यांची जेवणाची व्यवस्था कांही दिवस वरील शिक्षकाकडे व त्यानंतर ' महाराष्ट्र ' बोर्डिंगमध्ये करण्यात आली होती. दोन महिने पुण्यात अभ्यास करून हे तिघेहि जण जुलैमध्ये अमरावतीला जाऊन परीक्षेस बसले. त्या काळात कलकत्त्याच्या ' राष्ट्रीय विद्यापीठा 'चे वऱ्हाडसाठी अमरावती येथे परीक्षा-केद्र असे. परीक्षा देऊन जुलैमध्ये केशवराव नागपूरमध्ये पुन्हा येऊन धडकले. स्वाभिमान टिकवायचा म्हणजे खरोखरी केवढी यातायात असते ! त्या वेळीं ' वंदे मातरम् ' प्रकरणात क्षमायाचना करणारे इतर विद्यार्थी परीक्षाचे निर्णय लागून वर गेले होते, तर केशवराव आताच कोठे अडथळ्याच्या स्पर्धेतील एकेक अडथळा ओलांडून पुढे निघाले होते !

★ ★ ★

# ४ : कलकत्ता

केशवराव हेडगेवार ह्यांनीं नागपूरमध्यें आल्यावर पूर्वीप्रमाणें सार्वजनिक कामांत लक्ष घालण्यास आरंभ केला. नागपुरापासून जवळच असलेल्या व कालिदासाच्या ‘ मेघदूतां ’त वर्णिलेल्या रामगिरीवर म्हणजेच ‘रामटेक’वर श्रीरामनवमीच्या वेळीं मोठी यात्रा भरत असते. ह्या यात्रेंत विकले जाणारे पेढे हे कटाक्षानें स्वदेशी विकले जावेत म्हणून त्यांनीं नागपुरांत खटपट करून “ गुळाचे पेढे ” स्वस्त व मोठ्या प्रमाणांत तेथें मांडले जातील अशी व्यवस्था केली. त्या वेळीं नागपुरांतील क्रांतिकारक तरुणांत त्यांची सदैव ये-जा असे व त्या गटानें निरा-निराळ्या क्रांतिकारकांशीं प्रांतोप्रांतीं जोडलेले धागेदोरेहि माहिती असावेत इतक्या आंतल्या गोटांत त्यांचा प्रवेश झालेला होता. ह्याच काळांत कोणी श्री. माधवदास संन्यासी ह्या नांवानें ओळखला जाणारा एक बंगाली क्रांतिकारक नागपूरला आला होता. ह्या तरुणाला त्याच्या क्रांतिकारक गटाच्या आदेशानुसार जपानला जावयाचें होतें. पण ही गोष्ट बिनबोभाट घडवून आणण्यासाठीं लागणारा पैसा व परदेशांत जाण्यासाठीं करावयाची योजना होईपर्यंत त्या संन्याशाला कोठें तरी ठेवण्याची आवश्यकता होती. केशवरावांनीं त्यांना, वयानें वडील व निष्ठेनें केशवरावांचे अनुयायी म्हणविण्यांत धन्यता मानणारे मोहोप्याचे श्री. आप्पाजी हळदे ह्यांजकडे सहा महिने पाठविलें. पुढें त्यांची जपानला पाठवणी करण्यांत आली. ह्या कामीं श्री. हळदे ह्यांनीं त्यांना सढळ हातानें आर्थिक साहाय्य केलें होतें.

ह्या वेळीं नागपूरच्या क्रांतिकारक गटानें कलकत्त्याच्या अनुशीलन समितीशीं आंतून संधान जोडलें होतें. त्यामुळें अलिपूर बॉंब खटला उभा राहतांच त्यांत गोवल्या गेलेल्या देशभक्त तरुणांच्या बचावासाठीं नागपुरांतूनहि निधि पाठविण्यांत आला. केशवरावांजवळ ह्या निधीसाठीं श्री. म. रा. तथा भय्यासाहेब बोबडे, वकील ह्यांनीं शंभर रुपये दिले होते. ह्यावरून इतर जणांकडून असाच निधि त्यांनीं गोळा केला असेल असें वाटतें.

ह्या हालचाली चालू असतांनाच केशवरावांच्या शालान्त परीक्षेचा अनुकूल निर्णय लागला. त्यांना मिळालेल्या प्रमाणपत्रावर ‘ दि नॅशनल कौन्सिल ऑफ एज्युकेशन ’ ( बंगाल ) चे अध्यक्ष म्हणून डॉ. रासबिहारी घोष ह्यांची स्वाक्षरी

असून हे प्रमाणपत्र दि. १ डिसेंबर १९०९ ला देण्यात येत असल्याचे त्यावर लिहिलेले आहे. हे यश पदरात पडल्यावर शिक्षणाचा सर्वसामान्य माणसाच्या दृष्टीने गाठता येणारा टप्पा त्यांनी गाठला, असे समजण्यास प्रत्यवाय नाही. केशवरावाची त्या वेळची गृहस्थिति ध्यानात घेता त्याच्या मनात उद्योगधंदा करून जीवनाला स्थैर्य आणण्याचा विचार आला असता तरी तोहि सुसंगतच दिसला असता. पण त्यांचे मन ह्या वेळी एकाच गोष्टीने प्रदीप्त झाले होते. इंग्रजांचे परके पाय ह्या पवित्र भूमीवरून कसे हुसकून लावता येतील, ह्या विचाराचे थैमान त्यांच्या मनात चालू असे व तारुण्याने सळसळणारे रक्त त्यांना त्याकरिता सशस्त्र क्रांति हाच एकमेव मार्ग आहे, असे सांगून त्यांचे पाय तिकडे वळवीत होते. दारिद्र्य असले व संकटांनी एकामागोमाग मार्गात आडवे येऊन अपशकुन करण्याचा अखंड प्रयत्न चालविला असला, तरी ध्येयनिष्ठ मन कधी हताश होऊन थबकत नाही, हेच त्यांच्या त्या वेळच्या हालचालीवरून दिसून येते. त्यांनी पुढच्या शिक्षणाची दिशा ठरवीत असतानाच शिक्षणासाठी प्रारंभी लागणारा पैसा हाती असावा म्हणून नागपूरमध्ये काही शिकवण्या केल्या व इतवारीतील एका शाळेत शिक्षक म्हणूनहि काही दिवस काम केले. आपले खिसे वेळप्रसंगी रिते असले तरी मनात तीव्र इच्छा असल्यावर काहीं ना काही तरी अचानक मार्ग निघतो व इच्छा सफल होऊ शकते, ह्याचा अनुभव त्यांनी अनेकदा घेतलेला होता. त्यामुळे पुढील शिक्षण कसेहि परिस्थितीत घ्यावयाचेच, हा त्यांचा निर्धार अढळ होता.

ते ह्या काळात डॉ मुंजे ह्यांजकडे राहत असत व त्यांनीहि त्यांना शिक्षणाच्या दृष्टीने कलकत्त्याच्या 'नॅशनल मेडिकल कॉलेज'मध्ये पाठविण्याचा विचार चालविला होता. केशवरावांना व त्यांच्या क्रांतिकार्यातील सहकाऱ्यांना हा कलकत्त्याला जाण्याचा विचार पटणाराच होता. कारण त्या गटाने बंगालमधील श्री. पुलिनबिहारी दास ह्यांच्या प्रांतव्यापी 'अनुशीलन संघटने'शी जे संबंध जोडले होते, ते केशवरावांच्या तिकडे जाण्याने अधिक दृढ व हितकारक होणार होते. तेव्हा केशवरावांच्या आर्थिक सिद्धतेचा काही भार त्यांच्या मित्रांनीहि उचलला असणे शक्य दिसते.

केशवरावांचे त्या काळातील एक जिवलग क्रांतिकारक मित्र श्री. रामलाल बाजपेयी हे आपल्या आत्मचरित्रात, केशवरावांचा कलकत्त्याला जाण्यात शिक्षणापेक्षा क्रांतिकारकांच्या संघटनेची माहिती घेण्याचाच प्रधान हेतु होता, असे स्पष्टपणे लिहितात. ते म्हणतात ".. श्री. केशवराव हेडगेवार, R S. S. चे जनक, ह्यांना रा. दाजीसाहेब बुटी ह्यांची थोडी मदत मिळवून डॉक्टरीचे शिक्षणापेक्षा पुलिनबिहारी दासांच्या ( कलकत्त्यातील क्रांतिकारक ) हाताखाली क्रांति व संघटन करण्यास पाठविता आले. " असे क्रांतिकार्य व शिक्षण हे दोन्ही हेतु मनात बाळगून केशवराव हेडगेवार ह्यांनीं १९१० च्या मध्यावर नागपुरापासून

७०० मैलांवर असणाऱ्या अनोळख्या कलकत्त्याचा मार्ग धरला. त्यांनीं आपल्या-बरोबर डॉ. मुंजे यांचें परिचयपत्र घेतलें होतें.

केशवराव कलकत्त्याला ती चिठ्ठी घेऊन प्रथम ' महाराष्ट्र लॉज 'मध्यें गेले. तें लॉज त्या वेळीं ' ७० बहुबझार रस्ता ' ह्या ठिकाणीं होतें. त्या ठिकाणीं चौकशी करतां तेथें एकहि जागा मोकळी नव्हती. परंतु डॉ. मुंजे ह्यांची चिठ्ठी घेऊन येणाऱ्या विद्यार्थ्याला जागा नाहीं, म्हणून अपरिचित ठिकाणीं " तुमची तुम्ही व्यवस्था करून घ्या, " असें सांगणें शक्य नव्हतें. तेव्हां त्यांची तेथेंच तात्पुरती व्यवस्था करण्यांत आली. ह्याच वर्षीं ' महाराष्ट्र लॉज 'मध्यें जागा न मिळाल्यानें अमरावतीचे सुप्रसिद्ध दे. भ. दादासाहेब खापर्डे ह्यांचे चिरंजीव अण्णासाहेब व त्यांचे स्नेही श्री. शंकरराव नाईक यांनीं त्या कामीं विशेष पुढाकार घेऊन आणखी कांहीं सहकारी मिळविले व प्रेमचंद गुराल रस्त्यावरील १८।२ ही दुमजली, सहा खोल्यांची जागा भाड्यानें घेतली. त्या निवासाला त्यांनीं ' शांति-निकेतन ' असें नांव दिलें होतें. तेव्हां ' महाराष्ट्र लॉज 'च्या कार्यवाहांनीं त्यांना ह्या ' शांतिनिकेतन 'कडे पाठविलें. पण अडचणींवांचून पुढें पाऊलच टाकतां येऊं नये, असा केशवरावांपुरता तरी नियतीनें जणूं दंडकच घालून दिलेला होता ! त्या ठिकाणीं जाऊन त्यांनीं पाहिलें तों तेथेंहि तोच अनुभव ! केशवरावांकरितां म्हणून श्री. अण्णासाहेब खापर्डे ह्यांनीं निकेतनांतील सर्वांना बोलावून आणखी एका विद्यार्थ्याला आपण सामावून घेऊं या, असा विषय काढला. त्यावर " अधिक कोणाला घेतां येणार नाहीं," असें इतर म्हणूं लागले. इतरांच्या त्या अनपेक्षित नकारानें अण्णासाहेबांची मोठीच अडचण झाली. डॉ. मुंजे ह्यांचा शब्द असा खालीं पडूं देणें, हेंहि त्यांना अतिशय अवघड वाटूं लागलें. शेवटीं त्यांनीं नाइकांशीं स्वतंत्रपणें बोलणें करून आपल्या दोघांच्या खोलींतच त्यांना जागा करून दिली.

' शांतिनिकेतनां 'तील खोली सडकेच्या कडेची व दोन्ही बाजूंना सज्जा असलेली होती. त्या लहानशा खोलींत एका अंगाला श्री. नाईक ह्यांचा तखत व दुसऱ्या अंगाला श्री. खापर्डे यांचा पलंग ! त्या दोहोंत जी निरुंद पट्टी उरे, तिच्यांत बुरणूस अंथरून केशवरावांना निजावें लागे. पण ही अडचण त्यांच्या गांवींहि नसावी, असेंच त्यांच्या वागण्यावरून दिसे. " हंसतमुख व सदा सुख " ह्याच म्हणीचें तें जणूं प्रत्यक्ष उदाहरण होतें. बंगालमधील घरांना असलेल्या खिडक्या बहुतेक खालच्या जमिनीपासून असतात. अशा प्रकारची एक खिडकी ह्या मधल्या भागांत होती व तिच्यांतून येणारी वाऱ्याची झुळूक हीच काय ती केशवरावांना लाभत असे. एकाच खोलींत परस्पर विरुद्ध संवयीच्या माणसांना राहण्याचा प्रसंग आला तर कुरबुरीचे प्रसंग उद्भवणें हें ओघानेंच येतें. त्यांतून केशवरावांचे एक खोलीसोबती श्री. नाईक हे प्रेमळ पण भांडखोर होते !

त्यांनीं थंडीचा कडाका पडला की, केशवरावाच्या उशाशी असलेली खिडकी बंद करावी ! पण नाइकांचा जरा डोळा लागलेला पाहतांच केशवरावांनी ती पुन्हा सताड उघडी टाकावी. त्यावर नाइकांनी उठावे नि " हे काय ? " म्हणून गुरगुर चालू करावी, तर त्यावरहि आपल्या मनमोकळ्या व खट्याळ हास्याने खिजवीत केशवरावानी डॉ. मुंजे ह्यांनी सांगितलेले आरोग्यशास्त्राचे तत्त्व त्यास पढवावे ! ते तत्त्व असे की, " थंडी असेल तर पांघरुणे अधिक घ्या; पण खिडक्या ह्या उघड्याच पाहिजेत. " नाईक ह्याच्या स्वभावाचे वर्णन करताना कविभूषण प्रा. अण्णासाहेब खापर्डे अजूनहि मधुर स्मृतीने गुदगुल्या होऊन सांगत असतात कीं, नाइकांच्या संबंधांत एकच क्रियापद लावता येणे शक्य होते व ते म्हणजे 'भाडणें !' " अशा या मित्राला केशवराव व खापर्डे नित्य चिडवीत की, " नाईक जेवण भांडतात ! नाईक स्नान भांडतात ! " अर्थात् त्या थट्टेला केव्हा केव्हा प्रत्युत्तर मिळे की, " केशवराव हे 'हेड गवार' ( म्हणजे गवाराचे मुख्य ) आहेत ! " पण त्यावर क्षणाचाहि विलब न लागतां " तुमच्यासारखे जगात गवार असल्यावर माझ्यासारखा हेडच त्यावर पाहिजे ! " असे तितकेच अवखळ पण चपखल उत्तर मिळाल्यावांचून राहत नसे ! " असा हा थट्टेचा फेस अनेकदा वरून दिसे खरा, पण आतून दोघाच्याहि मनात गभीर देशभक्तीचा सागर अखंड हेलावत असे ! कारण नाईक व केशवराव हे दोघेहि क्रातीचेच पाईक होते.

'दि नॅशनल मेडिकल कॉलेज' हे अप्पर सर्क्युलर रस्त्यावर म्हणजे ह्या निवासापासून जवळच होते व दुपारी ११ ते ५ ह्या वेळांतच तेथील अध्यापन चाले. डॉ. एस्. के. मलिक हे ह्या महाविद्यालयाचे प्राचार्य होते. ते एम्. एस्., एम्. डी. ( एडिम्बरो ) असून पाश्चात्त्य देशात अनेक वर्षे यशस्वीपणे व्यवसाय करूनहि वृत्तीने व वागणुकीने पूर्ण भारतीय राहिलेले होते. ते महाविद्यालयातील तासापुरते इंग्रजी बोलत. पण बाकी सर्व वेळ 'बागला' भाषेतून म्हणजे मातृभाषेतून व्यवहार करण्यावर त्याचा कटाक्ष असे. इतरहि प्राध्यापक अशाच तोलाचे नि वृत्तीचे होते व त्याच्या त्या वृत्तीचा ठसा केशवरावांवर इतका पक्का उमटला होता की, पुढे घरगुती व्यवहारात व अनावश्यक ठिकाणी उगीच इंग्रजीची ऐट कोणी मारू लागला कीं, ते आपल्या कलकत्त्याच्या गुरुवर्यांचे उदाहरण साभिमान त्याच्यापुढे ठेवून त्याची चूक त्याला पटवीत असत.

ह्या महाविद्यालयांत शिक्षणक्रम चालू झाल्यावर थोड्याच दिवसात केशवरावांनी प्रांतोप्रातीच्या विद्यार्थ्यांशी स्नेह जोडला. आतां महाविद्यालयांतून आल्यावर ते खोलीवर फारच थोडा वेळ असावयाचे. नेबुतला आळीमध्ये ( लेनमध्ये ) पंजाबी विद्यार्थ्यांनीं आपले वसतिगृह काढले होते. त्या वसतिगृहांतील सरदार निरंजनसिग व श्री. शिवदत्तजी पाराशर यांच्याशी त्याचा विशेषच स्नेह जडला. हे दोघेहि केशवरावांच्या वर्गात होते व निर्भयता व खेळकर-

पणा यांत त्यांचें साधर्म्य असे. ते पंजाबी निवासांत आले कीं, त्यांनीं कोणाच्या हातांतील पुस्तक ओढून मिटून दूर फेकावें, तर कोणाचा दिवा मालवावा ! धिंगा-मस्ती तर अनेकदां चाले व ती पाहण्यासाठीं सारें वसतिगृहच तेथें जमे ! या सर्व प्रकारांनीं त्यांचें तेथें होणारें आगमन हें मात्र कधींच नकोसें वाटत नसे. असा अपूर्व गोडवा त्यांच्या बोलण्याचालण्यांत होता. केशवरावांना तेथील मित्र अनेकदां पंजाबी मेवामिठाई देत व तिची परतफेड महाराष्ट्रीय ' श्रीखंड ' देऊन ते करीत असत, असें डॉ. पाराशर सांगतात.

ह्या वेळीं केशवराव आपल्या कुलपरंपरेला शोभण्यासारखे तापटहि असत. पण क्रोधाग्नि भडकण्याचा प्रसंग मात्र क्वचितच येई. पंजाबी निवासांत निरंजन-सिंग हे माडीवरील खिडकींत बसून स्नानानंतर केस वाळवीत व धार्मिक ग्रंथ खड्या आवाजांत पठण करीत. ही खिडकी एका बंगाली कुटुंबाच्या अंगणाकडे उघडत असे. त्यांना हा पोथी-पठणाचा घणघणाट रुचेना. त्यांनीं कांहीं वेळां " खिडकी लावा " म्हणून सांगितलें; पण निरंजनसिंगांनीं तिकडे लक्षच दिलें नाहीं. एक दिवस निरंजनसिंग खालील न्हाणीघरांत स्नान करीत असतांना बाहेरून शिडी लावून खिडकी बंद करण्यासाठीं एक जण वर चढूं लागला. ह्या गोष्टीची चाहूल लागून निरंजनसिंग चवताळून वर आले व त्यांनीं धाडकन् शिडी ढकलून दिली. शिडीवर चढणारा माणूस पलिकडील अंगणांत पडला व त्याला रक्त येण्यासारखी दुखापत झाली. त्या संतापांत तो ओरडला, " कायद्यानें खिडकी बंद करीन ! " पण तें वाक्य पुरें होण्याच्या आंतच खिडकींतून उत्तर गेलें, " जा ! जा ! मी कायदाबियदा जाणत नाहीं ! "

ह्या झटापटीनंतर आरक्षकांकडे प्रकरण नोंदविलें गेलें. तेव्हां वसतिगृहांत वारंवार येणारे पुढारी श्री. श्यामसुंदर चक्रवर्ती ह्यांनीं केशवरावांच्या सांगण्या-वरून मध्यस्थी केली; पण प्रकरण मिटलें नाहीं. पंजाबी विद्यार्थ्यांना तेथून कायमचेंच हुसकून लावावें, अशा विचारानें त्या आळींतील लोकांनीं निवासावर अंधाराच्या आश्रयानें दगड व विटा फेकून उपद्रव देण्यास प्रारंभ केला. लक्ष ठेवूनहि दगड नेमके कोठून येतात तें कळेना. आळींत फिरून चौकशी करण्यांत आली तरी पत्ता लागेना. एकदां तिन्हीसांजेला केशवराव तेथें येण्यास व विटा आणि दगडांची वृष्टि चालू होण्यास एकच गांठ पडली. तेव्हां आज मात्र ह्या प्रकाराचा एकदां सोक्षमोक्ष लावावयाचा, अशा त्वेषानें ते व निरंजनदास जिना दणदणावीत खालीं उतरले व समोरील गल्लींतून जाणाऱ्या दोघां आळीकरांना थपडा दिल्या. ते ह्या अनपेक्षित प्रकारानें स्तिमित होऊन विचारूं लागले, " कां हो मारतां ? " पण त्यावर, केशवरावांच्या मुखांतून सणसणीत शब्द निघाले कीं, " कोणी तरी विटा मारतात म्हणून आम्ही कोणाला तरी मारतों ! विटा बंद झाल्या कीं थांबूं ! " त्या दोघांचा रुद्रावतार पाहून व कडकडाट ऐकून

ते बिचारे न बोलतां तेथून निमूट निसटले. पण ही जहाल मात्रा " लेकी बोले नि सुने लागे " ह्या न्यायाने आळीकराना नेमकी लागू पडली व उपद्रव थाबला !

पण असा झगडा झाला तरी त्यानी कोणाहि व्यक्तीविषयी वा प्रान्ताविषयीं सरसकट ग्रह करून घेऊन मनात अढी ठेवली, असे चुकूनहि घडत नसे. कलकत्त्यांत गोषा पद्धति असलेल्या बगाली कुटुंबांतून जणू त्या कुटुंबातीलच एक इतक्या घरोब्याने ते वावरत असत, असे त्याचे मित्र सांगतात. ज्या प्रातात जावे त्या प्रातांतले व्हावे, असे त्यांना वाटे. ह्या धारणेमुळेच १९१० मध्ये कलकत्त्याला जो दंगा झाला त्यांत आपल्या महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचे शुश्रूषा-पथक उभारण्यात त्यानी पुढाकार घेतला होता.

काबुली पठाणानी भर रस्त्यात गाय मारली व त्यातून कुरबूर चालू झाली. त्या दग्यात मुसलमानानी कलकत्त्यातील सधन मारवाडी व्यापाऱ्याची लूटमार केली, त्याच्या स्त्रियाचे कान कापले व नथी ओढून नाके तोडली ! पण हे असे अनन्वित प्रकार चालू असता जवळील बगाली हिंदूंनी त्याना म्हणावे तसे मनापासून साहाय्य केले नाही. १९०५ च्या बंगालच्या फाळणीनतर चालू झालेल्या ' स्वदेशी ' आंदोलनाशीं मारवाडी मडळीनी जो असहकार केला, त्याची ही उघड उघड प्रतिक्रिया होती. त्यामुळेच डोळ्यादेखत तिजोऱ्या फुटत असतां व दुकाने लुटली जात असता लोकानी, ही परस्पर अद्दल घडत आहे, अशा समाधानात तिकडे कानाडोळा केला. हे हिंदु समाजातील परस्पर सबंध पाहून केशवरावाना अत्यंत दुःख झाले व त्यानी शुश्रूषा-पथकातून मोठ्या हिरीरीने काम केले. या पथकात दहा-बारा तरुण विद्यार्थी होते व घायाळ झालेल्या व्यक्तीला हातडोलीवर ( स्ट्रेचरवर ) घालून रुग्णालयात पोहोचविणे व तेथे शुश्रूषा करणे इत्यादि कामे ते करीत.

अशाच तऱ्हेने एकदा ह्या पथकातील मंडळी एका बेशुद्ध व्यक्तीला घेऊन रुग्णालयाकडे जात असतां एका व्यापाऱ्याच्या चौकीदाराने मागून झेप टाकून एका पठाणाच्या पाठींत सुरा खुपसला. पथकांतील कोणी तरी म्हणाला की, " आपण प्रथमोपचार करूं या ! " पण अशा धामधुमीत ज्याचे भले करावयास जावे तोच वेळप्रसंगी उलटावयाचा व चोर सोडून संन्याशालाच शिक्षा, असा अनुभव यावयाचा !" हा व्यवहार ध्यानीं घेऊन केशवराव म्हणाले, " आपल्यातील कोणी उपचार करावयास पुढे झाला व तेवढ्यात आरक्षक आले, तर एखाद्या वेळी आपण हिंदु म्हणून ते आपल्याच आंगलट यावयाचे ! "

ह्या दगलीनंतरहि हे विद्यार्थी व्यापारी विभागात जाऊन तेथील परिचितांना वारंवार भेटत असत.

केशवराव कलकत्त्याला आले तेव्हा स्वदेशी आंदोलनाची स्थिति बाह्यतः ओसरलेली होती. हिंदुस्थानांत खुदिराम बसु ह्याने १९०८ च्या एप्रिलमध्ये

टाकलेल्या स्फोटगोलकानें ( बॉंबनें ) बंगालमधील वातावरण कांहीं काळ तरी तप्त झालें होतें. "...त्या बॉंबच्या स्फोटासरशीं हिंदुस्थानच्या जुन्या राजकारणाचाच स्फोट होऊन त्यांतून सशस्त्र क्रांतीच्या रक्तरंजित युगाचा उदय झाला," अशा शब्दांत स्वातंत्र्यवीर सावरकर त्या घटनेचें माहात्म्य वर्णन करीत असतात. ही नव्या युगाची चाहूल इंग्रजांना अस्वस्थ करणारी होती. त्यांनीं हरळीची मुळी न् मुळी निखंदून काढण्याचा एखाद्या वेडगळ शेतकऱ्यानें प्रयत्न करावा, त्याप्रमाणें ह्या क्रांतिकारक चळवळीचीं पाळेंमुळें खणून काढण्याचा उद्योग आरंभिला होता. एकट्या अलिपूर बॉंब अभियोगाचा सरकारनें उभा केलेला ढिगारा पाहिला तरी त्या सरकारी प्रयत्नांची सहज कल्पना येऊं शकेल. त्या अभियोगांत २०६ साक्षीदार उभे करण्यांत आले व पुराव्यासाठीं चार सहस्र ( ४००० ) कागदपत्र व बॉंब, पिस्तुलें, दारू, वाती, इतर रसायनें व स्फोटक द्रव्यें हीं पांच सहस्र ( ५००० ) मांडण्यांत आलीं होतीं ! एवढें संशोधन करण्यासाठीं सहस्रावधि जणांच्या झडत्या झाल्या असतील नि असंख्य जणांना मारहाण होऊन खुळखुळत्या लोखंडी बेड्यांत अडकून पडावें लागलें असेल, हें सांगावयास नकोच. सरकारनें अनेक निर्बंध लादून सर्व समाजांत एक भीतीचें वातावरण निर्माण केलें होतें. सूर्यास्तानंतर सर्वत्र १४४ कलमाचें राज्य चालू होई व त्याचा भंग करणाऱ्यांना कडक शिक्षा ठोठावण्यांत येई. २० सहस्रांवर खप गेलेल्या 'युगांतर'सारख्या वृत्तपत्रावर श्री. किंग्जफोर्डनें संक्रांत आणून लोकांना स्फुरण चढविणारें व त्यांना आपत्तीहि सुसह्य वाटतील, असें धैर्य देणारें साधनहि जवळ जवळ बंद पाडलें होतें. ही दंडुकेशाही जनमनाला अतिशय भेडसावीत होती ह्यांत कांहींच नवल नाहीं. परंतु तिची उग्रता पाहून जॉन मोर्लेसारखे इंग्रज राजकारणीहि चिंतेंत पडले होते. त्या वेळीं लॉर्ड मिंटोला लिहिलेल्या पत्रांत मोर्ले म्हणतो, " आपण शांतता ही राखलीच पाहिजे; पण कठोरतेचा अतिरेक हा कांहीं शांतता-प्रस्थापनेचा मार्ग नव्हे. उलट तो 'बॉंब'कडे नेणाराच मार्ग आहे." (..." We must keep order, but excess of severity is not the path to order. On the contrary, it is the path to the bomb."

कोणत्याहि आंदोलनाचा प्रारंभींचा उत्साह हा सोड्याची बाटली फोडल्याप्रमाणें उतास जाणारा असतो. पण त्याची पहिल्या उसळीच्या वेळची उत्कटता दडपशाही चालू झाल्यावर स्वाभाविकच कमी होते. त्यांतून ज्या समाजानें तें आंदोलन हातीं घेतलेलें असेल त्या समाजाचा सुसंघटितपणा व ध्येयनिष्ठा जर यथातथाच असेल तर आंदोलनाचें बाह्यरूप तर थोड्याच अवधींत थंडच होऊन जातें. केशवराव कलकत्त्यास गेले तेव्हां क्रांतिकार्यांत प्रत्यक्ष संबंधित असलेले ध्येयनिष्ठ तरुण वगळल्यास सर्वसामान्य जनतेंत असेंच भकास वातावरण पसरलेलें होतें.

अभियोगांतून दोषमुक्त ठरून बाहेर पडल्यावर १९०९ मध्ये बाबू अरविंद घोष ह्यानी उत्तरपारा येथील भाषणांत ह्या परिस्थितीचे नेमके वर्णन केले आहे. ते म्हणतात की, "मी कारागृहात गेलो तेव्हा साऱ्या देशांत 'वंदे मातरम्'च्या गर्जनेने चैतन्य आलेले होते. एका राष्ट्राच्या आशा-आकाक्षांनी सारा देश उज्जीवित झाला होता. अधःपाताच्या दारुण स्थितीतून नुकत्याच वर उठू लागलेल्या कोटयवधि जनतेच्या आशा-आकांक्षानी तो मोहरून गेलेला होता. पण बदीतून बाहेर आल्यावर मी त्या उद्घोषाचा उत्सुकतेने कानोसा घेऊ लागलो, पण मला सर्वत्र सामसूमच आढळली. देशावर औदासीन्याची छाया पसरून जनता किंकर्तव्यमूढ झालेली दिसत होती. असे होणे स्वाभाविकच होते, कारण आम्हाला पूर्वी दिसणाऱ्या उज्ज्वल दिव्य स्वप्नानी आकाश उजळून जाण्याऐवजीं, ते काळवडून जाऊन मानवनिर्मित गडगडाट व विजाचा थयथयाट सुरू झाला होता." ("When I went to jail the whole country was alive with the cry of Bande Mataram, alive with the hope of a nation, the hope of millions of men who had newly risen out of degradation. When I came out of jail and listened for that cry, but there was instead a silence. A hush had fallen on the country and men seemed bewildered, for instead of God's bright heaven full of vision of the future that had been before us, there seemed to be overhead a leaden sky from which human thunders of lightnings rained")

अशाहि परिस्थितीत जे जागृत व सावध होते, त्याची धडपड अखंड चालूच असे. त्यांत दे. भ. पुलिनबिहारी दास ह्याच्या 'अनुशीलन समिती'चा उल्लेख प्रामुख्याने करावा लागेल. इतक्या सरकारी वक्रदृष्टीतूनहि ह्या समितीचे कार्यकर्ते लोकाना जागृत करण्यासाठी पुस्तिका व पत्रके गुप्तपणाने छापून ते वाङ्मय बिनबोभाट प्रसृत करीत. ह्या कामी केशवरावहि लक्ष घालीत असत. सुट्टीत प्रातोप्राती जाणाऱ्या परिचित विद्यार्थ्याबरोबर अशा वाङ्मयाचे गठ्ठे प्रसारासाठी ते पाठवून देत. अनेक जणाशी त्यानी जे जिव्हाळ्याचे व स्नेहाचे सबंध जोडलेले होते, ते सबधच त्याना असे उपयुक्त ठरत. नागपूरकडेहि असे वाङ्मय त्यांनी प्रसारित केल्याचे अनेकांच्या ध्यानात आहे.

'अनुशीलन समिती'चे प्रमुख श्री. पुलिनबाबू हे पदवीधर होते व वंगभंगानंतर त्याना सरकारने निरनिराळ्या कारणानी अडकवून ठेवण्यासाठी अनेकदा डाव टाकले. कधी हत्यारे जमविल्याचा आरोप, तर कधी मुले पळविल्याचाच आरोप! ढाक्याला प्रारंभी 'अनुशीलन समिति' स्थापन केल्यावर सरकारप्रमाणे स्थानिक मुसलमानांनींहि तेथील नबाबाच्या जिवावर

तिच्याविरुद्ध काहूर उठविलें होतें व त्यांतून प्रथम धमक्या व मुसलमानी स्वभावाप्रमाणें क्रमानें आक्रमण उदित झालें. पुलिनबाबूंच्या आखाड्यावर सातशें मुसलमानांनीं अचानक घाला घातला ! पण आखाड्यांतील ' समिति 'च्या अवघ्या सहा तरुणांनीं इतक्या सफाईनें त्या आक्रमणाचा मोड केला कीं, चाळीस-पन्नास मुसलमान अक्षरशः घायाळ होऊन पडले ! बाह्यतः पुलिनबाबूंच्या बंगाल्यांत शेंकडों ठिकाणीं चालणारे आखाडे हे अशा धैर्यशाली व देशभक्त तरुणांचीं संस्कारकेन्द्रें होतीं. केशवरावांचा पुलिनबाबूंशीं प्रत्यक्ष संबंध किती आला असेल तें सांगवत नाहीं. कारण १९०९ च्या ऑगस्टमध्यें पुलिनबाबूंना विनाचौकशी दोन वर्षे कारागृहांत डांबण्यांत आलें व त्यांतून सुटल्यावर एक-दोन वर्षांतच त्यांची सात वर्षांच्या काळ्या पाण्यावर पाठवणी झाली. म्हणजे १९११ ते १९१३ चा प्रारंभ एवढ्याच मध्यंतरांत केशवरावांचा त्यांच्याशीं काय तो संबंध आलेला असावा. पण त्या काळांत दोघांवरहि सरकारची वाकडी नि करडी दृष्टि होती. केशवरावांकडे कलकत्त्याहून नागपूरच्या क्रांतिकारकांना प्रत्येक सुट्टींत येतांना दोन-तीनशें रुपयांचा एक रिव्हॉल्व्हर आणण्याचें काम दिलेलें होतें, असें श्री. रामलाल बाजपेयी ह्यांनीं आपल्या आत्मचरित्रांत म्हटलें आहे. त्याचप्रमाणें ' अनुशीलन समितीं 'त त्यांनीं प्रवेश मिळविल्याचाहि स्पष्ट उल्लेख केलेला दिसतो. केशवरावांच्याच महाविद्यालयांत शिकणारे श्री. नलिनीकिशोर गुह ह्यांनीं त्यांना व डॉ. नारायणराव सावरकर ह्यांना ' अनुशीलन समितीं 'त आणलें, अशी माहिती ' जेलमें तीस बरस ' ह्या आपल्या पुस्तकांत ( पृष्ठ १५९ ). प्रसिद्ध क्रांतिकारक श्री. त्रैलोक्यनाथ चक्रवर्ती ह्यांनीं दिली आहे.

कलकत्त्यांत असतांना ज्या अनुशीलन समितींत श्री. केशवराव ह्यांनीं प्रवेश केला होता, त्या समितींत अनेक कसोट्या पाहिल्यानंतरच प्रवेश मिळत असे. माणसाची वृत्ति, त्याचें चारित्र्य, शारीरिक बल, सावधानता, सहनशिलता, आज्ञाधारकता व संयम आदि गोष्टी नीट पारखून मगच ज्याच्या त्याच्या पात्रतेप्रमाणें त्याला क्रमाक्रमानें प्रवेश दिला जाई. त्यासाठीं समितीच्या अगदीं मोजक्या व निवडक लोकांचें केंद्र व त्याच्याबाहेर उतरत्या क्रमानें पात्रतेनुसार विविध वर्तुळें अशी तिची रचना होती. समितीचे घटक होतांना दहा-बारा सदस्यांच्या देखत कालीमातेच्या मंदिरांत वा स्मशानांत धार्मिक विधिपूर्वक प्रतिज्ञा घ्यावी लागे. पात्रतेनुसार घटकांचे चार वर्ग असत व त्यांच्या प्रतिज्ञाहि उग्रतेच्या दृष्टीनें क्रमानें वाढत्या होत्या. श्री. केशवराव ह्यांचा त्या समितीच्या अंतरंगांत प्रवेश झाला असल्यास नवल नव्हतें. त्या समितीचे एक अग्रगण्य कार्यकर्ते श्री. त्रैलोक्यनाथ चक्रवर्ती ह्यांनीं वर उल्लेखिलेल्या ' जेलमें तीस बरस ' ह्या आपल्या पुस्तकांत ' अनुशीलन समिती 'च्या कांहीं सदस्यांचीं जीं छायाचित्रें दिलीं आहेत, त्यांत केशवरावांच्या छायाचित्राचाहि अंतर्भाव करण्यास ते विसरलेले नाहींत. तसेंच

" जो लोग अंत्य प्रतिज्ञा करते थे वे ही दलके सच्चे सदस्य गिने जाते थे। घरबार छोडे हुए सभी सदस्य अंत्य प्रतिज्ञाके अधिकारी माने जाते थे। " अशा शब्दात चक्रवर्तींनी 'सच्चा सदस्य' होण्यासाठी जी कसोटी दिली आहे ती केशवरावांना किती तंतोतंत लागू पडणारी आहे, हे सागण्याची आवश्यकता नाही.

श्री. केशवरावाच्या कलकत्त्यांतील क्रांति-जीवनाची माहिती अगदीच त्रुटित व फुटकळ स्वरूपात उपलब्ध आहे. आधीच सशस्त्र क्रातीला वाच्यतेचे वावडे! खऱ्या क्रांतिकारकाचे मनोगत (नाव नव्हे!) बॉब व पिस्तुलेच व्यक्तवीत असतात. या स्वाभाविक गुप्ततेच्या जोडीला केशवराव हेडगेवाराचा स्वभावहि गाजावाजा न करतां गुपचूप कार्य साधण्याच्या प्रवृत्तीचाच होता. स्वतःची टिमकी वाजावी, ह्या कल्पनेचा वारासुद्धा त्याच्या मनाला कधी शिवला नाही. त्यामुळे गणपतीच्या विसर्जनानतर त्याची मुख्य मूर्ति पाण्यातच अदृश्य होऊन तिच्या-वरील फुले नि दूर्वा तेवढ्या जशा वर तरंगू लागतात, त्याप्रमाणे केशवरावाचे त्या वेळच्या त्या क्रातिकार्यांतील मुख्य संधान आज काळाच्या उदरात लुप्त झालेले असून, त्यांच्या वर्गमित्रांना, केवळ त्यातील ज्या काही वरवर अनुभविता आल्या किंवा अवगत झाल्या, तेवढ्याच घटना साप्रत उपलब्ध झालेल्या आहेत.

केशवरावांनीं नागपूर सोडले त्या वेळेपासूनच त्यांच्यामागे सरकारी गुप्तचराची पाळत चालू होती व कलकत्त्यांत तर काही दिवस त्याच्या निवासातच हेर राहूं लागला होता. अर्थात् माणसाची पारख उत्तम असल्याने केशवरावानीं आवश्यक ती दक्षता सदैव घेतली असेल हे सांगणे नकोच. श्री. गोपाळ वासुदेव केतकर ह्या गृहस्थाने वैद्यकीय महाविद्यालयातच नाव घातले होते व त्याची महाराष्ट्रातून आलेल्या विद्यार्थ्यांपैकी सर्वांशी घसट असे. हा विद्यार्थी साधा नाही, तेव्हा तो खोलीत असतांना त्याच्यादेखत राजकीय विषय काढू नका व त्याच्या-पासून सावध रहा, अशी पूर्वसूचना केशवरावानी आपल्या मित्रमडळीना आधीच दिली होती. वणीचे डॉ. यादवराव अणे, चाद्याचे डॉ. शकर सीताराम वैद्य, मुंबईचे डॉ. शंकरराव नाईक (सध्यां आडनाव तेंडूलकर असे लावतात), गोपाळराव देव व आर्वीचे डॉ. मोहरीर इत्यादि सगळ्यानाच ह्या व्यक्तीची चागलीच आठवण राहिलेली दिसली. श्री. केतकर ह्याच्याविषयीची आपली शका फोल आहे असे प्रारंभी प्रारंभी त्यांच्या मित्रानीं म्हणावे; पण त्यावर " योग्य वेळी सागेन, मात्र सावध रहा " एवढेच उत्तर देऊन केशवरावानीं आश्वासन द्यावे. पुढे १९११ च्या जूनमध्ये स्वातन्त्र्यवीर सावरकराचे धाकटे बंधु श्री. नारायणराव सावरकर ह्याची कारागृहांतून सुटका झाली व त्यानंतर त्यानी वैद्यकीय शिक्षणासाठी कलकत्त्याला जाण्याचा विचार निश्चित केला. ही गोष्ट केशवरावांना त्यांच्या मित्राकडून पत्राने समजली होती. आता ह्या वेळी श्री. केतकर ह्यांना मुंबई सरकारकडून कांहीं तरी सूचना येणारच, अशी केशवरावानी अटकळ

बांधली व ती तंतोतंत खरी ठरली. त्यांनीं केतकर बाहेर गेल्याची संधि साधून त्यांच्या पेटीचें टाळें काढून तिच्यांतील नवीन आलेलें पत्र हस्तगत केलें व त्यांतील "ना. दा. सा. तिकडे येत आहेत त्यांवर लक्ष ठेवावें," अशा आशयाचा आदेश देणारा भाग मित्रांना दाखविला व पुन्हा तें जागच्या जागीं ठेवून पेटी लावून घेतली. ह्या प्रकारानंतर केशवरावांचे मित्र त्यांना सांगूं लागले कीं, "ह्या स्वारीला हांकलून देऊं या!" पण ती गोष्ट त्यांना युक्त दिसली नाहीं. ते म्हणाले, "आपल्या हालचालींवर डोळा ठेवण्याकरितां त्यांची योजना झाली आहे म्हणूनच त्यांच्या हालचालींवर लक्ष ठेवणें हें आपणांसहि आवश्यकच होऊन बसलें आहे. इतकेंच नव्हे तर तें आपल्याला उपयुक्तहि ठरणारें आहे. त्या दृष्टीनें ते आपल्यांतून जाण्यापेक्षां आपल्या सान्निध्यांत असल्यानेंच तें काम फार सोयीचें होईल. मात्र त्यांच्याविषयीं यथार्थ कल्पना ठेवून आपण सावधपणेंच सर्व व्यवहार करावे म्हणजे झालें."

ह्याच काळांत मध्यप्रांत सरकारकडून श्री. तारे ह्या नांवाचे एक आरक्षाधिकारीहि, गायीनें शिंगें मोडून वासरांत शिरावें त्याप्रमाणें विद्यार्थी म्हणून त्याच वैद्यकीय महाविद्यालयांत प्रविष्ट झाले होते. ही गोष्ट १९२० मध्यें अनपेक्षितपणें बाहेर आली असली, तरी श्री. तारे ह्यांचें अंतरंग केशवरावांनीं आधींपासूनच ओळखलें होतें, असें त्यांच्या बोलण्यांत येई. हे तारे इतरांच्याजवळ बोलतांना अत्यंत जहाल व भडक बोलत. इतकें कीं, नवीन माणसाला त्यांची ती तीव्रता खरी वाटून भीतिहि वाटावी. पण त्यांच्या बोलण्यांतील एकूण आवेशाचा नाटकीपणा चाणाक्ष दृष्टींतून सुटण्यासारखा नव्हता. ज्याला खऱ्या देशभक्तीची कल्पना असेल त्याला उठल्यासुटल्या तसे नुसते भावनांचे फवारे उडविणाऱ्या व्यक्तीची शिसारीच येईल! पण केशवरावांनीं व त्यांच्या सहकाऱ्यांनीं त्यांचें आवेशयुक्त बोलणें ऐकून घेण्याचें धोरण ठेवलें होतें. पुढें त्या गृहस्थांना आपण करीत असलेल्या कामाचा आपण होऊनच पश्चात्ताप झाला व त्यांनीं सरकारी नोकरीचें त्यागपत्र देऊन तेथून सागरकडे प्रयाण केलें.

'अनुशीलन समितीं'त केशवराव नेमकें कोणतें काम करीत होते, हें कळण्यास मार्ग नाहीं. पण ते 'शांतिनिकेतन' मधून कधीं कधीं रात्रीं अपरात्रींहि बाहेर जात व कधीं कधीं बारा-बारा एक-एक वाजतां बाहेरून निजावयास परत येत. त्या वेळीं ते, त्यांचे तेव्हांचे स्नेही डॉ. पाराशर व आणखी कांहींजण हे रसायनाचे प्राध्यापक चौधरी ह्यांच्याकडे कधीं कधीं जात असत. पण प्रा. चौधरी हे कांहीं जणांना 'बॉंब' करण्याची पद्धति शिकवतात, अशी सरकारला शंका आलेली होती व त्यामुळें त्यांच्याकडे विद्यार्थी गेले कीं अनेकदां त्यांच्या दारासमोर एखादा हेर घुटमळत असावयाचा. एकदां प्राध्यापकमहाशयांच्या विद्यार्थ्यांबरोबर चाललेल्या गप्पागोष्टी रंगांत आल्या व त्यामुळें बिचारा गुप्तचर

कंटाळून जाऊन त्यांच्या माडीवर जाणाऱ्या जिन्यांतच बसला. थोड्याच वेळांत त्या बिचाऱ्याला कंटाळल्याने तेथेच डुलकी लागली. रात्री १२ च्या सुमारास जेव्हां केशवराव, पाराशर इत्यादि खाली उतरूं लागले, तेव्हां त्यांच्यांतील पुढचे एक-दोन विद्यार्थी अंधारामुळे ह्या झोपलेल्या माणसास अडखळून खाली कोसळले ! स्वाभाविकच " कोण आहे ? " अशी पृच्छा होतांच तो डोळे चोळीत पळूं लागला. पण त्याला त्यानी पकडले व थपडा दिल्या. " चल, चौकीत चल ! " अशी भीति दाखवितांच तो लटलटा कापूं लागला ! शेवटी तो गयावया करूं लागल्यावर केशवराव म्हणाले, " जाऊ द्या. तो आपला मित्र आहे व म्हणूनच तो नेहमी आपल्याबरोबर असतो व चुकूनहि आपल्याविषयी माहिती देत नाही ! " ह्या वर्मी घावाने तो हेर बिचारा मनात किती ओशाळला असेल, त्याची कल्पना सहजच येणारी आहे ! ह्या दाखविलेल्या दयेसाठी त्या विद्यार्थ्यांनीं त्या रात्री त्या हेराकडून जिलबीहि उकळली होती !

' स्वदेशी ' आंदोलनाच्या काळातील अनेक पुढारी हे विविध प्रातातून आलेल्या विद्यार्थ्याना भेटण्यासाठी केव्हा केव्हा वसतिगृहात येत. अशाच प्रसंगानीं झालेला परिचय केशवरावानी त्याच्याकडे वारवार जाणे-येणे ठेवून वाढविला होता. त्यातील दोघाचा उल्लेख येथे प्रामुख्याने केला पाहिजे. एक श्यामसुंदर चक्रवर्ती व दुसरे मौलवी लियाकत हुसेन.

श्री. श्यामसुंदर चक्रवर्ती हे ठेवणीने लहान, ठेंगू व काहीसे अशक्त होते. ते आपल्या नांवाप्रमाणे वर्णाने श्यामच होते, पण चारित्र्याने धुतल्या तादुळा-सारखे धवल ! १९१० मध्ये ते ब्रह्मदेशातील विजनवास सपवून परत आले होते व अत्यंत दारिद्र्यात पण हसतमुखाने कर्मयोग आचरीत होते. तडीपार ( हद्दपार ) केले जाण्यापूर्वी त्यानी आपल्या औपरोधिक व तिखट लेखणीने साप्ताहिक ' प्रतिवासी ', ' संध्या ' व ' वदे मातरम् ' या नियतकालिकामधून जें देशभक्तिपरिपूर्ण नि उत्तेजक लिखाण केले होते, त्यामुळेच पहिल्या नऊ जणांत देशातराला धाडण्याचा मान सरकारने त्यांना दिला होता. श्यामसुदरांचे शिक्षण बी. ए. पर्यत झालेले होते व त्याचे संस्कृत, बांगला व इग्रजी या तीनहि भाषांवर उत्तम प्रभुत्व असे. लो. टिळक कलकत्त्याला गेले असता ' वंदे मातरम् 'च्या अकात " Crime of Nationalism " ह्या शीर्षकाखाली एक अग्रलेख आला. त्यांतील भाषा, भावना व विचार याच्या त्रिवेणीसगमाने लोकमान्य आनंदून भारावून गेले व त्या भरात त्या उत्कृष्ट अग्रलेखाकरिता ' वंदे मातरम् 'चे सपादक श्री. अरविद घोष ह्याचे स्वतः अभिनदन करण्यासाठी श्री. मोतीलाल घोष याना घेऊन ते त्याजकडे गेले. पण अरविदबाबूनी त्या अभिनंदनाचे धनी आपण नसून श्री. श्यामसुदर चक्रवर्ती हे आहेत, ही गोष्ट उघड केली ! पण अशी प्रभावी लेखणी लीलेने चालविणारे चक्रवर्ती सरकारी

ससेमिऱ्यामुळें दारिद्र्याशीं झुंजत कलकत्त्यांत येऊन अनवाणी हिंडत होते. केव्हां केव्हां तर त्यांच्या अंगावर एक धोतर व एखादें उपरणें एवढेंच आवरण असे! पण अशाहि स्थितींत ही स्वारी वसतिगृहांत आली कीं, तेथील तरुणांची प्रयत्नवाद व ध्येयवाद यांवरील निष्ठा प्रज्वलित करणारे विचारच ते चर्चेत मांडीत असत. केशवरावांना व त्यांच्या कांहीं मित्रांना श्यामबाबूंची ही स्थिति माहीत होती व त्यामुळें ते वसतिगृहांत आले कीं, त्यांना ती मंडळी आग्रहानें आपणांबरोबर जेवावयास बसवीत व जातांना त्यांना कांहीं पैसे देण्यासहि विसरत नसत. श्यामसुंदर हे स्वभावानें इतके निगर्वी व उदासीन होते कीं, कोणी कांहीं दिलें तर तें ते घेत व आतां मिळालेलें जरा वेळानें कोणी मागितलें तर त्याला हंसतमुखानें देऊन टाकीत! श्री. बिपिनचंद्र पाल ह्या त्यांच्या उदारतेचें वर्णन करतांना म्हणतात कीं, "कोणताहि एखादा मित्र वा परिचित व्यक्ति आपल्याहून अधिक वा आपल्याइतक्याहि नडींत असेल तर आपण स्वतः अति दरिद्री असूनहि जवळ असलेला पै-पैसाहि त्याला देऊन टाकण्यास त्यांनीं कधींहि अळंटळं केलें नाहीं. जे जे कोणी श्यामसुंदरांच्या घनिष्ठ संबंधांत आले, त्या सर्वांना त्यांच्या भावना उदात्त व कल्पना भव्य असल्याचें आढळून आलें." ("Very poor himself, he has never refused to part with his last penny, to any one, friend or acquaintance, who stood in greater or even equal need...... All who have come into contact with Shyam Sunder, have found his impulses to be almost uniformly noble and his ideas lofty.")

अशा सात्त्विक देशभक्ताविषयीं केशवरावांना अत्यंत आदर वाटे व ते त्यांच्या भाषणांना न चुकतां जात असत. त्यांच्या घरींहि केशवरावांचें सदैव जाणें-येणें असे. स्वतः केशवरावहि दारिद्र्याशीं व आपत्तींशीं झगडतच पुढें चाललेले असल्यानें "जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे" ह्या न्यायाप्रमाणें त्यांच्या मनांत समसंवेदनेनें श्यामबाबूंविषयीं अशी आस्था निर्माण होणें मनुष्य-स्वभावास धरूनच होतें. आपली वृत्ति अळवाच्या पानाप्रमाणें बनवून अश्रूंच्या वर्षावाचा प्रसंग असतांहि त्या अश्रूंचेच टपोरे मोती हास्यरूपानें कसे प्रकट करावेत, ह्याचें इंगित केशवरावांना श्यामसुंदरांच्या सहवासांतच अधिक उमजलें असेल ह्यांत शंका नाहीं.

ह्याच समसंवेदनेंतून श्यामसुंदरांच्या मुलीचें लग्न जुळविण्यापासून तों तें निर्विघ्नपणें पार पडेपर्यंत करावी लागली ती ती खटपट केशवरावांनीं स्वतः कसून केली व आपल्या मित्रमंडळींतून पैसे उभे करून त्या मंगल कार्यांत आर्थिक दृष्टीनेंहि त्यांना कांहीं उणें पडूं दिलें नाहीं.

मौलवी लियाकत हुसेन हा हिंदुस्थानांतील नकली 'राष्ट्रीय' मुसलमानांच्या 'भांगेंत तुळस' असल्याप्रमाणें होता. केशवराव कलकत्त्याला असतांना ह्या मौलवीचें

वय साठीच्यापुढे होते. पण अखंड कार्यरत राहण्यांत तो तरुणांनाहि लाजवीत असे. स्वतःचा चरितार्थ केवळ दोन-चार आण्यांत भागविणारा हा वृद्ध मौलवी लोकमान्य टिळकाचा चाहता व स्वदेशी व्रताचा कट्टा पुरस्कर्ता होता. गोरगरिबांसाठी ' निधि ' जमवून तो त्याना वाटावा, गरीब विद्यार्थ्यांना त्या निधींतून पुस्तके व शुल्क पुरवावे, असे त्याचे सदैव काही ना काही चाललेले असे. आपल्याबरोबर येतील तेवढ्याच लोकानिशी निर्भयपणे प्रभातफेरी काढून स्वदेशीचा प्रचार करीत तो हिंडे व अनेकदा ' बिडन ' व ' कॉलेज ' या नावानी ओळखल्या जाणाऱ्या चौकात तो सभा घेई. या प्रभातफेऱ्याना व सभाना आपल्या मित्रमडळीना घेऊन केशवराव जात असत. त्या सभाची व्यवस्था पाहण्यात ते स्वतः लक्ष घालीत व केव्हा केव्हा आपल्या मोडक्या-तोडक्या हिंदीत ते सभांतून भाषणेहि देत. काही दिवस ह्या ' देशवेड्या ' वृद्धाने ' कुबेर वस्तु भांडार ' ह्या नावाचे एक स्वदेशी वस्तूंचे दुकानहि चालविले होते असे सागतात. पाढरी टोपी, पैजामा व पाढरी शेरवानी, असा त्याचा साधा वेष असे व काही दिवस कारागृहात नि काही दिवस नगरात अशा त्याच्या येरझारा चालू असत ! तो एकदा आजारी असता दीड-दोन महिने केशवरावानी त्याची शुश्रूषाहि केली होती. डॉ. यादवराव अणे यानी ह्या मौलवीसंबधी सागितलेली एक गोष्ट अत्यत उल्लेखनीय आहे. ती अशी की, ह्या मौलवीने स्वदेशीचा पुरस्कार करण्यास प्रारभ केल्यावर ' तुर्की टोपी ' टाकून दिली होती व आपल्या मिरवणुकात ' भगवा ध्वज ' मिरविण्यास प्रारंभ केला होता !

एकदां मौ. लियाकत हुसेन ह्याच्या अध्यक्षतेखाली चाललेल्या एका सभेत एका वक्त्याने लो. टिळकाविषयीं अनुदारपणाचे उद्गार काढले. ते ऐकताच केशवराव रागाने लाल होऊन उसळून उठले व त्यानी भरसभेत वक्त्याच्या श्रीमुखांत भडकाविली, अशी आठवण डॉ. घोष ह्यानी लिहून ठेविली आहे. मौलवीच्या प्रभातफेरीतीलहि एक प्रसग येथे देणे युक्त दिसेल. एकदा केशवराव हे मिरवणुकीच्या अग्रभागीं ध्वज घेऊन चालले असता, एक इग्रज अधिकारी त्याच्या-जवळ येऊन मराठीतून चौकशी करू लागला. ह्या घटनेचे त्याना फार आश्चर्य वाटले. आपण महाराष्ट्रीय आहोत हे त्याने कसे ओळखले असेल, ह्याचा मागून विचार करताना त्याच्या ध्यानात आले की, आपल्या डोकीवरील मोठा घेरा हेच आपल्या ठिकाणचे उठून दिसणारे महाराष्ट्रीयत्वदर्शक वैशिष्ट्य आहे. अर्थात् लौकरच त्यानीं तो घेरा कमी केला, हे सागावयास नकोच.

कलकत्यातील केशवरावाच्या ह्या अशा हालचाली चालू असता त्यांचे अभ्यासाकडील लक्ष कमी झाले होते, असे स्पष्ट दिसते. त्यामुळे एकदां नेहमीप्रमाणे ते सुट्टीचे नागपूरला आले असता त्याना प्रेमाने आर्थिक साहाय्य करणारे डॉ. चोळकर ह्यानी ह्याविषयी त्यांजपाशी अप्रसन्नताहि व्यक्त केली होती. इतर

विद्यार्थ्यांप्रमाणें अनेक दिवस खोलीचेंच विश्व समजून तासन् तास पुस्तकांत डोकें खुपसून अभ्यासांत गर्क होऊन ते बसत नसत, ही गोष्ट खरी; पण त्यांचें वर्गांतील अभ्यासाकडे पुरेसें लक्ष असे व त्यामुळें परीक्षेपूर्वी थोड्याशा केलेल्या अभ्यासावरहि ते चांगले गुण मिळवीत असावेत, असें दिसतें. १९१२ मधील परीक्षेंत, रसायन विषयांत त्यांना ऱ्याहत्तर टक्के व शरीरशास्त्रांत पासष्ट टक्के गुण मिळाल्याचें प्रमाणपत्रावर उल्लिखित आहे. ह्यावरून एवढेंच अनुमान निघतें कीं, एवढ्या बाहेरील उलाढाली चालू ठेवूनहि त्यांनीं असे गुण मिळवावेत, ही त्यांच्या अपूर्व धारणाशक्तीचीच किमया होती. ह्या सुमारास पहिलें जागतिक महायुद्ध चालू होतें व प्रत्यक्ष रणक्षेत्रावर भारतांतून वैद्यकीय पथकें पाठविण्याचा सरकारनें प्रयत्न चालविला होता. लढाईतील रणधुमाळीचा एकदां अनुभव घेतां आल्यास तो देशाच्या दृष्टीनें पुढें उपयोगी ठरेल ह्या कल्पनेनें केशवराव, नी. स. मोहरीर आदि मित्रमंडळींनीं डॉ. सुऱ्हावर्दीखान यांची भेट घेऊन नांवें नोंदविलीं होतीं. पण ज्या तरुणांचीं नांवें क्रांतिकारक या काळ्या नामावळींत ( Black List ) सरकारनें आधींच नोंदविलीं होतीं, त्यांना ही संधि मिळणें कसें शक्य होतें ?

कलकत्त्याच्या वास्तव्यांत खऱ्या अर्थानें राष्ट्रीय शिक्षण घेण्याकडे केशवरावांचें मन गुंतलेलें होतें. स्वतःची व फार फार तर कुटुंबाची चिंता वाहणारे जगांत असंख्य जण आहेत. पण समाजाची चिंता वाहतांना स्वतःच्या सर्वस्वाचा विसर पडेल इतकें समाजाशीं तादात्म्य करून घेऊन स्वतःचें मन व जीवन उंचावणारे फारच थोडे सांपडतात. या दुर्मिळ मनःस्थितीची घडणच केशवरावांनीं त्या काळांत चालविली होती. प्रांताप्रांतांतून आलेले विद्यार्थी आपल्या प्रांताच्या दुरभिमानानें प्रेरित होऊन इतरांविषयीं कसे ग्रह करून घेतात, ह्याचें परीक्षण त्यांनीं चालविलें होतें नि आपल्या समाजांत येणारी उत्साहाची भरती ही कशी क्षणिक असते, ह्याचाहि अनुभव ते घेत होते. " स्वराज्य हा बंगालच्या दृष्टीनें आतां एक दिवसाचा प्रश्न आहे, " येथवर भावनेच्या भरांत बोलणारे वक्ते त्यांच्या समोर असत व त्या भाषणांहून येतांना, " हें एक दिवसांत येणारें स्वराज्य आपल्या आजच्या स्वाभिमानशून्य नि विसंघटित समाजस्थितींत एकाच दिवसांत जाणेंहि संभवनीय आहे, "असें केशवरावांचें मन त्यांना सांगे. क्रांतिकार्यांतील अंतःप्रवाहहि त्यांच्या अवलोकनांत येत होते व देशापुढील प्रश्नांच्या दृष्टीनें समाजाची मनःस्थिति व संघटना कशी असली पाहिजे याविषयींचें आडाखे बांधण्याचें कामहि त्यांच्या मनांत चालू असे. पण या सर्वांपेक्षां इतरांना देशभक्तीचे धडे देण्यापूर्वी स्वतः शरीरानें व मनानें वज्रासारखें कठोर बनून, शेवटच्या श्वासापर्यंत देशाच्या स्वातंत्र्यासाठीं व समाजाच्या आत्यंतिक वैभवासाठीं उभें राहण्याचा महन्मंगल संकल्पहि त्यांच्या मनांत रूप घेत होता. डोळे व कान उघडे ठेवून आपण आपल्या संपर्कांत येणाऱ्या व्यक्तींचें व घटनांचें अंतरंग न्याहाळावें व त्यांतून मधुमाक्षिकेच्या

वृत्तीने नेमके चांगुलपण तेवढे टिपून घेऊन त्याचा उपयोग आपल्या जीवनांत करावा, असा जणू हव्यासच त्यानीं त्या काळांत घेतला होता. लोकमान्य टिळकांना सहा वर्षांची शिक्षा झाली त्या दिवसापासून आपल्या कोटाच्या बाहीवर काळी पट्टी बाधून हिंडणारे तपस्वी बाबासाहेब पराजपे ह्याचे कलकत्त्यात आगमन होवो किंवा लोकमान्य टिळकाना मडालेला भेटून अमरावतीचे उमराव दे. भ. दादासाहेब खापर्डे तेथे आलेले असोत, केशवराव आपल्या निवासात त्याना आणून त्याची व्यवस्था करीत व त्याच्याजवळ चालू समाजस्थितीचे उत्सुकतेने कानोसे घेत. अदमानातील अधारकोठडीतून स्वातंत्र्यवीर सावरकरांचे जणू रक्ताश्रूंनीं लिहिलें जाणारे पत्र ज्या वेळी कलकत्त्याला डॉ. नारायणराव सावरकराकडून त्याना वाचावयास मिळे, तेव्हा तर ते त्याची पारायणेंच करीत. त्यांतील आशय वाचता वाचता ते मनाने अदमानात जाऊन तेथील यमयातनाना हंसतमुखाने पचविणाऱ्या त्या राष्ट्रभक्ताच्या धृतीशी भक्तीने समरस होऊन जात !

ह्याप्रमाणे डोळसपणे व्यवहार करीत असता कोणतेहि एकदां कर्तव्य म्हणून म्हटल्यावर त्यानीं त्याकरिता कष्ट करण्यास कधीच मागेपुढे पाहिले नाही. रात्र असो वा दिवस असो, ते कर्तव्याच्या हाकेला ओ देण्यास कधीच चुकत नसत. एके दिवशी श्यामसुदर चक्रवर्ती घाईघाईने ‘ महाराष्ट्र-निवासा’त आले व निवडक महाराष्ट्रीय तरुणाना बाजूला घेऊन त्यानी त्या रात्री कलकत्त्याजवळील एका खेड्यात येण्याची सूचना दिली. रत्नागिरीकडील कोणी तरुण क्रातिकारक परदेशांतून ‘ बॉम्ब ’ करण्याची विद्या हस्तगत करून त्या खेड्यात अज्ञातवासात रहात असे. क्रातिकारकाना ती कला शिकविण्याचे काम त्याने अज्ञात राहून सावधपणे चालविले होते. त्या अधारातील जीवनातच तो आजारी पडला व त्या स्थितीत त्याच्या मित्रानी केलेले उपचार अपुरे पडून दुर्दैवाने तो मरण पावला ! त्या तरुणाने ‘ ब्राह्मणाकडून माझा अन्त्यसस्कार होऊ द्या, ’ अशी इच्छा व्यक्त केली होती व ती पूर्ण करण्यासाठीच चक्रवर्तींनी या तरुणाना त्या खेडयावर बोलाविले होते. सकेताप्रमाणे महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांपैकी आठ-दहा जण रात्री तिकडे गेले. त्यात श्री. रामकृष्ण सदाशिव पिपुटकर, केशवराव इत्यादि मंडळी होती.

त्या खेडयांतील एका अंधाऱ्या घरांतून त्या तरुणाचे शव खेडयापासून कांहीं अंतरावर गुपचूप नेण्यात आले. कलकत्त्यांतील तरुणानी दुःखाने भारावलेल्या मनःस्थितीत सरण रचिले. आकाश काळ्या ढगांनी अंधारून गेलेले होते. आता अग्नि द्यावयाचा, तोच श्यामसुंदर पोथी घेऊन पुढे सरले व एकाला दिवा दाखविण्यास सांगून म्हणाले, “ मातृभूमीच्या सेवेत बलिदान करणाऱ्या ह्या देशभक्ताला भडाग्नि नाही द्यायचा ! ” त्यांच्या त्या जिव्हाळ्याने तेथील साऱ्यांचे नेत्र ओलावले !

आपली एक काडी तुटलेला चष्मा दोऱ्यानें कानाला अडकवीत ते पोथी-वरून अंत्यसंस्काराचा विधि सांगूं लागले !

थोडयाच वेळांत ज्वाला उफाळूं लागल्या नि एक अज्ञात तरुण देशभक्त अज्ञातपणें अज्ञातांत विलीन झाला !

वरून काळा मेघ गहिंवरला व अशी दिव्यत्वाची प्रतीति देणाऱ्या त्या तरुणाला भावपूर्ण वंदन करून इतरांनींहि त्यास अश्रूंच्या तिलांजली अर्पिल्या !

★ ★ ★

## ५ : जीवनाची दिशा

कला आणि जीवन यांच्या परस्पर संबंधाविषयी अनेकांनी चर्चा करूनहि त्याचा समाधानकारक निर्णय अजूनहि लागलेला नाही. आणि पुढे तरी केव्हा तो लागणार आहे की नाहीं, हे सागणेहि सोपे नाही. बगालमध्येहि असाच झगडा चालू असलेला दिसतो.

सारा बगाल प्रान्त अत्यंत सपाटच्या सपाट व नदी-नाल्यानी भरलेला आहे. पण ही भूमीची सपाटी इतरेजनाना कितीहि कटाळवाणी होणारी असली तरीहि कवि-मनाला ती अत्यत मोहिनी घालणारी दिसते. सपाटी हे प्राताचे वैगुण्य आहे, असे म्हणून नाके मुरडणाऱ्या अरसिकाना कविवर्य रवीन्द्रनाथ ठाकूर असा परखड प्रश्न करतात की, " नेत्राने जो सारखा निरखीत रहावा नि मनाने जो अतर्निविष्ट करून ठेवावा, असा ह्याच्यासारखा दुसरा प्रदेश कोठे आहे ? " ( " Where is there another such country for the eye to look on the mind to take in ? " ) इतकेच नव्हे तर आणखी ह्यापुढे जाऊन ते असेहि सागतात की, " पुष्कळ जण बगाल हा केवळ एक सपाट प्रदेश आहे म्हणूनच त्याच्याकडे तुच्छतेने पाहतात. परतु नेमकी तीच गोष्ट मला तेथील सृष्टिसौंदर्यात अधिकच रगवून सोडीत असते. त्याचे निर्व्यत्यय आकाश सध्याकाळच्या उतरत्या प्रकाशाने आणि शांततेने जणू काय एखाद्या अजिरी रत्नचषकाप्रमाणेच काठोकांठ भरलेले असते आणि शान्त नि निःस्तब्ध अशा मध्यान्हाचे सुवर्णवस्त्र त्या समग्र गगनागणावर नितळपणे पसरलेले दिसते." ( " Many look down on Bengal as being only a flat country, but that is just what makes me reveal in its scenery all the more. Its unobstructed sky is filled to the brim, like an amethyst cup, with the descending twilight and peace of the evening and the golden skirt of the still, silent noonday spreads over the whole of it without let or hindrance. " )

पण याप्रमाणे कविमनाला सुखविणाऱ्या बंगालच्या याच भूमिविशेषाने गेलीं सहस्रावधि वर्षे लक्षावधि लोकांना महापुराच्या आपत्तीशी अखंडपणे झगडत ठेविलेले आहे. महापूर हा बंगालमधील लोकांना शापच ठरलेला आहे, असेच

म्हणावें लागेल. विशेषतः त्या प्रांताच्या उत्तरेस मुसळधार कोसळणाऱ्या पावसानें तेथील नद्यांना असा कांहीं पुराचा प्रचंड लोंढा येतो कीं, त्यांच्या दोन्ही तटांवर वीस-वीस मैलपर्यंत सर्व जलमयच होऊन जातें. ह्या जगबुडींत अधून-मधून त्या उंचवटयांवर असणारे खेड्यांतील झोपड्यांचे पुंज हे बेटांसारखे किंचित् उठून दिसतात. आणि त्या खेड्यांना परस्परांशीं संबंध ठेवण्यासाठीं लहान लहान होड्यांचा वापर करावा लागतो. चोहींकडील भातखाचरें एक एक पुरुष पाण्याखालीं डुबतात आणि विविध रंगांच्या कमलदलांनीं अनुपम शोभायमान होणारीं तळीं आणि पुष्करणी, व्यक्तीनें समष्टींत विलीन व्हावें त्याप्रमाणें स्वतःचें अस्तित्व या महापुराच्या पाण्यांत समरस करून टाकतात. लहान मुलानें आजोबांचा पगडी-पोषाख चढवून, डोळ्याला चष्मा लावून आणि हातांत काठी घेऊन पोक्तपणाची ऐट आणावी, त्याप्रमाणें बंगाल्यांतील जलप्रवाह सागराची ऐट आणण्याचाच जणूं यत्न करीत असावेत !

बंगालमधील दामोदर नदीला वर्षांतून एकदां तरी अशी लहर येते आणि त्या वेळीं विशेषतः तिच्या पश्चिम तीरावरील बरद्वान जिल्ह्यांतील लोकांचे मनस्वी हाल होतात ! पण १९१३ सालीं दामोदर नदीला आलेल्या महापुराचें स्वरूप फारच भीषण होतें. त्याचीं वर्णनें ऐकून आणि वाचून कलकत्त्यांतील कांहीं सार्वजनिक संस्थांनीं लगोलग एक निधि पूरग्रस्त जनतेला साहाय्य देण्यासाठीं गोळा केला व यंत्रणा उभारली. समाजावरील संकट तें आपणांवरील संकट अशी धारणा असलेली जी तरुण मंडळी स्वाभाविकपणेंच तेव्हां त्या कार्यांत संमीलित झाली, त्यांत केशवराव होते हें सांगावयास नकोच. त्या वेळीं ते स्वामी विवेकानंदांच्या ‘ रामकृष्ण मिशन ’च्या वतीनें त्या भागांत गेलेले असून त्यांच्या गटांत सहा जण होते. त्यांच्याबरोबर त्या वेळीं अविश्रान्त परिश्रम केलेले मद्रासचे देशभक्त श्री. के. एस्. वेंकटरमण ह्यांच्या दैनंदिनीवरून त्या सर्वांचीं नांवेंहि उपलब्ध झालीं आहेत. सर्वश्री नलिनी, गोखले, देशपांडे, आर्. एस्. सुर्वे, वेंकटरमण आणि केशवराव अशा सहा जणांची ती तुकडी होती. इतरहि तुकड्या त्या भागांत गेल्या होत्या.

त्या भागांत गेल्यावर शक्य होईल तेव्हां होड्यांतून जाऊन नाहीं तर कंबरेएवढ्या पाण्यांतूनहि चालत जाऊन मुरमुरे आणि पोह्याचीं पोतीं पाण्यानें वेढलेल्या विविध खेड्यांत पोहोंचविण्याचें काम त्या मंडळींकडून धडाक्यानें चालू करण्यांत आलें. पाठीवर पोतीं वाहून दलदलींतून खेडें गांठावें लागे तर तेथील दरिद्री लोक घरांत पाणी शिरून सर्व जलमय झाल्यानें मुलांमाणसांसकट माचणावर काकडत बसलेले दिसत. ही मंडळी तेंथें पोहोंचली म्हणजे त्यांना केवढा आनंद होई ! अशीं पोतीं वाहून नेत असतां मध्येंच एखादा साप आपल्याच गतीनें पाण्यावर नागमोड्या क्षणभंगुर रेघोट्या काढीत वळवळत चाललेला त्या मंडळींच्या दृष्टीला पडे, तर मध्येंच बाणाच्या गतीनें खंड्या पक्षी पाण्यांत झेंपावून आपलें

रुपेरी भक्ष्य टिपून पुन्हा भरारी घेतांना दिसे ! ऑगस्ट दि. ११, १२ आणि १३ असे संपूर्ण तीन दिवस केशवराव आणि वेंकटरमण यानी ते सेवाकार्य अविरत चालवले होते. श्री. वेंकटरमण लिहितात कीं, "डॉक्टरांनी अगदी रात्रदिवस मोठ्या आटोपाने आणि मोठ्या उत्साहाने काम चालविले होते. त्यांचे ते परिश्रम खरोखरच असामान्य होते." ("Day in day out Doctorji worked with great vigour and energy. It was extraordinary.")

त्याच धामधुमीत कांही भागांत भरीस भर म्हणून पटकीचा प्रादुर्भाव झाल्याने त्याचे औषध वांटण्यासाठींहि रात्रीं ११ वाजेपर्यंत प्रयत्न चाललेले होते असे दिसते. दुसऱ्याचे दुःख दूर करतांना स्वतःला ज्या हालअपेष्टा सहन कराव्या लागतात त्याचे भान खऱ्या सेवकाला कसे असत नाही, त्याचे मूर्तिमंत उदाहरण केशवरावांच्या त्या हालचाली ऐकल्यावर त्याच्या रूपाने कोणाच्याहि पुढे उभे राहील.

कलकत्त्याच्या जवळ जवळ सहा वर्षांच्या वास्तव्यात आणखीहि एक वेळ ते असेच महापुराच्या प्रसंगी सेवाकार्यासाठी गेले होते असे दिसते. त्या वेळी त्याच्याबरोबर डॉ. ना. दा. सावरकर, डॉ. यादवराव अणे आणि डॉ. तेंडूलकर (मुंबई) इत्यादि मंडळी होती. तसेच कलकत्त्यापासून साठ-एक मैलावर ज्या ठिकाणी गगा सागराला मिळते त्या ठिकाणी मकर संक्रांतीला प्रतिवर्षी मोठी यात्रा भरत असते. एका वर्षी त्या गंगासागर यात्रेच्या वेळी त्या भागात पटकीचा प्रादुर्भाव विशेष झाला होता. त्या वेळी तेथे झोपड्या-झोपड्यांतून हिंडून आजाऱ्याना औषधोपचार करण्याचे काम कलकत्त्याहून गेलेल्या पथकाने केले होते आणि त्या पथकातहि केशवराव हेडगेवार समीलित झालेले होते. अशा विविध प्रसगानी केशवरावाचा बंगालमधील ग्रामीण जीवनाशींहि निकटचा सबध आला आणि दारिद्र्य, अज्ञान व रोगग्रस्तता ह्या त्रयीने तेथील लोकाचे सारे जीवनच कसे निःसत्त्व आणि केविलवाणे करून टाकले आहे, त्याची चागलीच कल्पना त्याना आली. ती स्थिति पाहून त्याचे मन तीळ-तीळ तुटे आणि आपले जीवन हे भारताचे दैन्य दूर करण्यासाठीच समर्पण करावयाचें, ह्या त्याच्या सकल्पाला अधिकाधिकच दृढता येई.

केशवराव पहिल्या वर्षी राहण्याला आणि भोजनाला 'शान्तिनिकेतन'-मध्ये होते. त्यानंतरच्या चार-पांच वर्षात त्याचा राहण्याचा निवास सामान्यतः तोच टिकून होता, तरी हे जगन्मित्र जेवणासाठी दिवस टरवून घेऊन इतर वसतिगृहातूनहि जात असत. अधूनमधून काही महिने त्याना खाणावळींतहि जावे लागे. जशी आर्थिक परिस्थिति असेल त्यानुसार हे भोजनव्यवस्थेतील पालट होत होते, हे सांगावयास नकोच. तो स्वस्ताईचा काळ होता आणि अवघ्या पंचवीस रुपयांत कलकत्त्यांत व्यवस्थित राहतां येत असे. दूध रुपयाला आठ शेर होते आणि

दोन-तीन पैशांत बारा केळ्यांचा फणा मिळे ! नागपुराप्रमाणें येथेंहि व्यायाम करण्याचा नियम केशवरावांनीं टिकवला होता आणि त्याला पोषक असा दुग्धाहारहि स्वस्ताईमुळें ते घेऊं शकत होते. केशवरावांची छाती आतां भरदार झाली होती आणि त्यांच्या दंडांचा पीळ आणि मनगटाचा कणखरपणा वाढला होता. त्या काळांत आजच्या पिढीला आश्चर्य वाटेल असा त्यांचा आहार असे. वेळेला वीस-पंचवीस पोळ्या ते सहज खात आणि कधीं चढाओढ लागली तर त्यांत आणखी भरच पडे !

एकदां त्यांच्या वर्गात प्राध्यापक येण्याला थोडा अवधि असल्यानें विद्यार्थिवर्ग तारुण्यसुलभ वृत्तीनें परस्परांची थट्टा करण्यांत आणि गप्पा करण्यांत गर्क होता. थट्टेच्या भरांत केशवरावांचे एक स्नेही श्री. हावराबाबू म्हणजे डॉ. अमूल्यरत्न घोष ह्यांनीं कल्पना काढली कीं, दंडावर बुक्क्या मारून घेण्यांत कोण कोणाला हटवतो तें पाहूं या. श्री. हावराबाबू गुद्दे झेलण्यासाठीं बाही सरसावूं लागतांच केशवराव म्हणाले, "तूं प्रथम माझा पराभव करून दाखव." पलार्धात केशवरावांच्या दंडावर दणादण ठोसे लगावले जाऊं लागले आणि सर्व वर्गच त्या दोघांसभोंवतीं औत्सुक्यानें जमा झाला. बराच वेळ असें चाललें होतें, पण केशवरावांच्या मुखावर कष्टीपणाचा लवलेशहि आढळला नाहीं. उलट, त्यांच्या सहनशीलतेचें साश्चर्य कौतुकच प्रेक्षकांच्या मुखांतून उमटूं लागलें आणि शेवटीं गुद्दे मारून मारून थकलेले श्री. हावराबाबू हतोत्साह होऊन खालीं बसले ! ह्या घटनेविषयीं 'मॉडर्न रिव्ह्यू'च्या एका अंकांत डॉ. अमूल्यरत्न घोष म्हणतात, "हेडगेवार एक तसूभरहि मागें हटले नाहींत. त्यांना पराभूत करण्यांत मीच पराभूत झालों." ("Hedgewar did not budge an inch. I failed to inflict a defeat on him.")

कलकत्त्यांत लोकमान्यांच्या १९०६ मधील आगमनाच्या वेळींच सार्वजनिक गणेशोत्सवाचा श्रीगणेशा झाला होता. हें सुरू झालेलें राष्ट्रीय जागृतीचें लोण निरनिराळ्या वसतिगृहांतून पोहोंचविण्याकडे केशवरावांचें सदैव लक्ष असे. ते निरनिराळ्या वसतिगृहांत गणपति बसवण्याची खटपट करीत आणि त्यांच्यासमोर पुढाऱ्यांचीं आणि विद्यार्थ्यांचीं भाषणें घडवून आणीत. अशा उत्सवांतून महाराष्ट्रीय पद्धतीनें आरती होऊन मंत्रपुष्पांजलि वाहण्यांत येई. एक-दोन वेळां मंत्रपुष्पांजलीच्या वेळीं जणूं गगनाचीं कवाडेंच खोलूं निघालेल्या अशा चढ्या आवाजांत गाजलेल्या 'साम्राज्यं' 'वैराज्यं' यांसारख्या शब्दांविषयीं आरक्षकांना संशय येऊन कांहीं विद्यार्थ्यांना चौकीवरहि जाण्याचा प्रसंग आला होता, असें सांगतात !

श्री. केशवराव हे पदवी परीक्षेच्यानंतरहि कांहीं दिवस कलकत्त्याला होते. त्या अवधींतच नागपूरचे श्री. नानासाहेब तेलंग हे तेथील 'राष्ट्रीय वैद्यकीय

महाविद्यालयां 'त प्रवेश मिळावा म्हणून तेथे गेले. त्या वेळीं डॉक्टर एका मद्रासी खाणावळींतून डबा आणीत असत. त्यात वीस पोळ्या आणि त्याना साजेसेच इतर पदार्थांचे प्रमाण असे. डॉक्टर तेथे असतांनाच एकदां त्याच्या डब्याचे ते 'भरीव' स्वरूप पाहून त्यांच्याइतकेच पैसे देऊन डबा नेणाऱ्या एका व्यक्तीने चालकाजवळ कुरकूर चालू केली की, "त्याना तेवढी भात-पोळी-भाजी इतकी कां देतां?" त्या वेळीं त्यानें चक्क सांगितले, की "डॉक्टर हेडगेवार याना मी जो डबा भरून देतो तेवढे जेवण कांही दिवस एका वेळी आपण जेवून दाखवावे म्हणजे आपणालाहि मी तसा डबा देईन. प्रथमतः डॉक्टराना मीं नेहमीसारखा डबा भरून दिला असतां त्यानी मला येऊन सागितले कीं, 'एवढेसे अन्न मला कसे पुरेल?' तेव्हा त्यांनाहि मी कांही दिवस येथे येऊन जेवा आणि आपला आहार अधिक आहे असे दिसल्यास मी डब्यांत अधिक अन्न देत जाईन, असे सांगितले होते. त्यावर त्यानी काही दिवस सहजतेने वीस-वीस पोळ्या वेळेला खाऊन मला चकित केले. तेव्हाच मी त्याना असा डबा भरून देऊं लागलो. असेल सिद्धता तर पहा!" अर्थात् त्यानतर त्या माणसाची किरकीर आपोआपच थांबली हे सांगावयास नकोच. तेलग सागतात की, काही दिवस आम्ही त्यांच्या एकट्याच्या डब्यात दोन-तीन जण जेवत असूं.

डॉ. केशवरावाच्या नावावर मिळणारी ती भरीव डब्याची सवलत पुढे बंद कशी झाली तिच्याविषयी श्री. तेलंग हे पुढील गोष्ट सागतात: डॉक्टर कलकत्त्याहून नागपुरांत परत आल्यावरहि त्यांच्या 'भरगच्च' डब्याचा लाभ कांही दिवसपर्यंत त्यांच्या मित्रांनीं घेतला. पण त्या मित्रानी एक पथ्य न पाळल्याने शेवटीं त्या सवलतीच्या डब्याला ते मुकले. डॉक्टर एका ठराविक दिनाकाला डब्याचे पैसे न चुकता देत असत. हा कटाक्ष पाळा, असे त्यानी तेथून नागपूरला जातांना मित्रांना सांगितले होते. पण दोन-तीन महिन्यातच तो नियम त्याच्याकडून मोडला गेला. तेव्हां खानावळवाल्याने हेडगेवारांकडून असे होणे शक्य नाहीं, बहुतेक ते गांवीं गेले असावेत व त्यांच्या डब्याचा लाभ दुसरेच कोणी घेत असावेत हे हेरले. एके दिवशीं प्रत्यक्ष खोलीवर येऊन त्याने चौकशी केली, तेव्हा त्याची अटकळ अचूक असल्याचे त्याला कळून आले आणि दुसऱ्या दिवसापासूनच इतरांच्या मापानेच तेथील डबा भरला जाऊं लागला. डॉक्टराचें जेवण पाहून त्या खानावळ-वाल्याला त्याचें कौतुक वाटे आणि त्यामुळे तो त्यांना नित्याच्या भावांत तेवढे जेवण देऊं लागला होता.

वर्षांतून दोन वेळां डॉक्टर मध्यप्रदेशांत सुट्टीत येत असत. कलकत्त्याहून येतांना ते आपल्या चुलत्यांकडे रामपायलीला कांहीं दिवस थांबत. त्यासाठीं तिरोडा स्थानकावर उतरून रात्री एकटेच दहा-पंधरा मैल चालून जात. मग नागपूरला येत. ह्या वेळीं ते नागपूरमध्ये डॉ. मुंजे किवा श्री. तात्याजी फडणवीस

यांजकडे राहत असत. सुट्टींतील कांहीं दिवस ते केव्हां केव्हां आपले वर्गमित्र श्री. यादवराव अणे ह्यांच्याकडेहि यवतमाळला घालवीत. त्याचप्रमाणें त्यांचे क्रान्तिकार्यांतील सहकारी श्री. गंगाप्रसाद पांडे ह्यांना भेटण्यासाठीं ते वर्ध्याला जाऊन यावयाचे.

एकदां असेच सुट्टीचे ते यवतमाळला गेले होते. एके दिवशीं केशवराव, गोविंदराव आवदे आणि श्री. यादवराव अणे असे तिघेजण सिव्हिल लाईनच्या रस्त्यानें फिरावयाला निघाले असतां त्यांना समोरून तेथील इंग्रज जिल्हाधिकारी येतांना दिसला. त्याच्याबरोबर सरकारी डॉक्टर आणि आणखी एक अधिकारी असे आणखी दोन जण होते. त्या काळांत आधींच इंग्रज अधिकाऱ्यांविषयींचा एक धाक लोकांच्या हृदयांत वसत होता आणि त्यांतून वरमाईच्या तोऱ्यांत आपले मानपान घेण्याची त्या वेळच्या जिल्हाधिकाऱ्यांची उर्मट वृत्तीहि लोकांच्या नित्य परिचयाची झालेली होती. तो समोरून येत असेल तर लोकांनीं जागच्या जागीं थबकावें आणि स्वारी अंगावरून जातांना विनम्रतेनें ‘ सॅल्यूट ’ करावा, हा त्या वेळचा अलिखित असा दंडकच होऊन बसला होता. डॉ. केशवराव हे नवखे म्हणून त्यांच्या मित्रांनीं तो समोरून येतांना दिसतांच ‘ सॅल्यूट ’ ठोकण्याची आणि जरा रस्त्याच्या कडेनें चालण्याची पूर्वसूचना दिली. पण केशवराव हे अशा मदोन्मत्तापुढें थोडेच वांकणार होते ? आणि अशा अप्रयोजक दंडकाला थोडेच भीक घालणार होते ? ते म्हणाले, “ हा सार्वजनिक रस्ता आहे, तेव्हां मी जसा चाललों आहें तसाच सरळ चालणार ! ” इतक्यांत तें त्रिकूट केशवरावांच्या जवळ येऊन पोहोंचलें. केशवरावांकडून अपेक्षित वंदनेचा ‘ करभार ’ तर त्यांना मिळाला नाहींच, पण उलट ते बाजूला होण्याचा रंगहि त्यांना दिसेना, तेव्हां ती त्रयी स्वतःच बाजूला सरून पुढें गेली. पण तो अपमानाचा धक्का त्यांचें मन थोडेंच स्वस्थ राहूं देणार ? सापाच्या शेपटीवर पाय पडलेला असावा अशा फणकाऱ्यांत दहा पावलें पुढें गेल्यावर ते मागें वळले आणि “ अहो, जरा थांबा ! ” असें म्हणत त्यांनीं केशवरावांना थांबवून चौकशी केली. जिल्हाधिकाऱ्याच्या चौकशीला केशवरावांनीं शांतपणें उत्तरें दिलीं. त्यावर “ सॅल्यूट करावयाचा शिष्टाचार माहीत नाहीं काय ? ” असा प्रश्न त्यांना विचारला गेला. तेव्हां हा प्रश्न विचारणें हाच शुद्ध अशिष्टपणा आहे असा भाव व्यक्त करीत केशवराव म्हणाले, “ येथील शिष्टाचाराशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. मी प्रान्ताच्या राजधानींत वावरणारा नागरिक आहें आणि तेथें अशी प्रथा शिष्टाचारांत मोडत नाहीं. परिचयावांचून एखाद्याला नमस्कार-चमत्कार करणें हा कुठल्या देशांतला शिष्टाचार आणला ? ” ह्या निर्भयतेचा आविष्कार होत असतां केशवरावांचे दोन्ही हात कोटाच्या खिशांत होते. तेव्हां सरकारी डॉक्टर पेद्रू पुढें येऊन आणि जरा समजुतीच्या स्वरांत, केशवरावांनीं खिशांतून हात बाहेर काढावेत आणि ‘ सॅल्यूट ’

करणे हा मिथ्याचार वाटत असला तरी पुढील भानगडी टाळण्यासाठीं तरी त्यानीं तो करावा, असा युक्तिवाद परोपरीने करूं लागले. केशवरावांनी स्मित करीत ' अशी सूचना केलीत त्यासाठी आपला आभारी आहे ' असे म्हणत त्यांच्याकडे पाठ फिरविली आणि ते पुढे चालूं लागले. या प्रकारानंतर कांही दिवस तेथील सरकारी गोटात किती खळबळ माजली असेल हे सागणे नकोच. तथापि, नागपूरमध्ये परत आलेल्या केशवरावाकडून जेव्हा डॉक्टर मुजे ह्याना हा प्रकार समजला, तेव्हा त्यानी मात्र " छान केलेस ! " या शब्दांत त्यांची पाठ थोपटली !

१९१४ च्या जून महिन्यात त्याच्या ( केशवरावांच्या ) ' एल्. एम्. अँड एस्.' ह्या पदवी-परीक्षेपूर्वी ते काही कामानिमित्ताने नागपूरला आले होते. त्या वास्तव्यांतच जून दि. १७ या दिवशी लोकमान्य टिळक ह्याची मंडालेहून पुण्यांत आणून सुटका करण्यात आल्याची अत्यत आनंददायक वार्ता दि. १८ ला नागपूरला येऊन धडकली. लोकमान्यासारख्या साठीच्या घरात आलेल्या वृद्ध लोकाग्रणीचे मंडालेच्या रोगट कारागृहातील विजनवासातून सहा वर्षाच्या प्रदीर्घ कालानंतर होणारे आगमन ही भारतीय जनतेच्या जीवनातील एक आनंदपूर्ण आणि मंगलमय पर्वणीच होती. दिनाक १८ ला त्या आनंदाप्रीत्यर्थ झालेल्या सोहळ्यांत केशवरावानी स्वयप्रेरणेने डॉ. मुजे ह्यांच्या घरावर असंख्य दीप उजळून दिवाळीचे स्मरण करून दिले होते. डॉ. पाराशर ह्याच्या आठवणीप्रमाणे लोकमान्याना शिक्षा झाल्यापासून त्यांची सुटका होईपर्यतच्या काळांत केशवराव ' एकादशी ' करीत असत आणि त्याच्यापासून पजाबी विद्यार्थ्याच्या निवासातील दुसऱ्या काहीं जणानीहि त्याचे अनुकरण केलें होते. साहजिकपणेच लोकमान्या-विषयीं केशवरावाच्या हृदयात वसणारा तो गाढ भक्तिभाव त्याच्या सुटकेच्या दिवशीं असंख्य दीपांच्या रूपाने प्रकट व्हावा ह्यात नवल कसले !

त्या तशा आनंदातच ते कलकत्त्याला गेले आणि शेवटच्या परीक्षेला बसले. त्या परीक्षेचा निर्णय अर्थातच अनुकूल लागला आणि केशवराव हेडगेवार हे एल्. एम्. ॲड एस्. ही पदवी मिळवून 'डॉक्टर' झाले. दिनाक १२ सप्टेंबर १९१४ ह्या दिवशी त्याचा दीक्षान्त समारभ पार पडला. त्यानतरचे एक वर्ष तेथील शिक्षण-क्रमानुसार तज्ज्ञ डॉक्टराच्या मार्गदर्शनाखाली प्रत्यक्ष रुग्णालयात रोगनिदान, चिकित्सा, शुश्रूषा याचा अनुभव घेण्यासाठीं ते राहिले होते. १९१५ च्या जुलै दिनाक ९ ला त्याचा हा शिक्षणक्रम खऱ्या अर्थाने पूर्ण झाला आणि पदवीनतरचे प्रत्यक्ष प्रायोगिक अभ्यासक्रम ( clinical courses ) पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र त्याच्या हाती पडले.

हे प्रमाणपत्र हातीं पडल्यानंतर थोड्याच दिवसांत डॉ. केशवराव ह्यानीं बँकॉक येथील एक प्रख्यात डॉक्टर के. एस्. अय्यर ह्याच्याकडे नोकरीसाठीं

आवेदन ( अर्ज ) पाठविलें होतें. तेथें ३०० रुपये वेतन मिळणार होतें आणि निष्णात शस्त्रवैद्याच्या हाताखालीं अनुभवहि लाभला असता. परंतु तें आवेदन अर्थातच त्यांनीं आपल्या मनापासून पाठविलेलें नव्हतें, तर केवळ त्यांचे प्राचार्य डॉ. मलिक ह्यांच्या अत्याग्रहावरूनच केलेलें होतें. तें करीत असतांना त्यांनीं स्पष्टच सांगितलें होतें कीं, "माझा खरोखरच अशी नोकरी वा व्यवसाय करण्याचा मुळींच विचार नाहीं." त्यांच्या त्या आवेदनाला योगायोगानें दिनांक २९ जुलैला "जागा आधींच भरली गेली" असें नकारार्थी उत्तर आलें आणि डॉ. मलिक ह्यांचें मन दुखविण्याचा त्यांच्यावरील संभाव्य प्रसंगहि परस्परच टळला !

पण अशा रीतीनें राष्ट्रीय पदव्या घेऊन तरुण बाहेर पडत असतां त्यांना कुचकामी ठरवून त्या लोकमान्य पदवीधरांना राजमान्यता मिळेपर्यंत त्यांना हीन लेखण्याचा प्रयत्न सरकारनें चालू केला. त्यासाठीं सर पार्डे लुकिस् ह्यानें वरिष्ठ विधिमंडळापुढें एक विधेयक मांडलें होतें. त्यांत अशा पदवीधरांचा व्यवसाय करण्याचा अधिकार तर मान्य केलेला होता, पण त्यांनीं रोग्यांना दिलेलीं प्रमाण-पत्रें ( Certificates ) हीं मात्र सरकारी व्यवहारांत स्वीकारलीं जाणार नाहींत, अशी विचित्र अट लादलेली होती ! सरकारला डावलून केवळ लोकाश्रयावर उभ्या राहिलेल्या राष्ट्रीय शिक्षण संस्थांना शह देण्याचा विचारच ह्या अशा विक्षिप्त निर्बंधांतून सहजच डोकावत होता. तेव्हां हा सरकारचा डाव हाणून पाडण्यासाठीं नव्या-जुन्या राष्ट्रीय पदवीधरांच्या सहकार्यानें डॉ. केशवराव हेडगेवार ह्यांनीं एक वृत्तपत्रीय प्रचार-आंदोलन उभें केलें.

निरनिराळ्या प्रांतांच्या वृत्तपत्रांतून 'बोगस मेडिकल डिग्रीज् बिल' विरुद्ध कलकत्त्यांत निषेधाच्या सभा झाल्याचीं वृत्तें प्रसिद्ध होऊं लागलीं आणि सरकारच्या राष्ट्रीय संस्थांना नामशेष करण्याच्या दुष्ट हेतूंवर विविध वृत्तपत्रांतून कडकडून टीका करणारे अग्रलेख लिहिले गेले. वस्तुस्थिति अशी होती कीं, त्या सभा प्रत्यक्षांत झाल्याच नव्हत्या. परंतु तरीहि असें सांगतात कीं, ह्या न झालेल्या सभांतील बनावट भाषणांचीं जीं प्रतिवृत्तें प्रसिद्ध होत तीं वाचून त्या सभांचा पत्ता आपल्या गुप्तचरांना कसा लागला नाहीं, असा प्रश्न कलकत्त्यांतील सरकारी अधिकाऱ्यांना पडला होता !

तें आंदोलन चालू करण्यापूर्वी डॉ. केशवराव हेडगेवार ह्यांनीं डॉ. आशुतोष मुखर्जी ह्यांची भेट घेऊन आपला मनोदय त्यांना विदित केला. त्या वेळीं त्यांनीं संकल्पित आंदोलनाला आपला पाठिंबा व्यक्त करून "जी चळवळ कराल त्याची भरपूर प्रसिद्धि करण्यास मात्र विसरूं नका" असा कानमंत्र दिला. निरनिराळ्या वृत्तपत्रांच्या संपादकांचीहि भेट घेण्यास डॉक्टर विसरले नाहींत. त्यांत 'अमृत-बझार पत्रिका' ह्या सुविख्यात पत्राचे संपादक श्री. मोतीलाल घोष ह्यांनीं तर संपूर्ण सहकार्य देण्याचें आश्वासन दिलें.

ह्या सरकारी विधेयकाच्या निषेधार्थ कलकत्त्यांत कांही सभाहि योजिण्यांत आल्या. पण त्या जोडीने खोलीत बसल्या-बसल्या कलकत्त्यांतील नव्या नव्या सार्वजनिक ठिकाणीं सभा झाल्याची वृत्तेहि क्रमानें लिहिली जाऊ लागली आणि तीं वृत्ते वृत्तपत्रांतून बिनबोभाट ठळकपणे झळकूं लागली. त्या काल्पित सभांत ज्यांची नावे अध्यक्ष आणि प्रमुख वक्ते म्हणून गोंविली जात होतीं, त्याना आधीं भेटून पढविलेले असे. अशा सभाचा आपल्याला थागपत्ता कसा लागला नाही म्हणून गोंधळलेले गुप्तचर जेव्हा अशा अध्यक्षाकडे चौकशीसाठी जात, तेव्हा ‘ सभेचा छापलेला वृत्तान्त ततोतंत खरा आहे ’ असा निर्वाळा त्याना त्याच्या-कडून ऐकावयाला मिळे आणि त्याच्या वरिष्ठाकडून त्याची कानउघाडणी केली जाई.

पुढे त्या न झालेल्या सभांच्या वृत्ताचीं कात्रणे निरनिराळ्या प्रान्तातील वृत्तपत्राकडेहि प्रसिद्धीसाठी पाठविण्यात येऊ लागलीं आणि ‘ बोगस मेडिकल डिग्रीज बिलामागे राष्ट्रीय शिक्षणसस्थाना नामशेष करण्याचा सरकारचा दुष्ट हेतु आहे ’ अशी सडकून टीका करणारे अग्रलेख लिहिले गेले.

सर्व प्रान्तातून सरकारविरोधी जनमत तीव्र स्वरूपात व्यक्त करण्याची योजना कल्पकतेने अशी सफल केल्यावर कलकत्त्यात एक प्रचड सभा केशवराव आणि त्याचे सहकारी यानी घडवून आणली. ह्या सभेला बंगालचे त्या काळातील अध्वर्यु श्री. सुरेन्द्रनाथ बानर्जी हे अध्यक्ष म्हणून लाभले होते आणि त्या गाज-लेल्या सभेतील समत झालेल्या ठरावाने आदोलनावर लोकमान्यतेची जणू प्रत्यक्ष मुद्राच ठोकली गेली.

ह्या सर्व प्रचाराचा परिणाम म्हणून सरकारने अशा राष्ट्रीय पदवीधरासाठी एक चाचणी परीक्षा घेण्याचा निर्णय घोषित केला. त्या नाममात्र परीक्षेतून आपल्या ज्ञानावर राजमुद्रा ठोकून घेणाऱ्याला त्यामुळे व्यवसाय करण्याचा मार्ग पूर्ण मोकळा होणार होता. ही परीक्षा त्या वर्षीं १९१५ नोव्हेंबर दिनाक ३ ला होणार होती आणि त्या परीक्षेला बसण्याची अनुमतिहि डॉ. हेडगेवार ह्याच्या हाती येऊन पडली होती, असे त्याच्या कागदपत्रावरून स्पष्ट दिसते.

ही अनुमति मिळाली होती आणि होणारी परीक्षा ही केवळ दिखाऊ होती हे जरी खरे होते, तरी डॉ. केशवराव ह्यांनी मात्र कलकत्त्यांत राहूनहि परीक्षेल न बसण्याचा निर्णय ठरविला. त्यांचे म्हणणे असे होते की, “ आपण राष्ट्रीय विद्या-पीठाचे विद्यार्थी आणि त्या विद्यापीठाने आपणाला पदवी दिली आहे. मग सरकारच्या मान्यतेची आवश्यकताच काय ? परक्यांच्या ताटाखालील माजर होऊन राहण्याचा प्रसग येऊ नये म्हणून तर आपण सरकारी शाळेवर बहिष्कार घालून हा मार्ग पत्करला आहे. ”

डॉ. केशवराव हेडगेवार आपलें जवळ जवळ पांच वर्षांचें कलकत्त्यांतील शिक्षण संपवून १९१६ च्या प्रारंभीं नागपूरला परत आले. ते कलकत्त्याला गेले तेव्हांहि 'सरकारपुढें वांकणार नाहीं,' अशा निर्धारानेंच त्यांची मान उन्नत होती; तर ह्या वेळीं सरकारी मान्यतेच्या परीक्षेकडे ढुंकूनहि पाहावयाचें नाहीं, अशा स्वाभिमानाचा झेंडा डुलवीतच त्यांचें नागपूरला पुनरागमन होत होतें ! जीवनांत स्थैर्य आणण्याचा विचार करून त्यांच्या सोबत्यांनीं सरकारपुढें मान तुकवून व्यवसायाला प्रारंभ केला असेल, पण त्याच वेळीं डॉक्टर हेडगेवारहि आपल्या जीवन-निष्ठेला स्थैर्य आणूनच परतत होते ह्यांत लवमात्र शंका नाहीं. पैशासाठीं वा वैयक्तिक प्रतिष्ठेसाठीं ते थोडेच शिकले होते ? बाबू अरविंद घोषांनीं आपल्यावरील अभियोगामुळें राष्ट्रीय विद्यापीठाच्या प्राचार्यपदाचें त्यागपत्र देऊन उद्दिष्ट स्पष्ट केलें होतें. ते म्हणाले होते कीं, "तुम्हांला थोडेंबहुत पुस्तकी ज्ञान द्यावें आणि पोट भरण्यासाठीं कोणत्या तरी व्यवसायाचा मार्ग मोकळा करून द्यावा, ह्या हेतूनें आम्ही ह्या कार्याला उद्युक्त झालों नाहीं; तर आपणांतून मातृभूमीसाठीं कार्य करणारे आणि कष्ट झेलणारे सुपुत्र उभे राहावेत, हीच आमची अपेक्षा आहे." ("What we want here is not merely to give you a little information, not merely to open to you careers for earning a livelihood, but to build up sons for the motherland to work and to suffer for her.")

पण हें राष्ट्रीय शिक्षणाचें अंतरंग डॉ. हेडगेवारांव्यतिरिक्त खरोखर कितीशा पदवीधरांना कळलें होतें ! त्यांचें पिळवटणारें ध्येयनिष्ठ मन मात्र व्यक्तिगत जीवनांतील सुखदुःखांचा विचार सोडून हृत्तंत्रीवर एकच गीत आळवीत होतें—

"दुःख विघटना दिसे सभोंतीं
मनांत सलतें हें शल्य,
तें काढाया यत्न करावे
ह्यांतच जीवनसाफल्य !"

★ ★ ★

डॉक्टर नागपूरला आले तेव्हां त्यांच्या घरांत त्याचे थोरले बंधु श्री. महादेवशास्त्री राहत होते. घराच्या एका भागात तत्पूर्वी काहीं वर्षे श्री. वामनराव धर्माधिकारी ह्याचे वास्तव्य होते व त्यामुळे घराच्या पडझडीकडे लक्ष दिले गेले होते. वामनराव १९१० नतर जेव्हां घरांत प्रथम राहण्यासाठी आले त्या वेळी महादेवशास्त्रीच्या दुर्लक्षामुळे घरात ठिकठिकाणी पाणी गळून कांही ठिकाणी तर गवतहि उगवलेले आढळले होते! केशवराव 'डॉक्टर' होऊन जर व्यवसाय करूं लागले असते तर कदाचित् त्याच्या उग्रप्रकृति बंधूंचे मन जरा शांत होऊन त्यांना घरी राहण्याला अनुकूलता निर्माण झाली असती. पण डॉक्टर नागपूरला येऊन काही दिवस लोटले तरी पण व्यवसाय चालू करण्याची त्याची कांहींच हालचाल दिसेना. उलट श्री. तात्याजी फडणविसांच्या माडीवर निवास ठेवून ते सार्वजनिक कार्यातच गढलेले राहत. अर्थातच त्यामुळे त्यांच्या थोरल्या बंधूंचा व त्यांचा पुन्हा एकोपा होण्याची सुतराम् शक्यता उरली नव्हती. परंतु असे होते तरीहि केव्हां केव्हा डॉक्टर घरी जात व बंधूंना भेटून येत. डॉक्टर नागपूरला येऊन फार दिवस झाले नाहींत तोंच नागपूर भागात प्लेगचे पुनरागमन झाले. पूर्वींप्रमाणे आतां प्लेगविषयींचे अज्ञान लोकांत राहिलेले नव्हते. त्यामुळे बऱ्याच लोकांनी गांवाबाहेर भराभर झोपड्या बांधून घरे सोडली व टोचून घेण्याचीहि तत्परता दाखविली. ह्या वेळीं डॉक्टर व सीतारामबुवा हंपयार्डच्या बाजूला झोपडीवर राहावयास गेले व त्यांनी कर्तव्य म्हणून महादेवशास्त्रीना 'बाहेर राहण्यास चला' असा परोपरीने आग्रह करून पाहिला. पण त्याचा रगेलपणा इतका विलक्षण होता की, त्यांनी "हमको साला प्लेग क्या कर सकता है?" अशा शब्दांत नकार दिला. त्याच्या हट्टीपणापुढे कोणाचेच काहीं चालण्यासारखे नव्हते. पण हा हट्टीपणा परिणामी अत्यत घातक ठरणारा होता व तसाच तो त्या प्रसंगीं प्रत्यक्ष ठरलाहि. कारण थोड्याच दिवसात त्यांना प्लेगने गांठले व त्यातच त्यांचा अंत झाला.* त्याच्या मरणाची सधि साधून आसपासच्या कांहीं हाताळ लोकांनी

---

*[ टीप :—डॉक्टरांच्या बधूंच्या निधनाची ही घटना १९१६ मध्यें न घडतां १९१४ मध्यें घडली, असें सागणारेहि भेटतात, पण त्यासंबंधींचा निश्चित निर्णय*

हेडगेवारांच्या घरांतील कांहीं भांडींकुंडीं व कांहीं इतर सामानहि लांबविण्याचें कमी केलें नाहीं !

ह्या दुर्घटनेनंतर सांथ कमी झाल्यावर १९१७ पूर्वी सीतारामबुवा व डॉक्टर आपल्या घरांत राहावयास आले. नाहींतर इंदुराहून शिकून आल्यापासून सीतारामबुवा हे फडणवीस ह्यांच्याकडेच राहत व भिक्षुकी करीत. आतां दोघे बंधु एकत्र आले होते, तरी दोघांच्या दोन तऱ्हा असत. सीतारामबुवा हे भिक्षुकीमुळें सदान् कदा जेवणासाठीं बाहेरच असावयाचे व डॉक्टर कधीं लहरीप्रमाणें घरांत वा मित्राकडे जेवावयाचे ! या दिवसांत त्यांचे मित्र घरीं येऊन " व्यवसाय चालू करा, आम्ही जागा पाहून देतों, औषधालय थाटून देतों ! " असा लकडा लावीत. पण डॉक्टर " थोड्या दिवसांनीं पाहूं, आतांच काय घाई आहे ? " अशा शब्दांत त्यांची बोळवण करीत. कधीं कधीं तर ते हा विषय केवळ हंसण्यावारीच नेत. या दिवसांत पांच-दहा औषधें, छाती पाहण्याची नलिका ( स्टेथॉस्कोप ), लहानसा ताजवा व निवडक वैद्यकीय ग्रंथ असें साहित्य त्यांच्याकडे असे. तसेंच मित्रांपैकीं कधीं कोणाला आवश्यकता लागल्यास ते औषधहि देत. पण तेवढ्यावरून त्यांनीं तो व्यवसाय थाटला होता, असें म्हणतां येण्यासारखें नाहीं. व्यवसायाचा विचार त्यांच्या ध्यानींमनींहि नव्हता.

ज्या काळांत ते पदवी घेऊन आले होते, त्या काळांत हिंदुस्थानांत वैद्यकीय व्यवसायाला अत्यंत वाव होता. त्या वेळच्या श्री. कृ. दा. वऱ्हाडपांडे ह्यांच्या एका लेखावरून असें कळून येतें कीं, सबंध मध्यप्रांत व वऱ्हाड यांत वैयक्तिक व्यवसाय करीत असलेल्या डॉक्टरांची संख्या तेव्हां पाऊणशेंच्या वर नव्हती. ज्या प्रांतांत आज त्यांची संख्या सहस्रांनीं मोजावी लागेल, त्याच प्रांतांत त्या वेळीं केवळ पाऊणशें जणच तो व्यवसाय करणारे होते. त्यामुळें डॉक्टरांची प्रतिष्ठा स्वाभाविकच अधिक असे. एकीकडे ' व्यवसाय चालू करा ' असा कित्येक जणांचा आग्रह चालला होता, तर दुसरीकडे पांच-पांच सहस्र रुपये हुंडा देण्याचा मनोदय व्यक्त करून दुसरे कोणी हळूंच आपल्या मुलीची पत्रिका त्यांच्याकडे टाकून पाहत होते. पण अशा पत्रिकांतील नवग्रहांच्या पकडींतूनहि ते सटकन् निसटून जात ! ते सांगत, " अजून माझ्या थोरल्या बंधूंचें लग्न व्हायचें आहे, तेव्हां तें झालें कीं मग पाहूं ! " पण हा आडोसाहि फार दिवस त्यांच्या उपयोगीं पडूं शकला नाहीं. कारण १९१७ मध्येंच सीतारामबुवांचें लग्न झालें व हेडगेवारांच्या घराचें

---

*करणें अवघड आहे ! मात्र श्री. केशवराव परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर १९१४ मध्यें जेव्हां नागपूरला आले असतील त्या वेळच्या सुट्टींतील प्लेगमध्येंहि ती दुर्घटना घडलेली असणें संभवनीय आहे. ]*

एकलकोंडे नि रुक्ष स्वरूप जाऊन त्यांत गृहलक्ष्मीचे मांगल्य वसूं-वावरूं लागले. आतां गडातून पटांगणांत आल्यासारखी डॉक्टरांची गत झाली.

त्यानंतर आपल्यामागचा तो पत्रिकाचा ससेमिरा चुकविण्यासाठीं डॉक्टर लोकाना सांगत की, " रामपायलीला आबाजीना जाऊन भेटा. " नि त्याप्रमाणे अडलेले मुलीचे बाप रामपायलीचीहि वारी करीत. अर्थात् काही जणाना पडणारे हे हेलपाटे पाहून आबाजीनी एकदा पत्र टाकले कीं, " आपला विवाहासबंधीचा काय विचार आहे तो एकदा स्पष्ट कळवा. " त्यावर त्यांनी चुलत्यांना पत्र लिहून कळविले की, " अविवाहित राहून जन्मभर राष्ट्रकार्य करण्याचा मी निश्चय केला आहे. देशकार्य करताना केव्हांहि जिवावरचे संकट ओढवू शकेल, हे माहीत असतांना उगीच एका मुलीच्या जीवनाचा नाश करण्यात काय अर्थ आहे ? " ह्यानंतर मात्र लग्नाचा अध्याय येथेच सपला !

भावाच्या विवाहाने घराची नवी घडी बसली व डॉक्टराच्या जेवणाखाण्याचे हाल कांही प्रमाणांत कमी झाले. महादेवशास्त्रीच्या वेळचा मोडकळीस आलेला आखाडा बंद करून त्यातील व्यायामोपयोगी साहित्य दुसऱ्या काही आखाड्याना देऊन टाकण्यांत आले. मलखाब भारत व्यायामशाळेस दिला. करेले मात्र डॉक्टरांनी स्वतःसाठी घरांत राखून ठेवले. कलकत्त्याहून परत आल्यावर काही वर्षे हे दोघे बधु केव्हा केव्हा पहाटे उठून पळत कामठीपर्यंत जात व तेथे कन्हान नदीत स्नान करून पूजेसाठी फुले घेऊन येत.

युद्धकाळ संपेपर्यंत डॉक्टर सारखे गावभर हिडून गाठीभेटी घेत असावयाचे. त्या वेळीं डॉक्टराचे १९०८ पासूनचे परमस्नेही श्री. भाऊजी कावरे ह्यांच्या नेतृत्वाखाली मध्यप्रातांत ज्या क्रातिकारक हालचाली चालू होत्या, त्याच गोष्टींची आखणी व कार्यवाही करण्यासाठीं डॉक्टराचे प्रयत्न असत. निरनिराळ्या लोकाना जाऊन भेटावे व त्याना सागितलेली कामगिरी किती पार पडली, ह्याचा आढावा घेऊन पुढील योजना त्या व्यक्तीला समजावून द्यावी, असा त्या भेटीचा हेतु असे. एक त्यागी व सच्छील देशभक्त तरुण म्हणून डॉक्टरांकडे सर्वच जण आदराने पाहत व त्यामुळे ते कोणाकडेहि गेले तरी त्यांची आस्थेने वास्तपुस्त होई.

१९१६ पासून पुढील दोन-तीन वर्षांत मध्यप्रांतातील क्रांतिकारक गटाने ज्या हालचाली केल्या, त्यातील काहीं तुटक स्मृतिशेष अजूनहि ऐकावयास मिळतात. त्यावरून एक गोष्ट अगदी स्पष्ट ध्यानी येते ती ही की, त्या हालचालीची योजना करण्यात श्री. भाऊजी कावरे व डॉक्टर हेच प्रमुख होते. पण प्रत्यक्ष एखादी योजना घडवून आणण्याचे दायित्व मात्र भाऊजीनीच स्वीकारले होते. योजना व मार्गदर्शन यांत डॉक्टर हेडगेवार व प्रत्यक्ष ती योजना कार्यवाहीत आणण्यांत भाऊजी असा हा श्रमविभाग जुळून येण्याची कारणे अगदी उघड होती. एक तर डॉक्टर हे नागपूर व कलकत्ता या दोन्ही ठिकाणांप्रमाणेच पंजाबमधील

क्रांतिगटाशीं निकट परिचित व संबंधित होते व त्यामुळें इतरांचें लागणारें सहकार्य मिळविण्यास तेच दुव्याप्रमाणें उपयोगी ठरणारे होते. ह्याव्यतिरिक्त डॉक्टरांवर १९०८-९ पासूनच सरकारी हेरांचें लक्ष असल्यानें स्वाभाविकच बाह्यतः तांत्रिक दृष्ट्या निर्बंधांच्या कक्षेंत बसणारीं व बाहेरून तरी कसलाहि संशय न येणारीं अशींच कामें त्यांनीं सामान्यतः करणें कार्याच्या यशाच्या नि सुरक्षिततेच्या दृष्टीनें अधिक सोयीचें नि अधिक युक्तीचें होतें, हें थोडा विचार करतांच लक्षांत येणारें आहे. श्री. भाऊजी कावरे ह्यांची गोष्ट त्यांच्याहून अगदींच निराळी होती. ते मॅट्रिक-पर्यंत शिकलेले व कांहीं वैद्यकीय ग्रंथांचा नीट अभ्यास करून तेवढ्या बळावर तो व्यवसाय करणारे गृहस्थ होते. ह्या व्यक्तीचें बाह्य रूप अगदींच साधें असे, पण तिच्या अंतरंगांत मात्र ' नाना कलां 'चा निवास होता ! हे डॉक्टरांच्याहून दोन वर्षांनीं वडील होते व हाडापेरानें चांगलेच सणसणीत असत. उग्र व किंचित् पिंगट छटा असलेली तेजस्वी व पाणीदार दृष्टि व झुपकेदार मिशा हें त्यांचें वैशिष्ट्य होतें. त्यांचें लग्न झालेलें होतें, पण बायको लहान असतानांच वारली असल्यामुळें ' एकटा जीव नि सदाशिव ' ह्या म्हणीप्रमाणें ते अगदीं निश्चिंत व निर्भय असत. कोणत्याहि आपत्तींत मनाचा निश्चय व समतोलपणा डळमळला, अशी त्यांच्या संबंधांत नुसती कल्पना करणेंहि सयुक्तिक नव्हतें. आपल्या गटांतील मंडळींवर त्यांची विलक्षण पकड असायची. पण त्यांत शिस्तीबरोबरच वैयक्तिक स्नेहाचाहि ओलावा असे. त्यांचे शब्द झेलण्यांत ज्यांना कृतार्थता वाटे, असे त्यांचे एक सहकारी पूर्वींच्या स्मृति सांगतांना एकदां म्हणाले कीं, " भाऊजींचें व्यक्तिमत्त्व असें होतें कीं, त्यांना आई म्हणावें कीं वडील म्हणावें, अथवा भाऊ म्हणावें कीं मित्र म्हणावें, हेंच समजत नाहीं ! कारण या सर्वांच्याच प्रेमाचा ओलावा तेथें एकवटलेला होता ! " हें वाक्य उच्चारतांना त्या सहकाऱ्याचे ओलावलेले डोळे हेंच त्याची यथार्थता व्यक्त करीत होते.

भाऊजी कावरे व डॉक्टर ह्यांची मैत्री अपूर्व होती. दोन ओठांतून एकच शब्द उमटावा, दोन डोळ्यांनीं एकच दृश्य दिसावें, दोन कानांनीं एकच ध्वनि ऐकावा किंवा दोन हातांनीं एकच टाळी वाजावी, तसाच एकतेचा सुसंवाद त्या दोघांत अनुभवास येई. मात्र डॉक्टरांच्यापेक्षां ते अत्यंत भावनाशील असल्यानें रक्तमय क्रांतीच्या मार्गाव्यतिरिक्त अन्य मार्गानें जाणाऱ्यांचा खुसखुशीत व साभिनय उपहास करण्यांत त्यांचा हातखंडा असे. नरहरी सोनाराप्रमाणें त्यांना देशभक्तीचें रक्तक्रांतिमय रूपच तेवढें प्रिय होतें. त्यांचा ध्येयदेव पांडु-रंगाप्रमाणें कटीवर हात ठेवणारा नव्हता; तर त्याचें स्वरूप नेहमीं कोदंडधारीच असावयाचें ! डॉक्टरांमध्यें विचारांची विशुद्धता नि व्यापकता व त्याच्याच जोडीनें भावनेला संयमाचा लगाम घालून तिला योग्य मार्गानें चालविण्याची पात्रता व हातोटी अधिक होती. त्यामुळें भाऊजींच्या बोलण्यांत इतर मार्गांनीं

जाणाऱ्यांविषयीं जसा विखारी उपहास दिसे, तसा अनुभव डॉक्टरांच्या बोलण्यात न येतां त्याच्या शब्दातून सहिष्णुतेची स्निग्धता प्रत्ययास येई. परंतु ही स्वभावाची दोन भिन्न रूपे परस्परातील उत्कट स्नेहामुळे व देशभक्तिमय अंतःकरणामुळे एकाच बैठकींत बसल्यावर एकमेकाना पूरकच झाली होती.

डॉ. मुंजेच्या घराजवळ भाऊजी राहत असत. तेथे डॉक्टराची ये-जा असे. त्याचप्रमाणे मोठे पागोटे घातलेले व भरघोस मिशांचे भाऊजी डॉक्टरांकडेहि येत व तेथे दोघाचा विचार चाले. या दोघाव्यतिरिक्त आणखी कोणी बैठकींत असल्यास नागपुरी वळणाच्या अघळ-पघळ गप्पा-गोष्टी व थट्टा चालू होऊन हास्याच्या लहरी उसळत. पण अशा हास्याच्या उसळत्या व खेळकर वातावरणा-वरून तेथे दारूगोळ्यासंबंधीं खलबते चालत असतील, अशी शंका घेणेहि अशक्य होते. त्या वेळीं त्यांचे शेजारी-पाजारी असे बोलतहि असतील की, या लोकाना दुसरा कांही उद्योग नाही काय? पण अशा भेटींतूनच सशस्त्र उठावाची सामूहिक सिद्धता करण्याचे विचार प्रगत होत होते. माणसें, शस्त्रे व पैसा या तिन्ही साधनांची उभारणी करण्याचे काम चालू झाले होते. याच्या क्रातिगटात नवीन नवीन तरुण समाविष्ट करून घेणें सुकर व्हावे, म्हणून त्या क्रांतिगटातील श्री. अण्णा खोत ह्यांनीं ‘ नागपूर व्यायाम शाळा ’ स्थापन केली. त्याचप्रमाणे वर्धा व नागपूर या दोन ठिकाणी वाचनालय चालू करण्यात आले. ह्या गटाचे जाळे मध्यप्रात व वऱ्हाड या भागातहि विणण्याचा प्रयत्न चालू होता व त्या कामी काहींसे यशहि येत होते.

श्री. भाऊजी कावरे व डॉक्टर याचा सचार प्रातातील ठळक ठळ ठिकाणी योजनापूर्वक होत असे. कोणाच्या लग्नाला वऱ्हाडी म्हणून ते गेले आहेत, तर कोणाकडे हुरड्यासाठी म्हणून गेले आहेत, असे कानीं येई. पण त्यातील अतःस्थ हेतु अर्थातच निराळा असे. बाह्य जगाच्या डोळ्यांवर येऊ नये म्हणूनच ही दक्षता घेतली जात होती. नागपूर-वऱ्हाड या भागातील क्रातिगटात समाविष्ट झालेल्या वा हस्ते-परहस्ते ह्या गटाला आर्थिक व इतर साहाय्य करणाऱ्या मालगुजारांचाहि एक संघ कावरे व डॉक्टरानी उभा केला होता. ह्या लोकाचे प्रत्येक वेळीं नवीन नवीन गांवी मिष्टान्न भोजनाचे कार्यक्रम होत. त्या वेळी जमणाऱ्या मंडळीचा बाहेरून दिसणारा हेतु तारुण्यसहज चैन करणे हाच असे. पण अशा बैठकातूनच पिस्तुले व दारूगोळा आडगिऱ्हाइकीने विकत घेणे व इतर कामे यासाठीं लागणाऱ्या सहस्रावधि रुपयाची जुळणी होत असे. अशा एकेका मेळाव्यात केव्हा केव्हां पाच-दहा सहस्र रुपये घेऊन कावरे व डॉक्टर परत येत. या लोकाच्या जमण्याला तत्कालीन संस्थानिकाच्या सभेवरून ‘ नरेंद्र मंडळ ’ असे गमतीने संबोधिले जाई. ह्या मंडळात धोटीवाड्याचे श्री. समिमुल्लाखान हे धोतर नेसून व गंध लावून अशा पंक्तींतून पावन होऊन जात!

वरील पद्धतीनें जमणाऱ्या पैशांतून प्रांतांत ठिकठिकाणीं जमविलेल्या तरुणांना पिस्तुलें व इतर शस्त्रास्त्रें विकत घेऊन पुरविण्यांत आलीं होतीं. त्यासाठीं कलकत्ता, भागानगर (हैदराबाद) व गोवें या ठिकाणीं माणसें पाठवून नि संधानें जुळवून शस्त्रें हस्तगत करण्यांत येत. अन्य प्रांतातील क्रांतिकारकांचीं बिघडलेलीं पिस्तुलें नीट करून पाठविण्याचें कामहि डॉक्टरांचे एक स्नेही श्री. दादासाहेब बक्षी हे सफाईनें करीत असत. डॉक्टर कलकत्त्यांत असल्यापासूनच ही कामगिरी त्यांनीं स्वीकारली होती. बक्षी हे जाणते तंत्रज्ञ ( Technician) असून १९१४-१५ मध्यें डॉ. सावरकर व डॉ. हेडगेवार यांनीं आणलेल्या पिस्तुलांची त्यांची आठवण अजूनहि ताजी असलेली दिसते.

याच काळांत केशवरावांनीं बंगाल व पंजाबमधील क्रांतिकारकांशीं संधान बांधून वर्धा व नागपूर जिल्ह्यांतील सुमारें वीस लोकांचें एक पथक उत्तरेंत पाठवून दिलें. या पथकाचें नेतृत्व वर्ध्याचे श्री. गंगाप्रसाद पांडे या धडाडीच्या व कणखर क्रांतिकारकावर सोपविण्यांत आलें होतें. श्री. पांडे यांनीं राजस्थानांतील संस्थानी परिस्थितीची अनुकूलता ध्यानीं घेऊन तिकडील निरनिराळ्या राज्यांत बरोबर नेलेल्या लोकांची योजना केली व उठावाचीं सूत्रें हालविण्याच्या दृष्टीनें अजमेर हें ठिकाण निश्चित केलें. या कामीं त्या प्रांतांतील प्रसिद्ध पुढारी श्री. चांदकिरण सारडा यांचें गंगाप्रसादजींना बरेंच साहाय्य झालें. अर्थात् या पथकाचा आर्थिक दृष्टीनें पाठपुरावा करण्याचें काम डॉक्टरांनीं नागपुरांत राहून चालविलें होतें व उठावाला उपयुक्त अशीं साधनें तिकडे पाठविण्यासाठीं लागणाऱ्या जागरूक व चाणाक्ष तरुणांचीहि योजना केली होती.

महायुद्ध चालू झाल्यानंतर एक-दीड वर्षांतच इंग्रजांना निरनिराळ्या आघाड्या सांवरून धरण्यासाठीं हिंदुस्थानांतील बहुतेक सैन्य परदेशीं पाठवावें लागलें. अशा वेळीं जनतेवरील आपला वचक स्थिर राहावा ह्यासाठीं धूर्त इंग्रजांनीं आपल्या-जवळ असलेल्या मूठभर सैनिकांच्या बळावर गांवोगांवीं संचलनें काढण्याचा उपक्रम चालू केला. उपाशी माणसानें मिशीला तूप लावून जणूं काय नुकतेंच पंक्तींतून चमचमीत भोजन करून उठल्याचा आव आणावा, तशांतलाच हा दिखाऊ प्रकार होता. ही वस्तुस्थिति उठावासाठीं टपून बसलेल्या कांहीं क्रांतिकारकांच्या लक्षांत आली होती. देशांत परक्यांचें सैनिकी सामर्थ्य तुटपुंजें आहे, ह्या संधीचा लाभ घेऊन देशांतील सर्व प्रमुख पुढाऱ्यांनीं एकमुखानें ' हिंदुस्थान स्वतंत्र झाला ' अशी घोषणा करावी व तो ' स्वातंत्र्याचा जाहीरनामा ' एकाच वेळीं देशोदेशीं प्रसिद्ध करावा, असें केशवराव ह्यांना वाटूं लागलें व त्यांनीं ती कल्पना डॉ. मुंजे ह्यांच्याजवळ बोलून पाहिली. पण त्यांनीं ती कल्पना उचलून धरली नाहीं, असें पुढें केशवरावांच्या बोलण्यांत येई. इतर कांहीं पुढाऱ्यांचाहि त्यासाठीं डॉ. हेडगेवारांनीं कानोसा घेऊन पाहिला असण्याची शक्यता दिसते.

या हालचाली चालू असतांनाच डॉक्टरांच्या मनांत एकदा लोकमान्यांचे दर्शन घेण्यासाठीं पुण्यास जाऊन येण्याचा विचार आला. त्यांत चालू परिस्थितींत त्याच्याकडून मार्गदर्शक विचार ऐकावयास मिळतील, हाहि एक हेतु होताच. डॉ. मुंज्यांकडून परिचयात्मक पत्र घेऊन डॉक्टर पुण्याला गेले व त्यानीं लोकमान्यांची भेट घेतली. डॉक्टर मुंज्याच्या चिठ्ठीमुळे, भेटीनंतर उतरण्यास बाहेर जाऊ न देतां त्यांनी डॉक्टराना आपल्या घरीच ठेवून घेतले. ते त्यांच्या घरी एक-दोन दिवस होते. त्या वेळी लोकमान्यानी त्याच्या चहापाण्याची व निजण्या-उठण्याची व्यवस्था होते आहे की नाही, ह्याकडे आपल्या अनत व्यापातून स्वतः लक्ष दिले. ह्या गोष्टीने डॉक्टराना तेथे राहणे काहीसे सकोचाचे वाटूं लागले व त्याकरिता काम होतांच त्यांनी शिवनेरीला जाण्याचा विचार व्यक्त केला आणि त्या निमित्ताने गायकवाड-वाडा सोडला. या एक-दोन दिवसात तत्कालीन युद्धपरिस्थितीसबंधीं व नागपूर-वऱ्हाड भागांत चालू असलेल्या प्रयत्नासबंधी त्यानी लोकमान्याचा विचार घेतला. पण तो अनुकूल नव्हता असे म्हणतात. अर्थात् त्याचे निश्चित स्वरूप काय होते, हे सागणारा डॉक्टराचा एकहि मित्र मला भेटला नाही. लोकमान्याच्या ह्या भेटीनतर डॉक्टर शिवनेरीला गेले व छत्रपति शिवरायाच्या बाललीलानी पवित्र झालेल्या वातावरणातून आपल्या राष्ट्रसेवेच्या संकल्पाला उजळा देऊन ते नागपूरला परतले. त्या वेळी शिवरायांच्या पडक्या व उपेक्षित जन्मस्थानाशेजारीच धडकी मशीद व दर्गा त्यांच्या पाहण्यात आला ! त्या दृश्यांतील त्या विसगतीने ते अत्यत व्यथित झाले. ही मनातील बोच शिवनेरीचा कोठे उल्लेख निघाला की दुःखाश्चर्य व्यक्त करीत त्यांजकडून प्रकट होत असे !

नागपूरला जमविलेलें साहित्य पंजाब व राजस्थान या भागातहि पाठविले गेले होते व अशा एका प्रसंगीं भुसावळ स्थानकावर एक तुकडी दुर्दैवाने पकडली गेली. ह्या घटनेने सावध होऊन स्त्रीवेषधारी तरुणांकडून असे साहित्य पोहोच-विण्याचा उपक्रम चालू करण्यांत आला. १९१७ मध्ये हुबेहूब स्त्रीवेष घेऊं शकतील अशा तरुणांची योजनापूर्वक निवड करण्यांत आली होती. त्याचप्रमाणें प्रांतांतील, कांहीं तरतरीत व चाणाक्ष तरुणांना नागपूरला आणून पिस्तुलाने अचूक नेम साधण्याचे शिक्षणहि श्री. नानासाहेब टालाटुले व श्री. भाऊसाहेब टालाटुले याच्या नेतृत्वाखालीं देण्यांत आले होते. ह्याच वर्गात क्रांतिकार्यांत वावरणाऱ्या व्यक्तीने कशी सावधानता घ्यावयाची असते, ह्यासबंधी डॉक्टरानीं सर्वांना नीट कल्पना दिली होती. ह्याच वर्गाच्या निमित्ताने डॉक्टर व वर्ध्याचे श्री. आप्पाजी तथा हरि कृष्ण जोशी ह्यांचा निकट संबंध आला व त्याचे पुढें दाट मैत्रीत रूपांतर झाले. ह्या क्रातिकार्यांत नवीन प्रविष्ट होणाऱ्याची चांचणी घेऊन त्यांना प्रतिज्ञा देण्याचें काम डॉक्टर व भाऊजी हे करीत असत. ही क्रांतिकार्याची दीक्षा छत्रपति शिवाजीमहाराज व समर्थ रामदासस्वामी यांच्या प्रतिमांसमोर दिली जाई.

तरुणांची चांचणी घेण्याचा एक प्रकार प्रत्यक्ष समजला आहे. एके दिवशीं भाऊजी तीन तरुणांना घेऊन नागपूरपासून पांच-सहा मैलांवरील इंदोरा गांवीं गेले व राजे भोसल्यांच्या तेथील विहिरींत त्या तिघांनाहि उडी टाकण्याचा आदेश त्यांनीं दिला. त्या विहिरीची खोली चाळीस फुटांहून अधिक होती व त्यामुळें दोघेजण कचरले व एका मुलानें निर्भयतेनें आदेशानुसार उडी टाकली ! हेच ते बालवीर बाबूराव हरकरे ! बाबूरावांच्या मागोमाग भाऊजींनीं उडी टाकून त्यांना वर आणलें व त्यांचा क्रांतिपक्षांत त्यानंतरच अंतर्भाव करण्यांत आला. आणखीहि चांचणीचे प्रकार असूं शकतील, असें ह्यावरून अनुमानतां येईल.

नागपुरांत अशा पारखून घेतलेल्या तरुणांच्या बैठकी बारद्वारी, तुळशी-बाग, सोनेगांवचें मंदिर, कर्नल बाग, इंदोऱ्याचें मंदिर व मोहितेवाडा अशा ठिकाणीं आलटून-पालटून घेतल्या जात व बैठक संपतांना पुढच्या बैठकीचें पालटलेलें स्थान नि दिनांक विदित करण्यांत येई. मॅझिनी, जोन ऑफ आर्क, बंगाली क्रांतिकारकांच्या वीरकथा, अलिपूर व माणिकतोळा बॉंब खटला, त्याच-प्रमाणें ‘ Two Beauties ’ अशा आवरणांत वेष्टिलेलें बॅ. वि. दा. सावरकरांचें ‘Indian War of Independence ’ इत्यादि वाङ्मय त्यांना वाचावयास देण्यांत येई.

ह्या काळांत मध्यप्रदेशांतील क्रांतिकार्यांत साधारणतः दीडशेंपर्यंत तरुण संमीलित झालेले असावेत. पण प्रारंभापासूनच दक्षता घेतल्याकारणानें ह्या सिद्धतेचा परिस्फोट झाला नाहीं. एखादा मनुष्य कांहीं कारणानें उघडकीस आला तरी एकांतून एक अशी लागवण होऊन सर्वच योजना फसण्याचा प्रसंग येऊं नये, ह्यासाठीं कामाची नीट आंखणी व व्यक्तींची नीट पारख करून एखाद्या कामावर नियुक्ति करणें आवश्यक असतें. तशी सावधानता त्या काळांत घेण्यांत आली होती, असें स्पष्ट दिसतें. कोणताहि निरोप हा कटाक्षानें माणसाहस्तेंच पाठवला जाई व टोपणनांवें, परवलीचे शब्द नि सांकेतिक भाषा यांचा वापर करून गुप्ततेचें पथ्य सांभाळण्यावर दृष्टि असे.

नागपुरांत उपाध्ये यांच्या वाड्यांत श्री. नानासाहेब तेलंग व त्यांचे सहा-सात महाविद्यालयीन मित्र एकत्रित राहत. ते सर्व जण ह्या क्रांतिकारक गटाशीं संबंधित होते व त्यांच्या पुस्तकांच्या पेट्या याच कांहीं दिवस डॉक्टरांचीं पिस्तुलें नि काडतुसें दडवण्याच्या जागा झाल्या होत्या.

श्री. भाऊजी कावरे व डॉक्टर यांच्या नेतृत्वाखालीं चालणाऱ्या नागपूर भागांतील क्रांतिगटानें शस्त्रसंचय व धनसंचय यांसाठीं विविध मार्ग अवलंबिले होते. त्यासाठीं आवश्यक त्या मोहिमांची योजना अत्यंत सावधगिरीनें कार्यवाहींत आणल्याकारणानें त्यांचा परिस्फोट झाला नाहीं. अशा मोहिमांवर जाणाऱ्या तुकडीला डॉक्टरांनीं स्वतः थालीपिठें करून शिदोरी म्हणून बरोबर दिल्याची कांहीं जण

अजूनहि आठवण सांगतात. एकदा अशा एका संकल्पित स्वारीवर जाण्यासाठी श्री. नानासाहेब तेलंग ह्यांना बाहेरगांवाहून नागपूरला बोलवावयाचे होते. त्या वेळीं ते बी. ए. ची परीक्षा आटोपून अवघ्या चारच दिवसांपूर्वीं आपल्या गांवी गेले होते. अशा वेळी घरच्या मंडळीना नानासाहेबानी इतक्या लवकर येणे हे सयुक्तिक दिसावे म्हणून डॉक्टरानी एका मित्राच्या लग्नाला येण्याचे आग्रहाचे निमंत्रण त्याच्याकडे पाठवले व त्यातील इंगित नेमकें जाणून ते तसे आलेहि.

धनसंचयाप्रमाणेच कामठीच्या सैनिकी छावणीतील काही जणांशी सधान जमवून कांही शस्त्रे आडगिऱ्हाइकीने मिळविण्यात आलीं होती. एकदा तर नागपूरवरून जाणाऱ्या सरकारी दारूगोळ्याच्या पेट्या ह्या क्रातिगटातील काही जणांनी सैनिकी अधिकाऱ्याचा वेष चढवून मोठ्या कौशल्याने आगगाडीतून उतरवून घेतल्या. त्या पळवलेल्या पेट्या योग्य ठिकाणी बिनबोभाट दडवल्यावर भावी सरकारी चौकशीत पुराव्याचा मागमूसहि उरू नये म्हणून डॉक्टरानीं आपल्या सहकाऱ्यांचा सैनिकी पोषाख जाळून टाकला व ती राख 'अयाचित-बुवाची वाही' म्हणून नागपुरात ओळखल्या जाणाऱ्या वाहत्या नाल्यात फेकून दिली ! अशा अनेक रम्य कथा काही जणानी इतके दिवस केवळ हृदयातच दडविल्या होत्या. त्या आता कोठे दबकत दबकत ओठावर येऊ लागल्या असून पुढे-मागे त्या कोणाच्या तरी लेखणीतून प्रकटहि होतील. प्रत्येक गोष्टीला काळ यावा लागतो म्हणतात तेच खरे ! असो.

अशी माणसाची व शस्त्रास्त्रांची सिद्धता ही कोणत्या तरी उठावणीच्या दृष्टीनेच चालू होती हे उघड आहे. पण त्या उठावणीचे सकल्पित स्वरूप काय होते, हे दुर्दैवाने कोणत्याच मार्गाने बाहेर येऊ शकले नाही. एक तर अशी क्रातीची पूर्वसिद्धता होत असतानाच ती सरकारच्या दृष्टीत येऊन, कळी प्रत्यक्ष उमलण्यापूर्वीच ती खुडली जावी, ह्यासारखा प्रकार होत असतो, किंवा सिद्धतेनतर क्रातिगटाच्या योजनेनुसार वैयक्तिक वा सामूहिक उठावणी होऊन त्यातून सरकारला भयकपित करणारा स्फोट झाला म्हणजे तरी क्रांतीची उद्दिष्टे जगासमोर येतात. यापैकी अवेळी प्रकट झालेला कट वा आंखणीनुसार प्रभावी ठरलेली यशस्वी स्फोटक योजना यापैकी दोघाचाहि सरकारला हादरा बसण्याच्या कामी निश्चित उपयोग होऊ शकतो व जनमनातहि कांहीं प्रमाणांत जागृति उत्पन्न होते. अर्थात् यापैकीं कोणताच लाभ मध्यप्रातातील या लोकाना झाला नाहीं, ही गोष्ट अप्रिय व दुःखद असली तरी सत्य म्हणून मानावीच लागेल.

तसे पाहिले तर उपलब्ध होण्याच्या निश्चित स्वरूपाच्या माहितीवरून उठावाचे संकल्पित स्वरूप हे साधिक असावे व त्याची व्याप्ति पंजाबपासून नागपूरपर्यंत असावी असें दिसते. त्याचप्रमाणें हा उठाव परदेशांतून येणाऱ्या

अग्निनौकांतील शस्त्रांवरहि कांहीं प्रमाणांत निर्भर असावा असें वाटतें. यवतमाळचे श्री. वामनराव धर्माधिकारी सांगतात कीं, "१९१७-१८ च्या सुमारास डॉक्टरांनीं बंडाचा विचार आमच्या कानांवर घातला होता." एवढेंच नव्हे तर डॉक्टरांनीं १९१८ मध्यें त्यांना मार्मा गोव्यामध्यें पाठवून तेथें 'संकेताप्रमाणें एक अग्निनौका येणार आहे, तेव्हां ती येतांच लगेच ती वार्ता नागपूरला येऊन सांगण्याची कामगिरी' सोपविली होती. त्या वेळीं त्यांच्याबरोबर पुरेसे पैसेहि देण्यांत आले होते. त्या आदेशानुसार वामनराव धर्माधिकारी मुंबईवरून जल-मार्गानें गोव्यास गेले. तेथें सातारच्या श्री. पाटील नांवाच्या गृहस्थाला जाऊन भेटलें कीं पुढील काम होणार होतें. त्याप्रमाणें त्यांनीं श्री. पाटील यांची भेट घेतली. पाटील हे ३५ वर्षांचे, दिसावयास काळसर, पण तरतरीत असे गृहस्थ होते. त्यांनीं गोव्यांत केरीला श्री. दादासाहेब वैद्य ह्यांच्याकडे त्यांची रहाण्याची व्यवस्था केली; पण ज्या आठ दिवसांत ती अग्निनौका तेथें येऊन लागणार होती, तो काला-वधि उलटून गेला तरी तिचा पत्ता नव्हता! उलट एक अग्निनौका इंग्रजांनीं वाटेंतच अडविली असें कळलें. तेव्हां ते पुण्यावरून परत येऊन डॉक्टरांना भेटले व त्यांनीं त्यांना सर्व निवेदन केलें. ह्याच धर्माधिकारी यांना त्यापूर्वीं डॉक्टरांनीं श्री. नानासाहेब तेलंग यांच्यासमवेत गोव्यांत पाठवून कांहीं पिस्तुलें आणविलीं होतीं. तेव्हां पूर्वीचे गोव्याचे माहीतगार म्हणून ह्या वेळीं त्या चौकशीसाठीं त्यांना पाठविण्यांत आलें असावें. अशा हातीं लागणाऱ्या फुटकळ दुव्यांवरून एकं-दर उठावाच्या संकल्पाची कल्पना बांधणें अवघड आहे, पण त्याचें स्वरूप सांघिक व पूर्वसंकेतानुसार इतर घटनांवर अवलंबून असलेलें दिसतें.

ह्याच्याच जोडीला जर्मनीला पराभूत करून इंग्रज सरकार ह्याच वेळीं निर्धास्त झालें व त्याचा परिणाम म्हणजे हिंदुस्थानांतील क्रांतगटांना धुळाला मिळविण्याच्या इंग्रज सरकारच्या प्रयत्नांना तेज चढलें. इंग्रजांवरील महायुद्धाचें संकट ही पददलित भारताला स्वातंत्र्यसंपादनाची जशी सुवर्णसंधि होती, त्याच-प्रमाणें इंग्रजांचा विजय ही त्यांना पददलितांस अधिक चिरडण्यास उद्युक्त करणारी घटना होती. त्याचेंच प्रत्यंतर भारतांत येऊं लागलें व मोठ्या आशेनें केलेले मनोरथ ढांसळून जाऊन क्रांतिकारक गटांत एक प्रकारची विफलतेच्या नैराश्याची लाट पसरली. अशा काळांत क्रांतिकार्याची योजना करणाऱ्यांना डोकें शांत ठेवून आपल्या मांडलेल्या पसाऱ्याचा परिस्फोट न होईल अशा बेतानें आवराआवर करणें भागच होतें. हें काम, लग्नासाठीं थाटामाटांत उभारलेला मंडप, तें न होतांच उलगडण्याचा प्रसंग यावा त्यासारखेंच, पण त्याहून अधिक अवघड, अधिक टोचणारें व अधिक उद्वेगजनक असें होतें. पण बुद्धिबळांच्या डावांत एक पवित्रा अंगावर आला तरी गांगरून न जातां पुढील खेळीच्या वेळीं अधिक दूरदर्शित्वानें व कौशल्यानें जशीं मोहरीं सरकवावींत, त्याचप्रमाणें राजकारणाच्या क्षेत्रांतहि

करावे लागते. राजकारणांत कोणतीहि घटना अंतिम अशी असत नाही.

पण अशी विफलता पदरीं पडण्याचे चिन्ह दिसताच पश्चात्ताप होऊन 'पुन्हा ह्या असल्या भानगडीत पडावयाचे नाही,' असा निर्णय अनेक तेजस्वी तरुणांनीं घेतलेला आढळतो. त्याच्या दृष्टीने ती घटना ही सार्वजनिक कामापुरता पूर्णविरामच ठरत असते. त्याच्या उलट काही काळ स्मशानवैराग्यासारखा मोह प्राप्त झाला असला तरी पुन्हा परिस्थितीची अनुकूलता डोकावू लागताच हिवाळ्यात खराटा झालेले वृक्ष जसे वसंतागमनाने अकुरू लागतात, त्याचप्रमाणे कात टाकून पुन्हा उत्साहाने पुढे येणाऱ्याचाहि एक वर्ग असू शकतो. पण स्वयंप्रेरित व असिधाराव्रत जाणूनबुजून घेतलेल्याची अवस्था या सर्वाहून अगदीच भिन्न असते. त्यांनाहि अशा घटनेने मुळींच त्रास होत नाही असे नाही. पण त्याची ध्येयासक्ति इतकी चिवट नि जाज्वल्य असते कीं, ती त्याहि परिस्थितीत घडलेल्या घटनेचे विश्लेषण करून त्या परिस्थितीतूनहि पुढेच कसे घुसता येईल, त्याचा मार्ग धुडाळू लागते. हे करतांना भावनाविवशतेने वैताग उदित झालेला त्याच्या ठायी दिसत नाहीं. कारण वृक्षाला येणारा मोहोर सर्वच तगत नाही, त्यातील काही गळून जात असतो व काही प्राणि-पक्षी याच्या आहारी पडत असतो, ह्याची त्याना कल्पना असते. ते आपण आपल्याकडून प्रयत्नाची पराकाष्ठा करीत असतात, पण त्यातून अपेक्षेप्रमाणे यश न आल्यास ते आपला मार्ग व साधने याचे नीट परीक्षण करून व त्यातील दोष दूर करून वा वेळप्रसगी त्याचा त्याग करूनहि ते पुढे सरण्यासाठीं त्याहून प्रभावी मार्ग व त्याहून प्रभावी साधने हुडकून काढतात. अपयश ही आत्मनिरीक्षणाची सुसधि समजून हतोत्साह न होता 'की तोडिला तरु फुटे अणखी भराने' या सुभाषिताचा प्रत्यय देणारे, केव्हा-ना-केव्हां तरी परिस्थितीवर स्वार झालेले अवश्य दिसतात. डॉक्टरानी व त्याच्या सहकाऱ्यांनी अशाच कार्यानुकूल मनःस्थितीत त्या प्राप्त परिस्थितीला तोंड दिले.

या दिवसांत गणेशोत्सवांत डॉक्टरांचीं जहाल भाषणे होत. त्या निमित्ताने त्यांनी प्रांतातील अशा संबधित तरुणाना निराशेने ग्रासू नये म्हणून वैयक्तिक भेटी घेऊनहि प्रयत्न चालू केले. मध्यप्रातातील 'होमरूल लीग'मध्ये त्यानी प्रवेश मिळवला व त्यांच्या होणाऱ्या सभा व परगणा-परिषदा यातून कधी अध्यक्ष म्हणून तर कधी वक्ते म्हणून त्यानी लोकासमोर प्रोत्साहक विचार ठेवले. त्या वर्षीं लोकमान्यांच्या गाजलेल्या वऱ्हाड दौऱ्याच्या आधी डॉक्टरानी संचार करून डॉक्टर मुंजे ह्यांच्या अपेक्षेप्रमाणे ठिकठिकाणी लोकमान्यांचे यथोचित स्वागत व्हावे व तेथील सभा यशस्वी व्हाव्यात म्हणून पूर्वसिद्धता करून ठेवली. आपल्याशी सबंधित असणाऱ्यांना गलितगात्र होऊं द्यावयाचे नाही ह्या कल्पनेनेच त्यांनीं आलेल्या संधीचा लाभ घेऊन प्रयत्न केलेले आढळतात. एका बाजूने हे सार्वजनिक काम चालू असतां येथवर निवेदिलेल्या क्रांत्युत्थानाच्या उलाढालींतील

पैसे, शस्त्रास्त्रें व माणसें यांची नीट व्यवस्था लावण्याचें त्यांचें कामहि दुसऱ्या बाजूनें चालू होतें; नव्हे तें निरवानिरवीचें काम डोळ्यांवर येऊं नये म्हणूनच बाहेरून सार्वजनिक सभा व भाषणें यांचें सत्र त्यांनीं चालू केलें होतें.

त्या निरवानिरवीच्या कामांत पंजाबमध्यें पाठवलेल्या तुकडीबरोबर तिकडे गेलेले श्री. गंगाप्रसाद पांडे, वर्ध्याचे श्री. आप्पाजी जोशी, नागपूरचे बाबुराव हरकरे, नानाजी पुराणिक इत्यादि मंडळी प्रमुख होती. अमृतसरकडील साहित्याची व्यवस्था १९१९ च्या प्रारंभींच पूर्ण लागल्याचा निरोप नागपूरला येऊन पोहोंचला होता. पण तिकडे गेलेल्या मंडळींना परत आणावयाचें होतें. त्यासाठीं श्री. आप्पाजी जोशी ह्यांची वर्ध्याहून अमृतसरला पाठवणी करण्यांत आली. या मंडळींना आणून व त्यांची आर्थिक दृष्टीनें कांहीं दिवसांची व्यवस्था लावून झाली नाहीं तोंच डॉक्टरांनीं कारागृहांतून नुकतेच मुक्त झालेले पं. अर्जुनलाल शेठी ह्यांची वर्ध्यास व्यवस्था करण्याचा आदेश आप्पाजींना दिला. पंडित अर्जुनलाल हे क्रांतीच्या हालचालींत पकडले गेलेले होते व त्यांच्या-कडून माहिती काढण्यासाठीं आरक्षकांनीं त्यांचा मनस्वी छळ केलेला होता. त्यांत पंडितजींनीं मोठें मनोधैर्य दाखवून आपल्या सहकाऱ्यांच्या नांवांची यत्किंचितहि परिस्फुटता होऊं दिली नाहीं. मात्र त्या छळवादानें कारावासांतच ते कांहींसे भ्रमिष्ट झाले व त्यांची प्रकृतीहि अतिशय ढासळली. १९१९ च्या प्रारंभीं तशा स्थितींतच त्यांची सुटका झाली होती. तेव्हां अशा सहकाऱ्याला वेळींच हात देण्याचें कर्तव्य ओळखून डॉक्टरांनीं हा आदेश दिला होता. त्यानुसार त्यांना सहकुटुंब वर्ध्याला आणून त्यांची स्वतंत्र व्यवस्था करण्यांत आली. तेथें तीन-चार वर्षांच्या काळांत त्यांचें वेड ओसरून त्यांची प्रकृतीहि सुधारली होती. हे गृहस्थ जैनपंथीय होते. पण आत्यंतिक अहिंसेचे कट्टे विरोधक म्हणून त्यांचें नांव घ्यावें लागेल ! वर्ध्याला असतांना त्यांची श्री. विनोबाजी भावे ह्यांच्याशीं अनेक वेळां खडाजंगी उडे. १९१७ मध्यें वर्ध्यांत चालू झालेल्या ' राष्ट्रीय स्वयंसेवक मंडळा 'चे एक सदस्य श्री. चिरंजीवलालजी बडजाते ह्यांनीं त्यांचा आर्थिक भार प्रामुख्यानें सांभाळला होता. इतरहि कांहीं जणांच्या अशाच व्यवस्था लावण्यांत आल्या.

त्या दिवसांत आपल्या हालचालींचा चुकून परिस्फोट झाला तर अनेक जणांच्या जीवनाची, कांहींएक न साधतां धूळधाण उडेल, अशी भीति प्रमुख मंडळींना वाटणें स्वाभाविक होतें. त्यांतच पंजाबमधून परतलेल्या एका व्यक्तीनें हिंगणी येथें बॉंबचा धडाका उडवून दिला व त्यामुळें चौकशीचें सत्र चालू झालें. त्या प्रकारानें प्रमुख मंडळींच्या अस्वस्थतेंत भर पडली असेल. त्याच्याच जोडीला त्या पडत्या काळांत क्रांतिगटांतील अनुशासन ढिलें झालें व कांहीं व्यक्तींचा स्वार्थ बळावूं लागला. ठराविक ठिकाणीं आपणांजवळ असलेलीं शस्त्रें व पैसे अशा पद्धतीनें आणून पोहोंचवा. असे दिलेले आदेश कांहीं जणांनीं अक्षरशः

घाब्यावर बसविले ! आधींच नित्याच्या चिठ्या-चपाट्यांचे पुरावे असतांहि दुसऱ्याचे पैसे लुबाडणें वा डुबविणे हे काही जणांच्या अगदी अंगवळणी पडलेले असते. पण येथे तर सर्व विश्वासावरच व्यवहार आधारलेला ! ना चिठ्ठी ना चपाटी ! एवढेच नव्हे तर कोणी विश्वासघात करून ठकविले तरी त्याची वाच्यता करण्याची अशा प्रसंगीं चोरीच असावयाची ! आणि नेमके असेच अनुभवाचे अत्यंत कडवट घोट कावरे व डॉक्टर याना घेण्याचा प्रसग त्या वेळी आला.

पण यशाच्या अमृतासाठी जितक्या उत्सुकतेने त्यानीं हात पुढे केले असते, तितक्याच सहजतेने त्यानी हा अपयशाच्या हालाहलाचा कुंभहि स्वीकारला ! यश आले तर तो माझा पराक्रम म्हणावयाचे व अपयश आले तर त्याचें खापर परिस्थितीच्या माथीं फोडावयाचे, हा मनुष्यस्वभाव असतो. पण त्यावर मात करून त्यांनीं झालेल्या घटनेचे नीट परीक्षण केले व त्यातून कोठे चुकले त्याचा शोध घेतला.

डॉक्टराना त्या निरीक्षणात असे स्पष्ट दिसून आले की, पूर्ण प्रभावी सस्कार केल्यावाचून देशभक्तीचे टिकाऊ स्वरूप निर्माण होणे अशक्य आहे व असे स्वरूप निर्माण होईपर्यंत सामाजिक व्यवहारात सचोटी येणे ही गोष्टहि शक्य नाही. त्याचप्रमाणे हीहि गोष्ट त्यानी हेरली की, भावनेच्या भरात व तारुण्याच्या धुदींत कांहीं तरुण उभे राहतात व दडपशाहीचा फटकारा बसताच तोड फिरवून सामाजिक क्षेत्रातून शाश्वतचाच पाय काढतात. अशा लोकाच्या भरंवशावर देशापुढील बिकट व गुंतागुतीच्या समस्या कशा सुटाव्यात ? ह्यासाठी ध्येयावर अविचल दृष्टि ठेवून, मार्गावर मखमली पायघड्या असोत वा निवडुंगाच्या फड्या असोत, त्यांची चिंता न करतां अखड पुढे जातील अशा निश्चयाचे धृति-कृतिशील तरुण उभे केले पाहिजेत. देशभक्त म्हणविणाऱ्या तरुणानाहि अनुशासन मानवत नाही. कारण निःस्वार्थता बाणेपर्यंत खरे अनुशासन उदयाला येत नाहीं व अनुशासन निर्माण होईपर्यंत परकीयांच्या यत्र-तत्र-सज्ज अशा पाशवी बळाला ठोकरून लावण्याचे सामर्थ्य कोणत्याहि राष्ट्रीय उत्थानाच्या प्रयत्नात येणे अशक्य असते. ह्या अपयशांतूनहि डॉक्टरानी सामाजिक स्थितीचे असे नेमके स्वरूप ध्यानीं घेतले व पुढील मार्गक्रमणा त्यांनीं चालू केली. मात्र एक गोष्ट येथे अगदी स्पष्ट केली पाहिजे की, त्या निरीक्षणाने सशस्त्र क्रातीवरील त्यांचा विश्वास यत्किंचितहि डळमळला नव्हता. देशशत्रूना कोणत्याहि मार्गाने ह्या भूमीवरून पिटाळून लावतां येत असेल तर तो मार्ग सुष्ट व योग्य आहे, अशीच त्याची सदैव धारणा होती. मात्र कोणताहि मार्ग यशस्वी करण्यासाठी ज्या वृत्तीची आवश्यकता असते, त्याच गोष्टीची उणीव त्यांना त्या वेळी प्रकर्षाने जाणवली असे त्याच्या बोलण्यांत येई. दृष्टि असणारी व्यक्ति वाइटातूनहि चांगले पाहतें ते असें !

★ ★ ★

# ७ : नागपूरचें कॉंग्रेस अधिवेशन

महायुद्ध संपलें नि हिंदुस्थानांत ‘ खिलाफत ’ चळवळीनें मुसलमानांत एक नवीन लाट उसळून दिली व त्या लाटेशीं हिंदु-मुसलमानांच्या ऐक्यासाठीं महात्मा गांधींनीं हातमिळवणी केल्यानें एक असहकाराचें नवें पर्व जन्मास आलें. ह्या असहकार पर्वांत डॉक्टर हेडगेवारहि संमीलित झाले होते. ह्यासाठीं त्या घटनेची पार्श्वभूमि येथें जरा बारकाव्यानें पाहणें उद्‌बोधक ठरेल.

तुर्कस्थान हा पहिल्या महायुद्धांत जर्मनीच्या पक्षाकडून लढाईला उभा ठाकला होता व जगांतील सर्व मुसलमानांचा धर्मगुरु जो खलिफा तोच त्या काळीं तुर्कस्थानचा बादशाह असे. त्यामुळें हिंदुस्थानांतील मुसलमानांचा स्वाभाविकच कल असा होता कीं, आपल्या खलिफाचा जय व्हावा. पण जर्मनीविरुद्ध लढण्यांत येथील मुसलमानांचें सहकार्य तर इंग्रजांना हवें होतें. त्यासाठीं आगाखानासारख्या कांहीं मुसलमानांचा ‘ उदो उदो ’ करून सरकारनें मुसलमानांना असें मधाचें बोट लावण्यास प्रारंभ केला कीं, जर्मनीचा आम्हीं पराभव केला तरी तुर्कस्थानचा खलिफा व मुसलमानी धर्मक्षेत्रें यांची प्रतिष्ठा आम्ही लवमात्र कमी पडूं देणार नाहीं. अर्थात् त्या आश्वासनांवर झुलवून युद्धकाळांत मुसलमानांचें सहकार्य इंग्रजांनीं मिळविलें. पण राजकारणांत कामापुरतें कोणालाहि मामा म्हणावयाचें व काम झाल्यावर त्या मामाच्याच खिमा करावयाचा, ही रीति इंग्रजांना कांहीं नवी नव्हती; तर ती त्यांच्या चांगलीच अंगवळणीं पडलेली होती. त्याच नीतीचा अवलंब इंग्रजांनीं ह्या वेळीं केला व तुर्कस्थानच्या आटोमन साम्राज्यांतील इजिप्त, सीरिया, पॅलेस्टाईन व अरेबिया हे भाग संधींत ( तहांत ) वेगवेगळे तोडले जाऊन प्रत्यक्ष तुर्कस्थानच्या भूमीवरहि मित्र-राष्ट्रांचें प्रभुत्व प्रस्थापित होऊं लागल्याचें दृश्य मुसलमानांना दिसूं लागलें. अर्थात् अशीं आपल्या तोंडाला लीलेनें पानें पुसणाऱ्यांविषयीं भारतीय मुसलमानांना संताप येणें स्वाभाविक होतें व त्या संतापांतूनच ‘ हा खलिफावरील अन्याय मित्रराष्ट्रांनीं त्वरित दूर केला पाहिजे, नाहींतर आम्ही इंग्रजांशीं असहकार करूं ’ अशी भाषा मुसलमानांत चालू झाली.

मुसलमान समाजांत असा असंतोष मूळ धरीत होता, तर तिकडे न्यायमूर्ति सर सिडने रौलट ह्यांच्या नेतृत्वाखालीं क्रांतिकारक चळवळीची चौकशी करून त्यावर उपाययोजना सुचविण्यासाठीं नियुक्त केलेल्या ‘ सिडिशस इन्कायरी

कमिटी ’ ने आपले प्रतिवृत्त १९१८ च्या एप्रिलमध्ये प्रासिद्ध केले. ते प्रतिवृत्त अत्यंत दूषित दृष्टीचे नि प्रक्षोभक असे होते. पण तेच प्रतिवृत्त आधारभूत धरून त्याच्या मागोमाग सरकारला हिसक उलाढाली करणाऱ्या लोकाना विनाचौकशी बंदीत ठेवण्याचा व सशयितावर पचांची सवलत न ठेवता दावा ( खटला ) चालविण्याचा अधिकार देणारे एक विधेयक दिल्लीच्या वरिष्ठ विधिमंडळात माडण्यात आले. हेच ते कुविख्यात ‘ रौलट ॲक्ट ’ ला जन्म देणारे विधेयक !

रौलटकडून प्रकाशित झालेले ते प्रतिवृत्त, तोवर क्रातिकारकानी देशभक्तीने जिवावर उदार होऊन हिदुस्थानातील इंग्रजाची राज्यसत्ता उखडून टाकण्यासाठी जे अनेक गुप्त प्रयत्न केले, त्यातील कांही प्रयत्नाची परिस्फुटता करणारे होते. प्रतिवृत्ताचे स्वरूप ध्यानी येताच डॉक्टराना असे वाटले की, ह्याच्या वाचनाने जनमनातील देशभक्ति अधिक प्रज्वलित होऊ शकेल. तेव्हा त्यानी इग्रजी जाणणाऱ्या लोकात त्या प्रतिवृत्ताच्या प्रती अधिकाधिक प्रसृत करण्याचा सपाटा चालू केला. त्यानंतर थोड्याच दिवसात हे प्रतिवृत्त मध्यप्रदेशात सर्वत्र प्रसारित होत आहे, ही गोष्ट सरकारच्या ध्यानी येऊन शेवटी त्या प्रतिवृत्ताची विक्री बद करण्यात आली असे सागतात.

रौलट प्रतिवृत्तावर आधारलेल्या त्या विधेयकाने विजयोन्मादाने मत्त झालेल्या सरकारच्या हातात छळाचे आणखी एक जळजळीत कोलीत दिले जाणार होते व त्यामुळे त्याला सर्वांकडून कडाडून विरोध झाला. अमृतसर येथे दि. १३ एप्रिल १९१९ ह्या दिवशी जालियनवाला बागेत एक निषेधसभा भरली असता त्या जागी जमलेल्या दहा सहस्र श्रोत्यावर जनरल डायरने अचानकपणे गोळ्याचा पाऊस पाडला व ‘ हम करे सो कायदा ! ’ एवढाच न्याय सरकार ओळखते, असे शेकडो निरपराध्याची प्रेते पाडून त्याने प्रत्यक्ष दाखवून दिले ! सबध देशातच त्या प्रकाराने संतापाची लाट उसळली. खिलाफतीमुळे मुसलमानात उत्पन्न झालेला असतोष व हा नवा प्रक्षोभ याची युति जमवावी, असे प्रयत्न चालू झाले. त्यात मौ. शौकतअल्ली व मौ. महंमदअल्ली हे खिलाफत समितीकडून व महात्माजी हे स्वतत्रपणे ‘ धडपडत ’ होते. पण त्या धडपडीचे अंतरग आज पाहू लागल्यावर अल्लीबधु हे मुसलमानांच्या हिताच्या ‘ धड ’ भूमिकेवर उभे होते, पण महात्माजी मात्र आत्मनिर्भरतेच्या भूमिकेवरून ‘ पडत ’ होते, असेच म्हणणे सयुक्तिक होईल ! १९१९ च्या नोव्हेंबर २४ ला हिदुमुसलमानांची ‘ अखिल भारतीय खिलाफत परिषद ’ भरली असता महात्माजींनीं अध्यक्षीय भाषणात जे विचार माडले होते, तेच ह्या विधानावर प्रकाश टाकण्यास पुरेसे आहेत. ते म्हणाले होते की, “ आपण हिदु-मुसलमानाच्या एकीच्या गप्पा मारतो. मुसलमानावर आपत्ति आली असताना जर आपण हिदु लोक अंगचुकारपणा करू लागलो तर त्या एकीच्या घोषणांत अर्थ काय ? आपण हिदु लोकांनी काही अटीवर मुसलमानाना

साहाय्य करावें, असें कांहीं लोक म्हणतात. पण निःस्वार्थ साहाय्य हेंच खरें साहाय्य होय. '' पुढें मुसलमानांच्या हातांत 'कोरा चेक' देण्यापर्यंत जी गांधीजींची धांव गेली, तिची ही नांदी होती व तिच्यामागें येन केन प्रकारेण हिंदु-मुसलमानांची एकी साधावी, हीच अत्युत्कट कल्पना वसत होती ह्यांत शंका नाहीं. पण ह्या अत्युत्कट किंबहुना प्रामाणिक कल्पनेचा जन्म मात्र हिंदुसमाजाला आत्मनिर्भर राहून एकट्याला इंग्रजांना घालवून देतां येणार नाहीं, ह्या आत्म-विश्वासहीन अशा दुबळ्या मनोवृत्तींतून झालेला होता.

हिंदु-मुसलमानांची एकी हाच 'स्वराज्याला प्रतिशब्द' आहे, अशा एकांतिक विचारसरणींतून महात्माजींचे प्रयत्न चाललेले होते, तर महात्माजींच्या या कसेंहि करून ऐक्य साधण्याच्या सद्भावनेचा आपल्या समाजाला जागृत करण्याच्या कामीं उपयोग करून घेऊन, खिलाफत प्रकरणांत सरकारला वठणीवर आणण्यासाठीं हिंदूंचें सहकार्य मिळवावयाचें, ही अल्ली बंधूंची केवळ स्वार्थपर अशी जातीय दृष्टि होती. महात्माजींपुढें स्वराज्य ही कल्पना होती, तर अल्लीबंधु हे तसें पाहूं जातां हिंदुस्थानाशीं अर्थाअर्थीं संबंध नसलेल्या खिलाफतीचें दुखणें त्याच्या घरांत आणूं पहात होते. एकाच्या हृदयांत भोळीच पण राष्ट्रभक्ति होती, तर दुसऱ्यांच्या हृदयांत देशबाह्य गोष्टीविषयींची आस्था दिसे. महात्माजींना अहिंसा हवी होती, तर अल्लीबंधूंची खिलाफतीसाठीं रक्तरंजित क्रांति करण्याची भाषा ऐकूं येई ! सहिष्णुता हा महात्माजींना प्राण वाटे, तर प्रत्यक्ष धर्मांधतेनेंच अल्लीबंधूंचें रूप घेतलें आहे कीं काय, असा प्रत्यय येत असे ! पं. जवाहरलाल नेहरू ह्यांनीं आपल्या आत्मचरित्रांत मौलाना महंमदअल्लींचें वर्णन करतांना 'most irrationally religious' म्हणजे 'परमावधीचा धर्मांध' असें अगदीं शेलकें विशेषण त्यांना मार्मिकतेनें बहाल केलें आहे. अशी ही परस्पर-विरुद्ध प्रवृत्तींची युति १९१९ मध्यें जुळून येत होती. तिच्यांतील दोन्ही पक्षांना ऐक्य हवें होतें, ही एवढीच तिच्यांतील समानता वगळल्यास, ती युति म्हणजे एका स्वार्थी संघटित गटानें दुसऱ्या प्रामाणिक पण आत्मविस्मृत अशा गटाच्या प्रामाणिकपणाचा पुरेपूर लाभ करून घेण्यासाठीं योजिलेली युक्ति होती, असेंच दिसून येतें.

भारतीय राजकारणांत हिंदु-मुसलमान ऐक्याचे असे नगारे झडत असतां डॉक्टर हेडगेवार हे या प्रवाहांत कोठें होते, हें पहाणें अत्यावश्यक आहे. महा-युद्धानंतरचे क्रांतीचे मनोरथ ढासळले असले तरी त्यांतून उदास न होतां डॉक्टरांनीं मध्यप्रांतांतील कॉंग्रेसच्या राजकारणांत लक्ष घालण्यास प्रारंभ केला होता. त्या वेळीं त्या प्रांतांतील राजकारणाचीं सूत्रें लोकमान्य टिळकांच्या अनु-यायांच्या हातीं असत. डॉ. बा. शि. मुंजे, नीळकंठराव उधोजी, नारायणराव अळेकर, नारायणराव वैद्य, बॅ. मोरूभाऊ अभ्यंकर, गोपाळराव ओगले, भवानी-

शंकर नियोगी, डॉ. ना. भा. खरे, विश्वनाथराव केळकर, बॅ. गोविंदराव देशमुख, डॉ. चोळकर, डॉ. परांजपे आदि सोळा जणांनी एक 'राष्ट्रीय मंडळ' म्हणून संस्था चालविली होती. या मंडळातील नांवांकडे पाहिले तर त्या प्रांतांतील बहुतेक अतिरथी-महारथीच कसे एकत्रित आले होते, हे सहज ध्यानी येऊं शकेल. या मंडळांतील लोकांनी काही गोष्ट ठरवावी व तीच गोष्ट कॉंग्रेसने 'मम' म्हणावी, अशी या संस्थेतील सदस्यांची त्या वेळच्या प्रांतिक कॉंग्रेसवर पकड होती. डॉक्टर हेडगेवार हे राष्ट्रीय मंडळातील लोकांच्या मानाने वयाने तरुण पण मनाने मात्र अधिक जहाल असे होते. त्या वेळी कॉंग्रेसमध्ये साम्राज्यांतर्गत स्वराज्य हेच उद्दिष्ट बोलण्या-लिहिण्यांतून प्रकट होई. पण त्या काळात 'निर्भेळ स्वातंत्र्या'चा जयघोष डॉक्टरांनी अत्यंत निर्भयपणाने चालविला होता. तसेंच केवळ शांततेचा व सनदशीर मार्ग तेवढाच न्याय्य ह्या विचारसरणीशीहि त्यांचा कडवा विरोध असे. या मतभिन्नतेमुळे ते राष्ट्रीय मंडळाच्या अनुषंगाने काम करीत असतानाहि मंडळाचे सदस्य असे मानले जाणे शक्य नव्हते व त्यांनाहि ती गोष्ट रुचली नसती. डॉ. मुंजे यांच्या लोभामुळे प्रारंभी प्रारंभी डॉक्टरांनी मंडळाने पुरस्कारिलेल्या सभा-बैठका व परिषदा यांतून भाग घेतला होता, तरी त्यांचे व त्यांच्या गटाचे निराळेपण वा वैशिष्ट्य हे झाकले जाणे शक्य नव्हते. शेवटीं राष्ट्रीय मंडळांतील काही जणांच्या सहकार्याने डॉक्टरांनी 'नागपूर नॅशनल युनियन' या नांवाने एक निराळीच राजकीय संस्था उभी केली. त्यात श्री. बोबडे, विश्वनाथराव केळकर, बळवंतराव मंडलेकर, चोरघडे, हीच मित्रमंडळी एकत्रित आली होती. थोड्या दिवसांनीं डॉ. ना. भा. खरे हेहि त्या संस्थेत येऊन समाविष्ट झाले.

या वेळी राष्ट्रीय मंडळाच्या वतीने नागपुरांत एक 'संकल्प' नांवाचे हिंदी साप्ताहिक काढण्याचा विचार सुरू झाला. यापूर्वीच मराठींतून 'महाराष्ट्र' निघूं लागला होता. या नव्या साप्ताहिकाचा महाकोशल या हिंदी भागात प्रसार करणे अत्यंत आवश्यक होते. यासाठी १९१९ च्या जानेवारीच्या शेवटी डॉक्टरांना 'संकल्प' पत्राचे 'संघटक' म्हणून नियुक्त करण्यांत आले. या निमित्ताने त्या वर्षी चार-पांच महिने त्यांनी साऱ्या महाकोशल भागात संचार केला. त्यांच्याबरोबर नागपूर व्यायामशाळेचे प्रमुख श्री. अण्णा खोत हेहि होते. या प्रवासात 'संकल्पा'चा प्रसार तर त्यांनीं केलाच, पण त्या वेळी प्रवासांत अनेक जणांचा त्यांनी जवळून परिचय करून ठेवला. हाच या वेळचा परिचय, संघाचा संकल्प सोडल्यावर या प्रांतात कार्यारंभ करतांना अत्यंत उपयुक्त ठरला, असे दिसून येते.

'संकल्प' साप्ताहिकाच्या प्रचारासाठी डॉक्टर रायपूर येथें गेले असता त्यांनी अनेक जणांच्या भेटी घेतल्या. बहुतेक ठिकाणी त्यांच्या संकल्पित वृत्तपत्राचे स्वागतच होत होते. पण जेव्हा त्यांनी श्री. ज्ञानरंजन सेन यांच्याजवळ ग्राहक

होण्याचा विषय काढला तेव्हां सेन म्हणाले, " माझ्याकडे इंग्रजी व बंगाली वृत्तपत्रें येतात. तेव्हां हिंदी वृत्तपत्र घेऊन त्याचा काय उपयोग ? " त्यावर डॉक्टर जरा कडाडलेच ! " आपलें सारें जीवन या हिंदी भाषी प्रांतावर चाललें आहे नि येथील भाषेचें वृत्तपत्र घेण्याचें तेवढें ओझें कां वाटतें ? " एवढें बोलून डॉक्टर थांबले नाहींत ! तें म्हणाले, " हिंदुस्थानांत आपणांपैकीं कोणी कोणत्याहि प्रांतांत गेला तरी तो प्रांत आपलाच आहे, अशी धारणा ठेवून त्यानें तेथील जीवनाशीं समरस झालें पाहिजे. तसें जमत नसेल तर हा प्रांत सोडून कां नाहीं जात ? " अर्थात् या सहजोद्गारांमागील भारतीय एकत्वाविषयींचा जिव्हाळा इतका विशुद्ध व उत्कट होता कीं, क्षणाचाहि विलंब न लावतां ज्ञानरंजनांनीं डॉक्टरांच्या हातांत ' संकल्प ' साप्ताहिकाची एक वर्षाची वर्गणी आणून दिली.

याच सुमारास एकदां डॉक्टर आर्वीला गेले असतां सायंकाळीं श्री. गंगाधरराव देशपांडे यांना भेटावयास गेले. ते डॉक्टरांचे घनिष्ठ मित्र होते. त्या वेळीं देशपांडे सचिंत असलेले पाहून डॉक्टरांनीं त्यांना कारण विचारलें. तेव्हां ते म्हणाले कीं, " भाचीचें पत्र आलें आहे कीं, तिचे चुलते तिला एका जरखड म्हाताऱ्याच्या गळ्यांत बांधणार ! " तें ऐकून डॉक्टरहि अस्वस्थ झाले व त्यांनीं पृच्छा केली, कीं, " मग तुझी काय इच्छा आहे ? तूं तिच्या लग्नाचा खर्च करणार असशील तर बघतों ! " देशपांडे यांना देव पावल्यासारखें वाटून त्यांनीं होकार दिला. तेव्हां डॉक्टर मित्राला बरोबर घेऊन मोटारीनें लग्नाच्या आधीं थोडा वेळ नागपूरला पोंचले व त्यांनीं योग्य माणसाकडून मुलीला पूर्वसूचना देण्याची व्यवस्था केली कीं, तेलवणाच्या वेळीं गंगाधरराव मोटार घेऊन येतील, तेव्हां त्यांच्याबरोबर निघून जाण्यासाठीं सिद्ध रहा. पुढें वाजत गाजत तेलवणासाठीं मुलगी गाडींतून जात असतां पूर्वसंकेतानुसार तेथें मोटार नेऊन, गंगाधररावांकडून तिला मोटारींत बसवून आर्वीस नेवविलें. पुढें त्यांतून बरेच खटले-खोकले निर्माण झाले होते; पण तो जरठ-तरुणी विवाह टळून त्यानंतर भाचीचा एका अनुरूप तरुणाशीं विवाह झाल्यानें गंगाधररावांना कोण धन्यता वाटली !

या दिवसांतच नागपुरांतील विद्यार्थ्यांमध्यें डॉक्टरांचे संबंध विद्यार्थ्यांच्या सभांत होणाऱ्या भाषणाच्या निमित्तानें निर्माण झाले व त्यांची डॉक्टरांकडे कांहीं प्रमाणांत ये-जा सुरू झाली. समाजापुढें आपल्या इतिहासांतील थोर राष्ट्रपुरुषांचीं चरित्रें ठेवून त्यांचें स्वत्व जागें करावें, या हेतूनें नागपूरमध्यें एक ' राष्ट्रीय उत्सव मंडळ ' याच काळांत स्थापन झालें. त्या मंडळाचे डॉक्टर हे अनेक वर्षें कार्यवाह म्हणून काम करीत असत. छत्रपति शिवाजी महाराजांचा जन्म, राज्याभिषेकदिनोत्सव, श्रीगणेशोत्सव, दासनवमी, शस्त्रपूजन, संक्रांत असे ठळक ठळक उत्सव या मंडळाच्या वतीनें साजरे होत व त्यांत डॉ. मुंजे, शं. दा. पेंडसे, खापर्डे, लो. अणे आदि मंडळींचीं भाषणें व्हावयाचीं. श्रीछत्रपति शिवाजी व

समर्थ रामदास हे डॉक्टरांचे स्फूर्तिदाते असल्यानें त्यांनीं त्या दोघांच्याहि उत्सवात अत्यत ओजस्वी भाषणे केल्याचे आढळून येते.

डॉक्टरांचे मित्रमंडळ आता बरेच वाढले होते. पण त्याच्या मित्रांचा विशेष असा की, ते ठिकठिकाणी विखुरलेले व निरनिराळ्या मतप्रणालीचे पुरस्कर्ते असे असत. दोन विभिन्न मताची कर्ती माणसें सहसा मैत्रीचे संबध ठेवीत नाहीत व ठेवला तरी तो सबध दिखाऊच असण्याचा संभव अधिक असतो. आज-काल तर, आपल्या मताशीं सुसवादी सूर न काढणाऱ्या व्यक्तीला वा पक्षाला चार हात दूर ठेवणारी व त्याची खोटयानाटया प्रकारानी अवहेलना करणारी असहिष्णुता हीच दुर्दैवाने शिष्टसंमत होऊ पहात आहे. पण डॉक्टराच्या मैत्रीच्या चादण्यात जसा जहाल येऊन बसे, तसा मवाळहि असे. धनवानहि तेथे येऊन रमे व गरिबाना तर ते आश्रयस्थान गमे ! त्याच्या स्नेहाने विभिन्न वृत्तीच्या व मतांच्या मंडळीना विचाराची मनमोकळी देवघेव करावयास अनुकूलता निर्माण केली होती व तिचाच लाभ घेण्यासाठी कोजागिरीच्या दिवशी डॉक्टराच्या निमंत्रणावरून त्यांचे मित्र त्याच्या अंगणात एकत्र होत. युद्धकाळाच्या शेवटी रूढ झालेली कोजागिरी–मित्र मेळाव्याची प्रथा १९२५-२६ पर्यत अखड-चालू होती व तिने नागपूरच्या राजकीय वातावरणात इतरत्र क्वचितच दिसणारा सहकार व मोकळेपणा आणण्यास हातभार लावला होता.

भारतातील निरभ्र पौर्णिमा ही आनंदाची पर्वणीच मानली जाते. अशा पौर्णिमेच्या चंदेरी प्रसन्नतेत डॉक्टरांकडे जसे त्याचे सत्तर-ऐशी मित्र जमत, त्याचप्रमाणे डॉ. मुंजे, राजे लक्ष्मणराव भोसले व तत्कालीन वडीलधारी मडळीहि उपस्थित असत. आटीव केशरी दुधाचे पेले देण्यापूर्वी विविध विषयावर बोलणी होत. पण त्यात ओघाओघाने निघणाऱ्या विषयावर सहजतेने चर्चा होई. अशा प्रसंगीं परस्पराची थट्टा होणे, हेहि स्वाभाविक असे व त्यांतून विविध मंडळींचे विचार व स्वभाव पारखण्यावर डॉक्टरांचे लक्ष असे. काही वेळा होऊन गेलेले कार्यक्रम व चळवळी याचे अशा प्रसंगाने सिहावलोकन होई व पुढे काय करावयाचे याविषयी विचार होऊन कांहीं संकल्प सुटत. कार्यक्रमाच्या शेवटी दूध व अत्तरगुलाब झाल्यावर सर्वांचे आभार मानण्यास डॉक्टर विसरत नसत. त्याचे भाषण जेवणानतर लवग-वेलची द्यावी इतके आटोपशीर पण क्वचित् झणझणीत पण स्वादकर असे असे ! एकदां तर सर्वांचे आभार मानतांना नागपुरांतील विख्यात कामगार पुढारी श्री. रामभाऊ रुईकर याच्याकडे वळून डॉक्टर म्हणाले, "कोजागिरीचा गोड कार्यक्रम आता पूर्ण होत आहे, तेव्हां दुधाची कढई व भाडीं धुण्याचे काम यानतर माझे मित्र रामभाऊ रुईकर हे करतील. कारण ते मजूरपुढारी आहेत !" या खटयाळ विनोदाने हास्याची एकच खसखस पिकली ! राजकीय मतभिन्नतेने उत्पन्न होणाऱ्या संघर्षाची तीव्रता अशा मेळाव्याने कमी

होई आणि नव्या व जुन्या पिढींतील पुढाऱ्यांना विचारांची देवाणघेवाण करण्यास सुसंधि लाभे.

बाहेरील एकूण वातावरण सरकारी धोरणामुळें आधींच अत्यंत तप्त होत चाललें होतें व त्यांतूनच खिलाफत आंदोलन व महात्माजींनीं सुरू केलेला सत्याग्रह यामुळें त्या वातावरणाची तीव्रता दिवसेंदिवस वाढत होती. १९१९ डिसेंबरमध्यें इंग्रजांनीं ' शांततादिन ' पाळण्याचा आदेश दिला होता, पण तो धुडकावून लावून ' सरकारचा निषेधदिन ' त्याच दिवशीं घडवून आणण्याचा आदेश नागपुरांतील पुढाऱ्यांनीं लोकांना दिला. त्यासाठीं वांटण्यांत आलेल्या पत्रकावर डॉक्टरांचीहि स्वाक्षरी होती. ' Can we celebrate peace ? ' म्हणजे " आम्ही शांतता-दिन पाळूं शकतों काय ? " असें खोचक शीर्षक त्या पत्रकावर होतें. त्या वर्षीच्या अमृतसर कॉंग्रेसलाहि डॉक्टर गेले होते. अधिवेशन चालू असतां ते ' जालियनवाला बाग ' हि जाऊन पहाण्यास विसरले नाहींत. या अधिवेशनांतील एकूण चर्चेवरून महात्माजींच्या विचाराला लोकांचा पाठिंबा मिळणार, असा रंग दिसूं लागला.

या कॉंग्रेसपूर्वींच खिलाफतीचें प्रकरण अगदीं टिपरघाईला येऊन त्यांच्याशीं असहकाराच्या दृष्टीनें गांधीजींचें सूत जमत आलें होतें. दि. २४ नोव्हेंबर १९१९ ला हिंदुमुसलमानांच्या अ. भा. संयुक्त खिलाफत चळवळीची तळी उचलून धरून महात्माजींनीं निःस्वार्थ साहाय्याचा पुकारा त्याचमुळें केला असावा. ते म्हणाले होते, " आपण हिंदु लोकांनीं कांहीं अटींवर मुसलमानांना साहाय्य करावें असें कांहीं लोक म्हणतात. पण निःस्वार्थ मदत हीच खरी मदत होय. " अशा वातावरणांतच १९२० ची कॉंग्रेस नागपूरला होण्याचा विचार निश्चित होऊन तिच्या पूर्वसिद्धतेचीं चक्रें जोरानें फिरूं लागलीं. १९०७ मध्यें नागपूर-मधील पुढाऱ्यांनीं लोकमान्य टिळकांच्या अध्यक्षतेखालीं नागपूरमध्यें कॉंग्रेस अधिवेशन घेण्याची खूप खटपट केली होती. पण त्या वेळीं जहाल व मवाळ पक्षांत लठ्ठालठ्ठी होऊन त्यांत तात्पुरता मवाळांचा वरचष्मा झाला व नागपूरकरांचा विचार विफल ठरून त्यांतून सुरतेचा बखेडा जन्मास आला. त्या वेळीं फसलेला डाव या प्रसंगीं साधावा या विचारानें नागपूरमध्यें एक नवा त्वेषच संचारला होता, असें म्हणणें वावगें होणार नाहीं.

डॉ. ल. वा. परांजपे यांच्या नेतृत्वाखालीं १९२० च्या जानेवारींतच ' भारत स्वयंसेवक मंडळ ' स्थापन करण्यांत आलें. सर्व सार्वजनिक कामें व्यवस्थितपणें पार पाडण्यासाठीं लागणारें साहाय्य पुरविणें हें या मंडळाचें उद्दिष्ट होतें. या मंडळांत डॉक्टर हे परांजपे यांचे सहकारी होते. मागोमाग मध्यप्रांतांत स्वागतसमितीच्या वतीनें प्रचार-दौरेहि सुरू झाले. १९२० च्या मे महिन्यांत झालेल्या दौऱ्यांचें वृत्त देतांना ' महाराष्ट्र ' लिहितो कीं, "......जेथें जेथें दौरा गेला, तेथें तेथें लोकांनीं गांव शृंगारून पाहुण्यांचें स्वागत केलें. किसान बंधूंनीं

दाखविलेली उत्सुकता अपूर्व होती. डॉ. मुंजे, डॉ. हेडगेवार, गणपतराव जोशी व बाबासाहेब देशपांडे याची व्याख्याने परिणामकारक होती. " या दौऱ्याचा विशेष असा कीं, सव्वीस दिवसात सत्तावीस गांवी पंधरा-सोळा सहस्र लोकासमोर या मंडळींनीं भाषणे दिली होतीं. या सभांत कधीं डॉ. मुंजे, तर कधी डॉक्टर हेडगेवार हे अध्यक्ष असत.

असे प्रचारदौरे सुरू होते, त्याच जोडीने जुलैच्या प्रारंभापासून कॉंग्रेस अधिवेशनासाठी लागणाऱ्या हजार-बाराशे स्वयसेवकांची उभारणी करण्यासहि प्रारंभ करण्यांत आला. भा. स्व. मंडळाच्या या स्वयसेवक मंडळाचे डॉ. परांजपे हे अध्यक्ष होते व डॉ. हेडगेवार हे त्यांचे प्रमुख सहकारी होते. या स्वयसेवकांना आपला पोशाख स्वतःच करावा लागणार होता. त्या काळात ही स्वयंसेवक पद्धति जरा नवीन असल्याने गणवेष करणे महाग पडते, अशी कुरकूर ऐकूं येऊं लागली. तेव्हा स्वयसेवक मंडळाकडून निघालेल्या पत्रकात, ' हे स्वयंसेवक अधिवेशनापुरतेच उभे करावयाचे नाहीत तर अशी पथके कायमची उभी करण्याची आवश्यकता ' प्रतिपादिली होती. त्यात म्हटले होते की, " हा गणवेषाचा नियम गरिबाच्या मार्गात अडचण निर्माण करण्याच्या उद्देशाने केलेला नसून कॉंग्रेस संपल्यावर सुद्धा या नवीन तयार झालेल्या स्वयसेवकाची पथके कायम ठेवण्याची खटपट करण्याचा विचार आहे..... वेळ अशी आली आहे की, गांवोगाव आपल्या राष्ट्रीय संस्थाना मदत करण्याकरिता वा मिरवणूक व सभा यांतून व्यवस्था ठेवण्याकरिता स्वयंसेवकाची पथके तयार झाली पाहिजेत. "

पण अशा उत्साहावर आघात करणारी घटना दि. ३१ जुलैला घडून आली. भारताचे अनभिषिक्त सम्राट् लोकमान्य टिळक हे मुबईला थोड्या दिवसाच्या आजारानंतर दि. ३१ जुलैला रात्री निधन पावले ! सारा देशच दुःखसागरात बुडून गेला ! पण नागपूरकराची मनोव्यथा अर्थातच अधिक होती. त्या वेळी श्री. अच्युत बळवंत कोल्हटकरानी लिहिले होते की, " लोकमान्य अध्यक्ष हवेत म्हणून नागपूरकरानी बारा-तेरा वर्षे एकसारखी तपश्चर्या चालविली होती. १९२० मध्ये दुर्दैवाने ती विफल ठरली......लोकमान्यांवर कृतांताने झडप घातली आणि ' हेच अध्यक्ष हवेत ', ' हेच अध्यक्ष हवेत ' अशी जपमाळ नागपुरी कॉंग्रेस घेऊन बसलेली असतानाच लोकमान्याच्या स्वर्गवासाने जगतीतलावरील दाही दिशा काळ्याकुट्ट झाल्या. "

लो. टिळक निधन पावल्याची वार्ता कानी येतांच डॉ. हेडगेवार हे काही वेळाने डॉ. मुंजे यांजकडे जाण्यास निघाले. वाटेत लहानशा मोकळ्या जागेत पांच-सहा शाळकरी चेंडूफळी खेळत असल्याचे त्यांनी पाहिले व त्याना राग येऊन त्यांनीं प्रश्न केला की, " लोकमान्य टिळक वारले नि तुम्ही खेळतां कसले ? " त्यावर एक-दोघा मुलानीं कांहीं तारे तोडण्यास प्रारंभ केला तेव्हां डॉक्टरांनीं

अशा कांहीं तऱ्हेनें त्यांच्याकडे दृष्टिक्षेप केला कीं, त्यांची वटवट तर थांबलीच, पण तो खेळ आवरून ते घरीं गेले ! या वेळीं डॉक्टरांनीं विचारलेला प्रश्न त्यांतील एका तरुणाच्या मनांत इतका घर करून राहिला कीं, त्या तरुणाचा सारा जीवनप्रवाहच पालटून गेला. हा चेंडूफळी खेळणारा तरुण म्हणजेच डॉक्टरांनीं संघ काढल्यानंतर त्याच्या प्रचारार्थ आघाडीवर गेलेले श्री. दादा परमार्थ !

लोकमान्यांच्या दुःखद निधनानंतर सुतकाच्या दहाव्या दिवशीं सोमवार दि. ९ ला नागपुरांत सार्वजनिक हरताळ, मिरवणूक व सभा असा कार्यक्रम घडवून आणण्यांत डॉक्टरांनीं पुढाकार घेतला होता. याच सुमारास दि. ११ ते १८ असा नागपुरांत असहकार सप्ताहहि पाळण्यांत आला. त्या सप्ताहांत लोकांनीं कसा भाग घ्यावा, याचें मार्गदर्शन करण्यासाठीं एक पत्रक प्रसिद्ध झालेलें होतें. त्या पत्रकाखालीं ‘ चिटणीस, नॉन्-को-ऑपरेशन बोर्ड ’ म्हणून चौघांच्या स्वाक्षऱ्या असून त्यांत डॉक्टरांचें नांव आढळतें.

लोकमान्य गेले त्याच दिवशीं खिलाफत समितीनें हिंदुस्थान सरकारला एक महिन्याचा दिलेला कालावधि संपून असहकार पर्वाला प्रारंभ झाला होता. सिंध, वायव्य सीमाप्रांत व पंजाब यांमध्यें “ इंग्रजांच्या अमुसलमान राज्यांत म्हणजे ‘ दार–उल्–हरब ’ मध्यें यापुढें रहावयाचें नाहीं ” अशा प्रचारानें मूळ धरलें व थोड्या अवधींतच जवळ जवळ अठरा सहस्र मुसलमानांनीं घरें-दारें सोडून अफगाणिस्तानांत जाण्याचा मार्ग सुधारला. ह्या देशांतराला म्हणजे हिजरातीला म. गांधींनीं आपला आशीर्वाद दिल्यानें खिलाफतवाल्यांच्या असहकाराच्या आंदोलनाला तेजच चढलें.

खिलाफत समितीचा असहकार अशा रीतीनें प्रगत होत असतांना लो. टिळकांच्या निधनानंतर कलकत्त्याला सप्टेंबर महिन्यांत कॉंग्रेसचें एक खास अधिवेशन पार पडलें. या अधिवेशनाचा विशेष असा कीं, प्रतिसहकारवादी टिळकानुयायी यांना मागें टाकून असहकारवादी महात्मा गांधींचें प्रभुत्व कॉंग्रेसवर प्रस्थापित झालें व त्यांनीं खिलाफत समितीच्या प्रयाग अधिवेशनांतील असहकाराच्या निर्णयाला ‘ मम ’ म्हटलें.

सप्टेंबरमधील या कॉंग्रेसच्या निर्णयाचा रोख ध्यानीं घेऊन नागपूर अधिवेशनांत तरी लोकमान्य टिळकांच्या मतांशीं सुसंवादी मतें असणारा, त्याच तोलाचा अध्यक्ष मिळवावा, असा विचार नागपूरमध्यें सुरू झाला व डॉ. बा. शि. मुंजे यांनीं विचारान्तीं बाबू अरविंद घोष यांना या दृष्टीनें एकदां कौल लावून पाहण्याचें ठरविलें. १९१० पासूनच बाबू अरविंद हे पॉंडेचरीच्या एकांतांत अध्यात्मसाधनेंत निमग्न होऊन राहिलेले असले तरी ते या मार्गांत शिरण्यापूर्वीं टिळकानुयायी व प्रतिसहकारवादी होते. या आधारावर लो. टिळकांच्या निधनानें

निर्माण झालेली जहाल पक्षाची विशिष्ट स्थिति ध्यानी घेऊन योगी अरविंद कदाचित् पुन्हा राजकारणात उतरतात काय, हे पहाणे अयुक्त नव्हते.

तेव्हा डॉ. मुंजे यांनी योगी अरविंदाना जाऊन भेटण्याचा विचार केला. त्यांचा हा विचार डॉक्टर केशवराव हेडगेवार व त्यांचे क्रांतिप्रवण सहकारी यांना स्वाभाविकच रुचणारा होता व त्यामुळे डॉ. मुंजे यांच्याबरोबर नागपुरातील तरुण वर्गाकडून पाचारण करण्यासाठी म्हणून डॉ. केशवरावहि पॉडेचरीस गेले. ही पॉडेचरीची भेट बहुधा १९२० च्या सप्टेंबरमध्ये झाली असे दिसते.

योगी अरविंदाना भेटण्यासाठी हे डॉक्टरद्वय नागपुराहून निघाले तेव्हाचा आगगाडीतील एक छोटासा प्रसंग हिंदु समाजाच्या अंतरंगातील स्वाभाविक देशभक्तीची ओळख पटविणारा असल्याने येथे देणे युक्त दिसेल. ह्या वेळी डॉ. मुंजे पहिल्या वर्गातून व केशवराव तिसऱ्या वर्गातून प्रवास करीत होते. प्रवासात एखाद्या स्थानकावर अधिक वेळ गाडी थांबली की, केशवराव खाली उतरत व डॉ. मुंजे यांची विचारपूस करण्यासाठी त्यांच्या डब्यात जाऊन येत. शेवटी मद्रासच्या अलिकडील स्थानकावर गाडी आली तेव्हा त्यांनी डॉ. मुंज्यांची वळकटी गुंडाळून इतर सामानाची नीट आवराआवर करण्यासाठी त्यांच्या डब्यात प्रवेश केला. पण हे काम पूर्ण होण्यापूर्वीच गाडी सुरू झाली व केशवरावांना आपल्या तिसऱ्या वर्गाच्या डब्यात जाण्यास अवधि मिळाला नाही. योगायोग असा की, नेमका त्या वेळी त्या डब्यात निरीक्षक (चेकर) चढला व केशवरावाजवळील तिसऱ्या वर्गाची दर्शिका पाहून तो त्यांच्याजवळ नियमबाह्य प्रवास केल्याचा भुर्दंड व पहिल्या वर्गाचे भाडे मागू लागला तेव्हा दोघांहि डॉक्टरांनी नेमका घडलेला प्रकार त्याला समजुतीने सांगण्याचा यत्न केला. पण तो नियमावर बोट ठेवून जरा तोऱ्यातच पैसे मागू लागला. तेव्हा डॉ. मुंज्यांना ते सहन न होऊन ते कडाडले की, " जा, पैहि देत नाही ! आम्ही तुझे धनी आहोत नि तू आहेस आमचा नोकर हे ध्यानात ठेव ! " (" You will not get a pie. Mind, that I am the master and you are the servant. ")

आजवर त्याच्या कचाट्यात सापडणारा प्रवासी गयावया करू लागतो, असा त्या निरीक्षकाचा नित्याचा अनुभव होता. त्यामुळे ह्या कडकडाटाने सतापून तो उद्गारला की, " मजजवळ गमजा नकोत ! हा काही मुसलमानांचा देश नाही ! " (" This is not a Muslim Country ! ") डॉ. मुंजे यांची उंच गोल काळी टोपी, डोक्याचा गोटा, लांब दाढी व घसघशीत देह ह्या गोष्टींनी फसूनच त्या निरीक्षकाने त्यांना मुसलमान ठरवून असा सणसणीत टोला लगावला होता, हे वाचकांनी हेरलेच असेल !

या उत्तराने दोघांहि डॉक्टरांना मनापासून हसू आले व आतून एक प्रकारचे समाधानहि वाटले. हिंदुस्थानात राहणारे सर्व जण हे या देशाचे स्वामी

आहेत, असा प्रचार त्या काळांत चोहींकडे मोठ्या धडाक्यानें सुरू होता. तरीहि संघर्षाचा प्रसंग आला कीं, हिंदु-मनांतील देशभक्ति कशी उसळून उठते नि हा देश केवळ हिंदूंचाच आहे हें इतिहासपूत सत्य ठणठणीतपणें ती देशभक्ति कशी बोलूं लागते, याचें हें प्रात्यक्षिक पाहून त्या दोघां देशभक्तांचें हृदय फुलून येणें स्वाभाविकच होतें. हा प्रवासांतील प्रसंग डॉक्टरांच्या मनावर इतका उमटला होता कीं, हिंदूंच्या स्वतःसिद्ध राष्ट्रीयत्वाचें विवेचन करतांना ते तो प्रसंग अनेकदां कथन करीत. अस्तु !

पॉंडेचरीला डॉक्टरांचें चार-पांच दिवस वास्तव्य होतें व तेवढ्या अवधींत त्यांनीं एकूण देशाची परिस्थिति अरविंदबाबूंच्या कानीं घालून त्यांनीं पुढाकार घेणें नितान्त आवश्यक असल्याचें परोपरीनें सांगितलें असेल. त्या विचारविनिमयाच्या वेळीं उपस्थित असलेला कोणी भेटला नाहीं. ते येऊन गेल्याचें सांगणारे मात्र भेटतात. योगी अरविंदांनीं पॉंडेचरी न सोडण्याचा मनोदयच डॉक्टरांजवळ निग्रहपूर्वक मांडला. यापूर्वीं अशाच पद्धतीनें त्यांना राजकारणांत पुन्हा ओढण्याचा प्रयत्न अनेकांनीं केला होता. १९२० मध्येंहि लो. टिळकांच्या सांगण्यावरून श्री. जोसेफ बॅप्टिस्टा यांनीं एका राष्ट्रीय वृत्तपत्राचें संपादकत्व स्वीकारण्याची विनंति केली असतां अरविंदबाबूंकडून त्यांना जें उत्तर मिळालें, त्याच पद्धतीचें उत्तर त्यांच्यामागोमाग यांनाहि मिळालें असेल यांत शंका नाहीं.

बॅप्टिस्टांना योगी अरविंद लिहितात, "........माझ्यासमोर कामाचा इतका ढीग आहे कीं, सध्यां तरी सरकारी पाहुणे बनून वेळ घालविण्याची मला मुळींच इच्छा नाहीं. यदा कदाचित् मला पूर्ण स्वातंत्र्य मिळालें तरीसुद्धां मी भारतांत परतणार नाहीं.......मी भारतासाठीं जें करावयाचें तें आपल्या परीनें करीत आहें. माझा मनोगत हेतु पूर्ण झाल्याशिवाय मी आज तरी दुसरें कोणतेंहि कार्य अंगावर घेऊं शकत नाहीं. भारतांत परत यावयाचें म्हणजे अनेक गोष्टींना हात घालावा लागेल."

यानंतर दि. १० ऑक्टोबरला नागपूर येथें स्वागतमंडळाची सभा झाली. त्यांत अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून बारा प्रान्तांपैकीं सहा प्रान्तांनीं श्री. विजय राघवाचार्य यांचें नांव सुचविलें असून सिंधनें बाबू अरविंद, बंगालनें बॅ. चक्रवर्ती व आंध्रनें महंमदअली यांना पाठिंबा दिला असल्याचें सांगण्यांत आलें. या वेळीं डॉक्टर हेडगेवारांची ध्येयनिष्ठा किती निर्भेळ व कडवी होती, हें पाहण्यासारखें आहे. डॉ. मुंजे यांनीं या सभेंत श्री. विजय राघवाचार्य यांचेंच नांव आपणहि मान्य करावें, अशी सूचना करतांच डॉक्टरांनीं त्यांना विरोध केला होता. ते म्हणाले, " विजय राघवाचार्य हे परवां गव्हर्नरच्या पार्टीला गेले होते. असला थोडा तरी डाग लागलेला मनुष्य आपण कॉंग्रेसचा अध्यक्ष म्हणून निवडूं नये; तर त्या जागीं बंगालचे श्री. चक्रवर्ती यांचें नांव सुचवून हें निवडणुकीचें प्रकरण

अ. भा. कॉंग्रेस समितीकडे पाठवावे." शेवटी भवति न भवति होऊन विजय राघवाचार्यच विजयी झाले ! डॉक्टराची मताभिन्नता कॉंग्रेसच्या प्रांतिक बैठकांतून नेहमीं उठून दिसावयाची. पण त्यांत विचारांची विशुद्धता व अनुशासनाविषयींची आस्था निश्चयाने दिसे. दि. २८ नोव्हेंबरच्या प्रांतिक कॉंग्रेसने अ.भा. कॉंग्रेस समितीवर बारा जणांची निवड केली. त्या वेळी कांहीं जणांचा नामनिर्देश करून डॉक्टर म्हणाले की, "...... जे प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे सभासद लोकमताला न जुमानता कौन्सिलसाठी उभे राहिले, त्यास प्रतिनिधि निवडूं नये." अर्थात् राजकारणांत शिरलेल्या संधिसाधू वृत्तीला अनुशासन व विशुद्धता या गोष्टी न मानवल्या तर त्यांत आश्चर्य करण्यासारखे कांहींच नव्हते !

या होणाऱ्या नागपूर कॉंग्रेसला जोडूनच अखिल भारतांतील महाविद्यालयीन विद्यार्थी परिषद घेण्याचे नागपूर विद्यार्थी वर्गाने प्रचंड सभा घेऊन ठरविले. या परिषदेच्या प्रचारार्थ श्री. रामभाऊ गोखले यानीं सरकारी नोकरीचे त्यागपत्र देऊन सचार सुरू केला. ही वार्ता 'यंग पेट्रियट'(Young Patriot) मध्यें प्रसिद्ध होतांच डॉक्टरानी आपले बंधु सीतारामबुवा याच्याकरवी रामभाऊंच्या वडिलांजवळ घरच्या परिस्थितीसंबधी व या त्यागपत्राने होणाऱ्या प्रतिक्रियेसबंधीं आपुलकीने विचारपूस केली. रामभाऊ गोखले या कामावर निघाल्यावर मुबईला जाऊन महात्माजीना भेटले व त्यानी निरनिराळ्या प्रान्तात प्रचारास सुलभता लाभावी म्हणून त्याच्याजवळून परिचयपत्र मिळावे अशी विनति केली. पण त्यानी नकार दिला. या घटनेने काहीसा विरस होऊन ते नागपूरला परत आले व झालेला प्रकार त्यानी डॉक्टरांना विदित केला. कोणतीहि व्यक्ति स्वयप्रेरणेने कांहीं काम करण्यास पुढे येत असेल तर तिला प्रोत्साहन देणे हा डॉक्टराचा स्वभाव होता. त्यानीं रामभाऊना धीर दिला व कलकत्ता, डाक्का, मेमनसिग, पाटणा, बनारस, प्रयाग आदि ठिकाणासाठीं पत्रे व परिचयपत्रे देऊन परिषदेच्या प्रचारार्थ जाण्यास त्याना प्रोत्साहन दिले. यासंबंधी श्री. गोखले लिहितात, "......डॉक्टरांनी दौऱ्यासाठी स्वतःचा कोशाचा फेटा दिला व त्या भागात कसा विषय माडावा यासंबंधी सूचना दिल्या. त्याचा मला किती उपयोग झाला, हे शब्दानी व्यक्त करणे कठीण आहे."

कॉंग्रेसचे अधिवेशन दि. २६ डिसेंबरला सुरू व्हावयाचे होते. तत्पूर्वी कांहीं दिवस प्रांतिक कॉंग्रेस सामितीकडून एक 'असहकार मंडळ' नियुक्त झाले. त्या मंडळावर डॉक्टरांचीहि निवड झाली होती व प्रामुख्याने सभा ठरविणे व भरविणे हे काम त्याच्याकडे सोपविण्यांत आले होते. डॉक्टराना जशी राष्ट्रविमोचनासाठी केलेल्या हिंसेची घृणा नव्हती, तसा त्याच हेतूने पण अहिंसक मार्गाने पुकारलेल्या असहकाराशींहि त्यांचा असहकार नव्हता. परक्यांना कोणीहि कोणत्याहि मार्गानें हुसकून देण्यासाठी पुढे आला तरी त्याचा डॉक्टरांना अभिमान

वाटे व त्यामुळें ते शक्य तेवढा सहकार करीत. तशांत डॉक्टर व त्यांचे क्रांतिकार्यांतील सहकारी यांचा विधानसभांच्याद्वारें देशाचें स्वातंत्र्य मिळविण्यावर विश्वासच नव्हता. त्यामुळें मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांशीं असहकार पुकारण्यांत या मंडळींना खटकण्यासारखें कांहींच नव्हतें. आणखीहि एक हेतु डॉक्टर व त्यांचे सहकारी यांनीं त्यांच्या दृष्टीनें मवाळ असलेल्या काँग्रेसशीं सहकार करण्यामागें असावा. या काळांत क्रांतिकारक म्हणून ज्यांच्याविषयीं सरकारला दाट शंका होती, त्यांच्यामागें सावलीप्रमाणें हेरांचा ससेमिरा असावयाचा. अशा वेळीं सरकारच्या दृष्टीनें कांहींशी सौम्य व अहिंसेचा अखंड पुकार करणारी काँग्रेसचीच चळवळ होती व त्यामुळें तींत मिसळून गेल्यावर आपणहि आतां अहिंसेच्याच मार्गावर गेलों आहोंत असें सरकारास भासवून आपल्या इतर हालचालींसंबंधींची सरकारच्या मनांतील शंका दूर करतां येईल, असा तो हेतु असावा.

मात्र काँग्रेसचें प्रत्यक्ष अधिवेशन होण्यापूर्वीं डॉक्टर हेडगेवार, श्री. बळवंतराव मंडलेकर, आदि मंडळींनीं नागपूरला व्यंकटेश नाट्यगृहांत सभा घेऊन ‘ निर्भेळ स्वातंत्र्य हेंच आमचें उद्दिष्ट आहे ’ असें घोषित करणारा ठराव संमत केला. तोच ठराव काँग्रेसनेंहि स्वीकारावा असें सांगण्यासाठीं त्यांतील चौघे महात्मा गांधी यांना जाऊन भेटले. ते त्या वेळीं नुकतेच कोठें साम्राज्यांतर्गत स्वराज्याऐवजीं ‘ स्वराज्य ’ पाहिजे, असें म्हणूं लागले होते. महात्माजींनीं त्यांचें म्हणणें ऐकून घेऊन ‘ स्वराज्यांत निर्भेळ स्वातंत्र्य आलेंच ’ अशी मल्लीनाथी केली !

पुढें प्रत्यक्ष काँग्रेस अधिवेशन दि. २६ डिसेंबरला सुरू झालें. सध्यां नागपुरामध्यें ‘ काँग्रेस नगर ’ या नांवानें जी वस्ती झाली आहे, त्या ठिकाणींच अधिवेशनाचा मंडप होता. “ या जागीं १४५८३ इतके प्रतिनिधि, तीन सहस्र स्वागत मंडळाचे सदस्य व सात-आठ सहस्र प्रेक्षक उपस्थित होते ” असें वर्णन आढळतें. या वेळचें हें अधिवेशन संख्येच्या दृष्टीनें तत्पूर्वीच्या कोणत्याहि अधिवेशनाला मागें टाकणारें होतें, यांत कांहींच नवल नाहीं. त्यानें १९२८ पर्यंतच्या अधिवेशनांना फिकें पाडलें, असें काँग्रेसच्या इतिहासावरून ध्यानीं येतें. त्या अधिवेशनांतील स्वयंसेवकांचे प्रमुख म्हणून डॉ. परांजपे व डॉक्टर यांना इतक्या जणांची व्यवस्था करण्याचा फार ताण पडला. खाकी गणवेष व साफे घालून स्वयंसेवक उभे करण्यांत आले होते. तरी संचलनांतून मिळणारें शिस्तीचें वळण त्यांच्या अंगवळणीं पडलें नसल्यानें कांहीं वेळां लोकांना आवरण्याबरोबरच स्वयंसेवकांना सांवरणें हेंहि या प्रमुखांचें एक प्रमुख काम होऊन बसलें होतें ! डॉक्टरांनीं भोजन-व्यवस्था व वसति-गृह यांवर विशेष लक्ष दिलें व त्या काळाच्या दृष्टीनें व त्या संख्येच्या दृष्टीनें लोकांनीं व्यवस्थेविषयीं धन्योद्गार काढण्याइतकी सेवा केली. या निमित्तानें त्यांना जो अनुभव आला, त्यामुळेंच स्वयंसेवक कसा असावा व तो तसा घडविण्यासाठीं काय करावें, याचा विचार

करण्यास त्यांना चालना मिळाली. कामापुरते उत्साही तरुण एकत्रित करावेत व ते स्वभावाने व वृत्तीनें जसे असतील तसेच स्वीकारून काम संपतांच त्याना मोकळीक द्यावी, ही त्या वेळची प्रथा त्याना रुचली नाही. तसेच इतराना साहाय्यभूत होण्यासाठीं उभा राहणारा स्वयसेवक हा अनुशासनशील नसेल तर, अंगांतील हाडेच मऊ पडल्यावर जशी स्थिति होते तशी स्थिति त्या कामाचीहि झाल्यावाचून राहत नाहीं, याचा अनुभव त्यानी या वेळी घेतला व त्यांतूनच आदर्श स्वयसेवकत्वाची कल्पना त्याच्या डोळ्यांपुढे मूर्तरूप घेऊ लागली.

या कॉंग्रेस अधिवेशनांत अ. भा. कार्यकारिणीमधील एका प्रसंगानें डॉक्टरांच्या विचारांना जोराचा धक्का दिला होता. मुसलमानांना जवळ करण्यासाठी आऊचा काऊ तो माझा मावसभाऊ, इतकेहि दूरान्वयाने म्हणता येणार नाही असे खिलाफत प्रकरण कॉंग्रेसने उचलून धरले असता, गोरक्षणाचा प्रश्न राष्ट्रीय असल्यामुळे तो कॉंग्रेसने हातीं घ्यावा अशी विनति श्री. बढे यानी केली. त्यावर " मुसलमानाच्या भावना दुखविल्या जातील म्हणून हा प्रश्न कॉंग्रेसला हाती घेता येणार नाहीं, " असे महात्मा गाधीनी सागितले ! यावर वादग माजले. तेव्हा महात्माजीनी श्री. बढे याना ' मंडप सोडून जा ' असे सागितले. बढे हट्ट सोडीनात व जागचे हालेनात ! त्याची मनोदेवता त्याना सागत होती की, गोरक्षणाची उपेक्षा ही सत्याची हिसा होय. अशा तंग वातावरणात गाधीजींनीं अनत्याचारी वृत्तीला स्मरून त्यांना हातीं धरून बाहेर न काढता अ. भा. कार्यकारिणीची बैठक स्थगित केली ! ही पाहिलेली घटना डॉक्टराना फारच बोचली. ते कधीं कधी ही गोष्ट सागून म्हणत कीं, " त्या काळात मुसलमान प्रसन्न होऊन आपणाकडे कसे वळतील, हीच प्रत्येक प्रश्नाची कसोटी होती ! "

बॅ. चित्तरंजन दास यांनीं मांडलेला असहकाराचा नऊ परिच्छेदांचा ( नऊ कलमी ) ठराव म. गांधींनीं उचलून धरला व लाला लजपतराय, श्री. शंकराचार्य ( पुरी ), स्वामी श्रद्धानंद, श्यामसुंदर चक्रवर्ती व जम्नादास मेहता यानी पुष्टि दिल्यावर संमत झाला. या ठरावाने खिलाफत समिति व कॉंग्रेस यांच्या युतीवर अधिकृतपणाची मुद्रा ठोकली गेली.

आणखी एका गोष्टीचा उल्लेख स्मरणपूर्वक केला पाहिजे. तो म्हणजे स्वागतसमितीच्या एका ठरावाचा. या ठरावात असे म्हटले होते कीं, " हिंदुस्थानचे प्रजासत्ताक निर्माण करून भांडवलशाही राष्ट्रांच्या जाचांतून जगातील देशाची मुक्तता करणे हे कॉंग्रेसचें ध्येय आहे. " पण या ठरावातील ' जगातील देशांच्या मुक्ततेच्या ' कल्पनेचा उपहास करून विषयनियामक समितीनें तो ठराव मागे टाकला. यासंबंधीं कलकत्त्याचा ' मॉडर्न रिव्ह्यू ' आपल्या १९२१ च्या मार्चच्या अंकांत म्हणतो कीं, " The .draft resolution deserved a better fate than what it met with, in the subjects committee. "

म्हणजे त्या संकल्पित ठरावाची जी संभावना विषय-नियामक समितींत झाली, त्याहून त्या ठरावाची योग्यता अधिक होती. एवढेंच सांगून न थांबतां नागपूरच्या स्वागतसमितींत कांहीं ‘ प्रजासत्ताकाचे पुरस्कर्ते ’ आहेत, याविषयीं आनंद व्यक्त केला होता. हा स्वागत समितीचा ठराव अर्थातच नागपूर नॅशनल युनियनच्या डॉ. हेडगेवार, विश्वनाथराव केळकर आदि त्या समितींतील तरुण गटाच्याच प्रेरणेनें पुढें आला होता व त्या वेळीं स्वातंत्र्याचा उच्चार करण्यासहि कचरणाऱ्या पुढाऱ्यांनीं त्याचा उपहास करून तो डावलून लावला होता !

हिंदुस्थानच्या राजकारणांत ‘ प्रजासत्ताकाची आकांक्षा ’ निर्भयपणानें बोलून दाखविणाऱ्या तरुणांचा आवाज त्या वेळीं उपहासाच्या खिदखिदण्यांत विरला असला तरी वर्तमानकाळानें प्रजासत्ताकाच्या व जागतिक मुक्तीच्या केलेल्या घनगंभीर व मुक्त जयजयकारांत तो उपहासहि विरला नाहीं काय ?

★ ★ ★

## ८ : असहकार व खटला

नागपूर कॉंग्रेस अधिवेशनात डॉक्टर व त्याचे सहकारी मग्न असतां श्री. भाऊजी कावरे हे त्या बाजूला नुसते फिरकलेहि नाहीत ! सशस्त्र क्रान्तीव्यतिरिक्त अन्य मार्ग त्याना अत्यन्त मिळमिळीत वाटत असल्यामुळे त्याना त्याच्या गावात देशातील प्रमुख प्रमुख पुढारी एकत्र झाले असता, त्याचे नुसते दर्शन घेण्यासहि उत्सुकता वाटली नसल्यास नवल ते कोणते ? उलट कॉंग्रेसच्या विषयनियामक समितीतील काही वादविवाद डॉ. हेडगेवार व इतर मडळी याजकडून जेव्हा त्याना ऐकावयास मिळाले, तेव्हां ते त्याची खुसखुशीत थट्टाच करताना आढळत.

अधिवेशन सपले व डॉक्टरानी आपल्या मित्रमंडळीजवळ विचारविनिमय केला. त्यात खिलाफत चळवळ ही विघातक ठरणार आहे व एका वर्षात स्वराज्य मिळवून देण्याचे आश्वासन दिले गेले असले तरी आताची लोकाची मनःस्थिति पाहता ही गोष्ट घडणे शक्य दिसत नाहीं, असे विचार त्यांनी व्यक्त केले होते. त्याचप्रमाणे देशात हिन्दूंच्या जोडीने मुसलमानाप्रमाणेच खिश्चन, पारशी, यहुदी वगैरे लोक राहत असता केवळ हिन्दु-मुसलमानांची एकी झाली पाहिजे, अशी जी भाषा प्रचलित होत आहे, ती मुसलमानाना राष्ट्रीयतेत विलीन करणारी नसून त्यांना आपण कोणीतरी विशेष आहोत, अशी फुटीरतेची भावना त्याच्या मनात उद्दीपित करणारी आहे, हेहि त्यांनी स्पष्ट केले होते. अशा मनःस्थितीतहि या आदोलनांतून लोकांना कांही प्रमाणांत जागृत करता येईल ही गोष्ट ते विसरले नव्हते. त्याचप्रमाणे देशांतील सहस्रावधि लोक इग्रजाच्या यंत्रणेशीं असहकार पुकारून संघर्षाला उभे ठाकत असता, त्या सघर्षातून अपेक्षेइतका लाभ होणार नाहीं म्हणून आपण केवळ प्रेक्षकाची भूमिका घेणे हेहि त्यांना कसे रुचावे ? अन्यायाशीं संघर्ष हा त्यांचा स्वभाव होता व "कष्टासि मानूं झोला। मृत्यूशीं खेळूं खेळा ! !" असें त्याचे मनोधैर्य असे. याव्यतिरिक्त आणखीहि एक कल्पना आदोलनात भाग घेण्यामागें असावी. ती अशी कीं, आज नाहीं उद्यां पण आपल्या सहकाऱ्याना ह्याच समाजात आपल्या कल्पना रुजविण्यासाठीं धडपड करावयाची आहे; तेव्हां तो समाज आदोलनाला सिद्ध होत असता, आपले सहकारी बाजूला राहिले तर ते आंदोलन ओसरल्यावर "तेव्हां तुम्ही कोठें होतां नि आताच नव्या गोष्टी सांगायला आलां आहांत !" असें लोक

छेडल्यावांचून राहणार नाहींत. तेव्हां आंदोलनांतील दोष व गुण दोन्ही ध्यानीं घेऊन असहकार आंदोलनांत भाग घेण्याचा निर्णय त्यांनीं घेतला व आपल्या स्वभावाप्रमाणें हातचे न राखतां त्यांत ते आघाडीवर गेले.

विद्यार्थ्यांनीं शाळा सोडाव्यात, लोकांनीं न्यायालयांवर बहिष्कार घालावा, सरकारनें दिलेल्या पदव्यांचा त्याग करावा, ठिकठिकाणीं राष्ट्रीय शाळा सुरू करून घरोघर चरखा हातीं घ्यावा, असा प्रचार चोहींकडे सुरू झाला. सभा, परिषदा यांतून हेच विषय घुमूं लागले व लोकमान्य टिळकांच्या नांवें उभारलेल्या निधीचा आंकडा फुगूं लागला. 'एक वर्षांत स्वराज्य' या म. गांधींच्या आश्वासनावर लोक भाळले होते व त्यांतून उत्साहित होऊन ह्या असहकाराच्या आंदोलनांत उड्या घेत होते. या काळांत डॉक्टरांनीं मध्यप्रांतांत गांवोगांव जाऊन भाषणांचें सत्र सुरू केलें; एवढेंच नव्हे तर डॉ. नारायणराव सावरकर यांच्याबरोबर त्यांनीं मुंबई नगर व उपनगरें यांतहि कांहीं दिवस आपल्या देशभक्तिपूर्ण व ओजस्वी भाषणांनीं सहस्रावधि लोकांना स्वातंत्र्याभिमुख करण्यासाठीं संचार केला. त्यांचीं त्या वेळचीं भाषणें हीं अभिजात स्वातंत्र्यप्रेमानें रसरसलेलीं व परक्यांविषयींच्या संतापानें धगधगणारीं अशीं असत. त्यांचे शब्द हे "आधीं केलें मग सांगितलें" या स्वरूपाचे असल्यानें ते जनमनाची तेव्हांच पकड घेत. त्या काळांतील त्यांच्या वक्तृत्वानें भारावून गेलेले श्री. दादा परमार्थ सांगतात कीं, "इंग्रज व इंग्रजी राज्य यांसंबंधीं चर्चा सुरू झाली कीं त्यांचा आवेश अनावर होऊन डॉक्टरांचें अंतःकरण बोलूं लागे. त्या प्रसंगीं त्यांचे उद्गार ऐकतांना शत्रु जणुं समोरच उभा असून ते त्यावर उफाळून घाव घालीत आहेत, असा आवेश नखशिखान्त पहावयास मिळे. डोळे लाल, मुठी वळलेल्या व बाहु स्फुरलेले असें त्यांचें जाज्वल्य रूप दिसावयाचें !" त्यांच्या भाषणांतील ही दाहकता म. गांधींच्या परिसरांत वावरणाऱ्या कांहीं साजुक व निर्भेळ सात्त्विकांना अस्वस्थ करी व त्यामुळें 'डॉक्टरांना भाषणाला कशाला बोलावितां ?' अशी कुरकूर श्री. आप्पाजी जोशी व श्री. आप्पाजी हळदे आदि सहकाऱ्यांना केव्हां केव्हां ऐकावी लागे.

१९२१ च्या पहिल्या दोन-तीन महिन्यांत डॉ. मुंजे व डॉ. हेडगेवार यांची भंडारा, खापा, केळवद, तळेगांव दशसहस्र, देवळी, वर्धा, बोरी अशा अनेक गांवीं, परगणा व जिल्हा परिषदांतून भाषणें झाल्याचें त्या वेळच्या वृत्तपत्रांवरून स्पष्ट दिसतें. अशा परिषदांत अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणांचें वर्णन "अध्यक्षांचें भाषण स्फूर्तिदायक व हृदय हालविणारें झालें," असेंच केलेलें आढळतें या प्रचारदौऱ्यांत कांहीं ठिकाणीं विदेशी कापडाच्या होळ्याहि सभांनंतर होत असत.

असें सरकारविरोधी रान उठविलें जात असतां डॉक्टरांना 'हिंदु-मुसलमान ऐक्य' असा रूढ होऊं पाहणारा शब्दप्रयोग खटकत होता. त्यासाठीं

त्यांनीं एकदां महात्मा गांधीची भेट घेऊन त्यांना प्रश्न केला की, " वास्तविक हिंदुस्तानात हिन्दु, मुसलमान, खिश्चन, पारशी, यहुदी अशा अनेक धर्मांचे लोक राहत असतां आपण या सर्वांची एकी अशी कल्पना न मांडता केवळ ' हिन्दु-मुसलमान ऐक्य झाले पाहिजे ' असे का बोलतां ? " त्यावर महात्माजीनी सांगितले होते कीं, " यामुळे मी मुसलमानाच्या मनात देशाविषयीची आत्मीयता निर्माण करीत असून ते राष्ट्रीय आंदोलनात आपल्या खांद्याला खांदा भिडवून काम करू लागल्याचे तुम्ही प्रत्यक्ष पाहत आहातच. " ' या उत्तराने डॉक्टराचे मुळीच समाधान झाले नाही. त्यांनी सांगितले की, " ' हिंदु-मुसलमान ऐक्य ' हा शब्द प्रचारात येण्यापूर्वीहि अनेक मुसलमान राष्ट्रासंबधी आपुलकी ठेवून लोकमान्य टिळकाच्या नेतृत्वाखाली काम करीत होते. बॅ. जिना, डॉ. अन्सारी, हकीम अजमलखान वगैरेंची नावे या संबंधात घेतां येतील. पण या नव्या शब्दप्रयोगाने ऐक्याऐवजी फुटीरतेचीच भावना वाढीला लागेल, अशी मला भीति वाटते ! "

अर्थात् त्या वेळी महात्माजीनी " तशी भीति मला वाटत नाही, " असे सांगून डॉक्टराची बोळवण केली. पण प्रत्यक्ष काळाने मात्र डॉक्टराच्या दूरदर्शित्वाचीच सरळ सरळ ग्वाही दिली आहे, हे विसरून चालणार नाही. असो.

ह्या जहाल प्रचाराचा परिणाम होऊन फेब्रुवारीमध्ये डॉक्टरांवर सरकार-कडून एक महिन्यासाठी एक निर्बंध घालण्यांत आला. जिल्हाधिकारी श्री. सिरिल जेम्स् आयर्विन (Cyril James Irwin) याने त्यात म्हटले होते की, "I hereby require you...to refrain from attending, holding or otherwise being concerned in any way in any public meeting or public assembly of five or more persons, for the period of one month from the date hereof. " ही १४४ निर्बंधाखालील जिल्हाधिकाऱ्याची आज्ञा दि. २३ फेब्रुवारी १९२१ ची आहे. त्यानुसार एक महिन्यापर्यंत त्याना लोकांसमोर बोलण्याचीहि चोरी झाली. एकदां सरकारशीं असहकार पुकारल्यावर त्यांच्या अशा आज्ञांचा विचार करण्याचे डॉक्टरांना कारणच नव्हते. त्यानीं यथापूर्व सभातून भाषणे देण्याचे काम धडाक्याने चालू ठेवले. त्याचे पर्यवसान खटला होणे हे ठरलेलेंच असे. नित्याप्रमाणे १९२१ च्या मे महिन्यांत डॉक्टरांवर खटला भरण्यांत आला. मात्र एक महिन्याची भाषणबंदीची ही आज्ञा मोडण्या-विरुद्ध खटला न भरता सरकारने, डॉक्टरांचीं काटोल व भरतवाडा येथील पूर्वीची भाषणे आक्षेपार्ह ठरवून खटल्याची उभारणी केली.

नागपूरचे न्यायाधीश सिराज अहमद याच्यापुढे हा खटला दि. ३१ मेला निघाला व थोडयाच वेळांत दि. १४ जूनपर्यंत तो पुढे ढकलण्यात आला. या वेळी मंगळवार दि. १४ जूनला स्मेली हे न्यायाधीश होते व सर्वश्री बोबडे, विश्वनाथ-राव केळकर, बाबासाहेब पाध्ये, हरकरे व बळवंतराव मंडलेकर यानी विधिज्ञ

म्हणून डॉक्टरांच्या वतीनें काम चालविलें. दि. २४ ऑक्टोबरला काटोल तालुका-सभेंत केलेल्या भाषणासाठीं व काटोल परगणा सभेचे अध्यक्ष या नात्यानें भरत-वाडा येथें केलेल्या भाषणासाठीं हा खटला भरण्यांत आला होता.

पहिल्या दिवशीं म्हणजे दि. १४ जूनला आरक्षकाधिकारी आबाजी यांची साक्ष झाली व दुसऱ्या दिवशीं श्री. बोबडे यांनीं त्यांची उलटतपासणी घेतली. पण श्री. बोबडे यांना श्री. स्मेली यांजकडून वारंवार अडथळे होऊं लागले. " हा प्रश्न विचारतां येणार नाहीं! हा प्रश्न असंबद्ध आहे ! हा मुद्दयाला धरून नाहीं!" अशा वाक्यांची नुसती खैरात चालू होती ! उतारूंनीं सांखळी ओढून वारंवार गाडी थांबवावी, तसाच प्रकार सुरू होता, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. सोमवार दि. २० जूनला आबाजींची उलटतपासणी बोबडेंनीं पुढें चालू करतांना " हिन्दुस्थान हा हिन्दुस्थानच्या लोकांकरितांच आहे, (India for Indians) हें तत्त्व डॉ. हेडगेवार प्रतिपादीत होते ना ? " असा प्रश्न केला. पण श्री. स्मेली यांनीं तो प्रश्न लिहून घेण्याचें नाकारलें. तेव्हां बोबडे रागावून " न्यायाधीश मला उलटतपासणी करूं देत नाहींत, त्या अर्थीं मी हा खटला चालवूं शकत नाहीं ! " असें म्हणत निघून गेले ! तेव्हां डॉक्टरांनीं " माझा खटला दुसऱ्या न्यायालयांत चालवा, अशी मी सूचना करणार असल्यानें, सध्यां खटल्याचें काम स्थगित करावें, " असें श्री. स्मेली यांस सांगितलें. ह्यावरून दुपारीं दीड वाजतांच काम थांबलें.

दुसऱ्या न्यायालयांत खटला पाठवा, अशी मागणी करणारें आवेदन दि. २५ जूनला जिल्हाधिकारी श्री. आयर्विन यांजकडे पाठविण्यांत आलें. त्यांत डॉक्टर म्हणतात, " खटल्याची सुनावणी चालू असतांना मॅजिस्ट्रेटसाहेबांस मराठीचें तुटपुंजें ज्ञान तरी आहे किंवा नाहीं याविषयीं शंका दिसून आली; आणि भाषणें व टिपणें तर मराठींत घेतलेलीं आहेत. तेव्हां अशा मॅजिस्ट्रेटला कायदा व न्याय समोर ठेवून खटला समजणेंच अशक्य आहे. म्हणून श्री. स्मेली हे खटला चालविण्यास अपात्र आहेत. शिवाय श्री. स्मेली यांच्यांत एक महत्त्वाचा राजकीय फौजदारी खटला चालविण्याकरितां लागणाऱ्या सामान्य ज्ञानाची अत्यंत कमतरता दिसून आली. आरोपीच्या वकिलांनीं उलटतपासणींत कांहीं प्रश्न विचारले तेव्हां 'मुख्य तपासणींत जें बाहेर पडलें असेल तेवढ्याविषयींच उलट प्रश्न विचारा ! आणखी कांहीं निराळ्याच गोष्टी सिद्ध करावयाच्या असतील तर आपल्यातर्फे साक्षीपुरावा पुढें आणा !' अशा नाना तऱ्हेच्या हरकती घेऊन ते प्रश्न विचारूं दिले नाहींत. त्या प्रश्नांचीं साक्षीदारांकडून उत्तरें मिळालीं असतीं तर आरोपीच्या भाषणांत राजद्रोह मुळींच नाहीं, हें तत्काळ दिसून आलें असतें. पण मॅजिस्ट्रेटची जवळ जवळ प्रत्येक प्रश्नाला कांहींना कांहीं टुरटूर सुरूच होती. प्रत्येक प्रश्नाच्या वेळीं त्या प्रश्नाचा उद्देश त्यांस समजावून

द्यावा लागे व मग पुढे काम चाले; त्यामुळे साक्षीदाराला उडवाउडव करण्यास चांगलेंच फावे ! ता. १४ जूनला इतका वेळ उलटतपासणी झाली, पण मॅजिस्ट्रेटसाहेबांचे डिपोझिशनचे ( टिपणाचे ) कागद पहाना ! अगदी जसेच्या तसे कोरे आहेत. तेव्हा आरोपीच्या वकिलास कोर्टातून निघून जाणे भाग पडले. सदर मॅजिस्ट्रेटच्या कोर्टात खटल्याची योग्य रीतीने सुनावणी होईल असे वाटत नाही. शिवाय हा खटला चालविण्याकरिता त्या कोर्टात दुसरा कोणी वकील जाणे शक्य नाही. म्हणून हा खटला दुसऱ्या कोर्टात पाठवावा. ''

या आवेदनातील भाषेवरून त्याची श्री. आयर्विन या इंग्रज अधिकाऱ्याने कशी वासलात लावली असेल, हे सागावयास नकोच. दि. २७ ला या आवेदनाला नकार देण्यात आला. त्या वेळी न्यायालयात डॉक्टराच्या वतीने एकहि वकील उपस्थित नव्हता. त्या दिवशी श्री. स्मेली यानी डॉक्टराना आपले लेखी समर्थन ( जबाब ) देण्यास सागितले. त्यावर डॉक्टर म्हणाले की, '' सर्व साक्षीपुरावा ऐकल्यानतर मग मी जबाब देईन.''

'' कोर्टास वाटेल तेव्हा लेखी जबाब मागता येतो ! '' असे सागितले जाताच डॉक्टर निश्चयी स्वरात म्हणाले की, '' मला जे सांगावयाचे होते ते मी सागितले. मी शेवटीच जबाब देईन ! '' त्या दिवशीचे काम एवढ्यावरच थाबले.

दि. ८ जुलैला खटला सुरू होऊन काटोल भागाचे सर्कल इन्स्पेक्टर श्री. गंगाधरराव याची साक्ष झाली. ती आटोपताच डॉक्टरानी स्वतःच त्याची उलटतपासणी घेतली होती, ही गोष्ट उल्लेखनीय आहे. त्यातील आशय हाहि, डॉक्टरानी श्री. गंगाधररावाना कसे छेडले होते, याच्यावर प्रकाश टाकणारा असल्याने उद्‌धृत करणे युक्त ठरेल. श्री. गंगाधरराव म्हणाले, '' सुमारे ७-४५ वाजण्याच्या आतच सभा संपली. आम्ही चोरकदिलाच्या उजेडात रिपोर्ट घेत होतो ! '' यावर डॉक्टरानी सागितले की, '' हे अधारात असून चोरकंदील वगैरे मुळीच नव्हता. मी शुद्ध मराठी बोलणारा असूनसुद्धा माझ्या तोंडी यानी ' बायकोचा पोर ' असे शब्द घातले आहेत. '' यावर साक्षीदार म्हणाला की, '' मला व्याकरणाचे नियम येत नाहीत. मी माझ्या आईशी तेलगू भाषेत बोलतो व बायकोशी मराठी भाषेत बोलतो. मी सरासरी प्रत्येक मिनिटास २५।३० शब्द लिहूं शकतो. मी कधी कधीं सबंध वाक्य लिहून घेत असे व कधी कधी एखाद्या शब्दाचा किंवा वाक्याचा सारांश लिहून घेत असे. सारांश लिहिण्याकरितां सबंध वाक्य ऐकण्याची आवश्यकता नाही. साराश लिहिताना मला विचार करावा लागला नाही. तुम्ही जसजसे बोलत गेलात तसतसा मी साराश लिहीत गेलो. जे जे कळत नसे त्याचा साराश मी इतराना विचारून लिहीत असे. हे काम ज्या वेळीं वक्ता व्याख्यानांत मध्येच दुसऱ्याशी बोलत असे ( व प्रत्येक वक्ता व्याख्यानात मधून मधून दुसऱ्याशीं बोलत असतोच.) त्या वेळीं

मी करीत असें ... ... डॉक्टर प्रत्येक मिनिटास २०।२५ शब्द बोलत होते. व्याख्यान ऐकतांना वक्त्यानें सांगितलेल्या गोष्टी खऱ्या आहेत असें वाटून इतरां-प्रमाणें माझ्या मनावरहि त्याचा परिणाम झाला; पण वक्ता सर्व खोटयाच गोष्टी सांगणार हें मला पक्कें माहीत होतें ! ”

अशी उलटतपासणींतून माहिती काढून झाल्यावर डॉक्टर स्मेलीकडे वळून म्हणाले कीं, “ भाषणाचा रिपोर्ट घेण्यांत सर्कलसाहेब किती पटाईत आहेत याची परीक्षा घेऊं देण्याची अनुमति द्यावी. ” या विनंतीस अर्थातच नकार देण्यांत आला.

त्यावर डॉक्टरांनीं भाषण करून आपली बाजू मांडली. त्या समर्थनांत विधिज्ञांप्रमाणें मार्दव नसलें तरी प्रतिपादनांतील मार्मिकता व स्पष्टवक्तेपणा उल्लेखनीय होता. ते म्हणाले, “ कोर्टापुढें आलेलीं भाषणें माझीं भाषणें नव्हत. मी दर मिनिटास सरासरी दोनशें शब्द बोलतों व जे लॉंगहॅंड ( हा डॉक्टरांनीं मारलेला टोमणा होता ) नवशिके रिपोर्टर माझ्या भाषणाचें वृत्त घेण्यास आले होते असें सांगण्यांत आलें आहे, त्यांना माझ्या सबंध भाषणाचा १/८ भाग देखील लिहून घेतां येणें शक्य नव्हतें. म्हणून फिर्यादीकडून पुढें आलेल्या सर्व रिपोर्टांत तुटक शब्द व तुटक कल्पनाच भरलेल्या असणार; व त्यांचा परस्पर संबंध, राजकीय कल्पना समजण्यास अत्यंत नालायक अशा पोलीस अधिकाऱ्यांनीं स्वतःच्या सुपीक डोक्यांस लागेल त्याप्रमाणें व वाटेल त्या वेळीं मदतीस धांवून येणाऱ्या आपल्या स्मरणशक्तीप्रमाणें लावलेला असला पाहिजे. सबंध रिपोर्टावरून मी काय किंवा कशा प्रकारचें बोललों, हें कोणासहि कळणार नाहीं. त्यांतल्या त्यांत भरतवाडा येथील माझ्या शेवटच्या भाषणाचा रिपोर्ट घेतां येणें तर शक्यच नव्हतें. कारण त्या वेळीं इतका अंधार होता कीं, त्यांत कागद किंवा पेन्सिलहि दिसणें शक्य नव्हतें व पोलिसांजवळ तर दिवेसुद्धां नव्हते. तेव्हां माझ्या भाषणाचे म्हणून पुढें आलेले रिपोर्ट हे बनावट असून ते लोकपक्षाची चळवळ दडपून टाकण्याकरितां आपण किती निकराची खटपट करतों, हें दाखविण्याकरितां निर-निराळ्या पोलीस अधिकाऱ्यांनीं आपसांत संगनमत करून पाठीमागून तयार केले आहेत, हें स्पष्ट दिसून येतें. कांहीं कांहीं रिपोर्टांकडे नुसती जराशी दृष्टि फेकली तरी सुशिक्षित माणसाला ते खोटे आहेत हें लगेच पटेल, आणि याच भीतीनें कोर्टांत कांहीं नोट्स् वाचण्यांत आल्या नसाव्यात असें दिसतें. तात्पर्य काय कीं, योग्य रीतीनें खटला चालवूं दिला असता तर फिर्यादी पक्षाची बाजू सपशेल ढासळली असती, हें आतां दाखविलेल्या गोष्टींवरून स्पष्ट दिसून येईल. आपल्या रिपोर्ट घेण्याच्या पद्धतीविषयीं व माझ्या भाषण करण्याच्या वेगाविषयीं श्री. गंगाधरराव यांनीं जीं हास्यास्पद विधानें केलीं, तीं पाहून कोणाहि Judicial mind ला फिर्यादी पक्षाचे रिपोर्ट कुचकामाचे आहेत, असें वाटल्यावांचून

राहणार नाहीं. तसेंच नेहमीच्या सभेतील भाषणाच्या गतीने बोलून साक्षीदार माझ्या भाषणाचे किती शब्द लिहून घेऊं शकतो, हे पाहण्याची मला संधि मिळाली असती, तर पोलीस अधिकाऱ्याचा खोटेपणा व हलकटपणा चागलाच चव्हाट्यावर आला असता. परतु अत्यंत आश्चर्याची व खेदाची गोष्ट ही कीं, माझ्या खटल्यात कमालीचे व्यत्यय आणण्यात आले. मातृभूमीच्या भक्तास दडपशाहीच्या वरवट्याखाली चिरडणाऱ्या सरकारवर मी येथे केलेल्या निषेधाचा काहीहि परिणाम होणार नाही, हे मी जाणून आहे. मी अद्यापहि असे म्हणतो की, हिन्दुस्थान हिन्दी लोकांकरिताच आहे व स्वराज्य हे आमचे ध्येय आहे. आजपर्यंत ब्रिटिश प्रधानानी व राज्यकर्त्यांनी केलेला स्वयंनिर्णयाचा पुकारा हे जर निव्वळ ढोंग असेल तर सरकारने माझे भाषण खुशाल राजद्रोही समजावे, पण माझा ईश्वराच्या न्यायावरील विश्वास मात्र कधीच ढळणार नाही."

इतर साक्षीदाराचीहि उलटतपासणी मला घ्यावयाची आहे, अशी डॉक्टरानीं मागणी केली. पण या शितावरून एकूण भाताची परीक्षा श्री. स्मेली यानी केली असावी! त्यानी या गोष्टीस नकार दिला व खटला दि. ५ ऑगस्टवर पुढे ढकलला.

दि. ५ ऑगस्टला खटला पुन्हा उभा राहिला. त्याच्या प्रारंभी डॉक्टरानीं आपले इंग्रजी लेखी समर्थन ( जबाब ) सादर केले व त्याच्या जोडीने आपली भूमिका स्पष्ट करणारे भाषणहि केले. त्याच्या वतीने अन्य विधिज्ञ नसल्याने हा सर्व कारभार एक हातीच होणे अपरिहार्य होते. त्या वेळच्या लेखी निवेदनात डॉक्टर म्हणतात कीं—

"[ १ ] माझी भाषणे ही कायद्याने प्रस्थापित झालेल्या ब्रिटिश राज्यशासनाविरुद्ध असंतोष, द्वेष व द्रोह उत्पन्न करणारी व हिन्दी व युरोपीय लोकात शत्रुभाव चेतविणारी असतात, या मजवरील आरोपांचे मीं स्पष्टीकरण करावे असे मला सांगण्यात आलें आहे. हिदुस्थानात एखाद्या हिदी माणसाच्या कृत्याचा न्यायनिवाडा करण्याचा आव एखाद्या परक्या राजसत्तेनें आणावा, हा मी माझा नि माझ्या महान् देशाचा अपमान समजतो.

[ २ ] हिदुस्थानात न्यायाधिष्ठित अशी एखादी राजसत्ता अस्तित्वात आहे असे मला वाटत नाही व तसे कोणी सांगूं लागल्यास मला आश्चर्यच वाटते! आमच्या येथे जी कांही आहे ती पाशवी शक्तीच्या बळावर लादलेली दंडुकेशाही! कायदा ही तिची केवळ बटीक असून न्यायासनें हीं तिचीं खेळणीं आहेत! या पृथ्वीच्या पाठीवर कोठेहि एखाद्या राजसत्तेला जगण्याचा अधिकार असेल तर तो लोकांच्या, लोकासाठीं व लोकांनीच चालविलेल्या राज्यशासनालाच. याव्यातीरिक्त आढळणाऱ्या राज्यपद्धति म्हणजे धूर्त लोकांनीं देशांची पद्धतशीर लूट करण्यासाठीं चालविलेली शुद्ध फसवणूक आहे.

[ ३ ] माझ्या देशबांधवांच्या मनांत आमच्या दीन मातृभूमीविषयींचा उत्कट भक्तिभाव प्रदीप्त करण्याचा व भारत हा भारतीयांचाच आहे, हें तत्त्व त्यांच्या अंतःकरणावर बिंबविण्याचा मीं प्रयत्न केला. एखाद्या भारतीयाला राजद्रोही झाल्यावांचून हीं राष्ट्रभक्तीचीं तत्त्वें प्रतिपादितां येत नसतील व भारतीय व युरोपीय लोकांत शत्रुभाव चेतविल्यावांचून धडधडीत सत्यें बोलण्याची त्याला चोरी वाटावी इतक्या थरापर्यंत जर गोष्टी गेल्या असतील, तर युरोपीय लोकांनीं व स्वतःला भारताचे राज्यकर्ते म्हणवून घेणाऱ्यांनीं आपलें चंबुगवाळें सफाईनें आवरण्याची घटिका आतां भरत आली आहे, असें खुशाल समजावें.

[ ४ ] माझीं भाषणें सामग्र्यानें व बिनचूकपणें टिपून घेतलीं नाहींत असें मला धडधडीत दिसतें आहे. आणि जें बोललों म्हणून दाखविण्यांत आलें आहे तें माझ्या भाषणाचें भोंगळ, तुटक व विपर्यस्त स्वरूप आहे. पण मला त्याची पर्वा नाहीं. राष्ट्राराष्ट्रांचे संबंध ज्या मूलभूत तत्त्वांवर अधिष्ठित असतात त्याच तत्त्वांधारें माझें इंग्लंडशीं व युरोपीय बांधवांशीं वर्तन होत आहे. मी जें जें बोललों तें तें माझ्या देशबांधवांचे अधिकार व स्वातंत्र्य यांच्या प्रस्थापनेसाठींच बोललों असून त्यांतील अक्षर नि अक्षराचें समर्थन करण्याची माझी सिद्धता आहे. ''

[ ( 1 ) I, the undersigned, make the following statement : I have been called upon to answer whether I have been delivering speeches which were calculated to excite disaffection and promote hatred and contempt against the British Govt. established by law and also to rouse feelings of enmity between Indians and Europeans. I take it as an insult to me and to my great country that a foreign power should pose to sit on judgement on the actions of an Indian in India.

( 2 ) In India, I do not think, there is any Govt. established by law and I am surprised to be told otherwise. What we have here is a super-imposed reign of terror with its foundations in brute force, where law is only its handmaid and the courts but its instruments. The only Govt. that has a right to exist in any part of the globe is a Govt. of the people, by the people and for the people; all other systems of Govt. that obtain are a huge fraud designed by adventurers for the pillage and plunder of the countries.

( 3 ) I tried to excite feelings of affection in my people for our poor Motherland; I tried to impress upon them the

principle that India is for Indians. If an Indian cannot preach these patriotic principles without being seditious, and cannot talk plain facts without rousing feelings of enmity between Indians and Europeans here, if things have come to this pass, Europeans and those who call themselves the Govt. of India should beware that the time for their graceful exit is passing.

( 4 ) I see before my eyes that my speeches have not been fully and accurately taken down, and what I find spoken to, is a broken indifferent and misrepresented accounts of what I spoke, but I do not care The principle governing the relations between the nation and nation, guides my conduct towards Great Britain and the Europeans. Anyway, whatever I have spoken, I have spoken in vindication of the rights and liberties of my countrymen and I am prepared to maintain every word of what I spoke If I cannot speak anything of what has been attributed to me, I am now prepared to uphold the whole of it and I say, all that is fully justified. "]

हे जळजळते निखारे हातीं पडल्यावर न्यायाधीशाच्या मुखातून असे उद्गार निघाले की, " त्याच्या मूळ भाषणापेक्षा त्याचे हे समर्थनच अधिक राजद्रोहपूर्ण आहे. " ( His satement is more seditious than his speech. ) यात आश्चर्य ते कोणते ! कारण या निवेदनात डॉक्टरानी आपले अंतरंगच, यत्किंचितहि आडपडदा न ठेवतां, व्यक्त केले होते. त्यांत स्पष्टता व रेखीवपणा होता व प्रतिपक्षावर झेपावतांना दिसणारा सिंहाचा आवेश व रौद्रता त्यांतून रसरसत होती. नागपूर कॉंग्रेसमध्ये स्वागतसमितीच्या ठरावाच्या रूपाने जो प्रजासत्ताक राज्याचा हुंकार दडपला गेला होता, त्याच प्रजासत्ताकाचा जयजयकार डॉक्टरांनीं अगदी मुक्तकंठाने इंग्रजाच्या अन्यायासनाला हादरे देत या वेळीं घुमविला होता.

हे लेखी निवेदन झाले ! पण त्यातील जणूं कमतरता भरून काढावी याच हेतूने त्यानी त्या ठिकाणी भाषण करून न्यायालयातील सारे वातावरण तप्त करून टाकले. त्यात जसा अपूर्व युक्तिवाद होता, तसाच निर्भयतेचा खणखणीत ध्वनिहि त्यांतून उमटला होता, हे सांगावयास नकोच.

सरकारनें पोलिसांव्यतिरिक्त दुसरा साक्षीदार आणला नाहीं व ते तर सरकारचे बगलबच्चे असल्यानें "त्यांना साक्षीदार म्हणण्यापेक्षां फिर्यादी म्हणणेंच अधिक युक्त दिसेल," अशा शब्दांत त्या भाषणाच्या आरंभींच सरकारची संभावना करून ते पुढें म्हणाले कीं, "........'हिंदुस्थान हें हिंदुस्थानच्या लोकांकरितांच आहे. आम्हांला हिंदुस्थानांत स्वराज्य पाहिजे,' हाच बहुधा माझ्या व्याख्यानाचा विषय असतो. पण फक्त एवढेंच सांगून काम भागत नाहीं. स्वराज्य कसें मिळवावयाचें व तें मिळाल्यानंतर कसें वागावयाचें, हेंहि लोकांना सांगावें लागतें. नाहीं तर 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायानें आमचे लोक इंग्रजांचें अनुकरण करावयाचे ! इंग्रज लोक तर स्वतःच्या देशांतील राज्यावर संतुष्ट न राहतां दुसऱ्या देशांवर धाड घालून, तेथील लोकांना आपले गुलाम करून, त्यांच्यावर राज्य करण्यास व स्वतःच्या स्वातंत्र्यावर गदा आली कीं, तलवार उपसून व रक्ताच्या नद्या वाहवून, त्या स्वातंत्र्याचें रक्षण करण्यास तत्पर असतात, हें परवांच्या महायुद्धावरून सर्वांना कळून चुकलें आहे. म्हणूनच आम्हांला लोकांना सांगावें लागतें कीं, बाबांनो, तुम्ही इंग्रजांच्या ह्या राक्षसी गुणांचें अनुकरण करूं नका ! निव्वळ शांततेच्या मार्गानेंच स्वराज्य मिळवा व स्वराज्य मिळाल्यानंतर दुसऱ्यांच्या देशांवर धाड न घालतां आपल्याच देशांत संतुष्ट रहा. ही गोष्ट लोकांच्या अंतःकरणांत ठसविण्याकरितां 'एका देशांतील लोकांनीं दुसऱ्या देशावर राज्य करणें अन्याय्य आहे' हें तत्त्व मी त्यांना समजावून देतों. त्या वेळेला प्रचलित राजकारणाशीं संबंध येतो. कारण आपल्या ह्या प्रियतम हिंदुस्थान देशावरच दुर्दैवानें परकीय इंग्रज लोक अन्यायानें राज्य करीत आहेत, हें आज आपण प्रत्यक्ष पाहतों. खरोखरच असा एखादा कायदा आहे काय, कीं ज्याच्या योगानें एका देशांतील लोकांना दुसऱ्या देशावर राज्य करण्याचा अधिकार पोहोंचतों ? पब्लिक प्रॉसिक्यूटर ! माझा हा आपणांला सवाल आहे. या प्रश्नाचें उत्तर आपण देऊं शकाल काय ? ही गोष्ट निसर्गाच्या विरुद्ध नाहीं काय ? आणि एका देशांतील लोकांना दुसऱ्या देशावर राज्य करण्याच्या अधिकार पोहोंचत नाहीं, हें तत्त्व जर खरोखरच सत्य आहे तर इंग्रजांना हिन्दुस्थानांतील लोकांना पायांखालीं तुडवून त्यांच्यावर राज्य करण्याचा अधिकार कोणीं दिला ? इंग्रज लोक या देशांतले नाहींत ना ? तर मग त्यांनीं या हिंदभूमीच्या पुत्रांना गुलाम बनवून, 'या हिंदुस्थानचे मालक आम्ही आहोंत' असें म्हणणें म्हणजे न्यायाचा, नीतीचा व धर्माचा खून करणें नव्हे का ?

"इंग्लंडला परतंत्र करून त्यावर राज्य करण्याची आम्हांला इच्छा नाहीं. परंतु ज्याप्रमाणें इंग्लंडचे लोक इंग्लंडांत व जर्मनीचे लोक जर्मनींत राज्य करतात, त्याचप्रमाणें आम्ही हिन्दुस्थानचे लोक हिन्दुस्थानांत मालक म्हणून राज्य करूं इच्छितों. इंग्रजी साम्राज्यांतराहून इंग्रजांच्याकायम गुलामगिरीचा छाप आपल्या

मस्तकावर मारून घेण्याची आमची इच्छा नाहीं. आम्हांला 'पूर्ण स्वातंत्र्य' ( Absolute Independece ) पाहिजे आहे व ते आम्ही मिळविल्याशिवाय राहणार नाही. आम्ही आमच्या देशात स्वतंत्र राहण्याची इच्छा करणे हे नीतीच्या कायद्याच्या विरुद्ध आहे काय ? माझी खात्री आहे की, कायदे हे नीतीची पायमल्ली करण्याकरिता केलेले नसून नीतीचे सरक्षण करावे, हाच त्याचा उद्देश असला पाहिजे. ''

डॉक्टरांचा खटला चालू असतां न्यायालय लोकानी फुलून जाई. डॉक्टराच्या आधीं ज्या एक-दोन जणावर खटले झाले होते, त्यानीं आपले समर्थन करावयालाच नकार दिलेला असल्याने त्या खटल्यातून 'शिक्षे'व्यतिरिक्त ऐकण्यासारखे काय असणार ? या वेळी मात्र सरकारची अपात्रता व असहकार–आंदोलनाचे उद्दिष्ट बाहेरील सभाप्रमाणेच न्यायालयातहि स्पष्ट करण्याचे धोरण डॉक्टरानीं स्वीकारले होते व तेथे जमणाऱ्या व त्याचीं भाषणे औत्सुक्याने ऐकणाऱ्या लोकानीच त्याच्या धोरणाची यथार्थता स्पष्ट केली होती. डॉक्टराच्या या पवित्र्यामुळे त्यांनी मैदानातील सभा प्रत्यक्ष न्यायालयात आणून गाजविल्या होत्या, असेच म्हणावे लागेल !

डॉक्टराचे स्वतःची भूमिका स्पष्ट करणारे असे वक्तव्य झाल्यावर पब्लिक प्रॉसिक्यूटर यांनी त्या दिवशीं थोडक्यात अशी मल्लीनाथी केली की, ... ... "डॉ. हेडगेवार यानीं आतां जे भाषण केले तें अत्यंत सरळ आहे, परंतु त्यांची सभेतील भाषापद्धति निराळीच असली पाहिजे. प्रतिवृत्त घेणाऱ्याचा अपसमज होण्याला काहीं कारण दिसत नाही.'' सरकारी विधिज्ञाच्या दृष्टीने हे भाषण अत्यत सरळ असल्याचा निर्वाळा मिळाला होता, तर यावरून त्याची बाहेरील इतर भाषणे कशा प्रकारचीं असू शकतील, याची अटकळ आतां वाचक सहज बांधूं शकतील !

दि. १९ ऑगस्टला डॉक्टरांवरील १०८ कलमाखालील जामिनाच्या खटल्याचा निर्णय लागावयाचा असल्यामुळे न्यायालयांत लोकांची एकच झिंमड उडाली ! दुपारीं १२–३० वाजतां स्मेलीने निर्णय सागितला तो असा की, "तुमचीं भाषणे राजद्रोही आहेत. तरी तुम्ही एक वर्षपर्यंत राजद्रोही भाषणे करणार नाहीं असे अभिवचन म्हणून हजार हजार रुपयाचे दोन जामीन व एक हजार रुपयाचा जातमुचलका लिहून द्या. '' हा निर्णय प्रकट होतांच डॉक्टरांनीं यासंबंधींचा आपला मानस प्रकट केला.

त्यांत ते म्हणाले कीं, "तुम्ही काहींहि निकाल द्या. मी निर्दोषी आहे, याविषयी माझी मनोदेवता मला ग्वाही देत आहे. सरकारच्या दुष्ट धोरणामुळे अगोदरच धुमसत असलेल्या आगींत या दडपशाहीच्या कृत्यांनीं तेल मात्र ओतलें जात आहे. या परकीय राज्यकर्त्यांना आपल्या पापाबद्दल पश्चात्ताप करण्याचा

प्रसंग लवकरच येईल, असा मला विश्वास वाटतो. सर्वसाक्षी परमेश्वराच्या न्यायीपणावर माझा पूर्ण भरंवसा आहे. यामुळें माझ्याजवळ मागितलेले जामीन देण्याचें मी साफ नाकारतों ! ”

डॉक्टरांचें बोलणें पूर्ण होतांच श्री. स्मेली यांनी डॉक्टरांना एक वर्ष सश्रम कारावासाची शिक्षा दिल्याचें घोषित केलें. त्या वेळीं डॉक्टरांनीं शिक्षेचें हंसतमुखानें स्वागत केलें व ते आरक्षाधिकाऱ्यांच्या सूचनेवरून कारागृहांत जाण्यासाठीं तेथून बाहेर पडले. ते बाहेर येतांच त्यांच्या सभोंवतीं त्यांच्या मित्रांचा व जनतेचा गराडा पडला व त्यांच्या गळ्यांत नगर काँग्रेस समितीच्या वतीनें रा. गोखले यांनीं पुष्पहार घातला. त्यांच्या मागोमाग श्री. विश्वनाथराव केळकर, दामूपंत देशमुख, हरकरे व इतर अनेक जणांनीं त्यांना पुष्पमाला समर्पण करून त्यांच्या नांवानें जयजयकार केला. टांग्यांत बसण्यापूर्वीं रामपायलीहून आलेले चुलते आबाजी हेडगेवार, थोरले बंधु सीतारामबुवा व डॉ. मुंजे यांना डॉक्टरांनीं लवून नमस्कार केला व बॅरिस्टर मोरूभाऊ अभ्यंकर, समीमुल्लाखान, श्री. अळेकर, वैद्य, मंडलेकर, हरकरे वगैरे मित्रांना भेटून सभोंवतींच्या सर्वांचा लहानसें भाषण करून त्यांनीं निरोप घेतला. ते म्हणाले, “ मीं या राजद्रोहाच्या खटल्यांत ‘ डिफेन्स ’ दिला होता. हल्लीं जो ‘ डिफेन्स ’ देईल, तो देशद्रोही अशी कित्येकांची समजूत झाली आहे. परंतु, आपण इतकी मंडळी या प्रसंगीं येथें जमलांत यावरून आपली तरी तशी समजूत दिसत नाहीं. आपल्यावर खटला झाला असतां, आपण आपला बचाव न करतां ढेकणासारखे चिरडून मरणें मला योग्य वाटत नाहीं. प्रतिपक्षाचा खोडसाळपणा आपण जगाला अवश्य दाखवून दिला पाहिजे. तसें करण्यांतहि देशसेवा आहे. उलट ‘ डिफेन्स ’ न करणें म्हणजेच आत्मघातकीपणा होय ! तुम्हांला न आवडेल तर डिफेन्स देऊं नका. पण डिफेन्स देणाऱ्याला कमी योग्यतेचा समजणें चुकीचें होईल. देशकार्य करीत असतां, तुरुंगांतच काय, पण काळ्या पाण्यावर जाण्यास किंवा फांसावर लटकण्यासहि आपण सिद्ध असलें पाहिजे. पण तुरुंगांत जाणें म्हणजेच स्वर्ग आहे, तीच स्वातंत्र्यप्राप्ति आहे, अशी आपली दिशाभूल करून घेऊं नका. नुसते तुरुंग भरून टाकल्यानें आपणांस स्वराज्य किंवा स्वतंत्रता मिळेल असें समजूं नका. तुरुंगांत न जातां बाहेरसुद्धां पुष्कळ देशकार्य करतां येतें हें लक्षांत ठेवा. मी एक वर्षानें परत येईन. तोंपर्यंत देशांतील चळवळी मला कळणार नाहींत, परंतु हिंदुस्थानला पूर्ण स्वातंत्र्य मिळविण्याची खटपट सुरू होईल, अशी मला खात्री वाटते. हिन्दुस्थान आतां परकी सत्तेखालीं राहणें शक्य नाहीं. त्याला इतःपर गुलामगिरींत ठेवतां येणार नाहीं. आपणां सर्वांचे मनःपूर्वक आभार मानून एक वर्षाकरितां आपला निरोप घेतों. ” असें म्हणत डॉक्टरांनीं हात जोडले व सभोंवतींच्या जमावांतून टाळ्यांचा कडकडाट होऊन ‘ वंदे मातरम् ’ ची घोषणा झाली !

डॉक्टर सस्मित मुद्रेनें टांग्यांत चढले व टांगा सुरू झाला. तो टांगा डोळ्यांआड होईपर्यंत सद्‌गदित झालेल्या लोकांतून अखंड घोषणा उठत होत्या—

भारतमाता की जय !
डॉ. हेडगेवार की जय ! !

* * *

## ९ : नागपूर कारागृहांत

डॉक्टर शुक्रवार दि. १९ ऑगस्ट १९२१ला कारागृहांत गेले. त्याच दिवशीं सायंकाळीं ' टाउन हॉल 'च्या पटांगणांत बॅ. गोविंदराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखालीं डॉक्टरांच्या अभिनंदनासाठीं प्रकट सभा घेण्यांत आली. त्यांत डॉ. मुंजे, श्री. नारायणराव अळेकर, श्री. हरकरे व श्री. विश्वनाथराव केळकर यांचीं हृदयस्पर्शी भाषणें झालीं. श्री. अळेकर यांनीं ' डॉक्टर हेडगेवार यांची कळकळ व स्वार्थत्याग या गुणांमुळें उदयोन्मुख पिढींत तेच नागपूरचे पुढारी होतील ' असा आशावाद प्रकट केला होता, तर श्री. हरकरे यांनीं डॉक्टरांच्या निर्भेळ स्वातंत्र्यावरील अढळ निष्ठेची मुक्तकंठानें प्रशंसा केली होती. सभेच्या शेवटीं श्री. विश्वनाथराव केळकर, डॉक्टरांनीं कारागृहांत जातां जातां दिलेला संदेश लोकांना विदित करतांना म्हणाले कीं, "...' कार्य करीत असतां कारागृहांत जाणें अवश्यच झालें तर जरूर जा; पण नुसतें तुरुंगांत जाणें हेंच ध्येय ठेवूं नका—देशकार्य हें ध्येय ठेवा, ' असा डॉ. हेडगेवार यांचा आपणांस संदेश आहे."

या शिक्षेनंतर नागपूरच्या साप्ताहिक ' महाराष्ट्र ' वृत्तपत्राच्या दि. २४ ऑगस्टच्या अंकांत डॉक्टरांचे एक निकटवर्ती स्नेही संपादक श्री. गोपाळराव ओगले यांनींहि त्यांचें स्वतंत्रपणें अभिनंदन केलें होतें. डॉक्टर हे त्यांच्याकडे नित्य जाणारे व अगदीं नेहमींच्याच बैठकींतील असल्यानें त्या अभिनंदनपर लेखांत प्रकट झालेले विचार हे प्रमाणभूत मानण्याच्या तोलाचे असणार, हें सांगावयास नकोच. त्यांतील एक विचार ' डॉक्टरांनीं कारावास कां पत्करला ? ' यासंबंधींचा असून तो त्या वेळच्या डॉक्टरांच्या भूमिकेवर उत्तम प्रकाश पाडणारा आहे. श्री. गोपाळराव लिहितात कीं, " डॉ. हेडगेवार हे आपल्या सदसद्विवेकबुद्धीच्या विरुद्ध तुरुंगांत गेले. ' हा तुरुंगांत जावयास भ्याला ' असा जनापवाद आपणांवर येऊं नये म्हणून त्यांस तुरुंगांत जाणें अवश्य वाटलें. जनापवाद हा निर्घृण दुर्वासऋषि आहे. तो मोठमोठ्यांचें सत्त्व कसोटीस लावतो. त्याला भिऊनच श्रीरामचंद्रानें ' सीता निष्पाप आहे ' हें माहीत असूनहि तिचा त्याग केला ! त्याप्रमाणेंच ' तुरुंगांत जाऊन स्वस्थ बसण्यापेक्षां बाहेर राहूनच मी जास्त काम करीन ' अशी डॉक्टर हेडगेवार यांच्या मनाची खात्री असतांहि लोकापवाद टाळण्यासाठीं त्यांस तुरुंगांत जावें लागलें ! ' लोकापवादो बलवान्मतो

मे ।' हे श्रीरामचंद्राचें वाक्य सर्व पुढाऱ्यांस अनेकवार आचरणात आणावे लागते. जाणूनबुजून पत्करलेल्या या तुरुंगवासाच्या स्वार्थत्यागाने तावूनसुलाखून बाहेर पडलेले डॉक्टर हेडगेवार हे नागपुरातील उदयोन्मुख पिढीचे नेतृत्व स्वीकारण्यास व आपलें निर्भेळ स्वातंत्र्याचे ध्येय प्रतिपादण्यास लवकरच, कदाचित् वर्ष संपण्यापूर्वीच तुरुंगातून परत येतील, अशी आम्हास आशा वाटते."

डॉक्टर एक वर्षाच्या सश्रम कारावासासाठी या वेळी अजनी कारागृहात आले होते, तरी त्यांना कारागृहाच्या वातावरणात नवीनता कांहीच नव्हती. कारण कलकत्त्याला असताना केव्हा केव्हां आरक्षकांच्या चौकीवर काही काळ बसावे लागे व एक-दोन वेळा तर चार-चार दिवसाचा कोठडीतील पाहुणचार त्यानी घेतलेला होता. हेर व आरक्षक याची भीति अतिपरिचयामुळे लहानपणीच नाहीशी झाली होती व कष्टाविषयीं म्हणाल तर त्या दोघाची मैत्रीहि फार दिवसाची व घनिष्ठ अशी होती, हे सागावयास नकोच !

कारागृहात प्रवेश करताना त्या वेळच्या नियमानुसार बंद्याला जानवे असल्यास ते शिक्षेच्या काळापुरते काढून ठेवावे लागे. तो नियम डॉक्टराना दाखविण्यात आला, तेव्हां त्यानी जानवे काढण्याला स्पष्ट शब्दात नकार दिला. त्या नकारामागील कठोर निश्चय तेथील अधिकाऱ्याना सहज जाणवण्यासारखा असल्याने त्यांनी समंजसपणाने अट लादण्याचा प्रयत्न केला नाहीं. कारागृहाचा त्या वेळचा पर्यवेक्षक फोर्ड हा आयरिश होता व आंतून इंग्रजाचा द्वेष्टा होता. त्यामुळे त्याला हा डॉक्टराचा स्वाभिमान आतून भूषणावह वाटला असल्यास नवल नव्हते. १९२० नंतर अनेक कारणांनी कारागृहे भरूं लागलीं व राजकैदी म्हणून सत्याग्रहीना मान्यता मिळू लागल्यावर हा अपमानास्पद नियम आपोआपच काढला गेला.

डॉक्टर कारागृहांत गेले तत्पूर्वी एक महिना श्री. रघुनाथ रामचद्र तथा कर्मवीर बापूजी पाठक हे सरकारी दमनचक्राने तेथे येऊन पोचले होते. त्यांच्या मागोमाग पं. राधामोहन गोकुळजी, डॉक्टर व बालवीर श्री. बाबूराव हरकरे हे कारागृहांत आले. थोड्याच दिवसांनी खिलाफत चळवळीतून शिक्षा झालेला काझी इनामुल्ला या नावाचा एक वीस वर्षांचा तरुण या चौघांच्या कोठडीतच आणण्यांत आला. हा इंटरमध्ये शिकणारा उत्तरप्रदेशांतील विद्यार्थी होता व वृत्तीने कडवा मुसलमान म्हणून त्याचे वर्णन करावें लागेल.

या एकत्रित आलेल्या मंडळींना प्रारंभीं निरनिराळीं कामें मिळालीं होतीं. श्री. पाठक ह्यांना कांहीं दिवस दळत बसावें लागले होते, तर डॉक्टरांना हाती बनावटीच्या कागदाला सफाई आणण्याचें काम करावें लागले. हे काम चालू असतां विश्वनाथराव केळकर व चोरघडे ह्या दोघांनीं त्यांची कारागृहात भेट मिळविली होती. त्या भेटीच्या प्रसिद्ध झालेल्या वृत्तान्तांत 'पेपर पॉलिशिंग' मुळें

डॉक्टरांच्या हाताला फोड आल्याकारणानें त्यांना तूर्त 'पेपर पल्प'चें म्हणजे कागदाचा रांधा बनविण्याचें काम देण्यांत आल्याचें म्हटलें होतें. पण लवकरच या पांचहि जणांवर पुस्तकबांधणीचें काम सोंपविण्यांत आलें.

या सर्वांच्या कल्पना, निष्ठा व स्वभाव यांचा विचार करतां त्यांच्या समवायांतून खटके व करमणूक उत्पन्न व्हावी, अशीच स्थिति होती. श्री. पाठक हे वकील, पण त्यांचें वळण बाळबोध व सात्त्विक. बालवीर हरकरे हे अगदीं तरुण व वीरत्वाला साजेसे उग्र होते, तर पंडितजी हे कट्टर आर्यसमाजी व आक्रमक हिंदुत्वाचे पुरस्कर्ते होते. इनामुल्ला याचें चढाईखोर धर्मप्रेम इतकें जाणवे कीं, त्याला बाकीचे चौघे जण सरळ 'उल्लू' म्हणूनच संबोधीत असत ! इनामुल्ला कोठडींत आणला गेला व दुसऱ्या दिवशीं कोंबड्याची आरव ऐकूं येण्याच्या आंतच ही स्वारी जी उठली ती कुराणशरीफमधील कलमें मोठमोठ्यानें म्हणूं लागली ! एक दोन दिवस पाठक, हरकरे आदि मंडळींनीं त्याला समजुतीनें सांगून पाहिलें कीं, "तूं कलमें पढतोस यांत वावगें नाहीं. पण इतरांची झोप-मोड होईल इतक्या मोठ्यानें म्हणूं नको म्हणजे झालें." पण विवेक असता तर त्याला 'उल्लू' म्हणण्याचा प्रसंगच कां येता ? त्यानें तोच क्रम चालू ठेवला. तेव्हां पं. राधामोहन दुसऱ्या दिवशीं पहाटे त्याच्याच वेळांत श्रीतुलसीदासांच्या रामायणांतील चौपाया खड्या आवाजांत म्हणूं लागले ! त्यांच्या म्हणण्याचा घणघणाट असा होता कीं, त्यांच्यापुढें इनामुल्लाचा आवाज म्हणजे नगाऱ्यापुढें टिमकी ! जो इनामुल्ला सामोपचारानें वळला नाहीं, त्याला ही आर्यसमाजी रामायणाची झणझणीत बुटी मात्र चांगलीच लागू पडली; व पुन्हा पहाटेच्या निवांतपणांतील साखरझोप घेणें त्या कोठडींतील सर्वांनाच शक्य झालें.

इनामुल्लाच्या वर्तनावरून मुसलमान समाजांत खिलाफत चळवळीमुळें कोणत्या तऱ्हेची वृत्ति निर्माण होत होती, याची तेव्हांच कल्पना येई. तो रंगांत येऊन डॉक्टर व पाठकजी यांनादेखील मुसलमान धर्माचे गोडवे ऐकवूं लागला. पंडितजींजवळ तो विषय काढणें अवघडच होतें. म्हणून त्याचा प्रयत्न या दोघांवर चाले. तो कांहीं सांगूं लागला कीं, डॉक्टर प्रसन्नतेनें हंसत तर पाठकजी त्याला सांगत कीं, जो काय प्रयत्न करायचा तो त्या बालवीरावर कर ! कारण त्यांना पक्कें माहीत होतें कीं, त्याच्याजवळ असा विषय काढणें म्हणजे आगेमोहोळावर दगड मारण्यांतलाच प्रकार होता !

डॉक्टर सर्वांजवळच खेळीमेळीनें वागत. ते त्या वेळीं कॉंग्रेसच्या प्रांतिक समितीचे सदस्य होते व असहकार आंदोलनांतून कारागृहांत आले होते. तरीहि कांहीं तरी बखेडे निर्माण करून वा कारण काढून कारागृहांतील काम बंद करण्याकडे त्यांचा कल नव्हता. दि. १३ एप्रिलला जालियनवालाबाग-दिन येत होता. तेव्हां त्या दिवशीं पांचहि जणांनीं काम करूं नये, असा विषय निघाला.

डॉक्टरांची या कल्पनेला हार्दिक संमति नव्हती म्हणून ते मोघमांत 'पाहूं' म्हणाले. इनामुल्लाला मात्र खिलाफतीव्यतिरिक्त कशाशीच सोयरसुतक नव्हते. पण त्याने डॉक्टरांचा कल पाहून हिकमतीने उत्तर दिले की, "डॉक्टर काम थांबवणार असतील तर मी थाबवीन!" जालियनवाला बागेतील राक्षसी घटनेच्या केवळ स्मरणाने डॉक्टरांचे मन संतप्त होत असले तरी कारागृहाच्या चार भितीआड पुस्तकबाधणीचे काम थाबवून तो संताप व्यक्त करण्याचा प्रकार डॉक्टरांना अगदीच गौण व अनावश्यक वाटत होता. पण इनामुल्लाने आपल्या-आड दडून, आपल्या मनातील जालियनवाला बागेसंबंधींची उपेक्षा दडवावी, हे डॉक्टराना रुचले नाहीं. त्यानीं काम थाबविण्यास होकार दिला. तेव्हा निरुपाय होऊन इनामुल्लाला सहभागी व्हावे लागले व त्याची अल्पशी शिक्षाहि भोगावी लागली. त्यानतर डॉक्टरानी त्याला जणूं तोंडघशी पाडले, असा भाव त्याच्या बोलण्याचालण्यांतून उमटल्यावाचून राहिला नाहीं.

डॉक्टर कारागृहात गेले त्या वेळीच डॉ. नीळकंठराव जठार हे बंदीपाल म्हणून नियुक्त झाले. अगदी नवीन असल्याने त्याना कामाची कल्पना नव्हती. तेव्हा डॉक्टरांनीं परिचय झाल्यावर त्याना पुस्तकाच्या आधारे करावयाच्या कामाची माहिती करून दिली. पण असे साहाय्य करताना 'स्वतःच्या पोळीवर तूप ओढून घेण्याची यत्किंचितहि छटा त्याच्या वागण्या-बोलण्यात नव्हती,' असे कै. कर्नल सर नीळकठराव जठार सागत असत. एवढेच नव्हे तर त्या ठिकाणच्या डॉक्टराच्या भारदस्त व सौजन्यपूर्ण वागणुकीचा परिणाम कर्नल जठार याच्याच शब्दात सागावयाचा तर असा की, "डॉक्टराची कारागृहातून सुटका झाल्यावर आम्ही सरकारी नोकर असूनहि स्नेहामुळे महालांतील त्यांच्या घरीं जात असूं. गावात गेल्यावर त्यांच्याकडे जावे अशी ओढ वाटे."

या वेळी सर्वांप्रमाणेच असहकार आदोलनातील लोकानाहि कारागृहांतील कैद्यांचाच पोषाख घालावा लागे व भाकरी, डाळ व भाजी असे साधेच जेवण मिळे. राजकीय कैदी म्हणून स्वतंत्र वर्ग व स्वतंत्र उत्तम व्यवस्था ही हुतात्मा यतीन्द्रनाथ दास या क्रातिकारकाच्या पुढे झालेल्या दिव्य बलिदानांतून जन्मास आली. तोवर अट्टल गुन्हेगार व देशभक्त हे एकाच माळेचे मणी गणले जात! कागदाचे गठ्ठे बाधणें, पुस्तकाची बांधणी करणे हीं कामे करून जो वेळ उरे, त्यांत डॉक्टर टकळीने सूत काढीत व कधी महाभारत वाचीत. त्या वेळी त्याच्याजवळ शातिपर्व होते असे सांगतात.

पुस्तक-बांधणीचे काम दोन गटांनीं चाले. डॉक्टर व पाठक हे एकत्र काम करीत व उरलेल्या तिघांचा स्वतंत्र गट होता. अर्थात् कोठडींत जवळ जवळ हे काम चाले. एकदा चिक्की लावून नुकत्याच बांधून झालेल्या पुस्तकावर दाब पडावा म्हणून इनामुल्लाने हरकरे याच्याजवळील तुलसी रामायणाचा ग्रंथ त्यावर ठेवला

व त्या रामायणावर वजन म्हणून स्वतः उभा राहिला. पुस्तकें नीट चिकटावींत म्हणून लागणारी यांत्रिक व्यवस्था त्या ठिकाणीं नसल्यानें इनामुल्लानें एवढा उपद्व्याप केला होता. पण रामायणाच्या पुस्तकावर कोणत्याहि कारणानें उभें राहणें हें डॉक्टरांना सहन होणें अशक्य होतें. ते त्या प्रकारानें हरकरे यांच्यावर रागावलेहि.

त्यानंतर थोडे दिवस गेले. डॉक्टरांच्या दंडाला त्या वेळीं कांहीं कारणानें सूज आली होती. म्हणून रोज रात्रीं कोठडींतील कोपऱ्यांत असलेल्या मेजावरील दिव्यावर हातरुमालाची घडी तापवून ते शेकत बसत. एके दिवशीं नित्यक्रमा-प्रमाणें ते शेकत बसले असतां त्यांच्यापासून पंधरा-वीस फुटांवर असलेल्या निजावयाच्या ओट्यावर हरकरे व इनामुल्ला हे बसले होते. त्यांच्या शेजारींच कुराण पडलें होतें. त्या दिवशीं इनामुल्लानें जरा तोऱ्यांतच डॉक्टरांना प्रश्न केला कीं, " कुराणापेक्षांहि उच्च स्थानावर बसलांत हा त्याचा अपमान नाहीं काय ? " त्यावर डॉक्टर म्हणाले, " मी कोपऱ्यांत बसलों आहें व तुझें कुराण आहे येथून पंधरा-वीस फुटांवर ! तेव्हां त्याचा माझ्याशीं काय संबंध ? शिवाय माझ्या मनांत तुझ्या धर्मग्रंथाची अप्रतिष्ठा करण्याचें नाहीं; मग तुझ्या मनांत असें कसें आलें ? मी तर येथें नेहमींच बसतों. " त्या दिवशीं हा प्रकार एवढ्यावरच थांबला.

या घटनेच्या दुसऱ्या दिवशीं हरकरे, राधामोहन व इनामुल्ला काम करीत बसले असतांना तेंच रामायणाचें जाडें पुस्तक पायाखालीं घेण्याकरितां इनामुल्ला मागूं लागला. तेव्हां हरकरे यांनीं बजावलें कीं, " आतां तूं माझें पुस्तक पायांखालीं घेऊं शकत नाहींस. तो माझा धार्मिक ग्रंथ आहे ! "

" कालपर्यंत नव्हता व आजच कसा ? " असा तिढा प्रश्न इमुनाल्लानें केला.

त्यावर हरकरे उत्तरले कीं, " तुझ्या मनांत वेड आलें आहे तर आमची नीति ' शठे शाठ्यं समाचरेत् ' असें सांगते. वास्तविक आमचा धर्म पुस्तकांत नाहीं. "

या घटनेनंतर दोन दिवसांनीं इनामुल्ला विश्रांतीच्या वेळांत झोपण्याच्या कठड्यावर बसून हरकरे यांना सुचवूं लागला कीं, " तुम्ही आमच्या खिलाफत चळवळीला साहाय्य करतां म्हणून आम्ही तुमच्या असहकार चळवळीला साहाय्य करतों. तसेंच गोरक्षणाचेंहि आहे. गोवध करूं नका असें जोंवर तुम्ही आम्हांला आर्जवून सांगतां तोंवर आम्ही ' कदाचित् ' करणार नाहीं. मगर जब आप उस गोवध बंदीपर जोर देंगे, तब फिर गौ काटना यह हमारा फर्ज हो जाता ! "

हे प्रलाप ऐकून हरकरे इतके भडकले कीं, त्यांनीं त्याची दाढी धरून त्याच्या श्रीमुखांत भडकावली ! ' हें काय केलेंत ? ' असें म्हणत डॉक्टर पुढें झाले म्हणूनच त्याची संभावना केवळ एका थपडेवर भागली ! खिलाफतीचें

अंतरंग डॉक्टरांनीं आधींच ओळखले होतें व मुसलमानांची राष्ट्रविरोधी चाल हेरली होती. त्यामुळें हीं इनामुल्लाची मुक्ताफळे ऐकून डॉक्टरांना नवल वाटले नाही. उलट आपला कयास कसा तंतोतंत खरा ठरत आहे, याची प्रत्यक्ष साक्षच त्यांना तेथे पटली.

दुसऱ्याच दिवशीं इनामुल्लाला तेथून हलविण्यात आले व ही कोठडीतील डॉक्टरांची करमणूक संपली! अधून मधून रात्रीच्या गप्पा चालत व भावी कालाविषयीहि चर्चा निघे. त्या गप्पात डॉक्टरांच्या बोलण्यांत नेहमी एक सूर निघे. तो असा की, "माझ्या एकट्याचा बॉम्ब आज पुरा पडणार नाही व सामूहिक उठाव शक्य दिसत नाही. म्हणून तूर्त कारागृहांत आलो आहे." १९२२ मध्ये प्रथमतः कर्मवीर पाठक यांची सुटका झाली व त्याच्यामागोमाग इतरहि कारागृहांतून मुक्त झाले.

डॉक्टरांची मुक्तता दि. १२ जुलै १९२२ ला सकाळी करण्यात आली. ते बाहेर पडताना जेव्हा आपला घरगुती पोषाख चढवूं लागले, तेव्हा गळ्या-पर्यंतच्या गुंडयांचा कोट व अंगरखा त्याना घट्ट वाटूं लागला. डॉक्टराचे वजन पंचवीस पौंड वाढले होते, त्याचा हा स्वाभाविक परिणाम होता. कोणत्याहि परिस्थितीत हंसतमुख राहण्याच्या त्यांच्या स्वभावामुळेच ही कारागृहयात्रा त्याना मानवली होती, यात शंका नाहीं.

डॉक्टर कारागृहांतून बाहेर पडले तेव्हां मुसळधार पाऊस पडत होता. पण तशाहि स्थितींत डॉ. मुंजे, डॉ. परांजपे, डॉ. ना. भा. खरे व अनेक मित्रमंडळी बाहेर वाट पाहत होती. त्यांनीं अर्पण केलेल्या पुष्पहाराचा सहर्ष स्वीकार करून डॉक्टर सर्वांबरोबर घरीं येण्यास निघाले. येताना वाटेतहि ठिक-ठिकाणीं त्याना थांबवून सत्कार व पानसुपाऱ्या झाल्या. त्याच दिवशींच्या 'महाराष्ट्र'ने छापता छापता डॉक्टरांच्या स्वागताचीहि संधि साधली होती. 'महाराष्ट्र'ने म्हटले होते की:, "डॉक्टर हेडगेवार यांची स्वदेशभक्ति व त्याचे राष्ट्रकार्यावरील प्रेम व कळकळ याविषयीं कोणासच शंका नव्हती. परंतु हे सर्व गुण स्वार्थत्यागाच्या मुशीत तावूनसुलाखून उज्ज्वल होत्साते बाहेर पडले आहेत. त्यांच्या या गुणांचा यापुढे राष्ट्रकार्यास शतपट अधिक उपयोग होवो, असे आम्ही मनःपूर्वक चिंतितो."

त्याच दिवशीं सायंकाळीं चिटणीस उद्यानाच्या पटांगणांत 'स्वागत-सभा' होणार असल्याची द्वाही सर्व नागपूरभर फिरविण्यात आली. या वेळीच पं. मोतीलाल नेहरू, श्री. विठ्ठलभाई पटेल, हकीम अजमलखान, डॉ. अन्सारी, श्री. राजगोपालाचारी, श्री. कस्तुरीरंग अय्यंगार आदि मंडळी कॉंग्रेस समितीच्या कामासाठीं तेथे आलेली होती व ते सर्व जण 'स्वागतसभे'ला येणार असल्याचे प्रकटहि करण्यांत आले होतें.

पण सायंकाळींहि पावसानें कटकट चालूच ठेवल्यानें आयत्या वेळीं व्यंकटेश नाट्यगृहांत सभा न्यावी लागली. नाट्यगृह नागरिकांनीं फुलून गेलें होतें. डॉ. ना. भा. खरे यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारल्यावर डॉक्टरांच्या स्वागतपर ठराव सभेपुढें मांडण्यांत येऊन टाळ्यांच्या गजरांत तो संमत झाला. यानंतर हकीम अजमलखान व पं. नेहरू यांचीं चालू परिस्थितीसंबंधीं भाषणें झाल्यावर डॉक्टर बोलावयास उभे राहिले. त्यांचें भाषण छोटें व मार्मिक असें झालें. ते म्हणाले कीं, "एक वर्ष सरकारच्या घरीं पाहुणा म्हणून राहिल्यानें माझी योग्यता पूर्वींपेक्षां वाढलेली नाहीं. तथापि वाढली असेल तर त्याबद्दल सरकारचेंच आभार मानले पाहिजेत. देशाचें ध्येय सर्वांत उच्चतम असेंच ठेवलें पाहिजे. 'निर्भेळ स्वातंत्र्या'हून कमी दर्जाचें ध्येय ठेवणें मुळींच रास्त ठरणार नाहीं. मार्ग कोणते असावे हें इतिहासज्ञ श्रोत्यांस सांगणें म्हणजे त्यांचा उपमर्द करणें आहे. स्वातंत्र्यासाठीं झगडण्यांत मरण आलें तरी त्याची फिकीर करतां कामा नये. हा झगडा उच्च ध्येयावर दृष्टि ठेवून व डोकें शांत ठेवून चालविला पाहिजे."

नागपूरनंतर यवतमाळ, वणी, आर्वी, वाढोणा, मोहोपा, आदि अनेक ठिकाणच्या मित्रांनीं डॉक्टरांना पाचारण करून त्यांच्या मिरवणुका व सत्कार-समारंभ घडविले व पंचारती करून खादीचे पोषाख समर्पण केले. यवतमाळचा सत्कार-समारंभ लोकनायक बापूजी अणे यांच्या अध्यक्षतेखालीं झाला होता. जगाच्या दृष्टीनें डॉक्टर 'मोकळे' झाले होते. पण त्यांचें त्या वेळचें अंतरंग पाहूं जातां गुंतागुंतीच्या परिस्थितींतून मार्ग कोणता काढावा, या विचारांत ते 'गुंतले' होते असें दिसे!

त्यांच्या गळ्यांत असे भरघोस हार पडत असतां त्या वर वर दिसणाऱ्या उत्साहामागें त्यांना सचिंत करणारें असें काय दिसूं लागलें असावें?

★ ★ ★

डॉक्टर १९२२ च्या दि. १२ जुलैला कारागृहातून बाहेर पडले. तत्पूर्वीच असहकार आंदोलन बंद होऊन महात्माजीना अटक झाली व त्या आंदोलनांत भावनेच्या भरात पडलेले लोक भ्रांत स्थितीत वावरत होते. फेब्रुवारी दि. ५ ला उत्तर प्रदेशांतील चौरीचुरा येथे चवताळलेल्या लोकांनीं चौकीवर चाल करून एकवीस आरक्षक व एक अधिकारी याना चौकीसह भस्मसात् केले. या घटनेने व्यथित होऊन म. गांधीनी दि. १२ फेब्रुवारीला असहकार आंदोलन स्थगित केलेले दिसले, तरी हे कारण अगदीं तात्कालिक व दुय्यम प्रतीचे होते. असहकाराचें आंदोलन, अहिंसेचे पथ्य कांटेकोरपणाने पाळून चालवावयास सर्वसामान्य जनतेत जी पात्रता व अनुशासन पाहिजे, त्याचाच अभाव तत्पूर्वींहि प्रकर्षाने जाणवूं लागला होता. अशा स्थितीत या घटनेच्या काडीचा आधार बुडत्या आंदोलनाने घेतला होता असे स्पष्ट दिसते. त्या वेळीं महात्माजी लिहितात कीं, "केवळ ज्याच्या बळावर सामूहिक असहकाराचे समर्थन करता येईल असे सत्यपूर्ण व अहिंसामय वातावरण अजून हिंदुस्थानात नाहीं असे परमेश्वराने तिसऱ्या वेळा बजावले आहे." ("... He has warned me the third time that there is not as yet in India the truthful and non-violent atmosphere which and which alone can justify mass disobedience.")

वीस सहस्र लोकानी या आंदोलनात भाग घेतला होता व त्यांतील सर्वसामान्य थरातील लोकांना तर 'एक वर्षांत स्वराज्य' हीच घोषणा प्रेरक ठरली होती. पण असे आंदोलन बंद झाल्याने शहरातील विजेचा प्रवाह एकदम जावा किंवा भर रंगात आलेला चित्रपट एकदम तुटावा तशी स्थिति होऊन जे ते आपापल्या स्वभावानुसार संतापले वा निराश झाले. पं. नेहरू १९२३ मध्यें कारागृहांतून बाहेर आल्यावर या विपरीत परिस्थितीचे वर्णन करतांना म्हणतात कीं, "…. ध्येयवादाचा पत्ताच नव्हता. मात्र त्या जागीं, ज्यामुळें खऱ्या भावनाशील व्यक्तीला 'राजकारण' हा शब्द तिरस्करणीय वाटूं लागावा अशीं कारस्थाने सुरू होतीं व कॉंग्रेसपक्षाची यंत्रणा हस्तगत करण्यासाठी विविध गट उभे ठाकले होते." अशा स्थितींत शाळा सोडलेले विद्यार्थी पुन्हा शाळकरी झाले असले व वकीलवर्गाने कज्जेदलाली नव्या उत्साहाने सुरू केली असली तर नवल कोणतें !

पण राष्ट्रीय उत्थानाच्या आंदोलनांतील अंतिम यश हेंच काय तें संपूर्ण यश या कोटींत बसणारें असतें. तोंवर प्रयत्नशील कोळ्याप्रमाणें वारंवार प्रयत्नांचें जाळें पसरीत राहणें व तें तुटल्यास पुन्हा विणून पुन्हा पसरणें असा चिवट कर्मयोगच निष्ठेनें आचरावा लागतो. अर्थात् मध्यंतरींचे सर्व प्रयत्न विसकटले जात असले तरी त्यांतूनहि अनुभवाची जोड मिळून पुढील प्रयत्नांना तेज चढत असतें. असेच कांहीं अनुभव या आंदोलनानें दिले होते व ते घेऊनच डॉक्टरांचीं यापुढील पावलें पडावयाचीं होतीं.

हें १९२१ सालचें आंदोलन सरकारविरोधी म्हणून उभारण्यांत आलें असलें तरी त्याहून, 'हिंदु-मुसलमान ऐक्य' हा त्यामागील म. गांधींचा हेतु अधिक प्रभावी होता. पण हें आंदोलन सुरू होण्यापूर्वींपासूनच खिलाफत चळवळीचे धागेदोरे, इंग्रजांना घालवून त्या जागीं अफगाणिस्थानच्या अमीराला स्थानापन्न करण्याच्या दिशेनें विणले जात होते व त्या विणकामाची महात्माजींना नुसती कल्पना होती एवढेंच नव्हे, तर त्या कामांत ते सहभागीहि झाले होते, असें श्रद्धेय स्वामी श्रद्धानंदांनीं पुढें उघडपणें घोषित केलें. हें कारस्थान हिंदुस्थानच्या सुदैवानें त्या वेळीं सफल झालें नसलें तरी त्या कारस्थानामागें खिलाफत चळवळीच्या पुढाऱ्यांनीं जागृत मुसलमानांची अराष्ट्रीय आकांक्षांवर आधारलेली जी संघटना उभी केली, ती मात्र देशाला कायमचीच भोवली, हें विसरून चालणार नाहीं. कांहींच्या मतें हें 'हिंदु-मुसलमान' ऐक्यासाठीं महात्माजींनीं केलेलें भयंकर धाडस होतें. पण पटकीच्या जागीं आरोग्यासाठीं प्लेगचा स्वीकार करण्याचें हें धाडस म्हणजे महात्माजी ज्या समाजाचे प्रतिनिधि होते, त्या समाजाच्या आत्मविश्वासहीनतेचें अपत्य होतें! नाहींतर कोणत्याहि राष्ट्रीय वृत्तीनें रसरसलेल्या समाजांत या प्रयत्नाची 'धाडस' म्हणून गणना न होतां 'लांछन' म्हणूनच त्यावर लोक थुंकले असते! पण मनानें मेलेल्या लोकांच्या पुढाऱ्यांची अगतिकता ही 'धाडस' व 'प्रामाणिक प्रयत्न' म्हणून समजली गेली तर त्यांत आश्चर्य तें कसलें! या प्रयत्नाचें स्वरूप वर्णन करून डॉ. भीमराव आंबेडकर विचारतात कीं, "डोकें ठिकाणावर असलेला कोणताहि मनुष्य हिंदु-मुसलमान ऐक्यासाठीं इतक्या थराला जाईल काय?" ("Can any sane man go so far, for the sake of Hindu-Muslim unity?") हा डॉ. आंबेडकरांनीं केलेला प्रहार सकृद्दर्शनीं महात्माजींवर पडत असला तरी त्याचा रोख आमविस्मृत हिंदु समाजाच्या अनुकंपनीय स्थितीकडेच झुकतो, हें डॉक्टरांनीं ओळखलें होतें.

डॉक्टर कारागृहाबाहेर आले त्या वेळीं मुसलमानांच्या मुखांतून 'वंदे मातरम्' च्या जागीं 'अल्ला हो अकबर' या आरोळ्या घुमूं लागल्या होत्या व सभांतून अमुसलमानांचा म्हणजे काफरांचा संहार करण्याचा व त्यांच्याविरुद्ध

जिहाद म्हणजे धर्मयुद्ध पुकारण्याचा आदेश देणारे कुराण-शरीफमधील उतारे मौलाना-मौलवीकडून वाचण्यांत येऊं लागले होते ! ज्या खिलाफतीचे अल्लीबधू-सारखे पुढारी होते त्यांतून दुसरे काय निघणे शक्य होते ? कारण हिदूना बाट-विण्यात अग्रेसरत्व दाखविल्यामुळेच त्याना ‘ मौलाना ’ ही सनद ‘ फिरगी महाला ’ कडून मिळाली होती. आपण मुसलमान कोणी तरी वेगळे आहोत, ही भावना सुशिक्षिततातहि स्पष्ट दिसूं लागावी हे नवल खरेंच ! कारण इग्रजी शिक्षणाने हिंदु समाजांत बुद्धिवादाला चालना मिळाली होती व तोच परिणाम मुसलमानांतहि दिसू लागेल कशी कल्पना होती. पण खिलाफतीनतर निराळाच प्रकार दिसूं लागला. पं. जवाहरलाल नेहरू आत्मचरित्रांत म्हणतात की, “ धार्मिक प्रवृत्तीकडे ओढा नसलेले पाश्चात्य वळणाचे अनेक मुसलमान दाढ्या वाढवू लागले व कर्मठ आचार पाळूं लागले ! ” या वेळीं मुसलमान पुढाऱ्याच्या हातात भोळ्याभाबड्या हिदूच्या खिशांतून गेलेला ऐंशी लक्ष रुपयाचा निधि पडला असता, त्यांतून हे निराळेपणाचे विष पसरविण्यात त्यानीं आघाडी मारली यात नवल ते कोणते !

याच काळांत डॉक्टर एका परिषदेला चालले असता त्यांच्याबरोबर श्री. समीउल्लाखान होते. या दिवसात डॉक्टर पांढरी खादी टोपी व केव्हा केव्हां खादीचे उपरणे वापरीत असत. तेव्हा डॉक्टरानी खानसाहेबाच्या डोक्यावरील तुर्की टोपी पाहून प्रश्न केला की, “ असहकार आदोलनापासून पाढरी टोपी रूढ होत असतां आपण अजून तिचा स्वीकार का केला नाहीं ? ” त्या वेळी खान-साहेबांनी चक्क सागितले होते कीं, “ मी प्रथम मुसलमान आहें व ही टोपी त्याची निशाणी आहे ! तेव्हा ती सोडण्याचा प्रश्नच येत नाही ! ” ही मुसलमानी मनाची चाहूल डॉक्टर घेत असता आणखी एका घटनेने त्याचे लक्ष वेधून घेतले. ते कारागृहांत असतानाच मलबारात मोपल्यानी सरकार व हिंदु समाज यांच्याविरुद्ध सशस्त्र उठावणी केल्याचे वृत्त आले होते. पण त्या घटनेची तीव्रता, कॉंग्रेसमधील पुढाऱ्याच्या, मुसलमानाना कसेहि करून सावरून धरावयाच्या वृत्तीमुळे लोकाना जाणवली नव्हती. कारण कॉंग्रेसने मलबारातील प्रकारानंतर ‘ दुःख ’ व्यक्त करणारा ठराव केला, त्यांत मोपल्यानी केलेल्या अत्याचारांच्या डोगराची राई करून दाखविण्यात आली होती, तर सरकारी दंडुकेशाहीच्या डोगराचा पर्वत करण्यास ते विसरले नव्हते ! वास्तविक भारत सेवक समाजाकडून ( सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटीकडून )* मोपला बंडाचे जे प्रतिवृत्त प्रसिद्ध झाले, त्यांत १५०० हिदु बळी पडले व २० सहस्र हिंदूंना सक्तीने बाटविण्यांत आले, असे म्हटले होते व मालमत्तेच्या हानींचा आकडा ३ कोटी रुपये

* *याच संस्थेचें सध्या ‘ हिंद सेवक समाज ’ असें नामांतर झालें आहे.*

देण्यांत आला होता ! पण कॉंग्रेसला हेंच दृश्य कसें दिसलें तें पाहण्यासारखें आहे. ठरावांत म्हटलें आहे कीं, "...ज्या हिंदु कुटुंबांचें सक्तीनें धर्मांतर करण्यांत आलें तीं मांजेरीच्या आसपास राहणारीं होतीं आणि ज्या धर्मवेड्या टोळीनें हें कृत्य केलें ती खिलाफत व असहकारिता या चळवळीविरुद्ध होती; आणि आतांपर्यंत जी माहिती मिळाली आहे त्यावरून अवघ्या तीनच कुटुंबांवर अशी सक्ती करण्यांता आली असें दिसून आलें आहे." (राष्ट्रीय सभेचा इतिहास, पान २५४-२५५.) कोठें वीस सहस्र संख्या नि कोठें तीन कुटुंबें !

उलट मोपल्यांना अशा उठावानंतर दडपून टाकतांना सरकारनें नेहमीं-प्रमाणें कठोर उपाययोजना केली. पण त्याविषयीं पं. जवाहरलाल व म. गांधी अत्यंत कळवळले ! महात्माजींनीं लिहिलें कीं, "देवभोळ्या, शूर मोपल्यांनीं त्यांना वाटणाऱ्या धर्मासाठीं, त्यांना अभिप्रेत असलेल्या धार्मिक पद्धतीनें झगडा केला." ("...brave, God-fearing Moplas who were fighting for what they consider as religion and in a manner which they consider as religious." )

अशा मोहक खादीच्या शालींत मोपल्यांचें क्रौर्य हें शौर्य म्हणून महात्माजींनीं गुंडाळलें ! तर पंडित नेहरूंनीं अश्रु गाळतांना म्हटलें कीं, "The Moplah rising and its extraordinary cruel suppression–what a horrible thing was the baking to death of the Moplah prisoners in the closed railway vans !" एकदां क्रौर्याला शौर्य ठरविल्यावर हे अश्रु समर्थनीयच ठरतात ! तेथील पीडित हिंदूंपेक्षां मुसलमान मोपल्यांसाठीं अश्रु अधिक गाळण्यांत आले, ही कटु वास्तवता होती.

मुसलमानांना राजी राखावयाचें, म्हणून ही अशी बंडाच्या उग्रतेवर सारवासारवी चालू असतां डॉक्टर मुंजे हे स्वतः मलबारांत हिंडून आले व त्यांनीं तेथील हिंदूंच्या यमयातनांचें प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेलें अत्यंत भेसूर चित्र लोकां-समोर ठेवलें. डॉक्टर हे डॉ. मुंजे यांच्याकडे नित्य जाणारे व त्यांच्या लोभांतीलच होते. त्यामुळें त्यांना हीं चक्षुर्वै सत्यम् अशीं वृत्तें प्रत्यक्षच ऐकावयास मिळालीं. डॉक्टर मुंजे यांनीं या वेळीं कोणाला काय वाटेल, याची यत्किंचितहि चिंता न करतां सांगून टाकलें कीं, "मुसलमानी राज्यांचा शेवट झाल्यावर हिंदु जनतेवर एवढ्या मोठ्या प्रमाणांत पडलेली ही पहिलीच आपत्ति होय !" त्या वेळीं या रानटी धर्मवेडया मोपल्यांपासून तेथील हिंदूंना कायमचें संरक्षण असावें यासाठीं मराठे, राजपूत व शीख यांना त्या भागांत जाऊन राहण्याला प्रोत्साहन देण्या-करितां एखादी योजना निश्चित केली पाहिजे, असाहि विचार डॉ. मुंजे मांडूं लागले. १९२३ च्या मे-जूनमधील ही घटना आहे.

या काळांत मलबारांतील स्त्रियांनीं त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग यांच्या पत्नीकडे कारुण्यपूर्ण आवेदन पाठविले होते. त्यांत त्या म्हणतात, "...( आमच्या ) मागणीप्रमाणे भरपाई देणे व आमचे संरक्षण करणे सरकारला अशक्य वाटत असेल तर आमची प्रार्थना एवढीच आहे की, या प्रांताशेजारच्या मुलखात कोठेहि आम्हांला जमीन देण्यात यावी. तो मुलूख जरी आमच्या मुलखाप्रमाणे निसर्गदेवतेच्या देणगीने संपन्न नसला, तरी माणसाच्या पशुवृत्तीच्या निर्दयतेपासून तरी तो शापित राहणार नाही !"

मोपल्यांच्या अशा बंडानतरहि मुसलमानाना चुचकारण्याचे कॉंग्रेसचे प्रयत्न अखंड सुरूच होते. असहकाराच्या आदोलनात गावोगाव परदेशी उंची व महाग कापडाच्या होळ्या होत असत व त्यातून अनेक जणाच्या मनात स्वाभिमानाचा वन्हि चेतविला जाई. पण मुसलमानाना देश व स्वातंत्र्य याच्याशी कर्तव्य नव्हते. त्यांनीं असे कपडे न जाळता ते तुर्की बाधवाना भेट म्हणून पाठविण्याची गाधीं-कडून समति मागितली, व मुसलमानाशी मेणाहून मऊ असणाऱ्या गांधींनीं ती सहर्ष दिली, हे सागावयास नकोच ! त्याचप्रमाणे मुसलमानाना प्रिय असलेली घोषणा म्हणून हिंदूंनी 'अल्ला हो अकबर !' म्हणण्यास प्रारभ केला. पण १९२३ नोव्हेंबरमध्ये मौ. शौकतअलीने मानभावीपणाने मुसलमानाना कर्णा-वतीच्या प्रकट भाषणांत सागितलें की, "..'अल्ला हो अकबर' व 'वंदे मातरम्' या गर्जनेत मला पूर्वीप्रमाणे एकतानता दिसून येत नाही. हिंदु 'अल्ला हो अकबर' अशी घोषणा करीत असतां मुसलमान 'वदे मातरम्'ची घोषणा करीत नाहींत ! म. गाधीच्या नेतृत्वाखालीं हिंदूंनी खिलाफतीच्या बाबतीत मुसलमानास किती साहाय्य केले आहे ते विसरू नका !" पण हे उपदेशहि वरकरणीच होते व त्यातूनच 'अल्ला हो अकबर'च्याच घोषणाना प्रोत्साहन मिळून विसंघटित हिंदूंच्या मनांत धडकी भरविणाऱ्या पाशवी अत्याचाराना उद्युक्त होणारी मुसलमानी वृत्ति दृढ झाली. हीं सर्व कारस्थाने नि स्थित्यंतरे डॉक्टर अगदी बारकाईने न्याहाळून होते व या वर वर दिसणाऱ्या गोष्टीवरून झटपट रंगाऱ्या-प्रमाणे परिस्थितीचे उडते निदान न करता, मुसलमानांच्या व हिंदूंच्या या अनुक्रमे चढाऊ व पडखाऊ वृत्तीची छाननी करीत, अगदी मुळाशी जाण्यासाठी त्यांच्या मनाची धडपड होती. हे चितन चालू असतांना त्याच्या समाजसेवेच्या असंख्य कामांत खंड पडला नव्हता; तर त्यातूनहि समाज धुंडाळून नवे नवे कार्यकर्ते व अनुभव आत्मसात् केले जात होते. १९२२ ऑगस्टनंतरच्या कांही ठळक ठळक घटनाचा नुसता धांवता आढावा घेतला तरी त्यांच्या अविश्रान्त परिश्रमांची व समाजनिरीक्षणासाठीं चाललेल्या प्रयत्नांची सहज कल्पना येऊं शकेल.

या वर्षींहि त्यांची प्रांतिक कॉंग्रेसवर निवड होऊन प्रांताच्या संयुक्त कार्यवाहपदावर त्यांची नियुक्ति झाली होती. या स्थानावर असतांना त्यांना

ज्या अनुशासनाची पदोपदीं उणीव भासत होती, ती भरून काढण्याच्या दृष्टीनें कॉंग्रेस-अंतर्गत एक संघटना उभारण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. त्यासाठीं प्रत्येक तालुक्यांतून चार-चार जणांना बोलाविण्यांत आलें होतें. पण स्वयंसेवक म्हटला म्हणजे पुढाऱ्यांच्या इच्छेप्रमाणें टेबलें-खुर्च्या उचलणारा व इतर कामें करणारा 'उत्साही सांगकाम्या', अशी विकृत कल्पना त्या वेळच्या पुढाऱ्यांत वसत असल्यानें, त्या प्रयत्नांना पुरेसें यश आलें नाहीं. याच जोडीनें महत्माजींच्या अहिंसा तत्त्वाचें नवें बाळकडू मिळालेल्या लोकांचा तर अशा संघटनेला विरोध होता. त्याची झळ डॉक्टरांच्या या प्रयत्नालाहि पोंचली असेल. डॉक्टरांच्या या प्रयत्नानंतर १९२३ मध्यें कोकोनाडा कॉंग्रेस अधिवेशनांत डॉक्टरांचे एक कलकत्त्यापासूनचे मित्र हुबळीचे डॉ. ना. सु. हर्डीकर यांनीं हिंदुस्थानी सेवादलाची स्थापना केली. त्यांना तर पं. नेहरूंचा सबळ पाठिंबा मिळाला असतांहि जो अनुभव आला तो पंडितजींनीं आपल्या आत्मचरित्रांत ग्रथित केला आहे. त्याच स्वरूपाचे अनुभव डॉक्टरांना आले असतील, हें सांगावयास नकोच. पं. नेहरू लिहितात कीं, "प्रमुख प्रमुख कॉंग्रेस नेत्यांचाहि सेवादलाल असलेला इतका प्रबळ विरोध पाहून आम्हांला मागाहून आश्चर्य वाटलें. ज्या अर्थीं, त्यायोगें कॉंग्रेसमध्यें सैनिकी प्रवृत्तीचा शिरकाव करण्यासारखें होईल आणि सैनिकी मनगट हें नागरिकीय अधिकारावर वर्चस्व गाजविण्याचा संभव आहे, त्या अर्थीं तसें करणें म्हणजे एक प्रकारची भयावह तत्त्वच्युतिच होय, असें कांहीं जणांचें म्हणणें होतें. त्या संबंधांत दुसऱ्या कांहीं जणांचा विचार दिसला कीं, वरून आलेली आज्ञा निमूटपणें पालन करणें इतकीच शिस्त स्वयंसेवकांत आवश्यक आहे आणि इतरांना त्यासाठीं स्वयंसेवकांनीं एकमेकांच्या बरोबरीनें पावलें टाकीत चालणें हें सुद्धां इष्ट वाटत नव्हतें. ह्याच्या जोडीनें कांहीं जणांची अशी धारणा होती कीं, शिक्षित व संचलित स्वयंसेवक, कॉंग्रेसपाशीं तिचे स्वतःचे म्हणून उभे करणें, हें तिच्या अहिंसा तत्त्वाशीं कोणत्या ना कोणत्या प्रकारें विसंगतच आहे."

("We were surprised to find later how much opposition there was to the Seva-Dal among leading Congressmen. Some said that this was a dangerous departure, as it meant introducing a military element in the Congress and the military arm might overpower the civil authority ! Others seemed to think that, the only discipline necessary was for the volunteer to obey orders issued from above and for the rest, it was hardly desirable for volunteers, even to walk in step. At the back of the mind of some was the notion that the idea of having trained and drilled volunteers was somehow

inconsistent with the Congress principle of non-violence." page 121. )

स्वयंसेवकत्व व शिस्त यांसंबंधीच्या अशा विपरीत कल्पनांत डॉक्टरांना आपल्या मनापुढील चित्र साकार होण्याची शक्यता दिसली नसेल तर त्यांत आश्चर्य तें कोणते ? एक तर कामापुरते सांगकाम्ये उभे करणे ही डॉक्टरांची दृष्टि नव्हती. त्यांना वाटे की, देशभक्तीने रसरसलेले, शीलाने नटलेले, गुण-विकासाने प्रभावी झालेले व निस्सीम सेवाभावाने स्वतः होऊन अनुशासित जीवन जगण्यास उत्सुक असलेले असे क्रियाशील कर्तृत्वशाली तरुण लक्षावधि संख्येनें उभे केले पाहिजेत. या उभारणीत पुढारी व अनुयायी हे कार्याच्या आवश्यकते-नुसार ठरले तरी गुण, स्वभाव, कर्तृत्व व अनुशासन या संबंधांत त्या दोहोंत काडी-इतकेहि अंतर असता कामा नये. जो कोणाचेच ऐकणार नाहीं, पण ज्याचे सर्वांनीं ऐकले पाहिजे, तसे न ऐकल्यास त्याने हातपायाची आदळआपट करून तणतणावें व अनुयायांना वाटेल तसे बोलावें, अशा वळणाचे व धारणेचे पुढारी, डॉक्टराना हरघडी दिसत होते. अशा पुढाऱ्यांच्या अपेक्षेतूनच टेबले-खुर्च्या उचलणारे स्वयंसेवक उभारले जात. ज्याचा सेवाभाव टवटवीत व ज्वलन्त असेल, त्याचेंच नेतृत्व उभे राहण्याची आवश्यकता डॉक्टरांना तीव्रतेने जाणवत होती. त्याच्याच जोडीने ' अहिंसा तत्त्वा 'च्या विकृत कल्पनानी समाजातील तारुण्याची व पौरुषाची उपेक्षा होणार, हेंहि त्याना दिसू लागले होते. त्या वेळी एका निदर्शनासाठी स्वय-सेवक उभे करण्याचा प्रसंग आला असता डॉक्टरांच्या सहकाऱ्याना मजेशीर अनुभव आलेले होते व ते डॉक्टराना कळले होते. डॉक्टराच्या मित्रानी काहीं दणकट प्रकृतीचे तरुण कॉंग्रेसच्या अहिंसक पुढाऱ्यापुढे उभे करताच त्याच्या कपाळाला आठ्या पडल्या ! ते म्हणाले, ' असले तरुण निदर्शनाला पाठविले तर लाठीचे फटकारे स्वतः सहन करण्याऐवजी त्या लाठ्या हिसकावून घेऊन हे आरक्षकानाच उलट मारावयाचे ! ' ही शंका ऐकतांच डॉक्टरांच्या मित्रांना हंसू आले नि त्यांनीं उत्तर दिलें की, " ह्याना प्रतिकार करूं नका म्हणून सांगितले तर करणार नाहींत. तर मरतुकडे स्वयंसेवक लाठ्याच्या फटकाऱ्याने स्वतः मरून जातील व हिंसा होईल. त्यापेक्षां हा बलवान् तरुणाचा स्वतःची हिंसा टाळणारा प्रतिकार पुरवला ! " हा १९२२-२३ मधील दारूबंदीसाठीं केलेल्या निरोधनां-तील अनुभव होता.

पंजाब–राजस्थान भागांत पाठविलेल्या क्रांतिकारक तरुणांना परत आणून त्याना कामात गुंतविण्याचें उत्तरदायित्व डॉक्टरांनी बहुतेक पार पाडले होते. परंतु त्या पथकाचे प्रमुख गंगाप्रसाद पांडे हे अजून परतले नव्हते. तेव्हा आपल्या त्या मित्राला इकडे आणून, त्याच्या गुणांचा व अनुभवाचा लाभ करून घेण्यासाठीं डॉक्टरांनी वर्ध्याला श्री. राळेगणकर यांची जागा भाड्याने घेऊन तेथें

गंगाप्रसादच्या नेतृत्वाखालीं ‘ राष्ट्रीय मल्लविद्या शाळा ’ या नांवाची संस्था सुरू केली. त्या संस्थेसाठीं एक विश्वस्त मंडळ नेमून, पुढें-मागें सर्व प्रांतांत त्याच्या शाखा उघडाव्यात, असाहि विचार होता. त्याप्रमाणें डॉक्टरांच्या अध्यक्षतेखालीं विश्वस्त-मंडळाची उभारणी झाली. या संस्थेचा हेतु द्विविध होता. क्रांतिकाळांत संबंधांत आलेल्या कांहीं तरुणांना गुंतवून ठेवणें व नवनवे होतकरू तरुण अखंडपणें मिळत राहतील अशी कायमची व्यवस्था करणें असे ते हेतु होते. या शाळेंत पंजाबकडील दहा-बारा व मध्यप्रदेशांतील बारा-तेरा तरुण होते व नोकरचाकर धरून एकूण संख्या तीसच्या आसपास असे. जोडी, कुस्ती, मलखांब याबरोबर धनुर्विद्येचेंहि शिक्षण या शाळेंत दिलें जाई.

गंगाप्रसाद हा डॉक्टरांच्या क्रांतिकार्यांतील अत्यंत विश्वासू, निर्भय व बुद्धिमान् सहकारी होता. पण त्याचा स्वभाव अत्यंत खर्चिक असल्यानें तो विद्यालयाला नडूं लागला. सकाळीं दूध-बदाम व दोन्ही वेळच्या चमचमीत जेवणांच्या मध्यंतरांत मिठाई व मलई असा याचा खाक्या असे व इतरहि बाबतींत खर्चाला तो एसपैस असे. तो स्वतः १००० दंड काढी व इतरांकडूनहि भरपूर व्यायाम करून घेई. पेलेदार छाती, पिळदार दंड, सतेज डोळे व लिंबाप्रमाणें अंगकांति हें तारुण्याचें वैभव तेथील तरुणांत विलसूं लागलेलें पाहून डॉक्टरांना अत्यंत समाधान वाटे व या समाधानांतूनच, पांडेच्या खर्चिक कारभाराला पैशाचा पुरवठा करतांना जो त्रास होई व धांवपळ करावी लागे, ती डॉक्टरांनीं सुसह्य मानली होती. ही संस्था अशी जेमतेम दीड वर्षें चालली असेल तोंच गंगाप्रसाद पांडेच्या मागें पंजाबमधून चौकशीचा ससेमिरा आला व नागपूर भागांतील गुप्तचरांच्या हालचालीहि जाणवूं लागल्या. तेव्हां डॉक्टरांनीं सरकारचा एकूण पवित्रा ओळखून ती संस्थाच बंद करून टाकली. असें करतांना त्यांनीं स्मरणपूर्वक गंगाप्रसादची व्यवस्था करण्याचें काम श्री. आप्पाजी जोशी यांच्यावर सोंपविलें.

या शाळेच्या निमित्तानें त्यांना वारंवार वर्धा येथें जावें लागत होतें. अशा वेळीं ते आपल्या फावल्या वेळांत महात्माजींच्या सत्याग्रहाश्रमांतहि आवर्जून जात असत. त्या वेळीं कॉंग्रेसमध्यें फेर-नाफेर वाद सुरू झाला होता आणि त्यावरच प्रामुख्यानें गप्पागोष्टी होत असत. पण त्यांत त्यांचा कल कांहींसा डॉ. मुंजे यांच्या लोभामुळें कौन्सिल-प्रवेशाकडे दिसला तरी त्यावर त्यांचा भर मुळींच नव्हता. त्या वेळीं कॉंग्रेस कार्यकर्त्यांच्या छावणींत राहणारे पंडित श्री. रामगोपाल विद्यालंकार हे त्यांच्या चांगल्याच परिचयाचे होते. ते सांगतात कीं, “ डॉक्टर हे रामभाऊ पिंगळे, वामनराव घोरपडे, राजाभाऊ डांगरे आदि मित्रमंडळींत वावरतांना दिसत. ते छावणीवर आले कीं, ‘ अहिंसा हें धोरण मानण्याऐवजीं सिद्धान्त कां मानतां ? मुसलमानांचा पक्षपात कां करतां ! ’ वगैरे

प्रश्न विचारीत व ‘ फेरवादी विचारसरणी स्वीकारून अनुशासनबद्ध जीवन निर्माण केले पाहिजे, दुसरा तरणोपाय नाही, ’ असे आग्रहाने सांगत. ” ज्यांची मते पटत नाहीत त्यांच्यापासून चार हात दूर राहून त्यांच्यावर टीकास्त्र सोडीत राहणे डॉक्टरांना रुचेना. ते आपल्या कल्पना मांडण्यासाठी मोकळेपणानें अन्य विचारांच्या पुरस्कर्त्यांकडे जात व निर्भयतेने विचारांची देवाण-घेवाण करीत. याचा परिणाम कसा होई, हे पहाण्यासारखे आहे. पं. रामगोपाल विद्यालंकार सांगतात की, “ डॉक्टर, मतभेद असूनहि स्नेह कायम ठेवीत. त्यामुळे मी त्यांच्या घरी जात असे तेव्हा ते मोकळेपणाने हास्य करीत. म्हणावयाचे की, ‘ मी तुमचे स्वागत करतो, पण तुमच्या विचारांचे नाहीं ! ’ ” विचार व व्यक्ति मनात निरनिराळ्या ठेवून, मतभिन्नता असताहि व्यक्तिगत स्नेहाला त्या मतभिन्नतेचे ग्रहण लागूं न देण्याची कला ही डॉक्टरांच्या स्वभावाचा एक अलौकिक व लोकसंग्रहाच्या दृष्टीने अत्यंत प्रभावी असा पैलू होता. त्या वेळीं रामगोपाल हे वर्ध्याला ‘ राजस्थान-केसरी ’ साप्ताहिकाचे संपादक होते. पण डॉक्टर कॉंग्रेसच्या छावणींत आले की, तेथील अशा मंडळीजवळ थट्टेने हसत, खेळत व खूप दंगामस्ती व धक्काबुक्की करून मगच परत येत !

कारागृहातून डॉक्टर सुटले त्या वर्षीची आणखी एक उल्लेखनीय घटना म्हणजे नागपूरच्या अनाथ विद्यार्थी गृहाच्या स्थापनेची. त्या वर्षी श्रीगणेश-चतुर्थीच्या मंगल दिवशीं डॉक्टरांचे मित्र श्री. गोविंद गणेश चोळकर यांनी ही संस्था सुरू केली. त्यात त्यांना डॉक्टरांचे सहकार्य मिळाले होते. श्री. चोळकर यांनी सुरू केलेली संस्था ही गरीब विद्यार्थ्यांना अत्यंत उपकारक ठरलेली आहे यात शंकाच नाही. पण या संस्थेला नागपूर नगराबाहेर भंडारा रस्त्यावरील बगडगंज भागात जागा मिळाल्यावर प्रांतोप्रांतीच्या कांही भूमिगत क्रांतिकारकांना काहीं दिवस आसरा देण्याची अत्यंत महनीय कामगिरीहि तिने बजावलेली आहे, हे विसरून चालणार नाही. या जागेत डॉक्टरांनी कांहीं वेळा शस्त्रास्त्रांच्या पेट्याहि लपवल्या होत्या व काहीं क्रांतिकारकांना तेथे ठेवून त्यांच्याकडे नियमाने जेवण पाठविण्याची व्यवस्था केली होती. त्या वेळी असे डबे पोचविणाऱ्या श्री. तात्या तेलंग व भेदी आदि निवडक तरुणांनाच या गोष्टीची कल्पना आहे. या संस्थेच्या कार्यकारी मंडळात डॉक्टरांचा अगदीं प्रारंभापासून शेवटपर्यंत समावेश होता व ते अधूनमधून आवश्यकतेनुसार अ. वि. गृहाच्या कामात लक्षहि घालीत. काल-दृष्टीने पुढे घडलेली गोष्ट विषयानुषंगाने येथेच उल्लेखिणे युक्त ठरेल. अ. वि. गृहामधील दोन मुले एका मिशनरी बाईने पळवून नेली असतां डॉक्टरांनी आपल्या सहकाऱ्यांच्या साहाय्याने ‘ मोठ्या प्रयासानें ’ तीं परत मिळवून दिल्याचा उल्लेख १९२६ च्या प्रतिवृत्तांत श्री. गोविंदराव चोळकर यांनी केलेला आढळतो.

या वेळीं परिषदांना जाण्याचा क्रम सुरूच होता व डॉ. मुंजे यांच्या प्रयत्नानें नुकत्याच सुरू झालेल्या ‘ रायफल असोसिएशन ’मध्येंहि डॉक्टरांचें बरेंच जाणें-येणें असे. शिस्त, संचलन व नेमबाजी या गोष्टी पददलित राष्ट्रांचें त्राण टिकविण्यास अत्यंत उपयुक्त आहेत, अशी त्यांची दृढ धारणा, त्या अहिंसेच्या नेभळ्या वातावरणांतहि लवमात्र मंदावली नव्हती. कलकत्त्याला असतांनाच त्यांनीं नेमबाजी हस्तगत केली होती. त्यामुळें सवड असली तर ते आपले मित्र श्री. भाऊसाहेब टालाटुले यांच्याबरोबर हौसेनें शिकारीलाहि जात. अशा वेळीं दोन-तीन दिवस त्यांचें रानांतच वास्तव्य असे. अशाच एका प्रसंगीं वान्नेरा येथें झाडाला वांगीं टांगून तीं टिपण्याची चढाओढ लागली असतां केवळ डॉक्टरांनींच अचूक लक्ष्य टिपून सर्वांना हरविलें होतें, ही गोष्ट त्यांच्या मित्रांच्या अजूनहि स्मरणांत आहे. दुसऱ्या एका वास्तव्यांत त्यांच्यांतील एकानें बंदुकींत काडतुसें भरलेलीं नसतील अशा कल्पनेनें थट्टेनें घोडा ओढला व डॉक्टरांच्या अगदीं जवळून सूंऽऽ करीत गोळी निघून गेली ! या जणूं अंगाला घसटून गेलेल्या मृत्यूचें वर्णन करून डॉक्टर सांगत, “ गोळी असो वा नसो, पण कोणत्याहि व्यक्तीवर थट्टेंत नेम धरूं नये ! ” गांवांत कोणताहि नवा उपक्रम सुरू झाला कीं, त्यांत डॉक्टर नाहींत असें सहसा घडत नसे. १९२२ मध्यें झालेल्या प्रांतिक खेळांच्या समितीवरहि त्यांचें नांव दिसतें व महालांतील नरसिंग बोलपट-गृहाजवळील मारुतिमंदिरांत दैनंदिन होणाऱ्या सायंप्रार्थनेलाहि इतरांबरोबर ते उपस्थित असलेले दिसतात. अभ्यास मंडळांतहि जाऊन तेथें जसे ते चर्चेत भाग घ्यावयाचे, त्याचप्रमाणें मित्रांच्या घरीं क्रमाक्रमानें होणाऱ्या भोजन-मंडळाच्या पंक्तींतहि ते असावयाचे. ज्या ठिकाणीं कांहीं समवयस्क जमणार असतील आणि राष्ट्रीय व सामाजिक दृष्टीनें कांहीं उपक्रम घडणार असेल, त्या ठिकाणीं जाऊन भाग घेण्यावर त्यांचा कटाक्ष दिसे. दारूगुत्त्यापुढें निरोधन करणाऱ्यांच्या पाठीवरून त्यांचा हात फिरावयाचा, त्याचप्रमाणें मुलांमुलांनीं हौसेनें केलेल्या गणेशोत्सवालाहि डॉक्टरांनीं आपल्या गरिबींतूनहि कांहीं वर्गणी द्यावयाची.

या काळांत डॉक्टरांनीं नागपूरच्या खंडोबाच्या देवळांत कवि परमानंद यांचें ‘ शिवभारत ’ काव्य पुढें ठेवून कांहीं वेळां प्रवचनें दिल्याचें अनेकांच्या स्मरणांत आहे. अर्थात् ह्या काळांतील प्रवचनें देखील कशा स्वरूपाचीं असत हें पाहण्यासारखें आहे. प्रा. ना. सी. फडके लिहितात, “ वक्त्यानें व्याख्यानाचा विषय म्हणून गीतेंतला एखादा श्लोक किंवा दासबोधांतलें वचन घेतलें तरी गीतेच्या किंवा दासबोधाच्या आधारानें वक्ते राजकारणच सांगत आणि तें देखील टिळकांचें जहाल राजकारणच. ” अर्थात् डॉक्टरांच्या प्रवचनांचा थाट याच धर्तीचा होता हें सांगावयास नकोच !

त्या वर्षीं कलकत्त्याला झालेल्या क्रांतिकारकांच्या एका गुप्त बैठकीलाहि ते गेले होते. पण बाह्य कारण मात्र आपल्या ‘ नॅशनल मेडिकल कॉलेज ’च्या माजी

विद्यार्थ्यांच्या संमेलनासाठीं जात आहे, असेंच त्यानी प्रकट केलेले दिसते. या गुप्त बैठकीत काय ठरले असेल ते कळण्यास मार्ग नाहीं. पण तो काळ क्रांतिकारकांची एकूण पागापांग झाल्याने अत्यंत प्रतिकूल होता व त्यामुळे कांही दिवस सुसंधीची वाट पाहत व आपले बल वाढवीत राहावे, असाच विचार तेथे झाला असण्याची शक्यता दिसते. या घटनेच्या आधीं कांहीं क्रांतिकारक जर्मनीमध्ये हर हिटलरच्या पक्षाशी संधान बांधण्याचा प्रयत्न करीत होते, याचा उल्लेख हिटलरच्या 'माइन काम्फ' या आत्मचरित्रात केलेला आढळतो. पण त्या वेळी हिंदुस्थानातील क्रांतिपक्ष किती निकृष्ट स्थितीला गेलेला होता, हे हिटलरच्या त्या वेळच्या अभिप्रायावरून सहज ध्यानात येण्यासारखे आहे. भेटावयास गेलेल्या क्रांतिकारकांविषयीं तो म्हणतो की, "त्याच्यासंबंधी माझा असा ग्रह झाला कीं, मागे कांहींच पाठबळ नसताना वटवट करणारे हे चळवळ्ये आहेत!" (" .who impressed me as being chattering busy bodies, with nothing behind them." p. 258) अशा पडत्या काळातील बैठकीवरून परतताना डॉक्टरानी एकच संकल्प मनोमन केला असेल कीं, 'आपल्या समाजात जागत्या तरुणाची प्रभावी संघटना मी उभी करीन!'

महात्मा गांधींना १८ मार्च १९२२ या दिवशीं ६ वर्षांची शिक्षा झाली. तेव्हापासून त्यांची सुटका होईपर्यंत प्रत्येक महिन्याला दि. १८ हा 'गांधी-दिन' म्हणून ठिकठिकाणी पाळण्यात येऊं लागला. त्याच वर्षीच्या ऑक्टोबरमधील नागपुरात झालेला 'गांधी-दिन' उल्लेखनीय आहे. या वेळी महात्माजी कारागृहांत होते व त्यांचे अनुयायी म्हणविणारे अनेक लोक बाहेर चक्क आपल्या स्वार्थात निमग्न राहून केवळ शाब्दिक देशभक्तीचे खेळ करीत होते. ही विसंगति समाजाच्या सर्व थरांतून डोळसपणानें अखंड वावरणाऱ्या डॉक्टराना अत्यंत अस्वस्थ करीत असल्यास नवल नाहीं. डॉक्टरांनीं १९२२ च्या गांधी-दिनोत्सवात केलेलें भाषण त्यांच्या मनांत उसळलेल्या काहुराची कल्पना आणून देण्यास समर्थ आहे. ते म्हणाले कीं, "आजचा दिवस अत्यंत पवित्र आहे. म. गांधींसारख्या पुण्यश्लोक पुरुषाच्या अंगीं असलेल्या सद्गुणांचे श्रवण व चिंतन करण्याचा हा दिवस आहे. त्यांचे अनुयायी म्हणविण्यात भूषण मानणाऱ्यांच्या शिरावर तर त्यांच्या गुणांचे अनुकरण करण्याची जबाबदारी विशेषच येऊन पडते. म. गांधींच्या अंगीं असलेला अत्यंत महत्त्वाचा सद्गुण म्हटला म्हणजे हातीं घेतलेल्या कार्याकरितां आत्यंतिक स्वार्थत्याग होय. महात्मा गांधीची चळवळ जर त्यांच्या अनुयायी वर्गापासून कशाची अपेक्षा करीत असेल तर ती या आत्यंतिक स्वार्थत्यागाची. बोलणे एक व कृति दुसरी, अशा दुटप्पी वर्तनाचे लोक महात्माजीना नकोत. तोंडाने 'म. गांधी की जय' म्हणावयाचें, हात वर करून त्यांच्या कार्यक्रमाला दुजोरा द्यावयाचा व घरी गेल्यावर आपले चैनीचे व द्रव्यार्जनाचे सर्व

व्यवसाय तसेच चालू ठेवून, त्या कार्यक्रमाविरुद्ध वर्तन करावयाचें, अशा दोगल्या ( दुटप्पी ) वृत्तीच्या अनुयायांकडून महात्माजींची कार्यनौका कधींच वल्हविली जाणार नाहीं. आपला दुबळेपणा झांकण्याकरितां शांतीचें पांघरूण घेऊं नका. प्रतिपक्षाच्या बरोबरीनें मनगटांत सामर्थ्य आणा व नंतर शांतीच्या गोष्टी बोला म्हणजे तें शोभेल. महात्माजींचे अनुयायी म्हणून घ्यावयाचें असल्यास स्वतःच्या–हलवायाच्या नव्हे–घरावर तुळसीपत्र ठेवून रणांगणांत उतरा. "

अशा विचारांनीं डॉक्टरांचें अंतःकरण सारखें धगधगत होतें. विकाळ प्रश्न त्यांना स्पष्ट दिसत होते व त्यांची सोडवणूक कशानें होईल, या दिशेनें ते परिस्थितीचें अखंड मंथन करीत होते. ह्या व यानंतरच्या काळांतील डॉक्टरांची हालचाल पाहिली कीं मनांत समर्थ रामदासांचा अभंग गुणगुणूं लागतो कीं—

भाग्यवंत नर यत्नासी तत्पर
अखंड विचार चाळणेचा ।
चाळणेचा यत्न यत्नाची चाळणा
अखंड शहाणा तोचि एक ॥

* * *

## ११ : दिंडी सत्याग्रह

नागपूर येथे झालेल्या कॉंग्रेस अधिवेशनापासून त्या संस्थेत दिवसेदिवस म. गांधींच्या मताचा प्रभाव वाढू लागून त्यांच्या अनुयायांच्या हातांत कॉंग्रेस संस्थेची सूत्रे जाऊं लागली. या नव्या स्थित्यतरात कॉंग्रेसची जी पुनर्रचना करण्यांत आली, त्यांत नागपूर, वर्धा, चादा व भडारा या जिल्ह्याच्या गटाला मराठी मध्यप्रदेश असे संबोधण्यात येऊं लागले. पण या भागांतील कॉंग्रेस ही पूर्वीपासूनच टिळकानुयायाच्या हातीं होती व त्या गटाचा प्रभाव असहकाराच्या या काळातहि यत्किचितहि कमी झाला नव्हता. चोहीकडे गाधीगटाचे प्रभुत्व प्रस्थापित होत असता हा प्रात त्याला अपवाद ठरावा, ही गोष्ट शेठ जमनालाल बजाजसारख्या गांधीवादी पुढाऱ्याना खटकणे अगदी स्वाभाविक होते. त्यामुळे १९२२ च्या मासुरास या दोन गटांत कॉंग्रेसची सूत्रे हाती घेण्यासाठी बरीच चुरस लागली.

अशा स्थितीत खिलाफतीचे व असहकार आदोलनाचे एकूण अतरग पाहून डॉक्टर सचित झाले होते व काही नव्या मार्गाचा शोध करण्यात त्याचे मन गुंतलेले दिसे. पण असा नवा मार्ग निश्चित करीपर्यंत आपल्या अनुयायांना त्यानीं असे सुचविले होते कीं, शक्य तर ठिकठिकाणच्या कॉंग्रेस समित्या आपल्या हातीं घ्याव्यात. या सूचनेनुसार श्री. अप्पाजी जोशी व त्यांचे समवयस्क तरुण कार्यकर्ते यानी गया येथे झालेल्या कॉंग्रेस अधिवेशनापूर्वी जी निवडणूक झाली, तीत गाधी-गटाशी अगदी अटीतटीचा सामना दिला. या वेळीं जुन्या पिढीतील टिळकानुयायी डॉ. मुजे, बॅ. अभ्यंकर, चांद्याचे श्री. बळवतराव देशमुख आदि मंडळी या तरुणाच्या पाठीशीं उभी होती. त्यामुळे निवडणुकीत त्याचीच सरशी झाली. ही या दोन गटांतील चुरस यानंतरहि कांहीं वर्षे चालूच होती असे दिसून येते.

डॉक्टर या वेळीं कॉंग्रेसमध्ये होते व खादीचे उपरणे आणि खादी टोपीहि कांहीं दिवस त्याच्या वापरांत आलेली होती. ठिकठिकाणच्या लोकांनी त्यांना प्रेमाने भेट म्हणून दिलेल्या खादी पोशाखाचा त्यानीं असा सानद स्वीकार केला होता. पण कॉंग्रेसमध्ये असूनहि एकाच अतिरेकी विचारावर व आचारावर भर देणाऱ्या कॉंग्रेसच्या नव्या धोरणाविषयी त्यांना आस्था नव्हती. खादीच्या ते मुळींच विरुद्ध नव्हते. पण कॉंग्रेस-अंतर्गत मतदानाच्या वेळीं भाडोत्री किंवा उसना खादी पोषाख मिळवून मतदान करण्यापर्यंत त्या खादीचा होणारा आग्रह त्यांना

अनावश्यक वाटे. दुसरीहि एक गोष्ट त्यांच्या बोलण्यांत येई. ती म्हणजे, स्वतः सूंत कातून खादी वापरणें हें उत्तम. पण आपल्याच भारतीय गिरण्यांतून लक्षावधि भारतीय मजुरांच्या श्रमानें निघणारें कापड हेंहि टाकाऊ ठरवून चालणार नाहीं. मँचेस्टर वा अन्य परदेशी कापड वा वस्तु या संपूर्ण त्याज्य यांत शंकाच नाहीं. पण देशांतील कोट्यवधि लोकांना हातीं सूत कातून खादी पुरविणें शक्य व आर्थिक दृष्टीनें लाभदायक दिसत नसतां, खादीवर फाजील भर न देतां देशी गिरण्यांचें कापडहि मान्य केलें पाहिजे. ते स्वतः जमेल तितकी खादी, नाहीं तर देशी गिरण्यांतील कापड, याच विचारानें वापरीत असत.

स्वयंसेवक उभे करण्याच्या दृष्टीनेंहि त्यांच्या हालचाली सुरू होत्या व १९२३ मध्यें वर्धा स्वयंसेवक परिषदेला डॉक्टर उपस्थित असल्याचा उल्लेखहि वृत्तपत्रांतून आढळतो. त्या काळांत डॉक्टर अधिक चिंतनशील असावयाचे. तेव्हां चालू असलेल्या सभापरिषदांत ते भाग घेत होते; पण त्यांतील अपूर्णता त्यांच्या ध्यानीं येऊन चुकली होती व त्यांचें मन कांहीं ' नवीन ' गोष्टींच्या शोधांत निमग्न दिसे. नेहमीं-प्रमाणें ते गणेशोत्सवांत ठिकठिकाणीं भाषणाला गेले. पण त्या भाषणांतूनहि ' प्रयत्नांत बदल पाहिजे ! ' असा सूर सर्वत्र उमटल्यावांचून राहिला नाहीं. दि. ४ एप्रिलला सालोडला झालेल्या नाचणगांव परगणा परिषदेला ते अध्यक्ष म्हणून गेले होते. डॉक्टरांचें तेथील झणझणीत भाषण अहिंसेच्या चौकटींत बसण्यासारखें नाहीं, असाच अभिप्राय ऐकावयास मिळाला. त्याच्या दुसऱ्या दिवशींच देहगांव येथें परगणा-परिषद झाली. डॉक्टरच तेथें अध्यक्ष होते. त्या सभेच्या प्रारंभीं ' गोपूजन ' करण्यांत येऊन परिषदेंत गोरक्षणाचा ठराव मांडला जाणार होता. पण त्या परिषदेला उपस्थित असलेल्या कांहीं गांधीवादी म्हण-विणाऱ्या मंडळींना या गोष्टीची कुणकुण लागली व ते भडकले. महात्मा भगवान दीन यांनीं डॉक्टरांना सांगून टाकलें कीं, " गोपूजन व गोरक्षण ह्या गोष्टी काँग्रेसच्या कार्यक्रमांत नाहींत. त्या गोष्टी सभेंत होणार असतील तर मी सभेस हजर राहूं शकत नाहीं ! "

डॉक्टरांनीं त्यांचें म्हणणें शांतपणें ऐकून घेतलें, पण योजलेल्या कार्यक्रमांत बदल करण्याला त्यांनीं संमति दर्शविली नाहीं. ठरल्याप्रमाणें सभेच्या प्रारंभीं गोपूजन झालें. तेव्हां भगवान दीन तेथून तडक जाऊं लागले. अशा प्रसंगीं डॉक्टरांची लोकसंग्रहाची व समजुतीची भूमिका लवमात्र ढळली नाहीं. त्यांनीं भगवान दीन यांना आग्रहानें थांबवून घेतलें व परिषदेच्या संकेतांना मुरड घालून स्वागताध्यक्षांच्या भाषणानंतर त्यांना परिषदेपुढें विचार मांडण्याची विनंति केली. ते भाषण देऊन निघून गेल्यावर मगच सहस्रावधि लोकांसमोर डॉक्टरांनीं अध्यक्षीय भाषण केलें. सांचांतील गणपतीप्रमाणें सर्वांचे स्वभाव, मतें व वाग-णूक हीं एका ठशाचीं कधींच असूं शकणार नाहींत. पण अशा वेळीं प्रत्येक

क्षणाला भांड्यावर भांडे आपटूं देऊन घणघणाट होऊं न देतां, जरा सौजन्याचा हात समजूतदारपणाने लावून, होऊं लागलेला नादहि थाबविणे, यांतच लोक-संग्रहाचे रहस्य आहे. मतभेदातहि कटुता येऊं न देणे, ह्याकडे डॉक्टराचे असें सदैव लक्ष असलेले दिसे.

अनेकदा असे दिसून येते की, कांही जण 'आहे हे रुचेना व नवीन सुचेना' म्हणून निष्क्रिय बनतात. डॉक्टर ह्या वर्गातील नव्हते. त्यांनीं चाललेल्या गोष्टीतून अंगहि काढले नाहीं व नवीन शोधण्याचा हव्यासहि सोडला नाही. १९२२ नतरच्या एक-दोन वर्षांच्या कालखंडांत डॉक्टर व त्यांचे मित्र यानी बैठका घेऊन परिस्थितीतून काय मार्ग काढता येईल, यावर बराच खल केला होता. त्यासंबधी कर्मवीर बापूजी पाठक सागतात कीं, "डॉक्टर, बढे, हरकरे, वामनराव घोरपडे, हिंगणघाटचे घटवाई आदि आम्ही मित्रमंडळी टोगूच्या घरापाशी डॉक्टराकडे तीन-चार वेळां एकत्र जमलो होतो. त्यांत सर्वांचे एकमत होऊं शकले नाहीं. डॉक्टराचा कल निवडणुकीच्या राजकारणापासून अलिप्त अशी सस्था काढून यातून नवीन पिढी संस्कारित करण्याकडे होता. पण ही कल्पना इतराना रुचली नाहीं."

म. गांधी कारागृहांत जाण्यापूर्वींच असहकार आदोलन स्थगित झाले व कॉंग्रेसमध्ये निवडणुका लढवून विधिमंडळांत जाण्याचा विचार प्रभावी होऊं लागला. या स्थित्यंतराने खिलाफतीकडे कोणाचे पुरेसे लक्ष जाणें अशक्यच असल्याने तिचे पुढारीहि खट्टू झाले यांत नवल कोणते ? अशाच स्थितींत आणखीहि काही थपडा खिलाफतीच्या पुढाऱ्याना परिस्थितीने दिल्या. ज्या तुर्कस्थानच्या खलिफाचा कैवार घेऊन भारतांतील मुसलमान असहकार पुकारून उठले होते तो खलिफाच तुर्कांना नकोसा झाला व नवोदित तुर्कस्थानचा नेता केमाल पाशा याने खलिफा मेजीद यास चक्कच कळवून टाकले कीं, "खलिफा, तुझी गादी म्हणजे एक ऐतिहासिक अवशेष आहे. यापुढे तिचे अस्तित्व समर्थनीय नाही." ("The Caliphate, your office is no more than a historical relic. It has no justification for existence") या घटनेने इंग्रजांच्या विरुद्ध खिलाफतीनें घेतलेला पवित्रा आतां टिकणारा नव्हता. तेव्हां खिलाफतीच्या पुढाऱ्यांनी पुढे होऊन केमाल पाशा यांसच विनंति करण्यास प्रारंभ केला कीं, "आपणच आमचे खलिफा व्हा !" पण त्या शिष्टमंडळाला केमालनें प्रश्न केला कीं, "तुम्ही इंग्रज व फ्रेंच यांच्या अधिराज्यात राहतां. तेव्हां मी खलिफा झाल्यास माझ्या आज्ञा आपण पाळूं शकाल काय ?" ते शिष्ट गांगरून एकमेकांकडे पाहूं लागले ! तेव्हां केमाल उपहासाने म्हणाला कीं, "आज्ञा पाळणार नसाल तर खलिफा म्हणजे बुजगबाहुलेंच ठरेल !" एवढेच सागून केमाल थांबला नव्हता. त्याने जेत्या तुर्कांच्या दृष्टीने 'इस्लाम' हा जितांचा धर्म आहे व तो धर्म तुर्कस्थानांत

आल्यापासूनच तुर्कांच्या ऱ्हासाला प्रारंभ झाला आहे, असा सर्व देशांत प्रचार सुरू केला आणि लोकमत जागृत करून १९२४ च्या प्रारंभीं खलिफाचें तुर्कस्थानांतून समूळ उच्चाटन करून टाकलें ! खिलाफत आंदोलनाचा हिंदोळा ज्या फांदीवर झोंके घेत होता, तीच फांदी अशी तोडली गेली होती.

या घटनेनें खिलाफत आंदोलनामुळें जागृत व संघटित झालेल्या हिंदुस्थानांतील मुसलमान समाजांत स्वाभाविकपणेंच एक पराभूत मनोवृत्ति व वैफल्याची भावना बळावणें क्रमप्राप्त होतें. पण त्या वेळच्या मुसलमान पुढाऱ्यांनीं जागरूक राहून धूर्तपणानें दुबळ्या हिंदूंविरुद्ध आपल्या बांधवांना उठवून 'पॅन इस्लामिझम 'ची मशाल पेटती ठेवली व खिलाफतीच्या निमित्तानें उभी राहिलेली मुसलमानांची संघटना अभंग राखली. १९२३ नंतरचे मुसलमानांचे दंगे हा त्याच धोरणाचा परिपाक होता.

त्या वर्षापासून ठिकठिकाणीं, कधीं उघड्यावर गाईच्या हत्या करून तर कधीं हिंदूंच्या सवाद्य मिरवणुकी अडवून, मुसलमानांनीं हिंदूंवर आक्रमण करण्याला प्रारंभ केला. त्या वर्षी पंजाब, मध्यप्रदेश व इतर प्रांतांतूनहि अशीं आक्रमणें झालीं. १९२३ च्या उन्हाळ्यानंतर पंजाबांत सहाराणपूरला जो दंगा झाला त्यानें खिलाफत चळवळीचें हिंदुविरोधी स्वरूप स्पष्टपणानें जगासमोर आणलें. त्या वेळचे भीषण प्रकार पाहून आल्यावर देवतास्वरूप भाई परमानंद आपल्या 'आत्मकथे 'त म्हणतात कीं, " तेथील हिंदूंचें दैन्य व यातना पाहून मी अत्यंत व्यथित झालों व जेव्हां स्थानिक खिलाफत समितीचे पदाधिकारी हेच दंग्याचे व हिंदूंच्या जीवित-वित्ताच्या विध्वंसनाचे प्रवर्तक असल्याचें मला समजलें, तेव्हां सर्व हिंदु-मुसलमानांच्या दंग्याच्या मुळाशीं खिलाफत चळवळच आहे, हा निष्कर्ष ओघानेंच निघाला. " ( The misery and sufferings of the Hindus there, pained me deeply. And when I learnt that the office-bearers of the local Khilafat committee were responsible for the riots and the destruction of the lives and property of the Hindus, I was forced to the conclusion that the Khilafat agitation was at the bottom of all Hindu-Muslim riots. )

या अनुभवानें जागे होऊन भाई परमानंद लाहोरला आले व त्यांनीं 'हिंदु संघ ' नांवाची संस्था स्थापन केली. खिलाफत चळवळीचें असें स्वरूप १९२३ मध्यें नागपूरमध्येंहि पाहावयास मिळालें व त्यांतूनच डॉक्टरांनीं मनांत जुळवीत आणलेल्या कार्यामागील तात्त्विक भूमिका दृढ झाली.

नागपुरांत शुक्रवार तलावाच्या दक्षिणांगाला गणेश पेठ असून त्यांत एक गणेश मंडळ चालत असे. या मंडळाच्या कार्यालयासमोर मोकळी जागा पाहून मुसलमानांनीं एक झोपडीवजा मशीद उभी केली. हा प्रकार १९२१ मधील

असल्याने ' हिंदु-मुस्लिम भाई भाई ' च्या घोषणांचा परिणाम म्हणून हा प्रकार ध्यानीं येऊनहि हिंदूंनीं त्याला विशेष विरोध न करतां सर्व दृष्टीने साहाय्य केलें. मुसलमानांच्या आक्रमणाचे स्वरूप प्रारंभी दुर्लक्षिण्याइतके चोरटे असते व हळूहळू हिंदूंच्या मऊपणाने धीर चेपूं लागला की, त्याच एवढ्याशा कांट्याचा नायटा होऊन तो हिंदूंना छळू लागतो. नागपुरातील मशिदीला केलेले साहाय्य असेंच अंगलट आले. मशीद स्थिरपद झाल्यावर मुसलमानानीं ' वाद्ये वाजवू नका ' अशी समज हिंदूंच्या मिरवणुका अडवून देण्यास प्रारंभ केला. त्या वेळी मुसलमानाना दुखवायचे नाही, हा लोकाच्या मनावर इतका खोलवर सस्कार रुजलेला होता कीं, ढोल, ताश्ये वगैरे वाद्ये हिंदूनी त्वरित बद केली ! एवढे यश हाती येताच ' पखवाज बंद करा ' असे टुमणे सुरू झाले व क्रमाने वीणा, टाळ आदि मंजुळ वाद्येहि त्यांच्या कानांना झोंबूं लागली ! असे सागतात की, मशिदीला साहाय्य करतांना, ' आम्ही हिंदूच्या वाद्याना प्रतिबध करणार नाही, ' असे आश्वासन तेथील मुसलमानानीं दिले होते. पण १९२३ मध्ये ते धाब्यावर बसविले गेलें. इतकेंच नव्हे तर ज्या—मागील रस्त्याकडील—बाजूस त्या मशिदीला दार नव्हते, त्या बाजूला रातोरात दार पाडून मशिदीसमोरील रस्त्याप्रमाणेच मागील रस्ताहि मिरवणुकीला अडथळा करण्यास मुसलमानानी सोयीचा करून घेतला.

नागपुरात दिसणाऱ्या मशिदी या वास्तविक तेथील राजे भोसले याच्या उदार व सहिष्णु वृत्तींतून उभ्या राहिल्या होत्या व १९२०-२१ पर्यंत कोणत्याहि मशिदीवर हिंदूंच्या कोणत्याहि सवाद्य मिरवणुकीला कधींहि प्रतिबध नसे. पण १९२३ मध्ये मुसलमानानी कागावा करून जिल्हाधिकाऱ्याकडून त्या मशिदीवरून गणपतीच्या मिरवणुका नेण्यास सप्टेंबरमध्ये प्रतिबंध करविला. गणपतीची स्थापना होऊन अवघे चार-पांच दिवसच झाले होते आणि या नियंत्रणाने त्या भागांतील गणपतीची सवाद्य मिरवणूक काढणे अशक्य होणार होते. तेव्हा सवाद्य मिरवणूक काढण्यास अनुज्ञा मिळेपर्यंत गणपति-विसर्जन करावयाचे नाहीं, असा निर्णय तेथील मडळीनी राजे लक्ष्मणराव भोसले, डॉ. मुंजे, डॉ. हेडगेवार आदि पुढाऱ्यांच्या भरंवशावर घेतला व त्या दिशेने खटपटींना सुरुवात झाली.

कॉंग्रेस व खिलाफत समिति याच्यामध्ये बरेंच वाटाघाटीचे गुऱ्हाळ चालूनहि विशेष काहीं निष्पन्न होण्याचें चिन्ह दिसेना. स्थानिक खिलाफत समितीच्या प्रतिनिधींनी वकिली भाषा सुरू केली. ते सांगूं लागले की, " तुम्ही मशिदीसमोर दहा पावले जागा रिकामी सोडून दोन बाजूंना दोन वाद्यांचे ताफे वाजत उभे ठेवावे. मात्र या मधल्या जागेतून जाताना वाद्ये बद ठेवावी. या योजनेने तुमचे वाद्य बंद पडणार नाहीं व मशिदीसमोरून ठराविक जागेतून वाद्ये वाजत गेली असेंहि आम्हास वाटणार नाही ! " या त्यांच्या सूचनेतूनहि एक गोष्ट स्पष्ट होत होती की, त्या वाद्याची त्याना कटकट होणार नव्हती तर मशिदीसमोर दहा

पावलांच्या पट्ट्यांत तेवढीं तीं वाजूं नयेत, असा दुराग्रह ते हिंदूंवर लादूं पहात होते. या सूचनेला अर्थातच हिंदूंनीं नकार दिला व गणपति जागच्या जागींच राहिला ! मात्र गांवांत हिंदु-मुसलमान संबंध साहजिकच बिघडले.

पुढें ऑक्टोबरमध्यें त्याच मार्गानें काकड आरतीची दिंडी जात असते तिलाहि हे विघ्न आणतील, या कल्पनेनें राजे लक्ष्मणराव भोसले यांनीं तत्पूर्वी मुसलमान पुढाऱ्यांना घरीं बोलावून घेतलें व 'काकड आरतीची पांच टाळांची दिंडी जाऊं द्याल कीं नाहीं याचें विचारपूर्वक उत्तर द्या,' असा खरमरीत प्रश्न केला. त्यांतील रोख ओळखून त्यांनीं होकार दिला व ते परतले. याप्रमाणें दि. २३ ऑक्टोबरची दिंडी निर्विघ्नपणें वाजत गेली. पण दुसऱ्याच दिवशीं मुसलमानांनीं चवताळून व दिलेला शब्द मोडून अडथळा केला. त्यांना आरक्षकांचेंहि त्या दिवशीं साहाय्य होतें. पण या दोघांच्या अडथळ्याला न जुमानतां दि. २४ ची दिंडी पार पडली. पण दि. २५ पासून जाणारी दिंडी आरक्षक अटकवूं लागले व चौकीवर नेऊन दहा-दहा रुपयांचा जातमुचलका व दहा-दहा रुपयांचा जामीन घेऊन मगच सुटका होऊं लागली.

या दिवसांत डॉ. हेडगेवार, डॉ. चोळकर, श्री. दाजीशास्त्री चांदकर यांनीं, अधिकाधिक लोकांनीं दिंडींत भाग घ्यावा म्हणून निरनिराळ्या भागांत सभा घेण्याचें सत्र सुरू केलें व घरोघर जाऊनहि या गोष्टीचा प्रचार केला. दि. ३० ऑक्टोबरला जिल्हाधिकाऱ्यानें आज्ञा काढली कीं, त्या रस्त्यावरून दिंडी नेऊं नये. त्याचें कारण असें दाखविण्यांत आलें कीं, मुसलमानांचा 'फज्र नमाज' व दिंडी या दोहोंचीहि वेळ सूर्योदयापूर्वी ५॥। ते ६। अशी अगदीं एकच आहे. अशी सरकारी आज्ञा निघाली तरी दिंडी नेण्याचा क्रम चालूच ठेवावयाचा, असा सर्व मंडळींचा अभंग निश्चय होता व त्या निश्चयाला साकार करण्यासाठीं चढत्या-वाढत्या संख्येंत लोकांना उभें करण्याचें काम डॉक्टर मोठ्या हिरीरीनें करीत होते. सरकारी आज्ञा निघाली त्या दिवशीं सायंकाळीं प्रचंड सभा होऊन हिंदूंच्या अधिकाराच्या रक्षणासाठीं राजे लक्ष्मणराव, सरदार तात्यासाहेब गुजर, गंगाधरराव चिटणवीस, डॉ. मुंजे व डॉक्टर यांची एक समिति स्थापन करण्यांत आली. त्या समितीचे डॉक्टर हे कार्यवाह होते. दि. ३१ ऑक्टोबरपासून दहा-बारा दिवस नागपूर नगर "जय विठ्ठल जय जय विठ्ठल !" या भजनानें दुमदुमून गेलें ! बाहेरील राजकारणांतील पक्षोपपक्षांचे भेद व सामाजिक कलह यांचा रंग त्या प्रभावी वातावरणांत आपोआपच फिका पडला व या दिंडी-सत्याग्रह आंदोलनाला सामूहिक व प्रातिनिधिक स्वरूप प्राप्त झालें.

गुरुवार दि. ८ नोव्हेंबरच्या दिंडींत डॉ. चोळकर, डॉ. परांजपे, डॉक्टर हेडगेवार अशा एक्केचाळीस जणांनीं भाग घेतला. त्या दिंडींत आंदोलनाचे कांहीं प्रवर्तकच असल्यानें दिंडीच्या रस्त्यावर मनस्वी जनसंमर्द लोटणें स्वाभाविकच

होते. ती दिडी टाळ वाजवीत मशिदीजवळ आली व नेहमींप्रमाणें तिला अटकाव होऊन सर्व लोक पकडले गेले. तेथून सर्वांना वाकर व केळीबाग रस्त्याने मुख्य चौकीवर नेण्यांत येत असताहि त्या मंडळीनीं अखंड भजन चालूच ठेवले होते. या दिवशीं राजे लक्ष्मणराव व सर गंगाधरराव चिटणवीस आदि प्रमुख मडळी दिडींत समाविष्ट न होता त्यामागोमाग चालत होती.

या दिवसात त्या मशिदीजवळ शभर-सवाशे सशस्त्र आरक्षक उभे असावयाचे. गावातील वातावरण पुढाऱ्यांच्या दृष्टीने अत्यंत धोक्याचे असल्यानें इतरत्रहि पहारा असे. या तंग वातावरणांत डॉ. मुंजे व डॉक्टर आदि मडळीना खुनाच्या धमक्या देणारीं पत्रे येऊं लागलीं. डॉ. मुंजे याची मोटार होती, पण डॉक्टर हेडगेवाराचा मात्र सर्व व्यवहार पायींच चालू असावयाचा. पण भय ही गोष्ट त्यांच्या गांवीहि नसे. ते त्या दिवसातहि पहांटे व रात्री एकटेदुकटे थेट मुसलमान वस्तींतूनहि जावयाचे. त्या वेळीं त्याचे मित्र सावधानता म्हणून त्याच्या इच्छेविरुद्ध त्याच्याबरोबर असण्याची दक्षता घेत. त्यावर डॉक्टर म्हणत, " माझे कोण काय करणार आहे ? ही नसती भीति कशाला ? "

अशा तंग वातावरणात हिंदु समाजातील उत्साह चढू वाढू लागला व दिडी पाहण्यासाठीं जवळ जवळ नागपूरच लोटूं लागले. दि. ११ नोव्हेंबरला स्वतः राजे लक्ष्मणराव यांनीं सत्याग्रह केला, तेव्हा तर चाळीस सहस्राहून अधिक लोकांनीं रस्ता फुलवून टाकला ! ते जनताजनार्दनाचे विराट स्वरूप त्या काळाच्या दृष्टीने नागपुरांत अपूर्वच होते व त्याचा परिणाम म्हणून प्रत्यक्ष दिडीला अटक होण्यापूर्वीच पांच टाळाची दिंडी मशिदीवरून नेण्यास मुसलमानानीं आपण होऊन होकार दिला. हे अल्पसे यश मिळालेले पाहून सर्वानाच 'संघटित प्रयत्नातून काम साधूं शकते,' याचा प्रत्यय आला होता. तेव्हा याच उत्साहाला टिकाऊ व सघटित स्वरूप द्यावे, असा विचार करून त्याच दिवशीं रात्री प्रकट सभा घेण्यात आली. डॉक्टर हेडगेवार हे अध्यक्ष होते.

या सभेंत दहा सहस्र नागरिकांसमोर हिंदुसभा स्थापन केल्याचे घोषित करून राजे लक्ष्मणराव म्हणाले कीं, "हिंदुधर्माचे हक्क सर्व हिंदूना हिंदुस्थानात उपभोगता आले पाहिजेत. हे हक्क हिंदुस्थानांतच, हिंदूंच्या मातृभूमींतच. उपभोगता येणार नाहीत तर त्यांनीं पृथ्वीच्या कोणत्या भागावर उपभोगावेत ? हिंदुधर्म म्हणजे गणेश पेठेतील काकड आरती किंवा गणपतीची मिरवणूक एवढ्यापुरताच नाही. हीं भांडणे म्हणजे आंधळ्या हिंदु लोकांना दृष्टि आणणारीं अंजनेंच होत. "

या दिवशीं घोषित झालेल्या हिंदुसभेच्या अध्यक्षस्थानी राजे लक्ष्मणराव भोसले व उपाध्यक्ष म्हणून डॉ. मुंजे याची योजना झाली होती व कार्यवाहाचे काम डॉक्टरांवर सोपविलेले होते. त्याचप्रमाणे या सभेच्या प्रचारक मंडळावर डॉक्टर व विश्वनाथराव केळकर याची योजना करण्यांत आली होती.

आपणांला पड खावी लागली, याची चीड मुसलमानांना येणें त्यांच्या मनोरचनेशीं सुसंगतच होतें. त्यांच्या मोहल्ल्यांतून दि. १९ ला कार्तिकी एकादशीच्या दिवशीं या अपमानाचें उट्टें काढण्याची भाषा सुरू झाली व ठिकठिकाणीं घोळके जमून त्याचा खल होऊं लागला. या गोष्टीचा कानोसा डॉ. मुंजे, डॉ. हेडगेवार प्रभृतींनीं अचूक घेतला होता व सरकारनेंहि दक्षता म्हणून नमाजाच्या पांच वेळां घोषित करून त्या वेळां वगळून इतर वेळांत हिंदूंनीं आपल्या दिंड्या मशिदीवरून वाजवत न्याव्यात, असा आदेश दिला. रविवार दि. १८ नोव्हेंबरला रात्रीं एक-दोन वाजतां व दुसऱ्या दिवशीं सकाळीं राजे लक्ष्मणराव, डॉ. मुंजे, डॉ. हेडगेवार व उदाराम पहिलवान यांनीं मोटारीनें नागपूरभर फिरून नमाजाच्या वेळां चुकवून दिंड्या वाजतगाजत न्याव्यात, असें सांगण्यासाठीं खटपट केली. या खटपटीला यश येऊन त्या दिवशींच्या दिंड्यांमध्यें संयम व शिस्त चांगलीच दिसून आली. पण हिंदूंच्या संयम व शिस्तीनें शांतता थोडीच टिकणार होती ? इतकें नियमबद्ध वागूनहि मुसलमानांनीं सायंकाळीं ५ नंतर गणेशपेठेंतील परतणाऱ्या दिंडीवर दगड, विटा, जोडे यांचा मारा केला व कांहीं प्रमाणांत लाठ्याकाठ्या, सुरे व तरवारी यांचा वापर करून चाल केली. या ठिकाणीं दोन चांगल्याच चकमकी झडल्या. नगरांतील इतर भागांतहि तुरळक झगडे व चकमकी झडल्या व बाचाबाची होऊन वातावरण अत्यंत गंभीर झालें ! या दिवशीं घोळक्याघोळक्यानें हिंडणारे मुसलमान ' अल्ला हो अकबर ' व ' दीन ! दीन ! ' म्हणून गर्जत होते ! दुसऱ्या दिवशींहि कोष्टीपुरा, हंसापुरी व इतवारी या भागांत झटापटी झाल्याच.

ही परिस्थिति आटोक्यांत आणण्यासाठीं जे प्रयत्न झाले, त्यांत डॉक्टर हेडगेवार अग्रेसर होते. त्यांना या ' अल्ला हो अकबर ' घोषणेमागील मुसलमानांची हिंदुविरोधी वृत्ति आतां चांगलीच प्रत्ययास आली होती व ते त्या वेळीं मित्रांजवळ म्हणूंहि लागले होते कीं, ' अल्ला हो अकबर ' या घोषणे-मागील वृत्तीला उत्तेजन देऊन आपण ' राष्ट्राची कबर ' बांधीत आहेंत ! त्यांनीं हिंदु वस्तींतील प्रमुखांना भेटून रात्रभर अखंड गस्ती सुरू केल्या व स्वतः जागल्याप्रमाणें या गस्तींची पहाणी करण्यासाठीं रात्रीं सर्वत्र हिंडण्यास सुरुवात केली.

नागपुरांतील हिंदु समाजांत एक नवचैतन्य खेळूं लागलें होतें व त्याचा प्रत्यय कार्तिकी त्रयोदशीच्या दिवशीं जागोबाची जी मिरवणूक निघाली त्यावरून सहज येण्यासारखा होता. या मिरवणुकींत गंधाचे ठळक टिळे लावून व हातांत सणसणीत लाठ्या घेऊन लोक उपस्थित झाले. त्या दृश्याचें वर्णन करतांना " संबंध इतवारींत काठ्यांचें जणूं काय अरण्यच एकाएकीं पैदा झालें आहे कीं काय असा, पाहणारास भास होई ! " असें ' महाराष्ट्र 'नें म्हटलें होतें. यानंतर दोन दिवसांनीं त्रिपुरी पौर्णिमा असल्यानें त्या दिवशीं काकडआरतीची समाप्ति

व्हावयाची होती. त्याच समाप्तीबरोबर अनेक दिवस योग्य संधीची वाट पहात राहिलेल्या गणेशपेठेतील 'गणपती'ला पोचवावे असा बेत ठरला व त्या दिशेने सर्व शहरात हिंदुसभेच्या प्रचार मंडळाने डॉक्टरांच्या नेतृत्वाखाली झंझावाती प्रचार केला.

पौर्णिमेच्या दिवशी दुपारीं तीन वाजतांच मिरवणूक निघाली. या वेळीहि काठ्याचा समुद्र उसळला होता. या दिवशीच्या अपूर्वाईचे वर्णन असे केलेले आढळते की, " शहरातील कोणीहि लहान-मोठा पुरुष आज घरी बसून राहिला नाहीं. " त्या दिवसाची ही मिरवणूक गणरायाच्या जयजयकारात उत्साहाने पार पडली. या गाजलेल्या मिरवणुकीने मुसलमान पुन्हा चिडले व पुढे तीन-चार दिवस भुरट्या चकमकी व दगडफेक असे प्रकार चालू राहिले. गस्त सुरू होतीच, तरीहि एका दिवशी मारुतीची मूर्ति फोडली जाऊन नागेश्वर-मंदिरात व जैन मंदिरात गाईचे पाय टाकल्याचे आढळून आले ! या घटनेने सर्वत्र संतापाची लाट उसळली व त्यांतून हरताळ व निषेधसभा एवढेच न घडता मुसलमानाचे आक्रमक अत्याचार बंद पडेपर्यंत सर्व हिंदूंनीं त्याच्यावर कडक बहिष्कार टाकावा, असा घरोघर प्रचार सुरू झाला व त्याने जनमनाची चागलीच पकड घेतली.

नागपुरांतील या सर्व धामधुमींत काहीं वेळा मशिदीजवळ वाद्ये वाजविण्यास मात्र वाजत्री कचरूं लागत. तो वास्तविक त्यांचा दोष नव्हता. जे दुबळे संस्कार अखंडपणाने त्यांच्या मनावर होत होते, त्यातून या भीतीचा जन्म झालेला होता. या वेळी ही भीति उडवून लावावयाची, या निश्चयाने डॉक्टर व त्यांचे सहकारी मशिदीजवळ अशा मिरवणुकाच्या प्रसगी स्वतः उभे राहत व वाजत्री कचरू लागल्यास स्वतः ढोल गळ्यात घालून तो वाजवू लागत. यामुळे त्या दोन-तीन वर्षांत घरगुती लग्नमुंजीच्या मिरवणुकाना डॉक्टरानी यावे म्हणून लोक आठवण-पूर्वक निमंत्रण देत असत, असे सागतात. या वातावरणांतून वावरत असता ते मनांत म्हणत की, नागपुरात मुसलमानाची वस्ती हिंदूंच्या केवळ एक-सप्तमाश असतां, त्यांनी औद्धत्याने आपणावर हात टाकावा व बहुसंख्य हिंदु वस्तीत स्वसंरक्षणासाठीं गस्ती घालण्याचा प्रसंग यावा, ही खरोखरच चिंतनीय घटना आहे. वास्तविक बहुसंख्य हिंदूंच्या अस्तित्वाने व सौजन्याने मुसलमानाच्या मनात अनुक्रमे भीति व प्रेम याचा उद्भव व्हावयास पाहिजे. पण असे न घडता, वळचणीचें पाणी आढ्याकडे जावे, त्याप्रमाणे उलट आपल्यावर द्वेषाने व त्वेषाने हात का उचलला जावा ? अशा प्रश्नांनीं त्याच्या मनात काहूर उसळे व या विपरीत अनुभवाच्या अगदीं मुळाशीं जाऊन ते कारणमीमासा करूं लागत.

असे अनुभव येत असता अनेक प्रकारचे विचार उत्पन्न होऊं शकतात. दुसरा पक्ष बलवान् आहे व आपण तसे बलवान् होऊं शकणार नाहीं, या आत्म-विश्वासहीनतेने कोणी गळाठून जातात; तर कोणी तेवढ्या संकटापुरती कांही तरी

घाईघाईनें उपाययोजना करून अल्पकाळापुरती सोडवणूक करून घेऊन समाधान मानतात. अशा आपत्तीचें खापर इतरांच्या असहिष्णु व तामसी वृत्तीच्या माथीं फोडून त्यांनाच सौजन्याचा व सहिष्णुतेचा शाब्दिक उपदेश करण्याकडे कोणाचा कल असतो, तर स्वतःच्या दोषांकडे न पाहतां आक्रमकांच्या नांवानें खडे फोडीत राहण्यांत व त्यांना शिव्याशाप देण्यांतच कांहींच्या विचारांची परिणति असते. आणखीहि एक अहंकारी व हट्टी प्रकार दिसून येतो. तो असा कीं, आपल्या सौजन्याच्या दुधाचे प्रतिपक्षाच्या सापाला घुटके पाजून त्याला अविषारी व अहिंसक बनविण्याचा अद्भुत प्रयत्न ते करीत असतात व त्या सापाची लवलवती जिह्वा व फूत्कार समोर दिसत असतांहि आपल्या प्रयत्नांची दिशा बदलविण्याची आवश्यकता त्यांना कधींच वाटत नाहीं! धन्य आहे त्यांच्या धृतीची! पण डॉक्टरांच्या उत्कट राष्ट्रभक्तीमुळें व विवेकशीलतेमुळें ते अशा कोणत्याहि प्रकारच्या वावटळींत सांपडले नाहींत. हिंदूंचा अपमान होतो व त्यांच्यावर विनाकारण आक्रमण होतें, याची त्यांना अत्यंत चीड येई. पण यापुढील त्यांची विचारपद्धति स्वतंत्र असे. त्यांना स्पष्ट दिसे कीं, मूठभर लोक असंख्य हिंदूंवर क्रूर आघात करतात, हें आक्रमकांचें शौर्य नसून हिंदूंच्या विसंघटित व स्वाभिमानशून्य स्थितीचा स्वाभाविक परिणाम आहे. यासाठीं इतरांचा द्वेष न करतां, त्यांच्या नांवें खडे फोडीत न बसतां वा सौजन्यानें दुष्टांचें हृदयपरिवर्तन करण्याचा अव्यवहारी मार्ग न चोखाळतां, आपल्या समाजांतील ज्या दोषांमुळें इतरांना आक्रमक बनण्यास प्रोत्साहन मिळतें, ते दोष कटाक्षानें व द्रुतगतीनें निखंदून टाकून तारुण्य, स्वाभिमान व पराक्रम यांनीं युक्त असा समाजपुरुष जागृत रूपांत उभा केला पाहिजे, असें त्यांना वाटे. त्यांच्या विचारांना हा घाट या काळांतच आला होता.

ही जशी त्यांच्या विचारांतील नवीनता होती, त्याचप्रमाणें आणखीहि एका विचारानें त्यांच्या मनांत खळबळ माजविली होती. जों जों हिंदु-मुसलमानांच्या ऐक्याविषयीं त्यांना ऐकावयास व पहावयास मिळे, तों तों त्यांचें मन विचारूं लागे कीं, आज तर एकी मुळींच दिसत नाहीं; पण पूर्वीं तरी केव्हां होती? थेट दाहिरापासून अगदीं आपल्या स्वराज्याचा अस्त होईपर्यंत, कधीं पृथ्वीराजानें तर कधीं राणा प्रतापानें, कधीं हक्क–बुक्क द्वयानें तर कधीं कृष्णदेवरायानें, कधीं गुरु बंदानें तर कधीं गुरु गोविंदानें, कधीं छत्रपति शिवरायानें तर कधीं संताजीनें, कधीं थोरल्या बाजीरावानें तर कधीं महादजी शिंद्यानें, पण मुसलमानांच्या तत्कालीन आक्रमणाला स्पष्टपणें 'परकीय' समजून धुळीला मिळवण्यासाठीं व आपल्या भारतीय संस्कृतीची विजयध्वजा पुन्हा अटकेपार डोलविण्यासाठींच पराक्रम केलेला दिसतो. अशा स्थितींत भारतीय मंदिरें, भारतीय कल्पना यांचा ठायीं ठायीं विध्वंस करून परक्या अरबी इस्लामची दीक्षा

भारताला देण्यासाठीं आपल्या असंस्कृत, असहिष्णु व अमानुष वृत्तीने अखंड कारस्थाने रचणाऱ्या या लोकांना आपण आजच आपले का मानूं लागलों ? त्यांच्या मनांत हिंदु समाजाविषयी व नराचा नारायण करणाऱ्या त्याच्या अपूर्व दैवी संस्कृतीविषयी आस्था निर्माण झाली आहे काय ? की जगूं व जगवूं अशा मानवतेला भूषणभूत झालेल्या भारतीय सहिष्णुतेचा स्वीकार करून 'भारतमाते'च्या जयजयकारात ' एक स्वर मेरा मिला लो ' असे ते म्हणूं लागले आहेत ? यातील कोणतेच अनुकूल परिवर्तन झाले नसेल तर इंग्रज हे जितके आक्रमक, तितकेच मुसलमानहि आक्रमकच आहेत. अशा स्थितीत हिंदुस्थानावरील दोन आक्रमणे मोडून काढावयाचीं असून हिंदु समाजाच्या पुरातन पण नित्यनूतन अशा जीवन-परंपरेची पावनगंगा अप्रतिहतपणे वाहू लागेल, अशी परिस्थिति निर्माण करावयाची आहे, हे त्यानी ओळखले. बाहेर चाललेल्या ' हिंदु-मुस्लिम भाई भाई ' या आत्मघातकी व एकांगी घोषणेचा उगम, हिंदु समाजाला आपल्या खऱ्या इतिहासाची विस्मृति झाल्याने व इंग्रजानी, जो जो या देशात राहील तो तो या देशाचा धनी, अशी विकृत कल्पना शिक्षित हृदयांत खिळविल्यामुळे झालेला आहे, हे डॉक्टराना स्पष्ट दिसू लागले व त्यातूनच प्रभावी व अजेय हिंदु संघटनेच्या महामंत्राचा त्याना साक्षात्कार झाला.

एकाच वेळी पण निरनिराळ्या ठिकाणी असणाऱ्या दोन व्यक्तींनीं परिस्थितीविषयीं घेतलेले वेध हे केव्हा केव्हां आश्चर्य करण्याइतके समान असतात. हिंदुस्थानात सर जगदीशचंद्र बसु याना ज्या वेळीं बिनतारी यंत्राने संदेश पाठविण्याची कल्पना सुचली त्याच वेळीं इटलीतील मार्कोनीहि त्याच कल्पनेला साकार करण्याच्या मार्गावर होता. अशा समान कल्पना एकाच वेळी दोन व्यक्तींना स्फुराव्यात, असा प्रकार १९२२–२३ मध्येहि झालेला दिसतो. डॉ. केशवराव हेडगेवार याच्या मनात असे विचारमंथन पूर्ण होत आलें असतां रत्नागिरीच्या कारागृहांत याच हिंदुत्वाच्या दिव्यतेचा साक्षात्कार स्वातंत्र्यवीर सावरकर याना झाला होता. एवढेच नव्हे तर त्यांनीं आपल्या ओजस्वी व प्रतिभाशाली लेखणीने तो प्रकट करून १९२२–२३ मध्ये कौशल्याने कारागृहाबाहेर पाठविला होता. योगायोग असा कीं, तो ' हिंदुत्व ' ग्रंथ प्रथम आला तो डॉक्टरांचे एक जिवलग मित्र श्री. विश्वनाथराव केळकर वकील याजकडेच. या वेळी हे हस्तलिखित डॉक्टराच्या वाचनात आलें असेल हे सागावयास नकोच. आपल्या मनातील हिंदुत्वाच्या व हिंदु राष्ट्रीयत्वाच्या कल्पना व त्या ग्रंथांतील तर्कशुद्ध, रेखीव व ठाम हिंदुत्वाचे प्रतिपादन यांतील साधर्म्य डॉक्टरांचा आत्मविश्वास वाढविणारेच ठरले असेल यांत लवमात्र शंका नाहीं. डॉक्टरांना तो ग्रंथ अतिशय आवडला व त्यानी त्या काळांत व त्यानंतरहि त्या पुस्तकाचा सर्वत्र प्रसार सुरू केला. निद्रित हिंदु समाजाच्या दृष्टीनें बाहेरील मुसलमानी आक्रमणे हीं ' भयसूचक घंटे 'प्रमाणे उपयुक्त

ठरलीं होतीं. पण त्याहून सुप्त मनाला खडबडून उठविण्याचें सामर्थ्य स्वातंत्र्यवीरांच्या ' हिंदुत्व ' या युगप्रवर्तक ग्रंथांत होतें, अशीच इतिहास साक्ष देईल.

पण स्वातंत्र्यवीर सावरकर या वेळीं कारागृहांत होते व त्यांच्या सुटकेसाठीं सरदार वल्लभभाई पटेल, श्रीमती सरोजिनी नायडू व श्री. जमनादास मेहता प्रभृतींनीं १९२३ मध्यें मुंबईच्या सभेंत मागणी केली होती. नागपुरांत तर सावरकरांचा चाहता वर्ग फारच मोठा होता व त्यांनींहि या दिशेनें एक-दोन वर्षें खटपट चालविली होती. दि. १४ ऑक्टोबरला नागपुरांत तात्याराव सावरकरांच्या मुक्ततेच्या मागणीसाठीं काँग्रेसकडून जी सभा झाली त्यांत डॉक्टरांचें कडक भाषण झालें होतें. ते म्हणाले कीं, "...१४ वर्षांनंतर सरकारनें त्यांस सोडलें तर त्यांत कांहीं मेहेरबानी नाहीं. तो कायदाच आहे. न्यायाचा खून पाडून त्यांना शिक्षा देण्यांत आली हें अपयश पुसून काढण्याची सरकारची इच्छा असेल, तर तें त्यांस सोडील. पण सरकारची तशी इच्छा दिसत नाहीं. सावरकरांना एकतर्फी पुराव्यावर शिक्षा झाली आहे ! सरकार शुद्ध खुनशीपणा दाखवीत आहे. त्यांस आतांहि सोडण्यांत न आलें तर हिंदी राष्ट्राविषयीं सरकारच्या मनांत कशी अढी आहे, याचा तो आणखी एक पुरावा म्हटला पाहिजे."

अशा असंख्य उलाढालींत १९२३ साल तेव्हांच निघून गेलें असलें तरी या असामान्य मंथनांतून एक अमृतकुंभ डॉक्टरांच्या हातीं पडला होता व तो म्हणजे ' हिंदुराष्ट्रवाद ' !

* * *

## १२ : संघाचा संकल्प

स्वातंत्र्य व तेहि संपूर्ण स्वातंत्र्य ही डॉक्टर व त्याची संस्था—नागपूर नॅशनल युनियन—यांच्या प्रतिपादनातील विशेषता होती. त्या काळात धोरण म्हणून म्हणा वा मनाची धारणाच तेवढी म्हणून म्हणा, पण बहुतेक पुढारी साम्राज्यातर्गत स्वायत्ततेच्या आसपास घुटमळत असत. सर्वोदयवादी आचार्य दादा धर्माधिकारी अशी आठवण सागतात की, या काळात राष्ट्रीय उत्सव मंडळांत वा अन्य कोठेहि एखाद्या व्यक्तीला भाषणाला बोलावताना ‘ सपूर्ण स्वातंत्र्याचीच कल्पना माडा ’ अशी आग्रहपूर्वक सूचना करण्यास डॉक्टर कधींहि विसरत नसत. याच निर्भेळ स्वातत्र्याचा प्रचार अधिक वेगाने व प्रभावीपणाने केला पाहिजे, अशी आवश्यकता त्या आदोलनानंतरच्या विफलतेच्या व गोधळाच्या काळात विशेषच होती. तीच ध्यानी घेऊन १९२३ च्या मध्यावर डॉ. हेडगेवार, विश्वनाथराव केळकर, डॉ. खरे, वासुदेवराव फडणीस, श्री. गोपाळराव ओगले, बळवंतराव मडलेकर आदि मडळीनीं नागपुरात एक ‘ स्वातंत्र्य ’ नांवाचे दैनिक काढण्याचा सकल्प सोडला व एक-दोन महिने प्रात-भर खटपट करून एक सहकारी तत्त्वावर ‘ स्वातत्र्य—प्रकाशन—मडळ ’ स्थापन करण्यात आलें. या मडळाच्या उभारणीसाठीं डॉ. खरे व डॉ. हेडगेवार यानी वऱ्हाडमध्येहि सचार करून पैसा उभारला होता. त्या वेळची शैक्षणिक दृष्टीने मध्यप्राताची जी मागासलेली स्थिति होती, ती विचारात घेतां दैनिक काढणे हे एक धाडसच म्हणावे लागेल. कारण तुटपुंज्या वाचकवर्गात प्रजापक्ष ( अकोला ) उदय ( अमरावती ), लोकमत ( यवतमाळ ), तरुण—भारत ( वर्धा ), मारवाडी प्रणवीर व महाराष्ट्र (नागपूर ) इतक्या साप्ताहिकांनीं आपली पाळेमुळे रोवलीं होतीं. पण तरुण मनाची उभारी ही इतकी विलक्षण असते कीं, ती परिस्थितीचा रंग ओळखूनहि त्यावर मात करण्याची आकांक्षा सोडीत नाहीं. नागपुरातील या तरुणाचा हा ‘ स्वातंत्र्या ’चा प्रयत्न हा याच कोटींतील होता. चिटणीस उद्यानाजवळील बेनिगीरबुवांच्या वाड्यांत ‘स्वातंत्र्य’ दैनिकाचे कार्यालय थाटण्यात येऊन १९२४ च्या प्रारंभीं श्री. विश्वनाथराव केळकर याच्या संपादकत्वाखाली ‘ स्वातंत्र्य ’ सुरू करण्यात आलें. डॉक्टर हेडगेवार हे प्रकाशन मंडळाचे एक प्रवर्तक होते व ‘ स्वातंत्र्य ’ दैनिकाच्या प्रारंभापासून त्याच्या मार्गात येणाऱ्या

सर्व अडचणी दूर करण्याचें काम त्यांनीं सहर्ष सांभाळलें होतें व त्यामुळें एका अर्थानें त्यांना संचालक म्हणणेंच युक्त ठरलें असतें. या दिवसांत डॉक्टर जेवणासाठीं घरीं येत व कांहीं सार्वजनिक सभा-समारंभ यासाठीं जाणारा वेळ वगळून बाकी सर्व काळ ते ‘ स्वातंत्र्य ’ दैनिकाच्या कार्यालयांत असावयाचे. लिखाण कमी पडलें तर ते कधीं कधीं हातांत लेखणी घेत व इतर वेळीं संपादकांनीं लिहिलेलें लिखाण पारखून त्यांत कमीअधिक करण्यासहि सुचवीत. हें दैनिक जेमतेम एक वर्षभरच चाललें. पण तेवढ्या अवधींत दोन-तीन संपादक झाले ! कांहीं दिवस विश्वनाथराव केळकर यांच्या साहाय्याला मुंबईहून मराठींतील सिद्धहस्त लेखक श्री. अच्युतराव कोल्हटकर यांनाहि आणण्यांत आलें होतें. त्यांचें लेखन विपुल, सरस व चटकदार असावयाचें, पण नागपूर भागांत दैनिकाला त्यांच्या अपेक्षेइतकें क्षेत्र नसल्यानें, तेहि अर्ध्याहून परत गेले. त्यानंतर श्री. गोपाळराव ओगले यांना संपादक होण्याचा आग्रह करण्यांत आला व त्यांनीं कांहीं दिवस काम पाहिलें. ह्या दैनिकांत स्वातंत्र्यवादी लेख बरेच येत असावेत अशी कल्पना आहे; पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, बरीच शोधाशोध केल्यानंतर नागपूरला केवळ एक अंक उपलब्ध होऊं शकला ! तो अंक म्हणजे मराठींतील विख्यात लेखक डॉ. शं. दा. पेंडसे यांच्या दक्षतापूर्ण जपणुकीचा प्रसादच म्हटला पाहिजे. त्या अंकांत ‘ बॅ. सावरकर अध्यक्ष पाहिजेत ’ या शीर्षकाखालीं त्यांचा लेख आला होता व त्यांच्या स्वभावाप्रमाणें त्या लेखासाठीं त्यांनीं तो अंक आपल्या संग्रहीं जतन करून ठेवलेला आढळला. अर्थातच या नव्या नवसाच्या अंकावरूनहि त्या दैनिकाचें स्वरूप कांहींसें समजूं शकतें.

‘ स्वातंत्र्य ’ दैनिक सोमवारव्यतिरिक्त निघे व त्याच्या किरकोळ अंकाची किंमत दोन पैसे असे. वार्षिक वर्गणी साडेबारा रुपये होती व दैनिकाच्या शीर्षभागीं ‘ वऱ्हाड-मध्यप्रांताचें प्रमुख आणि एकटेंच दैनिक ’ अशी ग्वाही झळकत असे ! पहिलें व चौथें पान संपूर्ण प्रकटनांनीं ( जाहिरातींनीं ) व्यापलेलें होतें. त्यांतील मुखपृष्ठावर ‘ एकोज् फ्रॉम अंदमान्स् ’ व शेवटल्या पृष्ठावर ‘ हिंदुत्व ’ या स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या पुस्तकांचीं प्रकटनें केलेलीं आढळतात. हा स्वातंत्र्याचा पहिल्या वर्षातील ( नि दुर्दैवानें शेवटच्याहि ) २३८ वा अंक गुरुवार दि. ६।११।१९२४ चा आहे. या वेळीं स्वातंत्र्यवीर सावरकर यांची नुकतीच प्रत्यक्ष कारागृहांतून मुक्तता होऊन त्यांना त्र्यंबकेश्वर येथें येण्यास कांहीं दिवसांची मोकळीक मिळाली होती. तेव्हां याच वेळीं नागपूरला होणाऱ्या साहित्यसंमेलनाला त्यांना अध्यक्षस्थान मंडित करण्याची विनंति करावी, अशी डॉ. हेडगेवार, वासुदेवराव फडणीस व डॉ. शं. दा. पेंडसे यांनीं खटपट सुरू केली. ‘ स्वातंत्र्य ’ दैनिकांतूनहि तशी मागणी करणारे लेख येऊं लागले. या लेखांशीं श्री. गोपाळराव ओगले सहमत नव्हते. तेव्हां त्यांनीं संपादकत्व सोडण्याची इच्छा प्रदर्शित केली.

याच काळांत स्वातंत्र्य-प्रकाशन-मंडळाची आर्थिक स्थिति अत्यंत हलाखीची झाली होती व त्यामुळे प्रत्येक उगवणारा दिवस हा डॉक्टराच्या चिंतेंत भरच घालणारा ठरला असल्यास नवल कोणते ?

हा 'स्वातंत्र्य' दैनिकाचा खटाटोप तत्त्वज्ञानाच्या प्रसाराच्या उत्कट लालसेंतून डॉक्टरांनी चालविला होता. हे सर्व प्रयत्न त्यांनीं विनावेतन केले होते, हें आज कोणाला सांगून खरे वाटणार नाहीं. पण त्यांच्या अनेक मित्रांनीं डॉक्टरांच्या निःस्वार्थ सेवेची धन्यतापूर्वक ग्वाही दिलेली मीं प्रत्यक्ष ऐकली आहे. वेतन घेऊनहि लोक कामचुकारपणा कसा करतात, हे सर्वांच्या चांगले परिचयाचें आहे. याउलट वेतन न घेतां पडेल ते काम निरलसतेने व सेवेच्या अभिमानाने ताठून न जातां करणे हा डॉक्टराचा स्वभाव होता. ते स्वतः तेथे खपत. पण इतरांनीं कामाची टाळाटाळ केली हे ध्यानीं येऊनहि ते प्रत्यक्ष संतापून बोलत नसत. त्या वेळचा एक प्रसग या दृष्टीने उल्लेखनीय आहे.

'स्वातंत्र्य' दैनिकांत श्री. उळाभाजे हे उपसंपादक होते. एके दिवशीं तारुण्यसुलभ अशा लहरींतून त्यांनीं आजारी असल्याची चिठ्ठी डॉक्टरांकडे पाठवून दिली व ते फडणविसांच्या वाड्यात नेहमींप्रमाणें पत्ते खेळावयास गेले. पत्त्याची चटक ही अशी विलक्षण असते ! ती चिठ्ठी डॉक्टराच्या हातात पडल्यावर त्यांनीं वाचली व ती खोटी असल्याचें तेव्हांच ताडले. डॉक्टरांना उळाभाजे यांचा खेळण्याचा अड्डा माहीत होता. तेव्हां कार्यालयांतील कामें थोडीं हातावेगळी करून ते नेमके फडणविसांकडे आले व नेहमींच्या सहजतेने तेथील झोपाळ्यावर बसून व त्यांच्याशी थोडया गप्पा मारून परतले. झोपाळ्याजवळच तरुणांच्या खेळाचा गोंगाट सुरू होता व त्यांत 'आजारी' उळाभाजे रंगले होते ! डॉक्टर तेथे येतांच ते ओशाळले. पण डॉक्टरांनीं एक चकार शब्दहि उच्चारला नाही ! शहाण्याला शब्दाचा मार असतो, पण स्नेह्याला डॉक्टराच्या अशा वेळच्या मौनाचाहि धाक वाटत असे ! दुसऱ्यानें केलेला कामचुकारपणा आपल्या ध्यानी आला असल्याचे तर सूचित करावयाचें, पण त्याच्यावर भडकून त्याला दुखवूं न देतां आपल्या सौजन्यपूर्ण सूचकतेनें सुधारण्यास संधि द्यावयाची, अशी डॉक्टरांची अपूर्व पद्धति असे.

'स्वातंत्र्य' दैनिकाचा प्रयोग एकूण यशस्वी होऊं शकणार नाहीं, याची कल्पना १९२४ च्या शेवटींच आली होती. त्या वर्षीच्या आयव्ययाच्या पाहणींत १०७९४ इतक्या रुपयांची तूट आल्याचे ध्यानांत आले असल्याने एकंदर आवराआवरीचा विचार सुरू झाला. त्या वेळीं संपादक राहण्यासहि कोण उत्सुक असणार ? यशाचे शिरपेंच मिरविण्यांत सर्वांनाच धन्यता वाटते. पण अपयशाचे धनी होण्यास कोणीच पुढे सरत नाहीं. अशा वेळीं डॉक्टर पुढें आले व त्यांनीं स्वतः संपादकत्व स्वीकारून मगच पूर्णविराम दिला. असें

' अपयशाचें संपादन ' करण्याचें मनोधैर्य त्यांना त्यांच्या निष्काम व निःस्वार्थ सेवावृत्तीनेंच दिलें होतें ! हें ' स्वातंत्र्य ' १९२५ च्या प्रारंभीं बंद करण्यांत आलें तरी त्यानंतरहि कांहीं दिवस ' स्वातंत्र्या 'वरील एका अब्रुनुकसानीच्या खटल्याचें खेकटें सप्टेंबरपर्यंत त्यांच्यामागें लागलें होतें. या अपयशाचें सिंहावलोकन करतांना डॉ. ना. भा. खरे यांनीं ' तरुण भारत 'मधील लेखांत म्हटलें होतें कीं, "...... पैशाचे अभावीं व लोकांत अजून दैनिक पत्र वाचण्याची अभिरुचि उत्पन्न झाली नव्हती म्हणून हा प्रयोग फसला. " या वर्षाच्या प्रारंभींची आणखी एक घटना उल्लेखनीय आहे. ती म्हणजे क्रांतिवीर श्री. गणेशपंत तथा बाबाराव सावरकर यांच्या नागपुरांतील वास्तव्याची. बाबाराव हे आजारी असल्यानें विश्रांतीसाठीं त्यांच्या नात्याचे व निकटचे स्नेही श्री. विश्वनाथराव केळकर यांजकडे नागपूरला आले होते व स्वाभाविकच डॉक्टरांचें तेथें नेहमीं जाणें-येणें असल्यानें त्या दोघांचा घनिष्ठ संबंध आला. या तिघांच्याहि मनोरचना कांहीं बाबतींत एकमेकांशीं अगदीं जुळत्या होत्या. सशस्त्र क्रांतीवरील निष्ठा या तिघांच्याहि मनांत जागृत होती व हिंदुत्वासंबंधींचें प्रेमहि जाज्वल्य स्वरूपांत होतें. या तिघांचा आणखी एक विशेष असा कीं, स्वतःला विसरून ते तिघेहि हातीं घेतलेल्या कामांत मग्न असावयाचे. विश्वनाथराव केळकर यांच्या निधनानंतर त्यांनीं आपल्या आयुष्याचें ध्येय म्हणून एका काव्यांतील चार ओळी दैनंदिनींत लिहून ठेवलेल्या आढळल्या त्या अशा कीं—

" नको स्थान मज बहुमानाचें,
कंठावरचें, शीर्षावरचें,
कनकमण्यांचें चकाकण्याचें,
तुझ्या पदींचा धुंगुरवाळा देवि मला कर ना ! "

श्री. विश्वनाथरावांनीं हें ब्रीद आपल्या दैनंदिनींत लिहिलें असलें तरी या तिघांच्याहि व्यवहारांतून याच धुंगुरवाळ्याचा मंदमधुर निनाद घुमत असे, याचा निर्वाळा त्या तिघांच्या सहवासांत आलेला कोणीहि देऊं शकेल. अशी ही त्रयी एकत्रित आल्यावर स्वाभाविकच चालू परिस्थितीवर घोलणें निघे व परस्परांचे अनुभव ऐकून ' हिंदु समाज सुसंघटित केला पाहिजे ' या विचाराला दृढता येई.

या काळांत नागपूरमध्यें लहान लहान विद्यार्थि-मंडळेंहि सुरू होतीं व त्या मंडळांशीं डॉक्टरांचे संबंध असत. या मंडळांच्या कार्यक्रमांत चर्चा, हस्तलिखित मासिक, सरकारनें आक्षिप्त ठरवलेल्या वाङ्मयाचें वाचन व उत्सव अशा गोष्टींचा अंतर्भाव होई. श्री. बाबाराव सावरकर यांच्यामध्यें सभेंतील वक्तृत्वाची कला नव्हती. पण बैठकींतील संभाषणांतून तरुणांना क्रांतिप्रवण करण्याची त्यांची हातोटी वाखाणण्यासारखी असे. ते ज्या ठिकाणीं जात, त्या त्या ठिकाणीं अशा तरुणांचें एक कोंडाळें त्यांनीं उभें केलेलें असे व त्यांतून त्यांनीं तरुण हिंदुसभा उभारली होती. त्यांच्या नागपूरच्या या वास्तव्यांतहि त्यांच्याकडे कांहीं तरुण

आले असले पाहिजेत. संघटन, शुद्धि, आत्मसंरक्षण या दृष्टीनें ते त्यांच्याजवळ विचार मांडीत. पण विचारांपलीकडे तरुणाचे प्रत्यक्ष संघटन उभारण्याचे त्राण मात्र त्यांच्यांत उरले नव्हते. अनेक वर्षांच्या अदमानमधील कोलू, काथ्याकुटी व क्षय यांमुळें भोगाव्या लागलेल्या असंख्य यमयातनानी त्याचे शरीर जर्जर झालेले होते. मात्र काही तरुणाना हिंदुत्वाची दीक्षा देण्याच्या दृष्टीने त्याचे वास्तव्य हे उपकारक ठरले होते यात शंका नाही.

'स्वातंत्र्य' दैनिकाच्या व्यापातून डॉक्टर जसजसे मोकळे होऊं लागले, तसतसे तरुणांजवळ संबंध वाढवून त्यांच्यातून संघटन उभे करण्याची कल्पना बळावूं लागली. त्यांनी कांहीं मुलांना पोहावयास शिकविण्यासाठी एकत्र केलें व त्या निमित्ताने सबधात आलेल्या मुलाजवळ त्याच्या मनमोकळ्या गप्पागोष्टी सुरू झाल्या. कोणताहि तरतरीत मुलगा दिसला की, त्याला ते विहिरीवर पोहावयास येण्याचा आग्रह करीत. हा वर्ग डॉक्टराच्या एका स्नेह्याच्या विहिरीवर चाले. एकदां डॉक्टर असेच काहीं जणांना पोहावयास शिकवीत असतां एक बारा-तेरा वर्षांचा मुलगा विहिरीजवळून जात होता. त्याला डॉक्टरांनी थट्टेने अडवून विचारले की, 'तूहि उडी टाकतोस काय?' त्या निर्भय मुलाने पोहावयास येत नसताहि 'हो' म्हटले व सदरा भिरकावून देत तो डॉक्टरासमोर कमरेला दोरी बाधून घेण्यासाठी उभा राहिला आणि दोरी बाधून होताच त्याने सरळ उडी झोकली! त्या मुलाची धडाडी पाहून डॉक्टराना संतोष झाला व त्यानी त्या मुलाचा नीट परिचय करून घेतला. या साध्या प्रसंगांतूनच सघाच्या पहिल्या काळात यशस्वी प्रचार करणारे श्री. गोपाळराव येरकुंटवार डॉक्टरानी जवळ केले होते. त्या प्रसंगाची आठवण सांगतांना 'विहिरीजवळ भेटलेल्या त्या अनोळखी व्यक्तीच्या कृष्णवर्णावर त्यांचे तेजस्वी डोळे अधिकच तेजस्वी व आकर्षक असल्याचा ठसा माझ्या मनावर कायमचा उमटलेला आहे,' असे येरकुंटवार सांगतात.

आतां मुलांच्या मंडळांतून भाषणासाठीं डॉक्टर हेतुपुरस्सर जाऊं लागले. त्यांच्या हस्तलिखित मासिकांवर डॉक्टराचे प्रोत्साहक अभिप्रायहि या दिवसांत दिसूं लागले असल्यास नवल नव्हते. आतां कांही विद्यार्थी-मंडळांतील किशोर डॉक्टरांकडे येऊन "आपण आमच्या मडळाचे अध्यक्ष व्हा" असा आग्रह करूं लागले. पण त्या वेळीं डॉक्टरांचा हात वृत्तपत्राच्या व्यापांतून पुरा निघाला नव्हता व त्यांच्या घराची दुरुस्तीहि सुरू होती. त्यामुळे डॉक्टर त्यांना नकार न देतां हंसत सांगत असत कीं, "थोड्या दिवसांनीं पाहूं." सामान्यतः प्रतिष्ठा पावलेल्या पुढाऱ्याने मुलांत मिसळावे व तेहि मनापासून, ही गोष्ट त्या वेळी व काही प्रमाणात आजहि दुर्मिळ म्हणावी लागेल. डॉक्टर जेव्हां मुलांना सांगत की, "थोड्या दिवसानी पाहूं", त्या वेळीं मुलांना पर्यायानें टोलवून लावावें, असा धोरणी भाव त्यांत उमटत नसे. त्यांचे शब्द हे त्यांच्या मनात संघटनेसंबंधीं

रात्रंदिवस चालू असलेल्या चिंतनांतून व आस्थेतून उदित होत व त्यामुळें डॉक्टरांकडे मुलांच्या येण्याजाण्यांत अशा उत्तरानें कधीं खंड पडला नाहीं. प्राध्यापक श्री. पां. कृ. सावळापूरकर हे अशाच मुलांपैकीं एक होते. ते लिहितात कीं, "नागपुरांतील तरुणांच्या या सर्व चळवळींकडे डॉ. हेडगेवार यांचें पूर्ण लक्ष होतें व प्रत्येक तरुण त्या काळीं मार्गदर्शनासाठीं डॉक्टरांच्याकडे साहजिकच पहात असे. क्रांतिकारी पक्षाशीं त्यांचा असलेला संबंध व त्यांच्या आख्यायिका या तत्कालीन तरुणांना रोमहर्षक वाटत. १९२३ किंवा १९२४ मध्यें राष्ट्रप्रेम चर्चामंडळांत डॉ. हेडगेवारांना आम्हीं बोलाविलें होतें; त्या प्रसंगीं, 'शुद्ध राष्ट्रवाद कसा असतो?' याचें मार्मिक विश्लेषण त्यांनीं केलें होतें."

दिंडी सत्याग्रहाच्या वेळीं मुसलमानांनीं जी दंगल केली, त्याचीच छोटी आवृत्ति १९२४ मध्येंहि निघाली होती. जुलैच्या १२-१३ दिनांकास ईद व आषाढी एकादशी यांची युति झाली व मुसलमानांच्या आक्रमणशीलतेनें जरा डोकें वर काढलें. पण या वर्षीं सावध असलेल्या हिंदूंपुढें त्यांची डाळ शिजणें शक्य नव्हतें. त्यामुळें पंचवीस-तीस मुसलमानांस पट्ट्या गुंडाळून रुग्णालयांत पडावें लागलें. मुसलमान वस्तींतील हिंदूंना वेळींच राजवाड्यांत हलविण्याची दक्षताहि या वेळीं डॉ. मुंजे, डॉ. हेडगेवार आदि मंडळींनीं घेतली होती असें दिसतें. या दंग्याच्या निमित्तानेंहि नागपुरांत बरेच दिवस गस्त चालू राहिली व मुसलमानांच्या व्यापारावर कडक रीतीनें बहिष्कार घालण्याला चालना मिळाली. त्यांच्या डोल्यांपुढें नाचण्यामध्येंहि आतां लोकांना स्वारस्य उरलें नव्हतें. कारण आपल्या चांगुलपणाच्या हांकेला सौजन्याचा प्रतिसाद मिळत नाहीं, असा कटु अनुभव लोकांना येऊन चुकला होता. या काळांत मुसलमान खाटिकांच्या जागीं हिंदु खाटिक मिळाले नाहींत तर "मी स्वतः खाटिक बनेन" अशी घोषणा डॉ. मुंजे यांनीं केली होती! यावरून बहिष्कार आंदोलनाची तीव्रता कांहींशी ध्यानीं येऊं शकेल. या निमित्तानें त्या वेळीं सदंडतेचा प्रचारहि पुढाऱ्यांनीं जोरांत चालविला होता. डॉ. मुंजे तर तरुणांना सांगत कीं, "एखादा लाठीवाला धटिंगण दारांत आला तर त्यापासून स्वस्त्रीचें संरक्षण करण्याचें सामर्थ्य तरुणांमध्यें असावयास पाहिजे. लाठीकाठीचें शिक्षण देऊन 'शठं प्रति लाठ्यं व काठ्यं'चा प्रयोगहि वेळोवेळीं अगदीं सव्याज झाला पाहिजे!" गस्तीची पहाणी करीत डॉक्टर अनेकदां विविध वेटाळ्यांतून (सर्कल्समधून) हिंडत, त्या वेळीं गस्तींत भाग घेणाऱ्यांची ओळख व पारख करून ठेवीत होते. त्यांच्या भावी कार्याच्या रोखानें ही अशी तरुणांची जुळणी या काळांत हळूहळू सुरूच झाली होती म्हणावयाची!

नागपूरमागोमाग देशांत इतरत्रहि हिंदु-मुसलमान ऐक्याचे साबणी फुगे फुटूं लागले व बहुतेक सर्वत्र हिंदु पुढाऱ्यांना परिस्थितीचा पुनर्विचार करण्याचा प्रसंग आला. आमेठी (Amethi), संभळ (Sambhal), गुलबर्गा व कोहाट

येथील मुसलमानांच्या आक्रमणांनीं, वादळामुळेंहि केळीच्या पानांच्या चिंधड्या उडत नसतील अशा माणुसकीच्या व शांततेच्या चिंधोट्या उडवून टाकल्या. कोहाटमध्ये दि. ९ व १० सप्टेंबरला झालेल्या दंगलीत १५५ जण मृत्युमुखीं पडले व नऊ लक्ष रुपयांची मालमत्ता नष्ट करून मुसलमानांनीं लाखो रुपयांची लूट केली! श्रीमती सरोजिनी नायडू यांनीं म. गाधीना लिहिले की, "शातीवरील भाषणें व प्रवचने आता पुरेत!" ( Speeches and homilies on peace would not do. ) महात्माजीहि अत्यंत अस्वस्थ झाले व त्यानी दिल्लीत मौलाना महंमदअल्लींच्या घरात डॉ. अन्सारी व अब्दुल रेहमान या मुसलमान डॉक्टराच्या दृष्टीखालीं एकवीस दिवसांचा उपवास घोषित केला! उपवास चालू असता महात्माजी म्हणाले कीं, "आवश्यक तर माझ्या रक्ताने या दोघाचा साधा जुळवून आणण्याचा माझा मानस आहे." ( My longing is to be able to cement between the two with my blood, if necessary. ) या उपवासाने शातता-परिषदांना जन्म दिला व पुन्हा एकदा प्रेमाचा पुळका आल्याप्रमाणे मुसलमानांनीं ऐक्याच्या घोषणा केल्या. या परिषदातून फलित काय निघाले, यासंबंधीं डॉक्टर आबेडकर लिहितात कीं, "ऐक्य-परिषदातून केवळ गोडस ठराव होत व ते घोषित होतांक्षणींच मोडले जात." ( But the unity conferences produced nothing except pious resolutions which were broken as soon as they were announced. )

पण अशा या वातावरणात महात्माजींनीं आपल्या उपदेशाचा अहिंसक रंग यत्किंचितहि पालटविला नव्हता. त्यांना अमानुषतेचा नंगा नाच दिसत होता व तरीहि त्यांचे हिंदूंना सांगणे होते कीं, "माझे कोण ऐकते आहे? पण तरीहि या घटकेला माझे हिंदूंना सांगणे आहे कीं, तुम्ही मरा, पण मारूं नका." ( ... who listens to me? And yet I must ask the Hindus even to-day to die and not to kill. ). डॉ. हेडगेवारांच्या नेतृत्वाखालीं या वेळी निघणाऱ्या 'दैनिक स्वातत्र्या'चे जर अंक मिळाले असते तर कदाचित् त्यांचे या काळातील विचार त्यांच्याच शब्दांत देतां आले असते, पण तशी शक्यता नसली तरी एवढे अनुमानता येतें कीं, या सर्व घटनांनीं डॉक्टर अत्यंत व्यथित झाले असतील. त्या धकाधकीच्या काळांत 'हिंदी' म्हणवून घेण्यांत भूषण मानणाऱ्या भल्याभल्यांच्या हृदयांतील हिंदुत्व जागृत झालेलें होते. स्वामी श्रद्धानंद यानीं तर शुद्धि व संघटन याचा ध्यास मोपला बंडापासूनच घेतला होता. त्यांनीं कायदाभंग चौकशी-समितीसमोर असे स्पष्ट सांगून टाकले होते की, एकूण एक प्रांतांत या दोनहि जाती परस्परांविषयीं संशयग्रस्त झाल्या आहेत, ही गोष्ट मला स्वतःला दिसून आली आहे. याचें एक कारण असें कीं, मुसलमान व शीख हे समाज जितके सुसंघटित आहेत, तितका हिंदु समाज नाहीं. तो

अजून विस्कळीत आहे. त्यास उपाय एकच; आणि तो हा कीं, हिंदु पुढाऱ्यांनीं आपला समाज सुसंघटित करावा." १९२४ च्या शेवटी बेळगांवच्या हिंदु महासभेच्या वार्षिक अधिवेशनांत पं. मदनमोहन मालवीय यांनींहि असाच सूर उमटविला होता. ते म्हणतात कीं, "...हिंदूंच्या अंगीं भ्याडपणा व दुर्बलता नसती तर हिंदु-मुसलमानांतील दंग्यांपैकीं पुकळ दंगे टळले असते. या दंग्यांमुळें राष्ट्रास विघातक अशी परिस्थिति निर्माण झाल्यामुळें तिला बऱ्याच अंशीं कारणीभूत झालेली हिंदूंची दुर्बलता घालविणें प्राप्त आहे." याच अधिवेशनाहून परततांना पुण्याच्या प्रकट सभेंत स्वामी श्रद्धानंदांनीं मांडलेले विचारहि मननीय असून तत्कालीन पुढाऱ्यांच्या मनःस्थितीवर उत्तम प्रकाश टाकणारे आहेत. ते म्हणाले होते कीं, "सिंहगडासारख्या अवघड जागीं ज्या महाराष्ट्रीयांनीं भगवा झेंडा रोवला, ते अत्यंत निर्भय असेच होते. आज आपण आपला भगवा झेंडा सोडून भलत्याच झेंड्याखालीं जमूं लागलों आहों, ही भूल दूर करून, पुन्हा आपली खरी ओळख करून घ्या आणि खऱ्या वैदिक धर्माचें व आर्यसंस्कृतीचें रक्षण करा."

देशबंधु चित्तरंजन दास यांनीं तर सहा महिने केवळ मुसलमानी इतिहास व त्यांचा कायदा यांचा सखोल अभ्यास करण्यांत घालविले व अभ्यासाचा निष्कर्ष म्हणून त्यांनीं लाला लजपतराय यांना कळविलें कीं, "मला असें वाटूं लागलें आहे कीं, हिंदु-मुसलमान ऐक्य शक्य नाहीं व व्यवहार्यहि नाहीं." ("I am inclined to think it is neither possible nor practicable.") देशबंधूंच्याप्रमाणेंच लाला लजपतराय यांनाहि कॉंग्रेसच्या पांच वर्षांतील हिंदु-मुसलमान ऐक्याचा अर्थ कांहीं प्रमाणांत उमगूं लागला होता. त्यांनीं 'हिंदु व मुसलमान यांचीं स्वतंत्र राज्यें निर्माण झालीं पाहिजेत,' या मौलाना हजरत मोहानी यांच्या सूचनेचा परामर्श घेतांना म्हटलें होतें कीं, "अगदीं नाहीं म्हटलें तरी गेल्या पांच वर्षांत कॉंग्रेस ही हिंदु-मुसलमानांची संयुक्त संघटना झाली होती; पण तिनें खरें पाहूं जातां हिंदूंपेक्षां मुसलमानांचें अधिक हित साधलें." (..."For the last five years, even if not before, the Congress has been a joint organisation of Hindus and Muslims, in fact it has done more for the Muslims than for the Hindus.") याच वेळीं हजरत मोहनी यांनी "वायव्य सीमा प्रांत, सिंध, पंजाब या भागांचें स्वतंत्र मुसलमानी राज्य हवें," अशी मागणी सुरू केली होती. महात्माजीहि आपला अनुभव बोलून दाखवूं लागले कीं, "सर्वसामान्यतः मुसलमान हा धटिंगण व हिंदु भित्रा आहे." (...an average Muslim was a bully and an average Hindu a coward.)

पंडित जवाहरलाल नेहरूंना तरी दुसरा कोणता अनुभव येणें शक्य होतें? त्यांनीं आपल्या आत्मचरित्रांत त्या काळाचें वर्णन करतांना म्हटलें आहे कीं,

"...अनेक कॉंग्रेसजन हे राष्ट्रीय बुरख्याखालीं वावरणारे जातीयवादी होते." (Many a Congressman was a communalist under his national cloak.) याशिवाय हिंदु हे 'कारकुनी पेशांत रमलेले व झोपाळू' असल्याचे मतहि त्याच पुस्तकांत त्यांनी व्यक्तविलेले दिसते. विख्यात क्रांतिकारक लाला हरदयाळ यांनींहि १९२५ च्या प्रारभीं लाहोरच्या 'प्रताप' पत्रांत आपले हृद्गत व्यक्त करताना हिदु-सघटन, हिदु राज्य, शुद्धि व अफगाणिस्थानचे भारतांत विलीनी-करण या चार गोष्टींचा हिदुराष्ट्राच्या उज्ज्वल भवितव्यासाठी पुरस्कार करतांना म्हटले होते की, "जोपर्यंत हिंदुराष्ट्राने या गोष्टी साध्य केल्या नाहीत तोपर्यत हिदु जातीची सुरक्षितता साधणे अशक्य आहे." डॉ. मुंजे याचे तर वागण्याचे सूत्र त्या काळात प्रसिद्ध होते. ते म्हणत, "कानात तुळशीपत्र घालून राजकारण करीत नसतात." जानेवारी १९२५ मध्ये त्यानींहि पुण्याला आपले धोरण व्यक्त करताना म्हटले होते की, "नागपुरात दीड लक्ष लोकवस्तीत फक्त वीस हजार मुसलमान असता आम्हासच तेथे जीविताची व वित्ताची अशाश्वती वाटू लागली. मुसलमानाना मात्र एक लक्ष तीस हजार लोकांचे मन दुखविले तर आपली अवस्था काय होईल, ही भीतीच वाटत नव्हती......तेव्हा यापुढे कसलाहि प्रश्न उपस्थित झाला तर त्याकडे प्रथम 'हिंदु' या दृष्टीने पाहिले पाहिजे. कॉंग्रेसमध्ये हिंदी व बाहेर हिदु ही वृत्ति ठेवल्याखेरीज गत्यतर नाहीं, असे मुसलमानानीच आपणांस शिकविले आहे." याच वर्षीच्या सातारा येथे झालेल्या महाराष्ट्र प्रातिक परिषदेत बॅ. रामराव देशमुख यानी तर या सर्वांवर ताण करून आपले मनोगत व्यक्तविले होतें. ते असे की, "हिदु समाजाला मुसलमान समाजाइतके सघटित व प्रबल करणे, हें हिंदी राष्ट्रीयत्व पुन्हा जिवंत करण्याचे लक्षण होऊन बसलें आहे. चार वर्षे महात्मा गांधींबरोबर अली बंधु खुषमस्कऱ्यासारखे मिरवले, पण बिचाऱ्यांना राष्ट्रीयत्वाची अजून जाणीव झाली नाहीं. मुळात राष्ट्रीयत्व नव्हते व महात्माजींच्या सहवासांतहि राष्ट्रीयत्व नव्हते, तेव्हां ते अली बंधूत येणार कोठून?"

१९२५ च्या प्रारंभी एकंदर हिदुस्थानांतील पुढाऱ्याची मन:स्थिति काय होती, याची कल्पना यावी, यासाठी येथे केवळ वानगी म्हणून कांही जणाचे उद्गार दिलेले आहेत. पण सुज्ञ वाचक या शितांवरून एकूण भाताची परीक्षा सहज करू शकतील, असा विश्वास वाटतो. हिंदु-मुसलमान ऐक्यासाठी केलेल्या तपाचे फळ सर्व विचारवंतांना स्पष्टपणे दिसून चुकले होते व ज्याने त्यानें आपआपल्या मनोरचनेप्रमाणें उमज पटल्याचे व्यक्तहि केलें होतें. आजच्या काळात केवळ हिदु समाजापुरता विचार कॉंग्रेसमध्ये राहून जिव्हाळ्याने मांडणे, हे शुद्ध जातीयतेचे निदर्शक म्हणून त्याज्यच ठरते. पण १९२५ च्या जानेवारीमध्ये मध्यप्रदेश कॉंग्रेस समितीच्या विद्यमाने स्वामी सत्यदेव याचा दौरा झाला होता व त्या दौऱ्यांत नागपूर, वर्धा, भंडारा, गोंदिया आदि अनेक गावी त्यानीं हिदु-संघटन

या विषयावर आपले विचार मांडले. या सबंध दौऱ्यांत डॉक्टर हेडगेवार व श्री. वामनराव घोरपडे हे त्यांच्याबरोबर होते व अनेक सभांत डॉक्टरच अध्यक्ष असत, असें त्या वेळच्या वृत्तपत्रांवरून दिसतें. डॉक्टर हे त्या वेळीं काँग्रेसचेच कार्यकर्ते होते, हें सांगावयास नकोच.

या दौऱ्यांत डॉक्टरांच्या अध्यक्षतेखालीं वर्ध्याच्या भाषणांत स्वामी सत्यदेवांनीं जे विचार मांडले ते एकूण प्रचाराचा रोख ध्यानीं आणून देण्यास पुरेसे आहेत. ते म्हणाले कीं, " हिंदु-संघटन हें मुसलमानांच्या विरुद्ध आहे, ही कल्पना चुकीची आहे. बदमाष लोकांशीं ठोकाठोकी करण्यासाठीं हिंदु-संघटन करण्यांत येत आहे, ही महात्माजींची समजूतहि चुकीची आहे.......हिंदुस्थान हाच आमचा प्राण, हेंच आमचें सर्वस्व, अशी जशी हिंदूंची निष्ठा आहे तशी मुसलमानांची नाहीं. तशी निष्ठा ठेवण्याविषयीं त्यांची समजूत घालावयास जावें, तर ते समजतात कीं, हिंदु लोक आम्हांला डरतात. हा त्यांचा अपसमज दूर होण्यासाठीं हिंदु-संघटन अवश्य केलें पाहिजे. "

या दौऱ्यावर जाण्यापूर्वींपासूनच डॉक्टरांनीं मध्यप्रांतांतील राजकीय क्षेत्रांतील अनेक कार्यकर्ते व श्री. भाऊजी कावरे, श्री. आप्पाजी जोशी, श्री. विश्वनाथराव केळकर आदि निकटवर्ती स्नेही यांच्या अनेकदां बैठकी घेतल्या. त्यांत 'संघटन उभारावयाचें म्हणजे काय व कोणत्या पद्धतीनें ?' यासंबंधीं निरनिराळ्या जणांच्या कल्पना ऐकून घेतल्या होत्या व आपल्याहि कांहीं कल्पना विचारार्थ सर्वांसमोर मांडल्या होत्या. त्या प्रतिपादनांत हिंदु-मुसलमानांची एकी हा भ्रम आहे, ही गोष्ट स्पष्ट करून हिंदु समाजांतील तरुण पिढीला हातीं धरण्याचा व तिच्यावर संस्कार करण्याचा मनोदय त्यांनीं व्यक्त केला होता. त्याचप्रमाणें हिंदुस्थानच्या हितसंबंधांशीं ज्याचे सारे हितसंबंध निगडित आहेत, जो या देशाकडे भारतमाता या पवित्र दृष्टीनें पहातो व ज्याला या देशाबाहेर कोणताहि आधार नाहीं, असा थोर धर्म-संस्कृतीनें विनटलेला हिंदुसमाज हाच राष्ट्रीय समाज असून तो जागृत व सुसंघटित केला पाहिजे, हें त्यांच्या प्रतिपादनाचें दुसरें सूत्र असे. या राष्ट्रीय संघटनेची उभारणी करतांना ती पक्षीय राजकारणाच्या संपूर्ण अतीत ठेवली पाहिजे; मात्र कोणत्याहि राजकीय पक्षांतील व्यक्तीला आपलीं राजकीय मतें कायम ठेवून या संघटनेंचें कांम करतां आलें पाहिजे, असें मत ते मांडीत.

डॉक्टरांनीं आपल्या माहितींतील ज्या लहानमोठ्या कार्यकर्त्यांशीं हा विचारविनिमय केला, त्यांना डॉक्टरांचीं हीं मतें तत्कालीन फेर-नाफेर राजकारणाच्या कोष्टकांत बसणारीं वाटलीं नाहींत. त्यासंबंधीं श्री. अप्पाजी जोशी लिहितात कीं, " ...हे जमविलेले बहुतेक कार्यकर्ते कोणत्या ना कोणत्या तरी राजकीय पक्षाचे असल्यामुळें व त्यांच्यापैकीं कांहीं जणांवर महात्माजींच्या चळवळीचा परिणाम, तर कांहीं जणांवर स्वराज्य पक्षाच्या चळवळीचा प्रभाव विशेष असल्यामुळें,

या आवळ्या-कोहळ्यांची मोट डॉक्टरांना शेवटपर्यंत बांधतां आली नाहीं. तेव्हां १९२५ च्या प्रारंभीं त्यांनीं या सर्वांचा नाद सोडला व आपल्या विचारसरणीशीं सहमत होतील अशा लोकांच्या बळावर हिंदुराष्ट्राच्या पुनरुद्धाराच्या कार्याला प्रारंभ करण्याचा त्यांनीं मनोमन निश्चय केला.

अशा तऱ्हेनें हिंदुराष्ट्राच्या संघटनेचा विचार निश्चित केल्यावर डॉ. हेडगेवार यांनीं रत्नागिरीला स्थानबद्धतेत असणारे बॅ. वि. दा. तथा तात्याराव सावरकर याची भेट घेण्याचा विचार केला व त्याप्रमाणे मार्च महिन्यात श्री. विश्वनाथराव केळकर व डॉ. सावरकर यांच्यासमवेत डॉक्टर तिकडे गेले. त्या वेळीं रत्नागिरीमध्ये प्लेगची साथ सुरू झाली होती व त्यामुळे स्वातंत्र्यवीर हे रत्नागिरीजवळील शिरगांव येथे राहावयास गेले होते. तेथे श्री. विष्णुपंत दामले यांच्याकडे त्यांचे वास्तव्य असे. त्या ठिकाणी डॉक्टर दोन दिवस होते व तेवढ्या अवधींत तात्यारावांना त्यानीं आपल्या सकल्पित संघटनेची कल्पना दिली व त्याचा त्यावरील अभिप्रायहि समजून घेतला.

दिंडी सत्याग्रहाच्या काळापासूनच त्याचे निरनिराळ्या तालमीतील प्रमुखांशीं सबंध आले होते व ते सबध त्याच्याकडे जाऊन-येऊन डॉक्टरानीं उत्तम राखले होते. सघाच्या प्रत्यक्ष कामाला प्रारंभ करताना जे कार्यक्रम डॉक्टराच्या मनांत घोळत होते, त्यांत आखाड्यांतील व्यायामाचाहि अंतर्भाव असावा व त्या दिशेनेच तालमींशीं डॉक्टरानीं संबध वाढविले असण्याची शक्यता दिसते. या आखाड्याच्या जोडीनें नागपुरांतील सर्व गणपति-उत्सव-मंडळाच्या चालकाना गुणोत्कर्ष मंडळाद्वारें श्री. भाऊसाहेब टालाटुले यांच्या माडीवर एकत्रित आणून त्या सार्वजनिक राष्ट्रीय उत्सवाला भरघोसपणा व एकसूत्रीपणा आणण्यासाठी त्यांनीं याच वर्षी खटपट केली होती. त्या वेळी ते राष्ट्रीय उत्सव मंडळाचे कार्यवाहच होते.

या काळांत हिंदु-संघटन झाले पाहिजे, अशी जाणीव सर्व विचारी वर्गाला किती प्रकर्षाने झाली होती, हे आपण पाहिले आहे. पण त्या जाणिवेतून प्रत्यक्ष संघटन करण्यासाठीं किती जण पुढे आले व त्याच्या प्रयत्नांचे स्वरूप काय होते, याकडेहि दृष्टिक्षेप करणे आवश्यक आहे. सर्व जणांना हिंदु-संघटनाची झालेली जाणीव ही मुळात सारख्याच तीव्रतेची असणे शक्य नव्हते. एखाद्या पाशवी अत्याचाराचा वज्राघात झाला कीं, तेवढ्यापुरती स्वाभिमानाची उसळी येणारा एक वर्ग होता.! त्याला राजापूरच्या गंगेप्रमाणे मध्येच वाहते स्वरूप यावयाचें. दुसरा वर्ग असा होता कीं, त्याना या दंगली तात्पुरत्या वाटत असत व हिंदु-मुसलमान ऐक्याच्या अखंड प्रचाराने या अस्वस्थ वातावरणांत कायमचे परिवर्तन करतां येईल, असा त्याचा त्याच्या प्रचारपद्धतीवर भोळा विश्वास होता. तिसरा

वर्ग असा होता कीं, त्यांना हिंदुपणाची जाणीव होई, पण ' इतक्या दिवस ज्या हिंदीपणाची प्रौढी मिरविली त्याची वाट काय ? ' असा प्रश्न पडे व त्यांची जीभ अडे ! चौथा वर्ग याहून प्रामाणिकपणांत जरा उजवा म्हणावा लागेल. या वर्गातील लोकांना हिंदीपणा न सोडतां व महात्माजींची आपणांवर अवकृपा न होईल इतक्या बेतांत हिंदु-संघटनेविषयीं बोलण्याचें धैर्य होतें. यांपैकीं सर्व जण ' हिंदी ' राष्ट्रीयत्वाच्या मोहिनीनें भारावलेले होते व त्या कल्पनेशीं काडीमोड न करतां जमेल इतक्याच प्रमाणांत त्यांचें हिंदुपण बोलकें होई ! उलट महात्मा गांधी व पं. जवाहरलाल नेहरू यांच्यासारख्या अगदीं कट्टर ' हिंदी ' राष्ट्रवादी लोकांच्या दृष्टीनें हिंदूंविषयीं सहानुभूतीनें बोलणें हें जातीयतेचें व फुटीरपणाचेंच द्योतक होतें ! त्यांच्या दृष्टीनें असें ऐक्य साधण्यासाठीं हिंदूंनीं कितीहि त्याग केला, तरी तो कमीच होता. मुळांत हिंदु-मुसलमान एक असून इंग्रजांच्या धोरणामुळें हें द्वैत माजलें आहे, अशी त्यांची पक्की समजूत होती ! या वेळीं डॉ. हेडगेवारहि हिंदु-संघटनाची आवश्यकता निर्भयपणें मांडूं लागले होते व त्यांच्या मताशीं सुसंवादी धारणा असलेले कांहीं पुढारी हिंदुस्थानांत विद्यमान होते. ' हिंदुस्थानांत राहणाऱ्या सर्व लोकांचें हें राष्ट्र आहे ' या कल्पनेवरील त्यांचा विश्वास संपूर्णतः उडाला होता व या ठिकाणीं हिंदुत्व हेंच राष्ट्रीयत्व आहे, असा निःसंदिग्ध निर्वाळा त्यांचें मन देऊं लागलें होतें.

इतक्या विविध प्रकारांत जे ' हिंदुत्व हेंच राष्ट्रीयत्व ' या मताचे होते, त्यांतहि कांहीं जण उच्चार करण्यापलीकडे जाऊं शकत नव्हते. भाषणें, लेख व ठराव हीच त्यांची मर्यादा दिसे. ' संघटन ' करावयाचें म्हणजे नेमकें काय करावयाचें, याचा मार्ग त्यांना सुचत नव्हता व म्हणून केवळ ' असा समाज व्हावा ' अशा केवळ गुणवाचक कल्पना मांडण्यांतच त्यांच्या यत्नांची परिणति झाली असल्यास नवल नव्हतें. पस्तीस कोटींचा समाज त्या वेळीं ज्या दिशेनें वाहत जात होता, त्या प्रवाहाविरुद्ध पोहत जाण्यासारखेंच हें हिंदु-संघटनाचें कार्य होतें. पण असा पराक्रम करण्यासाठीं ज्या मनोधैर्याची, निष्ठेची, कर्तृत्वाची व कौशल्याची आवश्यकता होती, त्याची जोड दुर्दैवानें कांहीं जणांना लाभली नव्हती; तर कांहीं जणांना अशी जोड लाभली असूनहि त्यांच्या प्रयत्नांत संघटनेच्या स्थिर, विधायक व चिरंतन स्वरूपाच्या जागीं मुसलमान-द्वेषाचें प्रतिक्रियात्मक स्वरूप उमटलेलें दिसूं लागलें.

अशा परिस्थितींत अनेक जणांनीं व अनेक प्रसंगीं जरी ' हिंदुसमाज अत्यंत धोक्यांत आहे ', असें कळवळून सांगितलें असलें तरी गडगडत्या गाड्याला हात देऊन त्याची गति रोधण्याचें प्रत्यक्ष कार्य मात्र दुर्दैवानें होऊं शकलें नाहीं. त्यामुळें संघटनेला सार्वत्रिक उठाव १९२५ मध्येंच मिळाल्याचें दृश्य तर दिसलेंच नाहीं, उलट डॉ. केशवराव हेडगेवार यांनीं केलेल्या कार्यारंभाला ' जातीय ',

'पोरासोरांचे', 'त्रेतायुगीन' अशी दूषणे लावून असंख्य तऱ्हांनी त्या संघटनेची गति रोधण्याचाच दुर्दैवाने प्रयत्न झाला !

पण लोकसंग्रहाच्या हेतूने डॉक्टरानी केलेल्या सत्संकल्पामागे इतका जिव्हाळा व ध्येयावरील नि मार्गावरील अविचल विश्वास होता की, त्याना या समाजाच्या विपरीत मनःस्थितीची कीव वाटली, पण राग आला नाहीं. त्यांनी पांच-सात वर्षांत झालेल्या घटनाचा अन्वयार्थ लावताना हिंदु-मुसलमान याच्या इतिहासाची साक्ष काढून याच्यांतील सघर्षामागील नेमक्या कारणाचा छडा लावला होता व त्या कारणांचे समूळ उच्चाटन करण्याचा त्यानीं मनोमन विडा उचलला होता. त्यांना स्पष्ट कळून चुकले होते की, हिंदुस्थानला देशपण आणून देण्यास ज्या हिंदु समाजाने भगीरथ प्रयत्न केले, त्या हिंदु समाजाचा हा देश आहे. त्याचा ऱ्हास हा मुसलमान व इंग्रज याच्या आक्रमणामुळेच झाला हे खरे नसून राष्ट्रीय भावना शिथिल झाल्याने व्यक्ति व समष्टि याचे वास्तविक असणारे संबंध विसकटले व अशा विसघटित स्थितीमुळे पूर्वी दिग्विजयांच्या नौबती झडविणारा समाज शेंकडो वर्षे परक्याच्या पाशवी सत्तेखाली चिरडला गेला. आपल्या समाजात मनुष्यबळ होते, पैसा होता व शस्त्रेहि होती, पण राष्ट्राचा मी घटक आहे व त्यासाठीं माझे जीवन मी व्यतीत केले पाहिजे,' ही कर्तव्याची जाणीव बुजल्याने साऱ्या शक्ति असूनहि समाज पराभूत झाला. यासाठीं समाजाच्या नसानसात ही राष्ट्रीयतेची भावना नेऊन खेळवावी व त्या भावनेने सारा समाज अनुशासित व सजीवित करून त्याला दिग्विजयी राष्ट्ररूपात उभे करावें, असा महन्मगल सल्कप डॉक्टरानी सोडला. तो सकल्प म्हणजेच राष्ट्रीय स्वयंसेवक संघ !

★ ★ ★

# १३ : संघाचा शुभारंभ

संघाची कल्पना मनांत निश्चित केल्यावर लौकिक दृष्टीनें त्या संघाला प्रारंभ केल्याचें घोषित करावयाचें डॉक्टरांनीं ठरविलें व १९२५ च्या दसऱ्याच्या सुमुहूर्तावर आपल्या घरीं पंधरा-वीस जणांना जमवून 'आपण आज संघ सुरू करीत आहोंत' असें सर्वांना विदित केलें. या प्रारंभींच्या बैठकींत श्री. भाऊजी कावरे, अण्णा सोहोनी, विश्वनाथराव केळकर, बाळाजी हुद्दार, बापूराव भेदी वगैरे मंडळी होती. त्यांच्यासमोर डॉक्टरांनीं संघ स्थापित झाल्याचा निर्णय प्रकट केल्यावर, संघ सुरू करावयाचा म्हणजे प्रत्यक्ष काय काम करावयाचें, असा प्रश्न सर्वांसमोर ठेवून त्यांच्या कल्पना समजून घेतल्या. बैठकीच्या शेवटीं डॉक्टरांनीं एक विषय अत्यंत प्रभावीपणानें विशद केला कीं, संघ सुरू करावयाचा म्हणजे शारीरिक, लष्करी व राजकीय अशा तीन प्रकारचें शिक्षण स्वतः घेऊन तें इतरांना देण्यास प्रारंभ करावयाचा.

सामान्यतः नवीन संस्था काढावयाची म्हणजे पहिल्या दिवशींच तिचें नांव, पावती-पुस्तकें, निधि, अध्यक्ष-उपाध्यक्ष, घटना, संस्थेचें कार्यालय, पाटी, समारंभ व त्याचा वृत्तपत्रीय गाजावाजा असा थाटमाट दिसून येतो. पण या बहुतेक सर्वच गोष्टी संघाच्या प्रारंभीं अभावानेंच दिसल्या. त्या विजयादशमीच्या दिवशीं संघाच्या दृष्टीनें दोनच गोष्टी बीजरूपानें निश्चित होत्या. पहिली हिंदु-राष्ट्राच्या पुनरुत्थानाची डॉक्टरांच्या मनांतील महनीय आकांक्षा व दुसरी गोष्ट त्या आकांक्षेला साकार करण्यासाठीं समर्पित केलेलें डॉक्टरांचें चारित्र्यपूर्ण, ध्येयनिष्ठ व सेवामय जीवन !

हिंदुराष्ट्राला सुसंघटित करण्याला डॉक्टरांनीं प्रारंभ केला तो त्यांच्या विजयाकांक्षी मनोरचनेशीं सुसंवादी अशा सीमोल्लंघनाच्या मुहूर्तावर ! व्यक्तिगत जीवनांतून समष्टिजीवनाकडे, दास्यांतून स्वातंत्र्याकडे, निद्रेंतून जागृतीकडे, दैन्यांतून स्वर्गतुल्य सुखाकडे व दौर्बल्यांतून दिग्विजयी तारुण्याकडे साऱ्या हिंदु-समाजाला नेणारें सीमोल्लंघन डॉक्टरांनीं या दिवशीं सुरू केलें. प्रभु रामचंद्रांनीं चौदा चौकड्यांचें साम्राज्य असणाऱ्या व देवांनाहि दास बनविणाऱ्या रावणाला याच दिवशीं रामबाणाचा प्रताप दाखविला होता व विराटाच्या गाई पळवून नेणाऱ्या दुष्ट कौरवांना पळतां भुई थोडी होण्याला कारणीभूत झालेला गांडीव

धनुष्याचा टणत्कारहि अर्जुनाने याच दिवशीं ऐकविला होता ! दुष्टांना भयकंपित करणारे बलिष्ठ हिंदुराष्ट्र जागृत करण्याला अशा विजयांचें स्मरण करून देणाऱ्या विजयादशमीहून कोणता मुहूर्त अधिक समर्पक ठरला असता ?

डॉक्टरांच्या संबंधानें आलेल्या तरुणांची व बालांची ज्या वहींत प्रारंभीं नोंद केलेली होती, त्यांत प्रत्येकाचे नांव, वय, शिक्षण व तो कोणत्या व्यायामशाळेंत जातो, याची माहिती घेतलेली दिसते. प्रारंभीं संघाचे असे दैनंदिन कार्यक्रम नव्हते. संघाच्या घटकानीं कोणत्याहि व्यायामशाळेंत जाऊन पुरेसा व्यायाम करावा, एवढी अपेक्षा असे. मात्र रविवारीं सकाळीं ५ वाजतां सर्वांना इतवार दरवाजा प्राथमिक शाळेच्या पटांगणांत एकत्र केले जाई. याच एकत्रीकरणात कांहीं दिवसांनतर श्री. मार्तंडराव जोग याच्या नेतृत्वाखालीं सैनिकी शिक्षण देण्यास प्रारंभ करण्यांत आला. प्रारभीं कांहीं महिने रविवारीं व त्याच्या जोडीने गुरुवारीं ‘ राजकीय वर्ग ’ मात्र न चुकता होत. या राजकीय वर्गाचा हेतु संघांतील सभासदाना ( नि हाच शब्द प्रारंभीं प्रचलित होता, ) देशाच्या परिस्थितीची व आपल्या कर्तव्याची जाणीव करून द्यावी व संघटना बलिष्ठ करण्यासाठीं कसे प्रयत्न करावेत, याचे मार्गदर्शन करावें असाच असे. हे वर्ग अनाथ विद्यार्थी गृह, श्री. बडकस, टालाटुले, मार्तंडराव जोग व स्वतः डॉक्टर याची घरे अशा ठिकाणी आलटून पालटून व्हावयाचे. त्यांत डॉक्टर तर बोलतच, पण त्या जोडीने तरुणांपैकी श्री. बाळाजी हुद्दार, श्री. दादा परमार्थ, श्री. भय्याजी दाणी अशांनाहि बोलावयास प्रोत्साहन दिलें जाई. श्री. विश्वनाथराव केळकर याचीहि भाषणे अशा वर्गातून होत. या राजकीय वर्गाप्रमाणेच कांहीं उत्सवानिमित्तानेंहि भाषणे व्हावयाचीं. हेच राजकीय वर्ग पुढे ‘ बौद्धिक वर्ग ’ म्हणून संघाच्या कार्यक्रमात ओळखले जाऊं लागले. ‘ बौद्धिक वर्ग ’ हे नवीन नाव १९२७ सालानंतर रूढ झालेलें दिसते.

संघाचे तरुण व बाल प्रामुख्याने श्री. अण्णा खोत यांच्या ‘ नागपूर व्यायामशाळे ’तच जात असत. एक तर त्या ठिकाणीं व्यायामाच्या दृष्टीनें साधनसामग्री वा उपकरणे उत्तम असत व दुसरे कारण म्हणजे डॉक्टर व अण्णा खोत यांचा घनिष्ठ स्नेह होता. डॉक्टरांच्या संघटनेतील घटक त्या व्यायामशाळेंत जोर-बैठका, मलखांब, एक-दांडी, दुदांडी ( Single bar, Double bar ) आदि कार्यक्रम करीत असतां डॉक्टर स्वतः ते पहावयास जात. १९२५ पूर्वी व्यायामशाळात शाळकरी मुले व व्यवसायी हेच तेवढे दिसावयाचे. सरकारी वक्रदृष्टि वळूं नये म्हणून महाविद्यालयीन तरुण वर्ग तेथे दिसेना; पण डॉक्टरांच्या प्रयत्नाने अशा तरुणांची संख्या वाढूं लागली व त्या व्यायामशाळेतील शिक्षक श्री. दत्तोपंत मारुलकर व श्री. अण्णा सोहोनी यांना इतक्या जणांवर लक्ष देणें अवघड वाटूं लागले.

व्यायामाच्या पलीकडे अनेक गोष्टी डॉक्टरांच्या डोळ्यांसमोर होत्या व म्हणून त्यांनीं संघांतील तरुणांना स्वतंत्रपणानें शिक्षण देण्याचा विचार सुरू केला. याच वेळीं राजे लक्ष्मणराव भोसले यांनीं त्यांच्या मुलाच्या मौंजीबंधनानिमित्तानें देणगी दिली व त्यांतून महाराष्ट्र व्यायामशाळा व प्रताप आखाडा श्री. दत्तोपंत मारुलकर यांनीं स्वतंत्र सुरू केला. या नवीन व्यायामशाळेला वर्गणी देणाऱ्यांच्या पहिल्या नामावळींत डॉक्टरांचें नांव अग्रभागीं असलेलें आढळतें. या काळांत आखाडा व संघ अशा दोन पायऱ्या डॉक्टरांच्या कल्पनेंत असाव्यात. हा नवीन आखाडा निघाल्यावर त्यांत संघ-घटक जाऊं लागले. पण थोड्याच दिवसांत महाराष्ट्र व्यायामशाळा व नागपूर व्यायामशाळा यांच्यांत द्वैत माजून ती लाथाळी संघाला भोवणार, असा रंग दिसूं लागला. तेव्हां डॉक्टरांनीं संघ निराळ्या ठिकाणीं नेण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें इतवार-दरवाजा शाळेसमोरील पटांगणांत श्री. अण्णा सोहोनी यांनीं स्वतंत्रपणें संघाचे लाठीचे कार्यक्रम सुरू केले. प्रारंभीं व्यायामशाळा व संघ यांचे कार्यक्रम अलग होत, पण शेवटीं प्रार्थनेसाठीं सर्व जण एकत्रित येत.

संघाला कांहींसें आखाड्याचें बाह्यरूप असतांनाच १९२६ च्या एप्रिलमध्यें रामटेक येथील रामनवमीच्या यात्रेच्या वेळीं सर्व संघ-घटकांना तेथें नेण्याचा विचार डॉक्टरांच्या मनांत घोळूं लागला. रामटेक येथील यात्रेंत अव्यवस्थेमुळें सहस्रावधि ग्रामीण बांधवांना धक्काबुक्कीचा त्रास होऊन धड दर्शन मिळत नसे. ही अव्यवस्था थोड्या पण शिस्तबद्ध तरुणांच्या बळावर दूर करून, जनमनावर संघटनेच्या बळाचा व चांगुलपणाचा ठसा उमटवावा व स्वयंसेवकांचाहि आत्म-विश्वास व संघाभिमान या निमित्तानें वाढवावा, असा दुहेरी हेतु रामटेकला सर्वांना नेण्यामागें होता. प्रतिवर्षीं नागपुरांतील अनाथ विद्यार्थि-गृहांतील विद्यार्थी रामटेकला जात असत. ते जातांना बरोबर भगवा ध्वज न्यावयाचे. त्याच वेळीं आपल्या मंडळींना पाठवावयाचें तर आपल्या संघाला स्वतंत्र नांव व वेष असला पाहिजे व आपल्या मंडळींचा स्वतंत्र परिणाम व प्रभाव जोखतां आला पाहिजे, असें डॉक्टरांना वाटणें स्वाभाविक होतें. त्यांनीं संघाचें नांव काय असावें, या दिशेनें आपल्या सहकाऱ्यांशीं विचार सुरू केला व तें नांव निश्चित करण्यासाठीं दि. १७ एप्रिलला आपल्या घरीं बैठक घेतली. त्या वेळच्या बैठकांतून आजच्या-प्रमाणेंच कोणत्याहि विषयाची साधकबाधक चर्चा होई; पण त्यांत विशेषता अशी असे कीं, शेवटीं मतें घेऊन निर्णय ठरविला जाई. दि. १७ च्या बैठकींत संघाचें नांव काय असावें, याविषयीं बऱ्याच सूचना आल्या व ज्यानें त्यानें आपण सुचविलेलें नांवच कसें समर्पक आहे, याविषयीं समर्थनहि केलें. त्या वेळच्या नागपूरच्या कार्यवाहांनीं जें प्रतिवृत्त लिहून ठेवलें आहे, त्यांत ते म्हणतात कीं, "...सभेस २६ सभासद हजर होते. सभेचा विषय संघाचा नामकरणविधि हा

होता. या सभेत संघाकरिता अनेक नावे सुचविण्यात आली व त्यांवर बराच वादविवाद होऊन खालील तीन नांवे मताकरिता सभेपुढे ठेवण्यात आलीं. ती अशीं :—( १ ) राष्ट्रीय स्वयसेवक संघ, ( २ ) जरिपटका मंडळ, ( ३ ) भारतोद्धारक मडळ. या नांवापैकी पहिल्या नांवाला २० मते, दुसऱ्याला ५ व तिसऱ्याला ० मते मिळाली ! ”

याच बैठकीला प्रा. पा. कृ. सावळापूरकर हेहि उपस्थित होते. ते लिहितात, “...डॉक्टरांनी सस्थेचे हे नाव आपल्या मनाशी अगोदरच निश्चित करून ठेवले होते. तथापि बाल स्वयंसेवकाना आपण आपल्या मनाने काही तरी करूं शकतो, असा आत्मविश्वास उत्पन्न व्हावा एतदर्थच, जणू काय डॉक्टरानी उपस्थित भावी स्वयसेवकांना नाव सुचवावयाला सागितले. त्यात महाविद्यालयात प्रथम वर्षात नुकत्याच दाखल झालेल्या एका विद्यार्थ्याने ( आज हे गृहस्थ डिस्ट्रिक्ट जज्ज आहेत ) ‘ जरिपटका मंडळ ’ हें नांव सुचविले व त्यावर मोठ्या उत्साहाने भाषण केले. इतरांनीहि वेळेवर सुचलेली कांही नावे पुढे माडलीं. ही सर्व चर्चा झाल्यावर ‘ राष्ट्रीय स्वयसेवक सघ ’ हेंच नाव कसे बरोबर आहे, यासबंधी समर्थनात्मक भाषण करण्यासाठी डॉक्टरानीं मला आज्ञा केली व मी सुमारे अर्धा तास त्यावर चागला बोललो. माझ्या बोलण्यावर डॉक्टरसाहेब फार खूष झाले व त्यांनी मला जाहीर शाबासकीहि दिली. डॉक्टरसाहेबाचे विचार ऐकून माझ्या मनावर जे संस्कार झाले होते, त्यामुळेच मी ते भाषण करूं शकलो हे उघड आहे. अर्थातच हे श्रेय त्याचे आहे. ”

डॉक्टरांनीं अत्यंत विचारपूर्वक ‘ राष्ट्रीय स्वयंसेवक सघ ’ हे नाव निश्चित केले होते. त्या वेळी हिंदुस्थान हे ‘ त्यांत राहणाऱ्या सर्व लोकाचे राष्ट्र ’ असल्याचा अपसमज हिंदु पुढाऱ्यात इतका खिळून बसला होता की, त्याना हिंदुसमाज-संघटनेचे कार्य हे ‘ राष्ट्रीय ’ वाटणे शक्यच नव्हते. म्हणून डॉक्टरांनी हा शब्द अस्थानी व निरर्थक वापरला आहे, असे त्याचे परके शत्रु व स्वकीय मित्र दोघेहि बोलूं लागले ! पण विकृत राष्ट्रीयत्वाची कल्पना उराशी बाळगून संघाच्या ‘ राष्ट्रीय ’ शब्दाला काही जणानीं विरोध केला असला तरी डॉक्टराच्या मनांत मात्र हिंदुस्थानात हिंदु समाजाची प्रत्येक गोष्ट, सस्था व चळवळ हीच तेवढी बावन्नकशी ‘ राष्ट्रीय ’ असूं शकते, याविषयी सपूर्ण निःशकता होती. राष्ट्र म्हणजे परस्पर-विरोधी परंपरा, संस्कृति व भाव-भावना असलेल्या लोकाची मारून मुटकून बाधलेली आवळ्यांची मोट नसते, तर धर्म, संस्कृति, देश, भाषा व इतिहास अशा साधर्म्यातून ‘ आपण सर्व एक आहोत...सारखे आहोंत ’ अशी जी अपूर्व आत्मीयता वा जिव्हाळा हृदयातून उचंबळून येतो, तोच राष्ट्राला अधिष्ठानभूत असतो, हे त्यांनी पुरेपूर ओळखले होतें. परक्यांनीं हिंदूंच्या आत्मविश्वासावर आघात करण्यासाठीं संघाला जातीय,

राष्ट्रविरोधी व संकुचित म्हणण्यास प्रारंभ केला, यांत आश्चर्य करण्यासारखें कांहींच नव्हतें. कारण हिंदु समाजाचें स्वत्व जागें होण्यांतच त्यांचें मरण होतें, व म्हणून हिंदुसमाजाच्या मनांत त्या आत्मीयतेची म्हणजेच राष्ट्रीयतेची जागृति होऊं नये, एवढ्याचसाठीं तर त्यांनीं ' हा देश त्यांत राहणाऱ्या सर्वांचा आहे ' असा आपमतलबी प्रचार धडाक्यानें चालविला होता. या परक्या प्रचाराला या वेळीं इतकें यश आलें होतें कीं, डोळ्यांदेखत हिंदु समाजाची इतरांकडून पद्धतशीर ससेहोलपट चालू असलेली प्रत्यक्ष पाहूनहि, तिचा प्रतिकार करण्यासाठीं सुसघटित होणें हें संकुतितपणाचें वाटूं लागलें व उलट ससेहोलपट करणाऱ्यांनाच आपले म्हणून कवटाळण्याची आत्मघातकी विपरीत वृत्ति दुर्दैवानें दिसूं लागली ! प्रत्यक्ष आपल्या समाजाचें हें दयनीय दृश्य डॉक्टरांना स्पष्ट दिसत होतें व म्हणूनच त्यांनीं लोकांच्या तात्कालिक स्तुति-निंदेची लवमात्र क्षिति न बाळगतां, जें सत्य होतें, इतिहासाला संमत होतें, राष्ट्राला हितकर होतें, पण घडविण्यास अत्यंत अवघड होतें, तें संघकार्य निर्भयतेनें सुरू केलें. लहान मुलाला बाळकडू पाजूं लागावें तर तें हातांपायांची आदळआपट करून एकच आकांत करूं लागतें ! तशीच स्थिति आत्मविस्मृत हिंदु समाजाची त्या वेळीं दिसत होती यांत शंका नाहीं. मुलानें आकान्त केला तरी परिणामीं हितकर असलेलें बाळकडू ज्या तळमळीनें पण आग्रहानें माता पाजीत असते, तीच तळमळ व आग्रही वृत्ति ' हिन्दुत्व हेंच राष्ट्रीयत्व ' हें आरोग्यदायी औषध हिंदु समाजाच्या गळीं उतरविणाऱ्या डॉक्टरांच्या व्यवहारांत ओतप्रोत भरलेली असे.

ही राष्ट्रीयत्वाची दीक्षा देण्यासाठीं डॉक्टरांनीं संघ सुरू केला. तेव्हांची परिस्थिति त्यांना कशी दिसत होती हें पहाण्यासारखें आहे. आपल्या टांचणवहींत डॉक्टर लिहितात, " ...म. गांधींच्या असहकारितेच्या चळवळीचा राष्ट्रांत चढलेला आवेश कमी होऊन त्या चळवळीमुळें राष्ट्रांत उत्पन्न झालेले दोष आपलें डोकें वर काढून मिरवूं लागले होते. राष्ट्रीय चळवळीचा जोर कमी होऊन आपसांतील द्वेष व मत्सर हे स्पष्ट दृग्गोचर होत होते. व्यक्तीव्यक्तींतील भांडणाला ऊत आला होता. जाती-जातींत भांडणें सुरू होतीं. ब्राह्मणब्राह्मणेतर वाद थयथय नाच करीत होता. कोणत्याहि संस्थेंत एकसूत्रीपणा दिसून येत नव्हता. असहकारितेच्या चळवळींत दूध पिऊन पुष्ट झालेले यवनरूपी सर्प आपले विषारी फूत्कार सर्वत्र सोडून राष्ट्रांत कलह उत्पन्न करीत होते. " ह्या सर्व बजबजपुरीचीं बाह्य रूपें विविध दिसलीं तरी त्यांचा उगम मात्र हिंदूंच्या आत्मविस्मृतींत व असंघटितपणांत आहे, हें अचूक निदान डॉक्टरांनीं केलें होतें व ह्या बाह्य लक्षणांचा स्वतंत्र विचार न करतां या मूळ रोगावर त्यांनीं संघटना-चिकित्सा सुरू केली होती. हा मूळ रोग मुळासकट खणून काढला कीं, त्याचीं बाह्य लक्षणें क्रमाक्रमानें नाहींशीं होतील, असा त्यांना विश्वास वाटे. दिल्लीच्या मुसलमानी राज्याच्या

मुळावर कुठार घालण्याची थोरल्या बाजीरावाची दृष्टीच डॉक्टराच्या या प्रयत्नामागे होती, असे म्हणणे सयुक्तिक दिसेल.

हे आपल्या सस्थेचे नामकरण झाल्यावर सर्व घटकाना विशिष्ट पोशाख करण्याचा आग्रह डॉक्टरांनी सुरू केला व रामनवमीच्या दिवशी त्यातील बरेच जण रामटेकला त्या वेषातच उपस्थित राहिले. १९२० च्या नागपूर कॉंग्रेस-अधिवेशनाच्या वेळी डॉ. पराजपे व डॉ. हेडगेवार यांच्या नेतृत्वाखाली उभारण्यात आलेल्या 'भारत सेवक समाजा'च्या पथकाचा वेषच प्रारभी सघाकडून स्वीकारला गेला. त्यात खाकी विजार, खाकी सदरा व खाकी दोन गुड्याची टोपी याचा अतर्भाव असे. मात्र खाकी विजारीची लाबी आजच्या मानाने जरा अधिक म्हणजे गुडघ्यापर्यंत असावयाची. दि. १९ एप्रिलला रा. स्व. सघ, अ. वि. गृह व बजरंग सघ यांची एक सयुक्त बैठक झाली व त्यात रामटेकला जाण्याची योजना आखण्यात आली.

रामटेकच्या त्या उत्सवात रामनवमीच्या आदल्या दिवशीच स्वयंसेवक तेथे जाऊन पोचले व त्यानी सकाळी ८ पूर्वी निवासातून व्यवस्थेसाठी गडावर जाताना, समर्थ रामदासाचे मनाचे श्लोक खणखणीत म्हणत सचलन केले. हा प्रकार सर्वांनाच नवखा होता व त्यामुळे सबध दिवस या स्वयसेवकाच्या हालचाली हा लोकाच्या कौतुकाचा व कुतूहलाचा विषय बनला असल्यास नवल नव्हते. सहस्रावधि दर्शनेच्छूंची गर्दी उसळल्यावर त्याना आवर घालण्यास आरक्षक असमर्थ होते. कारण त्याची संख्या व आस्था दोन्ही गोष्टी यथातथाच होत्या. सघ-स्वयंसेवक व त्याचे सहकारी यानी प्रवेशद्वारावर उभे राहून व लोकाना विनंति करून बारीत उभे राहण्याचे व क्रमाने जाण्याचे वळण लावून दिले व ठिकठिकाणी पाणी भरून ठेवून यात्रिकरूंच्यासाठी पाणपोया चालविल्या. याच वेळीं आणखी एक गोष्ट ध्यानी आली की, भाविक हिंदूंच्य अज्ञानाचा लाभ घेण्यासाठीं मुसलमान फकिरांनी नगारखान्यापर्यंत ठिकठिकाणीं लहान लहान पीर उभारून त्याच्या भोळेपणांतून पैसे उकळण्याचे काम पद्धतशीरपणे चालविले आहे. हे उपटसुभ पीरांचे आक्रमण भोळ्या लोकाना जाणवत नव्हते व ज्यांना ते खटकत होते त्यांच्यांत तें आक्रमण थाबविण्याची धमक नव्हती. डॉक्टरानी आपल्या सहकाऱ्यांच्या व रामटेकमधील स्नेह्याच्या साहाय्याने अशा पीराचे उच्चाटन केले. डॉक्टर धार्मिक होते, हाडाचे हिंदु होते व सहिष्णुताहि त्याच्या रक्तातच होती. पण पीराच्या नांवाखालीं हिंदूंवर आक्रमण करणाऱ्या मुसलमानाचे गरिबांची नागवणूक करण्याचे चाळे हे त्यांना सहन होणे शक्य नव्हते. मुसलमानाप्रमाणेच गर्दींतूनहि निश्चित दर्शन घडवितो असे आश्वासन देणाऱ्या क्षेत्रस्थ ब्राह्मणाचीहि डॉक्टरानीं शिस्त लावून बारी लावून दिल्याने मोठीच कुचंबणा झाली. देवाशीं वशिला लावण्याची आता आवश्यकता उरली नव्हती. तेव्हां असा वशिला लावण्यासाठीं हात ओला

होण्याची संधि गेल्यानें तेहि मनांतून अप्रसन्न झाले. पण धर्मक्षेत्रांतील अधर्म नाहींसा करतांना लबाडांना काय वाटेल, याची चिंता डॉक्टरांनीं केली नाहीं ! पाणपोईच्या रूपानें लोकांच्या पाठीवरून फिरणारा डॉक्टरांचा ममतेचा हात अन्याय व पशुता दिसतांच वज्रमुष्टि होऊन उसळून उठे ! कारण तोच त्यांचा स्वभाव होता. सकाळीं ८ पासून सायंकाळीं ५ वाजेपर्यंत स्वयंसेवकांनीं तेथें काम केलें व मग रात्रीं सर्वांनीं जेवण करून विश्रांति घेतली. संघाच्या प्रारंभापासून सुरू केलेला हा उपक्रम न चुकतां परवांपरवांपर्यंत चढत्या-वाढत्या संख्येंत व उत्साहानें चालू होता व जेव्हां तो थांबविण्यांत आला, तेव्हां व्यवस्थेच्या दृष्टीनें आवश्यकता उरली नव्हती म्हणूनच.

रामटेकच्या कार्यक्रमाहून परत आल्यावर शाखेंत श्री.सोहोनींच्या नेतृत्वाखालीं लाठी वर्ग नेहमींप्रमाणें सुरू झाले व त्या ओढीनेंहि नवे नवे तरुण संघाकडे आकृष्ट होऊं लागले. श्री. अनंत गणेश तथा अण्णा सोहोनी हे उंच, गौरवर्ण, प्रकृतीनें दणकट व चपळ होते व लाठी, तलवार, भाला व जंबिया चालविण्यांत त्यांचा हातखंडा होता. त्यांचें कौशल्य हेंहि एक आकर्षणच होतें. अशी संख्या क्रमानें वाढूं लागली असतां डॉक्टरांनीं त्या नवीन घटकांना संथपणें संघाच्या विचारांचें दर्शन घडविण्यास प्रारंभ केला. वाटेल त्या तरुणाला एकदम संघांत प्रवेश दिला जात नसे. संघांतील दोघांनीं त्याच्याशीं आपला चांगला परिचय असल्याची ग्वाही डॉक्टरांना दिली कीं, मग डॉक्टर दोन-तीन वेळां त्याच्या-जवळ बोलत. हें बोलणें अगदीं मनमोकळें पण येणाऱ्या नवीन घटकांची पारख करण्याच्या दृष्टीनें व्हावयाचें. प्रत्येकाचें नांव, गांव, वय, शिक्षण, पालक, मित्र, सायंकाळीं काय करतोस, अशी चौकशी ते करीत. अशा वेळीं बहुतेक जणांच्या घरची ओळख त्यांना असावी असें दिसून येई. अशी प्राथमिक चौकशी केल्यावर डॉक्टर निरनिराळे प्रश्न विचारीत. त्यांत त्या मुलाचा पोच किती हें पाहण्याकडे दृष्टि असे. “ येथून घरीं जातांना चौकांतल्या पोलिसानें विचारलें कीं, ‘ डॉक्टर हेडगेवारांच्या घरीं गेला होतास. तेथें काय बोलणें झालें ? ’ तर तूं काय उत्तर देशील ? संघांत कशासाठीं येण्याची इच्छा आहे ? उद्यां संघाशीं मतभेद झाला तर काय करशील ? ” असे अनेक प्रश्न ते विचारीत. आणि त्यांचीं उत्तरें तो कशीं देतो हें पाहून त्याला चार-दोन दिवसांत पुन्हा येऊन भेट असें सांगत. अशा भेटींत समाजस्थितीची कल्पना तरुण मनावर उमटविण्याचा त्यांचा विचार असे. लाठी-काठी कां शिकावीशी वाटते ? एकट्यानें लाठी शिकून भागेल काय ? तूं किती जणांना आपल्याबरोबर आणूं शकशील ?—असे प्रश्न विचारून ते नवागताच्या विचारांना चालना देत. जरा जाणता तरुण भेटला तर त्यांच्या प्रश्नांचें स्वरूप त्याला अनुरूप असें पालटावयाचें. ते विचारीत कीं, “ स्वराज्य म्हणजे काय ? तें पाहिजे असें म्हणणारे किती आणि त्याप्रमाणें खटपट करणारे किती ? ” अशी

शेकडेवारी ते विचारीत आणि शंभरांत हाताच्या बोटांवर मोजण्याइतकेहि लोक स्वराज्याचा विचार करीत नाहींत. ही वस्तुस्थिति ते त्याच्या ध्यानी आणून देत. डॉक्टरांच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव असा असे कीं, एकदां त्यांना भेटून गेलेल्या तरुणाचे पाय पुन्हा त्याच्या घराकडे ओढ घेत. त्यांच्या बोलण्यांतील जिव्हाळा हा ओठापासूनचा नव्हता. फुलाच्या अगचाच सुगध जसा दरवळावा तसा डॉक्टराच्या त्यागपूर्ण आणि ध्येयनिष्ठ जीवनाचाच नाद त्याच्या कृति-उक्तीतून स्वभावतः उमटे. त्याचा जिव्हाळा हा वरवरचा आणि व्यवहारी नसल्याने, त्याच्या उत्कट आणि अनन्य देशभक्तीचा रंग त्याना भेटावयास येणाऱ्याच्या भाव-भावनाना चढल्यावाचून राहत नसे. कोणी त्याना भेटून परतूं लागला की, जिन्यापर्यंत डॉक्टर त्याला पोचवावयाला जात आणि त्याच्या खाद्यावर हात ठेवून आणि त्याच्यावर आपल्या प्रसन्न हास्याचा आनंदमय वर्षाव करीत ते विचारीत कीं, " आतां पुन्हा केव्हा याल ? " या प्रश्नाने घराकडे वळलेले पायहि काही काळ थबकत असल्याचा अनुभव येई.

नवीन स्वयंसेवकाची भरती होऊ लागल्यावर इतवार दरवाजा शाळे-समोरील पटागण अपुरे पडू लागले आणि म्हणून नवीन जागेचा शोध सुरू झाला. डॉ. खानखोजे, श्री. भाऊजी कावरे व डॉ. हेडगेवार यानी १९०८-९-पासून ज्या मोहिते वाड्याच्या आश्रयाने गुप्त क्रान्तिकार्यांचे धागेदोरे विणले होते, तो वाडा कावरे आणि डॉक्टर याच्या डोळ्यासमोर अशा वेळी उभा राहणे स्वाभाविकच होते. त्या मोहिते वाड्याची १९०८ मधली स्थिति विचारात घेतां १९२६ मध्ये त्या वाड्याची विलक्षण पडझड झाली होती असेच म्हणावे लागेल. डॉ. खानखोजे यानी १९०८ मधील वाड्याचे वर्णन करतांना म्हटले आहे कीं,..." हा एक लहानसा किल्लाच होता. त्या वेळी केवळ वृद्ध साळूबाई आपल्या सरदारी थाटाने एवढ्या मोठ्या वाड्यात एकट्याच राहत असत. त्याच्यात जुन्या पद्धतीचा मराठ्याचा देशाभिमान बराच जागृत होता. वाड्याच्या भव्य दगडी दरवाजावर एक शिपाई रात्रदिवस पहारा करीत असे. दरवाजा नेहमी बंद असे आणि परवानगीवाचून कोणाला वाड्यात जाता येत नसे. वाडा दुमजली असून आत मोठमोठी दालने होती. " पण १९२६ मध्ये या वाड्याचे जोते आणि काही भिती तेवढ्या उरल्या होत्या आणि जिकडे तिकडे पडक्या भितीच्या ढिगाऱ्याखालीं वाड्याचे वैभव मात्र धुळीला मिळाले होते ! साळूबाईच्या मागून बेवारशी पडलेल्या वाड्याची अशी दुर्दशा होणे स्वाभाविक होते असेच म्हणावे लागेल. या पडक्या वाडयाचा उपयोग डॉ. पराजपे आणि डॉक्टर यानी १९२० च्या कॉग्रेस अधिवेशनाच्या वेळींहि कांही काळ केला असला तरी त्या वेळी जेमतेम उपयोगी पडलेला भागहि आतां कोलमडला होता. तेव्हां या वाड्यांत थोडी साफसुफी करून संघस्थान बनवावे, असा विचार निघाला.

त्या वेळीं भाऊजी कावरे आपल्या स्वभावानुसार थट्टेत म्हणाले कीं, " श्रीमंत साळूबाईनंतर हा वाडा दुर्दैवानें भुतांकडे गेला आणि त्यांच्याकडून त्या वाड्याचा वारसा सध्या माझ्याकडे आला आहे. तेव्हां तो तुम्ही खुशाल वापरा ! "

संघस्थानासाठीं जागा निश्चित केल्यावर सध्यां वाड्याच्या पूर्वांगाला उभ्या असलेल्या भव्य दगडी दरवाजाजवळील कांहीं भाग स्वच्छ करण्यास प्रारंभ झाला. शाखेपूर्वीं आणि सुट्टीच्या दिवशीं इतर वेळींहि हें काम चालू असे. टिकाव, फावडीं आणि घमेलीं घेऊन पडकीं भिंताडें बाजूला करण्याच्या कामांत डॉक्टर स्वतः तरुणांबरोबर खपत होते. उंटावरून शेळ्या हांकण्याच्या पद्धतीचें नेतृत्व त्यांनीं बाहेर अनुभवलें होतें आणि त्याची त्यांना अत्यंत उबग आणि शिसारी आली होती. स्वतःला शिष्ट समजून इतरांना आदेश न देतां नेत्यानेंहि सर्वांत मिसळून आणि सर्वांबरोबर कामानें हाताला घट्टे पाडून घेऊन मार्गदर्शक झालें पाहिजे, अशी त्यांची धारणा असे. हाच खऱ्या नेतृत्वाचा म्हणजेच खऱ्या स्वयंसेवकत्वाचा पहिला धडा डॉक्टरांनीं मोहिते वाड्याच्या धुळींत स्वयंसेवकांना घालून दिला होता. हींच संघाच्या प्रारंभींचीं ' धुळाक्षरें ' संघाला आजहि प्रेरक ठरलीं आहेत आणि हींच धुळाक्षरें हिंदु समाजांत यथार्थतेनें ' अक्षर ' ठरणार आहेत यांत शंका नाहीं !

संघांतील लाठीचें शिक्षण दि. २८ मे १९२६ पासून पद्धतशीरपणानें सुरू झालें. त्यासाठीं हलके हलके नव्या आज्ञा बनविणें आवश्यक होतें. हें काम श्री. अण्णा सोहोनी यांनीं यशस्वीपणें करून दाखविलें. या आज्ञांचा विशेष म्हणजे इंग्रजी आज्ञांची पद्धति रूढ असतांहि नवीन आज्ञा जाणूनबुजून स्वभाषेंत रचण्यांत आल्या. त्या आज्ञांत मराठी, हिन्दी आणि संस्कृत अशा सर्वांचा अंतर्भाव केलेला होता असें दिसतें. ज्या काळांत नवीन संस्थेला नांव देण्यापासून तों घरांत पत्नीचा ' मिसेस् ' म्हणून उल्लेख करण्यापर्यंत इंग्रजीचा सुळसुळाट झालेला होता, त्या काळांत स्वभाषेंत आज्ञा निर्माण करण्याचा उपक्रम अभिनवच म्हणावा लागेल. शाखेच्या व्यवहारांत ' सावधान, दक्ष, आराम ' आदि आज्ञांचा वापर सुरू झाला तरी सैनिकी शिक्षणापुरत्या इंग्रजी आज्ञा आपद्धर्म म्हणून प्रारंभीं स्वीकारल्या गेल्या. व्यवहाराला ' आपद्धर्माची मुरड ' घालण्याइतका लवचिकपणा डॉक्टर सदैव दाखवीत, याचेंच तें निदर्शक होतें. वारा पाहून योग्य त्या प्रमाणांत आपल्या नौकेचीं शिडें कलतीं करण्याचें अलौलिक कौशल्य त्यांच्याजवळ होतें.

या होणाऱ्या लाठी-भाला आदि कार्यक्रमांच्या शेवटीं प्रार्थना सुरू करण्यांत आली. त्यांत एक मराठी व एक हिंदी श्लोक होता. यांतील मराठी श्लोकाचा उगम कळत नाहीं; पण तो त्या काळांत नागपुरांतील कांहीं शाळांत म्हणण्याची प्रथा होती असें सांगतात. पण दुसरी हिन्दी प्रार्थना मात्र आर्यसमाजांत रूढ असणाऱ्या

प्रार्थनेत संघाच्या दृष्टीनें थोडा पालट करून स्वीकारली होती. तो मूळचा पाठ असा :—

हे प्रभो ! आनंददाता ग्यान हमको दीजिये ।
शीघ्र सारे दुर्गुणोंको दूर हमसे कीजिये ।
लीजिये हमको शरणमे हम सदाचारी बने ।
ब्रह्मचारी देशरक्षक वीर-व्रतधारी बने ॥

यांत थोडा पालट करून संघांत तिचे रूप खालीलप्रमाणे करण्यांत आले:—

हे गुरो ! श्रीरामदूता ! शील हमको दीजिये ।
शीघ्र सारे सद्‌गुणोंसे पूर्ण हिन्दू कीजिये ।
लीजिये हमको शरणमे, रामपंथी हम बने ।
ब्रह्मचारी धर्मरक्षक, वीर-व्रतधारी बने ॥

ही श्लोकांची जुळणीहि श्री. अण्णा सोहोनी यांनीच केली होती असे सांगतात.

मोहिते वाड्याच्या संघस्थानावर श्री. अण्णा सोहोनी व त्यानी आपल्या पद्धतीने शिकवून उभे केलेले काही निवडक तरुण यानी स्वयसेवकाचे निरनिराळे वर्ग पाडून लाठी शिकविण्यास प्रारंभ केला. लाठी-भाला आदि आयुधाचे हात करतांना दोन्ही पायावर सारख्या प्रमाणात दबून घेण्याचा पवित्रा हे त्यातील एक वैशिष्ट्य होते. पण त्याहिपेक्षा ‘ युद्धयोग ’ या नावाने सोहोनीनीं संघात रूढ केलेल्या लाठी-प्रकारांतील नावीन्य, आक्रमकता आणि आवेश ह्या गोष्टी हिंदुस्थानांतील इतर प्रचलित पद्धतींपेक्षा विशेष होत्या यात शका नाही.

ह्या लाठीच्या विशिष्ट पद्धतीचे शिक्षण श्री. सोहोनी याना कै. दामोदर बळवंत तथा भिडे भटजी या क्रान्तिकारकापासून मिळाले होते. या भिडे भटजींनींच सेनापति बापट यांना क्रांतिकार्याची दीक्षा दिली होती आणि डॉ. मुजे यांना प्रयत्नपूर्वक राजकारणाच्या आखाड्यात आणून उतरविले होतें. अबोलकेपणाने आणि चिकाटीने लोकांत बलोपासना आणि देशभक्ति यांचा प्रसार करणाऱ्या निष्ठावन्त देशभक्तांत त्यांची गणना प्रामुख्याने करावी लागेल. अशा थोर व्यक्तीकडून मिळालेला पवित्रा आणि लाठी, भाला, तलवार आदि आयुधाचे शिक्षण संघांत सुरू झाले आणि क्रमाने प्रगत होत गेले.

त्या वेळचे संघाचे कार्यवाह श्री. रघुनाथराव बाडे यानी एका वहीत केलेली टिपणे डॉक्टरांच्या प्रारंभीच्या प्रयत्नावर चागलाच प्रकाश टाकणारीं आहेत. त्या टिपणांवरून असे दिसून येते कीं, दि. २१ जून १९२६ ला अनाथ विद्यार्थि-गृहात एक बैठक झाली होती. त्या बैठकींत प्रत्येक स्वयंसेवकाने आपले ध्येय आणि आपल्या स्वयंसेवक संघाचे ध्येय काय असावे, हे आपल्या विचाराप्रमाणे लिहून काढावे, त्याच्याच जोडीनें आपण संघाचे स्वतः चालक झालो तर

संघाची कार्यपद्धति आणि घटना आपण कशी ठेवूं, हेंहि लिहून काढावें. आणि तो कागद दि. २८ जूनपर्यंत डॉक्टरांजवळ आणून द्यावा असें ठरलें. डॉक्टरांची इतरांना विचार करावयास लावण्याची ही योजना होती हें स्पष्ट दिसतें. आपण कांहीं गोष्टी सांगाव्यात आणि त्या तरुणांनीं निमूट ऐकून घ्याव्यात आणि दिल्या घासाचे आणि सांगितल्या कामाचे सांगकामे दास उभे करावेत, ही डॉक्टरांची कल्पना नव्हती. सर्व स्वयंसेवकांच्या विचारांना गति दिल्यावर ते विशुद्ध अशा हिंदुराष्ट्रवादाकडे आणि स्वतःचें जीवन त्या सत्संकल्पाच्या पूर्तीसाठीं समर्पण करण्याकडेच नेमके खेचले जातील, असा त्यांचा आत्मविश्वास होता. सभोंवतींच्या परिस्थितीची स्वयंसेवकांना कल्पना येऊं लागली तर आपण प्रतिपादीत असलेल्या हिंदुराष्ट्राची कल्पना डळमळूं लागेल अशी भीति त्यांच्या मनांत डोकावत नसे. उलट त्यांना असें वाटे कीं, देशाच्या परिस्थितीचें वास्तवदर्शन तरुण मनाला घडविल्यास, त्या परिस्थितींत पालट घडविण्यासाठीं संघटनेव्यतिरिक्त अन्य उपायच नाहीं हें त्यांना समजून येईल आणि त्यांतूनच, आपण स्वतः धडपड केली पाहिजे, अशी अंतःप्रेरणा उदित होईल. डॉक्टरांना असे विचारवन्त आणि स्वयंस्फूर्त कार्यकर्ते उभे करावयाचे होते आणि त्याच दिशेनें संघाच्या स्वयंसेवकांना, आपलें आणि संघाचें ध्येय, तसेंच संघाची कार्यपद्धति आणि घटना प्रत्येकानें आपापल्या कल्पनेप्रमाणें लिहून द्यावी, असा आदेश त्यांनीं दिला होता.

या काळांत दर महिन्यांत पहिल्या रविवारीं बैठक होत असे आणि मागील महिन्याचें प्रतिवृत्त सर्वांसमोर ठेवलें जाई. त्याचप्रमाणें पुढील महिन्यांतील संभाव्य कार्यक्रमांची आंखणीहि अशा बैठकींत होत असे. प्रत्येक स्वयंसेवकानें महिन्यांतून किमान एक-दोन वेळां तरी डॉक्टरांची भेट घेतली पाहिजे, असा दंडक होता. अशा वेळीं स्वयंसेवक व्यायामशाळेंत नियमितपणें जातात कीं नाहींत, याची चौकशी स्वतः डॉक्टर आणि इतर अधिकारी आवर्जून करीत असत.

या वर्षींच रक्षाबन्धनाचा उत्सव संघांत डॉक्टरांनीं सुरू केला. हिंदु-समाजाच्या एकत्वासाठीं राखीला 'बंधुत्वाची व परस्परांच्या संरक्षणाची ग्वाही' असा नवा आशय निर्माण करून हिंदुस्थानच्या उत्तर भागांत रूढ असलेल्या या पद्धतीला डॉक्टरांनीं राष्ट्रीय बंधुत्वाच्या संस्कारांचें रूप दिलें. संघाच्या पहिल्या दिवसापासूनच डॉक्टरांच्या विचारांनीं हिंदुस्थानच्या सीमा गांठल्या होत्या आणि त्या चतुःसीमांतील भाषा, प्रान्त, जाति, पंथ यांचें वरवर दिसणारें भेदाचें शेवाळ दूर सारून आंतील एकरस हिंदुसमाजाचें जीवन त्यांनीं प्राशन केलें होतें. त्यामुळेंच रक्षाबन्धन हा सण त्यांच्या दृष्टीला राजपुतांचा सण न वाटतां तो अखिल हिंदुसमाजाचा वाटला; आणि त्याचा त्यांनीं सानंद स्वीकार केला. हा पहिला रक्षाबंधनोत्सव नागपुरांतील तुळशीबागेंत दुपारीं दोन वाजतां बैठकीच्या रूपांत साजरा झाला होता.

संघाच्या प्रारंभींच्या काळांत कोणत्याहि मशिदीवरून वाजतगाजत मिरवणूक नेण्याचा हिंदुसमाजाचा अधिकार अबाधित राखण्यासाठी डॉक्टराच्या प्रेरणेनें स्वयंसेवक अशा मिरवणुकातून भाग घेत असत. १९२५ च्या प्रारंभी नागपुरांतील हिंदु-मुसलमान तंट्याचा निर्णय करण्यासाठी प. मोतीलाल नेहरू, डॉ. महमूद आणि मौलाना अबुल कलम आझाद याची चौकशी समिति बसली होती. त्या समितीने मशिदीवरून भोसले घराण्याची कोणतीहि मिरवणूक आणि जागोबाची मिरवणूक या केव्हांहि सवाद्य जाण्यास संमति दिली होती आणि इतरांनीं नागपुरातील पांच प्रमुख मोठ्या मशिदीसमोर दुपारच्या आणि संध्याकाळच्या नमाजाचे वेळी अर्धा अर्धा तास सोडून इतर वेळी वाद्ये वाजवीत जावे, असा तिचा निर्णय होता. पण हा निर्णय अनेकदा कागदावरच राही. मुसलमानाचा हट्टीपणा आणि हिंदूंची भीरुता हीच त्याची कारणे होती. ही कारणे ध्यानीं घेऊन ' बाजा बद करो ! ' असे मुसलमान सागू लागताच त्याच्याहून निग्रहानें आणि खड्या स्वराने ' बाजा बजाव ! ' सागणारे हिंदूच्या मिरवणुकीत उभे केले पाहिजेत, हे डॉक्टरानीं ओळखले होते. आणि त्याच्या अपेक्षेप्रमाणे स्वयंसेवक तसे जाऊ लागताच मिरवणुका निर्वेधपणे पार पडू लागल्या. काहीं दिवसानी संघ जसजसा वाढू लागला, तसतसा त्याच्या नुसत्या अस्तित्वानेच मुसलमानाचा हट्ट कमी होऊन त्याच्यातहि समंजसपणा दिसू लागला ! ' भयबिन होत न प्रीति ' हाच सिद्धान्त शेवटी खरा ठरत असतो ! या काळात व यानतर एक-दोन वर्षे नागपुरांतील हिंदु-मुसलमान सबंध बिथरलेलेच होते. त्या काळात हरितालिकेच्या वेळीं मुसलमानाकडून स्त्रियांची कुचेष्टा होत असल्याचे कळतांच तुळशीबाग आणि शुक्रवार तलाव या ठिकाणी आणि तिकडे जाणाऱ्या प्रमुख रस्त्यावर संघाचे स्वयंसेवक योजनापूर्वक राहू लागले. ही जागरूकता अत्यंत परिणामकारक ठरली आणि स्त्रियांनीं डॉक्टराना व स्वयसेवकांना धन्यवाद दिले. अशा प्रसगी डॉक्टराच्या बैठकीत बसणाऱ्या स्वयसेवकाना असे ऐकावयाला मिळे की, " आज योजनेनें ठिकठिकाणी स्वयसेवक उभे करावे लागतात, ही लाजिरवाणी अवस्था आहे. ती बदलून सर्व हिंदुसमाज जागृत राहून आपला चोवीस तासांचा व्यवहार करू लागेल तर स्त्रियाकडे वाकड्या नजरेने पाहण्याचे धैर्य कोणालाहि होणार नाही. अशीच स्थिति आपण निर्माण केली पाहिजे. "

संघाचा पहिला वार्षिकोत्सव डॉक्टरांच्या घरीच साजरा करण्यात आला. त्या वेळी संघ-स्वयंसेवकाच्या प्रमाणेंच अनाथ विद्यार्थि-गृहातील विद्यार्थींहि उपस्थित होते. श्री. बापुराव आबर्डेकर याचे अध्यक्षीय भाषण झाले आणि शेवटी जे गीत गाइले गेले त्यातील ओळी अजूनहि कांहीं जणाना मुखोद्गत दिसतात त्या अशा :

परमपावना भगव्या झेंड्या, काय दशा तव ही !
जिथे जन्मला जिथे तळपला तिथे ठाव नाहीं !

सुना रायगड, सुनें पुण्यपुर, सुना महाराष्ट्र
उदासवाणें तुझ्याविणें रे ! स्मशान सर्वत्र !

हा उत्सव दुपारीं ४ वाजतां साजरा करून त्यानंतर सर्व स्वयंसेवक राजाबाक्षाच्या प्रसिद्ध मारुति-मंदिरांत सीमोल्लंघनासाठीं गेले. त्या वर्षीं संघाची दसऱ्याची स्वतंत्र मिरवणूक निघाली नव्हती. कारण त्यासाठीं लागणारें मनुष्यबळ आणि शिस्त या दोन्ही गोष्टी अत्यंत अल्प होत्या. पहिल्या वार्षिकोत्सवांतील उल्लेखनीय घटना म्हणजे स्वयंसेवकांसाठीं डॉक्टरांनीं एक ग्रंथालय सुरू केलें.

या वेळीं मोहिते वाड्यांतील बरीच जागा खेळण्याजोगी स्वच्छ करण्यांत आली होती आणि त्या जागेंत असलेल्या तळघरांत बैठका आणि इतर वेळीं स्वयंसेवकांची ये-जा सुरू असे. आतां संचलनासाठीं जागेची अडचण उरली नाहीं, हें ओळखून डॉक्टरांनीं श्री. मार्तंडराव जोग यांना प्रत्येक रविवारीं सकाळीं सैनिकी शिक्षण देण्यासाठीं येण्याची सूचना केली. ही डिसेंबर १९२६ मधील घटना आहे. श्री. मार्तंडराव जोग हे या वेळीं काँग्रेसच्या दलाचेहि प्रमुख होते. तरी डॉक्टरांच्या सौजन्यापुढें जो तो टोपीचा रंग विसरत असे, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं ! डॉक्टरांचें आणि श्री. जोग यांचें घर नव्या शुक्रवारींत शेजारींच असल्यानें १९२० मध्यें जोग सैन्यांतून परत आल्यावर स्वाभाविकच दोघांचा परिचय झाला आणि त्या परिचयापासूनच डॉक्टरांनीं त्यांना आत्मसात् केलें. १९४९ मध्यें प. पू. सरसंघचालक श्रीगुरुजी यांना लिहिलेल्या पत्रांत श्री. मार्तंडराव जोग यांनीं लिहिलेलें वाक्य उल्लेखनीय आहे. ते म्हणतात कीं, “ मी एक आपलाच आहें. माझें जीवन संघानेंच उत्क्रांतिमय केलें असून परमपूजनीय डॉक्टरांनीं मला चुचकारून आपल्या कार्यांत बसविलें होतें. ” डॉक्टरांचें चुचकारणें असें प्रभावी असे.

मोहिते संघस्थानावर संचलन सुरू झाल्यावर गणवेषाचा आग्रह डॉक्टरांनीं सुरू केला आणि केव्हां केव्हां रस्त्यानें संचलन करीत जाण्यासहि आतां प्रारंभ झाला. पहिल्या संचलनांत तीस-चाळीस स्वयंसेवक गणवेषांत आणि शिस्तीनें शिट्टीच्या ठेक्यावर जाऊं लागतांच लोकांना आश्चर्यच वाटलें आणि कांहीं बाल आणि किशोर तर त्या स्वयंसेवकांच्या मागें घोळका करून व त्यांच्याचप्रमाणें पाय जुळवून चालण्याचा प्रयत्न करीत तेलंग खेडीपर्यंत गेले ! पहिलीं कांहीं संचलनें ( रूट मार्च ) हीं शाखेची संख्या वाढविणारीं ठरलीं असल्यास नवल नव्हतें. कारण नागरी जीवनांत अनुशासित तरुणांचें हें दृश्य अभिनव होतें. सैनिकी शिक्षण हा डॉक्टरांच्या आवडीचा विषय होता आणि परतंत्र राष्ट्रांत त्या शिक्षणाचा ओनामा करण्यांत लाभलेली अनुकूलता त्यांना उत्साहित करणारी ठरणें स्वाभाविक होतें. स्वातंत्र्यवीर सावरकरांनीं १९०५–६ मधील परिस्थिति वर्णन करतांना म्हटलें आहे कीं, “ अभिनव भारत सुरू करतांना...दहा

स्वातंत्र्य-सैनिकांच्या फुटकळ तुकडीचें सुद्धां उघड संचलन करतां येत नव्हते. ” पण आतां वीस वर्षात देशभक्ताच्या प्रयत्नाने असे असंख्य जणांचे संचलन घडवून आणण्यास सुसंधि मिळाली, ही राष्ट्रीय दृष्टीनें एक पर्वणीच होती आणि त्याचा आनंद डॉक्टराच्या बैठकातून उमटल्यावाचून राहत नसे.

सैनिकी शिक्षणात आपले तरुण निष्णात व्हावेत, अशी दृष्टि असल्यानें, ग्वाल्हेरच्या सैन्यांतील एक अधिकारी श्री. उपासनी हे नागपूरला सुटी घेऊन आले की डॉक्टर काही स्वयंसेवकाना त्याच्याकडे पाठवीत. विविध पथक-रचनाचे ( Formations ) आणि व्यूहरचनाचे शिक्षण श्री. कृष्णराव लाबे आदि तरुणांना एका लहानशा खोलीत, आगपेटीतील काड्याच्या साहाय्याने श्री. उपासनी यांनी करून दिले होते, आणि तेच त्या वेळी प्रारभी शाखेला उपयुक्त ठरलें. अशी कणाकणानीं संघटनेची उभारणी चालू होती.

सैनिकी शिक्षणांत मनुष्य रंगू लागला की, आपोआपच त्याला घोषाची ( Band ) स्वप्ने पडू लागतात. सघातील तरुणानाहि आपणाजवळ किमान बिगुल तरी असावा असे वाटूं लागले आणि त्यासाठी शाळकरी मुलानी पै-पैसा एकत्रित करण्यास प्रारंभ केला. त्या वेळीं नागपुरातील श्रीमन्त बुटी याच्या बर्डीवरील निवासांत गोकुळअष्टमीच्या वेळी सात दिवस मुक्तद्वार ब्राह्मणभोजन असे. त्यात संघांतील तरुणांनीं महाल भागांतून बर्डीवर जाऊन भाग घेण्याची सिद्धता केली. यांत प्रत्येकाला चार मैल पायपीट करावी लागे आणि पुरे तीन तास त्यात जात ! पण प्रत्येकाला प्रतिदिन चार-दोन आणे मिळणारी दक्षिणा एकत्र केली तर संघाचा निधि वाढेल आणि त्यातून बिगुल विकत घेता येईल, ह्या आशेने त्या तरुणांना ती पायपीट सुसह्य वाटली. पुढे संघाच्या कार्यात अग्रेसर ठरलेले श्री. बाबासाहेब आपटे, दादा परमार्थ, बाळासाहेब देवरस, कृष्णराव मोहरीर आद सर्व जण त्यांत असत. संघ आणि संघाचे सस्थापक या दोघाच्याहि पाचवीला नेहमी असे ‘ दारिद्र्यच ’ जणू पुजले होते ! पण त्यातूनच सघाचा पहिला ‘ बिगुल ’ घेतला गेला आणि सघाच्या प्रगतीचा निनाद सर्वत्र घुमू लागला, हे विसरून चालणार नाही.

प. पू. डॉक्टराना हिंदु समाजात ‘ वीरव्रतधारी ’ तरुण उभे करण्याची निकड वाटत होती आणि त्यासाठी सैनिकी संचलनाच्या जोडीनें ठिकठिकाणच्या शाखात थोडेसे घोडदळ उभे राहावे, असेहि त्याना वाटे. तो विषय निघाला म्हणजे कलकत्त्याचा चौरंगी रस्त्यावरील ‘ औटरॅम ’चा अश्वारूढ झुंझार पुतळा त्याना आठवे आणि त्या पुतळ्यावरील वीरोचित आवेशाची ते मुक्तकंठाने प्रशंसा करीत. एखाद्या शाखेजवळील गुरुदक्षिणेचे पैसे पडून राहिलेले त्याना खपत नसत. पाहिजे त्या गुणांचा विकास करण्यासाठीं आणि कार्यवाढीसाठी तो पैसा सुयोग्य तऱ्हेनें वापरला पाहिजे, असे त्याचे सांगणें असे. असे पैसे कोठे

उरले असल्यास घोडा घेण्याच्या सूचना त्यांनीं केल्या होत्या व त्यांच्या इच्छेनुसार कोठें घोडा घेतल्याचें कळतांच त्यांना आनंद होई.

एकदां रामटेकहून येतांना मोटार कामठीजवळून जात असतां मैदानावर अश्वारूढ सैनिकांचें पथक विशिष्ट पद्धतीनें कवायत करीत होतें. तें दृश्य पाहून प. पू. डॉक्टरांनीं, इतर उतारूंचें लक्ष जाऊं न देतां, त्यांच्याबरोबर असलेल्या श्री. विठ्ठलराव पतकी यांच्या पायाला आपल्या पायानें हलकेच धक्का देऊन त्यांचें लक्ष तिकडे वेधलें आणि असें दृश्य संघांत दिसलें पाहिजे असें सूचित केलें!

डॉक्टरांची गृहस्थिति या वेळीं विशेष समाधानकारक नव्हती. त्यांच्या थोरल्या बंधूंच्या भिक्षुकीवर कुटुंबाचा निर्वाह कसाबसा चाले. याच काळांत घरांतील तळमजल्यावरील पूर्वेकडील कांहीं भाग भाड्यानें देऊन आयव्ययाचा तोल सांभाळण्याचा डॉक्टरांनीं प्रयत्न केला. पण डॉक्टरांकडे लोकांची सकाळपासून रात्रीं ११-१२ वाजेपर्यंत अखंड होणारी ये-जा आणि त्यांतील अनेकांचें चहानें होणारें आतिथ्य, यामुळें चणचण ही कधीं संपलीच नाहीं. त्यांच्या मित्रांना डॉक्टरांचें हें ओढवस्तीचें जीवन दिसत नव्हतें असें नाहीं. पण डॉक्टरांची अयाचित वृत्ति ही इतकी उग्र होती कीं, त्यांच्यापुढें 'आम्ही तुम्हांला कांहीं साहाय्य करतों' हा विषय काढण्यासहि मित्रांची जीभ अडूं लागे. आपल्यासाठीं इतरांना कष्ट पडूं नयेत, जें आपल्या वांट्याला दुःख आलें असेल तें स्वतःच अबोलपणानें सहन करून त्या दुःखाच्या सुस्कार्‍यांनीं सभोंवतीं वावरणार्‍या लोकांचा उत्साह होरपळून जाऊं नये, म्हणून डॉक्टर सदैव दक्षता घेत.

समाजासाठीं डॉक्टर किती निःस्वार्थपणें आणि निरलसतेनें काम करीत आहेत, हें राजे लक्ष्मणराव भोंसले प्रत्यक्षच पहात होते. डॉक्टरांचा सर्व वेळ सार्वजनिक कार्यांत गेल्यावर त्यांचें वैयक्तिक जीवन आर्थिक दृष्टीनें कसें कष्टमय असेल, याचीहि कल्पना त्यांना येऊन चुकली होती. पण मित्र म्हणून कांहीं आर्थिक साहाय्य करण्याचा मानस त्यांच्याजवळ व्यक्त करणें हें राजे भोंसले यांनाहि अवघड वाटे. यासाठीं त्यांनीं आपले कारभारी श्री. वासुदेवशास्त्री संगमकर यांच्याकडून 'डॉक्टरांना कांहीं जमीन देणगी म्हणून देण्याचा आपला विचार आहे,' असें अनेक वेळां त्यांच्या कानांवर घातलें होतें. पण प्रत्येक वेळीं हा विषय निघाला कीं ते ऐकून न ऐकल्यासारखें करून चटकन विषय पालटीत. एकदां संगमकरांनीं अतिशयच आग्रह केला, तेव्हां ते उसळून म्हणाले, "हा विषय पुन्हा काढणार असाल तर आजपासून आपणांकडे येणेंच बंद. अहो, संघ हीच माझी संपत्ति आहे!" या घटनेपासून संगमकरांनीं तो नाद सोडला आणि राजे लक्ष्मणराव यांनाहि तसें कळविलें.

सिंदीचे श्रीमन्त नानासाहेब टालाटुले हे डॉक्टरांचे क्रान्तिकाळापासूनचे जीवश्च कंठश्च मित्र आणि अनुयायी होते. त्यांची डॉक्टरांवर निस्सीम श्रद्धा असे.

त्याचा १९२२-२३ पासून नियमच ठरून गेला होता की, डॉक्टरांना वर्षातून दोन-तीन वेळां तरी कांहीं दिवसांच्या विश्रातीसाठी सिदीला न्यावयाचेच. एखाद्या वेळी डॉक्टर सिदीला येण्यास चालढकल करू लागल्यास नानासाहेब नागपुरात दोन-तीन दिवस डॉक्टराकडे धरणेच धरून बसावयाचे ! डॉक्टर विश्रातीसाठी तेथे गेले की वर्ध्याहून श्री. आप्पाजी जोशी हेहि तेथे येत. असेच १९२६ मध्ये ते तिघे एकत्रित आले असता नानासाहेब आणि आप्पाजी यानी बोलण्याच्या भरात विषय काढला की, " आपल्या अखंड चाललेल्या असंख्य उलाढालीत आपणाला घराकडे लक्ष देण्यास सवड नसते आणि त्यामुळें आर्थिक चिंता आपणामागे अगदी सावलीप्रमाणे लागलेली आहे. यातून काही मार्ग काढला पाहिजे. " पण डॉक्टरांनी हा विषय ऐकला न ऐकल्यासारखा केला. तरीहि त्या दोघानी तो विषय पुन्हा सुरू करताच डॉक्टर म्हणाले की, " मला आवश्यकता लागली की मागेन. ज्याचे पैसे आणि वस्तु घेताना उपकार झाले असे वाटत नाही व मिंधेपणा येत नाही त्याच्या पैशाचा आणि वस्तूचा मी स्वीकार करतो. पण तूर्त तशी आवश्यकता नाही." मित्रांना तर तोडावयाचे नाही आणि अयाचित वृत्तीहि सोडावयाची नाही, अशा धोरणाने डॉक्टरानी दिलेले हे उत्तर होते !

पण ह्याच वाक्याचा आधार घेऊन श्री. नानासाहेब टालाटुले, आर्वीचे श्री. नारायणराव देशपांडे आणि श्री. आप्पाजी जोशी यांनी डॉक्टरांच्या वहिनीजवळ बिनबोभाट दर महिन्यास ५० रुपये नेऊन देण्यास सुरुवात केली. त्यामुळे घरांत थोडा अनुकूल पालट झालेला दिसू लागला आणि तो डॉक्टराच्या ध्यानात आला. त्यांनीं वहिनींजवळून खरा प्रकार कुशलतेने काढून घेतला आणि त्या तिघाची पुन्हा भेट होण्याची संधि येताच डॉक्टर त्याना म्हणाले की, " तुम्हीं माझ्या बोलण्याचा चक्क अपसमज केलात ! खरेंच मला लागेल तेव्हा मी निःसंकोचपणें मागेन ! आतां पुन्हा असे करूं नका ! " मित्राचा हा डावहि दोन-तीन महिन्यातच असा उधळला गेला. डॉक्टरानीं आवश्यकता नाही असे जरी सांगितलें होते तरी त्याची स्थिति जवळून पहाणाऱ्याच्या हृदयात कालवाकालव झाल्यावाचून राहत नसे. केव्हां त्याच्याजवळ नवीन कपडे घेण्यास पैसा नसे, तर कधी धान्यटंचाईमुळे असेल तेवढ्या अपुऱ्या भाजी-भाकरीवरच राहावे लागे. त्याच्याकडे येणाऱ्या मित्राना अशाहि स्थितीत डॉक्टर आपल्या पंक्तीला आग्रहाने बसवून घेत आणि शिळ्या भाकरीची तेल-तिखटाच्या तोंडीलावण्याशीं काय लज्जत असते, याचा अनुभव मित्रांना येई. डॉक्टराच्या पानांत काय वाढले जातें, याकडे त्याचे लक्षच नसे. ते जेवताना मित्रांबरोबर देशविषयक आणि संघविषयक वार्तालाप करण्यांत इतके रंगून जात आणि इतरांना हास्यविनोदांत इतके रंगवीत की, हा हां म्हणतां डॉक्टराच्या दारिद्र्याचा विचार मित्रांच्या मनातल्या मनांतच विरून जाई. धबधब्याच्या तळींचा धवल आणि फेसाळता असा मोहक खदखदाट डॉक्टरांच्या

अकृत्रिम हास्यांतून उमटत असे, एवढें सांगितल्यानेंहि त्यांच्या हास्यविनोदाची नीटशी कल्पना येणार नाहीं.

याच काळांत डॉक्टरांच्या नागपुरांतील कांहीं स्नेह्यांनीं 'आयडियल डेमॉक्रॅटिक इन्शुअरन्स् कंपनी' काढली आणि त्यांत वैद्यकीय विभागाचे कार्यवाह म्हणून डॉक्टरांची नियुक्ति केली. या योजनेनें न्यायमूर्ति भवानीशंकर नियोगी, डॉ. परांजपे, श्री. गोपाळराव देव आणि श्री. नानासाहेब तेलंग आदि मंडळींच्या मनांतील डॉक्टरांवरील प्रेमच साकार झालें होतें. या नियुक्तीमुळें डॉक्टरांना वर्षाकाठीं साधारण चार-पांचशें रुपये मिळूं लागले. १९२६ पासून १९३५-३६ पर्यंत हा क्रम अव्याहत चालू होता आणि त्यामुळें डॉक्टरांना बसणारे दारिद्र्याचे चटकेहि कांहीं प्रमाणांत कमी झाले असावेत असें दिसतें. या विमा-संस्थेंत महत्त्वाच्या अधिकारावर असलेले श्री. रा. ज. गोखले यासंबंधीं लिहितात, "डॉक्टरांना त्याचा कितपत उपयोग झाला हें त्यांनाच माहीत. पण त्यांच्या नांवाचा संस्थेच्या चालकांना मात्र उपयोगच झाला असण्याचा बराच संभव होता."

संघाच्या उभारणीचे प्रयत्न सुरू झाले त्यानंतर थोड्याच दिवसांत वर्धा जिल्ह्यांतील आर्वीमध्यें सवाद्य मिरवणुकीवरून हिंदु-मुसलमानांत चांगलीच झटापट झाली. त्या झगड्यांत मुसलमानांची खोड जिरवण्याइतका प्रभाव हिंदूंनीं दाखविला होता. या दंग्यापूर्वी वातावरण तंग बनत असतांनाच डॉ. मुंजे आणि डॉ. हेडगेवार यांनीं तेथें जाऊन एका बाजूनें तडजोड करण्याचा प्रयत्न सुरू केला आणि दुसऱ्या बाजूनें हिंदूंना सावधानता ठेवण्याची सूचना दिली. हिंदूंना स्वसंरक्षणक्षम:बनवावें, यासाठीं लाठी शिकविण्याकरितां डॉक्टरांनीं आपले सहकारी श्री. अण्णा सोहोनी यांना कांहीं दिवसांसाठीं तेथें पाठविलें होतें आणि त्याच शिक्षणाचा प्रताप प्रत्यक्ष झगड्यांत दिसून आला होता.

या आर्वी प्रकरणासंबंधीं नागपूरचे डॉ. ना. भा. खरे लिहितात कीं, "१९२६ सालीं मुसलमानांच्या जातीयतेमुळें ब्रिटिश सरकारनें आर्वी येथील दसऱ्याच्या उत्सवावर बंधन घातलें. त्यामुळें तो उत्सव दसऱ्यानंतर एक महिन्यानें करण्यांत आला. त्या उत्सवाला आर्वीच्या लोकांनीं नागपुराहून पुढारी मंडळींना बोलाविलें. या उत्सवासाठीं आम्ही चौघेजण म्हणजे डॉ. मुंजे, बॅ. गोविन्दराव देशमुख, डॉ. हेडगेवार आणि मी असे मोटारीनें आर्वीला गेलों. आर्वी येथील सभेंत आम्हीं चौघांनीं भाषणें केलीं. त्यांत डॉक्टर हेडगेवारांचें आणि माझें भाषण सडेतोड झालें. सभा आटोपून आम्ही चौघे जण नागपूरला परतलों आणि त्याच पहाटेला आर्वीला दंगा होऊन तीन-चार मुसलमान मारले गेले. वर्धा जिल्ह्याचे डेप्युटी कमिशनर आणि मुसलमान डी. एस्. पी. यांनीं मी आणि डॉ. हेडगेवार यांच्यावर खटला भरण्याची शिफारस केली. पण त्या वेळचे नागपूर विभागाचे कमिशनर स्टँडनसाहेब यांनीं ती धुडकावून लावली."

या घटनेनंतर चौदा हिंदु पुढाऱ्याना अटक करण्यात आली. त्यांत बहुतेक जण डॉक्टराच्या परिचयातील होते आणि त्यांतील अग्रगण्य डॉ. स. नी. मोहरीर हे तर डॉक्टराचे कलकत्त्यापासूनचे जिवलग मित्र पडले. त्यामुळे स्वाभाविकच तो खटला चालू असेपर्यंत डॉक्टराच्या वर्ध्याला आणि आर्वीला खटल्यासाठीं सारख्या खेपा सुरू असत. त्या वेळी आर्वी खटल्यासाठी निधि उभारण्यातहि त्यांनीं पुढाकार घेतला होता आणि वर्ध्याला खटला चालविण्यासाठीं बॅ. बाप्टिस्टा आले असता ते तेथें दीड महिना प्रत्यक्ष जाऊन राहिले होते. या वेळीं त्याचे वास्तव्य श्री. व्ही. व्ही. देशपाडे याजकडे असे. तेव्हा त्याचा उल्लेख करताना 'विनति विशेष' असा थट्टेने करीत असत! शेवटीं श्री. दादासाहेब करदीकर, बॅ. बाप्टिस्टा आणि अलाहाबादचे अल्स्टर आदि नामवंत वकिलानी खटपट करूनहि डॉ. मोहरीर याना त्या खटल्यात १९२६ च्या १३ डिसेंबर ह्या दिवशी जन्मठेपेची शिक्षा झाली! त्या खटल्यातून जे बचावले त्याची आर्वीमध्ये प्रचड मिरवणूक काढली जावी, अशी डॉक्टरानी व्यवस्था करून ठेवली होती. या खटल्याच्या निर्णयानतर तशी मिरवणूक निघालीहि. त्यानतर काहीं दिवसानी डॉक्टर आणि डॉ. नारायणराव सावरकर हे आर्वीला गेले आणि कारागृहात पडलेल्या पुढाऱ्याच्या कुटुबीयाना भेटून त्याना धीर दिला. तसेच सुटून आलेल्याचेहि अभिनदन करण्यास ते विसरले नाहीत.

डॉ. मोहरीर याच्या शिक्षेने डॉक्टराना दुःख होणे स्वाभाविकच होते. त्यानी डॉ. मोहरीर याना कारागृहात वारवार जाऊन भेटण्याचा क्रम १९३४-मध्ये त्याची सुटका होईपर्यंत चालू ठेवला होता.

या खटल्याच्या निमित्ताने डॉक्टराचे वर्ध्यास वारवार जाणे-येणे झाले आणि त्यातच त्यानीं श्री. आप्पाजी आणि त्याचे सहकारी याना सघाची माहिती देऊन तेथे शाखा सुरू करण्यास उद्युक्त केले. या वर्षी आप्पाजी हे एकदा कॉंग्रेसच्या कामासाठी नागपूरला आले असता डॉक्टरांकडे नेहमींप्रमाणे उतरले. तेव्हा एका खोलीत बैठकीच्या स्वरूपात चालणारा संघ डॉक्टरानी त्याना दाखविला होता. तेथे ध्वज आणि मारुतीची प्रतिमा होती आणि डॉक्टराच्या संघासंबंधींच्या भाषणानंतर प्रार्थनाहि झाल्याचे त्याना स्मरते. या घटनेनंतर दि. १८।२।१९२६ ला वर्धा येथे डॉक्टर गेले असता संघाची शाखा सुरू करण्यात आली. रा. स्व. सघाची खऱ्या अर्थाने हीच पहिली शाखा होय.

सघाच्या कल्पनेपासून प्रत्यक्ष संघाच्या शाखेच्या रूपात ती कल्पना मूर्त रूपपावेपर्यंत सर्वच गोष्टी डॉक्टरानी घडविल्या होत्या. पण त्यांचा स्वभाव असा होता कीं, त्यातून मीपणाचा भाव उमटत नसे. 'आपण संघ सुरू करीत आहोत किंवा आपण सुरू केलेला संघ' असा ते सर्वांचा अंतर्भाव करून उल्लेख करीत असत. पण कार्याच्या दृष्टीने काहीतरी घटना आणि अधिकारश्रेणी निर्माण करणें

हें अपरिहार्यच असतें. तेव्हां १९२६ च्या डिसेंबर दि. १९ ला झालेल्या बैठकींत त्यासंबंधीं विचार झाला आणि डॉक्टरांना रीतसर ' प्रमुख ' निवडण्यांत आलें. त्या वेळच्या टांचणवहींत म्हटलें आहे कीं, " राष्ट्रीय स्वयंसेवक संघ नियमितपणें, सुरळीत आणि शिस्तीनुसार चालण्यास सत्ताधारी एकच व्यक्ति असणें फार जरूरीचें असतें. असें असल्यानें संघांत माजणारे घोटाळे कमी होतात. म्हणून आज सभेच्या मतानें एक सत्ताधारी व्यक्ति नेमणें जरूर आहे आणि म्हणून तो सत्ताधारी मनुष्य आज सर्वानुमतें डॉ. हेडगेवार यांस आम्ही नेमीत आहोंत."

अशा दीड वर्षाच्या खटपटीनंतर नागपूर आणि वर्धा येथें संघ उभा राहिला आणि हिंदुस्थानच्या शेंकडों वर्षांच्या इतिहासांत ज्या सामूहिक जीवनाची प्रकर्षानें उणीव भासत होती ती उणीव भरून काढणारी यंत्रणा सिद्ध झाली. मोहित्यांच्या त्या पडक्या वाड्यावरून सायंकाळीं जाणाऱ्या-येणाऱ्याला आतां धगधगत्या ज्वालेची आठवण करून देणारा परम पवित्र भगवा ध्वज दिसूं लागला आणि ' नमो धर्मभूमी जियेच्याच कामीं । पडो देह माझा सदा ती नमी मी । ' अशा गंभीर प्रार्थनेचे ध्वनि कानांत घुमूं लागले !

* * *

# १४ : नागपूरचा दंगा

मोहिते वाड्यांतील संघाचे स्वरूप १९२७च्या प्रारंभाला बाळसेदार होऊ लागले व वयानुसार शिशु, बाल, तरुण व प्रौढ यांच्या निरनिराळ्या पथकाना लव, चिलया, कुश, ध्रुव, प्रह्लाद, अभिमन्यु, भीम व भीष्म अशा चढत्या क्रमाने अनुरूप नांवें ठेवण्यांत आलीं. त्यातील भीष्म पथकात संघाशीं संबंधित असलेले प्रौढ; भीम पथकांत मोठे तरुण; कुश, ध्रुव, प्रह्लाद या पथकांत तरुण व बाल यांमधील वयाचे किशोर आणि लव व चिलया या पथकांतून दहा वर्षांखालील शिशु असे सामान्यतः ते वर्गीकरण होते. आता संघस्थानावर होणाऱ्या कार्यक्रमांना आखीव स्वरूप आले होते व तरुणाच्या शिक्षणक्रमात स्वसरक्षणाच्या दृष्टीने युद्धयोग व द्वंद्व यांवर भर देण्यांत आला होता. सत्तर-ऐंशी तरुणाची आवेशपूर्ण लाठी सुरू झाली की शाखेवरील वातावरण तारुण्य व उत्साह यांनीं रसरसून जाई. एकेका घावात जणूं एकेका शत्रूला घायाळ करून खाली पाडीत आहोत, असा वेग प्रहाराला असला पाहिजे, असे सोहोनींचे सांगणे असे व त्याच्या स्वतःच्या प्रहारात त्यांचे हे सांगणे उमटत असे.

डॉक्टराच्या घरीं येणाऱ्या स्वयंसेवकानी त्याची माडी नेहमी गजबजून टाकलेली असावयाची. त्या काळांत नवीन नवीन मित्राना डॉक्टराकडे नेऊन संघामध्ये समाविष्ट करून घेण्याची बाल व तरुण यात मनस्वी चढाओढ लागली होती. घरीं व शाळातून जिकडे तिकडे संघाचेच विचारतंत्र विद्यार्थीवर्गात चालू होते. डॉक्टरांच्या बोलण्यात हिंदुसंघटनेची आवश्यकता, भगव्या ध्वजाचे महत्त्व, स्वातंत्र्य, इतर समाज आपल्यावर का आघात करतात याची कारणमीमासा, दैनंदिन जमण्याचे व कार्यक्रमाचें महत्त्व, शिस्त इत्यादि असख्य विषय येत. जाणत्या स्वयंसेवकांना हिंदुसंघटनेच्या दृष्टीने उपयुक्त अशीं पुस्तकेहि वाचावयास देण्याचा क्रम सुरू झाला. या पुस्तकांत इंग्रजांनीं आक्षिप्त ठरविलेली पुस्तकेंहि सावधपणानें अनेकांना वाचावयास दिलीं जात. ‘ हिंदुत्व ’ व ‘ भयसूचक घंटा ’ या पुस्तकांचा प्रसार या काळांत सर्वसामान्य जनतेतहि स्वयंसेवकांच्या प्रयत्नाने होऊं लागला.

साऱ्या देशांतच हिंदु-मुसलमानांमधील खरे संबंध आतां स्पष्ट होऊं लागले होते. मोपला बंडापासून योग्य तो धडा घेऊन हिंदूंच्या संघटनेचा मंत्र ज्या

श्रद्धानंदांनीं जनमनांत जागविला होता, त्या स्वामी श्रद्धानंदांची डिसेंबर २३ ला अमानुष हत्या झाली ! हिंदूंचे ' हिंदी ' बनलेले पुढारी कांहीं काळ स्तंभित झाले ! मुसलमानांनीं तर स्वामींवर गोळी चालविणाऱ्या अबदुल रशीद याचीं छायाचित्रें गाजी' (धर्मवीर) अशीं शीर्षकें छापून दिल्लीच्या भर रस्त्यांत लावलीं व विकलीं ! असहिष्णुतेचें बाळकडू मिळणाऱ्या मुसलमान समाजांतील ही हालचाल स्वाभाविक होती. इंग्रज लेखक बर्नार्ड शॉ यानें मुसलमानांच्या वृत्तीचें वर्णन करतांना एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, " सहिष्णुतेचा मूर्खपणा मुसलमानांत नाहीं. तुम्ही त्याच्या अल्लाचा स्वीकार करा, नाहीं तर तो तुमचें शिर धडावेगळें करील. तुम्ही मात्र त्यामुळें नरकांत पिचाल व तो तुम्हांला मारून स्वर्गसुख भोगील. " ( ..." There is no nonsense of toleration among the Muslims. You accept his Allah or he cuts your throat. You go to hell for it and he goes to heaven... " ) असा मुसलमानी न्याय आहे !

हिंदुस्थानांत असंख्य ठिकाणीं मुसलमानांचे आक्रमक चाळे चालू असल्यानें हिंदु-मुसलमान ऐक्याचा ध्यास घेतलेले हिंदु पुढारी बुचकळ्यांत पडले. या घटने-पूर्वी म. गांधींनींहि सामोपचाराचा व हृदयपरिवर्तन करण्याचा मार्ग एका परीनें विफल ठरला असल्याचा निर्वाळा त्यांच्या राजकारणी पद्धतीनें दिला होता. ' मी सम्राट् झालों तर ! ' या 'यंग इंडियां'तील लेखांत त्यांची ही अगतिकता उमटली होती. ते लिहितात कीं, " हिंदु-मुसलमानांची एकी घडवून आणण्यासाठीं मी असें करीन कीं, दोन्ही जातींतील वजनदार पुढाऱ्यांना बोलावून आणीन; आणि त्यांच्याजवळचीं हत्यारें-पात्यारें काढून घेऊन त्यांना एका खोलींत कोंडून ठेवीन ! ' तुम्हीं आपलीं भांडणें तडजोडीनें कशीं मिटवावयाचीं तें प्रथम ठरवा, तरच तुम्हांला मी सोडीन, नाहींतर सोडणार नाहीं ! ' असें त्यांना बजावीन. या युक्तीनें हिंदु-मुसलमानांत समेट घडून येईल. " हिंदु-मुसलमानांतील संघर्ष टाळण्या-साठीं दोघांच्याहि पुढाऱ्यांना ' सम्राट् ' गांधींनीं कोंडून टाकून अन्नपाण्यावांचून मारण्याची शक्कल लढविली होती ! अशी पक्क्या अहिंसकालाहि ' हिंसक ' विचार करावयास लावणारी परिस्थिति त्या वेळीं उत्पन्न झाली होती.

या काळांत बोलण्याच्या ओघांत कोणी ' अमक्या ठिकाणीं हिंदु-मुसलमानांचा दंगा झाला ' असा उल्लेख केला तर डॉक्टर त्याला मध्येंच थांबवून म्हणत असत कीं, " मुसलमानांचा दंगा असा योग्य शब्द वापरा. कारण हिंदु आज रक्षणहि करूं शकत नाहींत. तेव्हां चढाई कुठून करणार ! नि केवळ हिंदूंना मुसलमान मारीत आहेत, असें चक्क दृश्य दिसत असतां ' हिंदु-मुसलमानांचा दंगा ' असें कसें म्हणतां येईल ? "

गेल्या तीन-चार वर्षांतील घटनांनीं नागपुरांतील वातावरणहि असेंच गढूळ झालेलें होतें. १९२४ पासून तर नागपूर भागांतील मुसलमानांवर आर्थिक

बहिष्कार पडल्याने त्यांच्या संतापाचा पारा स्वाभाविकच चढलेला होता. त्याच्या दुराग्रहाला न जुमानता सतरंजीपुरा, हंसापुरी व जुम्मा या तीनहि मशिदींवरून हिंदूंच्या मिरवणुका वाजत गाजत जातात, हे दृश्यहि त्यांना झोंबू लागले व त्यानीं हिंदूना नाना प्रकारे सतावण्याचा प्रयत्न चालू केला. एकट्या-दुकट्या हिंदूला गाठून पिटावे व हिंदु वस्तीतून मुली पळवून न्याव्यात, असे प्रकार घडू लागले. पण या वेळीं हे प्रकार पचण्यासारखे नव्हते. डॉक्टर हेडगेवार, गोविंदराव चोळकर, रामचंद्र कोष्टी, भाऊजी कावरे, अण्णा सोहोनी, बाळाजी सखदेव व कृष्णा जोशी, हे उंचेपुरे व भीमकाय सप्तर्षि हातात दंडा घेऊन मुसलमान मोहल्ल्यातून हिंडू लागले. पुष्ठा असलेली खादी भाडारातील उच्च काळी टोपी, पाढरा सदरा, खाकी कोट, धोतराचा काचा व हातात सोटा अशा वेशात हे सात जण जाऊं लागले कीं, गुंडाच्या हृदयात धडकी भरावी, असेच वातावरण निर्माण होई ! एक-दोन वेळा केवळ त्याच्या तेथे जाण्याने हिंदूची पळविलेली मुलगी भालदार-पुऱ्यातील मुसलमानानीं परत केली होती ! स्वयसेवकहि गटागटाने हिंडून कोठे गुंडगिरी चालू झाल्यास जशास तसे वागू लागले. डॉक्टराच्या घरावर तर अनेक दिवस दगडाचा मारा होऊं लागला व क्वचित् पेटत्या उश्याहि त्याच्या घराच्या पाख्यावर पडूं लागल्या. स्वाभाविकच स्वयसेवकानी शिट्टी व दडे घेऊन डॉक्टराच्या घरासभोवतीं गस्त घालण्यास प्रारंभ केला.

अशा गोंधळातच डॉक्टरानी हुतात्मा स्वामी श्रद्धानंद याच्या स्मरणार्थ प्रारंभ झालेल्या मुंबईच्या ‘ श्रद्धानंद ’ साप्ताहिकासाठी शेकडो रुपये निधि गोळा करून पाठविला व त्याचे हिंदुसंघटनेवरील व हिंदूच्या पौरुषावरील विश्वास दृढतम करणारे अंक अधिकाधिक खपावेत म्हणून नागपुरात व्यवस्था केली. याच काळात स्वामीजींच्या नावाने प्रारभ झालेल्या ‘ श्रद्धानंद अनाथालय ’ या संस्थेच्या उभारणींतहि डॉक्टराचा हात होता व त्या संस्थेच्या प्रारंभींच्या बैठकानाहि ते जात असत, असा उल्लेख त्यांच्या दैनंदिनींत आढळतो. संघाच्या प्रारंभी कामासाठीं जो थोडाबहुत खर्च करावा लागे, तो डॉक्टर आणि त्याचे तत्कालीन कॉंग्रेसमधील मित्र व संघातील सहकारी याच्याकडून येणाऱ्या मासिक वर्गणीवर भागत असे. निरनिराळ्या कारणांनीं व प्रसंगानी निधि उभारण्याचा प्रसंग डॉक्टरावर येत होता व अशा वेळीं त्याची तळमळ, निःस्वार्थता, सौजन्य व निर्मळ चारित्र्य यांकडे पाहून त्यांना कधीं कोणी विन्मुख पाठवणे शक्य नव्हते. धन व शक्ति यातून स्वकीयावर जितके प्रभुत्व निर्माण होते, त्याहूनहि विशुद्ध चारित्र्याचा वचक हा निःसंशय प्रभावी असतो.

संघर्ष म्हटला कीं चेव चढावा, अशी अण्णा सोहोनींची वृत्ति होती. त्यांना संघांत लहान मुले यावींत हें रुचेना. जे केव्हांहि अस्तन्या मागे सारू शकतील अशा तरुणांकडे त्यांचें विशेष लक्ष असे. “ ही शिशु व बालांची चिल्लावळ शाखेत

कशाला ? तीं मुलें शाखेंत येऊन गडबड-गोंगाट तेवढा करतात. तेव्हां त्यांना बंद करा ! " असा त्यांचा डॉक्टरांच्या मागें लकडा असे. अशा वेळीं डॉक्टर 'पुढें पाहूं !' एवढेंच म्हणून थांबत. कारण त्यांच्या मनांत ज्या हिंदुराष्ट्राच्या कल्पना होत्या, त्या साकार करण्यास संस्कारक्षम अशी उगवती पिढीच खरी उपयोगी ठरणार आहे, अशी त्यांची पक्की धारणा होती. त्यामुळें नागपूर शाखेंतील किशोरांचीं 'कुश' व त्याखालील पथकें याविषयीं डॉक्टरांना विशेष आस्था वाटे. त्या काळांत शाखा सुटल्याची 'वि + किर्' अशी आज्ञा मिळाल्यावर शाखेंतील सर्व स्वयंसेवक एकामागून एक अशा गटानें डॉक्टरांच्या समोरून जात व त्या वेळीं डॉक्टर त्या दिवशीं कोणत्या गटांतील कोण आलेला नाही, याची पाहणी करीत. एवढ्यावर ते थांबत नसत, तर न आलेल्याकडे जाऊन किंवा त्याच्याकडे चौकशी-साठीं कोणाला तरी पाठवून ते तो स्वयंसेवक दुसऱ्या दिवशीं शाखेवर दिसेल असें पहात. केव्हां केव्हां डॉक्टर स्वतःदेखील वेळेपूर्वीं संघस्थानावर येऊन धूळ बसविण्यासाठीं पटांगणावर स्वतः पाणी मारीत, तर हौसेनें शाखेंतील स्वयंसेवकांच्या खेळांत स्वतः भाग घेऊन समरस होत. समाजांतील आज जाणवणारे भेसूर प्रश्न दूर करण्यासाठीं प्रयत्न तर अवश्य व्हावेत, पण हे भेसूर प्रश्न कायमचेच मिटवा-वयाचे असतील, तर मात्र कांहीं पिढ्यांपर्यंत राष्ट्रीयत्वाची दीक्षा देऊन देशहितासाठीं जीवनभर अखंड जागृत राहणारे नागरिक उभ्या देशांत व प्रचंड संख्येनें परंपरेनें उभे केले पाहिजेत, हें त्यांनीं ओळखलें होतें. अण्णा सोहोनींच्या डोळ्यांपुढें केवळ नागपुरांतील मुसलमानांच्या कारस्थानांना छिन्नविच्छिन्न करण्याचा विचार तीव्रतेनें घोळत होता. त्यांत तसें पाहतां वावगें असें कांहींच नसलें, तरी त्या विचारांत अपूर्णता होती यांत शंका नाहीं. सोहोनींच्या विचारांत परिस्थितीची प्रतिक्रिया उमटलेली होती, तर डॉक्टरांच्या विचारांत या प्रतिक्रियेच्या जोडीनें अशी विपरीत परिस्थिति पुन्हा उत्पन्नच होऊं नये म्हणून आपल्या समाजाची मनोरचना परंपरेनें राष्ट्रानुवर्ती बनवावी, अशी विधायक दृष्टिहि स्पष्टपणानें दिसे. डॉक्टर केवळ काल व आज एवढ्याचाच विचार न करतां समाजाच्या शाश्वत स्थैर्यासाठीं दूरवर पहात होते व त्यांतूनच तरुणांच्या जोडीनें बाल व शिशु यांवर संस्कार करण्यास ते उद्युक्त झाले होते.

नागपुरांत वातावरण तप्त होत असतांनाच डॉक्टरांनीं कांहीं तरुणांना स्वतःच्या बळावर संघाचें काम कोठेंहि जाऊन चालू करतां यावें, या दृष्टीनें त्यांचा एक उन्हाळी शिक्षणवर्ग चालू केला. त्या वर्गाचा हेतु उत्तम अधिकारी निर्माण करणें असा असल्यानें त्याचें नांव 'अधिकारी शिक्षणवर्ग' (Officers' Training Camp) असें रूढ झालें. या वर्गाचे कार्यक्रम मोहिते वाड्याच्या पटांगणा-वर पहांटे ५ ते ९ वाजेपर्यंत चालत. हा वर्ग यशस्वी करण्यासाठीं श्री. सोहोनी व जोग यांनीं मनस्वी खटपट केली. या वर्गांत सतरा निवडक तरुणांचा अंतर्भाव

केलेला होता. संघस्थानावरील तळघरात दुपारीं १२–३० ते ५ या वेळांत गप्पा-गोष्टी, चर्चा, टिपणें असे विविध कार्यक्रम होत व त्या कार्यक्रमात डॉक्टर स्वतः उपस्थित राहून अनेक विषयाचा ऊहापोह स्वयंसेवकाजवळ करीत असत. आठवड्यातून तीन वेळा होणारे बौद्धिकवर्ग हे डॉक्टराच्या घरीच व्हावयाचे. या वर्गातील स्वयंसेवकाना चिटणीसपुऱ्यातील एका विहिरीवर डॉक्टर पोहावयास घेऊन जात. पहिल्या काही वर्गात असा क्रम चालू होता.

हा वर्ग चालू असतानाच डॉक्टराच्या घरावर दगड येण्याचे प्रमाण अधिक वाढले व अधूनमधून डॉक्टराना व इतर काही पुढाऱ्यांना ‘ सावध रहा, आम्ही तुमचा खून करणार आहोत ! ’ अशा धमक्या देणारीं निनावी पत्रें येऊं लागलीं. डॉक्टर तीं पत्रे वाचून हंसत व जवळ बसलेल्या स्वयंसेवकाना म्हणत की, यांची छाती असती तर त्यानी असा आपला हेतु बोलून दाखविला नसता ! त्यांचे मित्र त्याना आता जिव्हाळ्याने येऊन सागू लागले होते कीं, बरोबर एक-दोन सणसणीत रक्षक घेऊन मगच रात्रीं-बेरात्रीं हिंडणे हिताचे होईल. एकदा ‘ महाराष्ट्रा ’चे सपादक श्री. गोपाळराव ओगले यानीं डॉक्टराना अशी सूचना करताच डॉक्टरानी उत्तर दिले की, “ मी हल्लीं रक्षक घेऊनच हिंडतो ! ” त्यावर गोपाळरावानीं ‘ कुठे आहे तुमचा रक्षक ? ’ असा प्रश्न केला. तेव्हा बारा-तेरा वर्षांच्या बबन पंडित या किशोराकडे बोट दाखवून ‘ हा काय ! ’ असे म्हणत डॉक्टर हसू लागले. डॉक्टरानी क्वचित् अशी थट्टा केली असली तरी ते आवश्यक ती सावधानता घेत होते. त्या वेळी डॉक्टराना येणाऱ्या पत्रातील एक पत्र दि. १५ मे या दिवशीं अबदुल करीम या स्वाक्षरीने आलेले ‘ महाराष्ट्र ’ वृत्तपत्रात प्रसिद्ध झाले होतें. त्यांतील भाषा विवेकाच्या दृष्टीने शुद्धिवर नसलेल्या गुंडाची असल्याचें तेव्हाच ध्यानीं येते. त्यात म्हटले होते कीं, “ आप नागपूरके मुसलमानोंका बडा दोस्त हो । ( ‘ दोस्त ’ शब्द उपरोधाने वापरलेला होता. ) आपने रामटेकमे मुसलमानोंसे शरारत की है । वो आपका करना मौत नजदीक लानेका तरीका है । खियाल रखना, एक बरसके अदर बेटा, तुम मुरगी सरीखे काटे जावेंगे और तुम्हारी हड्डी मुसलमान बाटके चुसेंगे । ”

डॉक्टरांना चालू परिस्थितीचे पर्यवसान संघर्षात होणार हें स्पष्ट दिसूं लागलें होतें व त्यामुळें त्यांनीं गावातील मुसलमान मोहल्ल्यांत मुसलमानाची गुप्तपणें चाललेली आक्रमणाची सिद्धता बारकाईने हेरण्याची व्यवस्था केली. हिंदु वस्तींत जून-जुलैपासूनच मुसलमानाचीं टोळकी कांहीं पाहणी करण्यासाठीं हिंडूं लागल्याचें स्पष्ट दिसू लागले होते व मशिदींतून त्याच्या वारंवार होणाऱ्या बैठकांचीं वृत्तेंहि संभाव्य संकटाची कल्पना आणून देणारींच असत. ह्या वेळीं महाराष्ट्रांत सर्वत्रच ब्राह्मण-अब्राह्मण यांत कटुता निर्माण झाली होती. हिंदु-संघटनेला उद्युक्त होऊन मुसलमानांवर आर्थिक बहिष्कार टाकणाऱ्या पांढरपेशा वर्गाला झोडपून काढण्या-

साठीं त्या कटुतेचा लाभ करून घेतां येईल, अशी मुसलमानांना आशा वाटणें स्वाभाविक होतें. कारण तात्पुरते तरी अब्राह्मण व मुसलमान हे पांढरपेशा वर्गाच्या प्रतिस्पर्धी गटांत उभे असलेले दिसत होते. नागपुरांत ह्या विचाराचें लोण आलेलें असलें तरी त्याची तीव्रता शमविण्याइतकी एक शक्ति नागपुरांत उदित झालेली होती. नागपूरकर भोंसले घराण्यांतील श्रीमंत रघूजीराव व त्यांचे धाकटे बंधु श्रीमंत राजे लक्ष्मणराव हे दोघेहि मनानें व कृतीनें या वादाच्या पलीकडे उभे राहून, सर्व हिंदु समाज माझा आहे, या ममत्वानें प्रत्यक्ष दैनंदिन व्यवहारांत लक्ष घालीत होते व त्यांच्या बरोबरीनेंच डॉ. मुंजे, डॉ. हेडगेवार आदि मंडळींनीं आपल्या प्रयत्नानें समाजांतील सर्व थरांतील पुढाऱ्यांना आपल्या स्नेहाच्या कक्षेत ओढून आणलें होतें. पण याची कल्पना मुसलमानांना नीटशी आलेली नसावी. कारण आपण पांढरपेशा वर्गावर प्रहार केला तर कोष्टिपुऱ्यांतील लोकांना आनंदाच्या उकळ्या फुटतील व प्रसंगीं ते आपणांस साहाय्यहि करतील, असे मनोरे त्यांनीं मनांत उभारले होते, असें स्पष्ट दिसतें. नाहीं तर मूठभर मुसलमानांनीं दिवसाढवळ्या नागपूरसारख्या एका प्रांताच्या राजधानींत धुमाकूळ माजविण्याचा व्यूह रचावा, हें एक धाष्टर्यच होतें. पण असा व्यूह रचला गेला व त्याची वेळींच कुणकुणहि लागली.

अशा धामधुमींत ईदच्या दिवशीं डॉ. मुंजे यांना ‘ खून करणार ’ असें पत्र आलें. त्या दिवशीं डॉक्टर व कांहीं स्वयंसेवक डॉ. मुंजे यांजकडे रक्षणाच्या दृष्टीनें निजावयास गेले. डॉ. मुंजे यांनीं तर आपल्या उशा-पायथ्याशीं दोन बंदुका व पिस्तुलें भरून सिद्ध ठेवलीं ! त्या दिवशीं एक मुसलमान गुंडांचें टोळकें रात्रीच्या वेळीं त्यांच्या घरावरून जाऊं लागतांच स्वयंसेवकांनीं त्यांतील दोघांतिघांचा खरपूस समाचार घेतला. या घटनेनें वातावरण अधिकच तंग झालें व महाल भागांत तेथील लोकांना ‘ कढीचट ! लेपसट ! ’ असें हिणवीत गुंड जाऊं लागले. मुसलमान मोहल्ल्यांतील बायकांमुलांना जुलैमध्येंच गांवोगांव पाठविण्यास प्रारंभ झाला होता. १९२४ मधील उडालेली घाबरगुंडी त्यांच्या स्मरणांत राहणें स्वाभाविकच होतें. मुसलमान मोहल्ल्यांत लाठीचे वर्गहि रात्रीचे भरूं लागले.

शेंगा खात व वरून बाळबोध वळण दाखवीत, स्थानकावर व अन्यत्र, संघ-स्वयंसेवकांची टेहळणी अधिक दक्षतेनें सुरू झाली. या दिवसांत डॉक्टरांकडे स्वयंसेवक व नागपुरांतील निरनिराळ्या भागांतील कार्यकर्ते भेटावयास येऊन त्यांना कळलेलें वृत्त डॉक्टरांना विदित करीत. अशा वेळीं डॉक्टर अत्यंत सूचकतेनें एक गोष्ट प्रत्येकाच्या ध्यानीं आणून देत असत कीं, हिंदु समाजाच्या कोणत्याहि भागावर आघात झाला तर इतरांनीं साहाय्यासाठीं धावून गेलें पाहिजे. कोष्टीपुऱ्यांतील कोणी आल्यास ते विचारीत कीं, ‘ महाल भागांत आक्रमण झालें तर तुम्ही काय कराल ? ’ व महाल भागांतील लोकांना व स्वयंसेवकांना

त्यांचा प्रश्न असे कीं, 'कोष्टीपुऱ्यांत गडबड झाली कीं तिकडे जाल कीं नाहीं?' या दिवसांत अण्णा सोहोनीच्या अंगांत तर विशेषच आवेश संचरलेला दिसे. त्यानीं लाठी-वर्गाची सिद्धता चालू ठेवून त्यांतील कांही जणांना धनुर्विद्येचेहि शिक्षण देण्यास प्रारंभ केला. सोहोनी हे शस्त्रे बनविण्यांत कुशल होते. त्याच्या घरीं वाघनखे, जंबिये, भाले व तरवारी याचें लहानसे उत्पादनकेंद्रच असे. या दिवसात अनेक परिचितांना त्यानीं सदंड व सशस्त्र बनविले होते व डॉक्टराच्या वाढदिवशी त्यांनीं एक जंबियाहि त्यांना सादर केला होता.

डॉक्टरांच्या बैठकातून 'सांगितलेले काम करण्यासाठी असते, त्याची वाच्यता करण्यासाठीं नाहीं' व 'आपण एकट्याने कामचुकारपणा केला तर काय मोठे बिनसणार आहे, ही विचाराची पद्धति सोडून दिली पाहिजे' असे वारवार मांडण्यात येई. त्यासाठीं राजे लक्ष्मणराव भोसले याजकडील एका समारभात पानदानांतील चुना संपला असता आलेला अनुभव ते कथन करीत. ते सांगत की, "चुना संपल्याचें ध्यानीं येतांच तेथील एक गृहस्थ मोठ्याने म्हणाले कीं, 'चुना आणा' या मागणीनतर एकाने दुसऱ्याला अधिकाराच्या पायरींनुसार 'चुना आणा!' असा आदेश देण्यास प्रारंभ केला व पांच मिनिटे हा आदेश सर्वत्र घुमूनहि सर्वांचे विडे अडलेले पाहून, डॉक्टर राजवाड्यांत घरोब्याचेच असल्याने आंत उठून गेले आणि त्यांनीं तबकांत चुना आणून ठेवला. त्यानंतरहि कांहीं वेळ 'चुना आणा' अशा चाकराच्या पडचाकराला सूचना चालूच होत्या!" त्याचप्रमाणे दुसरीहि एक गोष्ट ते सागत. "देवळाच्या गाभाऱ्यात प्रत्येकाने दूध आणून ओतावें, असा आदेश एका राजानें दिला. त्या वेळीं मीं एकट्यानें गुपचूप दुधाऐवजी पाणी ओतले तर ते कळून येणार नाहीं, असा चुकारपणाचा विचार प्रत्येक नागरिकाने आपणाशीं केला व त्याचा परिणाम म्हणजे दुधाऐवजीं तो गाभारा पाण्याने तुडुंब भरून गेला!" ही गोष्ट सांगून कामचुकारपणानें योजना कशा फसतात, हे ते स्वयंसेवकांच्या मनावर बिंबवीत.

संघाच्या प्रारंभींच्या काळात व नागपूरच्या १९२७ मधील संघर्षापूर्वीं, डॉक्टरांनीं हिंदुसमाजांतील 'मी एकटा आहे' अशी प्रत्येक व्यक्तीला वाटणारी भीति किती आत्मघातकी व हास्यास्पद आहे, याचे कथन बैठकांतून व सभातून अखंड चालविलें होतें. हिंदु ही आता मृत्युपंथाला लागलेली जात आहे, संस्कृत ही तिची मृत भाषा आहे व आताच्या परिस्थितींतून या समाजाला डोकें वर काढणें अशक्यप्राय आहे, तेव्हां दैवात असेल तसे होणार, असे सूर उमटलेले ऐकूं येत. तेव्हां डॉक्टर त्या गोष्टी ऐकून अस्वस्थ झाले तरी त्या विकृत सुराशीं आपलाहि सूर मिळवावा, अशी उदासीनता त्याच्या मनात डोकावलेली नाही. त्यांचें मन अशी अखंड ग्वाही देत होतें कीं, 'मी एकटा आहें!' ही फुटीरपणची जाणीवच हिंदूंच्या भीरुतेची जननी असून त्या फुटीरपणालाच येथून सामूहिक

जीवनाचा शह देऊन सीमापार केलें कीं, हिंदु समाजाचें खरें पुरुषार्थी व पराक्रमी स्वरूप आपोआप जगाच्या प्रत्ययास येऊं लागेल. या विश्वासावरच त्यांनीं या काळांत 'मी एकटा आहें' या मनाला घोरपडीप्रमाणें बिलगून बसलेल्या कल्पनेवर उपहासाचे सणसणीत तडाखे मारण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. त्यासाठीं पुढील दोन घटना ते वारंवार सांगत असत.

त्यांतील एक प्रसंग प्रकट सभेचा असून त्यांत टुणकन् उडी मारून पुढें सरणाऱ्या एका बेटकुळीनें अध्यक्ष व वक्ता यांसकट सर्व सभा पांगवून टाकल्याचा विचित्र प्रकार घडला होता. त्याचें त्या वेळच्या 'महाराष्ट्रां'त आलेलें वर्णन अत्यंत चिंतनीय आहे. तें वर्णन असें : " ......एकाएकीं सभेंतील कांहीं लोक मध्येंच उभे राहिले. म्हणतां म्हणतां पाव सेकंदाच्या आंत पार्कमधील वॉकर रोडच्या बाजूचे सर्वच लोक विजेच्या धक्क्यानें एकदम उभे राहावे तसे उठून उभे राहिले व पाठीमागें वाघ लागावा त्याप्रमाणें जीव घेऊन पळत सुटले ! त्या बाजूसहि लोकांची गर्दी उसळली होतीच. तिच्यावर हा लोकांचा लोंढा एकदम धांवत आल्याकारणानें आपण त्याखालीं चिरडून जाऊं, या भीतीनें 'हे पळतात कां ?' याचें कारण कोणासहि माहीत नसतां तिकडील मंडळीहि एकदम उठून उभी राहिली. त्यांपैकीं कांहीं जण पळणाऱ्या गर्दीच्या पायांखालीं चिरडले गेले; तर पळणारे कांहीं इसम बसलेल्या लोकांच्या अंगावर पडून स्वतः दुखावले गेले व ज्यांच्या अंगावर पडले त्यांसहि लहानमोठ्या दुखापती झाल्या ! सारांश, वर वर्णन करावयास वेळ लागला त्याच्या शतांश वेळांत—एका निमिषांत—सर्व सभा व्यंकटेश थिएटराच्या भिंतीकडे धांवत चालली ! इतक्यांत सभेंतील क्टिसन् लाइटचे दिवे गर्दीच्या धक्क्यानें धडाधड उलथून खालीं पडले व मालवून गेले. अध्यक्षांच्या टेबलावरील एक दिवा मात्र मिणमिण करीत होता ! धांवत आलेली गर्दी थिएटरच्या भिंतीवर आंदळली. त्या बाजूस पुढें पळण्यास वाट नाहीं म्हणून कांहीं लोक बाजूच्या भिंतीवरून व कठड्यावरून उड्या घेऊन पलीकडे पडले. त्यांपैकीं कित्येकांस जबर जखमा लागल्या ! कित्येक मुलें व माणसें पडलीं व दुखावलीं; कित्येक चेंगरून गेलीं ! 'किति पडती किति दडती । कितिएकांचीं धृतायुधें गळतीं ।' अशी स्थिति झाली ! एकदम आगासुगा नसतां, मागेंपुढें न पाहतां लोक पळत सुटल्यामुळें कित्येकांच्या काठ्या हरवल्या, कोणाचे जोडे गेले, कोणाच्या टोप्या गहाळ झाल्या; कोणाचे दुपट्टे गमावले; कोणाचीं धोतरें सुटलीं ! व इतकी चार हजार मंडळी क्षणभर भीतीनें गर्भगळित झालेली दिसली !...खरा प्रकार चौकशीअंतीं आम्हांस असा कळला कीं, सभेच्या मध्यभागीं बसलेल्या माणसाचे पायाखालीं कांहीं बेटकुळीसारखें लागलें, म्हणून तो उभा राहून खालीं न्याहाळून पाहूं लागला. तेव्हां शेजारपाजारचे दहापांच लोकहि उठून उभे राहिले ! त्यांतला एक जण 'साप ! साप !' म्हणून ओरडला. तें ऐकतांच शेजारपाजारचे लोक

उठून पळूं लागले ! त्यांना उठून पळतांना पाहून बाकीचेहि लोक भयाचे कारण न समजतांच पळूं लागले ! शेकडा ९९ लोक आपण का पळतो, हे न समजतांच पळत सुटले ! ''

या सभेच्या दिवशी डॉक्टर काहीं कामानिमित्ताने बाहेरगांवीं गेले होते. पण ' महाराष्ट्र ' पत्रातून त्यानी हे वर्णन वाचल्यावर त्या सभेच्या चालकापैकीं त्यानीं काही जणाची स्मरणपूर्वक गांठ घेतली व ' श्रोत्यांचे सोडा, पण तुम्हीं मंडळींनी वेळींच पुढे येऊन लोकांना का आवरले नाही ? ' असा प्रश्न केला. पण आश्चर्य असें की, " मी एकटा काय करणार ? ' हेच ध्रुवपद प्रत्येकाच्या मुखांतून आळविलेले डॉक्टरांना ऐकावे लागले !

मोहिते वाड्याजवळील काळीकराच्या बोळातील एक प्रसंग त्याच्या सागण्यांत येई. त्यांत सहा-सात हिंदूना समोरून येणाऱ्या दोघा मुसलमानानी ' ठैरो ! सालेको पीटो ! ' असे धमकावताच ते सर्व जण धूम ठोकून पळाले ! त्यातील एका पळपुट्याची वाटेत डॉक्टराशीं गाठ पडली. त्याला थांबवून डॉक्टरानी विचारले, ' पळतोस कां ? ' तेव्हा धापा टाकीत त्याने उत्तर दिलें कीं, " दोन मुसलमान मारायला निघाले व मी पडलो एकटा ! म्हणून पळतो ! ''

या अशा घटना डॉक्टर सांगत असता सर्व रोख हा जनमनांतील एकलेपणाचा न्यूनगड उखडून टाकावा यावरच असे. ही आत्मविश्वासहीनता दूर करावयाची तर हिंदूच्या मनातील ' मी 'पण जाऊन त्या जागीं ' आम्ही पस्तीस कोटि आहोत ' अशी ' सामूहिक अस्मिता ' प्रतिष्ठापित केली पाहिजे, हे त्यानीं ओळखले होते. त्यासाठीं ही भीरुता व हे पलायनचापल्य दूर करावयाचे असेल तर सर्वांनीं प्रतिदिन एकत्र येऊन आपण एकटे नसून अनेकातील एक आहोत, सिंधूतील बिंदु आहोत, याचा प्रत्यक्ष साक्षात्कार करून घेतला पाहिजे, असे त्याचे आत्मविश्वासपूर्ण व ठाम प्रतिपादन असे. हिंदूंचें खचलेले धैर्य व अवसान पुन्हा जागृत करण्याकडेच त्यानीं सारे उद्योग केंद्रित केले होते व त्यासाठीं सिंहगडावरील पळापळीला आपल्या निर्भयतेने व कर्तव्याच्या जाणिवेने आश्चर्यकारक कलाटणी देणाऱ्या वीर सूर्याजी मालुसरेचाच अचल पवित्रा डॉक्टरानीं घेतलेला दिसे. त्याच्या बोलण्याचालण्यांतून ' आता पराभव नाहीं, पराक्रम ! ' असाच ठसा त्यांच्या सबंधात येणाऱ्या प्रत्येकाच्या मनावर उमटत असे. बाहेरच्या परिस्थितीच्या उष्णतेनें विचारशील बनलेल्या लोकांच्या मनावर डॉक्टराच्या प्रतिपादनाची विजयी मुद्रा आतां अंकित होऊ लागली होती व समाजांतील तरुणमनात चढाईचे विचार उसळत होते.

डॉक्टराचे असे प्रयत्न चालू असता मुसलमान मोहल्ल्यात आक्रमणाचे व्यूह कसे रचले जात आहेत, याकडेहि त्यांचें पुरेसें लक्ष होते. त्यामुळेंच गणेशोत्सवांत गौरी किंवा महालक्ष्मी जेवतात त्या दिवशीं महाल भागांत धुमाकूळ माजविण्याचा

मुसलमानांचा डाव आधीं समजूं शकला. ही कुणकुण वेळींच लागल्यानें झगड्याच्या संभाव्य भागांत चटकन् लाठ्या मिळूं शकतील अशा बेतानें ठिकठिकाणीं त्यांचा सांठा करण्यांत आला व असुरक्षित वाटणाऱ्या भागांतील लोकांना दक्षता ठेवण्याविषयीं डॉक्टरांनीं स्वतः जाऊन सूचना दिल्या. नागपुरांतील पटवर्धन प्रशाळेच्या एका बाजूस असलेलें वसतिगृह हें गुंडांचें लक्ष्य होऊं शकेल अशी भीति वाटून, तेथील विद्यार्थ्यांनीं मुख्याध्यापकांना ' आमच्या संरक्षणाची व्यवस्था काय ? ' अशी विचारणा केली. तेव्हां त्यांनीं विद्यार्थ्यांना सांगितलें, " सरकारी शाळा आहे म्हणून सांगा, म्हणजे त्रास देणार नाहींत ! " डॉक्टरांना कांहीं स्वयंसेवकांकडून ही गोष्ट कळतांच त्यांनीं सांगितलें कीं, " गुंडांना आक्रमणाच्या भरांत हें उत्तर थोपवूं शकणार नाहीं. तुम्हीं सर्वांनीं सदंड व सावध राहिलें पाहिजे. " ही डॉक्टरांची सूचना अत्यंत उपकारक ठरली व पुढें गुंडांची वसतिगृहावरील झालेली चढाई धिटाईनें मोडून काढण्यांत विद्यार्थी यशस्वी ठरले.

ऑगस्ट महिन्याच्या शेवटीं मुसलमान वस्तींत दि. ४ सप्टेंबरला निघावयाच्या मिरवणुकीचें ' फातेहारव्वानी ' ( पुण्यतिथि ) अशा शीर्षकाखालीं एक हस्तपत्रक वांटण्यांत आलें होतें. संकल्पित चढाईवर ही पुण्यतिथि म्हणजे चढविलेला मुखवटा होता. त्या हस्तपत्रकांत म्हटलें होतें कीं, " ......मुसलमान बंधूंस कळविण्यांत येतें कीं, तीन वर्षांपूर्वी सय्यद मीर साहेब नांवाचा गृहस्थ धारातीर्थी पडला. त्याच्या पुण्यतिथीनिमित्त दि. ४।९।२७ ला दिवसां दोन वाजतां एक मिरवणूक हंसापुरी कबरस्थानाकडे जाण्यासाठीं नबाब मोहल्ल्यांतून महालावरून वॉकर रस्त्याकडे जाऊन गांजाखेतच्या रस्त्यानें हंसापुरींत जाईल. म्हणून सर्व इस्लामी बंधूंस प्रार्थना आहे कीं, वरील तारखेस जुलूस निघण्याचे अगोदर १२ वाजतां नबाबपुऱ्याच्या मशिदींत येऊन मिरवणुकींत सामील व्हावें. यामुळें मिरवणुकींत चैतन्य व आवेश उत्पन्न होऊन तुम्हांला पुण्यप्राप्तिहि होईल. " याखालीं कोणा हुसेन शरीफची स्वाक्षरी होती.

अशा या ' पुण्यप्रद ' मिरवणुकीसाठीं महालक्ष्मीच्या दिवशींचा दुपारचा वेळ निवडण्यांत मुसलमानांचा एक डाव होता. महाराष्ट्रांतील कोणत्याहि भागापेक्षां नागपूर-वऱ्हाड भागांत हा सण मोठ्याच वैभवानें व डामडौलानें साजरा केला जातो. मोठी आरास करण्यांत येते व दोन देवींच्या प्रतिमा रेशमी व जरीच्या उंची वस्त्रांनीं नटवतात आणि घरांतील हिरे, मोतीं, सोनें यांच्या मूल्यवान् आभूषणांनीं अलंकृत करून त्या दिवशीं घरोघर पूजिल्या जातात. देवींना नैवेद्य म्हणून केळीचें दीड हात पानहि अगदीं अपुरें वाटावें इतक्या पक्वान्नांच्या परींनीं जेवणाचा थाट करण्यांत येतो ! दुपारीं २ पासून तिन्ही सांजेपर्यंत घरोघर ' देवी जेवत असतात ! ' अशी लोकांच्या पंक्तींची गडबड उडत असतां, जर आपण हिंदूंच्या वस्तींत चाल केली, तर सर्व भोजनभाऊंची तारांबळ उडेल व त्या संधीचा

लाभ घेऊन त्यांच्या महालक्ष्म्यांची पाडापाड करून त्यांवरील अलंकार लुटण्याची खऱ्याच अर्थाची ' सुवर्ण '-संधि प्राप्त होईल असे मनोरथ मुसलमानांच्या धुरीणानी रचले होते ! हीच ' स्वप्ने ' मनःपटावर पहात दुपारी १२ पासून नबाब-पुऱ्यातील मशिदीजवळ नागपुरांतील व जवळपासच्या गावांतील मुसलमान जमू लागले.

या वेळीं डॉक्टर नागपुरांत नव्हते. आवश्यक त्या सूचना देऊन प्रतिवर्षाप्रमाणे गणेशोत्सवांत भाषणे देण्यासाठीं चांदा, वणी या भागात जाऊन त्यांना दोन-तीन दिवस झाले असावेत. झगडा झाला तर जी दक्षता घ्यावयाची, ती काळजीपूर्वक योजना करून मगच डॉक्टरांनी सचारासाठी प्रस्थान ठेवले होते. दासबोधांतील चाणाक्षपणाच्या ज्या खुणा श्रीसमर्थ रामदासानी वर्णन केल्या आहेत, त्या डॉक्टराच्या व्यवहारात नित्य दिसावयाच्या. जणूं कांही आपणाला काही पत्ताच नाहीं, असा वरकरणी देखावा, खटनटासी खटनट बनताना करावा लागतो, या सूत्राचे ते जाणकार होते. त्यानीं मुसलमानांची सिद्धता हेरली होती व हिदूंच्या सावधानतेचा परिस्फोट होऊं दिला नव्हता. मुसलमानानी चढाईचा तिथिनिश्चय केल्यावर त्यापूर्वींच डॉक्टरानीं नागपुरातून बाहेर जाणे हीं डॉक्टराकडे त्वेषाने पाहणाऱ्या मुसलमानाना हिंदूंच्या सिद्धतेच्या दृष्टीने अंधारात ठेवण्यासाठी योजलेली क्लृप्तीच असावी, असे वाटते.

डॉक्टराच्या सूचनेप्रमाणे श्री. अण्णा सोहोनी याच्या नेतृत्वाखाली दुपारीं १२ पासून मोहिते वाड्याच्या पडक्या भिंतीआड तरुण स्वयंसेवक जमू लागले. त्यांची अण्णांनीं नीट विभागणी केली व डॉ. मुंजे याच्या घरापासून तर महाला-पर्यंतच्या सर्व बोळांतून व गल्ल्यातून त्या स्वयसेवकाना सावधानतेने दबून बसण्याची सूचना देण्यांत आली. एकूण सोळा तुकडया पाडण्यात आल्या होत्या व त्यात शभर-सवाशे तरुणाचा साधारणपणे अंतर्भाव झालेला असावा.

ठरल्याप्रमाणे रविवार दि. ४ सप्टेंबरला दुपारीं मुसलमानाची मिरवणूक निघाली. ' अल्ला हो अकबर ! ' व ' दीन ! दीन ! ' या आरोळ्या स्पष्टपणे ऐकू येऊं लागल्या. इंग्रजाच्या राज्यात व एका प्राताच्या प्रमुख ठिकाणीं निघालेल्या या मिरवणुकींत लाठ्या, भाले, तरवारी व जबिये घेऊन सहस्रावधि मुसलमान उन्मत्तपणाने जाऊं लागले, तरीहि आरक्षकानी अडथळा केला नाहीं. हिंदु-मुसलमानातील संघर्षांत, राष्ट्रीय वृत्तीची स्वाभाविकपणे जोपासना करणारा हिंदु-समाज परस्पर ठेचला गेला तर ते इंग्रजाच्या पथ्यावरच पडेल, हे ध्यानी घेऊनच ठिकठिकाणीं मुसलमानी आक्रमणांकडे काणाडोळा करण्याचे तंत्र गोऱ्या अधि-काऱ्यानी अंगीकारले होते. तसे पाहता हिंदुस्थानावरील आक्रमक या दृष्टीने दोघेहि एकाच माळेचे मणी होते व याची जाणीव दोघानाहि असे. इंग्रजाच्या पूर्वींचे ' सम्राट् ' म्हणून मुसलमान पुढारी छाती फुगवीत व सध्याचे सम्राट् म्हणून इंग्रज ताठलेले असत ! सर् जॉन् स्ट्रॅची यांनी मुसलमानांसंबंधींची आत्मीयता व्यक्त

करतांना "......त्यांचे हितसंबंध आपणांशीं म्हणजे इंग्रजांशीं जुळते आहेत." ("...whose political interests are identical with ours") असा स्पष्ट निर्वाळा दिलेला आहे; तर सर् बामफील्ड् फुल्लरसारखे इंग्रज हे "मुसलमान लोक हे इंग्रजांची आवडती बायको व हिंदु लोक ही नावडती बायको!" अशीं मुक्ताफळें उधळतांना आढळत!

अशाच प्रकारच्या चुकीच्या धोरणांमुळे ही सशस्त्र मिरवणूक डॉ. मुंजे यांच्या घरापासून अधिकाधिक उच्छृंखल व आक्रमक बनत पुढें सरकूं लागली. इंग्रज अधिकारी मनांत कौतुक करीत पहातच राहिले! तें दृश्य भीतिदायकच होतें. गगनभेदी 'दीन! दीन!' शब्दांनीं 'मिरवणूक जवळ आली! अगदीं जवळ आली!' अशी कुजबूज काळीकर गल्ली, वाईकरांची गल्ली, केळीबागची बाजू, सिटी हायस्कूलचें प्रवेशद्वार, डॉ. हरदास यांचें रुग्णालय या भागांत घराघरांतून कातर शब्दांत व धडधडत्या हृदयांच्या सान्निध्यांत उमटत असतां त्याच गल्ल्यांच्या तोंडाशीं ज्यांचे बाहु आत्मसंरक्षणासाठीं स्फुरत होते, असे स्वयंसेवक निर्भयतेनें वाट पहात उभे राहिले. थोड्याच वेळांत नीट रस्त्यानें जाणारी मिरवणूक वाईकरांच्या गल्लींत शिवीगाळ व मारहाण करीत शिरली. पण त्या ठिकाणीं उभ्या असलेल्या तीनचार स्वयंसेवकांच्या तडाख्यांनीं त्या निरुंद गल्लींत जो जो त्वेषानें शिरे तो तो रक्तबंबाळ होऊन मागें फिरे! हें दृश्य कांहीं वेळ दिसतांच 'दीन! दीन!' आरोळ्या ठोकीत तोल सुटलेले व मिरवणुकींतून पांगलेले मुसलमान महाल भागांतील अन्य गल्ल्यांतून घुसण्याचा प्रयत्न करूं लागले. पण तेथेंहि त्याच प्रकारच्या रक्ताचा अभिषेक अनेकांना घडूं लागतांच मिरवणुकीची पुरी पांगापांग होऊन मुसलमान एकट्यादुकट्या हिंदूंस मारपीट करीत पुढें चिटणीस उद्यानाकडे जाऊं लागले. त्या वेळीं त्यांच्या गोंधळलेल्या व बावरलेल्या दृष्टींतून व शिवीगाळींतून त्यांचा पहिल्या चकमकींतच झालेला अपेक्षाभंग स्पष्टपणें डोकावत होता. एवढी मिरवणूक तरुणांनीं पांगविली, ही वार्ता घराघरांतून घुमूं लागली व आपलीं पंचपक्वान्नानें भरलेलीं ताटें तशींच टाकून अनेक जण लाठ्या सरसावीत, नेसलेल्या सोवळ्या वस्त्रानिशीच मिरवणुकीवर तुटून पडले. चिटणीस उद्यानाजवळील झटापटींत हा हिंदूंचा 'सोवळा' मार मुसलमानांना बसत असतां असंख्य लोक बऱ्याच वर्षांनीं येणाऱ्या पर्वणीप्रमाणें तें दृश्य पाहण्यासाठीं आरक्षकांना न जुमानतां एकत्रित झाले!

शेवटीं अंधाराच्या आश्रयानें आपलीं काळवंडलेलीं मुखें दडवीत मुसलमानांना भालदारपुऱ्याकडे पांगण्यावांचून गत्यंतर उरलें नाहीं. हिंदूंच्या दैवतावरील दागदागिने लुटण्याच्या व मूर्तींचें भंजन करण्याच्या लालसेनें पुढें सरसावणाऱ्या गुंडांना देवीचा असा प्रसाद मिळाला! कोमल कमलदलांवर महालक्ष्मीच्या हळुवार पडणाऱ्या पावलांत आज दशप्रहरणधारिणी अशा महिषा-

सुरमार्दनीच्या बळाची चुणूक दिसून आली होती ! महालक्ष्मीला सुवर्णमुद्राचा छनछनाट प्रिय असतो, पण आज तिला शस्त्राचा खणखणाट ऐकण्याची हौस वाढत होती असे दिसले ! रविवारी रात्रीः सर्व शहरातच चकमकी झडत होत्या व त्यांत हिंदूंचेच पाऊल पुढे होते. रात्रभर लोकानीं स्वयस्फूर्तीनें सर्वत्र गस्ती चालू केल्या होत्या.

यानंतर सोमवार, मगळवार व बुधवार असे तीनहि दिवस झटापटीतचा गेले. सोमवारीं हिंदूच्या प्रेतयात्रेवर मुसलमानानीं चाल केली. याचा वचप, काढण्यासाठीं हिदु जमू लागतांच त्याच्यावर तरवारी, लाठ्या व भाले घेऊन मुसलमानानीं हल्ला केला. या वेळी एका मुसलमानाने घरांतून गोळीबारास आरभ केल्यानें नऊ जण घायाळ झाले. त्यात एक संघस्वयसेवक श्री. धुडिराज लेहगावकर हा मृत्युमुखीं पडला. या घटनेने हिदु प्रक्षुब्ध झाले व त्यानीं काहीं मुसलमानाची घरे व एक मशीद जाळून भस्मसात् केली. या वेळी धनुर्धारी स्वयंसेवकानीं आपल्या धनुष्यांतून पेटत्या बाणाचा अचूक वर्षाव करून, ही गोष्ट स्वतः नामानिराळे राहून दुरूनच घडविली होती. सोमवारीं सायंकाळी, वरातीमागून घोडे यावे त्याप्रमाणे सैन्य व गोऱ्या पलटणी नागपुरात दिसूं लागल्या व यांत्रिक बदुकाचे मोर्चे उभारले गेले. तीनचार दिवसात जाति, पथ, उद्योग याच्या कृत्रिम भेदाचा कोठे गधहि न उमटता, सर्व हिंदूंनी जी जागरूकता दाखविली, तीमुळे नागपूर-मधून मुसलमानांना पळ काढावा लागला व सरकारी सैन्याच्या आधाराने आपल्या बायकामुलाना गोड राजाच्या किल्ल्यात नेऊन सोडणे भाग पडलें. शेकडो गुड रुग्णालयात कण्हत होते, तर जवळजवळ दहा-पधरा जण पैगंबरवासी झाले ! हिंदूंतीलहि चार-पांच जण मृत्युमुखी पडले असले तरी त्याचे प्रभुत्व निर्विवादपणे सिद्ध झाले होते यात शका नाहीं !

हा धुमाकूळ नागपूरमध्ये चालू झाल्याचे डॉक्टरांना चांदा येथे कळताच ते तेथून त्वरित निघाले. त्या वेळीं त्याच्याबरोबर श्री. बाळकृष्ण वाघ हे होते. डॉक्टर प्रथम वर्धा येथें गेले. तेथे नागपूरचे पत्र हातीं पडलें. त्यात असे म्हटले होते कीं, " सरकार व मुसलमान दोघेहि डॉक्टरांच्या आगमनावर लक्ष ठेवून आहेत. तरी त्यांनीं वर्ध्यासच थाबावें. " श्री. आप्पाजी जोशी यानींहि नागपूरची एकूण गंभीरता ध्यानीं घेऊन ' जाऊं नका ' असे परोपरीने विनवून पाहिलें. पण त्यांनीं ऐकले नाहीं व दंग्याच्या तिसऱ्या दिवशीं दुपारीं ते नागपूरला येऊन थडकले. स्थानकावर शुकशुकाट जाणवत होता व गावात जाण्यास टागा-गाड्या मिळणेंहि अशक्य होते. तेथे असलेल्या आरक्षकानीं डॉक्टरांना सांगून पाहिलें कीं, गावांत जाण्यांत ' खतरा ' आहे ! त्यावर डॉक्टरांनीं केवळ मंद स्मित केलें व ते पायींच घरीं निघाले. हें डॉक्टरांनीं केलेले धाडसच होतें. कारण छुप्या सुरामारींचे व झटापटीचे प्रकार अजून बंद वा मंद झालेले नव्हते.

डॉक्टर घरीं जाऊन पोहोंचले त्या वेळीं त्यांच्या घरावरील फुटक्या कौलांनीं व अंगणांत पडलेल्या फुटक्या खापऱ्यांनीं दगडफेक किती झाली, याची साक्ष दिली. घरांत विशेष कोणाला त्रास झाला नाहीं ना, याची चौकशी करून ते रुग्णालयांत गेले व झटापटींत घायाळ झालेल्या तरुणांची व लोकांची त्यांनीं आस्थापूर्वक विचारपूस केली. तसेंच ज्या स्वयंसेवकांनीं समाजरक्षणार्थ धारातीर्थीं देह ठेवले होते, त्यांच्या घरीं जाऊन डॉक्टरांनीं त्यांच्या पराक्रमाविषयीं धन्यता व त्यांच्या पालकांच्या दुःखाशीं सहसंवेदना व्यक्त केली. त्यांचें धैर्य व खरा आंतरिक जिव्हाळा याचा ठसा अशा भेटीच्या प्रसंगीं इतरांवर उमटल्यावांचून राहत नसे. या वेळीं कांहीं जणांना दंगा केल्याच्या आरोपावरून अटक झाली होती. अशा लोकांच्या घरीं जाऊन "तुम्ही मुळींच चिंता करूं नका, त्यांच्या सुटकेसाठीं सर्व तऱ्हेचे प्रयत्न केले जातील," असा धीर देण्यास डॉक्टर विसरले नाहींत. घरांतील वडीलधाऱ्या व्यक्तीचा जसा सर्व कुटुंबियांना आधार वाटतो, तसा प्रकार डॉक्टर नागपुरांत येतांच आढळून आला असल्यास नवल नव्हतें.

आतां चौकाचौकांतून आरक्षकांच्या व सैनिकांच्या तळपत्या संगिनी दिसत होत्या. त्या नसत्या तर हिंदूंच्या सणसणीत व प्रभावी प्रतिकारानें गलितधैर्य झालेल्या मुसलमानांचे हाल कुत्र्यानें खाल्ले नसते. हिंदूंच्या दुकानांत कांहीं वस्तू मिळणें ही गोष्ट त्या वेळीं मुसलमानांना अशक्य होऊन गेली व आपण हात दाखवून अवलक्षण करून घेतल्याचा पश्चात्ताप त्यांच्या मुखावर स्पष्टपणें उमटूं लागला. नागपूर महासभेच्या वतीनें राजे लक्ष्मणराव भोंसले व डॉ. मुंजे यांच्या नेतृत्वाखालीं आपद्ग्रस्तांना साहाय्य करण्यासाठीं एक समिति नियुक्त करण्यांत आली. त्यांत डॉ. हेडगेवार होते, हें सांगावयास नकोच. या समितीनें अनेकांवर भरण्यांत आलेल्या खटल्यांत पुरावा गोळा करून खटल्यासाठीं लागणारा खर्च भागविण्यासाठीं निधि उभारला. खटल्यांत हिंदूंची बाजू मांडण्यासाठीं याच समितीच्या प्रयत्नानें कांहीं विधिज्ञ पुढें आले.

नागपुरांत हिंदु समाजाचा आत्मविश्वास वाढल्याचा प्रत्यय त्या वेळीं कोणालाहि आला असता इतकें तेथील वातावरण सहकार्यपूर्ण व गतिमान् झालें होतें. 'महाराष्ट्र'च्या दि. ११ सप्टेंबरच्या अग्रलेखांत हा हिंदूंचा आत्मगौरव शब्दाशब्दांतून प्रकट झाला असल्यास नवल नव्हतें. त्यांत म्हटलें होतें कीं, "......मुसलमानांनीं एकदां कुरापत काढल्यानंतर व हल्ले सुरू केल्यानंतर हिंदूंनीं एका-अर्ध्या तासांत मोहल्ल्या-मोहल्ल्यांत शेजारपाजारचे लोक जमवून मुसलमानांच्या हल्ल्यांना तोंड देण्याची तयारी झटकन् केली, ही गोष्ट खरी आहे. त्यामुळें कोष्टी वगैरे दुसऱ्या लठबाज समाजाची मदत मिळूं न देतां महालाकडील पांढरपेशा समाजाला एकटेंच गांठून झोडपण्याचा जो गुंड व धर्मवेड्या मुसलमानांचा बेत होता तो सपशेल फसला! आतां नागपूरचा सबंध हिंदु समाज

स्वसंरक्षणक्षम झाला आहे. तो यापुढे मुसलमानाच्या गुंडागिरीला भिऊन पळणार नाहीं. तो आता जागच्या जागी ताठ उभा राहून मुसलमानाच्या टोल्यास टोला व ठोशास ठोसा देईल. ”

या अग्रलेखातून उसळणारा आत्मप्रत्यय हा प्रामुख्याने राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या मूठभर स्वयंसेवकाच्या पराक्रमातून हिंदु समाजाला आलेला होता. आपली ‘ मृत जाति ’ नसून ती सतेज, पराक्रमी व जिवंत जाति आहे, याची सजीवक प्रेरणा नागपुरात व मध्यप्रातात राष्ट्रीय स्वयंसेवकाच्या शौर्य-धैर्यातून दिली गेली होती. सघाच्या स्वयंसेवकांनी सामाजिक कर्तव्य म्हणून केलेले प्रहार हे त्या प्रातातील वाढती मुसलमानी आक्रमकता ठेचून टाकणारे ठरले होते. त्यासबधीं संघाचे एक अग्रगण्य कार्यकर्ते श्री. दादा परमार्थ लिहितात की, “ त्या प्रहारांचा पायगुण नागपूरला इतका फलदायी ठरला कीं, परत १९२७ नंतर नागपूरला दंगा म्हणून माहीत नाहीं ! ”

स्वाभाविकच नागपुरात व त्या प्रातात राष्ट्रीय स्वयंसेवक सघ व त्याचे सस्थापक डॉ. हेडगेवार यांचे नाव सर्वतोमुखी झाले व शेकडो तरुणाचे पाय मोहिते सघ-स्थानाकडे वळले. या दंग्यानंतर सघाची सख्या जवळ जवळ सहस्राच्या घरात गेली व नागपुरातील हिंदु समाजाच्या सर्व थरात संघ हा एक अभिमानाचा व गौरवाचा विषय होऊन बसला. दिव्याभोवती आपोआप पतग प्रदक्षिणा घालू लागतात, तसा पराक्रम हाहि आकर्षक असतो यांत शका नाही. या घटनेनंतर जनमनात डॉक्टरासाठी एक स्वतंत्र प्रेमाचे आसन प्रस्थापित झाले व लग्न-मुजीसारख्या घरगुती सोहळ्यातून शेकडो हिंदूंकडून डॉक्टराना आग्रहाचीं निमंत्रणे येऊ लागलीं. अशा प्रसगी पाचसात तरुण स्वयसेवकाना घेऊन ते जात असत व त्याची पाठवणी करताना यजमानहि डॉक्टराना पुष्पहार घालण्यात व त्याच्या हातात नारळ व रुपया देण्यात धन्यता मानीत. त्या वेळीं आखाड्यातील प्रमुखाचा असा सन्मान करण्याची पद्धति असे व त्या पद्धतीनुसार संघ हाहि डॉ. हेडगेवाराचा एक शिस्तबद्ध आखाडाच आहे, या कल्पनेने त्याचा असा सत्कार होई. केवळ पोरासोरांचा दोन वर्षांचा संघ हा बाह्यतः आखाडाच वाटावा, हे स्वाभाविक होते. पण एखादा वटवृक्ष केव्हा ना केव्हा तरी जवळील एखाद्या स्वभावतःच ठुसक्या असलेल्या झाडाहून उंचीने कमी असणारच व त्या वेळीं त्याची संभावना त्या दुसऱ्या झाडाच्या तोलाने केली जाणें, हे मनुष्यस्वभावास धरून असल्याने, युक्तच म्हणावे लागेल. एका आखाड्याचा प्रमुख म्हणून हार-नारळ स्वीकारताना संघ व आखाडा या घटकेला सारखेच असले तरी थोड्याच काळात साऱ्या भारतवर्षाच्या चतुःसीमांना व्यापणाऱ्या विराट् वटवृक्षाचे व्यापक स्वरूप सघाच्या प्रगतींतून आपण दाखवूं शकूं, असा आत्मविश्वास डॉक्टरांच्या हृदयात उसळत असेल यांत शंका नाहीं. मात्र लोकांनीं आपल्या संघटनेला उत्तम आखाडा मानलें,

ही आपल्या कार्याची एका दृष्टीनें अवगणना आहे म्हणून लवमात्र खंत न करतां लोकांच्या सद्भावनेचा प्रेमानें स्वीकार करून, त्यांच्या पाठिंब्यावरच संघाचा विशाल विस्तार करून दाखविण्याची व त्यांतून लोकांचा संघासंबंधींचा अपसमज दूर करण्याची धमक डॉक्टरांच्या या व्यवहारांत दिसे.

विजय हा विवेकाच्या संगतींत व्यक्तीला वा समाजाला हृष्टि-पुष्टिप्रद ठरतो. पण तोच विजय विवेकाच्या जागीं विकाराच्या स्वाधीन होईल तर तो विजयच पराभवाचा प्रारंभ ठरल्यावांचून राहत नाहीं. ' आपण पराक्रम केला ' ही भावना तरुणांत उत्पन्न झाली व ' जितं मया ' अशा जाणिवेनें आकाश ठेंगू वाटूं लागलें, तर ज्या सेवाभावाची व स्वयंसेवकत्वाची जोपासना करण्यासाठीं संघ निर्माण झाला त्या हेतूवरच पाणी पडेल, हें डॉक्टर ओळखून होते. यासाठीं नागपुरांतील वातावरण निवळूं लागतांच स्वयंसेवकांजवळ त्यांनीं संथपणानें हितगुज आरंभिलें. आपण समाजाचे घटक आहोंत व म्हणून त्याच्यावर कोणतीहि आपत्ति आली असतां तिच्या निवारणासाठीं पुढें सरून, स्वतःच्या छातीवर आक्रमकांचे आघात सहन करणें वा आक्रमकांवर रक्षणासाठीं प्रत्याघात करणें, हें आपलें केवळ कर्तव्यच आहे. आईनें मुलांची काळजी घ्यावी किंवा मुलानें आईवडिलांची सेवा करावी, या गोष्टी जितक्या स्वाभाविक, तितकेंच कोणतेंहि कर्तव्य स्वाभाविक वाटलें पाहिजे व त्याचा वृथाभिमान मनांत उत्पन्न होऊं नये यासाठीं पराक्रमाची फुशारकी न मारतां वा कांहीं स्वयंसेवकांना सहन कराव्या लागणाऱ्या हानीचें दुःख करीत न बसतां,आपल्याला आधारभूत असलेल्या समाजाची म्हणजे जनताजनार्दनाची अल्पस्वल्प सेवा करण्याचें भाग्य आपणांला लाभलें म्हणून आनंद मानून, कर्तव्य-पालनाचें निर्मळ समाधान तेवढें मनांत दरवळूं द्यावें, असे विचार त्यांच्या बोलण्यांतून मांडले जाऊं लागले. त्या वेळीं ' मुसलमानांना पिटण्यासाठीं हिंदुसंघटना ' अशी विकृत कल्पना ( धारणा ) महात्माजींसारख्यांच्या हृदयांत वास करीत असतां, त्यांना देव मानणाऱ्या त्यांच्या भक्तगणांत तोच सूर उमटणें स्वाभाविक होतें. पण हिंदुसंघटनेचा पुरस्कार करणाऱ्या लोकांतहि मुसलमानांच्या पारिपत्या-साठीं संघटन पाहिजे, असा प्रतिक्रियात्मक विचार सर्वत्र मांडला जाई व त्यांतूनच हिंदु-मुसलमानांच्या ऐक्याचा ध्यास घेतलेल्या महात्मा गांधींचा वरील अपसमज दृढ होत गेला होता. डॉक्टरांनीं या प्रतिपादनाचा कधींच अंगीकार केला नाहीं. त्यांनीं दंग्यापूर्वी व त्यानंतर अखंडपणें एकच विषय मांडला व तो म्हणजे " आपसांतील सारे कृत्रिम व वरवरचे भेद पुसून टाकून सारा हिंदु समाज एकत्वाच्या व प्रेमाच्या भावनेनें, ' हिंदु जातिची गंगा आम्ही तिचे सकल बिंदू ' असा अनुभव घेत उभा राहिला तर जगांतील कोणतीच शक्ति वाकड्या दृष्टीनें हिंदूंकडे पाहूं शकणार नाहीं ! " विधायकता हाच डॉक्टरांच्या प्रतिपादनाचा कणा होता.

...१२... * * *

## १५ : संघाची उभारणी

संघांतील स्वयंसेवकांची संख्या व लोकांतील तिचा दबदबा वाढला असता डॉक्टर मात्र त्या संख्येने काहींसे विचारांतच पडले. भावनेच्या लाटेबरोबर लोक एखाद्या कामात प्रविष्ट होतात व त्यांतील नावीन्य चार दिवसात ओसरूं लागताच पुन्हा वैयक्तिक जीवनात गुरफटून जातात, याचा अनुभव डॉक्टरानी अनेकदा घेतला होता. यासाठीं संघात प्रविष्ट होणाऱ्या स्वयंसेवकांच्या मनांत अखंड स्फूर्तीचे पाझर वाहते ठेवणारी हिंदुराष्ट्रासबंधींची वैचारिक बैठक स्थिर केली पाहिजे व हिंदुराष्ट्रावरील उत्कट भक्तिभावनेने त्यांचीं मने भारलीं पाहिजेत, हे डॉक्टरानीं नेमकें ओळखलें व त्या दिशेनें ठामपणाने विचार माडण्यास प्रारंभ केला. यासाठींच बैठका, वैयक्तिक भेटीगांठी व बौद्धिकवर्ग यांची सुसूत्र योजना करण्याकडे डॉक्टरांनी लक्ष दिले. त्या काळांत संघस्थानावर धडाडीने काम करणाऱ्या स्वयंसेवकातहि क्रांतिकारक विचारसरणीचे लोण येऊन पोचले होतें. कुश पथकातील तरुणाच्या, सघस्थानावरील कार्यक्रम सोडून अन्य वेळीं, गुप्त बैठका होत व त्यात काहीतरी ‘ धडकी ’ भरविण्यासारखे दिव्य करून दाखविण्याच्या कल्पना मांडल्या जात. श्यामराव गाडगे हे वीस-एकवीस वर्षांचे तरुण कार्यकर्ते त्या पथकाचे शिक्षक होते व त्याच्या मनाचा ओढा क्रांतिकार्याकडे असल्याने त्यांच्या प्रभावांत आलेल्या किशोराना त्याच विचाराची दीक्षा मिळाली असल्यास नवल नव्हते. याव्यतिरिक्त आक्षिप्त वाङ्मयाची गोडीहि तरुणांना लागलेली होती आणि त्यातूनहि शिडांत वारा भरून नावेला गति यावी त्याप्रमाणे तरुणाचीं मनें तिकडे झेपावत गेली.

बाहेरील सार्वजनिक कामाच्या व्यापामुळे डॉक्टरांना अजून स्वयंसेवकात मिसळण्यास पाहिजे तितकी सवड मिळाली नव्हती. त्यामुळें शाखेवर येणाऱ्या स्वयंसेवकांत व बाहेरील लोकांतहि अण्णा सोहोनी याचा संघ, मार्तंडराव जोग यांचा संघ वा महासभेचे पथक अशा तऱ्हेतऱ्हेच्या कल्पना ऐकूं येत ! पण १९२७ नंतर कांहीं काळांत डॉक्टरानी आपल्या बाहेरील हालचालींवर नियंत्रण घालून स्वयंसेवकांत अधिकाधिक मिसळण्यास प्रारंभ करतांच या संघटनेचे व्यक्तिविषयक स्वरूप स्वयसेवकांच्या मनातून विरून जाऊन हा कोणा व्यक्तीचा संघ नसून हे सर्व हिंदु समाजाचे कार्य आहे, असा ठसा नव्यानें उमटूं लागला. आजवर केवळ संघस्थानावरील लाठीकाठी व सैनिकी शिक्षण यांतच गुंतून पडलेल्या मनांत, ही

लाठीकाठी हें साध्य नसून समाजाला एकत्रित आणून त्याच्या अंतःकरणांत स्वत्वाचा नि पुरुषार्थाचा आविष्कार करण्यासाठीं उपयोगांत आणलेलें परिस्थिति-सापेक्ष साधन आहे, याचीहि उमज क्रमानें पडूं लागली.

याच सुमारास डॉक्टरांचें स्वयंसेवकांकडे जाणें-येणें अधिक सुरू होऊन त्यांतून संघाच्या खऱ्या स्वरूपाची उकल स्वयंसेवकांना होऊं लागली होती. संघाचे दोन कार्यकर्ते श्री. बाबासाहेब आपटे व श्री. बर्वे हे करंजकरांच्या वाड्यांत राहत. त्यांच्याकडे डॉक्टर येत व तेथें जमणाऱ्या स्वयंसेवकांजवळ मनमोकळ्या गोष्टी करीत. गप्पांच्या ओघांत उशीर झाला तर आपटे-बर्वे यांच्या आग्रहावरून ते त्यांच्याबरोबरच जेवण करीत. त्यांनीं केलेल्या पोळ्या ह्या 'रोट' म्हणण्याइतक्या जाड असत, तरी ते रोट खातांनाहि ' टॉनिक ' म्हणून डॉक्टर त्यांचा थट्टेनें उल्लेख करून त्या जेवणाला रुचिरता आणण्यास विसरत नसत !

याच वर्षीं नागपूरमध्यें ' जनरल ' श्री. मंचरशा आवारी यांच्या नेतृत्वा-खालीं ' सरकारनें शस्त्रनिर्बंध दूर करावा ' अशी मागणी करण्यासाठीं एक आंदोलन सुरू झालें. त्याचें स्वरूप असें होतें कीं, शस्त्रनिर्बंधाला न जुमानतां, हातांत नंग्या तरवारी घेऊन रस्त्यांतून मिरवणूक काढावयाची. अर्थात् अशी मिरवणूक निघाली कीं थोड्याच वेळांत ती पकडली जाई व त्या लोकांवर खटले भरले जात. पकडले गेलेले स्वयंसेवक न्यायालयांतील निवेदनांत " आपण बंगाली राजबंदींच्या मुक्ततेसाठीं हीं शस्त्रें जवळ बाळगलीं आहेत, " असें सांगत असत. या आंदोलनाचें केन्द्र इतवारी स्थानकापलीकडील ' गादा कँप ' म्हणून ओळखण्यांत येणाऱ्या भागांत एका पत्र्याच्या झोपडींत थाटलेलें होतें. या केंद्रावर त्या काळांत कांहीं स्वयंसेवकांना घेऊन डॉक्टर रात्रींचे जात असत व श्री. आवारी यांच्याशीं गप्पागोष्टी करून परत येत. पददलित राष्ट्राला आपलें उत्थान करण्यासाठीं शस्त्र-क्रांतीचा मार्ग केव्हांना केव्हां तरी चोखाळावाच लागतो, अशी डॉक्टरांची सदैव धारणा असे. त्यामुळेंच या आंदोलनानें जरी प्रत्यक्ष शस्त्रनिर्बंध दूर झाला नाहीं तरी शस्त्रांचा विचार लोकांच्या मनांत त्यानें येऊं लागेल व अशी जागृति कमी महत्त्वाची नाहीं, असें त्यांना वाटे व म्हणूनच त्यांनीं आवारींच्या आंदोलनाला तात्त्विक पाठिंबा दिला होता. महात्मा गांधींनीं मात्र आवारींना कळविलें होतें कीं, " मी दीपगृह आहें, तेव्हां मजकडे या ! " ( I am the light house, come to me. ) कारण त्यांच्या दृष्टीनें हें आंदोलन म्हणजे भरकटलेल्या तारवा-सारखें हिंसेच्या खडकावर आपटून विफल ठरणारें होतें ! डॉक्टरांनीं मात्र त्याचें मर्यादित महत्त्व दृष्टीआड न करतां झालें तेवढें साहाय्यच केलें.

या आंदोलनाच्या प्रवर्तकांनीं सभा घेऊन लोकांजवळून तरवारींची मागणी केली व लोकांनींहि त्या मागणीनुसार घरांत गंजत पडलेल्या भोंसले काळांतील तरवारी आणून दिल्या. अशा खऱ्या तरवारी सरकारच्या हातांत आपल्या हातानें

नेऊन देणे ही पद्धति मात्र डॉक्टरांना खटकूं लागली. त्यांनीं जनरल आवारी व महात्मा भगवान दीन यांची गाठ घेऊन सागितले कीं, " पारतंत्र्यात खितपणाऱ्या लोकांना परक्यांविरुद्ध उठाव करण्यास केव्हां व कशी अकल्पितपणे संधि मिळते हे सांगता येत नाही. यासाठी हातची शस्त्रे अशा तऱ्हेने गमावणें ही आपली मोठीच हानि आहे. " डॉक्टरानी अशी चिंता व्यक्त करताच आवारींनी ' यावर उपाय काय ? ' असा लगेच प्रश्न केला. तेव्हां डॉक्टरानीं योजून ठेवलेली कल्पना त्याना सांगितली. ती अशी कीं, खऱ्या तरवारीऐवजी पिपाच्या पत्र्याच्या तरवारी बनवून त्याना धार देऊन त्या वापरण्यास सुरुवात करा. ही कल्पना लगेच स्वीकारली गेली व त्यानंतर आदोलन समाप्त होईपर्यंत अशा धारेच्या पण एका अर्थाने बनावट तरवारी मिरवल्या जाऊ लागल्या. डॉक्टराची युक्ति कृतीत येईपर्यंत जवळजवळ एक सहस्र खऱ्या तरवारी सरकारी शस्त्रागारात जाऊन पडल्या होत्या. पण आणखी काही सहस्र तरवारी तरी या युक्तीने बचावल्या होत्या, हेंहि विसरून चालणार नाही. इंग्रजाच्या विरुद्ध कोणीहि व कोणत्याहि प्रकारचा उठाव करण्यास उद्युक्त झाला की डॉक्टर त्याचा जमेल तितका पाठपुरावा करीत व त्यातहि या वेळेप्रमाणेच दूरदृष्टिहि अवश्य आढळून येई.

नागपूरच्या दंग्यातील हिंदूंचे यश देशातील पुढाऱ्यानाहि आश्चर्यकारक वाटले होते. कारण त्या काळात मुसलमानाच्या योजनाबद्ध आक्रमणापुढे हिंदु टिकाव धरूं शकतात, असा अनुभव चुकूनहि येत नव्हता. उलट मुसलमानाचे आक्रमण म्हणजे हिंदूंचा विनाश असे समीकरणच होऊ पाहत होते. त्या वर्षीची हिंदुमहासभा कर्णावतीमध्ये ( अहमदाबाद ) डॉ. बा. शि. मुंजे याच्या अध्यक्षतेखालीं होणार होती व त्या अधिवेशनाला डॉ. केशवराव हेडगेवार यानीं अवश्य येऊन आपल्या प्रभावी संघटनेची माहिती प्रांतोप्रांतीच्या कार्यकर्त्यांना द्यावी, असा त्यांचा व कर्णावतीच्या स्वागत-समितीचा आग्रह होता. कांहीं कारणाने डॉक्टराना स्वतः त्या ठिकाणी जाणें जमण्यासारखे नसल्याने त्यांनी श्री. बाळाजी हुद्दार प्रभृति सात संघकार्यकर्त्यांना अधिवेशनाला पाठविले. त्यानीं आपल्याबरोबर कोट, पट्टा, फेटा, लांब बूट आदि गणवेश नेला होता.

प्रत्यक्ष अधिवेशनात प्रांतोप्रांतींची परिस्थिति सांगितली गेली. त्यात ' मुसलमानांपुढें आपण टिकाव धरूं शकत नाही ' असा तोच तोच उदासवाणा सूर अखंड उमटत होता व याला तोंड देण्यासाठीं संघटन उभारलें पाहिजे, अशी उपाययोजनाहि कांहींनीं सुचविली होती. जेव्हा मध्यप्रांताच्या प्रतिनिधीवर बोलण्याची पाळी आली, तेव्हा डॉ. मुंजे याच्या सूचनेवरून संघाचे तरुण कार्यकर्ते श्री. बाळाजी हुद्दार हे बोलावयास उभे राहिले. त्यांची गणवेषातील उंच व तरतरीत मूर्ति पाहून संघटनेने केलेल्या जागृतीची चाहूल सर्वांना खचित लागली असेल. कारण त्याच्या साध्या उभे राहण्यांतहि कांहीं आत्मविश्वास व ऐट होती व

त्यांच्या वक्तृत्वपूर्ण भाषणांत तर राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या विजयाकांक्षेची ओजस्विता रसरसली होती. हुद्दारांनीं सांगितलें होतें कीं, " ज्या प्रांतांत हिंदूंनीं मुसलमानांच्या दंडेलीला पायबंद घातला आहे, त्या प्रांतांतून मी आलों आहें व आपल्या समाजाची अत्यंत दयनीय असहायता दूर करण्याची ही किमया डॉक्टर केशवराव हेडगेवार यांच्या नेतृत्वाखालीं उभ्या राहिलेल्या संघटनेनें घडविली आहे. " १९२७ च्या या अधिवेशनाच्या निमित्तानें संघाचें नांव प्रांतोप्रांतींच्या पुढाऱ्यांच्या कानांवर गेलें व हिंदूंना गांगरवून सोडणाऱ्या परिस्थितीवरहि कांहीं प्रभावी तोडगा असूं शकतो, अशी कल्पना त्यांच्या मनांत अंकुरित झाली.

या अधिवेशनानें संघाचें नांव सर्वत्र पसरलें व संघाच्या प्रत्यक्ष कामाच्या दृष्टीनेंहि या वर्षीं मध्यप्रदेशांत प्रगतिपर पाऊल पडलें. गणेशोत्सव व विविध चळवळी यांतून डॉक्टरांचे अनेक गांवांशीं व व्यक्तींशीं संबंध आलेले होते. ते संबंध डॉक्टरांच्या स्वभावाप्रमाणें खऱ्या जिव्हाळ्याचे व निकटचे असत. असें मित्रमंडळ ठिकठिकाणीं विखुरलें होतें, त्याचा लाभ घेऊन त्यांनीं संघाच्या कामाचें लोण गांवोगांव नेऊन पोंचविण्यास प्रारंभ केला. या वर्षीं व त्यानंतरहि ते प्रवासाला निघाले म्हणजे भगवा ध्वज, मारुतीची प्रतिमा व प्रतिज्ञेचा कागद आपल्याबरोबर नेण्यास विसरत नसत. त्या काळांतील शाखा सुरू करण्याची त्यांची पद्धति म्हणजे गांवांतील परिचित अशा प्रतिष्ठित मंडळींना ते एकत्र करीत व त्यांच्यासमोर हिंदु समाजाची परिस्थिति मांडून त्यावर उपाय म्हणून प्रभावी संघटन केलें पाहिजे असें सांगत. त्यासाठीं नागपूरप्रमाणें भगवा ध्वज उभारून त्यासमोर हिंदूंनीं प्रतिदिन एकत्र जमण्यास प्रारंभ केला पाहिजे व विविध कार्य-क्रमांतून शिस्त, चापल्य व संरक्षणक्षमता वाढवून घेतली पाहिजे, तरच तरणोपाय आहे, असें त्यांच्या प्रतिपादनांत येई. कर्णोपकर्णीं नागपुरांत आलेला संघटनेचा अनुभव लोकांच्या कानीं आलेला असल्यानें डॉक्टरांचे प्रचीतीचे बोल हे बैठकींतील लोकांच्या मनाची तेव्हांच पकड घेत. त्यांचें प्रतिपादन हें वास्तव व सुबोध असे. तसेंच लोकांचें दैन्यवाणें, पराभूत व स्वार्थलंपट जीवन पाहून हृदयाची होणारी कालवाकालव त्यांच्या शब्दाशब्दांतून बोलकी होई. अनेकदां इंग्रजांचा वा अन्य आक्रमकांचा उल्लेख करतांना त्यांच्या भाषणांतून जो भावाविष्कार व्हावयाचा, तो कालियाच्या विषारी फडेवर भगवान् श्रीकृष्णानें नर्तन करावें इतका अत्युग्र भासे. आवाज घोगरा व निश्चयी असे. पण समाजाच्या विकलांगतेचा उल्लेख करतांना त्यांचा कंठ दाटून येई व केव्हां केव्हां त्यांच्या व श्रोत्यांच्या नयनांत अश्रु उभे राहत. हिंदु समाजाविषयींचा जिव्हाळा त्यांच्या रूपानें खरोखरच साकार झालेला वाटे. त्यामुळें अशा बैठकीनंतर ते सर्वांना संघाची प्रतिज्ञा घेण्याची विनंति करून लगेच खिशांतून ध्वज काढून प्रतिज्ञा देण्याची सिद्धता करावयास सांगत. तेव्हां त्यांच्या विनंतीला मान देऊन बहुतेक जण लगेच प्रतिज्ञित होत. कांहीं दिवस

डॉक्टरानीं सुरू केलेल्या संघाला असे बैठकीचे रूपच असे व पुढें त्यांतूनच कांहीं तरुणांना हातार्शी धरून प्रत्यक्ष दैनदिन एकत्र जमून कार्यक्रम करण्याचे म्हणजेच संघाच्या शाखेचे स्वरूप तेथील कामाला देण्यांत येई.

दंग्यानंतर नागपूरमध्येहि धनतोली भागांत एक शाखा सुरू करण्यांत आली व स्वयंसेवकाला आजन्म सेवाव्रताची व वीरव्रताची आठवण करून देणाऱ्या प्रतिज्ञेचा सस्कार संघात सुरू करण्यांत आला. या प्रतिज्ञेत सर्वशक्तिमान् परमेश्वर व आपले थोर पूर्वज यांचे स्मरण करून हिंदुराष्ट्राच्या निर्मितीसाठी व अभिवृद्धीसाठीं तनमनधनपूर्वक, आजन्म व प्रामाणिकपणाने प्रयत्नरत राहण्याचा निश्चय स्वयसेवकाने उच्चारावयाचा असतो. हे प्रतिज्ञेचे स्वरूप डॉक्टराच्या क्रातिपक्षातील प्रतिज्ञेशी अत्यंत जुळते होते, असे सांगतात. सघातील पहिल्या प्रतिज्ञेचा कार्यक्रम १९२८ च्या मार्चमध्ये नागपुरापासून तीन-चार मैलावर असणाऱ्या ‘ स्टार्की पॉइंट ’वर झाला.

ही टेकडी नागपूर–अमरावती रस्त्यालगत असून घनदाट झाडीने सुशोभित आहे. त्या टेकडीवर डॉक्टरानीं ९९ निवडक स्वयंसेवकाना नेले होते व टेकडीच्या पूर्वेकडील उतारावर विहिरीशेजारी पवित्र भगवा ध्वज उभारून त्याच्यासमोर हा प्रतिज्ञेचा गंभीर कार्यक्रम पार पडला. सबंध दिवस हे स्वयसेवक तेथेच राहिले व सायंकाळी परत फिरले. डॉक्टरानी प्रतिज्ञा सागावी व ध्वजापुढे एकेकाने उभे राहून त्या प्रतिज्ञेचा शातपणे व विचारपूर्वक उच्चार करावा, असे त्या विधीचे स्वरूप होते. त्या ९९ जणातील कृतनिश्चयी कार्यकर्ते अजूनहि बत्तीस वर्षानतर चढत्या आत्मविश्वासाने काम करताना आढळतात, हेच त्या संस्काराच्या यशाचे गमक म्हणून सागता येईल. त्या वेळी प्रतिज्ञा घेतलेल्या एका कार्यकर्त्याने असें सागितले की, पहिल्या दिवशी प्रतिज्ञा घेतलेल्या तरुणांचीं नांवे अजूनहि त्या ठिकाणची झाडे तुटलीं नसतील तर त्यावरून कोरलेली आढळतील. तीं अशाश्वत नावे आज कोणाला कोरलेलीं आढळोत वा न आढळोत, पण त्या वेळी हिंदु तरुणाच्या मनावर डॉक्टरानीं कोरलेला ध्येयवाद मात्र हिंदुस्थानात शाश्वत, वर्धिष्णु व जयिष्णु ठरणार आहे, यात लवमात्र शंका नाहीं. कारण तो हिंदुराष्ट्राच्या पुनरुत्थानाचा महामंत्र, आपले सारसर्वस्व राष्ट्रमातेच्या चरणावर अर्पण करणाऱ्या कर्मयोग्याच्या पुण्याईने व आत्मसामर्थ्याने प्रभावित झालेला असून मनूच्या माशाप्रमाणे वाढत वाढत हिंदुराष्ट्राला प्रलयातूनहि वाचविण्याइतका समर्थ होण्यासाठींच उच्चारला गेला आहे.

याच सुमारास डॉक्टराना धक्का बसणारी एक दुर्घटना घडली, ती म्हणजे त्यांचे ‘ बहिश्चर प्राण ’ म्हणून ज्याचा उल्लेख करण्यांत येतो, त्या श्री. भाऊजी कावरे यांच्या दुःखद निधनाची ! क्रातिकार्य मंदावल्यापासून भाऊजी नागपूर व सेलूघोराड या दोन ठिकाणीं जाऊन-येऊन असत आणि वैद्यकी व शेती यावर

उदरनिर्वाह करीत. डॉक्टरांच्या प्रत्येक कामांत ते असावयाचेच. संघाच्या कांहीं शाखा सुरू करतांना हिंगणी वगैरे ठिकाणीं ते डॉक्टरांसमवेत गेले होते असें दिसतें. त्यांच्या मनांत, क्रांतीला अनुकूल अशी संधि पुन्हा केव्हां तरी येईल; तोंवर कोकिळेनें शिशिरांत ज्याप्रमाणें झाडाच्या ढोलींत दडून राहावयाचें असतें तसा कांहीं काळ मुग्धतेंत घालविला पाहिजे, अशी कल्पना वसत होती; व त्यामुळेंच त्यांनीं १९२० पूर्वीं केलेला शस्त्रांचा व धनाचा सांठा ठिकठिकाणीं योजनेनें पांगवून पण सुरक्षित राहील अशी दक्षता घेतली होती. अधूनमधून त्यांचे क्रांतिकार्यांतील सहकारी 'आतां पुढें काय?' असा प्रश्न करीत. मृत्यूपूर्वी नागपुराहून जातांना श्री. नानाजी पुराणिक यांनीं अशी पृच्छा केली असतां त्यांनीं सांगितलें होतें कीं, "एक महिनाभर गांवाला जाऊन येतों. मग परिस्थितीचा पुन्हा विचार करूं." भाऊजी गांवाला गेले व त्या ठिकाणीं तापानें अंग फणफणलें असतांहि ते कर्तव्य म्हणून एका रोग्याची पाहणी करण्यासाठीं पायीं जाऊन आले. शरीरावरील या अत्याचारानें आजार अधिकच बळावला व अशक्ततीहि अतिशय वाढूं लागली. तशाच स्थितींत त्यांनीं आपल्या संग्रहींचें कांहीं औषध घेतलें. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. उलट त्यांची वाचा बंद पडली! डॉक्टरांना ही गोष्ट नागपूरला समजतांच ते व कावरे यांच्या बंधू-कडील मंडळी लगेच तेथें गेली. जातांना डॉक्टरांनीं वर्ध्याहून डॉक्टर देशमुख यांना बरोबर नेलें होतें. तीन दिवसपर्यंत शक्य ते ते उपचार करण्यांत आले. पण त्या प्रयत्नांना यश आलें नाहीं. भाऊजींनीं क्रांतीचीं स्वप्नें पाहतच डॉक्टरांच्या मांडीवर देह ठेवला! डॉक्टरांना या घटनेनें मनस्वी दुःख झालें. घोराडच्या नदीवर भाऊजींच्या पार्थिव देहाला अग्निसंस्कार झाला. त्या वेळीं नदीजवळील उंचवट्यावर बसून डॉक्टर एखाद्या लहान मुलाप्रमाणें ओक्साबोक्शीं रडल्याचें करुण दृश्य अजूनहि अनेकांच्या ध्यानांत आहे. अकृत्रिम प्रेमाचे कढ असेच असतात!

डॉक्टर तेथून परत आले तरी बरेच दिवसपर्यंत भाऊजींच्या आठवणीनें सद्‌गदित होत. संघाच्या १९२८ मधील पहिल्या सैनिकी शिबिरांतील एक प्रसंग उल्लेखनीय आहे. सैनिकी शिक्षण देऊन राष्ट्रकार्यासाठीं तरुणांचीं देशभक्तीनें भारलेलीं पथकें संचलन करीत होतीं व गणवेशधारी डॉक्टर शिबिर पहावयास आलेल्या नागरिकांना तें उत्साहवर्धक दृश्य कौतुकानें दाखवीत होते. इतक्यांत भाऊजींचा एक अनुयायी तेथें आला. त्याला पाहतांच डॉक्टरांचें मन भाऊजींच्या आठवणीनें भरून येणें स्वाभाविक होतें. त्यांनीं त्याला बाजूला नेलें व 'भाऊजी हें दृश्य पहावयास नाहींत' असें म्हणत ते रडूं लागले! इतकें होतें डॉक्टरांचें उत्कट मित्रप्रेम!

आतां संघाच्या प्रचारासाठीं डॉक्टरांना वारंवार प्रवासाला जावें लागे व निरोप पोंचविण्यासाठींहि पत्रांच्या जागीं माणसांची ये-जा करणें भाग पडे. संघाच्या

पहिल्या तीन-चार वर्षांत डॉक्टरांनीं टपालानें पत्रव्यवहार फारसा केलेला आढळत नाहीं. एखाद्या ठिकाणीं कांहीं संदेश पाठविणे असेल तर तो हातीं चिठ्ठी देऊन किंवा फारच महत्त्वाचा असेल तर तोंडी निरोप पाठविण्याची पद्धत होती. कामाचा पाया नीट स्थिर होईपर्यंत संघाकडे सरकारची वक्रदृष्टि वळूं नये म्हणून कोठेहि कागदी घोडे नाचवायचे नाहींत, असा त्याचा कटाक्ष असे. आपण काहीं तरी विशेष करीत आहोत याचा डंका पिटीत राहणे हे त्या काळात उदयाला येणाऱ्या संस्थांचे वळण होते. पण डॉक्टरांनीं सघदृष्टीने प्रसिद्धिपराङ्मुखताच स्वीकारली होती. संस्था ही देशाच्या तत्कालीन परिस्थितींत आवश्यक असे परिवर्तन घडविण्यासाठीं व राष्ट्राच्या उज्ज्वल परंपरेला चिरंतनतेचे वरदान आपल्या तपश्चर्येने मिळवून देण्यासाठीं उभारावयाची असते. पण ज्या वेळी आत्म-विस्मृतीने अधोगतीला गेलेल्या राष्ट्रात संस्थांचा गल्लोगल्लीं सुळसुळाट झालेला असतो, तेव्हा भरीव कार्याऐवजी चार-दोन महत्त्वाकांक्षी लोकांच्या लोकेषणेची सतृप्ति एवढाच त्या संस्थाचा अतःस्थ हेतु असतो व याच हेतूंतून ' मिया मूठभर व दाढी हातभर ' या प्रकारचा हास्यास्पद प्रचार व प्रदर्शन माडले जाते ! कविवय डॉ. रवीद्रनाथ ठाकूर देशबाधवांच्या या प्रवृत्तीविषयी एका पत्रांत म्हणतात की, " प्रत्यक्ष काहीं यश मिळवीपर्यंत आपण अज्ञात राहूं या, असे मी म्हणतो... .. तोंपर्यंत मागे राहून केवळ आपल्याच कामात आपण निमग्न असले पाहिजे. पण आपल्या देशबांधवांची वृत्ति याच्या अगदीं विपरीत दिसते. पडद्याआड राहून आपल्या किमान व निकडीच्या आवश्यकता भागविण्याला महत्त्व न देता, त्यानी आपले सर्व लक्ष दिखाऊ आस्था व प्रदर्शन यावर केंद्रित केलेले आहे. " ( " Till we can achieve something, let us live incognito, say I ..... Till then let us keep in the background attending to our own affairs. But our countrymen seem to hold the appo-site opinion. They set no store by our more modest, intimate wants which have to be met behind the scenes .. the whole of their attention is directed to momentary attitudizing and display. " ) डॉक्टरानीं सुरू केलेल्या कामाचा उगम राष्ट्रोत्थानाच्या लालसेतून झालेला होता. त्यामुळे प्रसिद्धीऐवजी वा वैयक्तिक प्रतिष्ठेच्या जागीं राष्ट्रीय सघटनेचे भरीव स्वरूप प्रत्यक्ष दिसूं लागावे, या दृष्टीनेच त्यानीं संघटना उभारण्याचे तंत्र उभे केलें.

या तंत्रांतील विशेष म्हणजे ' व्यक्तिनिष्ठेच्या जागी विशुद्ध तत्त्वनिष्ठा ' जनमनात जागवावी असेच तिचे स्वरूप ठेवण्याचा त्यांनीं प्रारंभापासून व कटाक्षपूर्वक प्रयत्न केला. त्या प्रयत्नांतील सर्वात उल्लेखनीय गोष्ट म्हणजे या संघटनेच्या गुरु-स्थानीं स्वतःची वा एखाद्या व्यक्तीची डॉक्टरांनीं प्रतिष्ठापना न करता परमपवित्र

भगवा ध्वज यासच त्यांनीं त्या दिव्य सिंहासनावर विराजित केलें. त्यासाठीं ज्या संघस्थानावर सर्व स्वयंसेवक रोज एकत्रित येणार, त्या ठिकाणीं प्रारंभीं तो ध्वज उभारून त्याला शिस्तीनें व आदरानें प्रणाम करून त्याच्या छायेखालींच वा सान्निध्यांत सर्वांनीं कार्यक्रम करावेत, अशी पद्धति त्यांनीं अगदीं प्रारंभापासून घालून दिली.

या तत्त्वनिष्ठेच्या कल्पनेला दृढता आणण्यासाठीं डॉक्टरांचे विचार सुरू असतां वाढत्या संघटनेसाठीं लागणारें धन कशा पद्धतीनें उभें करावें, असा प्रश्नहि डॉक्टरांपुढें उभा होता. सुदैवानें त्यांच्या मनमिळाऊ व लोकसंग्राहक वृत्तीमुळें त्यांनीं मागणी केल्यावर मित्रांकडून हां हां म्हणतां पैसे उभे राहत व तात्पुरती नड भागविली जाई. पण अशी चालचलाऊ पद्धति ही राष्ट्रव्यापी संघटना उभारण्याला योग्य नाहीं; त्यासाठीं विनासायास व वाढत्या प्रमाणांत पैशांचा ओघ संघटनेच्या कोषागाराकडे वाहत राहील, अशी टिकाऊ योजना केली पाहिजे, असें डॉक्टरांना सारखें वाटे. त्याचप्रमाणें उठल्यासुटल्या संघटनेसाठीं लोकांजवळ पैशाची याचना करण्यांत स्वतःच्या मनाला संकोच व कमीपणा वाटतो व आपण डॉक्टरांवर वा संघावर मोठे उपकार करीत आहोंत, असा भावहि साहाय्य देणाऱ्याच्या मनांत डोकावण्याची शक्यता असते, या कल्पनेनें डॉक्टर अस्वस्थ होत. झाडावर परिपक्व झालेलें फळ जितक्या सहजतेनें मातृभूमीच्या अंकावर पडतें वा श्रावण महिन्यांत अंगणांतील पारिजातकाच्या झाडाला थोडेंसें हालवितांच अति सुकोमल व सुगंधी फुलांची जितक्या सहजतेनें पखरण पडते, तसें एखाद्या संस्थेला लोकांच्या मनांतील आत्मीयतेनें द्रव्य मिळालें तरच तें संस्थेच्या व द्रव्यदात्यांच्या दृष्टीनें समाधानाचें व हितकर ठरतें. आत्मीयता व भक्ति यांतूनच ही गोष्ट साधूं शकेल, हें डॉक्टरांनीं हेरलें व देणाऱ्याच्या मनांत प्रसन्नता व समाधान उत्पन्न करून संघाचा धनकोषहि पुष्ट करणारी अशी गुरुदक्षिणेची पद्धति संघटनेंत त्यांनीं सुरू केली. आखूडशिंगी व बहुदुधी आणि कणभर खाऊन मणभर दूध देणारी गाय मिळणें जितकें दुर्मिळ व अवघड, तितकीच ही गोष्टहि अवघड होती. पण निरपेक्ष व अनन्य भक्ति ही कणभरहि न खातां मणभर दूध देणारी कामधेनु असते हें डॉक्टरांनीं ओळखलें होतें व त्याच उत्कट व अनन्य भक्तीची जोपासना त्यांनीं संघरूपानें अखंड चालविली होती. याचना न करतां देशव्यापी संघटनेला लागणारें धन राष्ट्रीय स्वयंसेवक संघाला अव्याहत मिळत राहिलें, याचें हेंच मर्म म्हणून सांगतां येईल. भगवा ध्वज सर्वांपुढें ठेवून हिंदूंच्या प्रवृत्ति व निवृत्ति, त्याग व भोग, अभ्युदय व निःश्रेयस् यांची सांगड घालीत जाणाऱ्या सहस्रावधि वर्षांच्या परंपरेची जशी त्यांनीं आठवण जागी केली, त्याचप्रमाणें आपण ध्वजांतील धाग्यांप्रमाणें राष्ट्राचे अंगभूत अवयव असून त्याच्या उत्कर्षांतच आपला उत्कर्ष आहे, अशी धारणा ठेवून प्रत्येकानें भक्तिभावानें आपलें कर्तृत्व 'इदं न मम' म्हणून

त्याच्या चरणीं अर्पण करण्यांतच जीवनाची सार्थकता आहे, असा संस्कारहि तरुणांच्या मनावर उमटविला.

आपल्या धर्मातील रूढीप्रमाणे आषाढांतील पौर्णिमा ही व्यासपूजनासाठीं वा गुरुपूजनासाठीं निश्चित केलेली आहे. या पौर्णिमेला सर्व स्वयंसेवकानी आपल्याजवळील धनाचा कांहीं भाग ' दक्षिणा ' म्हणून परम पवित्र ध्वजापुढें अर्पण करावा व त्याचे पुष्पानी प्रत्यक्ष पूजन करावे, अशी पद्धति १९२८ पासून त्यानीं संघात सुरू केली. तोपर्यंत व त्यानतरहि कांहीं वर्षे वर्गणीच्या रूपाने संघाची आर्थिक बाजू सांभाळली गेली. पण या नव्या पद्धतीने गरीब व श्रीमंत अशा दोघांनाहि त्याच्या त्याच्या परिस्थितींत अधिकाधिक जें अर्पण करता येणे शक्य असेल ते वाच्यता न करता देण्याची मोकळीक मिळाली. वर्गणीला चिकटणारी अधिकाराची कल्पना टाळूनहि कोणत्याहि कार्याला आवश्यक असणारे धन संघाच्या हाती येऊ लागले. दक्षिणा देताना कोणावरहि भार पडणार नाही व दिलेल्या धनामागे उपकाराची भावना रेंगाळणार नाही, अशा धोरणाने संघटनेत स्वीकारलेली गुरुपूजनाची पद्धति ही डॉक्टरांच्या सघटनकौशल्याची ठळक निशाणी होय.

प्रथमतःच डॉक्टरानी स्वयसेवकांना सागितले कीं, " उद्या गुरुपूजनाचा उत्सव साजरा होईल, तेव्हां ज्याने त्याने आपल्या श्रद्धेनुसार फुले व दक्षिणा घेऊन यावे. " या सूचनेने स्वयंसेवकात तर्कवितर्क लढविले गेले. कोणी म्हणाले, उद्या गुरु म्हणून आपणाला डॉक्टराचे पूजन करावयास मिळेल, तर कोणी अण्णा सोहोनींचे पूजन होणार, अशी अटकळ बाधली ! दुसऱ्या दिवशीं डॉक्टरानीं ध्वज उभारून झाल्यावर सर्वांना त्याचे पूजन करावयास सागतांना जे विचार माडले त्यामुळे सर्वांचा भ्रमनिरास होण्यास अवधि लागला नाहीं. डॉक्टरानी त्या भाषणात असे विचार माडले की, " राष्ट्रीय स्वयसेवक संघ हा कोणत्याहि व्यक्तीला गुरु न मानता पवित्र भगव्या ध्वजाला गुरु मानतो. याचे कारण व्यक्ति किती का महान् असेना, तिच्यात कमतरता राहू शकतात. शिवाय व्यक्ति ही नेहमी अढळ राहील अशी हमी देता येत नाहीं. तत्त्व हे मात्र अढळपदावरच आरूढ झालेले असते. भगवा ध्वज हा अढळ आहे. तो ध्वज पाहिल्याबरोबर राष्ट्राचा संपूर्ण इतिहास, सस्कृति आणि परपरा आपल्या डोळ्यांसमोर उभी राहते. जो ध्वज पाहिल्याबरोबर मन उचबळून विशिष्ट स्फूर्तीचा सचार मनात होतो, तो आपला भगवा ध्वजच आपल्या तत्त्वाचे प्रतीक म्हणून संघ गुरुस्थानीं मानतो आणि याच कारणावरून तो कोणत्याहि व्यक्तीला गुरुस्थानी ठेवू इच्छीत नाही. " या पहिल्या गुरुपूजनाच्या वेळी ८४ रुपये व काही आणे दक्षिणा ठेवली गेली व त्यांत विशेष म्हणजे एकानें अर्धा पैसा अर्पण केला होता ! गंगोत्रीजवळील लहान धारेप्रमाणे गुरुदक्षिणेचे हे बालस्वरूप पुढे विस्तारत लाखो रुपयांपर्यंत गेलें

आहे, एवढें सांगितलें म्हणजे डॉक्टरांच्या दूरदर्शित्वाची कल्पना आणून देण्यास पुरेसें होईल.

संघाचा प्रारंभ विजयादशमीच्या मुहूर्तावर झाला होता व प्रत्येक दसऱ्याला संघाच्या वाढीच्या दृष्टीनें गतवर्षीच्या सीमेचें उल्लंघन त्यानें करून दाखविलें होतें. या वर्षी दि. २३ ऑक्टोबरला दसरा येत होता. त्या वेळीं नागपुरांतून सैनिकी थाटाची मिरवणूक काढावी, असा डॉक्टरांनीं विचार केला व घोषविभाग (बॅण्ड) उभारण्यांत पुढाकार घेतला. जवळ जवळ पांचसहाशें स्वयंसेवकांची संचलनाच्या दृष्टीनें सिद्धता चालू होती. अशी दसऱ्याची सिद्धता चालू असतांना नामदार विठ्ठलभाई पटेल यांचें नागपूरला आगमन झालें व डॉक्टरांच्या विनंतीवरून दि. १६ ऑगस्टला त्यांनीं मोहिते संघस्थानाला भेट दिली. स्वयंसेवकांचें शिस्तबद्ध संचलन पाहून विठ्ठलभाईंना समाधान वाटलें. संचलनानंतर संघाची तोंडओळख करून देण्यासाठीं डॉ. मुंजे यांनीं असें सांगितलें कीं, "हिंदुस्थान कोणाचा या प्रश्नास तो आम्हां हिंदूंचा आहे, हें उत्तर युवक देतील अशी परिस्थिति उत्पन्न करणें हेंच या संघाचें कार्य आहे." यानंतर नामदार पटेल यांनीं अगदीं मोजक्या शब्दांत स्वयंसेवकांना मार्गदर्शन केलें. ते म्हणाले कीं, "ही चळवळ मला नवीन असून ह्यामुळें माझ्या विचारांना चालना मिळाली आहे. ह्या कार्याच्या राष्ट्रीय जीवनांतील स्थानासंबंधीं मी आज कांहींच मत देण्यास समर्थ नाहीं. पण एवढें मात्र सांगतों कीं, जगांत ईश्वराव्यतिरिक्त अन्य कोणासहि भिऊं नका व आपल्या कार्यावर अविचल निष्ठा ठेवून जोमानें कार्य वाढवा."

दसरा-उत्सवाची मिरवणूक हें त्या वर्षाचें वैशिष्ट्य होतें. त्या मिरवणुकींत साध्या पोषाखांत कांहीं संघप्रेमी नागरिकहि समाविष्ट झाले होते. तें दृश्य पाहून 'महाराष्ट्र' लिहितो कीं, "गेल्या विजयादशमीस राष्ट्रीय स्वयंसेवक संघाला तीन वर्षें पूर्ण झालीं. त्या मानानें संघानें केलेलें हिंदु तरुणांचें संघटन पुष्कळच भरीव झालें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं."

संघ-संस्थापनेनंतरच्या या दोन-तीन वर्षांत डॉक्टरांनीं नागपूर व वर्धा जिल्ह्यांत ठिकठिकाणीं पूर्वीं दडवून ठेवलेलीं शस्त्रास्त्रें नागपूरला एकत्रित केलीं. असें करतांना त्यांनीं ही गोष्ट सरकारच्या लक्षांत येऊं नये यासाठीं जशी दक्षता घेतली, त्याचप्रमाणें संघाच्या कोणत्याहि स्वयंसेवकाच्या हातीं तीं पडूं नयेत हेंहि पाहण्यास ते विसरले नाहींत. इंग्रजांसारख्या परकीय राज्यकर्त्यांच्या डोळ्यासमोर, शतकानुशतकांत उभारतां न आलेली हिंदुराष्ट्राची अभेद्य अशी संघटना जर उभी करावयाची असेल तर कांहीं पथ्यें हीं कटाक्षानें पाळलीं पाहिजेत, ह्याची तीव्र जाणीवच डॉक्टरांच्या या दक्षतेमागें वसत होती. त्यांचा शस्त्रांना मुळींच विरोध नव्हता; पण आपल्या देशांतील लोकांचीं अंतःकरणें हीं जाज्वल्य राष्ट्रभक्तीनें भारून त्यांचे परस्परांतील संबंध हे स्नेहमय व जीवन अनुशासनपूर्ण होईपर्यंत

नुसतीं शस्त्रास्त्रें कुचकामाची आहेत, याची त्यांना कल्पना होती. त्यामुळेंच त्या काळांतील विशिष्ट परिस्थिति ध्यानीं घेऊन त्यांनी स्वयंसेवकांना आपले सारे लक्ष लोकसंग्रहावर केंद्रित करण्यास सदैव उद्युक्त केलें. त्याच्या यासंबंधीच्या प्रतिपादनाचे स्वरूप ध्यानी आणून देणारा १९२८ मधील एक प्रसग उल्लेखनीय आहे.

संघाच्या दसरा महोत्सवात शस्त्रपूजन केले जाते. त्यासाठी साध्या लोखंडी तरवारी पूजिल्या जात. एकदां काही पंजाबी व्यापाऱ्यानी खऱ्या धारदार पोलादी तरवारी व जंबिये वर्धा येथे विकावयास आणले. ते पाहून दसऱ्याच्या शस्त्रपूजनासाठीं एक खरी तरवार घ्यावी, या कल्पनेने तेथील कार्यवाह श्री. बुराडे यानी तरवारीच्या किंमतीची चौकशी करून, ती विकत घेण्यास समति मिळविण्यासाठीं ते संघचालकांकडे गेले. योगायोगाने त्या दिवशीं पूजनीय डॉक्टर तेथेच होते. स्वाभाविकच त्याच्याजवळ हा विषय काढण्यात आला. त्या वेळी ‘ आपला समाज उत्तम शस्त्रसिद्ध असतानाहि पूर्वी परतंत्र का झाला ? ’ याचे विवेचन करून ते म्हणाले कीं, “ सर्व परिस्थितीचा विचार केल्यानतर, आज जर कोणत्या गोष्टीची नितात आवश्यकता असेल तर प्रत्येक हिंदूचे अंतःकरण राष्ट्रनिष्ठ होईल असा प्रयत्न करण्याची. अशी अंतःकरणे संपूर्ण देशात निर्माण झाल्यानतर त्याच्या हातात साधने चालत येतील व ते देश स्वतत्र करूं शकतील. ज्याप्रमाणे पाडवानी विशिष्ट कालपरिस्थितीचा विचार करून आपली आयुधे शमीवृक्षावर ठेवली, त्याप्रमाणे आपणहि तूर्त शस्त्राचा विचार न करता आपली सघटना देशव्यापी, एकसूत्री व शिस्तबद्ध कशी होईल, याचेच चितन करावे. ”

या वर्षींच्या आणखी काहीं घटना उल्लेखनीय आहेत. १९२८ च्या ऑक्टोबरमध्ये नागपूरला लोकमान्य टिळकाच्या पुतळ्याचे अनावरण करण्यात आले. हा समारंभ डॉ. अन्सारी याच्या हस्ते घडवून आणून नागपुरातील हिंदुराष्ट्रवादी गटाला खिजविण्याचा प्रयत्न त्या समितीवरील काही लोकानी जाणूनबुजून केला होता. या काळात डॉ. मुजे व बॅरिस्टर मोरूभाऊ अभ्यंकर या दोहोत फूट पडून नागपुरात दोन तट झगडूं लागले होते व त्याची झळ डॉक्टरांनाहि लागत असे. डॉक्टर हे डॉ. मुंजे यांच्या गटातील, अशी सर्वसामान्य समजूत होती व त्यामुळेच डॉ. मुंजे, डॉ. हेडगेवार व श्री. भवानीशंकर नियोगी याना या अनावरण-समारंभाचीं निमत्रणेंहि करण्यांत आलीं नसल्याने ते अनुपस्थित होते. कोणाच्याहि हस्ते का होईना पण लोकमान्याचा पुतळा उभारला गेला, या घटनेने डॉक्टराना अतिशय आनंद झाला होता. कारण लोकमान्य हे त्याच्या जीवनांतील एक प्रेरक राष्ट्रपुरुष होते. उद्घाटनाच्या वेळी आपणाला वगळण्यांत आले असले तरी आपलें कर्तव्य म्हणून डॉक्टरानीं दि. २७ ऑक्टोबरला सचलन करीत सर्व स्वयसेवकासह त्या पुतळ्याला मानवंदना दिली. त्या वेळच्या कार्यक्रमात डॉक्टर पूर्ण गणवेषांत उपस्थित होते व त्यांनीं

लोकमान्यांच्या गुणगौरवपर भाषणहि केलें. या मानवंदनेच्या कार्यक्रमांतील अनुशासन पाहून त्या वेळच्या नागपूरच्या आरक्षक दलाचे प्रमुख सरदार हरबानसिंग यांनीं प्रशंसोद्गार काढले होते, असें वृत्तपत्रांत उल्लेखित आहे.

ऑक्टोबरमध्यें संघ दाखविण्यासाठीं डॉक्टरांनीं मराठी ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांना आणलें असतां त्यांनीं कांहीं कार्यविषयक सूचनाहि केल्या होत्या. समाजांत मानमान्यता पावलेली व कोणत्याहि क्षेत्रांत आपापल्या अभिरुचीप्रमाणें कार्यरत असलेली व्यक्ति डॉक्टरांच्या संबंधांत आली म्हणजे तिला संघाची ओळख चर्चेतून व प्रत्यक्ष संघस्थानावरील कार्यक्रमांतून डॉक्टर अवश्य घडवीत असत. त्या व्यक्तीचा राजकीय पक्ष, त्याच्या मताचा कल, त्याची जात, त्याचा प्रांत या गोष्टी डॉक्टरांनीं कधींच पाहिल्या नाहींत. आपल्याच कल्पनेनें, इतरांचे आपणांशीं असलेले मतभेद हे मोठे करून त्या लोकांना भीतीनें वा मत्सरानें दूर ठेवण्याची वृत्ति सर्वसामान्यपणें दिसून येते. डॉक्टरांची वृत्ति या संबंधांत अगदींच निराळी होती. कोणत्याहि कारणानें हिंदु समाजांतील व्यक्तीला संघाची माहिती करून देण्याच्या दृष्टीनें ते अपात्र लेखीत नसत. कोणाचे मतभेद असले तरी त्याला बाजूला ठेवल्यानें ते कधींच दूर होणार नाहींत व यासाठीं मतभेद ऐकून घेण्याची व आपल्या कल्पनाहि त्याच्या कानांवर घालण्याची संधि ते दवडीत नसत. असें करण्यासाठीं दोन गोष्टींची आवश्यकता असते; एक तर कोणत्याहि तात्त्विक चर्चेत आपलें मत संपूर्णशः बरोबर असल्याचें तर्कशुद्ध पद्धतीनें पटवून देण्याचा आत्मविश्वास लागत असतो व दुसऱ्यानें आपल्या तर्कपद्धतींत दाखविलेले दोष वा उणीवा शांतपणानें ऐकून घेण्याइतकी तितिक्षा अंगीं असावी लागते. आपल्या हिंदुराष्ट्राच्या ध्येयवादावरील डॉक्टरांची निष्ठा ही असामान्य कोटींतील होती व दुसऱ्याचें म्हणणें अत्यंत शांतपणें ऐकून घेऊन, त्याचा मनोभंग होऊं न देतां, त्याला आपल्या कल्पना पटवून देण्यांत तर त्यांचा हातखंडा असे. त्यामुळेंच नामदार पटेल येवोत वा डॉ. केतकर येवोत, डॉक्टर त्यांचें सहर्ष स्वागत करीत.

गोरक्षण व गोसंवर्धन या कार्याविषयीं डॉक्टरांना सदैव आस्था वाटे. त्यामुळेंच श्री. गोपाळराव भिडे यांनीं नागपूरला गोरक्षण सभा काढली तेव्हांपासून त्यांनीं जमेल तें तें साह्य केलें होतें. नागपुरांतील मुसलमानांची गेल्या वर्षींच्या दंगलींत चांगलीच खोडकी मोडली होती तरीहि ते पुनः उठाव करणार, अशा कंड्या अधूनमधून उठत. अशा अस्थिर वातावरणांत गाईची मिरवणूक काढली तर पुनः कुरबूर सुरू होईल, असें दिसल्यावरून श्री. चौंडे महाराज यांनीं डॉक्टरांची भेट घेतली. त्या संबंधांत ते लिहितात, " हिंदुत्वानें विनटलेली डॉक्टरांची मूर्ति दिसतांच ' निर्विघ्नं कुरु मे देव ' असें मी त्यांना म्हणून सर्व वृत्तान्त त्यांच्या कानीं घातला. 'हिंदुस्थानांत नि गोमातेच्या कार्याला अडथळा, हें

कसे शक्य आहे ? ' असें म्हणून सरसंघचालकानीं आपल्या एका कार्यकर्त्यास बोलाविले. त्याला जी काय सूचना द्यावयाची ती आपल्या पद्धतीने दिली. ' मी मिरवणुकीस वेळेवर येतों, काही काळजी नसावी ' असें म्हणून आम्हाला त्यानी निरोप दिला. मी व डॉक्टर मुंजे आपापल्या निवासस्थानीं गेलो. अवघ्या अर्ध्या-एक तासाच्या अवधीत टिळक रस्त्यावरील आमच्या श्रीराममंदिरापुढे डॉक्टर हेडगेवारांची रामसेना हजार संख्येने जमलेली पाहून मला तरी तो एक चमत्कारच वाटला ! " यानतर ती मिरवणूक निर्विघ्नपणे पार पडली होती, हे सांगावयास नकोच.

संघ वाढत होता व १९२८ च्या शेवटीं नागपूर भागात संघाच्या एकूण अठरा शाखा चालू झाल्या होत्या, असा उल्लेख त्या वेळच्या पत्रात आढळतो. आतां अनेक स्वयंसेवक शालान्त परीक्षा ( मॅट्रिक ) उत्तीर्ण झाले होते व त्याना संघकार्याच्या दृष्टीने महाविद्यालयीन शिक्षण घेण्याचा आग्रह डॉक्टरानी सुरू केला होता. संघकार्यकर्त्यांने पदवीधर व्हावे यावर त्याचा विलक्षण भर असे. इतका कीं, एका भिक्षुकाच्या मुलाला त्यानी एम्. ए. व्हावयास उद्युक्त केले. ते त्याला वारंवार सागत कीं, " एम्. ए. होऊन मग मनमोकळेपणानें तूं खुशाल सत्यनारायणाची पूजा साग ! " नि तसे घडलेंहि ! इतक्या दिवस ' नोकरीसाठीं शिक्षण ' अशी धारणा असलेल्या विद्यार्थ्यांना डॉक्टरानीं संघकार्याच्या वृद्धीसाठीं नवी दृष्टि प्रदान केली. ती दृष्टि अशी होती की, हिंदु समाज द्रुत गतीनें सुसंघटित व बलवान् करण्यासाठी समाजाच्या दृष्टीने पदवी धारण करून प्रतिष्ठा प्राप्त करून घ्यावी व त्या बळावर समाजाच्या सर्व थरातून संघाच्या विचाराचे व कार्याचे लोण नेऊन पोचवण्यासाठीं उत्तम कार्यकर्ता म्हणून पात्रता वाढवावी. अशा स्वयंसेवकापैकीं ज्याना अन्य प्रातांतील विद्यापीठात जाऊन शिक्षण घेण्याची आर्थिक शक्यता असेल, त्यानीं संघप्रचाराच्या दृष्टीनें अवश्य जावे, असाहि काहीं जणांना त्यानीं आग्रह केला व त्यातूनच श्री. भय्याजी दाणी, श्री. बाबूराव तेलग व त्यानंतर श्री. तात्या तेलंग हे कार्यकर्ते बनारसला गेले. हेच प्रांताबाहेर पडलेलें सघाचे पहिले पाऊल !

डॉक्टर व त्यांचे सहकारी जगाच्या डोळ्यासमोर प्रसन्नतेने व उत्साहाने संघकार्यासाठीं अविरत प्रयत्न करीत होते. पण त्याच वेळीं त्यांच्या मनांत मात्र वादळी खळबळ चालू असेल, याची कल्पना कोणाला येऊं शकत नव्हती. प्रत्येक विषयात अत्यंत सावधानता व संयम ठेवण्याचा स्वभाव नसता तर १९२८ मध्ये सघाच्या बाल्यावस्थेतच डॉक्टरावर व संघटनेवर आलेल्या प्राणसंकटांतून मार्ग निघणे अशक्य होते. ती घटना अत्यंत रोमांचकारी आहे.

क्रांतिकाळातील शस्त्रसंग्रहाची निरवानिरव १९२१ पासून दबकत दबकत, तसेच कोठेंहि परिस्फोट होऊं न देतां १९२६-२७ पर्यंत चालूच होती. त्या

जिवावरील कामांत डॉक्टरांचा अनुयायी गंगाप्रसाद पांडे यानें केलेल्या कामगिरीचा उल्लेख मागें आलाच आहे. हा गंगाप्रसाद पंजाबांतील काम आटोपल्यावर नर्मदा-कांठीं आपल्या साधु झालेल्या भावाबरोबर तशाच वेषांत राहूं लागला होता. तेथें असतांना १९२७ मध्यें हुशंगाबादजवळ तो आजारी पडल्याचें कळलें. तेव्हां त्याला औषधोपचारासाठीं वर्ध्याला आणण्यांत आलें. त्या वेळीं त्याचा धाकटा भाऊ श्री. आनंदीप्रसाद हा वर्धा स्थानकाच्या पश्चिमेस दोन-तीन फर्लोगां-वर असलेल्या गोरक्षणसंस्थेंत नोकरीला होता. तेव्हां ही सरकारच्या डोळ्यांत खुपणारी स्वारी गांवापासून दूर असलेली चांगली, या कल्पनेनें त्याची भावाकडेच नीट व्यवस्था करून देण्यांत आली. या वेळींहि संन्यासी वेषांतच तो असे. पण वरून साधुत्वाचा गेरुवा रंग दिसत असला तरी क्रांतिनिष्ठेच्या ज्वाला त्याच्या हृदयांत धगधगत होत्या. इतकी दक्षता घेऊनहि जर केव्हां उघडकीला येण्याचा प्रसंग गुदरला तर शत्रुपक्षांतील लोकांना कण्ठस्नान घालून आपणांला निसटतां यावें, यासाठीं शस्त्रांची निरवानिरव केल्यानंतरहि गंगाप्रसादानें आपल्या भगव्या कफनींत पिस्तुल, काडतुसें व बिचवा सिद्ध ठेवला होता.

असें अज्ञातवासांत आजाराशीं झुंज देणें सुरू असतां त्याचा एक स्नेही त्याच्या शुश्रूषेसाठीं व केव्हां केव्हां समाचारासाठीं तेथें येत असे. अर्थात् त्याला ही पिस्तुलाची चाहूल लागलेली होती. त्यानें गंगाप्रसादाचें पिस्तुल उत्सुकतेनें एकान्त पाहून कधीं कधीं हाताळूनहि पाहिलें होतें. मित्रच असल्यानें स्वाभाविक असलें तरी गंगाप्रसादानें अज्ञात अवस्थेंत इतकी सलगी करूं देणें योग्य नव्हतें.

एके दिवशीं वार्ता येऊन थडकली कीं, हिंगणघाट स्थानक कांहीं अज्ञात व्यक्तींनीं लुटलें असून त्या लुटींत पिस्तुलाचाहि उपयोग लुटारूंकडून करण्यांत आला. 'खाई त्याला खवखवे' या न्यायानें ही वार्ता ऐकतांच गंगाप्रसाद चपापला व त्यानें आपली कफनी चांचपून पाहिली! पण पिस्तुल व काडतुसें तेथें कशीं असणार! तीं जाग्यावर नाहींत, हें ध्यानीं येतांच तो गांगरून गेला व त्या स्थितींतच तो स्नेह्याकडे जाऊन तें पिस्तुल व काडतुसें घेऊन गेल्या पावलीं परत आला. तें पिस्तुल हातीं पडल्यावर, जिवांत जीव येऊन, गंगाप्रसादानें अत्युग्र रूप धारण करून त्याला धमकी दिली कीं, "ध्यानांत ठेव कीं, या पिस्तुलाची कोठें वाच्यता करशील तर माझ्याशीं गांठ आहे!" त्यानंतर हायसें वाटून तो भावाकडे परत आला. एक मोठी अनर्थ परंपरा टळली होती, ही गोष्ट खरीच होती.

हिंगणघाटच्या प्रकरणांत ज्या गोळ्या सांपडल्या त्यावरून सरकारला पिस्तुलाच्या प्रकाराची कल्पना आली. सर्व सरकारी खात्यांतून डॉक्टरांचे हित-चिंतक व हस्तक असत व त्यांच्याकडून या प्रकरणीं कोणाकोणावर करडी दृष्टि ठेवण्याची आज्ञा सुटली आहे, याचा दुसऱ्याच दिवशीं सुगावा लागला व त्यांत त्यांचा अंतर्भाव सर्वप्रथम केलेला होता हें ध्यानीं आलें. वर्ध्याला गंगाप्रसादची

स्वारी होती व त्याचा क्रांतिप्रवण स्वभाव डॉक्टरांच्या पूर्ण परिचयाचा होता. तेव्हा ही हिंगणघाटची घटना कळताच डॉक्टरासमोर एकदम त्याची मूर्ति उभी राहिली. आपल्यावर व आपल्या ठिकठिकाणच्या सहकाऱ्यांमागे गुप्तचराचा वाढता ससेमिरा असल्याने या प्रकरणाचा छडा लावताना एखाद्या वेळी गंगाप्रसादाजवळ कांही हत्यार सांपडले तर इतक्या अंधारात ठेवलेला शस्त्रसाठा व क्रातिकारकांची प्रभावळ उघडकीस येण्याची शक्यता डॉक्टरांना स्पष्ट दिसूं लागली. आपल्या इतर अनुयायानी घरात अशी ' संशयास्पद वस्तु ' वा कागदपत्र उरूं दिले नसेल, याची डॉक्टराना पुरेपूर खात्री होती. पण गंगाप्रसादाचा साहसी पण हट्टी स्वभाव व जिवावर उदार होण्याची सिद्धता ध्यानीं घेता त्याच्याकडून मात्र दक्षता घेतली गेली नसेल, अशी दाट शका डॉक्टराना येणे स्वाभाविक होते. अशा वेळीं नीट विचार करून डॉक्टर, नागपुरात कोणाला कोठे जातो, हे न सागताच निघाले व या घटनेच्या तिसऱ्या दिवशीं रात्रीं साडेआठच्या सुमारास वर्ध्याला श्री. आप्पाजी जोशी याच्याकडे येऊन प्रविष्ट झाले. त्याच्या घरासमोरहि हेर घुटमळतच होते व त्यानी डॉक्टर हेडगेवार आल्याचे पाहिले होते. त्या प्रातात डॉक्टर हे आता सर्वांच्या परिचयाचे झालेले असल्याने असे होणे अशक्य नव्हते.

डॉक्टरानी शांतपणाने श्री.आप्पाजींकडून वर्ध्याचे वातावरण व गंगाप्रसादाचा ठावठिकाणा यासंबंधीं माहिती विचारून घेतली. सर्व परिस्थिति समजून घेतल्यावर डॉक्टराना गंगाप्रसादासबंधींची वाटणारी शंका अधिक सबळ दिसूं लागली व ते आप्पाजींना म्हणाले कीं, " आपण आता वेळ न गमावता त्याला जाऊन भेटून येऊ ! " डॉक्टराची निकड दिसत होती व घराभोंवती घुटमळणारे हेरहि आप्पाजीना विसरता येणे शक्य नव्हते. तेव्हा ते म्हणाले की, " आपल्यावर लक्ष आहे तर कशाला जा ? " पण आप्पाजींचें वाक्य पुरे होण्याच्या आतच ' झडतीत त्याच्याजवळ काहीं सांपडले तर ? ' असे म्हणत डॉक्टर उठले व पुन्हा ' चला ' म्हणत निघालेहि !

रात्रींच्या गडद अंधकारांतून ते दोघे वर्धा स्थानकापलीकडील गंगाप्रसादच्या निवासाकडे येऊन पोहोंचले. आपल्यामागे कोणीतरी लक्ष ठेवीत येणार, याची त्यांना कल्पना नव्हती असे नाही. पण आपण उभारीत असलेल्या राष्ट्रव्यापी संघटनेच्या हिताच्या दृष्टीनें आपण व आपले सहकारी हे असल्या उत्पाती प्रकरणात गोवले जाण्याची शक्यता त्याना उरूं द्यावयाची नव्हती. ज्या संघटनेसाठीं त्यानीं आपलें जीवन देण्याचा निर्धार पवित्र ध्वजासमोर केला होता, त्याच सघटनेवर परक्या सरकारचे गंडातर येण्याची शक्यता दिसत असता, डॉक्टरांनीं जाणूनबुजून असे पाऊल उचलणें स्वाभाविक होते.

निवासापासून वीस-पंचवीस पावलावर एक कडुनिंब होता. त्याच्या ओट्यावर डॉक्टर बसले व ' असतील तीं हत्यारे घेऊन बाहेर चल ' असें

सांगण्यासाठीं त्यांनीं आप्पाजींना आंत पाठविलें. अशा अंधाऱ्या रात्रीं आप्पाजींन समोर पाहून गंगाप्रसादला ते कां आले असतील याची कल्पना आली व आप्पाजींनीं डॉक्टरांचा आदेश विदित करतांच तो पिस्तुल घेऊन बाहेर आला व त्यानें डॉक्टरांच्या हातांत पिस्तुल दिलें. पण त्यांच्या हातांत पिस्तुल पडतें न पडतें तोंच एका अज्ञात व्यक्तीनें डॉक्टरांचें पोलादी मनगट पकडलें व 'कसें नेमकें धरलें !' असे त्या अज्ञात व्यक्तीचे आनंदोद्गार कानीं पडतात न पडतात तोंच डॉक्टरांनीं चपळाई करून तें पिस्तुल आप्पाजींच्या हातांत दिलें आणि धिटाईनें त्या गुप्तचराचे दोन्ही हात पकडून त्याला त्यांनीं मनसोक्त सडकून काढण्यास प्रारंभ केला ! तो गुप्तचर गयावया करून, 'मला सोडा ! पायां पडतों ! मी झाला प्रकार सांगणार नाहीं !' असें म्हणूं लागतांच डॉक्टर दोन्ही मोकळे हात दाखवून त्याला विचारतात, "पहा ! पहा ! आहे का माझ्याजवळ कांहीं ?" असा 'हात दाखवून' झाल्यावर डॉक्टर त्याला तेथेंच सोडून निघून गेले.

ही झटापट सुरू होतांच आपला साधुत्वाचा सोटालोटा घेऊन गंगाप्रसाद सिंदीकडे सटकला व आप्पाजीहि त्या अंधारांतून कोठें पसार झाले, तें त्यांचें त्यांनाच माहीत ! तो बिचारा गुप्तचर कण्हत कण्हत व लंगड चौकीवर येऊन पोंचण्यापूर्वींच डॉक्टर वर्ध्यांतील श्री. मनोहरपंत देशपांडे यांच्या दाराशी 'भाऊसाहेब ! भाऊसाहेब ! !' अशा हांका मारीत दार ठोठावीत होते. रात्रीं बारा वाजून गेले असल्यानें दार उघडतांच, 'आपण आज कुठें आला होता ?' असा देशपांडे यांनीं प्रश्न केला. तेव्हां डॉक्टरांनीं अगदीं नेहमींच्याच मोकळेपणानें उत्तर दिलें कीं, "आनंदीप्रसाद आजारी होता, त्याला पाहण्यासाठीं आलों होतों."

कडुलिंबाखालील प्रकारानंतर डॉक्टर आप्पाजींकडे जाणून बुजून गेले नाहींत. कारण त्या गुप्तचरानें अंधारांतहि जर आप्पाजींना ओळखलें असलें तर आपण लगेच त्यांच्याकडे गेल्यानें ओघानेंच उघडकीस येऊं, अशी शक्यता डॉक्टरांना दिसत होती. थोडा वेळ मनोहरपंतांकडे थांबून डॉक्टर पहाटेच्या गाडीनें नागपुरास गेले व पुन्हा सकाळीं नेहमींच्याच सहजतेनें सर्वत्र वावरूं लागले. संघटनेवरील एक प्राणसंकट टळल्याचा आनंद कोणाजवळ व्यक्त करणेंहि डॉक्टरांना त्या काळांत शक्य नव्हतें. आज तो आनंद व्यक्त करण्याचें भाग्य माझ्या लेखणीला मिळत आहे ! मार खाल्लेल्या हेरानें कडुलिंबाखालील कडु प्रकार चौकींत निवेदन केला, पण हातचें सावज गेलें, अशी चुळबुळ करण्यापलीकडे त्यांच्या हातांत काय उरलें होतें ?

या विलक्षण घटनेनंतर पिस्तुलांच्या शंकेनें सरकारची संघाशीं वागण्याची पद्धति अधिकाधिक जाचक होऊं लागली. आरक्षकांचा व गुप्तचरांचा त्रास

इतका वाढला होता की, डॉक्टर व आप्पाजी जोशी आदि प्रमुख संघकार्य-कर्त्यांच्या घरीं जाण्याची लोकांना भीति वाटूं लागली. उघड खटला भरलेला पुरवला, पण हे नेहमींचे लोढणें गळ्यात नको, असे वाटू लागले असल्यास नवल नव्हते. त्या वेळी मध्यप्रातांत ना. तांबे हे प्रांताधिपति होते. त्याच्याकडेहि यासबंधी कांहीं लोकांनीं स्वयंस्फूर्तीने विचारणा केली की, 'अशा प्रतिष्ठित लोकावर पहारा कां?' वर्ध्याच्या जिल्हाधिकाऱ्यांनाहि काहींजण जाऊन भेटले. त्या वेळी आप्पाजी हे मध्यप्रांत कॉंग्रेसचे कार्यवाह व अ. भा. कॉंग्रेस कार्यकारिणीचे सदस्य होते. तसेच वर्ध्यातील अनेक सार्वजनिक संस्थांशी पदाधिकारी या नात्याने त्याचा घनिष्ठ संबध असे. त्यामुळे काही जणाना हाच जाच असह्य वाटून त्यानीं अधिकाऱ्यांना जाऊन छेडणें हे स्वाभाविकच म्हणावे लागेल. श्री. गोविंदराव चरडे वकील यानी तर जिल्हाधिकाऱ्यांकडे जाऊन 'हा काय तमाशा चालविला आहे? प्रतिष्ठित माणसांच्या मागे ससेमिरा का?' अशा शब्दात विचारणा केली. त्यावर 'मोठे लोक दरवडे घालूं लागले तर?' असा जिल्ह्याच्या आरक्षाधिकाऱ्याने खोचक प्रश्न केला. तेव्हा क्षणाचा विलंब न लावता चरडे गरजले की, 'तुम्ही कांहीतरीच सांगतां! खरेच तसे असेल तर त्याना सरळ पकडा नि खटला भरा. निदान त्यांची भेट घ्या."

यानंतर श्री. आप्पाजींची जिल्हाधिकाऱ्यानीं भेट घेतली. पण त्यातून एकूण संवादाच्या शेवटी आप्पाजींवर अधिकाऱ्यानीं आरोप केला कीं, "सारीं घातक हत्यारे तुमच्याजवळ आहेत व तशी आम्हाला माहिती मिळाली आहे." त्यावर लगेच 'ती नुसती माहिती काय कामाची? सरळ झडत्या घ्या व खटले भरा' अशी आप्पाजींनीं मागणी केली. 'तिथें तर नडते आहे! भोळ्या लोकाजवळ सामान सापडेल, पण तुमच्याजवळ नाहीं!' अशी अगतिकता अधिकाऱ्यानीं व्यक्त करतांच आप्पाजींनीं खोचक प्रश्न केला कीं, "हे जर खरे असेल तर पहारा ठेवून आमच्याजवळ असलेले सामान सापडेल काय? तेव्हा हा जो तमाशा चालविलेला आहे तो थाबवा!"

या अशा घडलेल्या भेटीचे फलित म्हणजे डॉक्टर व आप्पाजी याच्यामागे असलेला ससेमिरा थाबला. याच वेळी हिंगणघाट खटल्यातील आरोपींची चौकशी पुरी होऊन त्यांना शिक्षाहि झाल्या. त्यामुळे परिस्थिति थोडीशी निवळली असे दिसूं लागले.

* * *

## १६ : सरसंघचालक

कोणत्याहि स्वयंसेवकांत एखादा गुण आढळून आला तर त्याच्या गुणाला प्रोत्साहन देण्याचा डॉक्टरांचा स्वभाव होता. त्याच स्वभावानुसार त्यांनीं विद्यार्थि-दशेंत असलेल्या प्रा. सावळापूरकर यांना ' भगवा ध्वज हाच हिंदुराष्ट्राचा ध्वज असला पाहिजे ' या विषयावर एक लेख लिहिण्याची सूचना केली. तो लेख लिहून होतांच डॉक्टरांनीं तो पाहून त्यांत स्वतःचे कांहीं शोध घातले व कांहीं वाक्यें काढून तो ' श्रद्धानन्दा 'कडे प्रसिद्धीसाठीं पाठविला. त्याप्रमाणें राष्ट्रीय वाङ्मयाच्या प्रकाशनासाठीं नागपुरांत १९२८ मध्यें ' अभिनव ग्रंथमाला ' सुरू करण्यांत आली. त्या कार्यारंभींहि डॉक्टरांनीं दहा रुपये देणगी देऊन त्या मालेला आपला आशीर्वाद दिला होता.

संघांत बाल व शिशु यांना प्रवेश देण्याच्या डॉक्टरांच्या धोरणाशीं त्यांचे मित्र श्री. अण्णा सोहोनी हे सहमत नव्हते. त्यांत संघाला जोडून एक आखाडा चालवावा, असा आग्रह त्यांनीं सुरू केला. त्यावर डॉक्टरांचें म्हणणें असें पडलें कीं, समाजांत आज अनेक आखाडे आधींच अस्तित्वांत असून त्यांत आपण अधिक भर न घालतां आपल्या स्वयंसेवकांनीं असलेल्या आखाड्यांतच जाऊन तेथील वातावरणांत चैतन्य खेळवावें व तेथें केलेल्या मैत्रींतून संघाला नवीन तरुणांची जोड मिळवून द्यावी. शिवाय आपला संघ हा सर्व देशांत प्रसृत करायचा असल्यानें सर्व ठिकाणीं आपण ज्या गोष्टी सहजगत्या उभ्या करूं शकूं, त्यांचाच अंतर्भाव संघाच्या कार्यक्षेत्रांत केला पाहिजे; त्या दृष्टीनें आखाडा हा युक्त नाहीं. पण या बारीकसारीक मतभेदांतून १९२९ च्या आगेमागें अण्णा सोहोनी प्रत्यक्ष संघकार्यांतून दूर झाले. मात्र या ठिकाणीं दोन गोष्टींचा उल्लेख केला पाहिजे. यांतील एक म्हणजे सोहोनी कार्यांतून बाजूला झाले तरी त्यांची व डॉक्टरांची वैयक्तिक मैत्री दुरावली नव्हती. ते एकमेकांकडे जात-येत असत व मन-मोकळ्या गप्पाहि करीत. दुसरी गोष्टहि कार्याच्या दृष्टीनें अत्यंत उल्लेखनीय आहे. सामान्यतः संस्थेंत मतभेद झाला म्हणजे एक गट फुटून निघून मूळच्या संस्थेशीं अटीतटीनें केवळ स्पर्धाच नव्हे तर तिला विरोध करूं लागतो; पण सोहोनींनीं हा वाममार्ग मुळींच चोखाळला नाहीं. उलट शेवटीं वार्धक्यांत अर्धांग होऊन पडल्या-वरहि त्यांच्या मनांतील डॉक्टरांविषयींचें प्रेम कसें प्रकट होई, हें मीं प्रत्यक्ष

अनुभवले आहे. आपल्या तरुणपणांतील एक जुनीपुराणी दैनंदिनी काढून तिच्यांत समोरासमोरील दोन पानावर अनुक्रमे डॉक्टर व सोहोनी या दोघाच्या लिहिलेल्या जन्मकुंडल्या त्यांनी मला दाखविल्या. त्या वेळीं ' ही पहा केशवची कुंडली ! ' असे अर्धांगामुळे अडखळणाऱ्या जिव्हेतून वाक्य उद्गारतांना कै. डॉक्टराच्या स्मरणाने त्याचे डोळे ओलावून गेले होते !

सार्वजनिक व खाजगी अशीं दोन अंगे सामान्यपणे प्रत्येकाच्या जीवनाला असतात. डॉक्टराच्या संबंधात मात्र असा भेद दाखविणे हे खरोखरच अवघड होते. त्याच्या घरांत चालणाऱ्या भेटीगांठी व बैठका या तर खाजगी म्हणता येणे अशक्यच होते. त्याचे सर्व जीवनच समाजाइतके व्यापक झालेले असल्याने घरांत असोत वा समाजात असोत सर्व ठिकाणीं ध्यास काय तो देशाचाच असावयाचा. सावनेरचे त्यांचे मित्र श्री. नानासाहेब आबोकर अशासारख्यानी गळ घातली म्हणजे ते नाटक वा चित्रपट पाहावयास जात. पण त्यात मित्राचे मन मोडायचे नाहीं, असाच विचार असे. आबोकरानीं एकदा फारच आग्रह केला असता ते म्हणाले होते कीं, " मला या गोष्टींची आवड नाहीं असे का वाटते ? त्याने मनाला विरंगुळा पडतो हे खरे. पण एक तर कामामुळे वेळ होत नाहीं व दुसरे म्हणजे सध्याचा काळ हा अशा गोष्टीत दवडण्यासारखा नाही. तो फार मोलाचा आहे. "

पण असा मोलाचा वेळ जेव्हा ते एखाद्या गायन-वादनासारख्या कार्यक्रमासाठी लोकाग्रहास्तव देत असत, त्या वेळींहि आपल्या तेथील केवळ अस्तित्वाने होतकरू तरुणांना ते संघानुकूल केल्यावाचून राहत नसत. १९२९ च्या जानेवारीमध्ये नागपूरमधील अभिनव सगीत विद्यालय, भारत गायन समाज व चतुर संगीत विद्यालय या तीन संस्थातील विद्यार्थ्यांचा गायनाचा कार्यक्रम व्यकटेश चित्रपटगृहांत झाला. त्या कार्यक्रमाला डॉक्टर गेले होते. त्या वेळी त्यांनीं गायनासंबंधीं जो अभिप्राय लिहून दिलेला आहे त्यात ते म्हणतात की, " ......या तीन संस्थांच्या मुलांचीं त्या ठिकाणीं गाणीं झालीं. तज्ज्ञ लोक गायनशास्त्राच्या दृष्टीने आपलीं मते देऊं शकतील. परतु त्या विषयात तज्ज्ञ नसलेल्या माझ्यासारख्याच्या मनावर श्री. प्रभाकर व यादव जोशी या दोन मुलाच्या गाण्याचा विलक्षण परिणाम झाला. मला गाणे ऐकण्याची आजपर्यंत विशेष आवड नव्हती. परंतु त्या मुलांचे गायन कितीहि वेळ ऐकले तरी ते आणखी ऐकावेच, असें त्या दिवसापासून मला वाटूं लागलें आहे. श्री. शंकरराव प्रवर्तक ह्याच्या ठिकाणीं जी शिक्षणाची विशेष हातोटी आहे, त्याचाच हा परिणाम आहे. शिवाय राष्ट्रीय विचार गद्यांतून ऐकण्यापेक्षां पद्यांतून ऐकण्याची लोकाना फार आवड असते व त्याचा लोकांच्या अंतःकरणावर परिणामहि फार चांगला होतो. म्हणून राष्ट्रीय दृष्टीनेंहि ह्या संस्थेची अत्यंत आवश्यकता आहे. संस्थेचे चालक हे गायनाच्या ह्या बाजूकडेहि लक्ष देतील, अशी मला आशा आहे. "

या अभिप्रायांत राष्ट्रीय विचारांच्या प्रचारासाठीं गायनाचा उपयोग करण्याकडे लक्ष पुरवा असें मार्गदर्शन तर त्यांनीं केलेंच होतें, पण दोन तरुण गायकांची त्यांनीं मुक्तकंठानें वास्तव स्तुति करून त्यांनाहि राष्ट्रीय विचारांच्या परिघांत खेचण्यास प्रारंभ केला होता असेंच म्हणणें युक्त ठरेल. या प्रसंगानें त्या दोन गायकांतील श्री. यादवराव जोशी यांचा डॉक्टरांशीं विशेष परिचय झाला व त्या परिचयाचें पर्यवसान असें झालें कीं, संघ हेंच यादवरावांचें जीवन-संगीत होऊन बसलें ! डॉक्टरांच्या सुरांतच त्यांनीं आपला सूर कायमचा मिळवून टाकला. यादवरावांसारख्यांचा कण्ठ डॉक्टरांना गोडी लावणारा असला तरी अशा असंख्य गुणी कलावंतांना वेड लावण्याचें सामर्थ्य डॉक्टरांच्या लोभस व्यवहारांत व अकृत्रिम स्नेहांत होतें, असाच निर्वाळा काळानें दिला आहे.

या काळांत डॉक्टर हे मध्यप्रांताच्या कॉंग्रेसच्या कार्यकारिणीचे सदस्य असल्यानें १९२८ च्या शेवटीं झालेल्या कलकत्ता येथील वार्षिक अधिवेशनालाहि ते उपस्थित राहिले होते. त्याच वेळीं त्यांची नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्याशीं प्रदीर्घ भेट होऊन देशाच्या परिस्थितीवर विचारविनिमय झाला होता. त्या भेटी-संबंधीं डॉक्टरांच्या बोलण्यांत केव्हां उल्लेख आला कीं हिंदु-मुसलमान ऐक्याची भाषा फोल आहे हें उमजूनहि त्या भोवऱ्यांतून सुभाषचंद्रांसारखा कर्तृत्ववान् व त्यागी देशभक्त बाहेर पडूं शकत नाहीं याचें सखेदाश्चर्य ते व्यक्त करीत. या भेटीच्या वेळीं क्रांतिकारक श्री. बाबाराव सावरकर हेहि त्यांच्या समवेत होते. या भेटीनें परस्परांचा जवळून परिचय झाला व दोघांच्याहि विचारांतील साधर्म्य अधिक ध्यानांत आलें. या वेळीं जडलेला स्नेह शेवटपर्यंत अतूट होता हें सांगावयास नकोच.

या कॉंग्रेस अधिवेशनाहून परत आल्यावर डॉक्टरांनीं त्यांच्या टांचण-वहींत तेथील स्वयंसेवकांच्या शिस्तीसंबंधीं व एकूण व्यवस्थेसंबंधीं आपलें अभिमत टिपून ठेवलें आहे. ते लिहितात कीं, " ......यंदां कलकत्ता कॉंग्रेसमध्यें स्वयंसेवकांची संख्या तीन हजारांचे वर होती. स्वयंसेवक खात्याकरितां पासष्ट हजार रुपये खर्च करण्यांत आला होता. पण स्वयंसेवकांची शिस्त असावी तशी नव्हती. कॉंग्रेसच्या मंडपांत विशेष गर्दी नसूनहि त्यांना व्यवस्थेचें काम चांगलें करतां येत नव्हतें, म्हणून एक वेळ सर्व स्वयंसेवकांना मंडपांतून काढून घ्यावें लागलें. " हें डॉक्टरांनीं केलेलें निरीक्षण आपण हातीं घेतलेल्या संघटनेंत अशीं वैगुण्यें राहूं नयेत या दृष्टीनेंच केलेलें होतें. त्यामुळें दुसऱ्याचे दोष बोलून दाखवून नसती प्रतिष्ठा व ऐट मिरविण्याचा प्रकार त्यांनीं चुकून केला नाहीं. अखंड निरीक्षण करीत असावें व समाजाला आवश्यक तें वळण व घाट देण्यासाठीं कसे संस्कार करावेत, कोणतीं पथ्यें सांभाळावींत, याची अचूक व परिणामकारक पद्धति शोधून काढण्यावरच यांची दृष्टि असे.

या अधिवेशनाहून परततांना दि. ६ जानेवारीला ते खडकपूर येथे होते. त्या ठिकाणी त्यानीं आपल्या मित्रांच्या साह्याने प्रतिष्ठित मंडळीची बैठक घेऊन संघाच्या विचारसरणीचे बीजारोपण केले. त्या ठिकाणच्या वास्तव्यात त्यानीं ‘ हिंदी नवयुवक राष्ट्रीय संघ ’ या नांवाने चालणाऱ्या सस्थेतील तरुणांशींहि विचार विनिमय केला होता, त्यासंबंधीं ते लिहितात की, “...... तीस-चाळीस सभासद उपस्थित होते ..... एकदर परिस्थिति समजावून सागितली. नवयुवक संघाची परिस्थिति समाधानकारक नाही.”

या वर्षीं सघाचे कार्य सर्वत्र पसरू लागले व या वाढत्या उत्साहाला साजेशी संघटनेला आवश्यक असलेल्या साधनाची उभारणी डॉक्टरानीं सुरू केली. शाखावर स्वयसेवकाची सख्या भरघोस असे व संचलनाचा कार्यक्रमहि मोठ्या शिस्तीने होई. पण चित्राला पार्श्वभूमि असल्यावाचून जसा उठाव नाही, तशीच स्थिति घोष ( बॅण्ड ) नसल्यास सचलनाची होत असते. ही उणीव तुटपुंज्या आर्थिक स्थितींत स्वयसेवकांनीं भरून काढण्याचा यत्न स्वयप्रेरणेने सुरू करून दोन वर्षे झाली होतीं. तरी समाधानकारक संच उभा राहिला नव्हता. अनेक वेळा तर सेनापतीलाच ‘ बिगुल ’ फुकावा लागे ! या वर्षीं डॉक्टरानी पैशाची जमवा-जमव करून घोषाचे साहित्य विकत घेतले व घोषपथक उभे करण्यासाठीं तरुणाची निवड करून त्याना एका भारतीय खिश्चन वादनपटूकडून शिक्षण देण्यास प्रारंभ केला. हा शिक्षक मिळवून देण्यासाठी श्री. व्हिव्हियन बोस व डॉक्टराचे एक स्नेही बॅरिस्टर गोविंदराव देशमुख यानी प्रयत्न केले होते.

राष्ट्रीय स्वयसेवक सघाच्या रूपाने अगदी कट्टर हिंदुराष्ट्रवादी तरुण उभे राहत होते तरी इतर धर्मीयाचा द्वेष ही कल्पना त्याना दिली जात नव्हती. इतरापासून राष्ट्रोपयोगी असलेली साधने वा ज्ञान, यत्र वा तंत्र हे आत्मसात् करून जगातील राष्ट्राराष्ट्रामध्ये चाललेल्या चढाओढींत आपण अग्रगण्य ठरले पाहिजे, एवढी एकच आकाक्षा त्यामागे असे. जीवनोपयोगी ज्ञानाचा व साधनाचा स्वीकार करताना सोवळे-ओवळे व आपपर असा भेदाभेद करून चालत नसते, हे प्रगमनशील तत्त्वज्ञान डॉक्टरांच्या व्यवहारमालिकेत सूत्राप्रमाणे असे व त्यामुळेच खिश्चन शिक्षक व पाश्चात्य सुरावट या दोन्ही गोष्टी सघाला चालल्या. पण एकदा ती विद्या आत्मसात् केल्यावर तिचा विकास करून, त्या विद्येला भारतीय स्वरूप देण्याचा प्रयत्नहि संघाच्या स्वाभिमानी प्रवृत्तींतून झाला आहे, हे येथे सागणे आवश्यक आहे. संचलनासाठीं ठेका देणाऱ्या निरानिराळ्या चाली किवा रचना ( marches ) या प्रारंभी पाश्चात्याच्या उचलल्या गेल्या असल्या तरी आता मात्र भारतीय रागदारीवर आधारलेल्या तितक्याच आकर्षक रचना संघ-स्वयंसेवकानीं बसविल्या आहेत. आवश्यक तेथे जगातील कोणाचाहि आधार अवश्य घ्यावा, पण लहान मुलाने पायात त्राण येईपर्यंत पांगुळगाडा

घ्यावा इतक्याच बेतानें ! हीच मर्यादा संघानें कृतींतून दाखविली आहे असेंच म्हटलें पाहिजे.

प. पू. डॉक्टर १९२८ च्या कलकत्ता काँग्रेसच्या अधिवेशनाहून परत आल्यावर थोड्या दिवसांनीं लाहोरच्या सॉंडर्स या इंग्रज अधिकाऱ्याला कंठस्नान घातलेले श्री. राजगुरु भूमिगत स्थितींत नागपुरास आले. त्यांची व डॉक्टरांची बरीच ओळख होती. एक-दोन वर्षांपूर्वीं राजगुरु हे नागपूरच्या भोंसला वेदशाळेंत राहून वेदाध्ययन व भिक्षुकी करीत असतां मोहिते वाड्यांतील संघशाखेवर येत असत व त्यामुळें त्यांचा व डॉक्टरांचा चांगलाच परिचय होता. एवढेंच नव्हे तर श्री. भाऊजी कावरे विद्यमान असतांना एकदां सरदार भगतसिंग हे त्यांना व प. पू. डॉक्टरांना भेटून गेल्याचें श्री. नारायणराव देशपांडे ( आर्वी ) व श्री. व्यंकट नारायण सखदेव ( नागपूर ) अशा कांहीं जणांना निश्चित आठवतें. ही त्या वेळीं डॉक्टरांशीं झालेली भेट वर्ध्याचे श्री. गंगाप्रसाद पांडे यांच्या ओळखीनें घडली होती.

श्री. राजगुरु नागपूरला येण्यापूर्वीं कलकत्ता काँग्रेसच्या वेळीं श्री. बाबाराव सावरकर व डॉक्टर यांना तेथें भेटले असण्याचीहि शक्यता वाटते. १९२९ च्या प्रारंभीं राजगुरु नागपूरला आल्यावर त्यांची व्यवस्था करण्यांत ज्यांनीं पुढाकार घेतला होता, त्यांत प. पू. डॉक्टरहि होते. एवढेंच नव्हे तर भूमिगत असतांना राजगुरूंनीं पुणें भागांत जाऊं नये, असा आग्रह डॉक्टरांनीं केला व त्यांची उमरेडचे श्री. दाणी यांच्या दूरच्या एका शेतावर राहण्याची व्यवस्था करण्याचें योजलें. पण अशी योजना चालू असतांना राजगुरूंनीं डॉक्टरांचा आग्रह डावलून नागपूर सोडलें व पुढें ते पुण्याला गेल्यावर थोड्याच दिवसांत पकडले गेले.

एकट्या-दुकट्याच्या पराक्रमानें व त्यागानें देशापुढील सर्व प्रश्न सुटणार नाहींत, त्यासाठीं अशा तरुणांची प्रचंड संख्या उभी केली पाहिजे, असें डॉक्टरांचें ठाम मत होतें. पण एखादा देशभक्त आपल्या मार्गानें न जातां अन्य मार्गानें जात असेल, तर त्याला होईल तेवढें साहाय्य देण्याची तत्परता मात्र ते सदैव ठेवीत.

या वर्षीं दि. २० एप्रिलला अकोला येथें अखिल महाराष्ट्र तरुण हिंदु परिषद झाली. या परिषदेला डॉक्टर स्वतः गेले होते व तेथें जमलेल्या प्रमुख मंडळींशीं व अकोल्यांतील कांहीं तरुणांशीं त्यांनीं संघासंबंधीं बोलणें केलें होतें. त्यांत श्री. मसूरकर महाराज, लो. अणे, स्वामी शिवानंद, डॉ. शिवाजीराव पटवर्धन, श्री. पांचलेगावकर महाराज, श्री. ब्रिजलाल बियाणी आदि पुढाऱ्यांचा उल्लेख प्रामुख्यानें करावा लागेल. संघाच्या शाखांची संख्या आतां तीस-पस्तीस-च्यावर गेली होती व नव्या शाखांत अनुशासन, तत्त्वज्ञानाची उमज व कार्य-क्षमता आणण्यासाठीं डॉक्टरांचा सारखा प्रवास सुरू झाला होता. या शाखांवर लक्ष ठेवून अशा बाहेरील परिषदांच्या निमित्तानें नवीन नवीन लोकांशीं परिचय

करून घेण्याची व त्यांना संघाचा परिचय करून देण्याची संधि डॉक्टर कधीहि चुकवीत नसत.

शाखांची भरभराट होत होती व तरुण कार्यकर्त्यांचा उत्साह सारखा वाढत होता. त्या उत्साहांतून डॉक्टरांमागें लकडा सुरू झाला की, सघाच्या सर्व ठिकाणच्या स्वयसेवकांचा एक मेळावा, छत्रपति शिवाजीमहाराज ज्या दिवशीं रायगडावर सिंहासनाधीश्वर बनले त्या ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशीला नागपूर येथे भरवावा. अशा मेळाव्याने स्वयंसेवकांचा आत्मविश्वास व उत्साह वाढेल, असे त्यांचें म्हणणें होतें. उलट कार्याला आतांच कोठे स्वरूप येण्याचीं चिन्हे दिसू लागलीं असतां असा मेळावा भरवून परकी सरकारचा व संघाच्या हितशत्रूंचा विरोध अधिक बळावून घेण्यात अर्थ नाहीं, असे डॉक्टराचे स्पष्ट मत होते. पण तरुणांना आरंभींच नकार देऊन त्यांचें मन खट्टू होईल, ही गोष्टहि ते विसरले नाहींत. जी गोष्ट घडूं नये असे वाटत असेल, ती गोष्ट हळुवारपणाने व कौशल्यानें टाळण्यावर त्याचा कटाक्ष असे. त्याला अनुसरूनच त्यांनीं आपल्या सहकाऱ्याना नकार न देतां उलट प्रांतांतील प्रमुख संघचालकाना पत्रे लिहिली. त्यांत त्यांनीं सर्व स्वयंसेवकाचा मेळावा भरविणे आपणाला कितपत युक्त वाटते, अशी विचारणा केली होती. अशी विचारणा केल्यावर जी उत्तरे येतील त्यातून आपोआपच, ही मेळाव्याची कल्पना सोडून द्यावी, असे अनुभवी तरुण कार्यकर्त्यांना उमजेल असा त्यांना विश्वास वाटत होता नि शेवटी तसेच घडले.

यथावकाश डॉक्टराना त्याच्या सहकाऱ्यांनी हाती उत्तरें पाठवून आपला विचार कळविला होता व त्यातील बहुतेकाचा सूर ‘ परिषद घेऊ नये ’ असाच दिसला. अकोल्याहून ‘प्रजापक्षा’चे संपादक श्री. गोपाळ कृष्ण तथा बाबा चितळे लिहितात कीं, “ ......आपण करूं घातलेले समेलन भरवू नये. ते अदृश्य रूपात ठेवावे. उलट सघाची वाढ जेवढी करतां येईल तेवढी करावी. तुमचे सघातील कानाकोपऱ्यांची माहिती सरकारला नसेल. जे डोळ्यानीं पाहिले नसेल ते संमेलन केल्याने सरकारला अधिक कळण्याचा व दिसण्याचा सभव आहे. सबब समेलन भरविण्याचा नाद सोडावा. ” डॉक्टराचे संघकार्यातील आघाडीचे कार्यकर्ते श्री. आप्पाजी जोशी यांनी वर्ध्याहून कळविले कीं, “......जे आपसांतील व बाहेरील शत्रु आहेत त्यांचीं अंतःकरणें सूडाने व्याप्त होऊन आपला उत्कर्ष होऊ नये, अपकर्ष व्हावा याकरितां ते कसून खटपटीला लागतील व संमेलनापासून फायद्याऐवजीं कदाचित् नुकसानहि होईल.”

या पत्रांत व्यक्त झालेली भीति खरी होती. कारण त्या वेळीं सरकार तर या वाढत्या संघटनेकडे बारकाईने पाहूं लागले होते व ठिकठिकाणच्या शाखात कोण कोण कार्यकर्ते आहेत, संघांत काय कार्यक्रम चालतात व कोणते विचार मांडले जातात, याचा कानोसा घेण्यासाठीं गुप्तचरांच्या चाललेल्या हालचालीहि कोठे

कोठें जाणवूं लागल्या होत्या. पण खरें दुःख याचें नव्हतें. परकें सरकार डोळ्यांत तेल घालून अशा तरुणांच्या संघटनेकडे पाहील यांत नवल नव्हतें. पण त्यांच्या-इतक्याच दुष्टाव्यानें, राष्ट्रसेवेसाठीं बद्धपरिकर झालेल्या लोकांनीं संघाला नामशेष करण्याचे संकल्प सोडावेत, याचें सखेदाश्चर्य वाटतें. पण काँग्रेस व हिंदुस्थानी सेवादल यांच्या कांहीं ठिकाणच्या कार्यकर्त्यांनीं दुर्दैवानें अशी भूमिका घेतली होती, असें त्या वेळच्या पत्रव्यववहारावरून स्पष्ट दिसतें. मध्यप्रांताच्या काँग्रेस समितीवर असलेले श्री. रामभाऊ फाटक साकोलीहून दि. २६ ऑक्टोबरला लिहिलेल्या पत्रांत म्हणतात कीं, " ......प्रांतिक काँग्रेस कमिटीचा रा. स्व. संघाला शह देण्यासाठीं सेवादल निर्माण करण्याचा विचार दिसतो. करितां प्रांतिक सीमा उल्लंघून परप्रांतांत शाखा स्थापन करण्याचा अवश्य विचार करावा. इतकेंच नव्हे तर मोठमोठ्या शहरीं शाखा स्थापून नंतर पूर्ण सांखळी बनवीत बसावें. " दुसऱ्या एका पत्रांत एक कार्यकर्ता लिहितो कीं, " ......येथें दसऱ्याच्या सुमुहूर्तावर हिंदुस्थानी सेवादलाची शाखा उत्पन्न झाली व त्या शाखेच्या अधिकाऱ्यांनीं एक महिन्याचे आंत रा. स्व. संघाची शाखा मोडण्याच्या प्रतिज्ञा केल्या आहेत. "

सभोंवतींच्या वातावरणांत काँग्रेसमधील आपल्याच लोकांचा विरोध दिसूं लागला, याचें डॉक्टरांना अत्यंत दुःख झालें. परक्यांना या देशांतून जोंवर आपण आपल्या बाहुबलावर हुसकून लावीत नाहीं, निदान तोंपर्यंत तरी राष्ट्रीय शक्तींची युति होत जाणें त्यांना नितांत आवश्यक वाटत होतें. पण आपण प्रामाणिक-पणें प्रयत्न करण्यास उद्युक्त होऊनहि त्या प्रयत्नाचा चांगुलपणा व विशुद्धता कांहीं जणांच्या ध्यानीं न येऊन त्यांनीं विरोध मांडला तरी त्याचीहि क्षिति बाळगावयाची नाहीं व तो विरोध शांतपणें पचवून कार्यरत राहावयाचें, असा त्यांचा बाणा दिसे. श्री. दादा परमार्थ व श्री. कृष्णराव मोहरीर यांना दि. २४ ऑक्टोबरला लिहिलेल्या पत्रांत ते म्हणतात कीं, " ...... आपणां दोघांच्याहि पत्रांतून एक अत्यंत महत्त्वाची बातमी आपण मला कळविलीत हें फार उत्तम केलेंत. मला याची कल्पना होतीच. याहि परिस्थितींतून आपणांला जावें लागणारच आहे. परमेश्वर सर्व लोकांना सुबुद्धि देवो, अशी आपण त्याची प्रार्थना करूं. परंतु आपण आपल्या सदसद्विवेकबुद्धीला व परमेश्वराला स्मरून कार्य केल्यानंतरहि जर कोणाला विषाद वाटेल किंवा आपला विरोध करावासा वाटेल तर त्यास आपला नाइलाज आहे. हें राजकारण आहे. तेव्हां अशा गोष्टीला भिऊन आपण किती दिवस चालणार ? "

विरोधी वातावरणाचे चटके बसूं लागले तरी, खरखरीत लोकरी कापडाला जसें मऊ रेशमी अस्तर असावें त्याप्रमाणें आपल्याच समाजांतील विरोधी

लोकासंबंधींची डॉक्टरांच्या मनांतील आपुलकीची मृदु भावना विरोधांतहि मंदावत नसे. ‘ आपलेच दात नि आपलेच ओठ ’ ही वस्तुस्थिति त्याच्या दृष्टी-आड होणें शक्य नव्हते. त्या वर्षीच्या गुरुपूजनोत्सवानतर ‘ महाराष्ट्रा ’च्या एकाच अंकांत हिंदुस्तानी सेवादलाचे प्रमुख डॉ. ना. सु. हर्डीकर व डॉक्टर या दोघांची भाषणे छापून येण्याचा योग आला. त्या दोघाच्या भाषणांतील एकूण सूर विचारांत घेतां डॉक्टराच्या संयमी व समाजव्यापी आत्मीयतेची चागली कल्पना येते. त्या कालात जिकडे तिकडे संघाचे वातावरण पसरत होतें, तर कॉंग्रेस संस्थे-संबंधी जनमनात औदासीन्याची छाया उमटूं लागली होती. अशा परिस्थितीत डॉ. हर्डीकर नागपूरला आले व तेथील एका सभेचे अत्यंत रोडावलेले दृश्य पाहून म्हणाले कीं, “ ... ... नागपुरात डॉ. मुंजे, श्री. अभ्यंकर यासारखे सन्मान्य व खंदे पुढारी असता व श्री. आवारी याच्या तालमींतील ‘ रिपब्लिकन आर्मी ’चे शूर शिपाई जिवंत असताना राष्ट्रीयत्वाचे चिन्ह व राष्ट्राचे जीवित असा जो झेंडा, त्यास वंदन करण्याचा समारंभहि त्या प्रातात होऊ नये .. .. ही मोठ्या शरमेची गोष्ट होय. नागपुरात तरुणाची चळवळ आहे असें आम्ही ऐकतो. परंतु त्या चळवळींत राजकारण किती आहे हे आम्हास माहीत नाहीं. आम्हाला लागलेल्या परकीयाच्या जळवा राष्ट्राचे रक्त शोषण करीत असता, ‘ आमची चळवळ केवळ सामाजिक आहे, त्यात राजकारण नाहीं ’ असे जर येथील तरुण म्हणत असतील, तर ती चळवळ असून नसून सारखीच होय. ”

डॉ. हर्डीकर याच्या वक्तव्याचा सारा रोख राष्ट्रीय स्वयसेवक संघाकडेच होता, हे सुज्ञ वाचकास सागण्याची आवश्यकता नाही. पण हिंदुराष्ट्राच्या पुन-रुत्थानाची स्पष्ट शब्दात घोषणा करून पाऊल उचललेल्या राष्ट्रीय स्वयंसेवक सघाने राष्ट्रीय भगवा ध्वज अनेक ठिकाणीं सन्मानाने उभारला जाण्याची व त्याचे भक्तिभावनेने पूजन करण्याची प्रथा रूढ केली होती व नेमकी हीच गोष्ट दुर्दैवाने अनेक जणाच्या जळफळाटाला कारणीभूत झाली होती, हें विसरून चालणार नाहीं. नागपूरच्या गुरुपूजनोत्सवात आभार मानतांना डॉक्टरानी माडलेले विचार या पार्श्वभूमिवर अधिकच उठून दिसणारे आहेत. ते म्हणाले कीं, “ ......प. मदनमोहन मालवीयांनी जेव्हां संघाला भेट दिली, तेव्हां त्यानीं असे उद्गार काढले कीं, ‘ इतर संस्थांजवळ भव्य भव्य इमारती व मोठे निधि असतात. पण तुमच्या सघात मनुष्यबळ चांगले आहे, हे पाहून मला फार आनंद होतो ! ’ आमच्याजवळ हे मनुष्यबळ असले तरी स्वतःची जागा असल्यावाचून यापुढे सस्थेचे हे बाळसेदार स्वरूप टिकविणें व वाढविणें शक्य नाहीं. संस्थेचे कार्य झपाट्याने चालण्यास व परिणामकारक होण्यास बाह्य साधनाची आता फारच जरूरी आहे. गेल्या वर्षीं दसऱ्याला सीमोल्लंघनाची मिरवणूक निघाली होती. त्या प्रसंगीं ५०० स्वयंसेवक खाकी गणवेषात लष्करी पद्धतीने नागपूर नगरातून चालत गेले. ते दृश्य फार

परिणामकारक होतें, असे अनेकांचे उद्गार ऐकावयास येतात. यंदाहि तशाच प्रकारची पण त्यापेक्षांहि मोटी अशी मिरवणूक येत्या विजयादशमीच्या प्रसंगीं काढण्याचा विचार आहे. त्या प्रसंगीं नागपुरांतील सर्व व्यायामशाळांनीं आमच्याशीं सहकार्य करावें व खाकी गणवेषांत मिरवणुकींत सामील व्हावें, अशी संघाची त्यांना विनंति आहे. आमचें कार्य हें फार व्यापक कार्य आहे. चार भिंतींच्या आंतच आम्हांला कार्य करावयाचें नाहीं. सनातन हिंदु संस्कृतीच्या रक्षणाचें हें पवित्र कार्य आहे. तेव्हां कोणत्याहि संस्थेशीं सहकार्य करावयास आमचे हात सदैव सिद्ध असतात. हें कार्य सर्वांनीं मिळून प्रेमानें केल्यासच जास्त परिणामकारक व यशोवर्धक होईल. " या भाषणांत आपल्याच लोकांच्या अपसमजामुळें वा पक्षांधतेनें होऊं घातलेल्या विरोधाचा नुसता उल्लेखहि नाहीं. उलट " कोणाहि संस्थेशीं सहकार्य करावयास आमचे हात सदैव सिद्ध असतात, " असा अगदीं निःसंदिग्ध शब्दांत दिलेला निर्वाळा मात्र लक्ष वेधून घेतो. डॉक्टरांना विरोध समजत होता. पण तो आपल्याच कांहीं लोकांचा आहे, साऱ्या समाजाचा नाहीं, याची त्यांना पूर्ण जाणीव असल्यानें ' जशास तसें ' अशी भाषा व वृत्ति त्यांनीं स्वीकारली नाहीं. ते मनांत पुरेपूर ओळखून होते कीं, आजचा विरोधक हा उद्यांचा सहकारी होईल व त्याच्या आजच्या शिव्या याच उद्यांच्या ओव्या ठरतील ! हाच आत्मविश्वास डॉक्टरांच्या संयमाचा आधार होता.

डॉक्टरांच्या दसऱ्याच्या वरील भाषणांत पं. मदनमोहन मालवीय यांनीं संघाला दिलेल्या ज्या भेटीचा उल्लेख आहे ती भेट नेमकी केव्हां घडली हें कळत नाहीं. पण मालवीयजी प्रत्यक्ष संघस्थानावर आल्यावर प. पू. डॉक्टरांचा व त्यांचा जो संवाद झाला, तो प्रत्यक्ष ऐकलेले कार्यकर्ते सुदैवानें आढळतात. मालवीयजींनीं मोहिते वाड्यांतील शाखेला भेट दिली तेव्हां वाड्याचा कांहीं भाग खेळण्यासारखा नीट दिसला तरी तो वगळून बाजूला पडझडीचे अवशेष विखुरलेले होतेच. अशा जुन्या पडक्या जागेंत संघ चालवावा लागतो त्या अर्थी संघाची आर्थिक स्थिति चांगली नाहीं हें त्यांच्या लगेच ध्यानांत आलें व ते डॉक्टरांकडे वळून म्हणाले, " लोक मला मोठा भिकारी मानतात. आपली संमति असेल तर मी संघासाठींहि चार जणांजवळ शब्द टाकून निधि जमवून देईन. " त्यावर डॉक्टरांनीं चटकन् उत्तर दिलें कीं, " पंडितजी, मला पैशाची मोठी चिंता नाहीं, तर आपल्यासारख्यांच्या आशीर्वादाची मला आवश्यकता आहे. " हें उत्तर पंडितजींना खरोखरच अनपेक्षित होतें. कारण पैशासाठीं इतर संस्थांच्या चालणाऱ्या खटपटी-लटपटी त्यांना चांगल्याच परिचयाच्या होत्या. त्यामुळें डॉक्टरांना ते प्रसन्न होऊन म्हणाले, " इतरत्र आधीं पैशांकडे व मग मनुष्यबळाकडे लक्ष दिलें जातें. पण आपली तऱ्हा न्यारी आहे. हें आपलें वैशिष्ट्य मी जाईन तेथें तेथें सांगितल्या-वांचून राहणार नाहीं. "

संघाच्या शाखा स्वयंसेकांनीं फुलूं लागल्या होत्या व त्यासंबंधींची प्रसन्नता डॉक्टरांच्या त्या वेळच्या पत्रांतून उमटणे स्वाभाविक होते. ब्रह्मपुरीच्या संघचालकांना दि. २२ सप्टेंबरला लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात कीं, " रा. स्व. संघ चंद्रकलेप्रमाणे दिवसेदिवस प्रातभर वाढत आहे. आज आपल्या शाखा छत्तीस झालेल्या आहेत. आपल्या संघरूपी राष्ट्राच्या प्रत्येक अंगोपांगात नवचैतन्य उत्पन्न करून, लवकरच आपणास आपला प्रात आपल्या विचारसरणीच्या आक्रमणाखालीं आणावयाचा आहे. " दि. ७ ऑगस्टच्या दुसऱ्या एका पत्रात तर आपल्या आनंदाला शब्दरूप देऊन ते लिहितात की, "...लहान मुलाना धन्यवाद द्यावेसे वाटतात. कारण त्याचेमुळेच आज संघाला शोभा आहे. " उगवत्या पिढीला हाताशी धरून हिंदी राष्ट्रवादाच्या दिशेने जाऊं लागलेला ओघ हिंदुराष्ट्राच्या योग्य दिशेनें वळविण्याची डॉक्टराची योजना होती व त्यामुळेच लहान मुलाची सख्या पाहून डॉक्टरानी धन्योद्गार काढले होते. त्याचप्रमाणे 'संघरूपी राष्ट्र' ही शब्दयोजनाहि संघाच्या रूपाने हिंदुराष्ट्र रूपाला येत आहे, याची सहकाऱ्याना जाणीव करून देण्यासाठीं त्यानीं केली होती, हे सागावयास नकोच.

अशा धांवपळीचे प्रयत्न चालू असतां डॉक्टरांच्या गृहजीवनात १९२७ नंतर एक भर पडली होती. त्याचे चुलते श्री. आबाजी हेडगेवार हे रामपायलीचे आपलें वास्तव्य आवरून नागपूरला डॉक्टरांकडेच त्याच्या आग्रहास्तव सहकुटुंब राहावयास आले होते. तसे पाहिले तर त्या दोघाचें नातें चुलत-चुलत असे काहींसे दूरचें होते. पण डॉक्टरांच्या विद्यार्थि-जीवनातील अस्थिर व पडत्या काळात त्यांना धीर व प्रोत्साहन देण्यात आबाजीनीं दाखवलेली आत्मीयता व केलेले साहाय्य अमोलच म्हणावे लागेल. त्यातून हे दूरपणाचे अडसर नाहींसे होऊन अत्यंत जवळीक निर्माण झालेली होती. नाहीं तरी नातीं हीं जसे परस्पराचे भाव असतील त्याप्रमाणेच व्यवहारात उतरत असतात. भाव उत्तम नसतील तर सख्खे भाऊहि दावेकरी बनतात व निर्मळ व उदात्त भाव असले की रूढ अर्थाने नातें नसले तरीहि दोन शरीरे व एक मन असे वर्णन करावे इतके रहस्य दोघा व्यक्तींत निर्माण होते. डॉक्टरांना कोणी बोलण्याच्या ओघात नात्यातील चुलत वा सावत्रपणाचा उल्लेख केलेला खपत नसे. या धारणेतूनच हेडगेवाराचे दोन प्रवाह एकत्र आले होते.

१९२९ च्या ऑगस्टमध्ये डॉक्टराची चुलती सौ. गंगूबाई अत्यत आजारी पडल्याने डॉक्टरानीं त्याना औषधोपचारासाठीं इंदूरला नेलें होते. आबाजी व त्यांची मुलगी सौ. भीमाबाई अशीं दोघें या वेळीं त्याच्याबरोबर तिकडे गेलीं होतीं. त्या वेळीं सबंध ऑगस्ट महिनाभर त्यांचें वास्तव्य इंदूरसारख्या नव्या ठिकाणीं आले असतां त्यानीं शाखेसाठीं खटपट केली असेल, हे सांगावयास नकोच. या काळात सर्व शाखांशीं त्यांनीं पत्रव्यवहारानें चांगला संबंध ठेवलेला

दिसतो. एका पत्रांत त्यांनीं ‘ भयसूचक घंटा ’ या पुस्तकाच्या व ‘Eye-opener’-च्या प्रत्येकीं पंचवीस प्रती मागविल्या होत्या व पांच भगवे ध्वज टपालानें पाठविण्यास कळविलें होतें. ही त्या भागांत संघाची मुहूर्तमेढ रोवण्याचीच सिद्धता होती. संस्थानी वातावरणाचा रोख ध्यानीं घेऊन त्यांनीं अनेकांचा परिचय करून घेतला व याच अवधींत इंदूर व देवास या दोन ठिकाणीं लहान स्वरूपांत संघाचें काम सुरू करून दिलें. या वेळीं डॉक्टरांच्या बरोबर आबाजी व त्यांची मुलगी ताई ही पण इंदूरला गेलीं होतीं. तेथें महिना सव्वा महिना उपचार होऊनहि सौ. गंगूबाईच्या प्रकृतींत उतार न पडल्यानें सप्टेंबरमध्यें त्यांना नागपूरला परत येणें भाग पडलें. पुढें प. पू. डॉक्टर सत्याग्रहांतून कारागृहांत गेले, तेव्हां सौ. गंगूबाई निवर्तल्या !

आजच्या विशिष्ट बिकट परिस्थितींत स्वयंसेवकांचा मेळावा भरवणें हें हितकर ठरणार नाहीं, असें सहकाऱ्यांच्या ध्यानीं आणून देऊन डॉक्टरांनीं तो कार्यक्रम सहजपणें टाळला. पण त्याऐवजीं निवडक कार्यकर्त्यांची बैठक घेण्याचें ठरवून दि. १९ ऑक्टोबरला डॉक्टरांनीं एक परिपत्रक सर्वत्र पाठवून दिलें. त्यांत त्या बैठकीचा हेतु स्पष्ट केला होता. ते लिहितात कीं, “ ......अगदीं जवळच्या भविष्यत्कालीं होऊं घातलेल्या अनेक राजकीय व सामाजिक आंदोलनाच्या वावटळींतून संघाचें तारूं सुरक्षित कसें हाकावें, संघाचें धोरण कशा प्रकारचें ठेवावें, संघाची वाढ झपाट्यानें होण्याकरितां काय योजना कराव्यात या व अशाच अनेक महत्त्वाच्या गोष्टींचा विचार करण्याकरितां ता. ९ व १० नोव्हेंबर या दिवशीं सर्व संघचालकांची सभा नागपूरला भरवावी, असें आम्हीं ठरविलें आहे. या सभेला आपण आपले बरोबर ज्यांना संघाचा जिव्हाळा असून विचारविनिमयाला ज्यांचा उपयोग होईल अशा संघाच्या एक-दोन प्रमुख गृहस्थांना बरोबर घेऊन अवश्य यावें. ”

या पत्रकावरून भारतीय राजकारणांतील संभाव्य आंदोलनाची चाहूल डॉक्टरांना लागली होती व असें आंदोलन उभें राहिल्यास त्या आंदोलनामुळें संघाच्या राष्ट्रनिर्मितीच्या सतत चालणाऱ्या कामाची गति कुंठित होऊं नये असा संस्कार कार्यकर्त्यांच्या मनावर उमटविण्याचा त्यांचा विचार स्पष्ट दिसतो. या वेळेपर्यंत संघाचें काम सारखें वाढत होतें व तें सर्व प्रारंभापासून डॉक्टरांच्या एकमेव नेतृत्वाखालीं चालू होतें. तरीहि कोठें कोठें लिखित व निश्चित घटना नसल्यानें, नेतृत्वासंबंधींचे भिन्न भिन्न सूर उमटल्यावांचून राहत नसत. निर्लेप व निरपेक्ष सेवाभाव सर्व व्यवहारांत बाणणें, ही वाटते तितकी सहजसाध्य गोष्ट नाहीं. संघाच्या रूपानें अशा निरपेक्ष देशसेवकांचा संच उभा करण्याची आकांक्षा बाळगून डॉक्टरांनीं प्रयत्न सुरू केले होते. पण त्यांत प्रवेश केलेल्या सर्व व्यक्तींच्या मनाचा परिपोष केवळ संघांत प्रवेश केल्यानें व तोहि अल्पावकाशांत आवश्यक

तितका निकोप, त्यागी व सेवामय होणे हे मनुष्यस्वभावाला धरून नव्हते. त्यामुळे कांहीं जणाच्या मनांत संघटनेला एक चालक असण्याऐवजी एक कार्यकारी मंडळ नेमून वा निवडून त्या मडळाच्या विचारानें संघटनेच्या प्रमुखानी धोरण ठरवावे व त्या मंडळांत आपला समावेश व्हावा, असे विचार घोळूं लागले. डॉक्टरा-जवळहि काहीं जणानीं आपली कल्पना सहजतेने बोलून दाखविली. डॉक्टर त्यावर इतकेच सांगत की, " सर्वांनीं मिळून जे ठरवाल ते मला संपूर्ण मान्य आहे. पण कोठूनहि हिंदु समाजाची आजची अत्यंत निराशामय अवस्था आमूलाग्र पालटून टाकील असे अनुशासनपूर्ण सामर्थ्य शक्य तितक्या लवकर आपल्या समाजात उभे राहिले म्हणजे झाले. " तेव्हा हा काहीं जणाच्या मनात रेंगाळणारा विचार होणाऱ्या बैठकींतहि ओघानेच पुढे येणे व त्यातून संघाच्या नेतृत्वा-संबंधीच्या निश्चित कल्पना साकार होणे हे क्रमप्राप्तच होते.

योजनेप्रमाणें दि. ९ व १० ला नागपुरातील डोके याच्या मठात ही संघचालक व कार्यकर्ते याची बैठक झाली. त्यात सर्वांनी मनमोकळी चर्चा करून देशाची सध्याची परिस्थिति व लोकांची मनःस्थिति ध्यानी घेतली व अनु-शासनाच्या दृष्टीने संघटनेचे स्वरूप ' एकचालकानुवर्ति ' ठेवण्याचे निश्चित केले. या चर्चेत प्रामुख्याने श्री. विश्वनाथराव केळकर, बाळाजी हुद्दार, आप्पाजी जोशी, कृष्णराव मोहरीर, तात्याजी काळीकर, बापुराव मुठाळ, बाबासाहेब कोलते, चांद्याचे देवईकर व मार्तंडराव जोग आदि मंडळींनीं भाग घेतला होता.

या बैठकीच्या दुसऱ्या दिवशीं सायकाळीं मोहिते संघस्थानावर नागपुरातील स्वयंसेवक व बैठकीला आलेले कार्यकर्ते याचा एकत्र कार्यक्रम झाला. त्या वेळी त्या सघस्थानाच्या मागे आजहि उत्तम स्थितींत असलेल्या भव्य दगडी प्रवेश-द्वाराकडे पाठ करून संघचालक व कार्यकर्ते उभे होते व डॉक्टर संघस्थानावरील ध्वजाजवळ उभे राहून ते दृश्य पहात होते. इतक्यांत बैठकींत घेतलेल्या निर्णयाला प्रकट रूप देण्याच्या उत्कट इच्छेने वर्ध्याचे संघचालक श्री. आप्पाजी जोशी यानीं सर्वांना पूर्वसूचना देऊन खणखणीत शब्दांत आज्ञा दिली कीं, " सरसंघचालक प्रणाम, एक–दोन–तीन ! " यानंतर एकचालकानुवर्तित्वाची कल्पना विशद करणारे श्री. विश्वनाथराव केळकर यांचे ओजस्वी भाषण झाले.

परमपूजनीय डॉक्टरांना ही गोष्ट रुचली नाहीं. कार्यक्रम आटोपल्यावर ते म्हणाले कीं, " आप्पाजी, आज आपण न ठरलेली गोष्ट केलीत ती मला पटली नाही. कारण माझ्यापेक्षा वडील व आदरणीय अशा माझ्या सहकाऱ्याकडून मी प्रणाम घेणे युक्त नव्हते. " त्यावर " कार्याच्या सोयीसाठी ही आपणांला अप्रसन्न करणारी गोष्ट, पण आम्ही सर्वांनी स्वयंस्फूर्तीने केली आहे, " असे आप्पाजींनीं समर्थन केले. याच संघचालकाच्या बैठकीच्या वेळी सरसंघचालकाना सहाय्यक म्हणून सरकार्यवाह व सरसेनापति असे दोन अधिकारी निश्चित

करण्यांत आले. त्यांत श्री. बाळाजी हुद्दार हे सरकार्यवाह व श्री. मार्तंडराव जोग हे सरसेनापति म्हणून नियुक्त झाले. त्याचप्रमाणें इतर अधिकारश्रेणीहि निश्चित करण्यांत आली.

राष्ट्रीय स्वयंसेवक संघ हा एका चालकाच्या आज्ञेनें चालवला जाणार हें या वेळीं निश्चित झालें. पण याच घटनापद्धतीचें एकमुखी व एकतंत्री स्वरूप हें संघाबाहेरील कांहीं जणांना दुर्दैवानें सिनॉर मुसोलिनीच्या ' फॅसिस्ट ' धर्तीचें वाटूं लागलें ! डॉ. हेडगेवारांच्या सहवासांत राहून त्यांच्या उदात्त, सहिष्णु, संग्राहक व सेवामय जीवनाच्या शीतल छायेखालीं येण्याचें सद्भाग्य लाभलें असेल, त्यांना या कांहीं जणांच्या कल्पनेंतील विकृतपणा सांगण्याची आवश्यकताच नाहीं. डॉक्टरांचें अंतःकरण हें कोणत्याहि घटनेंतील वैगुण्यें दूर करण्याइतकें देशभक्तिपूर्ण, प्रामाणिक व निरहंकारी होतें. त्यांच्या वृत्तींत लोकशाहींतील विचारविनिमय बसे व एकतंत्री पद्धतींतील अनुशासनहि तेथें पूर्णांशानें असे. एखाद्या कुटुंबांतील कर्त्या पुरुषाचीच भूमिका जणूं सरसंघचालक या पदांत एकवटली होती. त्या भूमिकेंत वाटेल ते कष्ट झेलून सर्व कुटुंबाचें पालनपोषण करण्याचें उत्तरदायित्व हें असतेंच. पण सर्वांना सुयोग्य मार्गानें चालविण्यासाठीं कधीं मायेनें पाठीवरून हात फिरवून समजुतीच्या चार गोष्टी सांगण्याचें कौशल्य, तर कधीं तेवढ्यानें न भागल्यास हितासाठीं कान धरण्याची पात्रता कर्त्या व्यक्तीला दाखवावी लागते. अशीं सर्व कर्तव्यें पार पाडण्यासाठीं लागणारी मनःस्थिति व कर्तृत्व यांची सुयोग्य युति संघ-संस्थापक डॉ. हेडगेवार यांच्या ठिकाणीं झाली होती, असाच निर्वाळा त्यांच्या संबंधांत आलेला कोणीहि देईल.

त्यांच्या मनःस्थितीचें मूर्तिमंत स्वरूप व्यक्त करणारीं, त्यांनीं स्वतःच एका वहींत केलेलीं टांचणें सुदैवानें आज उपलब्ध आहेत. तीं टांचणें कालदृष्टीनें १९३३ च्या सप्टेंबरमधलीं असलीं तरी विषयानुषंगानें येथें कांहीं उद्धृत करणें युक्त ठरेल. ते लिहितात :—

( १ ) या संघाचा जन्मदाता किंवा स्थापनकर्ता मी नसून तुम्ही लोकच आहांत, याची मला पूर्ण जाणीव आहे.

( २ ) तुम्हीं जन्म दिलेल्या संघाचें तुमच्या इच्छेनें व आज्ञेनें ' सुइणीचें ' काम मी करीत आहें.

( ३ ) यापुढेंहि तुमची इच्छा व आज्ञा असेल तोंपर्यंत हें काम मी करीत राहीन व हें काम करीत असतांना कितीहि हालअपेष्टा वा मानापमान सहन करण्याची माझेवर पाळी आली तरी मी माझा पाय मागें घेणार नाहीं.

( ४ ) परन्तु मी या कामाला नालायक असून माझेमुळें संघाचें नुकसान होत असेल असें जर आपणांला वाटत असेल तर दुसरा योग्य मनुष्य या जागे-करित निवडून काढावा.

( ५ ) आपल्या आज्ञेने जितक्या आनंदाने ह्या पदाचा मीं स्वीकार केला तितक्याच आनंदाने आपण योजलेल्या गृहस्थाचे हातीं सर्व अधिकारसूत्रे देऊन मी त्याच क्षणापासून त्याचा आज्ञाधारक स्वयसेवक म्हणून वागेन.

( ६ ) कारण मला माझ्या व्यक्तीची किंमत नसून संघकार्याची किमत आहे व संघाच्या हितार्थ कोणत्याहि गोष्टी करण्यात मला कसलाहि अपमान केव्हांहि वाटणार नाही.

( ७ ) संघचालकाची आज्ञा कोणत्याहि परिस्थितींत स्वयंसेवकांकडून बिनतक्रार पाळली जाणे व 'नाकापेक्षां मोती जड' अशी परिस्थिति संघांत उत्पन्न न होणें यातच संघकार्याचे रहस्य आहे.

( ८ ) म्हणून आपण स्वतः ती आज्ञा पाळून दुसऱ्या स्वयंसेवकाकडून पाळविणे हे प्रत्येक स्वयंसेवकाचे कर्तव्य आहे.

प्राप्त कर्तव्य म्हणून भरताप्रमाणे सर्व कार्याची धुरा वाहण्याची मनाची सिद्धता व त्याचबरोबर हे नेतृत्वाचे रत्नजडित सिंहासन स्वतःसाठीं नसून त्यावर हिंदुराष्ट्रपुरुषाच्या पादुका स्थापन करण्याइतके वैराग्य व सेवाभाव, अशा उदात्त भावना डॉ. हेडगेवार यांच्या रूपाने प्रकट झाल्या. असे कर्तव्यकठोर व कार्यशरण व्यक्तिमत्त्व या बैठकींतून सरसंघचालक पदावर आरूढ झाले होते. या घटनेतच संघाच्या अनुशासनपूर्ण विकसनाचे रहस्य सांठविलेले आहे, असा निर्वाळा काळानें दिला आहे.

ही बैठक आटोपून कार्यकर्ते गावोगांव परत गेल्यावर थोड्याच दिवसानीं परमपूजनीय डॉक्टरानीं सर्व शाखाना दि. २६ जानेवारी १९३० मध्ये कॉंग्रेस पक्षाचें अभिनदन करण्यासाठीं सभा घेण्याचा आदेश दिला. या काळात अपसमजामुळे कॉंग्रेस व हिंदुस्तानी सेवा दल यांच्याकडून विरोध होऊ लागला होता. पण चुकीच्या कृतीला आपण तशीच प्रतिक्रिया करणे डॉक्टराना मुळींच संमत नव्हतें. कॉंग्रेसमध्ये त्यांना दोष व उणिवा अवश्य दिसत होत्या. पण त्या वैगुण्यामुळे कॉंग्रेसच्या सरसकट सर्व गोष्टीच वाईट वा त्याज्य, असे त्यांनीं कधींच मानले नाहीं. विशेषतः इंग्रजांशीं दोन हात करण्यासाठीं ज्या वेळीं कोणी उभा राही, त्यावेळीं तर डॉक्टर त्याचा पाठपुरावा केल्यावाचून राहत नसत. कॉंग्रेस व संघ याच्या भूमिकांतील भेद व साम्य डॉक्टरानीं जाणले होते व मतभेद असूनहि दोन्ही संस्थांतील साधर्म्यापुरते सहकार्य करण्याची तत्परता त्यांनी दाखविली होती.

या दोन संस्थांसंबंधीं टांचण-वहींत ते म्हणतात कीं, "...हिंदुस्थानचा पंचप्राण म्हणजे त्याची हिंदु संस्कृति. म्हणून हिंदुस्थानचे रक्षण करावयाचें म्हणजे हिंदु संस्कृतीचे रक्षण करणे हे आद्य कर्तव्य ठरते. जर हिंदुस्थानची हिंदु संस्कृति नष्ट व्हावयाची असेल, हिंदु समाजाचें नांवनिशाणहि हिंदुस्थानांत उरणार नसेल, तर मग त्या राहिलेल्या केवळ जमिनीच्या तुकड्याला हिंदुस्थान किंवा हिंदुराष्ट्र

हें नांवहि शोभणार नाहीं. कारण राष्ट्र म्हणजे केवळ जमिनीचा तुकडा नव्हे... ही गोष्ट सत्य असतांहि हिंदु धर्म व हिंदु संस्कृति यांच्या संरक्षणाकडे व प्रत्यहीं परधर्मीयांकडून हिंदु समाजावर होत असलेल्या विध्वंसक हल्ल्यांकडे दुर्दैवानें कॉंग्रेसचें पूर्ण दुर्लक्ष असल्यामुळें हें अत्यंत आवश्यक कार्य करण्याकरितां राष्ट्रीय स्वयंसेवक संघाची आवश्यकता आहे. तरी पण संघाचा कॉंग्रेसशीं मुळींच विरोध नाहीं. आमच्या राष्ट्रीय संस्कृतीच्या आड न येणाऱ्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या कार्यक्रमांत संघ कॉंग्रेसशीं सहकार्य करील व आजपर्यंत करीत आलेला आहे." याच उदात्त भूमिकेंतून डॉक्टरांनीं सर्व शाखांकडे एक परिपत्रक पाठविलें. त्यांत लाहोर कॉंग्रेसमध्यें पं. जवाहरलाल नेहरू यांच्या प्रयत्नानें कॉंग्रेसनें जो संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव केला, त्याविषयींची धन्यता प्रकट झाली होती. संघाच्या संपूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयावर व सहकार्याच्या धोरणावर प्रकाश टाकणारें तें परिपत्रक ऐतिहासिक महत्त्वाचें आहे. त्यांत ते म्हणतात कीं :—

"यंदाच्या कॉंग्रेसनें 'स्वातंत्र्य' हेंच आपलें ध्येय निश्चित केलें असून रविवार ता. २६।१।३० हा दिवस सर्व हिंदुस्थानभर 'स्वातंत्र्यदिन' म्हणून पाळला जावा, असें कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीनें जाहीर केलेलें आहे....... अखिल भारतीय राष्ट्रीय सभा ही आपल्या स्वातंत्र्यध्येयाप्रत येऊन पोहोंचली हें पाहून आपल्याला अत्यानंद होणें साहजिक आहे व हें ध्येय समोर ठेवून कार्य करणाऱ्या कोणत्याहि संस्थेशीं सहकार्य करणें हें आपलें कर्तव्यच आहे...... म्हणून राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या सर्व शाखांनीं रविवार ता. २६।१।३० या दिवशीं सायंकाळीं ठीक सहा वाजतां आपापल्या संघस्थानीं आपापल्या शाखेच्या सर्व स्वयंसेवकांची सभा भरवून राष्ट्रीय ध्वजाचें म्हणजे भगव्या झेंड्याचें वंदन करावें. व्याख्यानरूपानें सर्वांना स्वातंत्र्य म्हणजे काय व हेंच ध्येय प्रत्येकानें आपलेसमोर कसें ठेवलें पाहिजे हें विशद करून सांगावें; व कॉंग्रेसनें स्वातंत्र्याच्या ध्येयाचा पुरस्कार केल्याबद्दल तिचें अभिनंदन करून समारंभ आटपावा."

या आदेशानुसार सर्व शाखांवर असा स्वातंत्र्यदिन पार पडला होता व त्यांत पोवाडे, मिरवणुका, व्याख्यानें, 'श्रद्धानंद' साप्ताहिकांतील स्वातंत्र्य या विषयावरील लेखाचें वाचन व 'वन्दे मातरम्'चा उद्घोष असे विविध कार्यक्रम झाले होते.

देशांत इंग्रजांविरुद्ध आंदोलन उभें राहण्याचीं चिन्हें आतां दिसूं लागलीं व त्यांत संघाचें धोरण नेमकें काय राहील, याची कल्पना नसल्यानें सरकारी आरक्षकांकडून ठिकठिकाणच्या स्वयंसेवकांना त्रास होऊं लागला. तुमचा प्रमुख कोण, उद्देश काय, तुमचीं नांवें सांगा, संघाचे पैसे कोणाजवळ असतात, खर्च कसा चालतो, अशा अनेक प्रकारांनीं लहान लहान शाखांतील स्वयंसेवकांना छेडून पाहण्याचे प्रकार कानांवर येऊं लागले. या त्रासाला शह देण्यासाठीं जो व्यवहारांत

दक्ष आहे असा गांवांतील भारदस्त व प्रौढ गृहस्थ संघचालक म्हणून स्वयसेवकाच्या पाठीशीं उभा करण्याची दक्षता डॉक्टरांनीं घेतली आणि अशा प्रौढाकडूनच शाखेच्या व्यवहारांत होणाऱ्या आर्थिक आयव्ययाची वेळच्या वेळी नोंद व्हावी, अशी व्यवस्था करण्याकडेहि त्यानीं लक्ष दिले. सार्वजनिक कार्यासाठीं उभारलेला पैसा अत्यंत योग्य कारणासाठी व काटकसरीने वापरला पाहिजे, याचे धडे त्यानीं आपल्या वागणुकींतून घालून दिले होते. दक्षतेने वापरलेला पैसा हा सघटनेला उपकारक ठरेल, पण त्याचा निष्काळजीपणाने वापर केल्यास त्याच पैशातून संघटनेची प्रतिष्ठा धुळीला मिळणेहि अशक्य नाहीं, हे डॉक्टर पुरेपूर जाणून होते. यासाठीं पैन् पैचा आयव्यय वेळच्या वेळी टिपला जावा, असा त्याचा कटाक्ष असे. या कामीं त्यांना त्यांचे चुलते श्री. आबाजी याचे अत्यंत साहाय्य झालें. त्यांचा स्वभाव अत्यंत करडा व चोख असल्याने कार्यालयाची व आयव्ययाची व्यवस्था ते नीट ठेवीत. डॉक्टरानी आपल्या दैनंदिनीत दि. ५ फेब्रुवारी १९३० या दिवशी केलेली नोंद त्याच्यासबंधीच्या कल्पनेवर उत्तम प्रकाश टाकणारी आहे. ते लिहितात कीं, " संघ स्थापन झाल्यापासून जानेवारी १९३० पर्यंतचे व तेथून आजपर्यंतचे सर्व हिशोब, कोणत्याहि चिकित्सक माणसाला काहीहि दोष काढतां येणार नाही अशा तऱ्हेने पूर्ण तपासून तयार करणे. कारण यापुढे अशा व्यवस्थितपणाची अत्यंत आवश्यकता आहे. "

पैशासंबंधींचा चोखपणा या काळात काही जणानीं तावून सुलाखूनहि पाहिलेला होता. गुरुदक्षिणेचे पैसे वाढत्या कामाला पुरे पडेनात म्हणून अनेक मित्रांकडून वर्गणीच्या रूपानें निधि उभारावा लागे. अशा एका प्रसगी, ' ऑल इंडिया रिपोर्टर 'चे एक संपादक रावसाहेब दातार याच्याकडे डॉक्टर गेले असता त्यांनीं आयव्ययाची वही पाहावयास मागितली. त्याप्रमाणे डॉक्टरानीं वही पाठवूनहि दिली. ती वही बारकाईने चाळीत असता सघस्थानावर सापडलेला एक पैसा जमेकडे नोंदविलेला पाहून त्याना समाधान वाटले व त्यानी जरा सढळ हाताने वर्गणी दिली. असाच आर्थिक व्यवहार चोख ठेवण्याकडे सर्वांनीं लक्ष द्यावें, असे त्यांचे सागणे असे.

संघटनेतील तात्त्विक गोष्टी या हलके हलके अनुभवातूनच निश्चित झालेल्या आहेत. संघाचा घोष ( Band ) आता लोकाचें लक्ष वेधून घेण्याइतका वादन-कलेंत निष्णात झाला होता. त्यामुळे सघावर लोभ करणाऱ्या व्यक्तीकडून त्याच्या-कडे होणाऱ्या समारंभांत सघाचा घोष पाहिजे, अशी मागणी डॉक्टराकडे होऊ लागली. आपल्या मंडळींना नकार देणेहि अवघड व होकार देणेहि कठीण, अशी डॉक्टराची अवस्था झाली. काही सहकाऱ्याचे म्हणणे पडले कीं, " पैसे मिळत असले तर घोष का देऊं नये ? " पण केवळ पैशाच्या मागे लागून घोष वाजविणाऱ्या स्वयंसेवकांच्या मनोवृत्तीला कमीपणा आणणे डॉक्टराना समत नव्हते. संघाचा

घोष हा स्वातंत्र्याच्या व वैभवाच्या ध्येयाकडे चाल करणाऱ्या तरुणांना साथ देण्यासाठीं गर्जत असला पाहिजे, अशी त्यांची इच्छा होती. त्यामुळेंच एका मित्रानें घरगुती समारंभासाठीं घोष देण्याची डॉक्टरांना गळ घातली असतां, त्यांनीं सांगितलें कीं, " तुमचा मुलगा देशासाठीं दिग्विजय करून आला असता तर त्याच्या स्वागतासाठीं मीं संघाचा घोष आपणहून नेला असता व देशाच्या गौरवांत भर घालणाऱ्या त्या सुपुत्राच्या आगमनाचा आनंद दाही दिशांना घुमविला असता. पण त्याच्या लग्नासाठीं, तुम्हीं, वाटेल तितके पैसे देऊं केलेत तरी हा घोष देतां येणार नाहीं. तसेंच एकाला तो दिल्यानंतर अनेक जण गळ घालूं लागतील व एकाच वेळीं अनेक जण तो मागूं लागल्यावर त्यांतील एक सोडून सर्वांना नकार देऊन अप्रसन्न करावें लागेल. " तेव्हां पैशाची दृष्टि ही लोकसंग्रहाला बाधक ठरणारी आहे, हें ओळखून डॉक्टरांनीं, संघाचा घोष हा केवळ राष्ट्रीय कार्यासाठींच वाजविला जाईल, असें निश्चित केलें.

पैसा कोठूनहि मिळाला तरी घ्यावयाचा, असें धोरण अनेक सार्वजनिक संस्थांच्या चालकांना निरुपायानें स्वीकारावें लागतें. कारण अशा कार्यांच्या पांचवीला चणचण ही पुजलेलीच असते ! पण कोठूनहि पैसा जोडीत असतां हातीं घेतलेल्या कार्याच्या पावित्र्याला कमीपणा येणार नाहीं, एवढी तरी दक्षता वास्तविक घेतलीच पाहिजे. पण केव्हां केव्हां पैशांचें स्तोम हें कार्यापेक्षांहि अधिक माजविलें जातें. १९३० पूर्वीं संघाच्या बाल्यावस्थेंत पैशांची ओढ असतांना नागपुरांतील महाल अॅमॅच्युअर क्लब व बरडीची सहकारी संस्था यांनीं अशी कल्पना मांडली कीं, त्यांच्या नाटकांच्या दर्शिका ( तिकिटें ) खपविण्याची संघ-स्वयंसेवकांनीं खटपट केल्यास त्या खेळाचें उत्पन्न आपण संघाला देऊं. जेव्हां बैठकींत ही कल्पना कार्यकर्त्यांनीं मांडली, तेव्हां डॉक्टरांनीं असंमति दर्शविली व बैठकीनंतर दोन-तीन दिवसांनीं त्या कल्पनेला स्पष्ट शब्दांत नकार दिला.

ही घटना घडली त्यानंतर लवकरच नागपुरांत ताराबाई सर्कस आली. तिच्या चालकांनीं श्री. मार्तंडराव जोग यांच्या आग्रहावरून एका खेळाचे पांच-सहाशें रुपये संघाला देणगी म्हणून दिले. त्या देणगीचा स्वीकार करतांच कांहींनीं डॉक्टरांना प्रश्न केला कीं, " आपण हे पैसे कसे स्वीकारलेत ? " त्यावर डॉक्टरांनीं दिलेलें उत्तर मननीय आहे. ते म्हणाले कीं, " सर्कस व नाटक यांत अंतर आहे. शिवाय आतां असे पैसे घेतले असेल तरी अशा पैशांवर संघाचें काम चालावें ही कल्पना मला असह्य वाटते. संघाचें कार्य हें संघ-स्वयंसेवकांच्या व संघहितैषी लोकांच्या हंसतमुखानें अर्पण केलेल्या दक्षिणेवरच निर्भर असलें पाहिजे. "

आंदोलनाचें वातावरण उत्पन्न होत असतांना डॉक्टरांना पैशाची ओढ अत्यंत जाणवत होती. संघकार्याच्या वाढत्या व्यापाला पेलून धरण्यासाठीं स्वयंसेवक व संघाचे हितचिंतक यांच्याजवळून १९३० च्या फेब्रुवारीमध्यें त्यांनीं

वर्गणी जमविलेली दिसते. हितचिंतकांसाठी काढलेल्या विनंतिपत्रकात त्यांनी म्हटलें आहे की, "......... आजपर्यंत आम्ही पैशाशिवाय काम कसे केले आहे हे आम्हांलाच माहीत; परंतु यापुढे मात्र संघाला पैशाशिवाय कार्य करता येणें शक्य नाही, हें अत्यत नम्रतापूर्वक आम्ही आपणाला कळवूं इच्छितो. याकरितां उदार-मनस्क लोकापासून देणग्या घेऊन एक मोठा निधि जमवावयाचा आहे. पण तूर्त आम्ही मासिक वर्गणी मागण्याकरिता बाहेर पडलेले आहोत व आपल्या उत्पन्ना-पैकी एक दिवसाचे उत्पन्न आपण आम्हाला मासिक वर्गणीच्या रूपानें द्यावे व आम्हाला उपकृत करावे, अशी आपणांला अत्यंत कळकळीची विनंति आहे. ही जरी आमची विनंति असली तरी आपण हंसतमुखाने जे द्याल, त्याचा आम्ही आनंदाने स्वीकार करूं."

स्वयंसेवकांपासूनहि त्या वर्षीं पैसे उभारावे लागले होते. त्याच्यापासून वय व मिळकत या प्रमाणांत काय अपेक्षा आहेत याचे नियम डॉक्टरानी ज्या कागदावर लिहिले आहेत, त्याच्या शेवटीं दोन सूचनाहि त्यानीं लिहून ठेवलेल्या आढळतात. त्या सूचनांवरून एक गोष्ट अगदीं स्पष्ट होते की, वर्गणीची सक्ती नाहीं. पण भक्तीने व आत्मीयतेने कोणी कितीहि धन दिले तरी ते अपुरें पडेल अशी निकड त्या वेळीं जाणवत होती. ते लिहितात की, "......... वर नमूद केलेल्या कोणत्याहि दराप्रमाणे ज्याला वर्गणी देणे शक्य नसेल त्याने त्याप्रमाणे चालकास कळविल्यास त्याचेपासून वर्गणी मुळीच घेण्यात येणार नाहीं. संघाचा स्वयंसेवक होण्याकरिता वर्गणी हें आवश्यक कलम नाही." याखालील 'विशेष सूचना' अशी आहे कीं, "वर दिलेले वर्गणीचे दर अत्यंत कमीत कमी असे दर आहेत. त्याच दराला चिकटून राहण्याची आवश्यकता नाहीं. इतकेंच नव्हे तर प्रत्येकानें या महान् कार्याकरितां जास्तींत जास्त सापत्तिक त्याग करण्याला सिद्ध होऊन जितकी जास्त वर्गणी देता येईल तितकी देणे अत्यंत आवश्यक आहे." ही पैशाची विशेष जमवाजमव करीत असतांनाहि डॉक्टरांनी मिळणाऱ्या पैशामागें देणाऱ्याच्या मनाची प्रसन्नता कशी टिकेल, यासाठी ही घेतलेली दक्षता पाहिली कीं त्यांच्या लोकसंग्राहक स्वभावाची सहज कल्पना येते.

हिंगणघाटच्या पिस्तुल प्रकरणापासून संघकार्याकडे सरकारची संशयी नजर वळलेली स्पष्ट दिसूं लागली होती व त्यात सरकारविरोधी आदोलनहि सुरू होणार, असे डॉक्टरांना स्प्रष्ट दिसूं लागले. डॉक्टर हे संघ चालवीत असले तरी त्यांचा पूर्वेतिहास ध्याना घेऊन सरकारने अशी अटकळ बाधली होती की, आंदोलन सुरू झाल्यास डॉक्टर त्यात अवश्य उडी घेतील; म्हणून त्याच्या धोरणासंबंधींचे कानोसे घेण्याचे प्रयत्न सुरू झाले. अर्थात् सरकारच्या या हालचालीचा सुगावाहि डॉक्टरांना लागला होता. त्यांना स्पष्ट दिसूं लागलें कीं, देशव्यापी आंदोलन सुरू झाल्यास सरकार कांहीं ना कांही खुसपट काढून आपणांला अटकेंत टाकील व मग आपल्या

राहत्या घरांत संघाच्या चालणाऱ्या बैठका व कार्यालय सुरू ठेवणें अशक्य होईल' अशा वेळीं घोटाळा होऊं नये म्हणून त्यांनीं मोहिते वाड्याजवळच वॉकर रस्त्यालगत असलेल्या दशोत्तरांच्या वाड्यांत कार्यालयासाठीं स्वतंत्र जागा भाड्यानें घेतली. त्यासाठीं लागणारें वीस रुपयांचें मासिक भाडें परस्पर उभारलें जावें, अशीहि व्यवस्था करण्यास ते विसरले नाहींत. बाह्यतः ही विद्यार्थ्यांची जागा आहे, असें दाखविण्यासाठीं श्री. तुंबडे व श्री. वाटवे या दोन विद्यार्थी स्वयंसेवकांना तेथें ठेवण्यांत आलें.

१९३० च्या प्रारंभापासूनच म. गांधींनीं 'यंग इंडिया' पत्रांतून सत्याग्रहाला आवश्यक असा प्रचार धूमधडाक्यानें सुरू केला होता व त्यांत "सत्याग्रहाची चळवळ सुरू करण्यांत आल्यानंतर देशांतील एखाद्या भागांत अत्याचार घडले तरीहि ती चळवळ स्थगित करण्यांत येणार नाहीं," असें धोरण स्पष्ट केल्यानें सरकार अधिकच गोंधळलें. व्हाइसरॉयशींहि त्यांचा पत्र-व्यवहार सुरू होता. शेवटीं म. गांधींनीं केलेल्या मागण्या पूर्ण होणार नाहींत, अशीं चिन्हें दिसतांच त्यांनीं दि. १२ मार्चला साबरमती आश्रमांतून एकोणऐंशी सत्याग्रहींसह मिठाचा निर्बंध मोडण्यासाठीं समुद्रकांठीं दांडी येथें जाण्यासाठीं प्रस्थान ठेवलें. दोनशें मैल पायीं प्रवास व प्रचार करीत ही दांडी-यात्रा दि. ५ एप्रिलला त्यांनीं पुरी केली व दि. ६ ला सकाळीं समुद्रस्नान करून महात्माजींनीं मीठ गोळा करून सत्याग्रहाचें शिंग फुंकलें. यानंतर देशांत सर्वत्र धरपकड सुरू झाली व दडपशाहीला ऊत आला. पण तें आव्हान स्वीकारीत लक्षावधि जनता स्वाभिमामानें उभी राहिली व "नहीं रखनी! नहीं रखनी! सरकार जालीम नहीं रखनी!" या घोषणेनें वातावरण भरून गेलें!

* * *

## १७ : जंगल सत्याग्रह

मिठाचा सत्याग्रह सुरू झाल्यापासून एकूण देशपरिस्थितीकडे डॉक्टरांचें विशेष लक्ष होते. इंग्रजाविरुद्ध आदोलन सुरू झाले, याचा डॉक्टरांना आनंदच झाला होता व तो त्यांच्या बोलण्या-लिहिण्यातून उमटल्यावांचून राहत नसे. पण त्यांनी हाती घेतलेलें राष्ट्र-उत्थापनाचे चिरंतन कार्य हे त्या वेळी दिसावयास लहान असल्याने चळवळीच्या लाटेत त्याची उपेक्षा होणे अशक्य नव्हते. सर्वसामान्यपणें भावनेच्या आहारी जाऊन वागणारी व्यक्ति ही केवळ क्षणजीवी वर्तमानकाळा-पुरताच विचार करते. पण ज्यांनी दूरदृष्टीने पाच-पन्नास वर्षांचाच नव्हे तर पुढील शेकडो वर्षांचा इतिहास आपल्या कल्पनेप्रमाणे वैभवसंपन्न, अभिमानास्पद व आनंदमय करण्याच्या निश्चयाने पाऊल उचललेले असते, त्यांना कार्याचा 'नित्य' व 'नैमित्तिक' असा नीट विवेक करूनच चालावे लागते. असा विवेक डॉक्टरानी केलेला होता.

आदोलन सुरू झाल्यावर त्यांच्या सहकाऱ्याकडून विचारणा होऊं लागली की, सत्याग्रहासंबधी संघाचे धोरण काय? त्यावर डॉक्टरानी एक पत्रक काढून सर्वांना कळविले की, "......चालू चळवळीत सघाने सघशः भाग घेण्याचे तूर्त ठरविलें नाही. व्यक्तिशः ज्या कोणास भाग घेणे असेल त्याने आपल्या सघ-चालकाच्या अनुमतीने भाग घेण्यास हरकत नाही. संघाच्या कार्यास पोषक होईल अशा रीतीनेच त्याने कार्य करावे."

अशा वातावरणांतच नेहमीचा अधिकारी शिक्षणवर्ग वाढत्या संख्येने पार पडला व डॉक्टराच्या विशेष सहवासात असलेल्या 'कुश' पथकातील बहुतेक तरुण कार्यकर्ते संघाचे सर्व क्रमिक शिक्षण पूर्ण करून स्वतःच्या बळावर कोठेहि संघ चालवूं शकतील असे निष्णात होऊन बाहेर पडले. हा वर्ग चालू असताना डॉक्टरानी आपल्या मनातील शुश्रूषापथक उभारण्याची कल्पना साकार करण्याची योजना आंखली. डॉ. पराजपे याच्या विचाराने नागपूर, बिलासपूर, भंडारा, चादा, वर्धा, हिंगणी, सेलू, आंजी, अल्लीपूर, नाचणगांव, सालोडफकीर, आर्वी, खापा व धनोडी इतक्या ठिकाणीं संघस्वयसेवकांची प्रथमोपचाराची पथके उभारण्याची योजना त्यानी आखली होती, असे कागदपत्रावरून दिसते. त्यातील किती ठिकाणी ती मूर्त रूपास आली हे निश्चित सागणें आज कठीण आहे. पण

नागपुरांत मात्र शंभर तरुणांचें एक शिस्तबद्ध पथक शिक्षण देऊन उभें करण्यांत यश आलें होतें.

रा. स्व. संघाच्या निघणाऱ्या प्रत्येक मिरवणुकीबरोबर व होणाऱ्या मोठ्या कार्यक्रमाच्या वेळीं स्वतःचें शुश्रूषापथक पाहिजे, असा त्यांचा कांहीं दिवस आग्रह सुरू होता. नियोजित शिस्तबद्ध कार्यक्रमांत कोणी घेरी येऊन पडला वा कोणाला प्रथमोपचार करण्याची आवश्यकता जाणवली, तर त्या विषयांतील गंध नसणाऱ्या लोकांची त्या वेळीं होणारी धांवपळ ही त्या शिस्तीला मारक ठरते, असें त्यांचें म्हणणें असे. यासाठीं आयत्या वेळीं अनभिज्ञ लोकांची घाबरट धांवपळ होण्याऐवजीं जाणत्या शिक्षित पथकापासून बिनबोभाट योग्य ते उपचार होणें त्यांना आवश्यक वाटे. त्यासाठीं त्यांच्या डोळ्यांसमोर असलेलें उदाहरण ते आवर्जून सांगत असत. दिल्लीमध्यें व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज यांच्यावर बॉम्ब फेकण्यांत आला असतां मिरवणुकींत तेथल्या तेथें त्याला मलमपट्टी करण्यांत आली; तशी आदर्श व्यवस्था संघांत असावी, या कल्पनेंतूनच त्यांनीं हीं पथकें उभारलीं होतीं. याच वेळीं ना. बोस यांच्याकडून गळ्यांत अडकविण्याजोग्या पाण्याच्या पिशव्या ( water bags ) संघाला देणगी म्हणून मिळाल्यानें या पथकाची एक उणीव अनायासें दूर झाली.

अधिकारी शिक्षणवर्ग समाप्त झाल्यावर कांहीं जणांनीं व्यक्तिशः सत्याग्रहांत जाण्याची डॉक्टरांजवळ अनुमति मागितली. एखाद्याची उत्सुकता असल्यावर त्याला डॉक्टर नकार देतील ही शक्यताच नव्हती. पण कांहीं तरुण संघकार्याच्या दृष्टीनें बाहेर राहणेंच आवश्यक असल्यानें अशांपैकीं ज्यांनीं विचारणा केली त्यांना डॉक्टर विचारूं लागले कीं, “ किती दिवसांची सिद्धता करून निघाला आहेस ? ” त्याच्याकडून ‘ सहा महिने ’ अशासारखें उत्तर येई. त्यावर डॉक्टर म्हणत कीं, “ सहा महिन्यांच्या जागीं दोन वर्षें शिक्षा झाली तर ? ” या त्यांच्या प्रश्नाला चटकन् उत्तर मिळे कीं, ‘ भोगीन ! ’ इतकी सिद्धता दाखविली कीं, डॉक्टर त्याला सांगत असत कीं, “ आपणांला शिक्षा झाली आहे असें समजून हा काळ संघ-कार्याला कां देत नाहींस ? ” अर्थात् या प्रश्नामागील आशय ध्यानीं घेऊन जाणते तरुण वागत असत. पण अशा तरुणांची संख्या अर्थातच मोजकी असे. डॉक्टरांनीं शेंकडों तरुणांना जाण्यास अनुमति दिली. पण ती अनुमति देत असतांना आपल्या कार्याच्या जिवंत तळमळीपेक्षां ‘ आपण कांहींतरी केलें ’ असें मिरविण्यास मिळेल अशी जाण्यामागें डोकावणारी लालसा तरुणांत अधिक असलेली पाहून त्यांना दुःख होई. अशा तरुणांनाहि वरील प्रकारचे प्रश्न विचारून केवळ भावनावशतेनें आंदोलनांत उडी न घालतां ते विचारपूर्वक संमीलित व्हावेत अशी ते दक्षता घेत.

संघाचें शुश्रूषापथक आंदोलनांत निघणाऱ्या प्रचंड मिरवणुकांबरोबर राहूं लागलें व सत्याग्रहांतहि व्यक्तिशः भाग घेण्याला प्रारंभ झाला. या वेळीं सार

समाज घुसळून निघेल व देशासंबंधींची खरोखर आंच असलेले कार्यकर्ते कारागृहातून अनायासें एकत्र होतील, ही गोष्ट डॉक्टरांना स्पष्ट दिसत होती. असे आपल्या समाजातील होतकरू ' तरुण देशभक्त ' एकत्रित होत असतां आपणांला जर त्याच्या सहवासांत राहण्याची सुसंधि साधता आली तर गावोगाव एकेका व्यक्तीला हुडकीत बसण्यापेक्षा ते संघाच्या दृष्टीने लाभदायक ठरेल, हे त्यानी ओळखले. त्याचप्रमाणे इंग्रजांविरुद्ध अशा असंतोषाचा अग्नि चेतवला जात असता या पवित्र यज्ञात आपणहि काही समिधा टाकाव्यात, असा विचार डॉक्टरासारख्याना न सुचता तरच नवल होते. संघाचे नेहमीचे स्वीकारलेले कार्य अबाधितपणे चालू राहील, अशी योजना करून देशोद्धारासाठी होणाऱ्या कार्याला होईल तितके साहाय्य देण्यास ते चुकत नसत. दृष्टान्त देऊन सांगावयाचे तर आपल्या गावावरून आळदीची पालखी पंढरपूरला जात असेल व प्रारंभापासून शेवटपर्यंत त्या पालखीबरोबर राहणे आपल्या हाती असलेल्या कामामुळे शक्य नसेल तर एका वेशीपर्यंत त्या पालखीला सामोरे जाण्यास व दुसऱ्या वेशीपर्यंत त्या दिंड्या-पताकात रंगून जाऊन पालखीला निरोप देण्यास ते चुकत नसत.

हिंगणघाट स्थानकाच्या लुटीच्या प्रकरणाचा निर्णय लागल्यावर संघाच्या प्रमुख अधिकाऱ्यामागील गुप्तहेराचा सुळसुळाट गेल्या दीड-दोन वर्षांत कमी झाला होता, तरी कांही सरकारी अधिकारी थोड्याशा संशयित दृष्टीने पहात असल्याचा प्रत्यय अधून मधून येत असे. अशा स्थितीत काही दिवस जर आपण अधिकाऱ्याच्या डोळ्याआड झालो तर या प्रकरणापासून निष्कारण गढूळ झालेले वातावरण आपोआप निवळेल, या कल्पनेने श्री. आप्पाजी जोशी यानी १९३० च्या मार्चपासून एक-दोन वेळा डॉक्टराना कळविले की, " मला सत्याग्रहात भाग घ्यावासा वाटतो. " त्यावर " वर्ग संपल्यावर पाहूं " असे उत्तर डॉक्टरानी दिले. यानंतर वर्गाच्या वेळी आप्पाजींनीं तोच विषय काढला असता प्रकृति व संघाचे वाढते काम ही कारणे पुढे करून सत्याग्रहात भाग घेण्यास डॉक्टरानी असंमति दर्शविली होती. आता वर्ग संपल्यावर पुन्हा खडा टाकून पहावा म्हणून आप्पाजीनी डॉक्टराना पत्र लिहिले. त्याला डॉक्टराकडून उत्तर गेले की, " तुमच्याबरोबर मीहि सत्याग्रहात येतो. " केवळ होकार न देता आपणहि बरोबर येतो असे डॉक्टरांनी रागात लिहिले असावे, असे आप्पाजींना वाटले आणि त्यानीं नागपूरला जाऊन त्याची समक्ष भेट घेतली. त्या भेटींत डॉक्टराचा सर्व मनोदय आप्पाजी-च्या ध्यानी आला.

सत्याग्रह सुरू होऊन तीन महिने झाले असताना समुद्रापासून पाचसहाशे मैलावर असलेल्या मध्य प्रदेशांतील अनेक जणाना मीठ गोळा करण्यासाठी इतके दूरवर जाणे दिवसेंदिवस अवघड वाटूं लागलें. एवीतेवी इंग्रजाचे निर्बंध आम्ही मानीत नाहीं असा निर्धार सामुदायिक पद्धतीनें प्रकट करणे हाच सत्याग्रहाचा

प्रधान हेतु होता. तो ध्यानांत घेऊन आपल्या प्रांताला जाचक ठरणारे जंगला-संबंधींचे निर्बंध आपण मोडावेत, असा विचार मूळ धरूं लागला. तसें पाहिलें तर १९१७ मध्यें सरकारनें चराऊ रानें राखीव वनविभागांत समाविष्ट केल्यापासून जनमनांत असमाधान होतें व त्याला वाचा फोडण्यासाठीं लोकमान्य टिळकांच्या पंचायतनांतील एक अग्रगण्य पुढारी श्री. माधवराव अणे यांनीं तेव्हांपासूनच रीतसर चळवळ चालविली होती. सरकारपुढें वेळोवेळीं केलेल्या निवेदनांत ते सांगत असत कीं, "......जंगलांचें संरक्षण व व्यवस्था हीं मुख्यतः सरकारी तिजोरींत भर टाकण्याचें साधन समजून करावयाचीं नाहींत, तर प्रथमतः शेतकरी-वर्गाची सोय पहावयाची; त्यांचीं गुरेंढोरें यांना पोटभर चरूं द्यावयाचें; त्यांना लागणारें गवत, सरपण, लाकूडफाटा हीं सवलतीच्या दरानें पुरवावयाचीं आणि एवढें झाल्यानंतर बाकीच्या जंगलामधून निघेल तें उत्पन्न सरकारनें घ्यावयाचें, असें झालें पाहिजे." अर्थात् हीं निवेदनें म्हणजे बहिरेपण स्वीकारलेल्या व्यक्तीच्या कानांत ओरडण्यासारखेंच होतें किंवा परिणामाचा विचार करतां त्याला 'अरण्य-रुदन' म्हणणें हेंहि युक्तच ठरलें असतें !

हा १९१७ पासून हाताळलेला प्रश्न या निमित्तानें धसास लावावा, अशी निश्चिति करून श्री. माधवराव अणे यांनीं जंगल-सत्याग्रहाची सिद्धता केली. पू. डॉक्टर हेडगेवार व श्री. आप्पाजी जोशी यांनीं याच वेळीं आंदोलनांत उडी घेण्याचा निर्णय केला होता. एकाच टिळक गटांतील असल्यानें त्यांचे श्री. अणे यांच्याशीं अगदीं निकटचे व जिव्हाळ्याचे संबंध होते. तेव्हां स्वाभाविकच आपल्याच प्रांतांत जंगल सत्याग्रह सुरू होत आहे, तर त्यांतच आपण समाविष्ट व्हावें, असें डॉक्टरांनीं ठरविलें. समुद्रकांठीं कोठें तरी जाऊन निर्बंध मोडतां आला असता. पण एकाच गोष्टींतून दोन उद्देश साधावेत, असा डॉक्टरांनीं विचार केला. ज्या श्री. माधवराव अणे यांनीं डॉक्टरांना त्यांच्या विद्यार्थिदशेंत आधार दिला होता, त्यांच्या नेतृत्वाखालीं संग्रामांत उडी घेण्यांत डॉक्टरांना विशेष अभिमान वाटत होता. याचप्रमाणें अकोला, यवतमाळ, खामगांव, पुसद, अमरावती या भागांत संघाचें लोण अजून पोहोंचलें नव्हतें व या निमित्तानें कारागृहांत येणाऱ्या कार्यकर्त्यांना आत्मसात् करून वऱ्हाडांतहि प्रवेश करतां येईल, असा विश्वास त्यांना वाटत होता.

पू. डॉक्टरांनीं असा विचार निश्चित केल्यावर कारागृहांत गेल्यावर संघकार्य अगदीं व्यवस्थितपणें प्रगत होत रहावें, अशी योजना आंखून त्याची कल्पना त्यांनीं आपल्या सहकाऱ्यांना देऊन ठेवली. त्यांत नागपूरच्या कामाची धुरा व्यवहारतः श्री. बाबासाहेब आपटे व श्री. बापूराव भेदी यांच्याकडे सोपवून आपल्या जागीं सरसंघचालक म्हणून डॉ. परांजपे यांनीं काम पहावें असें योजून दिलें. ही नवी योजना सर्वांना विदित करून आपली आंदोलनांत भाग घेण्यामागील

भूमिका स्पष्ट करणे डॉक्टरांना आवश्यक वाटत होते. ती गोष्ट त्यांनी १९३० च्या दि. १२ जुलैला झालेल्या गुरुपौर्णिमेच्या उत्सवांत जे भाषण केले त्यांतून घडवून आणली.

या उत्सवात अध्यक्ष म्हणून भाषण करताना, डॉ. हेडगेवार हे काही सहकाऱ्यासह भाग घेणार असल्याचे सर्वांना विदित करून डॉ. ल. वा. परांजपे म्हणाले की, " ज्यास त्यात भाग घ्यावयाचा असेल त्यानी अवश्य भाग घ्यावा. इतरानी मात्र या तरुण सघटनेच्या कार्यास हातभार लावावा. सध्याची चळवळ ही राष्ट्राला पुढे नेणारी आहे यात शका नाही; पण ती केवळ स्वातंत्र्याच्या मार्गावरची पहिली पायरी आहे. राष्ट्रस्वातंत्र्यासाठी सर्व आयुष्य खर्च करणारी माणसे संघटित करणे हेंच खरे कार्य आहे."

उत्सवाच्या शेवटी आभार मानतांना डॉक्टरानी आपली भूमिका स्पष्ट केली की, " मी आता आभार मानून खाली बसलों की यापुढे संघाचा चालक नाही. डॉ. परांजपे यांनी या संघाचे चालकत्व आपल्या शिरावर घ्यावयाचे कबूल केले आहे. याबद्दल सघाच्या वतीने मी त्याचे हार्दिक आभार मानतो. आता आम्ही सर्व मंडळी जी या चालू लढ्यात भाग घेण्याकरिता जात आहों ते केवळ वैयक्तिक जबाबदारीवर जात आहों. संघाची मते व कार्य करण्याचे मार्ग यांत कांहीहि बदल झालेला नाही किंवा आमची त्यातील श्रद्धाहि ढळलेली नाही. देशात ज्या अनेक चळवळी चालू असतील, त्याची आतून व बाहेरून माहिती करून घेणे व त्याचा उपयोग आपल्या कार्याकडे करून घेणे हे देशस्वातन्त्र्यार्थ झटणाऱ्या कोणत्याहि संस्थेचे कर्तव्य आहे. सघातील जे लोक आजवर या चालू लढ्यात पडले आहेत व आज आम्ही जे पडत आहोंत ते याच हेतूने."

" जेलमध्ये जाणे हे आज देशभक्तीचे लक्षण झाले आहे; पण जो मनुष्य दोन वर्षे जेलमध्ये जाण्यास तयार असतो त्यालाच जर बायका-पोराची व घरादाराची दोन वर्षे सुट्टी घेऊन देशात स्वातंत्र्योन्मुख संघटनेचे कार्य करावयास तयार हो असे म्हटले तर कोणीहि तयार होत नाही. असे का व्हावे? तर, देशस्वातंत्र्य हें वर्ष-सहा महिने कार्य करून नव्हे तर वर्षानुवर्षे सतत सघटनेचे कार्य केल्यानेंच मिळूं शकेल, ही गोष्ट समजून घ्यावयालाच लोक तयार नाहीत. ही हंगामी देशभक्ति आम्ही टाकून दिल्यावाचून व देशासाठी मरावयाची सिद्धता ठेवावयाची, पण देशस्वातंत्र्यार्थ संघटनेचे प्रयत्न करीतच जगावयाचे, असा निश्चय केल्यावाचून देशाला बरे दिवस येणार नाहीत. ही वृत्ति तरुणात उत्पन्न करावी व त्याची संघटना करावी, हेच या संघाचे ध्येय आहे."

या भाषणानंतर संघाचे सरसेनापति मार्तंडराव जोग यानी डॉक्टर व त्यांच्याबरोबर जाणारे इतर कार्यकर्ते यांना पुष्पहार समर्पण केले. अशी निरवानिरव झाल्यावर दि. १४ जुलैला सायंकाळीं डॉक्टरांच्या तुकडीनें नागपूर सोडलें.

त्या वेळीं त्यांना निरोप देण्यासाठीं स्थानकावर दोन-तीनशें मंडळी जमली होती. त्यांत सरसंघचालक डॉ. परांजपे, श्री. ढवळे वकील व बॅ. गोविंदराव देशमुख आदि स्नेही प्रामुख्यानें दिसत होते. अनेक जणांनीं हार घालून डॉक्टरांना चार शब्द सांगण्याचा अत्याग्रह केला. तेव्हां डॉक्टर म्हणाले कीं, "चालू लढा हाच स्वराज्याचा अंतिम लढा आहे व तोच तुम्हांला स्वातंत्र्य देईल, या भ्रमांत राहूं नका. याच्यापुढें खरा लढा लढावयाचा आहे व त्यांत सर्वस्व अर्पण करून उडी घेण्याची तयारी करा. आम्हीं आणि इतरांनीं या लढ्यांत भाग घ्यावा याचें कारण असें आहे कीं, तो आपलें पाऊल स्वातंत्र्याच्या मार्गावर पुढें नेईल, असा मला भरंवसा वाटतो." त्या दिवशीं गाडीनें ते वर्धा येथें गेले.

दुसऱ्या दिवशीं ( आषाढ वद्य ५ ) दि. १५ जुलैला सकाळीं डॉक्टर व त्यांचे सहकारी यांचा श्रीराममंदिरांत सत्कार झाल्यावर स्थानकापर्यंत मिरवणूक काढण्यांत येऊन वाटेंत शेंकडों ठिकाणीं हार घालून आरत्या ओवाळण्यांत आल्या. डॉक्टर गाडींत चढले तेव्हां त्यांना प्रेमाचा निरोप देण्यासाठीं त्यांचे आर्वीचे मित्र श्री. नारायणराव देशपांडे व त्र्यंबकराव देशपांडे हे उपस्थित होते. त्यांना डॉक्टरांनीं 'चला' असें म्हणतांच त्यांनीं तेथूनच डॉक्टरांबरोबर प्रयाण केलें. आपण असे परस्पर निघून गेल्यानें पुढील कांहीं महिन्यांची घरची व्यवस्था काय होईल, असा विचार करीत न बसतां नेत्याच्या शब्दाप्रमाणें आचरण करण्यांतच जीवनाची धन्यता व सार्थकता वाटावी, असे मित्र डॉक्टरांच्या चारित्र्यामुळें त्यांच्यासभोंवतीं उभे राहिले होते. वर्ध्यानंतर पुलगांव, धामणगांव आदि ठिकाणीं स्वागत झाल्यावर मोटारीनें ही तुकडी जंगल सत्याग्रहासाठीं पुसद येथील प्रमुख ठिकाणीं येऊन प्रविष्ट झाली. या वेळीं डॉक्टरांच्या बरोबर श्री. आप्पाजी जोशी, 'महाराष्ट्रा'चे सध्यांचे संपादक श्री. बाळासाहेब ढवळे, श्री. दादा परमार्थ, श्री. विठ्ठलराव देव, श्री. वेखंडे, श्री. घरोटे, श्री. भय्याजी कुंबलवार, आर्वीचे श्री. अंबाडे व श्री. नारायणराव देशपांडे, सालोडचे श्री. त्र्यंबकराव देशपांडे व चांद्याचे श्री. पालेवार अशी मंडळी होती. त्या ठिकाणीं शिबिरांतील जेवणांत पोळीबरोबर असणारी भाजी अत्यंत तिखट असल्यामुळें डॉक्टरांबरोबर कांहीं जण 'हाय ! हूय ! !' करूं लागले, तेव्हां डॉक्टर हंसत म्हणाले कीं, "इथें जर धड जेवण करीत नाहीं तर तुरुंगांत तुम्ही काय कराल ?"

ही मंडळी सत्याग्रहासाठीं पुसदला आल्यावर तेथील केंद्रचालकांचें असें म्हणणें पडलें कीं, या तुकडींत अनेक जण अशा तोलाचे आहेत कीं, जे निरनिराळ्या तुकड्यांचें नेतृत्व करूं शकतील. तेव्हां या तुकडीनें स्वतंत्र सत्याग्रह करूं नये. पण प. पू. डॉक्टरांबरोबर निर्बंध मोडण्यांत त्या मंडळींना विशेष समाधान वाटत असल्यानें स्वतंत्र नेतृत्वापेक्षां डॉक्टरांच्या तुकडींतील अनुयायित्व बरें, असाच सर्वांचा सूर दिसून आला. तेव्हां दि. २१ जुलैला यवतमाळ येथें या तुकडीनें

सत्याग्रह करावा, असे ठरविण्यांत आले. पुसदचा सत्याग्रह लोकनायक अणे यांच्या हस्ते सुरू झाला होता; तेव्हां यवतमाळच्या आंदोलनाचा शुभारंभ डॉ. हेडगेवारांसारख्या थोर व्यक्तीच्या हातून होणे तेथील संचालकांना उचित वाटले.

सत्याग्रहाचा दिवस ठरविल्यावर तिसऱ्या दिवशी ही तुकडी दारव्हा–पुसद या भागांत प्रचारासाठी पाठविण्यांत आली. याच मध्यतरीच्या पांच-सहा दिवसात आपला सत्याग्रहाचा मानस लो. बापूजी अणे यांना विदित करण्यासाठीं ही मडळी कारागृहात भेटीसाठी गेली होती. त्या वेळची आठवण सागताना लोकनायक बापूजी अणे मजजवळ म्हणाले की, "वेळप्रसगी दुष्टाचे मनगट फोडूं शकतील असे दणकट व खणखणीत तरुण डॉक्टर हेडगेवाराच्या तुकडींत पाहून मला धन्यता व समाधान वाटले!"

पुसदला आल्यावर दुसऱ्याच दिवशी सकाळी प्रातर्विधि उरकून नदीवरून परतत असतां वाटेंत गोठाणावर एक तरणीताठी गाय हातात धरून उभे असलेले दोन मुसलमान मुलगे डॉक्टराना दिसले. डॉक्टरानी औत्सुक्याने "गाय कोठे चालविली?" अशी चौकशी करताच त्यांना उत्तर मिळाले की, "आम्ही थोड्याच वेळाने तिची येथें कुर्बानी करणार आहोत." सकाळच्या वेळी लोकाच्या जाण्या-येण्याच्या हमरस्त्यावर भर हिदु वस्तीच्या गावांत अशी गायीची हत्या ही कल्पनाच डॉक्टरांना असह्य होती. तेव्हां डॉक्टरानी तिची किंमत विचारली. तेव्हां त्या मुलांनीं सांगितले की, "गाय १२ रुपयाना आम्ही घेतली; पण आमचा खाटकाचा धंदा असल्याने आम्ही ती विकणार नाही." इतक्यात म्हातारा खाटिक तेथे आला. "अशी उघड्यावर गाय मारता काय?" असा डॉक्टरानी त्याला प्रश्न विचारताच, "हो, वर्षानुवर्षे आम्ही येथे गाई मारत असतो व मासाचे रतीब पुरवतो" असे थंडपणाने त्याने उत्तर दिले. "मासाचे किती रुपये येतील?" असा प्रश्न करून "तेवढे पैसे मी देतो, पण हिला मारूं नका" असे डॉक्टरांनी सागून पाहिले. तोंवर आणखी काही मुसलमान तेथे जमा झाले. त्यानी मासाचे पंचवीस-तीस रुपये येतील असे सागताच डॉक्टरांनी तेवढे रुपये देण्यास होकार दिला. पण खाटिक काही केल्या गाय देण्यास उत्सुक नव्हता. "मी तुमच्या देखत येथेच गाय मारणार, तुमचे पैसे काय करावयाचे?" असा ताठा त्याच्या बोलण्यांतून उमटताच डॉक्टरानीं त्या गाईचे दावें आपल्या हातांत घेतले व आपल्या घोगऱ्या, उग्र व गंभीर स्वरात ते म्हणाले की, "माझा प्राण घेतल्याशिवाय तुम्हाला या गाईचा प्राण घेता येणार नाही!" ते रूप पाहून त्यांतील काही मुसलमान गांवातील काहीं प्रतिष्ठिताना बोलावून घेऊन आले. त्यांनीं डॉक्टराना परोपरीनें वळविण्याचा प्रयत्न केला. त्या सर्वांचा सूर एकच होता की, "येथे गाय मारण्याची प्रथाच आहे, तेव्हां गाईला वांचविण्याचा हट्ट सोडून द्या." अनेक वर्षांच्या पारतंत्र्यातील कुसंस्कारांनीं अशी बोथट, स्वाभिमानशून्य व पडखाऊ-

वृत्तीचीं नेभळीं माणसें पुढारी बनलेलीं पाहून डॉक्टरांचें अंतःकरण दुःखानें व्यथित झालें. इतक्यांत एका गृहस्थांनीं पुढें येऊन डॉक्टरांना प्रश्न केला कीं, तुम्ही जंगल सत्याग्रहासाठीं येथें आलांत नि असल्या फालतू गोष्टींत कसलें लक्ष घालतां ?" तेव्हां डॉक्टर उसळून म्हणाले कीं, "हिंदूंना पूज्य वाटणाऱ्या गाईचें रक्षण ही अशी फालतू गोष्ट आहे काय ? जंगल सत्याग्रह केला काय नि गाईसाठीं सत्याग्रह केला काय, मला दोन्ही सारखेच आहेत."

इतक्यांत आरक्षकाधिकारी तेथें आले व 'झगडा उत्पन्न होईल असें करूं नका,' असें डॉक्टरांना विनवूं लागले. तेव्हां डॉक्टर म्हणाले कीं, "पंचवीस-तीस रुपये द्यावयास तयार असतां ह्या माणसाचा आमच्यादेखत गाय मारण्याचा हट्ट कां ? तेव्हां पुन्हा एकदां स्पष्टपणें सांगतों कीं, मी व माझें पथक जिवंत असेपर्यंत गाय मारूं देणार नाहीं." हें प्रकरण इतक्या थराला जातांच अधिकारी म्हणूं लागले कीं, "कोणीच पड खाणार नसेल तर तंटा माजेल. यासाठीं मी दोघांनाहि पकडून ठेवतों. या धमकावणीचें भय डॉक्टरांना मुळींच नव्हतें. ते तर प्राणांवर उदार झाले होते. त्यांना पकडण्याची भीति दाखविणें म्हणजे वीरापुढें बागुलबोवा बनून जाण्यासारखेंच हास्यास्पद होतें. पण या धमकावणीनें मुसलमान नरमले. डॉक्टरांनीं ती गाय तीस रुपयांस सोडविली व तेथील गोरक्षण संस्थेला भेट म्हणून दिली.

या सकाळींच घडलेल्या प्रसंगानें गांवांत ज्याच्या त्याच्या तोंडीं डॉक्टरांचें नांव झालें होतें व त्यामुळें रात्रीं श्री. कानडेशास्त्री यांच्या अध्यक्षतेखालीं झालेल्या प्रचारसभेला मनस्वी गर्दी झाली. त्या सभेंत डॉक्टरांच्या तेजस्वी देशभक्तीची कानडेशास्त्री यांनीं मुक्तकंठानें स्तुति करून त्यांचा एक क्रांतिकारक म्हणून परिचय करून दिला. आप्पाजी व दादा परमार्थ यांचींहि या सभेंत भाषणें झालीं. नंतर डॉक्टर बोलावयास उठले. झगझगीत निखाऱ्यासारखा एक एक शब्द मुखावाटे बाहेर पडावा असाच त्यांच्या वक्तृत्वाचा त्या दिवशीं रंग होता. त्यांतील एक विचार अजूनहि कांहीं जणांच्या स्मरणांत दिसतो. ते म्हणाले होते कीं, "......स्वराज्याकरितां इंग्रजांच्या बुटाला पॉलिश लावण्यापासून तों त्यांच्या पायांतील बूट काढून त्यांचें डोकें रक्तबंबाळ होईपर्यंत त्यांना सडकून काढण्यापर्यंतचे सर्व मार्ग माझ्या स्वराज्यप्राप्तीच्या व्यवहारांत बसूं शकतात. कोणत्याहि मार्गासंबंधीं माझ्या मनांत तिरस्कार नाहीं. इंग्रजांना हांकलून देऊन देश स्वतंत्र करणें एवढी एकच गोष्ट मी जाणतों."

पुसदहून सर्व जण यवतमाळला आल्यावर डॉक्टरांबरोबर असलेल्या दोनचार जणांनीं असा हट्ट धरला कीं, आपण संघाचा गणवेष अंगावर घालून मगच सत्याग्रह करावयाचा. त्यावर खूप चर्चा व वादविवाद झाला व एक-दोन जणांनीं तर आपला गणवेष गांवाहून मागविण्यासाठीं तार करण्याची सिद्धता केली. तार

लिहून होईपर्यंत डॉक्टर काहीएक न बोलतां सर्वांचा वादविवाद लक्षपूर्वक ऐकत होते. पण तार लिहून झालेली पाहून डॉक्टरांना स्वस्थ राहवले नाही. ते म्हणाले की, " संघाच्या दृष्टीने तुम्ही विचार कराल असे वाटले होते. आपण गणवेष घालून सत्याग्रह केला तर त्याचा अर्थ काय होईल ? आपण या आदोलनात भाग घेत असलो तरी देशाच्या एकूण परिस्थितीवर अत्यंत परिणामकारक ठरणारे संघाचे मूलगामी व अग्रगण्य कार्य अखंड चालू राहील याची काळजी घेतली पाहिजे. " हट्ट धरणाऱ्यांनी गणवेषाची कल्पना सोडून दिली.

ठरल्याप्रमाणे दि. २१ ला सकाळी साडेसहा वाजता यवतमाळ येथील सत्याग्रह शिबिरातून रणशिगाच्या निनादात त्या दिवशी निर्बंधभग करणाऱ्या पथकाची थाटामाटाने मिरवणूक निघाली. नगर-भवनाच्या पटागणात मिरवणूक आल्यावर तेथे ध्वजवंदन होऊन राखीव कुरणातील गवत कापण्यासाठीं सर्वांना कोयते देण्यांत आले. पथकाचे प्रमुख म्हणून डॉक्टराना रुप्याचा चकचकीत कोयता देण्यात आला होता. ही मिरवणूक पुढे कापूस-बाजारापर्यंत गेली. तीन-चार हजार लोक तीत संमीलित झाले होते. तेथे मिरवणूक विसर्जित झाली व मग सारे लोक पायी, दुचाकी, मोटार व रेंगी यातून जंगलातील नियोजित ठिकाणी जाऊन पोहोचले. ही सत्याग्रहाची जागा यवतमाळपासून सहा मैलावर धामणगाव मार्गावर लोहारा जगलात रस्त्याजवळच होती. तेथे दहा सहस्र लोक सत्याग्रह पाहण्यासाठी जमले होते. त्या वेळी सत्याग्रहाची जागा, दिनाक व वेळ सरकारला आधीच कळवून ठेवण्याची पद्धति अगीकारलेली असल्यामुळे सरकारी अधिकारी व वनविभाग आरक्षक-दलाची पथके तेथे आधींच येऊन उभी होती.

ठीक ९ वाजता डॉक्टर आपल्या तुकडीसह तेथे येऊन पोहोचताच लोकानी स्वयंस्फूर्तीने त्याचा जयजयकार केला. एवढ्यात वनाधिकाऱ्याने ( रेंजरने ) पुढे येऊन " आपण कोयते घेऊन येथे आलात, पण आपणाजवळ ' पास ' आहे काय ? " असे म्हणून हटकले. त्याच्याकडे दुर्लक्ष करून सर्वांनी कोयते सरसावून गवत कापण्यास प्रारभ केला. थोड्याच वेळात आरक्षक दलाचे अधिकारी पुढे आले व त्यानी सर्वांना अटक केल्याचे विदित केले. तेव्हा डॉक्टरानीं तेथे जमलेल्या लोकाना उद्देशून सागितले की, " आम्हाला पकडले असले तरी तुम्ही सर्व जण हे आदोलन नेटाने पुढे चालवाल, असा मला भरंवसा वाटतो. " यानतर सर्वांना मोटारीने चौकीवर नेण्यात आले.

अटक झाली त्या दिवशींच यवतमाळ येथील कारागृहात श्री. भरुचा यांच्यासमोर खटला उभा राहिला व तडकाफडकी सर्वांना शिक्षा ठोठावण्यात आल्या. डॉ. हेडगेवार याना ११७ कलमाखालीं सहा महिने सश्रम कारावास व कलम ३७९ खाली तीन महिने सश्रम कारावास अशा एकापुढें एक भोगावयाच्या शिक्षा देण्यात आल्या. बाकीच्या अकरा जणाना चार महिन्याची सश्रम

कारावासाची शिक्षा मिळाली. कोठडींत असतांना श्री. धोंगडे या सब्इन्स्पेक्टरनें स्नेही म्हणून सर्वांना थाटाचा अल्पाहार दिला व यवतमाळचे सिव्हिल सर्जन श्री. सम्मनवार यांनीं तर सर्वांची अकोला कारागृहाकडे पाठवणी होण्यापूर्वीं त्यांना लाडूचें मिष्टान्नभोजन दिलें. डॉक्टरांच्या स्नेहाचें जाळें असें प्रांतभर सर्वत्र विणलेलें दिसे. हें भोजन चालू असतां डॉक्टर थट्टेनें म्हणाले, "सुरुवात तर चांगली झाली !"

सायंकाळीं त्या सर्वांना आगगाडीनें अकोला कारागृहाकडे पाठविण्यांत आलें, त्या वेळीं वाटेंतील बहुतेक प्रत्येक स्थानकावर सत्याग्रहींच्या दर्शनासाठीं लोकांची गर्दी होत होती व डॉक्टरांना पांच-दहा मिनिटें भाषण करणेंहि भाग पडत होतें. यवतमाळ तें मूर्तिजापूर या फांट्यावर दारव्हा हें मोठें स्थानक आहे. त्या ठिकाणीं लोकांनीं फलाटावरच एक व्यासपीठ उभारून सत्काराची जंगी सिद्धता ठेवली होती. साधारण सातशें ते आठशें लोकांच्या समुदायानें डॉक्टर तेथें उतरतांच जयजयकार केला. दारव्ह्यापर्यंत ते डब्याच्या दारांतच उभे राहून लोकांच्या सत्काराचा स्वीकार करीत होते. पण दारव्हा येथें श्री. डाऊ वकील व इतर प्रतिष्ठित मंडळी यांच्या प्रेमाग्रहावरून त्यांना व्यासपीठापर्यंत जावें लागलें. तेथें गाडी अधिक वेळ थांबत असल्यानें डॉक्टरांचें पंधरा-वीस मिनिटें भाषणहि झालें. तेथून डब्याकडे परतल्यावर लोकांनीं फळांच्या व फराळाच्या करंड्या डॉक्टरांच्या डब्यांत आणून दिल्या व गाडी सुटतांना 'वन्दे मातरम्'च्या उद्घोषानें तेथील वातावरण लोकांनीं दणाणून सोडलें.

गाडी आतां स्थानक सोडून पुढें आली होती व जयजयकार मंदपणें ऐकूं येत होता. इतक्यांत आरक्षकाधिकाऱ्यानें वृद्ध रामसिंगाला आज्ञा सोडली कीं, "रामसिंग, हातकडी निकालो !"

"हातकडी कशासाठीं ?"—डॉक्टर.

"मी काय करूं ? मला डी. एस्. पी. कडून फोन आलाय् व मी नोकर असल्यानें मला तसें करणें भाग आहे."—अधिकारी.

"डी. एस्. पी. ची तशी इच्छा असती, तर सत्याग्रहापासून आतांपर्यंत हातकड्या अडकवितां आल्या असत्या, पण आपण पाहिलें आहेच कीं, त्यांनीं आतांपर्यंत तसें कांहीं केलें नाहीं."

"पण आतां तशी आज्ञा आहे !"

हें उत्तर ऐकत असतांना तो अधिकारी चक्क खोटें सांगत आहे ह डॉक्टरांनीं ताडलें असल्यानें ते शांतपणानें सांगूं लागले कीं, "हा कांहीं माझा पहिला तुरुंगवास नाहीं. त्यांतून आम्ही आपणहून सत्याग्रह केला असून आम्ही केव्हांहि पळून जाणाऱ्यांपैकीं नाहीं. तेव्हां हातकड्या घालण्याच्या फंदांत पडूं नका."

तरी तो ऐकेना. तो कडाडला, " रामसिंग, हातकडी क्यो नहीं निकालते ? "

यावर डॉक्टर त्वेषांत म्हणाले, " तुम्हांला एकूण 'विनंति' मानवत नाहीं असे दिसतें. आपला हातकडी घालण्याचा निश्चय असेल तर मग मलाहि माझा निश्चय दाखवावा लागेल ? "

" म्हणजे मला तुम्ही हातकडी घालूं देणार नाही ? " जरा चढत्या आवाजात तरुण अधिकाऱ्यानें प्रश्न केला.

त्यावर दारूच्या कोठारात ठिणगी पडावी त्याप्रमाणे डॉक्टर अत्यंत संतप्त होऊन म्हणाले, " घाल कशा बेड्या घालतोस तो ? तूं आम्हाला काय समजतोस ? जास्त गमजा करशील तर तुझी गठडी वळून डब्यातून तुला बाहेर फेकून देईन ! आत्ताच्या शिक्षेत फार तर वाढ होईल. पण आम्ही नऊ महिन्याची शिक्षा होईल असे थोडेच धरले होते ! "

डॉक्टरांचा उसळता ज्वालामुखी पाहून सर्वच आरक्षक गोंधळले. तेव्हां आप्पाजी अधिकाऱ्यांची समजूत पटविण्यासाठी पुढे होऊन म्हणाले की, " आपण या प्रातात नवीन दिसता. डी. एस्. पी. ने आज्ञा केली आहे हे सब झूट आहे. तुम्ही ठिकठिकाणी झालेल्या सत्काराने खवळलेले दिसता. पण अशा फदांत पडूं नका. डी. एस्. पी. मुसलमान असल्याने त्याला खूष करता येईल अशी कल्पना असेल तर ती देखील फोल आहे. कड्या घालून पहा, म्हणजे तुम्हाला डी. एस्.पी.-कडूनच कानपिचक्या मिळाल्या की समजेल डॉक्टराचे व त्यांचे संबंध कसे आहेत ते ! आम्ही काय पळून जाणार आहोत ? "

आप्पाजीच्या म्हणण्याची री ओढून बरोबरच्या शिपायानीहि बेड्या न घालण्याविषयी समजूत घालण्याचा प्रयत्न केला. आता अधिकाऱ्याचा तोरा व पारा बराच उतरला होता. तो म्हणूं लागला की, " मी गरीब मनुष्य. निरनिराळ्या स्टेशनवर तुम्ही उतरता तेव्हा न जाणो तुमच्यातील कोणी पळून गेला तर माझ्या गळ्याला तात लागतील. नाही तर आपल्यासारख्याना बेड्या घालण्याची मला थोडीच हौस आहे ? "

त्यानंतर आप्पाजी म्हणाले कीं, " पळून जावयाचें असते तर दारव्ह्यापर्यंत नसते कां जाता आले ? तुम्ही चिंता करूं नका. आम्हां बारा जणांना व्यवस्थितपणें तुरुंगांत पोंचविल्याचें श्रेय तुम्हास मिळेल, अशी खात्री बाळगा. " आतां डब्यांतील खळबळ शमलेली दिसली.

त्या वातावरणाला रुचिरता आणण्यासाठीं डॉक्टर मनमोकळें हास्य करीत म्हणाले, " झाली खात्री आपली ? समजूत घालण्याचे श्रेय निष्कारण आप्पाजीकडे जायचे होते म्हणून मी सांगून पटले नाही. " डॉक्टराच्या या उद्गाराने प्रसन्नतेचें हास्य सर्वांच्या मुखांवर उमटतें न उमटते तोंच डॉक्टरांनी फराळाची करंडी पुढें करून सर्वांना जवळ बोलावले व आरक्षकांसह सर्वांना आग्रहानें खाऊं घातलें.

क्षणापूर्वी लाव्हारसाप्रमाणें रसरसणारें डॉक्टरांचें रूप आतां जोत्स्नेच्या शीतलतेची बरोबरी करतांना पाहून त्या अधिकाऱ्याला आश्चर्य वाटलेलें दिसलें.

रात्रीं १० वाजतां गाडी मूर्तिजापूरला पोहोंचली व तेथें गाडी बदलून ही तुकडी रात्रीं १२ च्या सुमारास अकोल्यास जाऊन पोहोंचली. स्थानकावर मोटार लॉरी उभीच होती. त्यांतून सर्वांना कारागृहांत नेऊन रात्रीपुरतें एकाच खोलींत कोंडण्यांत आलें.

प. पू. डॉक्टरांचा दुसरा कारावास असा सुरू झाला.

* * *

## १८ : दुसरा कारावास

परमपूजनीय डॉक्टर हेडगेवार यांनीं सत्याग्रह केला, त्याच्या दुसऱ्या दिवशीं म्हणजे मंगळवार दि. २२ ला नागपूरच्या संघस्थानावर सर्व स्वयंसेवकाना त्याचे वृत्त सांगण्यासाठीं एकत्र करण्यात आले होते. त्या कार्यक्रमाला सरसंघ-चालक डॉ. ल. वा. परांजपे, श्री. नानासाहेब टालाटुले, श्री. काळीकर, बॅ. देशमुख आदि प्रतिष्ठित मंडळी उपस्थित होती. त्या वेळीं एका स्वयंसेवकाने सत्याग्रहाचा वृत्तान्त वाचून दाखविल्यावर डॉ. पराजपे यानीं, डॉक्टरानी कापलेले गवत सर्वांना दाखवून ध्वजाच्या पायी अर्पण केले. शेवटी डॉ. मुंजे म्हणाले की, "या सत्याग्रहाच्या लढ्यांत जे धैर्य आपल्या संघाच्या डॉ. हेडगेवार प्रभृतींनी दाखविले आहे, तेच धैर्य हिंदु समाजाच्या नि हिंदुराष्ट्राच्या रक्षणार्थ यापुढे होणाऱ्या सर्व लढ्यातून आपण दाखविले पाहिजे."

डॉक्टराचे पथक अकोला येथील कारागृहात गेल्यावर दुसऱ्या दिवशीं सरकारी नियमानुसार सर्वांची 'ब' आणि 'क' या वर्गात विभागणी झाली. ही विभागणी कारागृहाचा एक वरिष्ठ अधिकारी श्री. फोर्ड याच्यासमोर सर्वांना उभे करण्यांत आल्यावर झाली होती. हे काम चालू असता फोर्डने डॉक्टराना आपल्या शेजारच्या खुर्चीवर बसवून घेतले होते. योगायोगाने त्या दोघाचा निकटचा परिचय १९२१ च्या असहकार आदोलनाच्या वेळी, प. पू. डॉक्टर नागपूर जेलमध्ये असता हा तेथे अधिकारी असल्यामुळे, झाला होता. पुन्हा त्या दोघाची भेट येथे झाल्याने स्वाभाविकच दोघांनाहि मनस्वी आनंद झालेला दिसला. फोर्ड हा आयर्लंडमधील एक नागरिक होता व त्याला हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यसंग्रामाविषयीं थोडीशी आस्था असे आणि तीच त्याच्या सभ्य वर्तनातून प्रकट होई.

डॉक्टरांच्या तुकडीची विभागणी चार ठिकाणी झाली. डॉक्टरांना 'ब' वर्ग मिळाला व बाकीच्यांना 'क' वर्गात तीन गटांनी निरनिराळ्या चाळींत (बराकींत) पाठविण्यांत आले. दुसऱ्या चाळींत बाळासाहेब ढवळे, वेखंडे, आप्पाजी जोशी व त्र्यंबकराव देशपाडे ही मंडळी होती. पांचव्या चाळीत दादा परमार्थ, विठ्ठलराव देव, नारायणराव देशपांडे व अंबाडे आणि सहाव्या चाळीत भय्याजी कुंभलवार, मारुतराव पालेवार व घरोटे अशी पाठवणी झाली होती. ही

विभागणी करतांना सरकारी नियमानुसार कांहीं जणांना ‘ क ’ वर्ग देतांना फोर्डला खटकलें होतें व त्यामुळें त्यानें वरील ‘ क ’ वर्गांतील आठ जणांना ‘ ब ’ वर्ग देण्यांत यावा, अशी विनंति डेप्युटी कमिशनरकडे केली होती. पण त्यांना वर पाठविण्याची आज्ञा देण्याऐवजीं उत्तर आलें कीं, संबंधित लोकांनीं तशी मागणी करणारी लेखी विनंति करावी. त्याप्रमाणें पुढें कांहीं जण ‘ ब ’ वर्गांत गेलेहि.

त्या वर्षीं अकोला कारागृहांतील हेला गोडाउन म्हणून ओळखल्या जाणाऱ्या इमारतींत ‘ ब ’ वर्गांचे सत्याग्रही ठेवण्याची योजना ठरली होती. त्या ‘ ब ’ वर्गाचें उद्घाटन अर्थातच डॉक्टरांच्या हस्तें झालें. शंभर फूट लांब व तीस फूट रुंद अशा विशाल कोठडींत ( तिला कोठडी म्हणणें योग्य नाहीं ) त्यांना पहिला आठवडा अगदीं एकट्यानें काढावा लागला. त्यानंतर यवतमाळचे श्री. स. ह. बल्लाळ यांची तेथेंच पाठवणी झाली. सात दिवसांच्या एकलकोंडीनंतर साथी मिळाल्यानें दोघांनाहि आनंद झाला. सात दिवसांनीं आतां संभाषणाची संधि डॉक्टरांना मिळाली होती. यानंतर क्रमाक्रमानें अमरावती जिल्हा सोडून बाकी जिल्ह्यांतील कार्यकर्ते अकोला कारागृहांत येऊन धडकूं लागले. डॉक्टरांनीं जंगल सत्याग्रहाच्या प्रारंभींच भाग घेतल्यानें अकोला कारागृहांत वऱ्हाडांतून आलेल्या कार्यकर्त्यांचें स्वागत करण्याचा मान अर्थातच त्यांना मिळाला होता. दि. १८ ऑगस्टला मेहकर येथील श्री. राजेश्वरराव देशमुख व श्री. दादासाहेब सोमण हे ‘ ब ’ वर्गांत प्रविष्ट झाले. ह्या दोघांचाहि डॉक्टरांशीं परिचय होण्याचा योग आगगाडींतील प्रवासांत पूर्वीं एकएकदां आला होता. आतां तर त्यांना आपल्या परमपूजनीय सरसंघचालकांच्या सहवासांत अकोला येथील कारागृहांत राहावयास मिळणार याची कल्पना येतांच अत्यानंद झाला. त्या दोघांच्या भेटीचें वर्णन करतांना ते लिहितात कीं, “ ... ... श्रावणांतील वद्य पक्षांतील सोमवार होता. त्या दिवशीं माझ्या आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाचा क्षण उगवला. गेल्या-बरोबर माझ्यासमोर माझे परमपूज्य सरसंघचालक डॉ. केशवरावजी हेडगेवार बसलेले मला दिसले. एकदम ‘ दक्ष ’ होऊन प्रणाम केला. डॉ. ठोसर तेथें होते. त्यांनीं माझी व श्री. दादासाहेब सोमण यांची ओळख करून दिल्याबरोबर पूर्वींची झालेली ओळख आठवून त्यांना अत्यानंद झाला. त्यांनीं कडकडून आलिंगन दिलें व ‘ तुमची मेहकरची शाखा कशी काय चालली आहे ? ’ हा पहिला प्रश्न विचारून मग इतर कुशल प्रश्न विचारले ... ... संघाच्या मुख्य जनकाचे चरणीं अनेक दिवस राहून शिक्षण घ्यावयास सांपडेल, या कल्पनेनें तर फारच आनंद झाला व त्या योगें स्वकीयांना, वृद्ध मातापितरांना व लहान अर्भकांना सोडून स्वीकारलेल्या कारावासाचें दुःख पार नाहींसें झालें. तो आनंद सांगतां येत नाहीं. ”

आतां ‘ ब ’ वर्गातील सत्याग्रहींची संख्या वाढता वाढतां पस्तीसपर्यंत गेली होती. त्यांच्यांतील भिन्न प्रवृत्ति, छंद व राजकीय मतमतांतरें यामुळे जे एक संमिश्र वातावरण निर्माण झाले, तें एखाद्या प्राणिसंग्रहालयाचीच आठवण करून देणारें होते, असे मेहकरचे देशमुख सागतात.

कोणाला चहा चाले, तर त्याच्या नुसत्या उल्लेखानें कोणाचे डोके उठे ! कोणाला पाव रुचे, तर कोणी अब्रह्मण्यम् समजून त्यापासून चार पावले दूर राही. जेवणातहि असंख्य प्रकार ! काही जण हाती स्वतंत्रपणे स्वयंपाक करून जेवत असत. त्याना इतराचा भ्रष्टाकार पाहावेना ! काहीं जण तानमान पाहून वागणारे, तर काहीं जणाचा खाण्यात अनिर्बंध मुक्तछंद दिसे ! तेल, तिखट, लसूण, कादा चालणारे नि न चालणारे असेहि भेद होतेच ! ‘ ब ’ वर्गासाठी स्वतंत्र स्वयपाक-घर होतें व त्यांत ‘ क ’ वर्गातील कैदी कामासाठीं येत. तेव्हा काहीं जणानी ‘ क ’ वर्गातील लोकासबंधी सहानुभूति दाखविण्यासाठी त्याचे जेवण घेऊन आपले ‘ ब ’ वर्गाचे पदार्थ त्याना देण्यास सुरुवात केली. श्री. स. ह. बल्लाळ यांनी ‘ क ’ वर्गाचे वर्णन करताना ‘ सी-वर्गे क्लेशबाहुल्यं खाद्य चापि पशूचितम् । ’ असे म्हटलें आहे. त्याचा अनुभव काहीं जण घेऊं लागले. काहीं जणाना सश्रम कारावास होता. त्याना चरखा फिरवावा लागे व साधी कैद असलेल्याची तोंडाची ‘ टकळी ’ चाले ! हे दोघेहि जेवण व स्नान या वेळी तेवढे एकत्र यावयाचे ! कोणाचे विनोदावाचून पाऊल उचलत नसे व काही जणाना त्यामुळे चिडण्यावांचून काम उरले नव्हते ! आकोटचे श्री. दाजीसाहेब बेदरकर याच्या खेळकर विनोदामुळे दिवसभर त्याच्या सभोवतीं कोणी ना कोणी रुंजी घालीत बसत व सारखी हास्याची खसखस पिके. श्री. स. ह. बल्लाळ यानीं आपल्या कारागृहातील सहचाऱ्यांचें वर्णन करताना बेदरकराविषयी जे लिहिले आहे, त्यावरून त्याच्या स्वभावाची सहज कल्पना येऊं शकेल. ते लिहितात की,

आकोटवासी नटनाटकी च
गोष्टिप्रियः श्रेष्ठ उदारधीश्च ।
आनंदमग्नः स सुखी करोति
वाग्वैजयन्त्या प्रियदाजिपतः ॥

अशी भिन्न प्रकृतीची कार्यकर्ती मंडळी पंधरा-वीस दिवस एकामागून एक येत होती व डॉक्टर त्यांचा परिचय करून घेत होते. आतां ‘ ब ’ वर्ग गजबजलेला पाहून डॉक्टरांनी आपल्या वर्गात कांहीं व्यवस्था लागावी, यासाठीं अकोल्याचे डॉ. ठोसर यांना सर्वांच्या अनुमतीने ‘ सेनापति ’ नेमले व त्याच्या शिस्तीप्रमाणे सर्वांनीं वर्तन करावे असे ठरले. सायंकाळीं या लोकाना पाय मोकळे करण्यासाठीं बाहेरील पटांगणांत सोडण्यांत येई. या वेळांत कोणाला आपणांवर गोष्ट लादली आहे अशी भावना उत्पन्न होऊं न देतां डॉक्टरांनीं संचलनाचा कार्यक्रम सुरू

करून दिला. पण आपण पुढारी असल्यानें असें दुसऱ्याच्या बंधनांत काय राहावयाचें, अशी फटकून वागण्याची प्रवृत्तिहि परस्परांच्या सहवासानें लवकरच मावळली.

'ब' वर्गांतील सर्व जण एकत्र राहत होते; पण त्यांचे तीन-चार गट पडले होते. त्यांतील एक वर्ग संघाच्या स्वयंसेवकांचा, दुसरा संघ-सहानुभूतांचा, तिसरा उदासीन व चौथा संघाच्या विचारसरणीला हिंसक, जातीय, संकुचित संबोधण्याइतका कट्टर गांधीवादी ! हे सर्व प्रकार व विविध मनोरचना डॉक्टरांनीं नीट पारखल्या होत्या व सर्वांशीं अगदीं मनमोकळेपणाचें वागणें सुरू होतें. विद्यार्थिदशेपासून राष्ट्रकार्य हेंच जीवन झालेल्या डॉक्टरांचें व्यवस्थित, शिस्तपूर्ण, गंभीर पण प्रसन्न वर्तन हा तेथील सर्वांच्या आदराचा विषय झाला होता. आपलें काम आपण स्वतः नेटकेपणानें करावयाचें व कोणाकडून सेवा घ्यावयाची नाहीं, असा डॉक्टरांचा कटाक्ष दिसे. कपडे धुऊन आणल्यावर ते वाळत घालण्यापासून तों आपल्या उशीखालीं त्या कपड्यांच्या नीट घड्या करून ठेवण्यापर्यंत सर्वच गोष्टी इतक्या आकर्षक असत कीं, त्यांची टापटीप पाहून अनेकांनीं त्यांचें तेथें अनुकरण सुरू केलें होतें. वास्तविक देशभक्ति व त्याग यांत डॉक्टर अग्रगण्य होते, पण अहंकाराची छटा चुकूनहि त्यांच्या वागण्यांत उमटत नसे. उलट आपण राजकारणांत कसा पुरुषार्थ गाजवला याचीं रसभरित वर्णनें स्वमुखानें करण्यांत रंगून जाणारे कांहीं जण सभोंवतीं दिसत असतांहि डॉक्टर तीं वर्णनें शांतपणानें ऐकून घेत असत.

डॉक्टरांच्या तुकडींतील कांहीं जणांनीं 'ब' वर्गाची मागणी केल्यावर त्यांना तो देण्यांत आला व पंधरा दिवस फोर्डनें आग्रह करूनहि श्री. आप्पाजी जोशी यांनीं मात्र तशी मागणी केली नाहीं. कारण ते त्या वेळीं कॉंग्रेसचे प्रांतिक कार्यवाह होते व पक्षाच्या धोरणांत 'सवलतीची मागणी करणें' ही गोष्ट बसण्यासारखी नव्हती. मागणी करावी तर तात्त्विक दृष्टीनें पटेना व न करावी तर फोर्डसारख्या माणसाचा आग्रह मोडणें अवघड वाटूं लागलें. त्या शृंगापत्तींत फोर्डनें 'कसें चाललें आहे ?' असें विचारलें कीं, आप्पाजींचें उत्तर 'क वर्गांत उत्तम चाललेलें आहे,' असें ठरलेलें असे. पण या उत्तरानें फोर्डला बरें वाटेना.

एक दिवस फोर्डनें आप्पाजींना थांबवून विचारलें, "आपण तुरुंगांत पुढारी म्हणून आलांत कीं अनुयायी ?" आप्पाजींकडून 'अनुयायी' असें उत्तर मिळालें.

"मग डॉक्टर सांगतील तें ऐकणार ना ?"

"हो ! पण ते मला अमुक कर असें सांगणार नाहींत."

"तें आपण पाहूं !"

या संवादानंतर एके दिवशीं फोर्डनें आप्पाजींना डॉक्टरांच्या भेटीसाठीं

पाठवून दिले. आप्पाजी कोठडीत येतांच ‘ क ’ वर्गातील एकूण वृत्त ऐकून घेऊन डॉक्टरांनी विचारले की, “ का आलात ? ”

“ फोर्ड मला अर्ज करा म्हणून सारखा आग्रह करतो आहे. तेव्हां आपला या संबंधांत विचार घ्यावा म्हणून त्याने मला इकडे पाठविले आहे. ”

“ पण तुम्ही प्रातिक कॉंग्रेसचे माजी चिटणीस, तेव्हा या सबंधात जे काही ठरवावयाचे ते तुम्हींच ठरविले पाहिजे. मी काय सागणार ? आपण काहीं गाधीवादी नाहीं. तेव्हा अर्ज करण्यात बिघडेल असे नाही. पण ज्या चळवळीतून आपण येथे आलो आहोत, त्या चळवळीच्या प्रतिष्ठेचीहि जपणूक आपण केली पाहिजे. तुम्ही तर प्रातिकचे चिटणीस आहात. तेव्हा तुम्हीच ठरवा, व जे तुम्ही ठरवाल तेच मीं तुम्हाला सांगितले असे फोर्डला सागेन. तुम्ही सर्व जाणताच आहा. ”

आपण ज्या चळवळींत संमीलित होऊं, तेथील पथ्ये व संकेत पाळण्यावर डॉक्टराचा कटाक्ष असे. ‘ अनुशासनात हयगय म्हणजे चळवळींत गोंधळाचे भय ’ हे डॉक्टर जाणत असल्यामुळे त्यांनी आप्पाजींना मार्गदर्शक होण्याची भूमिका घेतली नाही. या भेटींतून परत आल्यावर आप्पाजींनीं ‘ ब ’ वर्गाची मागणी करण्यास नकार दिला. फोर्डने परोपरीनें आग्रह करूनहि त्याला यश आलें नाहीं. यामुळे आप्पाजींवर तो रागावला व त्यानें पंधरा-वीस दिवस अवघड कामे देऊन तीं पुरीं न झाल्यास अवघड शिक्षा ठोठावून आप्पाजींना नमविण्याचा प्रयत्न केला. शेवटीं आप्पाजी प्रकृतीने खगत चालले व एक दिवस घेरी येऊन पडले ! तरीहि ते लेशभरहि डगमगले नाहीत ! ‘ पिचेल मनगट परी उरातिल अभंग आवेश ! ’ या गोष्टीचा त्याच्या ताठ्यातून प्रत्यय आल्यावर सतप्त झालेल्या फोर्डचेहि मन द्रवले व एक दिवस कौतुकानें त्याने आप्पाजीना ‘ ब ’ वर्गांत स्वतःच पाठवून दिले. जेव्हा या सत्त्वपरीक्षेची कथा ‘ ब ’ वर्गातील लोकांना आप्पाजीकडून ऐकावयास मिळाली, तेव्हा आपल्या सहकाऱ्याच्या सहनशीलतेचे व निग्रहाचें डॉक्टराना कौतुक वाटले.

कारागृहातील ‘क’ वर्ग हा सर्वसामान्य पाढरपेशा व्यक्तीला न मानवणारा होता. तेथील निकृष्ट प्रतीच्या धान्याच्या ठरीव भाकऱ्या वा पोळ्या, अन्न शिजविण्याची लोखडी भाडीं व इतर व्यवस्था यासंबंधीं त्या वेळी सभातून व वृत्तपत्रातून बरीच ओरड झालेली होती. दोन-तीन वर्षापूर्वीच भाई डागे यानीं आपल्या कारागृहातील हालअपेष्टाना अनुलक्षून ‘ नरक सापडला ’ ( Hell Found ) असे मार्मिक शीर्षक आपल्या पुस्तकाला दिले होते. नागपूरच्या ‘ तरुण-भारता ’चे सध्याचे सपादक श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांनीं तर ‘ ब ’ वर्गातील व्यवस्थाहि अतिसंतापजनक असल्याचा अनुभव प्रसिद्ध केला होता. त्यानीं म्हटले होतें कीं, “...तुरुंगात गेल्यावर तेथील शिस्त निमूटपणे पाळावी, असा म. गांधी यांचा आदेश आहे. पण तो कितीहि योग्य आणि व्यावहारिक

असला तरी तुरुंगांतील एकंदर परिस्थितीच अशी क्षोभजनक असते कीं, ज्याची माणुसकीची चाड आणि स्वाभिमानाची भावना मेलेली नाहीं, अशा मनुष्याला तेथें प्रतिकार करण्याची बुद्धि अखेर होतेच होते. ”

डॉक्टरांच्या तुकडींतील श्री. दादा परमार्थ हे ‘ क ’ वर्गात होते. त्यांना क्षयाची भावना झाली व दिवसेंदिवस त्यांची प्रकृति खालावूं लागली. कारागृहाधिकारी श्री. फोर्ड व श्री. पांडे यांच्याशीं डॉक्टरांचा इतका जिव्हाळ्याचा परिचय झाला होता कीं, ते दिवसांतून एक-दोन वेळां तरी डॉक्टरांना भेटून त्यांच्या हास्यविनोदाचा आस्वाद घेऊन जात. या परिचयामुळें ‘ क ’ वर्गांतील दादा परमार्थ यांना ‘ ब ’ वर्गांत आणण्यांत आलें व ‘ अ ’ वर्गांतील डॉ. टेंभे या तज्ज्ञांच्या मार्गदर्शनाखालीं त्यांना औषधोपचार सुरू करण्यांत आले. आजारी मनुष्य आपल्या कोठडींत येऊन त्याचा रात्रंदिवस चालणारा खोकला ऐकण्याचा प्रसंग अनेक जणांना अप्रसन्न करणारा होता. पण स्वतः डॉक्टर हे दादा परमार्थांची सेवा-शुश्रूषा करण्यांत जी दक्षता घेत, ती पाहून त्यांची अप्रसन्नता शब्दरूपानें प्रकट होत नसे. दादा हट्टी व चिडखोर स्वभावाचे. त्यामुळें ते कुपथ्य करीत व डॉक्टरांना त्यांच्यासाठीं रात्र रात्र जागावें लागे. श्री. दाजीसाहेब बेदरकर यांच्या विनोदाचा मोर्चा केव्हां केव्हां श्री. दादा परमार्थांकडेहि वळे व आधींच चिडखोर व त्यांत अशक्त झाल्यामुळें चुनखडीवर पाणी पडावें त्यासारखी त्यांची अवस्था होई ! अशा वेळीं डॉक्टरांनीं बेदरकरांना आवरावें व दादांची समजून काढावी. दादा परमार्थ बरे होईपर्यंत डॉक्टरांनीं त्यांची किती काळजी घेतली, हें प्रत्यक्ष श्री. राजेश्वरराव तथा भाऊराव देशमुख यांच्याच शब्दांत देणें युक्त दिसेल. ते लिहितात कीं, “ ......केवळ डॉक्टर केशवरावजी यांची काळजी नसती तर दादांचें काय झालें असतें हें सांगवत नाहीं. डॉक्टरांनीं त्यांना मृत्यूच्या दाढेंतून खेचून बाहेर काढलें. ” कारागृहांत असतांना वऱ्हाडांतील एक कॉंग्रेसचे पुढारी व पुढें संघाचे झालेले कार्यकर्ते श्री. दादासाहेब सोमण यांनीं तर डॉक्टरांजवळ उद्गार काढले होते कीं, “ डॉक्टर, आम्ही तर संसारी आहोंत. पण आपण आम्हांला लाजविण्याजोगी जी शुश्रूषा करीत आहांत, ती पाहून दादा परमार्थ म्हणजे तुमचा मानसपुत्रच वाटतो ! ” एकदां आपला म्हटल्यावर डॉक्टर त्याच्यासाठीं न कंटाळतां कसे अविश्रांत परिश्रम करतात व ते करीत असतांना आपण कोणावर उपकार करीत आहोंत, असा पुसट विचारहि त्यांच्या मनांत कसा डोकावत नाहीं, याचें कोठडींतील लोकांना आश्चर्य वाटे ! त्यांतील प्रत्येकालाच प्रारंभीं आपल्या चारचौघांसारखेंच ते आहेत असें वाटत असे. पण कांहीं महिन्यांच्या अखंड सहवासानंतर कोठडींतील लोकांच्या अहंकाराचीं कवचें विरघळवून टाकणारें डॉक्टरांच्या लोभस चारित्र्याचें रसायन त्यांच्या प्रत्ययाला आल्यावांचून राहिलें नाहीं. अनेकदां ‘ दुरून डोंगर साजरे ’

या न्यायानें एखाद्याचा दुरून ऐकलेला लौकिक हा त्याच्या प्रत्यक्ष सहवासांत आल्यानंतर पोकळ व फसवा ठरत असतो. डॉक्टरांच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव अलौकिक असे. निरभ्र पौर्णिमेच्या रात्रीं मोहक चंद्राचे सुखद दर्शन घेण्यासाठीं दुर्बिणीच्या सहाय्यानें ते चंद्रबिंब जवळ आणावे तो त्याचें सौंदर्य नष्ट करणारे काळे डाग ठळकपणाने डोळ्यांत खुपूं लागतात व स्वातंत्र्यवीर सावरकरांनीं एका काव्यांत म्हटल्याप्रमाणे दुर्बिण वापरल्याचा पश्चात्ताप होतो. ते म्हणतात :

" आल्हादक किति चंद्रबिंब हे नंदसुधा झरते !
फुटो भिंग ते भिकार त्या जें मसणासम करते ॥
त्याचे रिझवो रूप जनां की, आल्हादक कोळे ।
फुटोत ते त्या विद्रुप करिते दुर्बिणीचे डोळे ॥ "

असेंच काहीं जणाच्या जवळ जाण्याने आपल्या मनोमंदिरात आपण रेखाटलेले त्याचे चित्र अगदीं बेढब व विद्रूप वाटूं लागते. उलट डॉक्टराच्या जो जो जवळ जावे तो तों लोहचुंबकाप्रमाणें मनाला अपूर्व ओढ लागे व त्याच्या निकटतेंत त्यांच्या काळ्या-सावळ्या स्वरूपामागे असणाऱ्या अढळ ध्येयनिष्ठेचे, धवल चारित्र्याचे व स्वातंत्र्याच्या महन्मंगल आकांक्षेचे जवळून आणि अवीट असे दर्शन घडे.

याच व्यक्तिमत्त्वाच्या प्रभावाने कारागृहाचे प्रमुख श्री. पाडे याना भारून टाकलें होतें. पहिल्या कांहीं दिवसातच डॉक्टराच्या स्वभावाप्रमाणे त्यानीं पाडे याचा इतका दृढ परिचय करून घेतला कीं, ते संधि पाहून डॉक्टराच्याजवळ कौटुंबिक गोष्टीदेखील मनमोकळेपणाने सागत बसत असत. त्यात ' मुलीचे लग्न ' हा त्याना एक अत्यंत व्यग्र करणारा विषय होऊन बसल्याचे डॉक्टराच्या ध्यानीं आलें व त्यांनीं त्या मुलीची पत्रिका पाहून तिला अनुरूप अशीं स्थळे पाडे याना सुचविलीं. एवढेच नव्हे तर काहीं स्नेह्याकडे त्यानीं तिच्या पत्रिकाहि अवलोकनार्थ पाठविल्या. डॉक्टर कारागृहांत असेपर्यंत नागपूर केंद्रातून एकूण संघशाखाचे प्रतिवृत्त निवेदन करण्यासाठीं कधीं डॉ. पराजपे तर कधीं श्री. भाऊराव कुलकर्णी हे जात असत. भाऊराव हे त्या वेळीं नुकतेच पदवी संपादन केलेले तरुण होते. तेव्हा त्यांचें नांव पांडे याना डॉक्टरानीं सुचविल्यापासून डॉक्टराशीं ' प्रदीर्घ भेट ' तर त्याना मिळू लागलीच, पण त्या जोडीने केव्हा केव्हां श्री. भाऊराव कुलकर्णी यांचें शिरा व कॉफी अशा फराळानें आतिथ्यहि होऊं लागले ! या ठिकाणीं एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे कीं, बाहेरून येणाऱ्याना मोकळेपणाने भेटण्याची संधि मिळावी, यासाठीं डॉक्टरांनीं योजलेली ही युक्ति होती व ती चागलीच यशस्वी ठरली यांत शंका नाहीं. मात्र अकोला कारागृहांतून सुटून आल्यावर डॉक्टरांनीं त्या मुलीचें लग्न जमविण्यासाठीं बरीच खटपट केली होती, हेंहि तितकेच खरें आहे.

इंग्रज सरकारला शत्रुस्थानीं लेखून आपण सत्याग्रह केल्यानंतर कारागृहांत सवलती मागणें, हें डॉक्टरांना मान्य नव्हतें. ते म्हणत कीं, "अशा मागून मिळालेल्या सुखसोयींनीं आपली भावना निष्प्रभ व बोथट होते." केव्हां केव्हां कारागृहांतील अधिकारी 'कांहीं तक्रार आहे काय?' अशी पृच्छा करीत. पण डॉक्टरांचें 'कांहीं नाहीं' हें उत्तर ठरलेलें असे. मात्र 'ब' वर्गातील कांहीं जणांनीं, तेथें मिळणारें तूप भेसळ असतें, अशी कुरकूर अधिकाऱ्यांजवळ चालविली होती. पण कांहींच उपयोग होईना. तेव्हां डॉक्टरांचा व कारागृहावरील अधिकाऱ्यांचा जिव्हाळ्याचा संबंध ध्यानीं घेऊन 'आपण तक्रार कराल तर उपयोग होईल' असा आग्रह त्यांच्याकडून डॉक्टरांना होऊं लागला. त्यावर ते केवळ हंसत. पण एके दिवशीं असा आग्रह सुरू होतांच त्यांनीं स्पष्ट सांगून टाकलें कीं, "माझा हा दुसरा जेल आहे. मला स्वतःला, प्रतिपक्षाला विनंति करावी व मग त्यानें आपणांला द्यावें, हें रुचत नाहीं. अधिकाऱ्यांचा मजवर लोभ आहे तेव्हां ते माझें म्हणणें ऐकतीलहि. पण मला तसें करतां येणार नाहीं याचें वाईट वाटतें!"

त्यावर इतरांनीं एक क्लृप्ति काढली कीं, आपण तक्रार करावी व शेवटीं म्हणावें कीं, "आम्ही म्हणतों त्यांत किती तथ्य आहे हें वाटल्यास डॉ. हेडगेवार यांना विचारून पहा म्हणजे तुमची खात्री होईल!" याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं प्रयोग करण्यांत आला व तो यशस्वी होऊन 'ब' वर्गाला साजुक तूप उलपब्ध झालें! अर्थात् स्वतः डॉक्टरांना तुपासाठीं चाललेल्या ह्या धडपडीची कींवच वाटे!

कारागृहांत असतांना गढवाल दिनानिमित्तानें डॉक्टरांनीं 'अनशन' केलें होतें. तसेंच 'क' वर्गातील बंदींनीं त्यांचीं लोखंडी भोजनपात्रें व खराब अन्न यांविरुद्ध अन्नसत्याग्रह पुकारला तेव्हां 'ब' वर्गानेंहि एक दिवस त्यांना सहानुभूति दाखविण्यासाठीं उपोषण केलें. पण तो सत्याग्रह कांहीं राजबंदींनीं अर्ध्यावरून क्षमा मागितल्यानें विफल ठरला. हा वृत्तीचा दुबळेपणा पाहून डॉक्टरांना अत्यंत दुःख झालें. उत्तम संस्कार केल्यावांचून अशा वृत्तींत पालट होणार नाहीं, असें ते सांगत.

सर्वांशीं नीट परिचय होऊन त्यांच्या स्वभावाची पारख होईपर्यंत डॉक्टरांनीं संघाचा विषय तेथें काढला नाहीं. पण त्यानंतर ते हळूहळू संघाच्या तत्त्वज्ञानाविषयीं निरनिराळ्या पुढाऱ्यांजवळ बोलूं लागले. आप्पाजींनीं 'क' वर्गांत असतांनाच संघासंबंधीं बोलणें सुरू केलें होतें व नित्य प्रार्थनेला प्रारंभ करून दिला होता. आतां डॉक्टर व आप्पाजी यांच्या सभोंवतीं मोकळ्या वेळांत व विशेषतः रात्रीं विचारविनिमयासाठीं कांहीं जण बसलेले दिसूं लागले. या वेळच्या प्रतिपादनांत त्यांनीं देशस्थिति व त्यावरील उपाय यासंबंधीं सविस्तर व सुसूत्र विचार मांडले होते. त्यांत "संघाचें नांव राष्ट्रीय स्वयंसेवक संघ कां ठेवलें? राष्ट्र व देश यांतील अंतर काय? गुलाम राष्ट्राला राष्ट्रविमोचन एवढेंच राजकारण असतें; स्वातंत्र्य-

प्राप्तीसाठीं बल लागतें; त्यासाठीं व्यक्तिगत, कौटुंबिक व सामाजिक कल्पनांचा राष्ट्रविमोचनाच्या एकमेव कल्पनेत लय करावा लागतो; बलावांचून संरक्षण अशक्य व बल हें केवळ संघटनेत असते; पण ती संघटना अंतर्गत विघटनेपासून अलिप्त व बाह्य आक्रमणाशी टक्कर देण्यास समर्थ पाहिजे, वगैरे असंख्य विषय ते स्वानुभवांतून मांडीत होते. त्याच्या शब्दाशब्दांतून उमटणारी हिंदुराष्ट्राच्या भवितव्यासंबंधींची चिंता ऐकणाऱ्याच्या विचारचक्रांना गति देणारी असे आणि यांतून राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचा विकास एवढा हिंदूंना एकच आधार असल्याचा ठसा श्रोत्याच्या मनावर ठसठशीतपणे उमटे. कधीं कधीं संथपणें प्रश्नोत्तरे चालत व ह्यांत डॉक्टराना रात्र रात्र जागरण घडे. पण आपल्या तत्त्वज्ञानाने वऱ्हाड-मधील जाणत्या लोकाच्या मनाची घेतलेली पकड पाहून त्याना झोपेचे भानच राहत नसे. आपल्या स्वतःला अग्रस्थान देऊन त्याच्या अनुरोधानें कार्याचा विचार न करतां कार्याच्या अनुरोधाने स्वतःचा विचार ते जातील तेथे करीत व त्यामुळे कितीहि त्रास पडला तरी त्याच्या मुखावरील प्रसन्नता ढळत नसे.

अशा विचारमंथनातून प्रत्यक्ष संघशाखेचे नवनीत उदित होणे क्रम-प्राप्तच होते. संघ म्हणजे नुसता शब्दाचा खेळ नव्हे तर ती एक विशिष्ट दिशेनें आचरावयाची जीवनपद्धति आहे व ही पद्धति अंगीं मुरण्यासाठीं संघाचे दैन-दिन कार्यक्रम हे प्रभावी साधन आहे, याचा विसर डॉक्टर कोणालाच पडूं देत नसत. कांहीं जणांना संघाची ओढ लागल्यावर डॉक्टरानीं रोज सकाळीं संघाच्या पद्धतीने नीट गटात उभे करून सर्वांची प्रार्थना घेण्यास सुरुवात केली. हा प्रार्थनेचा क्रम दसऱ्याच्या दिवशीं सुरू करण्यांत आला होता.

कांहीं वेळां लोकमान्य टिळकाचा 'गीतारहस्य' हा ग्रंथ वाचण्यात डॉक्टर मग्न दिसत, तर केव्हा रात्रीच्या वेळी बाहेरील मोकळ्या जागीं सहकाऱ्याना नेऊन आकाशस्थ तेजोगोलाची माहिती देण्यात रंगून जात. निरनिराळ्या ग्रहांची व नक्षत्राची गति व अतरें वगैरे माहिती डॉक्टर अत्यत मनोवेधकपणे सागत असत. यासंबंधीं डॉ. ठोसर लिहितात की, "डॉक्टर अशी मजेदार माहिती सागत कीं, आमच्यापैकीं प्रथम अरसिक असलेल्या पुष्कळ लोकाना नक्षत्राची माहिती करून घेण्याचा पुढें छदच लागून गेला. काळोख्या रात्रीं आमचा हा कार्यक्रम ठरलेलाच असे. याअगोदर पुष्कळाना अतराळात सूर्य-चंद्रापलीकडे काहीं विशेष असेल, याची जाणीवदेखील नव्हती." रात्रीं-बेरात्रीं केव्हाहि एकट्यानें अनोळखी भागातून प्रवास करण्याचा प्रसंग आला तर दिशा व रात्रीची वेळ समजण्यास अशा खगोलशास्त्राचे ज्ञान उपयुक्त असते. याच हेतूने त्यानीं क्रांति-काळांत ते आत्मसात् केले होते, असे त्यांचे मित्र सागतात.

डॉक्टरांचा स्वभाव थट्टेखोर व त्यात बेदरकरांचा सहवास लाभलेला ! त्यामुळें घडलेला एक प्रसंग अनेक जणाच्या लक्षांत राहिलेला दिसतो. तेथील श्री. जगन्नाथ-

शास्त्री अग्निहोत्री यांना हात पाहण्याचा बराच नाद होता. मनुष्याला अज्ञेय व व भविष्य जाणण्याची स्वाभाविक जिज्ञासा असल्यानें बहुतेक सर्व जण मागें लागून लागून आपल्या ललाटांत काय लिहिलें आहे, हें जाणून घेण्याच्या खटपटींत दिसत. डॉक्टरांना त्याची ओढ नसे. 'रेखा तितुकी पुसली जाते। हें तो सदैव प्रत्यया येतें ॥' हा दैवरेषा पुसली जाऊं शकतें असें सांगणारा समर्थांचा प्रयत्नवाद डॉक्टरांच्या रोमारोमांत भिनलेला असल्यानें त्यांना भविष्य जाणून घेण्यांत स्वारस्य नव्हतें. बाहेर इतर अनेक डॉक्टर असतात त्यांपैकींच डॉ. हेडगेवारहि आहेत, अशी अग्निहोत्रींची धारणा होती. यामुळें ते हात दाखवीत नाहींत, याचें त्यांना कांहींसें आश्चर्य वाटे. बेदरकरांनीं डॉक्टरांशीं संगनमत करून ज्योतिषावरच नवग्रहांची वक्रदृष्टि वळविण्याचा घाट घातला. अग्निहोत्रींना ऐकूं जाईल अशा बेतानें त्यांनीं प्रश्न विचारावेत, कीं आपल्या मंडळींचें पत्र केव्हां आलें होतें ? आपला जगन्नाथ काय शिकतो ? अर्थात् पूर्वसंकेतानुसार डॉक्टर गंभीरपणें उत्तरेंहि देत व तींहि अग्निहोत्रींच्या कानांवर जात. असा एका बाजूला बार भरून दुसऱ्या बाजूनें दाजीसाहेबांनीं 'डॉक्टर, तुम्ही एकदां हात दाखवा' असा आग्रह सुरू केला व डॉक्टरांनींहि खास आग्रहास्तव आपला हात ज्योतिषापुढें धरला ! अग्निहोत्री डॉक्टरांच्या विशाल हातावरील रेषा न्याहाळीत असतां डॉक्टर व बेदरकर यांच्या मुखावर त्या दोघांनाच कळतील इतक्या मंद हास्यरेषा उमटल्यावांचून राहिल्या नाहींत ! थोड्या वेळानें ज्योतिषांनीं विचारलें कीं, "आपलें सध्यांचें दुसरें कुटुंब ना ? तसेंच आपणांला चार मुलें असणार !" डॉक्टरांनीं हात दाखविलेला पाहून अनेक जण सभोंवतीं गोळा झाले होते. हें ज्योतिष ऐकून सर्व जण खदखदा हंसूं लागले. डॉक्टरांनीं हात काढून घेऊन म्हटलें कीं, "बस झालें ! पुन्हा केव्हां तरी विचार करून सांगा !" बेदरकरांनीं या घटनेवर बरेच दिवस लोकांची हंसवून मुरकुंडी वळविली. पण डॉक्टर मात्र त्या क्षणानंतर स्वतः त्यांत समाविष्ट झाले नाहींत. कोणत्याहि गोष्टीच्या मर्यादा ते बरोबर ओळखत असत.

याच काळांत बुलढाणा जिल्ह्यांतील लोणार येथील तीर्थक्षेत्रावर मुसलमानांनीं आक्रमण सुरू केलें व त्यांतून मारामाऱ्या उद्‌भवून मुसलमानांना शिक्षा झाल्या. त्याच वेळीं हिंदूंमध्यें ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाला ऊत आला व त्या वादांत तेथील इंग्रज अधिकारी श्री. कोम्री व श्री. ब्राम्ले यांनीं तेल ओतून मुसलमान व अब्राह्मण यांना 'शेठजी व भटजी हे तुमचे खरे शत्रु आहेत' अशा प्रचारानें जाळपोळ व लूटमार करण्यास उद्युक्त केलें. एक आठवडाभर पंधरा-वीस मैलांच्या टापूंत इंग्रजांच्या कृपाछत्राखालीं खळीं व घरें यांची लूटमार, जाळपोळ व महिलांचा उपमर्द असे लांछनास्पद प्रकार सुरू होते ! या वेळीं मेहकरचे संघकार्यकर्ते रामाधार अवस्थी यांनीं लोकांना धीर देऊन इंग्रज अधिकाऱ्यांचें कारस्थान चव्हाट्यावर मांडून थेट व्हाइसरॉयपर्यंत तारा केल्या. या घटनेचें वृत्त ऐकून डॉक्टर कांहीं

दिवस अस्वस्थ होते. आपण आपला समाज वेळीच जागृत न केला तर भविष्य-काळांत इंग्रज व मुसलमान यांच्या युतींतून आपल्या समाजावर कसे अवमानास्पद प्रसग ओढवतील याची ही केवळ चुणूक आहे, अशी चिता त्याच्या बोलण्यांतून व्यक्त होई. त्याचप्रमाणे हिंदु समाज इतराच्या अपप्रचाराला बळी न पडेल इतका स्वाभिमानी बनवून कोणत्याहि घोर आपत्तींत धैर्याने उभा राहून आत्मसंरक्षण व आक्रमकशक्तीचे निर्दलन करण्यास समर्थ बनवावयाचा असेल तर सघाने आखलेल्या मार्गाने आज्ञांकित शक्तीची जोपासना करण्याव्यतिरिक्त दुसरा तरणोपाय नाही, असे विचार परोपरीने त्यानी तेथील मडळींच्या मनावर ठसविले. भविष्य-काळांतील हिंदु समाजाचे संभाव्य दयनीय चित्र उभे करताना त्याच्या मनाची होणारी तगमग ही शेजारी राहणाऱ्याना जाणवल्यावाचून राहत नसे व त्यावरील संघ हाच रामबाण उपाय आहे, हे सागताना दिसून येणारा आत्मविश्वास हाहि इतरांना कार्यप्रवृत्त करण्याइतका प्रभावी असे.

डॉक्टराचे संघाच्या दृष्टीने कारागृहातील असे प्रयत्न सुरू असतांना त्याच्या बाहेरील अनुयायानींहि प्रयत्नाची पराकाष्ठा केली होती. डॉक्टराच्या मागोमाग संघाचे तेव्हाचे सरसेनापति श्री. मार्तंडराव जोग यानी सत्याग्रह-आंदोलनात उडी घेतली. नागपूर जिल्हा संघचालक श्री. आप्पाजी हळदे याची तर ' डिक्टेटर ' म्हणून निवड झाली व त्यानींहि सहर्ष कारावास पत्करला. तसेच तळेगाव तेथे झालेल्या जगल-सत्याग्रहासाठी श्री. रामभाऊ वखरे व श्री. विठ्ठलराव गाडगे यानीं नागपूर सोडलें. त्या वेळी त्यांनाहि नागपूर शाखेवर प्रेमाचा निरोप देण्याचा कार्यक्रम झाल्याचा उल्लेख आढळतो. चिमूर येथील जंगल-सत्याग्रहात तर तेथील संघशाखेचे दहा-पधरा प्रमुख कार्यकर्ते पकडले गेले व त्यामुळे काहीं दिवस शाखाहि नीट चालविणे कठीण झाले असल्यास नवल नव्हते. नागपुरातील सघ-स्वयंसेवकाच्या शुश्रूषा-पथकाने केलेले सेवाकार्य हेहि जनतेच्या कौतुकाचा विषय होऊन बसले होतें. सघाच्या गणवेशातील खाकी सदऱ्याच्या जागीं पाढरा सदरा एवढा बदल करून व हातावर लाल क्रॉसच्या जागीं भारतीय सस्कृतीचे निदर्शक असे स्वस्तिक चिन्ह बाधून हे जवळ जवळ शभर तरुणाचे पथक प्रत्येक विशेष कार्यक्रमाच्या वेळी व आदोलनातील मिरवणुकाबरोबर असावयाचे. लाठी-मारानें घायाळ झालेल्याना मलमपट्टी करणे व घेरी आलेल्याना सावध करून योग्य स्थानीं पोहोंचविणें, अशी सर्व कामे हें पथक दक्षतेने करी. दि. ९ सप्टेंबरला कांही सत्याग्रहीना फटक्याची अमानुष शिक्षा ठोठावण्यांत आली. मासांत वेत रुतून रक्ताच्या चिळकाड्या उडत असताहि हंसतमुख असणाऱ्या सत्याग्रहींना मोगऱ्याचे भरघोस हार घालून त्याची मिरवणूक काढण्याताहे स्वयंसेवकांनीं पुढाकार घेतला होता व त्या सत्याग्रहींच्या औषधोपचाराची व्यवस्था सरसंघचालक डॉ. दादा परांजपे यानीं स्वतःच्या रुग्णालयांतच केली

होती. दि. ८ ऑगस्टच्या गढवाल दिनानिमित्तानें १४४ कलम धुडकावून लावण्यांत आलें. त्या मिरवणुकीच्या वेळीं तर हें पथक दुपारीं १ वाजल्यापासून रात्रीं १ वाजेपर्यंत कार्यमग्न होतें, असा उल्लेख सांपडतो.

पण हें आंदोलनांतील सहकार्य करीत असतां दैनंदिन कामावरील लक्ष यत्किंचितहि कमी झालेलें नव्हतें. संघ-कार्यालयाची झडती होणार, अशी वारंवार भुमका उठे व त्यामुळें तेथील कागदपत्र हालविण्यांत आले. मात्र स्वयंसेवकांची त्या ठिकाणीं ये-जा सुरू असे व त्या वेळच्या वातावरणाला अनुसरून कार्यालयांत टकळी व चरखा गरगरत असतां संघकार्याविषयीं स्वयंसेवकांच्या गप्पागोष्टी होत. शाखाहि फुललेल्या असत व डॉक्टर कारागृहांत आहेत तेव्हां ते येईपर्यंत आपण केवळ कार्य टिकवून न धरतां तें वाढविलेल्या स्वरूपांत दाखवितां यावें, अशा ईर्षेनें स्वयंसेवकांनीं प्रयत्न चालविले होते. त्याचें प्रतिवृत्त अधूनमधून डॉ. परांजपे अकोल्याला जाऊन डॉक्टरांना विदित करीत. त्या वर्षीं राखी पौर्णिमेच्या वेळीं डॉ. परांजपे यांनीं अकोल्याला जाऊन डॉक्टरांच्या हातांत स्वतः राखी बांधली व आंतील इतर स्वयंसेवकांना बांधण्यासाठीं कांहीं राख्या देऊन ठेवल्या. याप्रमाणेंच प्रांतांतील इतर शाखांशींहि भेट व टपाल या मार्गांनीं संबंध टिकविण्यांत कार्यकर्त्यांनीं दक्षता दाखविली होती.

अशा वातावरणांत डॉ. बा. शि. मुंजे हे गोलमेज परिषदेचें निमंत्रण स्वीकारून इंग्लंडला जावयास निघाले, ही गोष्ट असहकारवादी लोकांना कशी पटावी ! त्यांनीं त्यांच्याविरुद्ध टीकेची झोड उठविली. पण अशा टीकेचे प्रहार पचविण्याइतकी सहनशीलता असल्याचा प्रत्यय डॉ. मुंजे यांनीं आणून दिला. तेव्हां टीकेला न जुमानणारे डॉ. मुंजे म्हणून त्यांच्या जागीं एका गेंड्याचें व्यंगचित्र काढून त्या चित्राची मिरवणूक काढण्याचा बूट कॉंग्रेसच्या कांहीं विक्षिप्त मंडळींनीं काढला. पण ती मिरवणूक सुरू असतां त्यावर अचानक छापा घालून लोकांच्या लक्षांत येण्यापूर्वींच कांहीं व्यक्तींनीं तें चित्र पळवून फाडून टाकलें ! राजकारणांत मतभेद हे असणारच; पण त्या मतभेदांचें प्रदर्शन अशा थिल्लरपणानें करण्याची पद्धति ही योग्य मानतां येणार नाहीं. मतभेद असतांहि परस्परांच्या देशभक्तीचा आणि विशुद्ध हेतूचा आदर करीतच उभय गटांनीं आपआपल्या परीनें प्रयत्नमग्न राहण्यांत मौज आहे, असें डॉक्टरांचें मत होतें. त्यामुळें वरील मिरवणुकींतील व्यंगचित्राचें वृत्त जेव्हां कारागृहांत डॉक्टरांच्या कानीं आलें, तेव्हां लोकांनीं स्वयंस्फूर्तीनें पुढें येऊन त्या थिल्लरपणाला पायबंद घातला, याचें त्यांना एका परीनें समाधान वाटलें.

सामंजस्य हा डॉक्टरांच्या शिकवणुकीचा एक ठळक पैलू असे. एकदां गांधी श्रेष्ठ कीं सावरकर श्रेष्ठ, अशासारखा वाद दोघांत चालला असतां डॉक्टर तेथें गेले. तेव्हां निर्णयासाठीं दोघांनींहि आपलें म्हणणें त्यांच्यासमोर मांडलें. त्या

वेळीं डॉक्टरांनी घेतलेली भूमिका हीच त्यांच्या स्वभावाची निदर्शक होती. ते म्हणाले की, "गुलाब श्रेष्ठ कीं मोगरा श्रेष्ठ अशासारखाच हा वाद आहे. जसा गुलाबासारखा मोगरा नाही, तसाच मोगऱ्यासारखा गुलाब नाही, हेहि तितकेंच खरें व तसे पाहूं जातां सौदर्य, कोमलता व सुगंध या तिन्ही दृष्टींनी त्या दोघांत कोण श्रेष्ठ याविषयीहि मतभेद होणे सहज शक्य आहे. अशा वेळी ज्यानें त्याने दुसऱ्या फुलाला चुरगळून न टाकतां आपापल्या अभिरुचीप्रमाणे आपल्याला प्रिय असलेल्या फुलाचा मनसोक्त आस्वाद सुखेनैव घ्यावा असे मी सागेन." असेच वारंवार ऐकावयास मिळणारे विचार स्वयसेवकाच्या मनांत इतराविषयीचा द्वेष वा मत्सर याना अटकाव करण्यास कारणीभूत होत असत. याचेंच प्रत्यतर १९३० च्या आंदोलनांतील कॉंग्रेसशी मतभेद असूनहि संघ-स्वयंसेवकानी केलेल्या सहकारातून जाणत्या लोकाना आल्यावांचून राहिले नसेल.

डॉक्टर कारागृहात असतांना काही विरोधकानी उचल खाऊन मोहिते वाड्याची जागा घरे बांधण्यासाठी घ्यावयाची आहे, असे सांगून तेथील कार्यक्रम बंद पाडण्याचा यत्न केला. पण त्या वेळी राजे लक्ष्मणराव भोसले हे स्वतः पुढें आले व त्यांनी 'स्वतःच्या बेलबाग, तुळशीबाग व हत्तीखाना यापैकीं लागेल ती जागा तुम्ही वापरा,' असे सागितले. त्यांच्या इच्छेप्रमाणें हत्तीखान्यात संघ भरविण्यात येऊं लागला. डॉक्टराशी राजे लक्ष्मणरावाचे अत्यंत रहस्य असे व त्याच्या संघकार्याला ममत्वाने हातभार लावण्यात त्याना धन्यता वाटे. त्यामुळेच या वर्षीं संघाच्या दसऱ्याच्या उत्सवाचे अध्यक्षस्थान स्वीकारून त्यानी सर्व स्वयं-सेवकाना "डॉक्टर हेडगेवारानी सुरू केलेले हे पवित्र कार्य नेटाने पुढे चालवा," असें प्रोत्साहन दिले होते. त्या वेळच्या भाषणात, सघाला आपलीच माणसे कशी अडथळा करीत आहेत, याचे वर्णन करण्याच्या ओघांत राजे लक्ष्मणराव म्हणाले कीं, "संघाच्या कांही हितशत्रूंनीं त्याला मोडून काढण्याचे अधम प्रयत्न केले नसते तर आज तुम्ही पाहतां त्यापेक्षाहि त्याची अधिक प्रगति झाली असती. आजहि तसे प्रयत्न चालले आहेतच.' या दसरा उत्सवांत सघाच्या गावोगावच्या शाखांतून 'मना, तुला सुखाचा अधिकार नाहीं!' या भावनोद्दीपक व प्रेरक निबंधाचे वाचन करण्यात आले होते व त्यात 'देशाचें पारतंत्र्य नष्ट होऊन सारा हिंदु समाज बलशाली व आत्मनिर्भर होईपर्यंत मना, तुला वैयक्तिक सुखाची अभिलाषा धरण्याचा अधिकार नाहीं' असा विचार माडला होता. या वर्षीं निघालेल्या दसऱ्याच्या मिरवणुकींतील स्वयंसेवकांनीं नागपूर कारागृह व नरकेसरी अभ्यंकर यांचा निवास यांसमोरून जाताना मानवंदना दिली होती.

अकोला कारागृहांतील कोठडींत आतां संघाच्या विचारांचा एक प्रभावी गट निर्माण झाला होता व कारागृहातून सुटल्यानंतर कसे कसें कार्य वाढवावयाचे, याच्याहि कल्पना बोलल्या जाऊं लागल्या. चार महिन्यांनंतर एकएकाची सुटका

होण्यास प्रारंभ झाला. त्यानंतर तेथून जाणाऱ्या कार्यकर्त्याला डॉ. ठोसर यांच्या नेतृत्वाखालीं सर्वांनीं ' प्रणाम ' करून निरोप देण्यांत येऊं लागला. जाण्यापूर्वी बुलढाणा, अकोला व यवतमाळ भागांतील कार्यकर्त्यांनीं " आपली सुटका झाली कीं आमच्या भागांत या म्हणजे आपण संघ सुरू करूं, " अशी परमपूजनीय डॉक्टरांना आग्रहाचीं निमंत्रणें व आश्वासनें दिलीं. डॉक्टरांच्या सहवासांतून जातांना कांहीं जणांचे डोळे अक्षरशः आसवांनीं ओलावून जात व कमी शिक्षा झाली हें वाईट झालें, अशी चुटपूट त्यांना लागलेली दिसे !

एकेक सहकारी सुटून जात असतांना कारागृहाच्या त्या चाळींत असणारें गजबजलेलें खेळकर वातावरण आपोआपच पालटूं लागलें होतें. अशा वेळीं डॉक्टरांना दुःख देणाऱ्या व सचिंत करणाऱ्या वार्ता त्यांच्या कानांवर येऊन पडूं लागल्या. नागपुरांतील एक धनाढ्य गृहस्थ व डॉक्टरांचे स्नेही श्री. डी. लक्ष्मी-नारायण हे निवर्तल्याचें वृत्त ऐकून त्यांना अत्यंत वाईट वाटलें. वैयक्तिक स्नेही गेला, या दुःखाइतकीच संघाच्या दृष्टीनेंहि ती दुर्घटनाच होती. कारण सत्याग्रहापूर्वी या उदार तेलंगी गृहस्थानें डॉक्टरांना संघकार्यासाठीं एक लक्ष रुपये देण्याची इच्छा प्रदर्शित केली होती. पण या आकस्मिक निधनानें ती गोष्ट घडणें अशक्य झालें.

त्याच्याच जोडीनें इंग्लंडमध्यें चालू असलेल्या गोलमेज परिषदेंत जे मुसलमानांचे देशविच्छेदकारक प्रलाप उमटले होते, तेहि डॉक्टरांची झोप उडविण्यास कारणीभूत झाले होते. आपला तेहतीस कोटींचा समाज असतांना हिंदुस्थानचे धिंडवडे काढणाऱ्या पाकिस्तानी योजना डोळ्यांदेखत प्रगत व्हाव्यात व अगतिकतेनें सारें पाहण्याचा प्रसंग आपल्या समाजावर ओढवूनहि त्याचे डोळे उघडूं नयेत, या भयानक वास्तवतेच्या दर्शनानें डॉक्टरांच्या अंतःकरणांत खळबळ माजे व त्याच चिंतेंत त्यांची अतिशय तगमग होई.

अशा अवस्थेंतच वज्राघात झाल्यासारखें एक वृत्त डॉक्टरांच्या कानीं झालें. डॉक्टरांच्या अगदीं लोभांतील व विश्वासांतील सरकार्यवाह श्री. बाळाजी हुद्दार यांना १९३१ च्या जानेवारींत बालाघाटाच्या राजकीय सशस्त्र दरोड्यांत पकडल्याचें तें भयानक वृत्त होतें. सरसंघचालकांच्या खालोखाल संघटनेंत ज्यांचें स्थान आहे त्यांच्यावर असा आरोप येणें म्हणजे पर्यायानें इंग्रजांच्या डोळ्यांत सलूं लागलेल्या रा. स्व. संघाच्या संघटनेवरील तें गंडांतरच होतें. गेल्या शेंकडों वर्षांतील अखंड युध्यमान परिस्थिती-मुळें, परक्यांच्या पाशवी आक्रमणांमुळें व आपल्या समाजाच्या आत्मविस्मृत जीवनामुळें ज्या प्रकारच्या राष्ट्रीय भावनेचा परिपोष करण्यास उसंत मिळाली नव्हती, तें कार्य आपण विपरीत परिस्थितींत अत्यंत सावधपणानें उभारावयास प्रारंभ करून अवघीं पांच वर्षें झालीं नाहींत तोंच असा आघात व्हावा, याचें त्यांना अतीव दुःख झालें असल्यास नवल नव्हतें. कारण ते त्याच संघटनेच्या

उभारणीसाठीं श्वासोच्छ्वास करीत होते व आपल्याला सर्वांत प्रिय असलेल्या पंचप्राणांचे निराजन त्याच ध्येयदेवतेला ओवाळण्यासाठी त्यांनीं तेवत ठेवले होते. ज्याचे जीवन इतके समर्पित असेल त्यालाच त्या दुःखाची कांहींशी कल्पना करता येईल. इतरांचे निःसत्त्व शब्द त्या दुःखाची तीव्रता व्यक्त करण्यास असमर्थच आहेत. हे मनातील दुःख व काळजी ज्याच्याजवळ मनमोकळेपणाने व्यक्त करतां येईल असे सहकारी सुटून बाहेर गेले होते व त्यामुळें आतल्या आंत ती चिंतेची व्यथा सहन करण्यावाचून गत्यंतर नव्हते. या काळांत चिंतेमुळे डॉक्टराची झोपहि उडाली व त्यांना अन्नहि जाईना !

अशा मनःस्थितींत असतानाच ठरीव शिक्षा पूर्ण होण्यापूर्वी १९३१ च्या दि. १४ फेब्रुवारीला डॉक्टराची अचानक सुटका झाली. त्यानतर अकोला व वर्धा येथे थोडे थाबून व तेथील सत्काराचा स्वीकार करून दि. १७ फेब्रुवारीला सायंकाळीं ५॥ वाजता डॉक्टर नागपूर स्थानकावर उतरले. तेथे स्वागतासाठी जमलेल्या असंख्य लोकानीं डॉक्टराचा जयजयकार करून त्याना अनेक संस्थाच्या वतीने हार अर्पण केले. त्यानतर त्याची वाजतगाजत मिरवणूक निघाली. ही मिरवणूक हत्तीखान्याच्या मैदानावर पोहोचल्यावर डॉक्टराच्या स्वागतपर भाषण करून डॉ. पराजपे यांनीं त्याना ‘ सरसघचालक ’ पदाची सूत्रे स्वीकारावींत, अशी विनति केली.

तेथे डॉक्टराच्या सभोवतीं वलय करून उभ्या राहिलेल्या स्वयंसेवकाचा आनंद त्याच्या मुखावर स्पष्ट उमटला होता. डॉक्टरानीं सर्वांची विचारपूस केली व ते घरी न जातां आजारी स्वयंसेवकाच्या समाचारासाठी तडक निघून गेले ! कोण ही आस्था !

* * *

## १९ : वऱ्हाडांत प्रवेश

अकोला कारागृहांतून परमपूजनीय डॉ. हेडगेवार दि. १४ फेब्रुवारी १९३१ ला बाहेर आले व त्यांनीं आपल्या अनुपस्थितींत झालेल्या संघकार्याची जवळून पाहणी केली. आपले प्रमुख नेते कारावासांत असले तरी त्यामुळें कामांत कोणत्याहि प्रकारची कमतरता पडूं देणार नाहीं, हा स्वयंसेवकांचा निर्धार संघाच्या कार्यवाहींतून प्रकट झाला होता. तसें पाहिलें तर डॉक्टरांनीं आपल्या सभोंवतीं जमवलेले तरुण हे जगाच्या दृष्टीनें शाळकरी वा बाळगोपाळ याच कोटींत मोडणारे होते. पण त्या वेळच्या संघटनेच्या व्यापाला तोलून धरण्याचें त्यांनीं दाखविलेलें सामर्थ्य व चिकाटी संघसंस्थापकांना प्रसन्न करणारी होती यांत शंका नाहीं. संघाच्या दैनंदिन संस्कारांतून कोणत्या चिवट वृत्तीचीं माणसें उभीं राहूं शकतात, याचा आलेला हा अनुभव सर्व कार्यकर्त्यांचा आत्मविश्वास वाढविणारा ठरला.

नागपुरांत चार-सहा दिवस राहून एकूण परिस्थितीचा कानोसा घेतल्या-नंतर डॉक्टर मुंबईला गेले. त्या वेळीं त्यांच्या मनांत संघकार्याच्या दृष्टीनें मुंबईतील आपल्या मित्रमंडळींजवळ बोलणें करून प्रत्यक्ष महाराष्ट्रांत पदार्पण करण्याला अनुकूलता निर्माण करावी, असाच हेतु असावा. या वेळीं प्रामुख्यानें देशभक्त बाबाराव सावरकर व डॉ. नारायणराव सावरकर यांच्याशीं त्यांचें बोलणें झालें. डॉक्टर मुंबईला असतांना विलायतेंत नुकत्याच होऊन गेलेल्या गोलमेज परिषदेंतील हिंदुराष्ट्रविरोधी सूर त्यांना ऐकावयास मिळाला व हिंदु समाजावरील भावी संकटाची भेसूरता त्यांच्या लक्षांत आली. संकटें दिसत आहेत व तीं टाळण्याचा मार्गहि सांपडला आहे; आतां सर्वांचीं पावलें त्या दिशेनें झपाट्यानें कशीं पडतील, याच विचारांत डॉक्टर चूर झालेले दिसत.

या मुंबईच्या वास्तव्यांत डॉक्टरांची व श्री. विठ्ठलभाई पटेल यांची धावती भेट होण्याचा योग जुळून आला. प्रकृति बिघडल्यामुळें सरकारी पाहुणे असलेल्या विठ्ठलभाईंना व्हिएन्ना येथें पाठविण्यासाठीं सरकारनें मुंबईला आणलें. ही हालचाल सरकारनें गुप्तता राखून चालविली होती व त्यासाठीं विठ्ठलभाईंना मुंबईला आणतांना त्यांचें वैशिष्ट्य असलेली त्यांची दाढीहि काढून टाकण्याची दक्षता सरकारनें घेतली होती, असें सांगतात. मुंबईला त्यांना शेठ गोकुळदास तेजपाल रुग्णालयांत ठेवण्यांत आलें होतें. या काळांत डॉ. हेडगेवारांचे भाचे

डॉ. भास्करराव कृष्णराव विंचुरे हे त्याच ठिकाणीं हाउस-सर्जन म्हणून काम पाहत होते. त्यांची व श्री. विठ्ठलभाईंची दृष्टादृष्ट होतांच त्यांनीं विठ्ठलभाईंना ओळखलें. विठ्ठलभाईंनीं "मला ओळखल्याचें न दाखवितां मला पाहिजे असलेल्या व्यक्तींची सहजतेने भेट करून दे" असा कानमत्र तरुण विंचुरे याना दिला. डॉ. विंचुरे याच्याकडून डॉक्टराना विठ्ठलभाईच्या खालावलेल्या प्रकृतीविषयीं वृत्त कळले. सघाच्या मूलगामी कार्याविषयीं आस्था बाळगणाऱ्या पुढाऱ्यात विठ्ठलभाईचा अंतर्भाव होता व कांहीं वर्षांपूर्वीं नागपूर शाखेला भेट देऊन त्यांनीं संघाला आशीर्वादहि दिला होता. अशा वेळीं स्वतः डॉक्टर व श्री. बाबाराव सावरकर यांनी डॉ. विंचुरे यांच्याबरोबर जाऊन त्या वयोवृद्ध देशभक्ताच्या प्रकृतीची मोठ्या आस्थेनें विचारपूस केली होती, हें सांगावयास नकोच. डॉक्टराना खऱ्या देशभक्तीची ओढ होती व त्यामुळे कोणतेहि पक्षभेद हे त्याच्या स्नेहाच्या आड येऊं शकत नसत, असाच निर्वाळा द्यावा लागे.

मुंबईहून परतल्यावर थोड्याच दिवसात डॉक्टराना श्री. बाबाराव सावरकर यांच्या तांतडीच्या निरोपावरून श्रीक्षेत्र काशी येथे जावे लागले. काशींत हिंदु-मुसलमानात संघर्ष निर्माण होण्याचीं चिन्हे स्पष्टपणे दिसू लागलीं होती व प्रकृतीमुळें विश्रातीसाठीं तेथे गेलेल्या बाबारावाना स्वतः हालचाल करणे शक्य नव्हते. तेव्हां या वातावरणांत हिंदूंना जागे करून त्याना संघरूपानें उभे रहा अशी समजूत पाडण्यास हाच काळ योग्य आहे, या कल्पनेने बाबारावानी डॉक्टरांना तातडीने बोलाविलें होते. मार्च दि. ११ ला डॉक्टर तेथे गेले व त्यानीं काशीच्या स्थानिक कार्यकर्त्यांना त्या संघर्षाच्या काळात टिकाव धरण्यास आवश्यक असे मार्गदर्शन केले. "दंग्यात हिंदूंच्या रक्षणाची खबीर व्यवस्था डॉक्टरानी केली," असा उल्लेख कै. बाबाराव सावरकर याच्या चरित्रग्रथात केलेला आढळतो.

या वेळीं प. पू. डॉक्टरांना काशीला जाण्यापूर्वीं बाबाराव सावरकर याची, अत्यंत निकड व्यक्त करणारी तार आली होती. बाबारावाची घाई ही डॉक्टराच्या चांगलीच परिचयाची असल्याने त्यानीं गमतीने उलट तार केली कीं, "धीर धरा, वाट पहा, प्रार्थना करा (आणि) येतों अशी आशा धरा!" (Wait, watch, pray and hope!) व या तारेनंतर एक-दोन दिवसातच प. पू. डॉक्टर काशीस आले. ते कोणत्या गाडीने येणार ते त्यानीं पत्रानें आधीं कळविलें होते. तेव्हा त्यांच्या स्वागतासाठीं काहीं जण स्थानकावर आले व त्यांनीं डॉक्टराना श्री. भाऊराव दामले यांच्या घरीं नेलें. तेथें बाबाराव त्यांची वाट पाहत होते. डॉक्टर वाहनातून खालीं उतरतांच बाबरावांनीं पुढील दार बुद्धयाच लावून घेतलें नि डॉक्टर पुढे होऊन दारावर थाप मारीत 'दार उघडाऽऽ' असे म्हणतांच ते आंतून म्हणाले, 'Wait, watch, pray and hope!' अर्थात् या थट्टेनें डॉक्टरांचे स्वागत हास्यरसानें किती प्रसन्न झाले असेल हें सांगणें न लगे!

दि. १ एप्रिलपर्यंत डॉक्टर या वेळीं काशींत होते. तेवढ्या अवधींत श्री. भाऊराव दामले यांच्याकडे पडून असलेल्या बाबारावांची डॉक्टरांनीं पडेल ती सेवाशुश्रूषा केली व त्यांतूनच वेळ काढून काशी नगरांतील पं. मदनमोहन मालवीय यांच्या काशी हिंदु विश्वविद्यालयामधील संघशाखेला स्वरूप आणून देण्यासाठीं प्रयत्न चालविले. त्यासंबंधीं दि. २६ मार्चच्या पत्रांत ते लिहितात कीं, " ......येथील हिंदु विश्वविद्यालयांत एक व श्रीकाशी नगरांत एक अशा दोन शाखा येथें स्थापन झाल्या आहेत. विश्वविद्यालयांत मी एकंदर पांच-सहा वेळां गेलों व त्यांपैकीं तीन बैठकी व्याख्यानाच्या झाल्या व तीन बैठकींत चर्चा झाली. विश्वविद्यालयांत शाखेचें यापुढील कार्य उत्तम रीतीनें चालू शकेल, अशी आशा करण्यासारखी परिस्थिति उत्पन्न झाली आहे. गांवांतील शाखेचें कार्यहि उत्तम रीतीनें चाललें आहे व हळूहळू येथील महत्त्वाची मोठी मंडळी संघाला येऊन मिळत आहेत. "

या वेळीं काशीला डॉक्टरांनीं घेतलेल्या बैठकींतून त्यांच्या मनांतील एक बोंच वारंवार व्यक्त झाली होती. हिंदु समाजाच्या सद्यःस्थितीचें वर्णन करून ते सांगत कीं, " काशी विश्वेश्वराच्या देवळाजवळ मशीद कां व घाटावर मिनार कां उभा आहे, असा प्रश्न हिंदु मनाला पडत नाहीं वा त्याची खंतहि वाटत नाहीं ! ही स्थिति पालटण्यासाठीं संघ आहे हें विसरूं नका. "

उपरिनिर्दिष्ट बैठकींत एकदां प्रतिष्ठित प्रौढांजवळ संघासंबंधीं मनमोकळी चर्चा झाल्यावर डॉक्टरांनीं सर्वांना प्रतिज्ञा घेण्याची विनंति केली. त्या वेळीं प्रतिज्ञेचें स्वरूप सांगतांना ते म्हणाले कीं, " देश, धर्म यासाठीं तन-मनधनपूर्वक आजन्म काम करीन, अशा आशयाची प्रतिज्ञा आहे." तेव्हां एकानें सूचना केली कीं, " 'तनमनधनपूर्वक' याऐवजीं 'यथाशक्ति' अशी शब्दयोजना असावी." त्यावर ते म्हणाले कीं, " कोणीहि मनुष्य झाला तरी तो आपल्या शक्तीबाहेर काम करूंच शकत नाहीं. मात्र शक्ति असूनहि ती हातची राखून व अंगचुकारपणा करून आपण 'यथाशक्ति' काम केलें अशी तो इतरांची समजूत करून देण्याचा प्रयत्न करूं शकतो. यासाठींच 'तनमनधनपूर्वक' काम करण्याचा प्रतिज्ञेंत योजनापूर्वक उल्लेख आहे. "

परमपूजनीय डॉक्टरांचा हा सडेतोड विचार ऐकून सर्व जण भारून गेले. डॉक्टरांना देशकार्यासाठीं अशा आत्मसमर्पणाची सिद्धता असलेल्या लोकांची किती आवश्यकता भासत होती, हें त्यांच्या दोन-तीन दिवसांच्या बोलण्यांतून स्पष्ट झालेंच होतें. तेव्हां आपण पळवाट काढणारा 'यथाशक्ति' हा शब्द सुचविला हें बऱ्याच जणांना स्वाभाविकच अप्रस्तुत वाटलें व त्यांच्यांतील एका वकिलानें पुढें होऊन म्हटलें, " हें पहा, प्रतिज्ञेंत फेरफार करावा कीं नाहीं असें डॉक्टरांनीं आपणांला विचारलेलें नाहीं; तर संघाची जशी प्रतिज्ञा आहे तशी ती मान्य असेल तर घ्या

अशी विनंति केलेली आहे व त्याप्रमाणे प्रथम मी प्रतिज्ञा घेण्यास सिद्ध आहें ! ” त्या वकिलांनी प्रतिज्ञा घेताच त्यांच्या मागोमाग बैठकींतील सर्वांनी, आढेवेढे न घेता प्रतिज्ञा घेतल्या.

डॉक्टराची हिंदु समाजाला जागृत व सुसंघटित करण्यासाठी रात्रंदिवस चाललेली अशी धडपड बाबाराव सावरकर अनेक वर्षे पाहत असल्याने त्याना डॉक्टराच्या संघटनकौशल्याची अलौकिकता ध्यानी येण्यास विलंब लागला नाही. त्यानींहि ‘ तरुण हिंदुसभा ’ या नावाखाली ठिकठिकाणी तरुणाची लहान लहान मडळे उभीं केली होती व त्यातून उभे राहणारे तरुण व सघातील सुसस्कारित तरुण यातील अंतर नेमके हेरले होतें. हिंदुस्थानसारख्या अति अवाढव्य देशात कोटयवधि लोकांची सघटना उभी करण्याचा व्याप पेलण्याइतकी शारीरिक अनुकूलता यापुढे आपणाला लाभणार नाहीं, याची जाणीवहि बाबारावाना सतावत असे. अशा वेळीं दिवसेंदिवस हिंदु समाजाच्या दृष्टीने अत्यंत भयानक होत चाललेल्या परिस्थितीला आवर घालण्यासाठी लागणारी कर्तृत्वशक्ति, कौशल्य व गतिशीलता याचे दर्शन डॉक्टराच्या उसळत्या तेजस्वी कृति-उक्तीतून त्याना घडणे स्वाभाविक होतें. यातूनच बाबारावानी ‘ तरुण हिंदुसभा ’ सघात समाविष्ट करण्याचा मनोमन निश्चय केला व तो मनोदय काशीच्या वास्तव्यात त्यानी डॉक्टराना विदित केला. एक दिवस बाबारावाच्या शेजारी डॉक्टर बसले असतां ते त्याना म्हणाले की, “ डॉक्टर, आज मी माझी ‘ तरुण हिंदुसभा ’ विसर्जित केली. ती तुमच्या संघात विलीन करून घ्या. यापुढे माझी जी काही पुण्याई असेल ती मी तुमच्या सघकार्यात खर्चीं टाकीन. आपला सघ चिरंजीव नि यशस्वी होवो, असे माझे आशीर्वाद आहेत. ”

‘ मीं सुरू केलेली संस्था ’ या अहंकाराने फुगून न जाता लहानग्या वा मोडकळीस आलेल्या सस्था देखील त्याच ध्येयाने प्रेरित झालेल्या मोठ्या संस्थेत विलीन करण्याची उदारता ही क्वचितच दिसणारी गोष्ट आहे. अशा सस्थाची अडगळ हरघडी प्रत्ययाला येते ! म्हणून बाबारावानी संघकार्याशीं दाखविलेली समरसता ही जशी त्यांच्या कार्यार्थी प्रेमाची निदर्शक आहे, त्याचप्रमाणे प. पू. डॉक्टरांच्या लोकसंग्राहक वृत्तीची व कार्यकौशल्याची निशाणी म्हणून सागता येईल.

लोकसंग्रहाला लागणारी दक्षता डॉक्टराच्या व्यवहारात सदैव प्रत्ययाला येई. ते काशीला असतानाच नागपूरचे त्याचे स्नेही नरकेसरी बॅ. मोरोपंत अभ्यकर याची कारागृहातून सुटका झाल्याचे वृत्त त्याना समजले. तेव्हां पाडव्याच्या दिवशीं तेथूनच त्याचें अभिनदन करणारे पत्र लिहिण्यास ते विसरले नाहींत. त्या पत्रात ते म्हणतात की, “ ......आजचा वर्षप्रतिपदेचा दिवस. आजच्यासारख्या सुमंगल दिवशीं मला जर आपलें प्रत्यक्ष दर्शन घेतां आले असते तर किती आनंद झाला असता ! विशेषतः आपल्या मध्यंतरींच्या तुरुंगवासानें आपली भेट फार दिवसांपासून

दुरावल्यासारखी झाली आहे. आपण तुरुंगांतून सुटल्याबरोबर नागपूरला आपल्या भेटीचा योग येईल असें म्हणून वाट पाहत असतां, त्याच वेळीं कांहीं अत्यंत निकडीच्या कार्याकरितां मला श्रीकाशी क्षेत्रीं यावें लागलें......आज मी आपणांपासून फार अंतरावर असल्यामुळें जरी आपलें दर्शन घेण्यास असमर्थ असलों तरी माझ्या मनश्चक्षूंनीं आपलें दर्शन घेऊन या पत्ररूपानें मी आपली भेट घेत आहें." आपणांशीं मतभेद असलेल्या व नागपुरी फटकळपणांत व राजकीय वादंगांत अग्रगण्य ठरलेल्या व्यक्तीलाहि डॉक्टरांनीं संघकार्य करीत असतां वगळलेलें नाहीं, हीच गोष्ट या पत्रांतील जिव्हाळा पाहिल्यावर सहज ध्यानीं येण्यासारखी आहे. समाजाचें संघटन हा जगन्नाथाचा रथ असतो व तो ओढण्यासाठीं लक्षावधि लोकांचे हात लावण्याची आवश्यकता असते. या जागत्या जाणिवेंतूनच सर्वांना त्यांचे दोष पारखूनहि, जवळ करण्याची वृत्ति डॉक्टरांनीं स्वीकारली होती. त्यांच्या अपेक्षे-प्रमाणें अशा लोकांचा हातभार संघकार्याला लागलेला आहे, हेंहि विसरून चालणार नाहीं.

काशीच्या संघर्षांत हिंदूंची बाजू सांवरून धरण्यासाठीं डॉक्टर धडपड करीत असतांनाच दि. २३ मार्च या दिवशीं लाहोरच्या कारागृहांत सरदार भगतसिंग, सुखदेव व राजगुरु यांना फांसफळीवर चढविण्यांत आल्याचें अत्यंत दुःखद व खळबळजनक वृत्त येऊन धडकलें ! या वार्तेनें डॉक्टरांना तीव्र मनोवेदना झाल्या. त्यांचा भगतसिंग व राजगुरु यांच्याशीं परिचय होता; इतकेंच नव्हे तर नागपुरांतील वास्तव्यामुळें राजगुरूंशीं त्यांचे निकटचे संबंध आले होते, याचा उल्लेख मागें आलाच आहे. असे तेजस्वी तरुण फांसावर चढण्यापूर्वीं ज्या दुर्दमनीय विश्वासानें व उसळत्या तारुण्यानें रसरसून "मेरा रंग दे बसंती चोला। इसी रंग में रंगके शिवाने माँका बंधन खोला।" असें गीत मुक्तकंठानें घुमवीत होते. त्याच मनःस्थितींत व त्याच रंगांत रंगलेल्या डॉक्टरांनीं मातृभूमीच्या विमोचनासाठीं अशा जागृत तरुणांची देशव्यापी फळी उभी करण्यासाठीं अधिक धडपड करण्याचा निश्चय करून, तो आघात सहन केला होता.

हिंगणघाटचा दरोडा व त्यांतील गंगाप्रसादचें वापरलेलें पिस्तुल, तसेंच श्री. बाळाजी हुद्दार यांना एका राजकीय दरोड्यांत झालेली शिक्षा या एकामागून एक झालेल्या घटनांनीं प. पू. डॉक्टरांना किती त्रास झाला, हें आपण पाहिलेंच आहे. त्या घटनांनीं त्यांना कळून चुकलें कीं, शेंकडों वर्षें ज्या एका विसंघटितपणामुळें आपल्या समाजाचा असंख्य तऱ्हांनीं ऱ्हास झाला होता, तो दोष समूळ व कायमचा काढून टाकण्यासाठीं संघाच्या रूपानें चाललेले प्रयत्न यशस्वी व्हावयास पाहिजे असतील तर हीं दडवलेलीं शस्त्रास्त्रें नष्ट करणें हें हितकर ठरेल. तसें न केल्यास क्षुल्लक गोष्टीच्या परिस्फोटांतून, कांस्याचा नायटा व्हावा त्याप्रमाणें, शस्त्रास्त्रांबरोबरच उभ्या केलेल्या संघटनेचाहि नाश होण्याचा प्रसंग आल्यावांचून

राहणार नाहीं, नि याच विचारानें त्यांनीं महाप्रयासानें जमविलेला दारूगोळा नि शस्त्रास्त्रे १९३१ नंतर स्वतःच्या हाताने नष्ट करून टाकलीं !

डॉक्टर एप्रिलच्या प्रारंभी काशीहून नागपूरला परत आले व त्याच वेळीं कराची कॉंग्रेस अधिवेशनांत ' राष्ट्रीय निशाण कोणतें असावे ? ' हे ठरविण्यासाठीं एक समिति नेमण्यांत आल्याचे घोषित करण्यात आलें. दि. १ व २ एप्रिलच्या कॉंग्रेसमध्ये नियुक्त झालेल्या ध्वज-समितीकडे डॉक्टराचे लक्ष वेधणें स्वाभाविक होते. कारण १९०६ पासून निरनिराळ्या व्यक्तींकडून स्वयंस्फूर्तीने हिंदुस्थानचा ध्वज म्हणून जे ध्वज निर्माण करण्यात आले होते, त्या ध्वजांच्या रगाशी डॉक्टर मुळींच सहमत नव्हते. अशा वेळीं देशातील प्रमुख राजकीय संस्थेने विचारपूर्वक राष्ट्रध्वज निश्चित करण्यासाठीं समिति नियुक्त केली, ही गोष्ट डॉक्टराना स्वागतार्ह वाटली व त्यांनीं हिंदुस्थानच्या सहस्त्रावधि वर्षांच्या प्रदीर्घ व उज्ज्वल परंपरेशीं सुसगत असा भगवा ध्वजच समितीकडून निश्चित व्हावा, यासाठीं प्रयत्न सुरू केले.

या समितीवर सरदार वल्लभभाई पटेल, पं. जवाहरलाल नेहरू, डॉ. पट्टाभिसीतारामय्या, डॉ. ना. सु. हर्डीकर, आचार्य काकासाहेब कालेलकर, मास्टर तारासिंग व मौलाना आझाद असे सात जण होते. या समितीने निरनिराळ्या देशाच्या राष्ट्रीय ध्वजामागील आधारभूत कल्पनाचा विचार करून एकमताने असा निर्णय केला कीं, " एकरंगी ध्वज असावा व त्याचा रग केशरी असून त्यावर दाडीच्या बाजूला निळ्या रगांत चरख्याचें चित्र असावे. " भारतीय परंपरेच्या दृष्टीने त्यांनीं या केशरी रंगाची निवड केलेली होती. प्रतिवृत्तात म्हटले होते कीं, " ...आपलें राष्ट्रीय निशाण फक्त एकाच रगाचे असावे याविषयी आमचे एकमत आहे. सर्व हिंदी लोकाचा एकदम उल्लेख करावयाचा झाल्यास त्याना सर्वात अधिक मान्य होईल असा केशरी हा रंग आहे. इतर रंगापेक्षां हा अधिक स्वतंत्र स्वरूपाचा रंग असून या देशाला पूर्वपरपरेने तो आपलासा वाटतो. " ( साप्ताहिक महाराष्ट्र ) शिवाय असा रंग स्वीकारण्याने महात्माजीनीं १९२१ पासून देशातील विविध धर्मांचे प्रातिनिधिक म्हणून पाढरा, हिरवा व लाल या रंगाचे जें निशाण निर्माण केले होते, त्यामागील ' जातीय निवाड्या 'ला प्रोत्साहन देणारी विकृत भावना दूर सारली जाणार होती व त्याच्याच बरोबरीने ' ध्वजावर शिखांचा म्हणून एक स्वतंत्र रंगाचा पट्टा असावा ' अशा मागणीला इतर जातीय रंगाचें उच्चाटन करून परस्पर शह मिळणार होता. या समितीचा निर्णय वृत्तपत्रातून प्रसिद्ध झाला त्या वेळीं डॉक्टर यवतमाळला होते.आता लवकरच हे समितीचे अभिमत कॉंग्रेसच्या कार्यकारिणीसमोर मांडले जाईल, हे ओळखून डॉक्टर लगेच लोकनायक बापूजी अणे यांना जाऊन भेटले. कारण ते कार्यकारिणीच्या बैठकीसाठीं लवकरच जावयाचे होते. ध्वज-समितीचें अभिमत त्यांना दाखवून डॉक्टर म्हणाले कीं,

" राष्ट्राचे ध्वज भगवा व केशरी असे दोन असावेत असें मला वाटत नाहीं. या दोन रंगांत फारच थोडा फरक आहे, तेव्हां एकरंगी केशरी म्हणजेच भगव्या ध्वजाची बाजू आपण मांडली पाहिजे. खूप अभ्यास करून जरी समितीनें केशरी रंग सुचविला असला तरी त्यांतील सर्व जण महात्मा गांधींसमोर मुकेच होतात ! तेव्हां गांधीजींनीं त्या रंगाला विरोध करून तिरंगी झेंड्याचा पुरस्कार केला तर समितींतील पुढारी तोंडें उघडणार नाहींत. यासाठीं तुम्हीं पुढें होऊन निर्भीडपणानें बाजू मांडली पाहिजे. "

लो. अणे स्वत: एकरंगी केशरी ध्वजाला अनुकूल नव्हते. पण डॉक्टरांनीं केशरी रंग हा आपल्या भगव्या रंगाहून निराळा नाहीं, ही गोष्ट ध्यानीं आणून दिल्यावर त्याच ध्वजाचा पुरस्कार करण्याला त्यांनीं होकार दिला. एवढें करून डॉक्टर थांबले नाहींत; तर त्यांनीं कार्यकारिणीच्या बैठकीपूर्वीं स्वतः दिल्लीला जाऊन लोकनायकांच्या घरीं तळ ठोकला. तेथील तीन-चार दिवसांच्या वास्तव्यांत त्यांनीं " इतरांनाहि भेटून असा आग्रह केला असावा. कारण दिल्लींत ते सबंध दिवस इकडे तिकडे हिंडून अनेकांना भेटत होते," अशी आठवण लोकनायक सांगतात.

अर्थात् इतकी खटपट करूनहि प. पू. डॉक्टरांचा हेतु साध्य झाला नाहीं. मुंबईला अखिल भारतीय काँग्रेस समितीच्या बैठकींत जेव्हां हें ध्वज-समितीचें प्रतिवृत्त सादर करण्यांत आलें, तेव्हां एकरंगी केशरी ध्वजाची सूचना फेटाळली जाऊन तिरंगी ध्वजाला मान्यता मिळाली. मात्र ध्वज-समितीच्या सूचनेचा परिणाम म्हणून तिरंगी झेंड्यांत भडक तांबड्या रंगाच्या जागीं केशरी रंग स्वीकारण्यांत येऊन त्या रंगाला अग्रस्थान देण्यांत आलें. तत्पूर्वींच्या तिरंगी झेंड्यांत लाल रंगाची पट्टी अगदीं तळाला असे. सरदार पटेल, पं. जवाहरलाल नेहरू, मौ. आझाद, डॉ. पट्टाभि सीतारामय्या यांच्यासारख्या काँग्रेसमधील ' अग्रगण्य ' पुढाऱ्यांचा एकमुखी निर्णय मुंबईच्या बैठकींत कांहीं प्रमाणांत झिडकारला जाणें, ही गोष्ट सकृद्दर्शनीं आश्चर्यकारक वाटते. पण त्या काळांत काँग्रेसच्या भल्या भल्या पुढाऱ्यांनीं मंडित केलेल्या सभेचा रंग महात्माजींच्या एका शब्दाबरोबर कसा पालटत असे हें ज्यांना माहीत आहे, त्यांना या समितीच्या एकरंगी ध्वजाचा असा बेरंग झाल्याचें नवल वाटणार नाहीं ! अस्तु.

याच महिन्यांतील आणखी एक घटना उल्लेखनीय आहे. एप्रिलच्या पहिल्या आठवड्यांत पहिली गोलमेज परिषद आटोपून डॉ. मुंजे मुंबईला येऊन पोहोंचले. त्यांच्या येण्याकडे डॉक्टरांचें विशेष लक्ष होतें. कारण त्या परिषदेंत इंग्रज व मुसलमान यांच्या युतींतून फुटीरपणाचे व हिंदुहितविरोधी जे सूर उमटले होते, ते प्रत्यक्ष डॉ. मुंजे यांच्याकडून ऐकण्याची त्यांना उत्सुकता होती. प्रामाणिकपणा, निर्भयता व हिंदु समाजाविषयींचा त्यांचा उत्कट जिव्हाळा या संबंधांत डॉ. मुंजे यांचें स्थान अत्यंत उच्च व संशयातीत होतें. दि. ९ एप्रिलला

मुंबईच्या भाषणांत त्यांनीं विलायतेतील परिषदेची प्रतिक्रिया म्हणून असे खणखणीत उद्गार काढले की, "......हिंदुस्थानांतील साऱ्या जाती आणि सारे धर्म ' हिंदु ' या राष्ट्रीय अभिधानांत लुप्त झाले पाहिजेत. हिंदु-हिंदुस्थान, मुसलमान-हिंदुस्थान, पारशी-हिंदुस्थान अशी हिंदुस्थानची शकले मी कधींहि होऊं देणार नाहीं." अर्थात् या घोषणेमागील स्वाभिमान हाच डॉक्टराना आकृष्ट करणारा होता.

दि. १६ एप्रिलला डॉ. मुंजे नागपूरला पोहोचले, तेव्हा त्याच्या स्वागतासाठीं डॉक्टर व अनेक सघकार्यकर्ते स्थानकावर उपस्थित राहिले होते. त्याच दिवशीं सायंकाळी सघस्थानावर डॉ. मुंजे याचे गोलमेज परिषदेवर दीड तास भाषण झाले. या भाषणाच्या प्रारंभी डॉ. मुजे याचा सत्कार करताना डॉक्टरानी एक छोटेसे भाषण केले. त्यात त्यानीं खऱ्या पुढारीपणाची जी कल्पना मांडली, ती डॉक्टराच्या स्वतःच्या जीवनावरहि लख्ख प्रकाश टाकणारी होती. भाषणाच्या प्रारंभीं " नागपुरात जे जे म्हणून राजकीय चळवळीत भाग घेणारे लहानमोठे लोक आहेत, त्या सर्वांनीं डॉ. मुंजे याच्या पायाशीं बसून राजकारणाचे धडे घेतले आहेत," असा गौरव करून ते म्हणतात की, "... ..सवग लोकप्रियतेच्या मागे लागून लोकमताच्या प्रवाहाबरोबर वहात जाणे हे सोपे आहे. परंतु स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीला जर सर्वसाधारण लोकमत पटले नाही, तर लोकमतप्रवाहाच्या विरुद्ध उभे राहून छातीठोकपणे आपले मत लोकासमोर माडणे हेंच खऱ्या पुढाऱ्याचे काम आहे. प्रवाहाबरोबर वहात जाणे हे पुढारीपणाचे लक्षण नसून माघारीपणाचे लक्षण आहे. परिस्थिति आपल्या मताप्रमाणे निर्माण करून, लोकमत आपल्या माताकडे खेचून घेण्याचा जो प्रयत्न करतो, तोच खरा पुढारी होय. पुढारीपण लोकमतानुवर्तित्वात नसून लोकनियंत्रणात आहे. प्रसगीं लोकमताविरुद्ध जाण्यासहि न कचरणे याचेंच नाव सत्यनिष्ठा ! आणि या कसास लावून पाहिले तर डॉ. मुंजे याच्यासारखा सत्यनिष्ठ माणूस साऱ्या नागपूर शहरात दुसरा नाही."

डॉक्टर काशीहून आले त्या वेळीं नागपुरात बर्डी भागात श्रीमसूरकर महाराज यांचीं प्रवचनें चालू होतीं. त्या काळात हिदुत्वाची जागृति करण्यात व शुद्धि-संघटना घडवून आणण्यात मसूरकराच्या आश्रमानें बरेच प्रयत्न केले होते. ते ध्यानीं घेऊन प. पू. डॉक्टर व डॉ. मुंजे हे सायंकाळी ४ नतर केव्हा केव्हा बर्डीवर जाऊन त्यांना भेटत. त्या भेटींत हिंदुत्वाच्या अधिष्ठानावर काम करणाऱ्या संस्थाचे एकत्रीकरण होण्याची आवश्यकता डॉक्टरानी माडली होती व त्यावर मनमोकळी चर्चाहि झाली होती. पण त्या चर्चेत अशा संस्थाचें एकत्रीकरण, राजकीय परिस्थिति ध्यानांत घेतां हिताचें नाहीं, असा श्रीमसूरकरांचा एकूण सूर होता असे यांचे सहकारी सागतात.

जंगल-सत्याग्रहाला जाण्यापूर्वींच प. पू. डॉक्टरांनीं वाकर रस्त्यावरील दशोत्तरांच्या वाड्यांत संघकार्यालयासाठीं जागा घेतली व तेथें कांहीं स्वयंसेवक राहूं लागले, याचा उल्लेख मागें आलाच आहे. त्या जागीं आतां ते स्वतः देखील निजावयास जाऊं लागले. त्यामुळें तेथें कांहीं तरुण गप्पागोष्टी करण्यासाठीं येत व त्यांच्याजवळ १२-१ वाजेपर्यंत डॉक्टर बोलत बसत. तेथें निजावयास येणाऱ्यां-पैकीं एकाला कुत्रा बाळगण्याची मोठी हौस होती. त्यानें एके दिवशीं एक गुटगुटीत व गोंडस कुत्र्याचें पिल्लू तेथें आणलें. लवकरच तें आपल्या वागडण्या-मुळें तेथें कौतुकाचा विषय होऊन बसलें. प. पू. डॉक्टरांनीं त्या स्वयंसेवकाला तो कुत्रा घरीं नेण्यास हलकेच सुचविलें. कारण तो डॉक्टरांकडे आलेल्या एका नवख्या गृहस्थावर भुंकतांना दिसला. त्या वेळीं ते म्हणाले कीं, " ही हौस हितकर ठरणार नाहीं. कारण जाणाऱ्या-येणाऱ्यांवर कुत्रा भुंकूं लागला तर लोक येथें येण्याचें टाळूं लागतील व ही गोष्ट संघटनेच्या दृष्टीनें योग्य नाहीं."

हें जुन्या वळणाच्या घरांतील कार्यालय मोठें विचित्र होतें ! त्याच्या माडी-वरील खोल्यांत जाण्यासाठीं असलेला जिना अगदीं अरुंद व डळमळता होता आणि वरील खोल्यांतील दारें अत्यंत ठेंगणीं होतीं. प. पू. डॉक्टरांना भेटावयास येणाऱ्याला ' अंगीं नम्रता सदा असावी ' असेंच जणूं तीं दारें सूचित करीत ! या ठिकाणीं रात्रीं चालणाऱ्या गप्पागोष्टींतून संघटनेच्या दृष्टीनें स्वयंसेवकांना अनेक गोष्टींतील मर्म समजून देण्यावर डॉक्टरांचें लक्ष असे. विशेषतः त्यांतून स्वयंसेवकांच्या स्वभावाचे बारकावे ध्यानीं घेऊन त्यांतील बोचक व लोकसंग्रहाला विघातक ठरणारे कानेकोपरे कानसून टाकण्याचें त्यांचें कौशल्य प्रकट होई. तेथें निजावयास येणारा एक स्वयंसेवक एकांडे शिलेदारासारखा वागे. इतर जण ज्या भागांत झोपले असतीऽ तेथून दूर एका कोपऱ्यांत त्याचें अंथरूण दिसे व इतर वागण्यांतहि अशीच लहर उमटल्यावांचून राहत नसे. तेव्हां एके दिवशीं प. पू. डॉक्टरांनीं त्याच्या गुंडाळलेल्या वळकटीजवळ उपडी तपेली ठेवून दिली व तो बाहेरून येतांच चार-जणांच्या देखत त्यांनीं हंसत विचारलें कीं, " आपल्या कार्यालयांत ही विटाळशीची भानगड कोठून उपटली ? " सर्वांची हंसतां हंसतां मुरकुंडी वळली नि त्या स्वयंसेवकालाहि त्याचा नेमका अर्थ कळला !

अकोला कारागृहांतून बाहेर आल्यापासून ठिकठिकाणीं शाखांच्या कामाला उजळा येऊं लागला होता व डॉक्टरांचे प्रयत्न त्या दिशेनें अखंड सुरू होते. संघाच्या नियोजित कार्यक्रमांत कोठेंहि व केव्हांहि उणेपणा येऊं न देतां समाजांत चाललेल्या सर्व चळवळी व घटना यांजकडे डॉक्टरांचें लक्ष असे व त्यांतून कांहीं तळमळीचीं कर्तृत्ववान् माणसें हेरून आत्मसात् करण्यांत ते यशस्वी होत. नागपुरांत १९३१ च्या जुलैमध्यें कांहीं शुद्धि-समारंभ घडवून आणण्यांत डॉक्टरांनीं पुढाकार घेतला होता.

१९३० च्या सत्याग्रहाच्या वेळी संघकार्याच्या दृष्टीने नागपूरऐवजीं डॉक्टरांनी योजनापूर्वक वऱ्हाडांत जाऊन जंगल-सत्याग्रह कसा केला व अकोला कारागृहांतील वास्तव्यांत तेथे आलेल्या अनेक जणांना त्यांनीं संघविचाराची दीक्षा कशी दिली, हे आपण पाहिलेंच आहे. पण केवळ विचारसरणीचा प्रसार हे संघाचें उद्दिष्ट नाही. तर विचारसरणीच्या स्वीकारामागोमाग, ती विचारधारा साकार करण्यासाठी लोकांनी योग्य असे संस्कार करून घेण्याची सिद्धता करण्याची आवश्यकता असते. वऱ्हाडातील नव्या परिचिताना पुन्हा भेटून दैनदिन शाखेच्या रूपानें असे कर्तृत्व व अनुशासन वाढविणारे संस्कार करणारी यशस्वी यंत्रणा तेथे उभी करून देण्यासाठी डॉक्टर उत्सुक झाले होते. अशा वेळीच दि. ८ व ९ ऑगस्टला अकोला येथे हिंदुसभेचे अधिवेशन ठरले. या निमित्ताने वऱ्हाडातील ठिकठिकाणचे कार्यकर्ते एकत्रित जमणार असल्याने डॉक्टरानी अकोला येथे तीन-चार वर्षांपूर्वी स्थापन झालेली शाखा नीट उभी करून त्या शाखेच्या शिस्तबद्ध व उत्साहवर्धक कार्याचे प्रात्यक्षिक सर्वांसमोर ठेवण्याची दक्षता घेतली. या अधिवेशनाचे अध्यक्ष श्री. विजयराघवाचार्य याच्या मिरवणुकीच्या वेळी संघस्वयसेवकानी एका मशिदीजवळून घोषासह सचलन केलें, त्या वेळी सतप्त मुसलमानानी दगड-विटाचा मारा करूनहि सघाच्या स्वयसेवकानी वाद्यें चालू ठेवून जे धैर्य दाखविले, त्याच्या अभिमानास्पद स्मृति अजूनहि अनेक जणाच्या मुखातून ऐकावयास मिळतात.

याच वेळची एक घटना उल्लेखनीय आहे. संघाचे स्वयंसेवक घोष ( Band ) वाजवीत असता एकाने छायाचित्र घेण्यासाठीं कॅमेरा उभा केला. राष्ट्रसेवा करीत असता त्यात तन्मय व्हावें, पण आपल्या सेवेची प्रसिद्धि व्हावी अशी अभिलाषा मात्र मनात केव्हांहि अंकुरित होणार नाहीं याची दक्षता प्रत्येकाने घेतली पाहिजे, असा डॉक्टराचा कटाक्ष असे व त्यामुळेच संघाच्या कोणत्याहि कार्यक्रमाचे छायाचित्रण करण्याला त्याची संमति नसे. या अलिखित दंडकानुसार डॉक्टरानीं त्या गृहस्थाला ‘ छायाचित्र घेऊं नका ’ अशी नम्रपणे विनंति केली. पण तो आपला हेका सोडण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां डॉक्टरांनीं आपल्या स्वभावानुसार शब्दाशब्दी होण्याला अवसर न देता सहजतेनें आपली छत्री उघडली व पथक पुढे निघून जाईपर्यंत कॅमेऱ्याकडे पाठ फिरवून ते उभे राहिले !

या अधिवेशनाच्या वेळीं आलेल्या वऱ्हाडातील अनेक लोकास सघाचे प्रत्यक्ष भरीव काम पहावयास मिळाले होते व डॉक्टरांचाहि अनेक जणाशीं नव्याने परिचय झाला होता. हीच वऱ्हाडात कार्यविस्तार करण्यास योग्य सधि आहे, हे ओळखून डॉक्टरांनीं वणी, यवतमाळ, दारव्हा, उमरखेड, खामगाव, अकोट, वाशीम व पुसद असा प्रवास करून शाखांना प्रारंभ करून दिला. या पत्येक ठिकाणीं काय काय घडले, याचें वृत्त नागपूरला कळवितांना दि. ३०

सप्टेंबर १९३१ च्या पत्रांत त्यांनीं ‘ मोठमोठी वकील व डॉक्टर मंडळी संघांत सामील झाली ’ असें समाधान व्यक्तविलेलें दिसतें. अशी प्रतिष्ठित मंडळी समाविष्ट झाली तरी वऱ्हाडांतील काम स्थिर होण्यास नागपूरच्या प्रमुख शाखेनें अधिक धडाडीनें पुढें आलें पाहिजे, हेंहि त्यांनीं याच पत्रांत लिहिलें आहे. ते म्हणतात कीं, “ ... वऱ्हाडाचें काम म्हणजे सोपें काम नव्हे. खडक फोडून बोगदा तयार करून नंतर तेथून मार्ग करण्याइतकें तें कठीण कार्य आहे. परंतु हें परमेश्वरी कार्य असल्यानें त्याच्याच कृपेनें या कार्यांत यश येत आहे. परंतु या कार्यांत यश येणें म्हणजे नागपूर संघाची जबाबदारी अनंत पटींनीं वाढणें होय. ही जबाबदारी नागपूर संघाच्या प्रत्येक सभासदानें–लहानमोठ्या सभासदानें ओळखली पाहिजे. मी सर्वस्वीं आपल्याच भरंवशावर कार्य करीत आहें.... ” कार्यविस्तार करीत असतां अनेकांना विश्वासांत घेऊन ज्यांच्या जिवावर हा विस्तार पेलतां येणार आहे अशा तरुणांना परिस्थितीची जाणीव करून देण्यावर डॉक्टरांचें लक्ष असे. या पत्रांतील “ मी सर्वस्वीं आपल्याच भरंवशावर कार्य करीत आहें ” या शब्दांत दिलेली उठावणी नागपुरांतील एका सोळा-सतरा वर्षांच्या स्वयंसेवकाला दिलेली होती, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

या प्रवासांत असतां वाशीम येथें दि. २ सप्टेंबरला त्यांनीं ‘ श्रीबजरंगबली हिंदु आखाडा ’ या संस्थेला भेट दिली. त्या वेळीं तेथील काम पाहून त्यांनीं जो अभिप्राय लिहून दिला त्यांत सत्कार्याविषयीं डॉक्टरांनीं व्यक्तविलेला विचार अत्यंत मननीय होता. ते लिहितात कीं, “...ज्या चालकवर्गानें या आखाड्याचा पुनः-पुन्हा उद्धार करून त्याला आजच्या परिस्थितींत आणलें, त्यांना धन्यवाद देणें हें मी माझें कर्तव्य समजतों. कोणतेंहि एक वेळ सुरू केलेलें सत्कार्य हें सहजासहजीं नष्ट होऊं न देतां आम्ही तें चिरकाल सातत्यानें चालवूं, ही सात्त्विक महत्त्वाकांक्षा प्रत्येकानें ठेवणें आवश्यक आहे. ”

गणेशोत्सवाच्या काळांत वऱ्हाडमध्यें पाऊण महिना झालेला संचार आटोपून डॉक्टर नागपूरला आले व दसऱ्याच्या उत्सवापर्यंत ते तेथेंच होते. त्या वर्षींच्या दसरा उत्सवांत डॉक्टरांनीं, संघानें हिंदुराष्ट्र-निर्मितीच्या दृष्टीनें कोठवर पल्ला गांठला आहे, यासंबंधींचा विचार लोकांसमोर मांडला होता. इंग्रजी राज्य आल्यापासून सरकारी यंत्रणेव्यतिरिक्त अन्य ठिकाणीं एका गणवेषांत व शेकडोंच्या संख्येंत उत्साही तरुण प्रत्यहीं एकत्रित आले आहेत, हें दृश्य दुर्मिळच झालें होतें. त्यामुळें संघाचे ठिकठिकाणीं दिसणारे तरुण हा समाजांत एक कुतूहलाचा विषय झाला असल्यास नवल नव्हतें. याच भावनेनें लोक डॉक्टरांजवळ बोलत कीं, “ डॉक्टर ! आतां आपलें फारच प्रचंड संघटन झालें आहे. तेव्हां कांहीं तरी करून दाखवा. ” या सूचनांमागील अपेक्षा डॉक्टरांना उमजत होत्या. पण डॉक्टरांच्या डोळ्यांसमोर उभ्या असलेल्या विराट् हिंदुराष्ट्राच्या व्यापकतेची

कल्पना बहुतेकाना आकलन झाली नव्हती. या दसरा उत्सवांत डॉक्टरांनीं सागितले की, " आज आपल्या संघाच्या ६० शाखा आहेत. परंतु हे कार्य फारच कमी असून त्याची योग्यता समुद्रातील पाण्याच्या थेंबाएवढी आहे. " त्याच्या मनः-पटावर हेलकावणारा तो कार्याचा अथाग सागर तेव्हा तर नव्हेच, पण त्या काळानंतर संघकार्य असंख्य पटींनीं देशभर वाढलेले असूनहि अजून अस्तित्वात आलेला नाही, ही दुःखद वास्तवता आहे !

याच वर्षी नोव्हेंबरच्या मध्यावर प. पू. डॉक्टर हे हिंदी मध्यप्रदेशात म्हणजेच महाकोशलमध्ये पाऊण महिना संचारार्थ गेले होते व पुन्हा वऱ्हाडमध्येहि त्यांनीं कांही शाखाना भेटी दिल्या. त्या संचारासंबंधीं दि. ९ डिसेंबर १९३१ च्या 'महाराष्ट्रां'त म्हटलें होतें की, "...रा. स्व. संघाचे संस्थापक डॉ. हेडगेवार हे संघाच्या कार्याचा प्रसार करण्याकरिता छत्तीसगड विभागात गेले. तीन आठवडे-पर्यंत संचार करीत होते. त्या विभागातील सर्व जिल्ह्याच्या केंद्र-स्थानी आता संघाच्या शाखा स्थापन झाल्या असून तिकडील कार्य आटोपून डॉक्टरसाहेब याच कार्यासाठी आतां वऱ्हाडमध्ये गेले आहेत. "

कारागृहातून सुटल्यावर वऱ्हाडमध्ये संघाचे पाऊल पुढे पडलें असलें तरी राजकीय अस्थिर वातावरणामुळे तेथेहि अधूनमधून ते पाऊल डळमळल्याचा अनुभव येतच होता. डॉक्टरानी वऱ्हाडच्या पहिल्या प्रवासातच त्या ठिकाणच्या कामांतील कठीणता अचूक हेरली असल्यामुळे त्याना त्या भागातील नव्या कार्यकर्त्यांच्या पत्रातील एकूण उदासवाणा सूर अनपेक्षित नव्हता. १९३२ च्या प्रारंभींच्या पत्रव्यवहारात " हल्लीच्या चालू चळवळीची छाया संघावर पडली असून, या नियमित होणाऱ्या कार्यालासुद्धा बरोबर हजर राहण्याची तसदी सभासद घेत नाहींत, " अशी कुरकुर वाचनात येते. यवतमाळचे डॉ. टेंभे यानीं तर लिहिले होते कीं, " ......माझ्यावरील पकडहुकूम तीनदा परतले. का ते कळत नाहीं. आता फक्त उठून बोलावयाचा अवकाश की, दुसऱ्या दिवशी कृष्णगृहांत पोंच जरूर होईल......रा. स्व. संघ तूर्त यामुळे अर्धवट राहणार, याबद्दल दिलगिरी वाटते. " अशा वातावरणात नव्याने संघात आलेल्या मंडळीशी अखंड पत्रव्यवहार ठेवून त्याना उदास होऊं न देता याहि परिस्थितीमधून मार्ग काढण्याची धमक ते त्याना आपल्या उत्तेजक लेखणींतून देत होते. त्यातूनच त्या भागांतील कामात हलके हलके नवोत्साह दिसू लागला व आंदोलनाची अस्थिरता असूनहि संघशाखाचे वऱ्हाडांतील आसन स्थिर झाले.

डॉक्टरांची अखंड चाललेली धडपड, कार्यचिंतनाचा मानसिक ताण, पैशाची नेहमीं जाणवणारी चणचण व नवीन नवीन अडचणींचे करावें लागणारें स्वागत यांमुळें त्यांची प्रकृति आता जाणवण्याइतकी ढासळूं लागली होती. पण डॉक्टरांचें शरीर हें त्याच्या ध्येयनिष्ठ व वज्रकठोर मनाचे दास असल्यानें त्याना

कोणींहि प्रकृतीविषयीं विचारलें तरी त्यांच्या मुखावरील प्रसन्नतेंतून "मला काय होत आहे ? माझी प्रकृति तर उत्तम आहे !" असेंच उत्तर मिळे. वास्तविक अकोल्याच्या कारागृहांतच त्यांची प्रकृति बिघडली होती. त्यांतून बाहेर आल्यावर त्यांनीं मध्यंतरींच्या आपल्या अनुपस्थितीची जणूं भरपाई करण्यासाठीं जी हालचाल सुरू केली, ती त्यांच्याबरोबर सावलीप्रमाणें वावरणाऱ्या कांहीं धट्टयाकट्टया तरुणांनाहि दमविणारी अशी होती. सकाळपासून रात्रीं १-१ वाजेपर्यंत ते कार्यमग्न असावयाचे व त्यानंतर ते आपल्या अंथरुणावर पडत असलेले दिसत, तरीहि विचारमग्नतेमुळें त्यांना गाढ अशी झोप किती मिळत असेल तें सांगणें अवघड होतें. खिशांत पैसा नसल्यानें महालांतील आपल्या घरून निघून धनतोली-बर्डीपर्यंत अनेकांना भेटत भेटत १२-१ पर्यंत ते परत येत, तेव्हां घामानें त्यांचें शरीर अक्षरशः भिजून जाई व त्यानंतर स्नान व जेवण आटोपलें कीं पुन्हा पत्रव्यवहार, बैठका व शाखा असा रामरगाडा सुरू व्हावयाचा तो थेट रात्रीं १२-१ वाजेपर्यंत ! नागपूरचा उन्हाळा म्हणजे भयाण भट्टीचीच आठवण करून देणारा ! पण त्या उन्हाळ्यालाहि चटका बसावा, अशी दाहकता डॉक्टरांच्या उग्र तपश्चर्येंत होती, याचा प्रत्यय सदैव येत असे. सकाळीं संघाच्या दृष्टीनें अनेकांना भेटावयास गेले असतां डॉक्टरांची जेथें तेथें खरोखरच आंतरिक जिव्हाळ्यानें विचारपूस होई. कोणाला अप्रसन्न करावयाचें नाहीं म्हणून कितीदांहि चहाचीं आवर्तनें घडलीं तरी प्रकृतीकडे न पाहतां ते स्वीकारीत ! चहा त्यांना आवडत होता असें नाहीं, पण चहा देणाऱ्यांची आत्मीयता त्यांना आत्मसात् करावयाची असे व त्याच आत्मीयतेला संघशरण करण्यावर त्यांचा कटाक्ष असे. डॉक्टरांच्या चालण्या-बोलण्यांत इतकी सहजता व आकर्षकता होती कीं, त्यांच्या भेटींतून न कळतां पण न खळतां कोणत्याहि व्यक्तीला त्याच्या व्यक्तिगत जीवनाच्या इवल्याशा घर-कुलांतून ते हळूहळू विशाल सामाजिक जीवनाच्या अवकाशांत आणून कर्तृत्वाचे पंख खोलावयास लावीत !

* * *

काशी येथील कार्याला परमपूजनीय डॉक्टरांच्या १९३१ मधील भेटीनें चांगलीच गति मिळाली व त्या उत्साहांत तेथील कार्यकर्त्यांनीं काही प्राध्यापकाना संघाकडे आकृष्ट करण्यात यश मिळविले. अशा आकृष्ट झालेल्या मंडळींतच तरुण प्राध्यापक श्री. माधवराव गोळवलकर तथा गुरुजी हेहि एक होते. त्या वेळी ते संघाच्या कामात आत्मीयतेनें थोडे लक्ष घालूं लागल्याचे वृत्त तिकडील कार्यकर्त्यांच्या पत्रातून डॉक्टराना वरचेवर वाचावयास मिळे. त्यामुळे संघाजवळ येऊ लागलेल्या अशा तरुण व बुद्धिमान् कार्यकर्त्याविषयींची चौकशी त्यानीं माधवरावांशी संबंधित असलेल्या नागपुरांतील स्वयंसेवकाजवळ मोठ्या आस्थेने केली होती. पुढे १९३२ च्या एप्रिलमध्ये काशी विद्यापीठाला सुट्टी होताच गुरुजी नागपूरला आले त्या वेळीं एक दिवस ते रस्त्याने चालले असता परमपूजनीय डॉक्टरानी त्याना थाबवून पृच्छा केली कीं, " आपले नाव माधवराव गोळवलकर काय ? " अर्थात् हा प्रश्न त्यानीं इतराकडून त्यांच्यासबंधी ऐकलेल्या माहितीवरून कयासानें विचारला होता. त्या प्रश्नाला होकार मिळताच डॉक्टर त्याना म्हणाले कीं, " आपल्या सवडीने एकदा माझ्या घरीं अवश्य या. " त्याप्रमाणे गुरुजी त्याना जाऊन भेटले. हीच परमपूजनीय डॉक्टर व आजचे सरसंघचालक परमपूजनीय श्रीगुरुजी याची पहिली भेट होय.

नागपुरी उन्हाळ्याला सुरुवात झाली होती व १९३२ च्या मे महिन्याच्या ऑफिसर्स ट्रेनिंग कॅम्पची सिद्धता करण्यात डॉक्टर निमग्न होते. तोच एप्रिलच्या प्रारभीं श्री. बाबाराव सावरकर यांचे डॉक्टरांना पत्र आले व त्यात त्यानी " मे महिन्याच्या प्रारंभी कराची येथे होणाऱ्या अखिल भारतीय तरुण हिंदु परिषदेला आपण चलावे, " असे लिहिले होते. ठिकठिकाणांहून येणाऱ्या शेकडो तरुणाना भेटण्याची ही संधि डॉक्टराना हवीच होती. पण त्याच वेळीं नागपुरात होणारा वर्ग यशस्वी करण्याच्या दृष्टीनें डॉक्टरांना स्वतः तेथे राहणे आवश्यक दिसत होते. त्याच्याच जोडीने कराचीपर्यंत जाऊन येण्याला लागणारा खर्च कोठून करावयाचा, हाहि प्रश्नच होता. तेव्हां डॉक्टरानीं मनमोकळेपणाने आपल्या अडचणी बाबारावांना कळविल्या. त्यावर त्या दोघांत जो पत्रव्यवहार झाला, त्यांतील कांहीं भाग त्या दोघां देशभक्तांच्या परस्पर संबधावर व त्यांच्या त्या वेळच्या खडतर जीवनावर चांगलाच प्रकाश टाकणारा आहे. डॉक्टरांच्याप्रमाणेच कराचीला

जाण्यासाठीं लागणारे पैसे बाबारावांजवळहि नव्हते ! पण त्यांची अडचण ध्यानीं येऊन दे. भ. भाई परमानंद यांनीं त्यांना पत्र लिहून त्यांचा जाण्यायेण्याचा खर्च करण्याची सिद्धता दाखविली होती. त्या आश्वासनाच्या भरंवशावर बाबाराव डॉक्टरांना लिहितात कीं, " ... ... तेव्हां त्या मिळणाऱ्या व्ययांतून आपण अर्धे अर्धे आपल्या व्ययासाठीं घेऊन आपला अर्धा अर्धा भार हलका करूं. " याचें नांव स्नेह !

'आपणच त्या परिषदेंत संघासंबंधीं तेथें येणाऱ्या तरुण कार्यकर्त्यांजवळ बोला ' अशा डॉक्टरांच्या सूचनेवर बाबाराव लिहितात कीं, "......मीं संघाच्या कार्यास वाहून घेतलें असलें तरी अद्याप मी पूर्णपणें प्रचारक्षम झालों नाहीं, अशी माझें मन ग्वाही देत आहे. कदाचित् मी लोणच्यांतला आंबा असलों तरी मी मुरलों नाहीं. आपण मुरलेले आहांत. तुम्ही त्या वेळीं यावें. त्यांचें ( भाईजींचें ) मला तुम्हांविषयीं पत्र येऊन, ते ( डॉ. हेडगेवार ) येतात किंवा कसें ? त्यांचें येणें घडवावें, असें त्यांत लिहिलेलें आहे. " दि. २० एप्रिलच्या पत्रांतहि हाच सूर दिसतो. ते लिहितात कीं, "......मी संघांत पूर्णपणें मिळालों तरी त्याचें उद्दिष्टाच्या मांडणीची पद्धति, विविध शंकांचीं निश्चित उत्तरें, कार्यपद्धतीची पूर्णांगीण माहिती आदि गोष्टींच्या विचारव्याप्तीचें चित्र माझे मनांत स्पष्टपणें प्रतिबिंबित झालें नाहीं...तेव्हां त्या परिषदेला तुम्हीं यावें म्हणजे तेथें नाना शंका-प्रतिशंकांचीं उत्तरें, मांडणी, पद्धतिवर्णन, कार्यसरणी आदि माझेपुढें आमूलाग्र तुमचेकडून ठेवली जात असतां मला तिचें पूर्णपणें आकलन करतां येईल..."

कराची येथील परिषदेला जाण्याचा विचार शेवटीं निश्चित झाला व दि. २ मे या दिवशीं डॉक्टरांनीं नागपूर सोडलें आणि मुंबईला येऊन तेथून ते व श्री. बाबाराव सावरकर दि. ३ च्या रात्रीच्या गाडीनें निघाले. दि. ६ ला कराचीहून आपले चुलते श्री. आबाजी हेडगेवार यांना लिहिलेल्या पत्रांत डॉक्टरांनीं या प्रवासांतील कांहीं वेचक अनुभव कळविले होते. ते त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणाची साक्ष पटविणारे म्हणून सांगतां येतील. मुंबईला रात्रीच्या गाडींत जागा मिळविण्यासाठीं धांवपळींत त्यांना आलेला अनुभव लिहितांना ते म्हणतात कीं, "...मुसलमानांचा हडेलहप्पीपणा, प्रसंग आला असतांना पहिल्यानें धमकी, नंतर मुजोरी, त्यानंतर विनवणी व शेवटीं शरणागति हेहि प्रकार पहावयास मिळाले. " हें त्यांचें निरीक्षण आपल्या संबंधांत येणाऱ्या मुसलमान व्यक्तींपासून थेट त्यांच्या सामाजिक व राजकीय युयुत्सु समष्टीपर्यंत अचूक ठरलेलें हरघडीं प्रत्ययाला येऊं शकेल. पण दुर्दैवानें 'धमकी' व 'मुजोरी' मुसलमानांनीं दाखविण्यापूर्वींच आत्मविश्वासहीनतेनें गलितगात्र झालेले हिंदु, अहिंसेच्या सोज्ज्वळ तत्त्वज्ञानाच्या बुरख्याखालीं त्याला आपणहूनच शरण जाऊं लागल्याचें अत्यंत दयनीय व लांछनास्पद दृश्य ज्या काळांत पाहण्याचा प्रसंग आला आहे, त्या

काळात मुसलमानांकडून ' विनवणी ' व ' शरणागति ' हीं डॉक्टरांनी सागितलेली दोन रूपे कशी अपेक्षावीत ? त्याची धमकी व मुजोरी याना लीलेने पचवून पुन्हा ताठरपणाने व धैर्याने उन्नतशीर्ष उभे असणारे पराक्रमी हिंदु दिसू लागण्यावरच डॉक्टरानी सांगितल्याप्रमाणे त्याच्या वृत्तीत परिवर्तन होणे सहज शक्य आहे. तसे घडेल तो सुदिन ! अस्तु.

कर्णावती स्थानकावरीलहि एक अनुभव त्याच पत्रात त्यानीं दिलेला आहे. ते लिहितात कीं, ".. या ठिकाणीहि मुसलमानाची कणखर वृत्ति व हिंदूंची शामळू वृत्ति याचा चागलाच अनुभव पहावयाला मिळाला. नाहीं म्हणावयाला एका गुजराती स्त्रीचा बेडरपणा व तेजस्वी वृत्ति पाहून आनद वाटला. पण तिच्या नवऱ्याच्या ठिकाणी मात्र ती वृत्ति दिसून आली नाहीं." हे निरीक्षण करीत असता महाराष्ट्र, गुजरात वा सिंध असा वेगळा प्रात त्याच्या डोळ्यासमोर येत नसे, तर साऱ्या हिंदु समाजाशी आपल्या भावभावनांची—नव्हे आपल्या साऱ्या जीवनाची—एकरूपता केल्यानंतर त्या विशालतम ममत्वातूनच ते दिसणाऱ्या दृश्यानी आनदून जात वा व्यथित होत. त्यामुळेच हैदराबाद ( सिंध ) स्थानकापासूनचे प्रवासवृत्त लिहिताना ते सागतात कीं, "...हैदराबाद स्टेशनवर गाडींत चढल्यापासून आम्ही कोणत्या तरी इस्लामी प्रदेशात आल्यासारखे आम्हाला वाटले. हैदराबादपासून आम्ही कराचीला पोचेपर्यंत आमच्या डब्यात आम्हाला हिंदु दिसला नाही. डब्यात सर्वच मुसलमान. त्याचा खाण्यापिण्याचा गलिच्छपणा व डब्याबाहेर वालुकामय धुळीचे लोट अशा परिस्थितीत आम्ही...कराचीला पोहोचलो."

कराचीला डॉक्टराचे सहा दिवस वास्तव्य होते. त्या अवधीत परिषदेला आलेल्या सिंध व पजाब या प्रातातील अनेक तरुण कार्यकर्त्याचा परिचय करून घेऊन त्यानीं रा. स्व. संघ या उदयोन्मुख सघटनेची त्याना कल्पना आणून दिली. त्या दोन्ही प्रांतातील कार्यकर्त्यांना सघटनेची आवश्यकता खरे म्हणजे तेथील मुसलमानाच्या सतत होणाऱ्या पाशवी आघातानीच करून दिलेली होती. पण सघटन कसे करावयाचे याचे तंत्र, ठराव व परिषदा याच्या दिखाऊ उपचारात गढलेल्याना समजावून देणे हे फार अवघड काम होते व ते डॉक्टरानी यशस्वीपणे पार पाडले. परिषदेने डॉक्टराची कल्पना समजावून घेतल्यावर ' देशभर या संघाचा विस्तार होवो ' अशी सदिच्छा व्यक्त करणारा ठराव समत केला होता. पण डॉक्टरांनी कराचीतील कांही कार्यकर्त्यांना हाताशी धरून तेथून निघण्यापूर्वी भगवा ध्वज उभारून प्रत्यक्ष संघशाखा सुरू करून दिली. त्या वेळी श्री. डी. डी. चौधरी याना संघचालक म्हणून नियुक्त केल्याचा उल्लेख आढळतो. त्याचप्रमाणे " प्राचार्य रामसहाय यांच्यासारखी मंडळी संघात समाविष्ट झाली " असल्याचें आनंददायक वृत्त डॉक्टरांनीं आबाजींना कळविले होते.

या सहा दिवसांत डॉक्टरांना कराची शहर फारच आवडलें. त्यांनीं लिहिलें होतें कीं, "...मुंबई व कलकत्ता पाहिलेल्या लोकांना जरी कराची शहर पाहून एकदम आश्चर्य वाटणार नाहीं तरी हें शहर मुंबई व कलकत्ता या शहरांपेक्षां वरच्या दर्जाचें आहे असें म्हणणें भाग पडतें. येथील सौंदर्य, टापटीप, स्वच्छता, डांबराचे केलेले स्वच्छ व विशाल रस्ते, विजेच्या दिव्यांची विशेष व्यवस्था, गांवांत ठिकाठिकाणीं असलेल्या बागांमुळें शहरांत असलेला मोकळेपणा हा कोणत्याहि इतर शहरांना मागें टाकणारा आहे." आणखीहि तेथील चांगुलपणा सांगून ते शेवटीं म्हणतात कीं, "...आजपर्यंत मीं पाहिलेल्या शहरांत तरी कराचीचा क्रमांक मला पहिला लावावासा वाटतो." पण त्याच पहिल्या क्रमांकाच्या नगराची आज अवघ्या पंचवीस वर्षांत जी दुर्दशा झाली आहे ती पाहून सहृदय व स्वाभिमानी माणसाला मनाच्या शतशः चिंधड्या उडाल्यासारखें वाटल्यावांचून राहणार नाहीं!

प. पू. डॉक्टर कराचीहून परत आल्यावर ते नागपूरच्या अधिकारी शिक्षण वर्गात निमग्न होते. तो आटोपल्यानंतरची एक लहानशी घटना येथें देणें आवश्यक आहे. या काळांत लहान लहान शाळकरी मुलांकडून संघाचें लोण निरनिराळ्या गांवांपर्यंत जाऊन पोहोंचत असे. डॉक्टरांच्या सहवासांत येणाऱ्या प्रत्येकाला त्यांच्या बोलण्याचालण्यांतून अशी सदैव प्रेरणा मिळे. १९३२ च्या जूनमध्यें नुकताच शालान्त परीक्षेंत ( मॅट्रिकमध्यें ) उत्तीर्ण झालेला माधव मुळे हा स्वयंसेवक यापुढें आपल्या कोंकणांतील चिपळूण भागांत राहावयास जावयाचा होता. प. पू. डॉक्टरांना ही गोष्ट कळतांच त्यांनीं त्याला बोलावून घेऊन तो जात असलेल्या कोंकणपट्टींत संघाचें काम सुरू झालें पाहिजे, या दृष्टीनें बरेंच बोलणें केलें. नागपुरांतील घोष-शाखेकडून या स्वयंसेवकाला निरोप देण्याचा कार्यक्रम घडवून आणून ते त्या वेळीं आठवणपूर्वक उपस्थित राहिले. एवढेंच नव्हे तर तो जेव्हां जाण्यासाठीं गाडींत बसला तेव्हां डॉक्टर तेथें निरोप देण्यासाठीं आलेले पाहून त्याला धन्यता वाटली!

प पू. डॉक्टरांच्या अपेक्षेप्रमाणें कोंकणांत संघशाखांचें जाळें विणण्यांत तो स्वयंसेवक यशस्वी झाला. इतकेंच नव्हे तर आज पंजाबसारख्या एका प्रांताचें नेतृत्व करण्याइतकें कर्तृत्व याच स्वयंसेवकानें प्रकट केलें! प. पू. डॉक्टरांची निवड ही अशी असे.

याच सुमारास श्री. कृष्णराव लांबे हे डॉक्टरांच्या विचारानें दिल्ली येथें 'मराठा हायस्कूल' काढण्यासाठीं गेले. ही योजना करण्यांत कार्यविस्तार हाच हेतु होता. पण पदवी परीक्षेंत लांबे यांना यश न आल्यानें दोन महिन्यांनीं ते उदास होऊन परत आले व डॉक्टरांना न भेटतांच उमरेडला गेले. पुढें जेव्हां डॉक्टरांची व त्यांची गांठ पडली तेव्हां त्यांनीं विचारलें, "तूं दिल्लीहून परत कां आलास? पैसे नव्हते तर मीं दिले असते. किती पांच-दहा हजार रुपयेच लागले

असते ना ? मी दिल्लीकडे शाखा काढण्याच्या दृष्टीने तिकडील भाई परमानद आदि पुढाऱ्यांशी पत्रव्यवहाराने संधान जोडले होते. पण तूं परत आल्याने तें फसले ! " न सागतां लांबे परत आले हे अयोग्य झाले, हे दर्शविण्यासाठी डॉक्टरानी त्यांना पाच रुपये दंडहि केला होता !

आतां डॉक्टरांचा प्रवास वाढला होता व त्यामुळे कांहीं अहिंदु मडळींनीं उच्चल खाऊन, ते घरी नसतील अशा वेळीं त्याच्या घरावर दगड फेकण्याचे सत्र पुन्हा सुरू केले होते. या दगडांचे प्रवर्तक कोण, हे डॉक्टरांनीं ओळखले होते. पण दगड मारणाऱ्यांचा आवाकाहि त्यांना माहीत असल्याने चार दिवस या माकडचेष्टा चालतील हे जाणून ते निश्चिंत होते. डॉक्टराच्या घरावर दगड येताच ती गोष्ट नागपुरांतील अनेक जणाना समजली व त्याच मार्गाने ती पाझरून प्रांतांतहि कांहीं ठिकाणीं जाऊन पोचली. तेव्हां स्वाभाविकच हे काय नवीनच प्रकरण आहे, अशी पृच्छा काहीं जणानी पत्रातून सुरू केली. त्यावर डॉक्टर लिहितात की, " .. ...आमचे घरावर दगड येत होते ते ज्या एका समाजाकडून येणे शक्य आहे त्याच समाजाकडून येत होते. त्यात हिंदु समाजातील कोणत्याहि जातीचा संबंध असणे शक्य नाहीं. मध्यतरी जास्त जोराचा पाऊस होता व असतो त्या वेळी दगड बद असतात व पाऊस बंद झाला म्हणजे पुन्हा थोडेबहुत दगड येऊं लागतात. दगड मारले जातात यावरूनच दगड मारणाऱ्या समाजात पुढे येण्याचा मर्दपणा उरलेला नाहीं, हे स्पष्टपणें सिद्ध होते. आपण त्याविषयीं कोणत्याहि प्रकारची काळजी न करतां स्वस्थ रहावे. " अर्थात् अशा उपद्रवाच्या वेळीं डॉक्टरांकडे आपुलकीनें पाहणारी जी असख्य मंडळी पसरलेली असे त्याची टेहळणी सुरू होई व आपोआपच छुपे दगड मारणारे आपलीं तोंडे दडवून बसत. १९३२ च्या जूनमधील ही दगडफेक सात-आठ दिवसातच थाबलेली दिसते.

या दगडफेकीच्या काळातच परमपूजनीय डॉक्टरावर व रा. स्व. सघावर एक दैवी आघात झाला. संघाचे पाठीराखे, हिंदुत्वाचे कट्टर अभिमानी व डॉक्टराचे जीवलग स्नेही राजे लक्ष्मणराव भोसले याचे पुण्याला घडलेले आकस्मिक निधन हा तो कठोर आघात होता. दि. ९ जूनला ती दुःखद वार्ता नागपूरला येऊन पोहोंचली तेव्हां त्या वर्षीच्या संघाच्या अधिकारी शिक्षणवर्गाचा समारोप समारंभ साजरा करण्यासाठी सर्व संघकार्यकर्ते, स्वयंसेवक व शेकडो नागरिक एकत्रित झाले होते. राजे लक्ष्मणरावांच्या देहावसानाचे वृत्त समजताच डॉक्टरांनी संघाच्या वर्गाचा समारोप स्थगित केला व तेथे जमलेल्या सर्वांच्या सभेत महाराजाच्या निधनासंबंधीं दुखवट्याचा ठराव संमत करण्यात आला. त्यात डॉक्टराच्या भावनांचे प्रतिबिंब उमटलेले होते. त्या ठरावात म्हटले होतें की, "श्रीमंत राजे लक्ष्मणराव भोसले यांच्या मृत्यूची हृदयविदारक वार्ता ऐकून संघाला अंतःकरणावर वज्राघात झाल्यासारखें वाटत आहे. रा. स्व. संघ राजेसाहेबांच्याच कृपाछत्राखालीं जन्माला

येऊन वाढीला लागला. आज त्याला प्राप्त झालेलें स्वरूप म्हणजे त्यांच्याच प्रेमळ प्रोत्साहनाचें फळ होय. हिंदु धर्म व हिंदु संस्कृति यांवरील त्यांच्या हार्दिक व अलोट प्रेमामुळें ते राष्ट्रांतील अखिल हिंदु जनतेस ललामभूत झाले होते." त्या वेळच्या पत्रांतून यासंबंधीं लिहितांना, "राजे लक्ष्मणराव वारले त्यामुळें आपलें किती नुकसान झालें याचें वर्णन करणें अशक्य आहे !" असें डॉक्टरांनीं लिहिलेलें आढळतें.

असे अनेक आघात सहन करीत संघाचें मध्यप्रदेशांतील काम प्रगत होत होतें. आतां महाराष्ट्रांत संघाचें लोण नेऊन पोंचविण्याचा विचार करून ऑगस्ट १९३२ मध्यें डॉक्टर व श्री. बाबाराव सावरकर या दोघांनीं मुंबई, पुणें, सातारा, सांगली, कोल्हापूर, जमखिंडी व कऱ्हाड असा प्रवास केला. हीच संघकार्याच्या दृष्टीनें डॉक्टरांची महाराष्ट्राला पहिली भेट होती. या भेटींत श्री. बाबारावांच्या ठिकठिकाणच्या ओळखींचा डॉक्टरांना बराच लाभ झाला. डॉक्टरांचे अनुभवाचे बोल उमटणारें प्रभावी वक्तृत्व व बाबारावांचा बैठकांतील संभाषणांतून संथपणानें समजूत पाडणारा प्रचार यांच्या युतींतून महाराष्ट्रांतील कामाला सुरुवात झाली.

दि. ६ ऑगस्ट १९३२ ला संघाचे सरसेनापति श्री. मार्तंडराव जोग यांना बरोबर घेऊन डॉक्टर या दौऱ्यावर निघाले. नागपूरहून येतांना वर्ध्यापासून खामगांवपर्यंतच्या अनेक स्थानकांवर ठिकठिकाणचे कार्यकर्ते डॉक्टरांना भेटावयास येत होते. धामणगांवला तर तेथील स्वयंसेवकांनीं गणवेषांत स्थानकावर येऊन सैनिकी पद्धतीनें मानवंदना दिली होती.

अकोला येथून एका अनाथ स्त्रीला, तेथील कार्यकर्त्यांनीं मुंबईच्या श्रद्धानंद अनाथ महिलाश्रमांत पोंचविण्यासाठीं त्याच गाडींत बसवून दिलें होतें. त्या बाईला त्यांनीं दुसऱ्या दिवशीं आश्रमांत पोंचविलें. अशीं समाजोपयोगी कामें ते सहज करीत. पण जातां जातां आपल्या मित्रांच्या भेटी पोंचविण्याचा प्रसंग आला तरी ते कधीं कुरकुरत नसत. याच वेळीं आपल्या एका संघकार्यकर्त्याची तुपाची बरणी मुंबईला नेऊन पोंचविल्याचा उल्लेख पत्रांत आढळतो. लोकसंग्रह करणें ही थट्टा नाहीं; तर चोवीस तासांच्या निरलस, निरपेक्ष व सहज अशा सेवाभावाचें तें फलित होय !

पुणें, सातारा, सांगली आदि ठिकाणीं तरुणांच्या बैठका, प्रौढांच्या सभा, प्रतिज्ञा-विधि, शाखा-स्थापना व निरनिराळ्या पुढाऱ्यांच्या भेटी वगैरे जे धांवपळीचे कार्यक्रम झाले, त्यांतून शैकडों लोकांच्या कानांपर्यंत संघाचा विचार प्रथमच जाऊन पोहोंचला. पुण्यांत साहित्यसम्राट् श्री. तात्यासाहेब केळकर यांच्याकडे पुण्यांतील प्रौढांची बैठक झाली. त्या बैठकीसंबंधीं डॉक्टर लिहितात कीं, "...पुण्यासारख्या अत्यंत नांवाजलेल्या चिकित्सक गांवांतल्या विद्वान् लोकांनाहि प्रश्नोत्तरांनंतर संघाची कल्पना अत्यंत पसंत पडली." या धांवत्या प्रचारानें

महाराष्ट्रातील प्रमुख सहा-सात ठिकाणी संघाचे म्हणविणारे प्रतिष्ठित घटक उभे राहिले असले तरी त्यांतून संघाचे दैनंदिन शाखेचें स्वरूप निर्माण झाले नव्हते. तें काम मध्यप्रदेशातून शिक्षणासाठी पुणें व मुंबई या दोन ठिकाणी आलेल्या काही स्वयंसेवकांनी व योजनापूर्वक पाठविलेल्या प्रचारकानी करून दाखविले. अर्थात् त्याला यापुढे एक-दोन वर्षे जावी लागलीं.

या प्रवासात सबंधांत आलेल्या काही जणाना ' नागपूर सघाचा दसरा महोत्सव पाहण्यासाठीं या ' अशी आग्रहाची निमंत्रणे देण्यास डॉक्टर विसरले नाहीत. त्यात सघामध्ये नव्याने आलेल्याना नागपूरच्या भव्य महोत्सवाचे तेजस्वी व उत्साहदायी दृश्य दाखविण्याचा जसा त्याचा हेतु होता, त्याचप्रमाणे ' पाहुणे येणार आहेत, तेव्हा नागपूरचा उत्सव उठावदार झाला पाहिजे ' अशी चालना तेथील कार्य-कर्त्यानाहि त्याना द्यावयाची होती. कार्यविस्तार करीत असताना केंद्र बळकट करीत जाणे अत्यावश्यक असते, हें डॉक्टराइतके इतराना क्वचितच समजले असेल. ते दि. १ सप्टेंबरला नागपूरच्या सर्व स्वयसेवकाना उद्देशून पाठविलेल्या पत्रात म्हणतात की, "...आपला नागपूरचा दसऱ्याचा उत्सव म्हणजे रा. स्व. सघाची जीवनशक्ति मोजण्याचे माप होय ! या मापाने लोक आपल्या शक्तीचा अंदाज बाधतील. आपल्या उत्सवाचे ते दृश्य स्वरूप पाहून आपल्यावर प्रेम करणाऱ्या जनवृंदाच्या अंतःकरणात आनंदाच्या ऊर्मि उसळतील. आणि ही लोकाची आनद-भरित अंतःकरणें म्हणजे आपल्या सघाच्या इमारतीचे भरभक्कम खाब होत, ही गोष्ट आपण नेहमी लक्षात ठेवली पाहिजे. ..या उत्सवदर्शनाकरिता या वर्षी केवळ आपल्या प्रातातीलच नव्हेत तर प्राताबाहेरीलहि मोठमोठी मडळी नागपुरात येणार आहेत. आपल्या ध्येयाप्रमाणे हिदुस्थानातील इतर प्रातातून आपला शाखाविस्तार व्हावा म्हणून या परप्रातीय पाहुण्याच्या अतःकरणात आपला उत्सव पाहून कार्याची स्फूर्ति उत्पन्न झाली पाहिजे."

या दौऱ्यावरून परतताना ते आठ दिवस मुंबईला राहिले व तेथे कार्याला प्रारंभ करून देऊन दि. १४ सप्टेंबरला नागपूरला जाऊन पोचले. वाटेत ते अकोला व वर्धा येथेहि थाबले होते. या सव्वा महिन्याच्या प्रयत्नातून पुण्याला श्री. भाऊराव देशमुख व सागलीला श्री. का. भा. लिमये या कार्यकर्त्यांना संघचालक म्हणून डॉक्टरानी नियुक्त केले.

' गांधी आयर्विन संधि ' होऊन वर्ष लोटले तरी देशातील राजकीय अस्थिरता व स्फोटकता कायम होती. त्यामुळें ज्या ठिकाणीं काहीं तरुण एकत्रित येत असतील, तीं केंद्रे सरकारच्या अवकृपेला पात्र होणे हे स्वाभाविक होतें. त्यात कांहीं वेळां तर सुक्याबरोबर ओले जळावे त्याप्रमाणें राजकारणाच्या दृष्टीने खरोखरच निरुपद्रवी असलेल्या संस्थांकडेहि सरकारची वक्रदृष्टि वळत होती. अशा परिस्थितींत मध्यप्रदेश व महाराष्ट्र यात ज्या राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचें जाळें विणण्याचे

अत्यंत पद्धतशीर प्रयत्न सुरू होते व ज्याचे संस्थापक व शेंकडों कार्यकर्ते प्रत्यक्ष आंदोलनांत धडाडीनें संमीलित झाले होते, त्या संघामागें इंग्रज सरकारचा ससेमिरा लागणें मुळींच असंभवनीय नव्हतें. विशेषतः परमपूजनीय डॉक्टरांचा महाराष्ट्रांतील दौरा आटोपतांच तेथील प्रांतिक सरकारनें, ' ही काय नवीनच भानगड आमच्या प्रांतांत आली आहे ? ' अशी मध्यप्रांत सरकारकडे विचारणा केली होती. त्यामुळें मध्यप्रांत व मुंबई यांमधील गुप्तचरांची दृष्टि संघकार्यकर्त्यांच्या हालचालींवर विशेषच रोखली जाणें स्वाभाविक होतें. अशा वेळीं डॉक्टरांनीं नागपुरांत केंद्र, बर्डी व धरमपेठ अशीं संघाचीं अवघीं तीनच ठिकाणीं असलेलीं शाखाकेंद्रें वाढवून साऱ्या नगरभर अनेक ठिकाणीं नव्या संघशाखा उभ्या करण्यासाठीं तरुणांना उद्युक्त केलें.

संघावर सरकारची संक्रांत वळणार असें वातावरण असतांना त्यानें गांगरून न जातां, त्या संभाव्य आपत्तीला तोंड देण्यासाठीं स्वयंसेवकांना जें प्रोत्साहन दिलें त्यामुळें ' संक्रांत ' वळणार ही संभाव्यताहि संघाला अत्यंत पुष्टिकारक ठरली ! त्यासंबंधीं डॉक्टरांनीं पुढें एका भाषणांत १९३२ मधील परिस्थितीचा जो आढावा घेतला होता, तो अत्यंत मननीय आहे. ते म्हणतात कीं, "...१९३० सालच्या कायदेभंगाचा १९३२ सालीं दुसरा हप्ता होता. त्या वेळीं कोणतीहि संघटित संस्था असली तर ती त्या चळवळीला साहाय्य करील अशी भीति वाटून तशा संस्था बेकायदा ठरवून बंद करण्याचें सरकारनें ठरविलें......नागपूरला रा. स्व. संघ हीच एक बलवान् संस्था असल्यामुळें ती सरकार बंद पाडील, अशा ' विश्वसनीय ' म्हणून समजल्या गेलेल्या बातम्या फार वाढल्या. मला कौन्सिलच्या मोठमोठ्या सभासदांनींहि ही बातमी सरकारच्या अंतर्गृहांतून आणली असें सांगितलें. मला मात्र नक्की असें वाटत होतें कीं, मध्यप्रांत सरकार इतकें मूर्ख नाहीं कीं, तें रा. स्व. संघासारख्या संस्था बंद पाडील. कारण संघांत अत्यंत शांततेचें व शिस्तीचें शिक्षण देण्यांत येत असून तो बंद करून मध्यप्रांत सरकार नसती आपत्ति कां ओढवून घेईल ? मी त्या वेळीं नेहमीं असें बोलत होतों कीं, ' सरकारला संघ बंद पाडणें शक्य नाहीं. कारण तसें करणें हें आपल्या पायावर नसता धोंडा पाडून घेण्यासारखें होईल. ज्या दिवशीं सरकार संघ बेकायदा ठरवून बंद करील, त्या दिवशीं नागपुरांत २०० संघशाखा निर्माण होतील ! जितके स्वयंसेवक संघांत आहेत तितक्याच शाखा संघ बंद केल्याबरोबर निर्माण होतील. ' मी हें सर्व स्वयंसेवकांच्या भरंवशावर–कर्तृत्वावर विश्वास ठेवून बोललों.

" उद्यां समजा हिंदुस्थान सरकारला संघ बंद करण्याची इच्छा झाली तरी संघ बंद पडेल कसा ? ... ... दृश्य शाखा बंद पडलेल्या दिसतील पण अदृश्य शाखा किती तरी वाढतील. लोकांना बाहेर दिसणारें दृश्य सरकार बंद करूं पाहील, पण भावनामय अंतःकरणाला दिसणारें दृश्य तें कसें डोळ्यांआड करूं शकेल ? तात्पर्य, जाणूनबुजून सरकार संघटनेवर आघात करूं शकत नाहीं.

केल्यास स्वयंसेवकागणिक शाखा निर्माण होतील हें मीं सागितलें. तेव्हा सरकारनें संघ बेकायदा ठरविल्यावर वाटेल तेवढ्या शाखा निघूं शकतात तर मग प्रयत्न आत्तांच कां करू नये ? अशी कल्पना त्या वेळी सुचली व शाखाविस्तार करण्याचे ठरविले. मग प्रत्येक पेठेत उघडी जागा पाहून तेथे एक एक शाखा उघडली व अशा रीतीने नागपुरात आज सोळा शाखा काढल्या हे आपण पाहतो. ''

हा कार्यविस्तार करण्यासाठी डॉक्टरानीं आपल्या सहकाऱ्यासह सारे नागपूर घुसळून काढलें व कोणत्याहि बाह्य परिस्थितीवर संघाचा विस्तार हा निर्भर नसून तो स्वयंसेवकाच्या आत्मविश्वासपूर्ण प्रयत्नावरच केवळ अवलंबून असतो, असा महत्त्वपूर्ण ठसा त्यानीं संघकार्यकर्त्यांच्या मनांवर उमटविला. त्या काळात व त्यानंतरहि ' संघकार्य ' हे परिस्थितिनिरपेक्ष आहे, असे ते स्वयसेवकाना वारंवार सागत. पाठीकडचा वारा सुटून आपल्या उत्साहाचीं सर्व शिडे उभारा-वयास मिळालीं तर उत्तमच. पण वारा पडला वा विपरीत दिशेने वाहूं लागला, तर मात्र हातात वल्हीं घेऊन आपली नौका नियोजित दिशेने व तितक्याच गतीने पुढें हाकारली पाहिजे. त्या वेळीं ' परिस्थिति पालटली आहे ! आता काय करावे ? ' असे हताश होऊन, कपाळाला हात लावून, दैवाला दोष देत बसणे हे संघाला मुळीच समत नाही, असा आशय ' सघ परिस्थितिनिरपेक्ष आहे ' असे सागताना अभिप्रेत असे व तोच सस्कार ते आपल्या वागण्या-बोलण्यातून कोणत्याहि बिकट परिस्थितींतहि करीत असत. परमपूजनीय डॉक्टरानी आपल्या दैनंदिनींत दि. २९ जानेवारी १९३४ या पानावर जे एक सुभाषित लिहिलें आहे ते त्याच्या प्रयत्नवादी विचारसरणीवर उत्तम प्रकाश टाकणारे आहे. ते लिहितात, " कालमाहात्म्य म्हणजे नालायकाची सबब ! "

संघाच्या वाढत्या कामाचें दर्शन दसरा महोत्सवातून चांगलेच घडेल, या कल्पनेने या वर्षीं डॉक्टरांनीं उत्सव पाहण्यासाठीं काशी शाखेतून श्री. सद्गोपालजी व प्रा. माधवराव गोळवलकर याना बोलाविले होते. अपेक्षेप्रमाणेच १९३२ मधील दसरा उत्सव मोठ्या उत्साहाने साजरा झाला. त्या वेळीं १२०० गणवेषधारी स्वयसेवकाचे शिस्तबद्ध संचलन हा नागपुरातील सर्वांच्या कौतुकाचा विषय झाला होता. या उत्सवाच्या प्रसगीं श्री. सद्गोपालजी व प्रा. माधवराव गोळवलकर याचा ' काशी शाखेतील उत्साही कार्यकर्ते ' असा परिचय करून देऊन डॉक्टरानीं त्या दोघाना पुष्पहार घातले होते.

या प्रसंगीं भाषणाच्या प्रारंभीं अखिल हिंदुस्थानात बनारस, इंदूर, कराची, पुणे, मुंबई, सातारा, कोल्हापूर आदि ठिकाणीं संघाचे कसे उत्साहपूर्ण स्वागत झाले व इतरत्र संघाला कशीं निमंत्रणे येत आहेत, त्याचे आनंददायक वृत्त डॉक्टरांनीं निवेदन केले. त्यानंतर संघाचे उद्दिष्ट विशद करणारें त्याचें लहानसें भाषण झालें. त्यात ते म्हणाले कीं, " ......आपल्या धर्माचे, समाजाचे व

संस्कृतीचें रक्षण करणें हें संघाचें ध्येय आहे. कांहीं लोकांना स्वधर्माचें रक्षण करणें म्हणजे परधर्माचा द्वेष करणें असें वाटतें. पण स्वधर्माचें रक्षण करणें म्हणजे दुसऱ्यांचा द्वेष कसा होतो, हेंच मला कळत नाहीं. संघाच्या कार्यपद्धतींत पंथोपपंथ, जातीय मतभेद इत्यादि भानगडी उपस्थित होऊं शकत नाहींत. संघ संपूर्ण हिंदु समाजाचा एकत्वानें विचार करणारा आहे. संघांत सर्व जातींचे लोक एका ध्वजाखालीं काम करीत असल्यामुळें संघांतून अस्पृश्यता केव्हांच नाहींशी झालेली आहे. स्पृश्य व अस्पृश्य यांपैकीं एकाचाच कैवार आम्ही घेणार नाहीं. नागपूर प्रांताबाहेर संघाच्या प्रचारकार्यांत कॉंग्रेस व हिंदु संघटन हे मतभेद बिलकुल आढळले नाहींत. इतकेंच नव्हे तर बहुतेक ठिकाणीं कॉंग्रेसच्या भक्तांचेंच या कार्याला साहाय्य झालें. नागपुरांत तसें घडत नाहीं याचें कारण येथील मतभेद तात्त्विक नसून त्यांत वैयक्तिक आपपरतेचा भाव आहे, असा माझा समज आहे. परंतु आतां तरी त्यांनीं आमची भूमिका स्पष्टपणें ध्यानांत घेऊन आम्हांस मदत करून हें राष्ट्रकार्य यशस्वी करावें, अशी माझी त्यांना कळकळीची विनंति आहे. आपणांवरील मारक हल्ल्यांपासून आपलें संरक्षण करण्यासाठीं हिंदु जातीनें सिद्ध असावें म्हणूनच संघाची स्थापना झाली आहे. ''

या दसऱ्याच्या भाषणांत नागपूरमधील कॉंग्रेसजनांचा संघाशीं वागण्यांत दिसून येणारा तुटकपणा डॉक्टरांनीं सूचित केला होता व तीं फुटीरपणाचीं बीजें अंकुरण्यापूर्वींच नाहींशीं करण्याची त्यांना विनंति केलेली होती. पण राष्ट्रीयत्वा-संबंधींची अशास्त्रीय व अवास्तव कल्पना आणि पक्षाभिनिवेश यांमुळें या बीजाला दुर्दैवानें कॉंग्रेसजनांकडून पद्धतशीरपणें खतपाणी घातलें गेलें; त्यामुळें हिंदूंची अभेद्य संघटना उभी राहण्याच्या सत्कार्यांत अनंत विघ्नें आड आलीं.

नागपूरनंतर बनारस शाखेंतून श्री. सद्गोपालजी व प्रा. गोळवलकर यांना डॉक्टरांनीं उमरेड व भंडारा या शाखा दाखविण्याची योजना केली होती. वास्तविक या नवीन कार्यकर्त्यांना संघाच्या कार्याची नीट उमज पडावी, या दृष्टीनें डॉक्टरांच्या मनांत वरील दोन्ही ठिकाणीं त्यांच्याबरोबर स्वतःच जावें असें फार होतें. पण प्रकृतीनें त्यांना ती गोष्ट करणें अशक्य झालें.

शरीर हें ध्येयनिष्ठ व तपस्वी व्यक्तींच्या मनाचें दास असतें ही गोष्ट खरी. पण शरीराला अधिकांत अधिक झिजविण्याला कांहीं मर्यादा असतेच. रोडावलेली गाय गुराख्याच्या हातांतील काठीच्या भीतीनें कांहीं काळ चालेल हें खरें, पण अगदीं थकल्यानंतर पाठीवर काठीचे सपासप वळ उठूनहि ती गाय जागची न हालतां उलट बसकण मारते, हें केविलवाणें हृदयाला पाझर फोडणारें दृश्य आपल्या पाहण्यांत येतें. दुर्दैवानें १९३२ च्या आगेंमागें डॉक्टरांच्या शरीराची जवळजवळ अशीच अवस्था झाली होती, असें म्हणणें युक्त होईल. त्याचें मन हिंदूंच्या ऐश्वर्यसंपन्न व बलशाली जीवनासाठीं अखंड तगमगत होतें व

त्यासाठीं क्षणाचीहि उसंत न घेतां व येणाऱ्या आपत्तीनी खचून न जाता, ते आपल्या हृदयांतील ध्येयनिष्ठेच्या ज्योतीवर अनेकांच्या हृदयांतील दीप पाजळण्याची पराकाष्ठा करीत होते. कोळ्याच्या जाळ्यांत अडकलेली मासळी, पारध्याच्या जाळ्यांत गुंतलेला पक्षी वा पुराच्या पाण्यातील भोवऱ्यात गरगरणारा मनुष्य यांची त्यांतून बाहेर पडण्यासाठीं जी धडपड सुरू असते, ती डॉक्टराच्या हृदयातील कालवाकालवीपुढे खरीच दुबळी ठरली असती ! त्यांच्या मनात हिंदु समाजाव्यतिरिक्त अन्य विषय शिरकावच करूं शकत नव्हते. मंदिरातील नंदादीपाप्रमाणे त्याचे जीवन कोणत्याहि परिस्थितीत अखंड आशा व उत्साह याचा वर्षाव करीत असतांना दिसे.

त्या वर्षीं त्यांचे मन कार्यवृद्धीसाठी झेपावत असता त्याच्या मनाला शरीरानें साथ देण्याचे जवळ जवळ नाकारलेच होतें. त्यानी नागपूरचा दसरा उत्सव तर अंगांत ताप असूनहि त्याचा कोणाला थागपत्ता लागूं न देता पार पाडला. त्या वेळच्या एका पत्रात भंडाऱ्याच्या एका कार्यक्रमाला मनात असूनहि त्याना का येववत नाहीं हे कळविताना ते लिहितात की, "......मला जोराचा ताप आला नाहीं व मी बिछान्याला खिळलों नाहीं हाच जणूं काही माझा दोष आहे, अशी माझी स्थिति झाली आहे. अशा स्थितीत मी बनारसच्या पाहुण्याबरोबर उमरेड व भंडारा येथे गेलो नसलों तरी मला रामटेकला जावे लागले व त्यामुळे प्रकृतीवर अनिष्ट असा परिणाम झाला. कारण मोटारचा प्रवास मला सहन झाला नाही असे वाटते." इतकी स्थिति होऊनहि नागपुरातल्या नागपुरात त्यानी थोडी थोडी हालचाल चालविलीच होती. पण लवकरच डॉक्टराच्या खालावणाऱ्या प्रकृतीची सहकाऱ्याना कुणकुण लागली व त्यांनीं डॉ. हरदास याचे उपचार सुरू करून त्याच्याच विचाराने त्याना थारेपालट करण्यासाठी डॉ. हरदास याच्या धनतोली येथील बंगल्यावर नेले.

नोव्हेंबरच्या प्रारंभी डॉक्टरांना तिकडे नेण्यात आले व अधिकाधिक विश्रांति मिळावी, या दृष्टीनें स्वयंसेवकानी दक्षता घेतली. डॉक्टराच्या राहत्या घराशेजारी कांही घाणेरडे नाले होते व त्याच्या आजारांत शीतज्वराकडे (इन्फ्लूएन्झा) दुर्लक्ष केल्यामुळे Chronic congestion of lungs (फुफ्फुससंकोचाचा जुनाट विकार) हा मुख्य दोष निर्माण झाला होता. त्यामुळे त्याचा खोकला कांहीं केल्या कमी होण्याचे चिन्ह दिसेना. धनतोली भागातील मोकळ्या व कोरड्या वातावरणात आल्यावर डॉक्टराच्या प्रकृतीत थोडी सुधारणा होऊं लागली. आजारांतून किंचित् उतार पडताच डॉक्टराकडे स्वयसेवकाची ये-जा अधिक होऊं लागून थोड्याच दिवसांत तेथे घरच्याप्रमाणे बैठका व गप्पागोष्टीहि होऊं लागल्या. अथरुणावर बसल्याबसल्या पत्रव्यवहार तर सुरूच असे. डॉ. हरदास यांच्याकडे त्याचे वास्तव्य दोन महिने होतें. एवढ्या काळांत त्यांची व्यवस्था त्यानी

अत्यंत आत्मीयतेनें केली होती. गप्पागोष्टींच्या भरांत डॉक्टरांच्या औषधपाण्यांत क्वचित् चालढकल होई व केव्हां केव्हां रात्रीं जागरणहि घडे. 'अर्थात् ही गोष्ट ठीक नाहीं, तुम्ही पूर्ण विश्रांति घेतली पाहिजे' असा डॉ. हरदास आग्रह करूं लागले कीं डॉक्टर मनमोकळे हंसत असत; पण त्यामुळें हरदासांना राग मात्र कधीं आला नाहीं. त्याविषयीं डॉ. हरदास यांनीं असे उद्गार काढले कीं, "कांहीं लोक चैन व विलास करतांना अनियमितपणाचें जीवन जगतात. पण आपल्या डॉक्टरांचा अनियमितपणा हा कार्यमग्नतेमुळें होता हें मी जाणून होतों."

अशी विश्रांति सुरू असतांना पूर्वींप्रमाणेंच पैशाची विवंचना त्यांना स्वस्थ बसूं देत नव्हती. त्यासाठीं नागपुरांतील डॉ. परांजपे, 'महाराष्ट्र'चे संपादक श्री. ओगले, डॉ. चोळकर, श्री. विश्वनाथराव केळकर, ॲड. बोबडे, ॲड. मंडलेकर आदि मित्रमंडळींची त्यांनीं डॉ. हरदासांच्या घरींच बैठक घेतली होती. त्या वेळीं काढलेल्या पत्रकांत त्यांनीं संघाला पन्नास हजार रुपयांची निकड आहे असें लिहिलें होतें. पटांगण, कार्यालय, आखाडा व इतर प्रवासखर्च यांसाठीं त्यांनीं ही मागणी केली होती. त्या पत्रकाच्या प्रारंभीं ते म्हणतात कीं, "आज संघाचें चालू असलेलें कार्य व या कार्याची भविष्यकालीन रूपरेषा व व्याप्ति याचें प्रचंड स्वरूप लक्षांत घेतां संघाचा पाया आजच सांपत्तिक दृष्ट्या मजबूत करणें आवश्यक आहे. हिंदुस्थानभर आपलें जाळें पसरून सर्व देश सुसंघटित करण्याची महत्त्वाकांक्षा संघानें बाळगली आहे." ही बैठक घेण्यापूर्वींच दि. १३ ला संघप्रेमी लोकांकडे पैशाची मागणी करणारें परिपत्रक डॉक्टरांनीं पाठविलें होतें. त्यांतहि तोच सूर दिसून येतो. त्यांत डॉक्टर लिहितात कीं, "...... आजपर्यंत कोणाजवळ पैशाची मागणी न करतां संघानें केलेली सेवा आपणांसमोर आहे. पण आतां संघाचा व्यापहि इतका वाढला आहे कीं, यापुढे लोकांजवळ पैशाची मागणी केल्याशिवाय संघाला आपलें कार्य करतां येणें शक्य राहिलेलें नाहीं, हें अत्यंत नम्रतापूर्वक आम्ही आपणांला कळवूं इच्छितों......यापुढें धनिकांनीं आम्हांला पैशाच्या अडचणींतून मुक्त केल्याशिवाय कार्याचें हें लोण दूरवर पोंचविण्याकरितां आमचा हात मोकळा होणार नाहीं."

योजल्याप्रमाणें दि. १७ ला बैठक झाली. त्या बैठकींत संघाला पैशाची किती आवश्यकता आहे, हें मांडतांना प. पू. डॉक्टरांनीं देवीच्या देवळाजवळ शाखेसाठीं एक जागा विकत घेण्याचा मानस व्यक्त केला. त्यावर 'अशी जागा संघानें घ्यावी कीं न घ्यावी' अशी चर्चा सुरू होऊन त्यांत कांहीं जणांनीं संघाची जमीन उद्यां सरकार जप्तहि करील, अशी सबळ शंका प्रदर्शित केली. डॉक्टरांना ही गोष्ट मुळींच रुचली नाहीं. ते रागावून म्हणाले कीं, "प्रत्यक्ष आपला एवढा मोठा देश दुसऱ्याच्या घशांत गेल्याचें दुःख नाहीं नि या जमिनीसाठीं लागणाऱ्या दहा-पांच हजार रुपयांचें आहे काय?"

कार्यवाढीला अनुकूलता दिसत असता, प्रकृति बिघडलेली व पैशाची तंगी झालेली अशा अवस्थेंत डॉक्टर असतांना, मध्यप्रांत सरकारने त्यांच्या विवंचनेत भर घालणारें एक परिपत्रक काढलें. दि. १५ डिसेंबरला राज्यकारभार खात्याचे मुख्य कार्यवाह श्री. ई. गॉर्डन ( E. Gordon ) यानी काढलेल्या त्या परिपत्रकांत सर्व सरकारी नोकराना राष्ट्रीय स्वयंसेवक सघ जातीय असल्याने व त्याच्या राजकारणातील हालचाली वाढल्या असल्याने त्यांत भाग घेण्यास प्रतिबध केला होता. त्यात म्हटले होते की, " राजकीय चळवळीच्या सबधात सरकारी नोकराची भूमिका ' सरकारी नोकर वर्तणूक नियमा 'तील २१ व्या नियमात सागण्यात आलेली आहे. असल्या सगळ्या राजकीय विषयापासून सरकारी नोकरांनीं स्वतःला अलिप्त ठेवण्याच्या आवश्यकतेकडे ती कटाक्षाने लक्ष वेधते. रा. स्व. सघ या नावानें प्रसिद्ध असलेल्या सघटनेचे उघड उघड जातीय स्वरूप व राजकीय चळवळीतून ती वाढत्या प्रमाणात घेत असलेला भाग, ह्या गोष्टी विचारात घेता त्या संस्थेच्या हालचालीशी सरकारी नोकराचा संबध असणे हे त्या सरकारी नोकराच्या आपापलीं कर्तव्ये निःपक्षपातीपणे बजावण्याशी विसवादी आहे किवा विसंवादी होईल, ह्याविषयी सरकारची पूर्ण निश्चिति झाली आहे.

" अर्थात् ह्या विचाराला अनुसरून कोणत्याहि सरकारी नोकराला रा. स्व. सघाचा सदस्य होण्याला किवा त्याच्या हालचालींत भाग घेण्याला अनुमति दिली जाऊ नये, असे सरकारने ठरविलें आहे. "

( " The position of Government servants in relation to political movements is laid down in rule 21 of the Government servant's conduct rules, which draws attention to the necessity of Govt. servants holding themselves aloof from all such matters. Govt. is satisfied that in view of admittedly communal nature of the organisation known as Rashtriya Swayamsevak Sangh and its increasing participation in political movements, the association of the Govt. servants with the activities of this organisation is or may become incompatible with the impartial discharge of their duties as Govt. servants.

Government has accordingly decided that no Govt. servant should be permitted to become as member or to take part in the activities of R. S. S. " )

हे परिपत्रक म्हणजे संघाच्या प्रगतीला शह देण्याचाच एक डाव होता. संघांत तसें पाहिलें तर सरकारी नोकरींत असणारांची संख्या विशेष नव्हती. पण

ज्या मध्यमवर्गीय कुटुंबांतील तरुणांचा व बालांचा भरणा संघांत झालेला होता, त्यां कुटुंबाचे प्रमुख मात्र प्रामुख्यानें सरकारी नोकर होते, असें म्हणणें युक्त दिसेल. अशा वेळीं पालकांच्यावर दडपण आणल्यावर त्याचा स्वाभाविक परिणाम म्हणून संघाला ओहोटी लागेल, असा सरकारचा कयास होता व तो तत्कालीन हिंदु समाजाच्या भीरुतेवर आधारलेला असणें स्वाभाविक होतें. बाल शिवाजीची महाराष्ट्रांतील पुंडाई थांबविण्यासाठीं कर्नाटकांत शहाजी राजांना हातकड्या चढविणाऱ्या विजापूरकरांच्या कुटिल नीतीचाच हा विसाव्या शतकांतील नवा छोटा अवतार होता ! इकडे तर प्रत्यक्ष बंदी घातलेली नाहीं, पण व्यवहारतः संघाचें ठिकठिकाणचें काम तर ओसरलें आहे, असें दृश्य दिसूं लागेल, अशी परक्या सरकारची कल्पना होती. पण शहाजी राजांच्या हातकड्या ढिल्या करावयास लागणारें शिवाजी राजांचें बुद्धिकौशल्य सुदैवानें या प्रसंगींहि दिसून आलें व मध्यप्रांतांतील सरकारला हात दाखवून अवलक्षण करून घेतल्याचा पश्चात्ताप मात्र करावा लागला ! डॉक्टरांनीं खरोखरच इतक्या कौशल्यानें तो डाव उलटविला होता, असेंच दिसून येतें.

* * *

## २१ : सरकारचा पराभव

संघांत सरकारी नोकराना येण्यास प्रतिबंध करणारे परिपत्रक निघाल्यानंतर डॉक्टरांनीं राजदरबारी मानमान्यता पावलेल्या लोकाना सघातील उत्सवाना अध्यक्ष म्हणून बोलावण्याचे धोरण आखले. एका अर्थाने अशा लोकाकडून ' संघ हा जातीय नाही व राजकीयहि नाही ' असे वदवून घेऊन सरकारचे कान परस्पर सोनाराकडून टोचून घेण्याचे तत्र डॉक्टरानी योजले होते. त्यानुसार १९३३ मधील संक्रातीच्या उत्सवाला मध्यप्राताचे एके काळचे गृहमत्री सर मोरोपत जोशी याना अध्यक्षस्थान दिलेले दिसते. त्यानी सघाच्या उत्सवाला उपस्थित राहून त्याची मुक्तकण्ठाने स्तुति केली. या गोष्टींतहि सरकारच्या पत्रकाचे हंसेच झाले.

त्या वेळीं डॉक्टरानींहि खरमरीत शब्दात सरकारची कानउघडणी करून संघाची भूमिका सरकारच्या निदर्शनास आणून दिली होती. त्या वेळचे त्याचे भाषण युक्तिवाद व आत्मविश्वास या दृष्टीने उत्कृष्ट म्हणून सागता येईल. त्या भाषणाच्या प्रारभीं त्यानी सघाच्या शभर शाखा व दहा हजार स्वयसेवक असल्याचे सागून संघ कोणाचाहि द्वेष न करता व राजकारणात भाग न घेता दुर्बल हिंदु समाजाला सुसंघटित व बलशाली करण्यासाठी कसा प्रयत्नरत आहे हे स्पष्ट केले होते. त्यानतर परिपत्रकासंबंधी आश्चर्य व्यक्त करताना ते म्हणाले की, " ते ( परिपत्रक ) वाचून व ऐकून पराकाष्ठेचे आश्चर्य वाटले. मध्यप्रात सरकारच्या हातून असे अविचाराचे कृत्य घडूं शकेल, यावर आमचा एकाएकी विश्वास बसूं शकत नाही. पण ही गोष्ट जर खरी असेल तर आम्ही मध्यप्रात सरकारला असें जाहीर आव्हान देतो की, संघानें आजपर्यंत प्रचलित राजकारणाच्या कोणकोणत्या चळवळीत भाग घेतला व हिंदुस्थानातील हिंद्वेतर समाजाशीं कुरापत काढून त्याचेवर आक्रमण करण्याचा कुठे कुठे प्रयत्न केला, हे त्यानीं दाखवून द्यावें. युरोपियन असोसिएशन, युरोपियन चेंबर ऑफ कॉमर्स यासारख्या सस्था ' कम्युनल ' न ठरता, त्यात जर सरकारचे वाटेल तेवढे मोठमोठे अधिकारी भाग घेऊं शकतात, तर मग आम्ही आमच्या हिंदु जातीला सघटित करण्याच्या हेतूने काढलेली ही संस्था ' कम्युनल ' कशी ? व त्यात सरकारी अधिकाऱ्याना भाग का घेतां येऊं नये ? एका समाजाने दुसऱ्या समाजाविरुद्ध केलेल्या चळवळीला जातीय चळवळ म्हणतां येईल. परंतु

इतरांचा तिरस्कार किंवा द्वेष न करतां केवळ स्वजातीयांच्या कल्याणाकरितां चालविलेल्या ह्या चळवळीला 'जातीय' या सदराखालीं दडपून टाकण्याची ही पद्धति अजब आहे यांत शंका नाहीं. सरकारला हें कार्य आवडत नसल्यामुळें तें दडपून टाकण्याची इच्छा असेल, तर सरकारला आम्ही नम्रपणें सुचवून ठेवतों कीं, आमचें हें कार्य दडपलें जाणार नाहीं. आम्ही परमेश्वराला स्मरून आपलें कार्य करीत आहोंत व आमचे मार्गांत कितीहि संकटें आलीं तरी त्यांना तोंड देऊन आम्ही आमच्या कार्याची उत्तरोत्तर भरभराट केल्यावांचून राहणार नाहीं."

पुण्याच्या 'केसरी'नें व नागपुरांतील वृत्तपत्रांनींहि डॉक्टरांच्या भूमिकेला पुष्टि देणारे विचार मांडले होते. त्यांत 'हितवाद' या इंग्रजी पत्रानें तर असा खोचक प्रश्न विचारला कीं, "......ब्राह्मणेतर पक्ष ही संस्था जातिनिष्ठ आहे कीं नाहीं? असेल तर तिचें अध्यक्षपद एखाद्या दिवाणानें स्वीकारलें आणि दुसऱ्या एखाद्या जातीवर ताशेरा झाडला, तर तो सरकारला चालतो काय?" पण हिंदुस्थानांत निरनिराळ्या युक्त्या-प्रयुक्त्यांनीं हिंदु समाजाला दुर्बल, असंघटित व निद्रित ठेवण्यांतच परक्या इंग्रजांचें अन्यायी आसन कांहीं काळ स्थिर राहण्याची शक्यता असल्यानें, असल्या खोचक टीकेकडे पद्धतशीर कानाडोळा सरकारनें केला असला तर त्यांत नवल नव्हतें. सरकारला हिंदुहितविरोधी कांहींहि खपत असे व रुचत असे, असेंच दिसून येतें. यासाठीं वानगी म्हणून त्याच वर्षीच्या एका प्रकरणाकडे अंगुलिनिर्देश करून भागण्यासारखें आहे. त्या वर्षीं हिंदुस्थान सरकारच्या मंत्रिमंडळांत असलेल्या सर फजली हुसेन यांनीं एक सनसनाटी गुप्त पत्रक उत्तर हिंदुस्थानांतील मुसलमानांत मोठ्या प्रमाणावर प्रसृत केलें होतें. त्यांत म्हटलें होतें कीं, "हां, सांभाळा ! या हिंदु-मुसलमानांच्या एकीच्या जाळ्यांत सांपडूं नका ! आपणांला भिकारड्या हिंदूंशीं एकी करून काय लाभ ? आपण इंग्रजांशीं एकी करून आपला लाभ करून घेतला पाहिजे !" असल्या दुष्ट व खवचट पत्रकाचा पंजाबांत एका वृत्तपत्रांतून परिस्फोट झाला व त्यावर असेंब्लींत प्रश्नहि विचारले गेले. अशीं पत्रकें इंग्रजांना चालत होतीं; नव्हे तीं पत्रकें लिहिणारा हात फजली हुसेनचा असला तरी त्या हाताचा 'चालविता धनी' इंग्रजांवाचून वेगळा नव्हता हीच गोष्ट खरी ! अस्तु.

संक्रांतीनंतर अवघ्या दोनच महिन्यांनीं संघाच्या वर्षप्रतिपदेच्या उत्सवाला तर डॉक्टरांनीं एके काळचे मध्यप्रांताचे प्रांताधिपति (गव्हर्नर) नामदार श्री. ब. तांबे यांनाच आणून बसविलें. या मध्यंतरांत सर्वत्र पत्रव्यवहार करून संघाच्या शाखांवर या परिपत्रकाचा अनिष्ट असा परिणाम होऊं नये, म्हणून डॉक्टरांनीं दक्षता घेतली होती. त्यांची प्रकृति मात्र अजून असमाधानकारकच असलेली दिसते. दि. २५ मार्चच्या पत्रांत ते लिहितात कीं, "...थोडक्याशा मेहनतीनें थकवा व दम येणें ही तक्रार मात्र अजून कायम आहे." पण असें असतांहि

पाडव्याच्या भाषणांतील त्यांची तेजस्विता दिपविणारी होती. " हिंदु धर्माच्या व संस्कृतीच्या रक्षणाकरितां हिंदुस्थानातल्या हिंदूनी केलेले प्रयत्न हे जातीय व अराष्ट्रीय असूंच शकत नाहींत, " असे निक्षून सांगून डॉक्टरानी " तुमची राजकीय व सामाजिक मते कोणत्याहि तऱ्हेची असूं द्यात, आपली व्यक्तिविषयक मते स्वतः जवळ ठेवून तुम्ही सर्व आपल्या हिंदुसंघटन चळवळीत आमच्याबरोबर सहकार्य करावयास या " असें सर्व पक्षाच्या हिंदूंना त्यानीं आवाहन केले होते. ना. श्रीपाद बळवंत तांबे यानीहि संघकार्याची भरघोस प्रशंसा करून " सरकारने हे फर्मान काढले असले, तरी संघ ही संस्था पूर्ण हिंदु वृत्तीची व प्रचलित राजकीय चळवळीपासून अलिप्त असल्यामुळे, ज्याला हिंदु जातीची सेवा करण्याची इच्छा असेल त्यानें या संघांत भाग घेण्यास प्रत्यवाय नाही. " असा निर्वाळा दिला होता.

सरकारी परिपत्रकातील त्राण प्रत्यक्ष कार्य वाढवून कमी करण्यात डॉक्टरांनी बरेंच यश मिळविलें. नागपुरात तर चोवीस तासाचा दिवसहि सर्व व्याप सांभाळण्यास अपुरा वाटूं लागला. या वेळी " इकडील कार्य इतके वाढलेले आहे की, येथून बाहेरगावीं जाण्याकरिता पाय काढणे प्रायः अशक्य आहे, " अशी वस्तुस्थिति डॉक्टरानी मांडलेली आढळते. नागपुरात काम वाढत होते व त्या वर्षींच अधिकारी शिक्षण वर्गहि नागपूर व मेहकर अशा दोन ठिकाणी घ्यावा लागला होता. ही वाढ करण्यासाठी डॉक्टरानीं पत्रातून किती विविध मार्गानीं सहकाऱ्याना उत्तेजित केले होते, हे पाहिल्यानंतर त्याच्या असामान्य संघटन-कौशल्याची कांहीशी कल्पना येते. कधीं त्याच्या लेखणीतून गौरवोद्गार निघतात, तर कधीं एखाद्या मित्राजवळ अगदीं अंतरीचे कढ व्यक्त झालेले दिसतात, केव्हा एखाद्याच्या प्रमादासाठीं त्याला कडक शिस्तीने शासन केलेले आढळते, तर कधीं एखादा अपेक्षेइतके काम करीत नाही म्हणून डॉक्टरानीं त्रागा वा वैताग व्यक्त करून अगदी निर्वाणीचे बोल उमटविलेले दिसतात! एकाच तळमळीची व्यक्ति व परिस्थिति पाहून प्रकट झालेली तीं रूपे होतीं व त्यामुळे परमपूजनीय डॉक्टराच्या पत्राचें स्वरूप वरीलपैकी कोणतेहि असले तरी त्याचा परिणाम मात्र त्या व्यक्तीवर अनुकूल असाच होत असे. या दृष्टीने त्यांचे दि. १२।८।३३ चे पत्र उल्लेखनीय आहे. त्यांत नागपूर जिल्हा हा संघटनेच्या केंद्रस्थानी असल्याने सर्वांत अधिक बलवान पाहिजे, ही गोष्ट ठसविण्यासाठी ते लिहितात कीं, " ...इमारत जितकी प्रचंड व भव्य बाधावयाची असेल त्या मानाने पायाहि विस्तृत, भक्कम व बलशाली असला पाहिजे. आज आपल्या संघाच्या जवळ जवळ १२५ शाखा व १२००० स्वयंसेवक शिक्षण घेत आहेत, ही एवढी प्रचंड इमारत नागपूर जिल्हा असंघटित राहिल्यास ढासळून पडण्यास वेळ लागणार नाहीं, हा विचार मनांत येऊन माझे मनास जे दुःख होतें, त्याचें वर्णन या पत्रांत करणें शक्य नाहीं.

" थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे माझ्यांत असलेल्या सर्व शक्ति एकवटून मीं ही संघाची इमारत उभी करण्याचा प्रयत्न केलेला आहे. परंतु एका व्यक्तीनें कितीहि कार्य करूं म्हटलें तरी तें राष्ट्राचें कार्य असल्यानें एका व्यक्तीच्या हातून होणें शक्य नाहीं. म्हणून आपणांला माझी अंतःकरणपूर्वक कळकळीची विनंति आहे कीं, आपलें सहकार्य असल्याशिवाय हें कार्य यापुढें माझ्या व्यक्तीच्या हातून होणें शक्य नाहीं.

"...कार्य करण्यांत अडचणी नसतात असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. परंतु मनुष्यानें निश्चय केला म्हणजे तो अडचणीला तोंड देऊन कार्य करूं शकत नाहीं असेंहि मला वाटत नाहीं. तेव्हां असलेल्या सर्व अडचणींना तोंड देऊन, आपलीं खाजगी कामें क्षणभर बाजूला टाकून आपण या वर्षीं ( उमरेड ) तालुक्यांत शाखा भरभक्कम पायावर स्थापन केल्याच पाहिजेत, असें माझें आपणांला निक्षून सांगणें आहे.

" हें कार्य जर आपणां मंडळींकडून होणें अशक्य असेल तर आपण मला हें संघकार्य सोडून विश्रांति घेण्याची परवानगी द्यावी, एवढीच माझी आपणांला शेवटची विनंति आहे..."

नागपूर भागांतील सरकारी अवकृपा अशी विफल ठरत होती. पण मुंबई प्रांतांत डॉक्टरांनीं सुरू करून दिलेल्या कामाला मात्र नागपूरप्रमाणें उजळा आला नाहीं. एक तर तेथें संघकार्यांत मुरलेल्या कार्यकर्त्यांचा जसा अभाव होता, त्याचप्रमाणें सरकारी दंडुकेशाहीचें स्वरूपहि उग्र होतें. डॉक्टरांनीं कऱ्हाडला नियुक्त केलेले संघचालक श्री. गणपतराव आळतेकर वकील यांचें त्या काळांतील एक पत्र महाराष्ट्रांतील एकूण परिस्थितीचा नोकझोक समजण्यास पुरेसें आहे. ते लिहितात कीं, "...... इकडील शाखेचीं कामें इतक्यांत व्यवस्थितपणें चालतील असें वाटत नाहीं. राजकारणाचा कांहीं संबंध नसला तरी, ह्या इलाख्यांतील वातावरण इतकें कुजकें झालें आहे कीं, सरकारला कसलीहि चळवळ आक्षेपार्ह वाटते. स्मशान-शांतता राखणें हेंच इकडील बाजूस धोरण आहे. साधारण व्यायामशाळाहि बेकायदेशीर ठरविण्यांत आल्या आहेत." अशा विरोधी व दमट वातावरणांतहि महाराष्ट्रांतील काम मंद झालें तरी बंद झालें नव्हतें, ही गोष्ट विसरून चालणार नाहीं.

सरकारी नोकरांना संघांत येण्यास प्रतिबंध करणारी आज्ञा निघून अवघें एक वर्ष लोटलें नाहीं तोंच स्थानिक स्वराज्य संस्थांतील नोकरांवरहि तोच निर्बंध लादण्यांत आला. त्यांत असें म्हटलें होतें कीं—

" जिल्हा कौन्सिलच्या नियंत्रणाखालील शाळांतील कांहीं शिक्षक राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या स्थानिक शाखांचे सदस्य झाले आहेत, असें सरकारच्या दृष्टीस आणून देण्यांत आलें आहे. त्या संस्थेचें जातीय स्वरूप ध्यानीं घेऊन सरकारी

नोकराना त्या संघटनेचे सदस्य होण्यास किंवा तिच्या हालचालीत भाग घेण्यास प्रतिबध करण्यांत आला आहे. तसेच स्थानिक स्वराज्य संस्थातील नोकरांनींहि त्या संघटनेशी कोणत्याहि तऱ्हेचा संबंध ठेवणे हे तितकेच अनिष्ट आहे, असे मध्य-प्रदेश सरकारला ( त्या सरकारच्या स्थानिक स्वराज्य खात्याला ) वाटते. ते नोकर समाजातील सर्व वर्गांचे प्रतिनिधित्व करणाऱ्या सार्वजनिक संस्थांकडून नेमले गेलेले आहेत. त्या स्थानिक संस्थाना कर वसूल करण्याचा अधिकार सरकारकडून मिळालेला असून सर्वसामान्य कर भरणाऱ्या लोकाच्या जिवावरच सरकारकडून अनुदानाच्या रूपाने त्याना आणखीहि साहाय्य दिले जात असते. अशा परिस्थितीत जातीय स्वरूपाच्या कोणत्याहि खाजगी सस्थेत सम्मीलित होण्यास स्थानिक स्वराज्य सस्थानी आपल्या नोकरांना मोकळीक देणे हे अयोग्य होईल, हे स्पष्ट आहे. यासाठी मला तुम्हाला अशी विनंति करावयाची आहे की, आपल्या विभागांतील स्थानिक स्वराज्य सस्थावर हा दृष्टिकोन तुम्ही बिंबवावा व ह्या विषयाच्या संबधात आपापल्या नोकरासाठी स्पष्ट आज्ञा काढावयास सागावी. ''

(" It has been brought to the notice of the Government-that certain teaehers of the District Council Schools have been enrolled as members of local branches of the organisation known as Rashtriya Swayamsevak Sangh. In view of the communal nature of this association, Government Servants have been prohibited to become members of it or to take part in its activities. The Government of C. P. ( Ministry of Local Self Government ) considers that it is equally undesirable that servants of Local bodies should associate themselves with the organization in any way. These servants are employed by public bodies representing all classes of the community. The local bodies derive their outhority to impose taxes from Government at the expense of the General Tax-payer. In these circumstances, it would clearly be improper for local bodies to permit their servants to be associated with any private organization of a communal nature. I am to request that you will impress this view on the local bodies in your division and desire them to issue clear orders on the subject to their employees. " )

हा १९३३ च्या डिसेंबरमध्ये घडलेला प्रकार लोकमतावर चालणाऱ्या संस्थांतील मंडळींना मुळींच रुचणारा नव्हता. त्यामुळें ठिकठिकाणच्या लोकनियुक्त

सभासदांत खळबळ निर्माण झाली. अशा संस्थेतील सदस्य हे सर्वच जण केवळ संघाच्याच विचारसरणीचे नव्हते; नव्हे संघाव्यतिरिक्त अन्य संस्थांशीं निष्ठा व जवळीक असलेल्या लोकांची संख्याच त्यांत अधिक होती, असें म्हणणें वावगें ठरणार नाहीं. पण परक्या सरकारनें आपल्याकडे सोपविलेल्या अति छोट्याशा कार्यक्षेत्रांतहि पुन्हा अशी लुडबुड करणें हें त्या सर्वांच्या दृष्टीनें संतापजनक होतें. या असंतोषाला डॉक्टरांनीं पद्धतशीर स्वरूप देऊन अशा ठिकठिकाणच्या संस्थांकडून सरकारचा कडकडून निषेध व्हावा, म्हणून प्रयत्न सुरू केले. त्यासाठीं अनेक जणांना भेटून व त्यांना संघाची विशुद्ध राष्ट्रीय भूमिका समजावून देऊन, संघांत सरकार म्हणतें त्याप्रमाणें आक्षेपार्ह असें कांहीं नाहीं, याची कल्पना आणून दिली. यासाठीं ठिकठिकाणच्या कार्यकर्त्यांना पत्रें लिहून व कांहीं ठिकाणीं स्वतः जाऊन डॉक्टरांनीं प्रयत्न केले.

असे प्रयत्न सुरू असतांनाच डिसेंबरच्या शेवटीं नागपूरला अखिल महाराष्ट्र साहित्य संमेलन पार पडलें. त्याच वेळीं नागपूरला सैनिकी पद्धतीनें संघस्वयंसेवकांची छावणी सुरू असल्यानें महाराष्ट्रांतील शेकडों विद्वानांना संघाचें प्रत्यक्ष दर्शन घडविण्याची संधि डॉक्टरांनीं साधली असेल हें सांगावयास नकोच. शेकडों तरुणांचा सैनिकी गणवेष, त्यांचें शिस्तबद्ध संचलन व त्या तरुणांनींच स्वतःच्या श्रमानें उभारलेली पांढऱ्या तंबूंची छावणी या सर्व गोष्टी कोणत्याहि देशभक्ताला आकृष्ट व प्रमुदित करणाऱ्या होत्या.

लोकमान्यांचे एके काळचे सहकारी व 'नवा काळ'चे संपादक श्री. कृष्णाजीपंत तथा काकासाहेब खाडिलकर हे संमेलनाध्यक्ष होते व त्यांनीं प्राध्यापक दत्तोपंत पोतदार, वा. म. जोशी, य. रा. देशपांडे, बाबुराव गोखले, धुळ्याचे शंकरराव देव, सरदार किबे, शाहीर खाडिलकर आदि मंडळींबरोबर येऊन छावणीला भेट दिली. त्या वेळीं तेथील स्वयंसेवकांच्या अनुशासित जीवनाचा पाहुण्यांवर झालेला परिणाम श्री. काकासाहेब खाडिलकर यांच्या भाषणांतून चांगलाच व्यक्त झाला होता. संचलन पाहतांना ते बोलून गेले कीं, " या प्रसंगाचें वर्णन करणें कठीण आहे. प्रत्यक्ष कार्य करणें हेंच याचें खरें वर्णन ठरेल ! " त्यानंतर स्वयंसेवकांसमोर भाषण करतांना त्यांनीं डॉक्टरांच्या संघटन-कौशल्याचा गौरव करून सांगितलें कीं, "......आम्ही साहित्यसेवक वाचिवीर आहोंत. पण येथें शक्तीची उपासना प्रत्यक्ष चालू आहे. हें शक्तीचें दृश्य स्वरूप आहे. हजारों व्याख्यानें देऊन व लेख लिहून जें कार्य आम्हांला साधणार नाहीं व जें लोकांवर ठसवून देतां येणार नाहीं, तें केवळ या संघाच्या दृश्यानेंहि सहज साधणार आहे. प्रत्यक्ष दृश्य स्वरूपानेंच महान् तत्त्वांचा उलगडा व प्रकाश पडूं शकतो, याचें हा संघ म्हणजे उत्कृष्ट उदाहरण होय.... "

श्री. काकासाहेब खाडिलकरांसारख्यांना डॉक्टरांनीं हें ‘ जिवन्त साहित्य ’ दाखविलें व या साहित्यांतूनच हिन्दुस्थानांत हिन्दुराष्ट्राचा ‘ नवा काळ ’ निर्माण होणार, अशी जणूं मनोमन साक्ष पटविली ! ‘ हजारों लेख व व्याख्याने ’ ज्या दृश्यांसमोर पांगळीं ठरणार होतीं, अशीं तरुणांच्या संघटनेचीं प्रभावी दृश्ये अखंड हिन्दुस्थानांत उभीं करण्यांत डॉक्टर मग्न होते. साहित्यिक होण्यापेक्षां साहित्याला स्फुरण देणारे केन्द्र निर्माण करणे असेंच त्याच्या कार्याचे स्वरूप होतें, असें म्हणणे सयुक्तिक होईल.

या वर्षीं अल्लीपूर येथें झालेल्या वर्धा जिल्हा शिबिरांत डॉक्टरांनी पुन्हा ना. श्री. ब. तांबे याना अध्यक्ष म्हणून नेलें व त्यांच्या मुखाने, ‘ संघ हा जातीय व राजकीय आहे, ’ हा सरकारचा अपसमज असल्याचें सरकारच्या कानी घातले. या शिबिरांत भाषण करताना ‘ पाकिस्तान ’-निर्मितीसाठीं चालू असलेल्या मुसलमानी दुष्ट प्रचारासंबधीं डॉक्टरांनीं प्रकट रीतीने प्रथमच विचार मांडले होते. त्यावरून हिंदुराष्ट्रविरोधी कारस्थानांची जगाची गति व ती रोखली जाण्यासाठीं चालू असणाऱ्या हिंदुराष्ट्र-जागृतीच्या कार्याची गति यांतील अतर डॉक्टराना अत्यंत अस्वस्थ करीत होते, असे स्पष्ट दिसते. संकटे अनेकाना उमगत नाहींत व उमगली तरी त्यांची चाहूल लागल्यानंतर त्यांच्या निवारणासाठी आवश्यक ती सिद्धता वेळीच झाली नाहीं तर ती चाहूल लागून न लागल्या-सारखीच ठरते. तसा प्रकार घडूं नये म्हणून डॉक्टरांनी पराकाष्ठा चालविली होती व त्यामुळे त्यांच्या भाषणातून स्वाभाविकपणेच त्यांच्या हृदयांतील चिता व्यक्त होई. अल्लीपूरच्या भाषणात ते म्हणाले होते की, “ पूर्वीच्या गाधार देशाचा ज्याप्रमाणें आज अफगाणिस्थान झालेला पाहण्याचा प्रसग आपणावर आला आहे, त्याचप्रमाणे आजचे हिदुस्थान भविष्य काळात हिदुस्थान न राहता इस्लामस्थान झालेले पाहण्याचा प्रसग आपणावर येईल कीं काय, अशी भीति वाटते. उद्या जर धर्म आणि संस्कृति याचे मोल देऊन स्वराज्य घ्या, अशी भाषा उत्पन्न झाली, तर तसले संस्कृतिविहीन स्वराज्य घेण्यांत काय अर्थ आहे, याचा आपणच विचार करा. अशा तऱ्हेचा प्रसग येणार नाहींच, असें खात्रीपूर्वक सांगतां येत नाही. गेल्या वर्तुळ परिषदेत उत्तर हिंदुस्थानला ‘ पाकिस्तान ’ असे नांव देण्याची सूचना करण्यांत आली होती. यावरून वारा कोणत्या दिशेनें वाहत आहे, हे आपल्या ध्यानीं येईल. आज हिंदु समाजांत अत्यंत मोठी उणीव कोणती असेल तर ती परस्परांना साहाय्य करण्याच्या बुद्धीची होय. रा. स्व. संघास हीच उणीव भरून काढावयाची आहे. ”

डॉक्टरांचे स्नेही श्रीमन्त राजे लक्ष्मणराव भोसले निवर्तल्यावर सरकारनें अप्रत्यक्ष दडपण आणून हत्तीखान्यांत चालणारी संघशाखा तेथून हालविणे भाग पाडलें. राजे लक्ष्मणराव असेपर्यंतहि त्यांनीं संघाला पाठिंबा देऊं नये म्हणून

कारस्थानें चालत. ' हें संघाचें राजकारणाचें पिल्लूं जवळ कां बाळगतां ? ' असा प्रश्न विचारून भीति दाखविण्याचा यत्न अधूनमधून होत असे. पण त्यावर ' हें धर्माचें काम आहे व जेथें धर्म तेथें मी राहणारच ! ' असें अत्यंत तेजस्वी व खणखणीत उत्तर लक्ष्मणरावांकडून दिलें जाई. या निग्रहापुढें सरकारची डाळ शिजण्यासारखी नव्हती. पण राजे लक्ष्मणराव दिवंगत झाल्याची संधि साधून, हत्तीखाना काढून घेण्याचा व संघाला त्या बाजूनेंहि शह देण्याचा प्रयत्न केला गेला. त्यानंतर तुळशीबागेंत शाखा हालविण्यांत आली. ती जागा देखील राजघराण्याचीच असल्यानें, आज नाहीं उद्यां तीहि सोडून जाण्याचा प्रसंग येईल, हें डॉक्टरांनीं ओळखलें व त्यांनीं नाग नदीच्या पलीकडील रेशीमबागेंतील जवळजवळ सव्वादोन एकर जागा एका शेतकऱ्याकडून सातशें रुपयांना विकत घेऊन ठेवली. १९३३च्या शेवटीं संघाचे अनेक कार्यक्रम या नव्या, मोकळ्या व प्रशस्त पटांगणावर होऊं लागले.

या डिसेंबरांतच डॉक्टरांचे क्रांतिकार्यांतील एक स्नेही श्री. रामलाल बाजपेयी हे सतरा वर्षांनंतर परदेशांतून आपल्या मित्रांना भेटण्यासाठीं आले होते. त्यांच्या नागपूरच्या वास्तव्यांत त्या दोघांच्या अनेकदां भेटी होऊन एकूण देश-परिस्थितीसंबंधीं मनमोकळी चर्चा झाली होती. राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचें शारीरिक व सैनिकी शिक्षण, प्रार्थना, बौद्धिक-वर्ग आदि चालणारे कार्यक्रम डॉक्टरांनीं आपल्या मित्राला दाखविले होते. परतंत्र देशाला शिस्तबद्ध व आज्ञांकित शक्तीचा वापर करून उठाव करण्याची संधि जागतिक राजकारणाच्या धकाधकींत चालून येत असते. पण त्या वेळीं तसें उठावाचें सामर्थ्य पूर्वयोजनेनें सिद्ध ठेवलेलें नसेल तर तहान लागल्यावर विहीर खणावयास जाण्यासारखेच, आयत्या वेळीं केलेले प्रयत्न हास्यास्पद व विफल ठरतात. ही वारंवार बसणारी ठेच ध्यानीं घेऊन डॉक्टरांनीं चातुर्यानें व अखंड सावधानता ठेवून चालविलेलें हें कार्य पाहून त्यांच्या मित्राला अर्थातच धन्यता वाटली.

राजकीय आंदोलनाचें अस्थिर वातावरण आतां निवळलें होतें व आपल्या पक्षाच्या अंतर्गत स्थितीकडे लक्ष देण्यास पुढाऱ्यांना अवसर मिळाला होता. त्या परीक्षणांत मध्यप्रदेशांत तरी असें दृश्य दिसूं लागलें होतें कीं, कॉंग्रेसचे अग्रगण्य कार्यकर्ते हेच ठिकठिकाणीं संघाच्या कार्यांत मनःपूर्वक भाग घेऊं लागले आहेत. हें दृश्य अर्थातच कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना विचार करावयास लावणारें होतें यांत शंका नाहीं. महात्मा गांधींचें केंद्र बनलेल्या वर्धा येथील श्री. हरिकृष्ण तथा आप्पाजी जोशी हे वास्तविक प्रांतिक कॉंग्रेसच्या कार्यवाहपदावर आपल्या कर्तृत्वानें मंडित झालेले होते. पण गेल्या दोन-चार वर्षांत त्यांनीं संघाच्या कार्यांत उडी घेतांच त्या जिल्ह्यांतील वातावरण पालटलेलें दिसूं लागलें. तेव्हां संघाच्या या वाढत्या कामाचें स्वरूप समजावून घेऊन तें कार्य कॉंग्रेसला पूरक कसें होईल व

तसे न जमल्यास ते किमान कॉंग्रेसला अडचणीचें तरी कसें ठरणार नाही, या दिशेने कांहीं जणांची हालचाल सुरू झाली.

वर्ध्याचे शेठ जमनालालजी बजाज यानी डॉ. मुंजे व डॉ. हेडगेवार यांच्याकडे सघ, महासभा व कॉंग्रेस याच्या ध्येयधोरणाचे स्वरूप जाणून घेण्यासाठी एक प्रश्नावलि पाठविली. त्यांत अस्पृश्यता-निवारण, खादी, कॉंग्रेसचा कार्यक्रम, महासभा व संघ यांचे संबंध यांवरील प्रश्न होते. याच वेळी बजाज यानी बॅरिस्टर मोरोपत अभ्यंकर यांना एक पत्र लिहून संघ व महासभा याच्या संबंधाविषयी चौकशी करून माहिती कळविण्याची विनंति केली होती, असे दादा धर्माधिकारी यांच्या स्मरणांत आहे. या पत्राला डॉक्टरानी "आपल्या पत्राला लेखी उत्तर देणे अवघड आहे, तेव्हा आपण सवडीने भेटावयास या किवा आज्ञा होईल तर मी वर्ध्यास भेटावयास येतो," अशा आशयाचे उत्तर पाठविले. संघासबंधी मनात कोणते प्रश्न उभे राहतात, हे स्वयसेवकाच्या नीट ध्यानी यावे व या प्रत्येक प्रश्नासंबधी संघाची नेमकी भूमिका काय आहे, याची उमज पडावी यासाठी डॉक्टरांनीं त्यांच्याकडे येणाऱ्या स्वयंसेवकाना ती प्रश्नावलि उतरून घ्यावयास लावून, त्यांचीं उत्तरे लिहून काढण्यास सागितले होते. स्वयंसेवकानी न तुटणाऱ्या तात्त्विक वादांत गुरफटून जाऊं नये, असे डॉक्टराचे सदैव सागणे असे. मात्र इतराच्या बुद्धिभेद करणाऱ्या असख्य प्रश्नाच्या माऱ्याने कधीहि हतप्रभ होणार नाहीत, इतकी आपल्या भूमिकेच्या विशुद्धतेची बौद्धिक उमज स्वयंसेवकाना असलीच पाहिजे, अशी त्याची अपेक्षा असे. याच कल्पनेतून त्यानी हे आलेले प्रश्न सोडविण्यासाठी कार्यकर्त्यांसमोर ठेवले होते.

डॉक्टरांच्या पत्रानंतर बुधवार दि. ३१ जानेवारी १९३४ या दिवशी सकाळी शेठ जमनालाल बजाज यानीं नागपूरला येऊन डॉक्टर हेडगेवार व डॉ. मुंजे याची स्वतंत्रपणे भेट घेतली. त्या वेळीं शेठजींबरोबर श्री. गणपतराव टिकेकर व कुमारी ताराबेन याहि आल्या होत्या. या भेटीत डॉक्टरानी संघ राजकारणातीत असून कोणत्याहि सस्थेला विरोध करीत नाही, तसेंच त्याचा खादीला विरोध नसून अस्पृश्यता तर तो मुळात मानीतच नाहीं असे स्पष्ट केले. खादीसंबंधीचे स्पष्टीकरण करतांना त्यानी सागितले होते कीं, "ज्याची खादीवर पूर्ण श्रद्धा आहे व जे खादीवाचून इतर कपड्यांना स्पर्श करीत नसतील, त्यांना खाकी खादीचा पोषाख करण्याला पूर्ण मोकळीक आहे. खादीने स्वराज्य मिळूं शकेल किवा खादी ही अर्थशास्त्राच्या दृष्टीने बाजारांत विजय मिळवूं शकेल, असे आम्हास वाटत नाही. तसेंच देशांतील गिरणीच्या कापडावर बहिष्कार घालणें घातक आहे. कारण त्यामुळें विलायती कापडाची व गिरणीच्या कापडाची योग्यता एकच ठरविली जाते. गिरणीचे कापड वास्तविक

१५ आणे स्वदेशीच असतें. मात्र संघ स्वदेशीचा पुरस्कार करीत असल्यानें परदेशी कापडाचा खाकी गणवेष संघाला मुळींच संमत नाहीं. ”

या भेटींत संघाची भूमिका स्पष्ट करण्यासाठीं प. पू. डॉक्टरांनीं संघाची लिखित घटना शेठजींना वाचून दाखविली होती व त्यामुळें बरेचसे प्रश्न मुळांतच विरले होते. मात्र शेठजींनीं ‘ संघ कॉंग्रेसचा द्वेष करतो ’ असें पालुपद दीड तासाच्या संभाषणांत अनेकदां आळविलें होतें. तेव्हां डॉक्टरांनीं चर्चा संपण्यापूर्वीं ठिकठिकाणच्या कॉंग्रेस कार्यकर्त्यांनीं संघासंबंधीं कसे प्रलाप काढले व लोकांचीं मनें कशीं कलुषित केलीं, याचीं एकामागून एक साधार उदाहरणें मांडण्यास सुरुवात केली. त्या ओघांत “ दोन-तीन दिवसांपूर्वीं कोण तुमच्या मीराबेन कीं ताराबेन आहेत ना, त्यांना संघाची मुळींच कल्पना नसतांना त्या संघावर तोंडसुख घेऊन कडाडल्या, तें तुम्हीं ऐकलेंच असेल, ” असा डॉक्टरांनीं प्रश्न टाकला. इतकी वित्तंबातमी यांना लगेच कशी कळली, याचें नवल वाटून जमनालालजी चपापले व त्यांनीं उल्लेखित कु. ताराबेनचा परिचय करून दिला ! तेव्हां डॉक्टरांनीं नमस्कार केला. या भेटीसंबंधीं डॉक्टर दि. १।२।३४ च्या पत्रांत लिहितात कीं, “...मीं शेठजींना संघाची घटना पूर्णपणें वाचून दाखविली. त्यामुळें त्यांचे प्रश्न बरेच कमी झाले. फक्त संघ कॉंग्रेसचा द्वेष करतो, एवढाच मुद्दा शिल्लक राहिला. संघ कॉंग्रेसचा द्वेष करीत नसून कॉंग्रेसचे प्रमुख लोकच संघाचा द्वेष करतात हें पुराव्यानिशीं मीं त्यांचे पदरांत घातलें व यापुढें असें होऊं न देण्याची काळजी घेण्यास सांगितलें. ”

संघ व महासभा या दोन अगदीं स्वतंत्र संस्था असल्याचें डॉ. मुंजे यांनीं शेठजींना निक्षून सांगितलें होतें. तसेंच संघ कॉंग्रेसचा द्वेष करतो, हा आपला शुद्ध भ्रम असून कॉंग्रेसनें विशाल दृष्टिकोन स्वीकारावा, असा हितोपदेश केला होता. या भेटीनंतर डॉक्टरांनीं श्री. बजाज यांच्या प्रश्नांना श्री. आप्पाजी जोशी यांच्या हस्तें लेखी उत्तरेंहि पाठविलीं होतीं, असें एका पत्रावरून दिसतें. अर्थात् आज त्यांची प्रत उपलब्ध नाहीं.

याच काळांत डॉक्टरांनीं महाराष्ट्रांत प्रचार करण्यासाठीं सांगलीला गोपाळराव येरकुंटवार, पुण्याला श्री. दादाराव परमार्थ व जळगांव, धुळें या भागांत श्री. बाबासाहेब आपटे या तिघां तरुण कार्यकर्त्यांना नागपुराहून पाठवून दिलें. या वेळेपर्यंत केवळ संघाचें काम करणारा प्रचारक-वर्ग उभा राहिला नव्हता. त्याचा याच काळांत प्रारंभ झालेला आहे. श्री. परमार्थ यांनीं आपल्या भावनापूर्ण व प्रभावी वक्तृत्वानें पुण्याला चांगलाच जम बसविला व श्री. बाबासाहेब आपटे यांच्या संथ व विचारशील प्रचारानेंहि भुसावळ--जळगांव भागांत संघाचें कार्य प्रगत होऊं लागलें. हिंदुस्थानसारख्या पददलित देशाला आपला पुनरुद्धार करून घेण्यासाठीं, फावल्या वेळांत कार्य करणाऱ्यांच्या कर्तृत्वावर निर्भर राहून

भागण्यासारखें नाहीं, हें डॉक्टरांनीं ओळखलें होतें. त्यासाठींच संघाच्या प्रारंभापासून डॉक्टरानी सभोंवती जमविलेल्या तरुणाच्या मनावर, आपल्या जीवनाचे साफल्य समाजासाठी ईश्वरदत्त सद्‌गुणाची व शक्तीची जोपासना करून, त्याच्या बलावर राष्ट्रोद्धारासाठी आत्मसमर्पण करण्यात आहे, हा दिव्य संस्कार सातत्याने चालविला होता. त्या संस्कारातूनच संघकार्यासाठी सर्व काळ देण्यात आनद मानणारे तरुण पुढे येण्यास सुरुवात झाली होती.

या सर्व घडामोडी चालू असताना डॉक्टराचे लक्ष सरकारी पत्रकाविरुद्ध जनमत जागृत करण्याकडे केन्द्रित झाले होते. १९३४ च्या मार्चमध्ये मध्यप्राताच्या कौन्सिलचे अधिवेशन होणार होते. तत्पूर्वी निरनिराळया पुढाऱ्याना व कौन्सिलच्या सभासदाना भेटून, त्याची सघाच्या प्रश्नावर सरकारला कडाडून विरोध करणारी फळी उभी करावी, या दिशेने डॉक्टराची हालचाल सुरू होती. निरनिराळ्या ठिकाणच्या विधिज्ञाचा विचार घेऊन सरकारने केलेला आघात कसा निष्फळ ठरविता येईल, याची योजना निश्चित करण्यात डॉक्टर मग्न दिसत. त्याच्या प्रयत्नाला हलके हलके यशहि येऊ लागले व मार्चपूर्वी अकोला डिस्ट्रिक्ट कौन्सिल व वर्धा उमरेड, सावनेर, काटोल, भडारा, आदि अनेक ठिकाणच्या स्थानिक स्वराज्य संस्थानी सघावर हा अन्याय होत असल्याने, ते जाचक परिपत्रक मागे घ्यावे, अशी मागणी करणारे व असे पत्रक काढल्याबद्दल सरकारचा निषेध करणारे ठराव समत करून पाठविले.

सरकारने १९३२ च्या डिसेंबरात निर्बंध लादल्यानंतर त्याविरुद्ध जीं वक्तव्ये व वृत्तपत्रीय टीका झाली, ती अगदीच निष्फळ ठरली नव्हती. त्याचे प्रत्यंतर म्हणजे १९३३ च्या परिपत्रकात संघावर केवळ ‘ जातीय ’ चळवळीचाच आरोप उरला होता. तत्पूर्वीच्या परिपत्रकातील ‘ राजकीय ’ चळवळीचा आरोप गाळलेला दिसला. त्यासबंधीं डॉक्टर एका पत्रांत म्हणतात कीं, “ ...राजकीय चळवळीचे विधान सरकारला मागे घ्यावे लागलें व सघ फक्त ‘ कम्युनल ’ आहे, एवढेच पोरकट विधान त्यानीं केले. दोष तर लावतां येत नाहीं व दृष्टीनें तर ( संघ ) पाहवत नाहीं, अशी हिताविरोधी लोकाची स्थिति झाली आहे.”

मध्यप्रांत विधिमडळात ( कौन्सिलमध्ये ) संघावरील परिपत्रकासंबंधींचें तप्त लोकमत सरकारच्या ध्यानात आणून देण्यासाठीं आवश्यक तितकी पूर्वसिद्धता डॉक्टरानीं केली व त्यानुसार दि. ३ मार्च १९३४ च्या विधिमंडळाच्या अधिवेशनांत सघासंबंधीं खुसखुशीत प्रश्नोत्तरे झडलीं. एखाद्या बावळट मुलाची टर उडविण्यासाठीं, खट्याळ व खोडकर मुलानीं त्याला गराडा घालून, निर-निराळ्या तऱ्हानीं त्याला सतावण्यास सुरुवात केल्यानंतर त्या बिचाऱ्याची जी अवस्था होते, तसाच अनुभव गृहमंत्री ना. राव यांना त्या दिवशीं आल्यावांचून राहिला नाहीं. जातिनिष्ठ संस्था म्हणजे काय ? एखादी मुसलमान संस्था जातिनिष्ठ

आहे काय ? परिपत्रक कोणत्या खात्यानें काढलें ?—असे एकामागून एक सारखे प्रश्न विचारले जात होते. अशा फैरी झडत असतां सिहोरा येथील श्री. काशीप्रसाद पांडे यांनीं प्रश्न टाकला कीं, " मध्यप्रांत सरकारांतले एक माजी मंत्री रा. स्व. संघाचे अध्यक्ष झाले होते हें खरें काय ? "

" मला तर हें आतांच कळत आहे ! "—ना. राव.

" गुप्त पोलिस खात्यानें सरकारकडे रिपोर्ट पाठविला नाहीं काय ? "

" सी. आय्. डी. चा रिपोर्ट आलेलाच असेल म्हणा ! परन्तु मध्यप्रांत सरकारच्या एका माजी मंत्र्यानें, त्यांच्याच कारकीर्दींत त्या संस्थेवर सरकारी बहिष्कार पडला असतां, संघाच्या सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारावें, ही गोष्ट मला तरी विचित्र वाटते ! "—ना. राव.

" सरकारनें संघ बहिष्कृत केव्हांपासून ठरवला ? "

" या प्रश्नाची आगाऊ सूचना मला पाहिजे. ' बहिष्कार ' या शब्दाचा अगदीं कांटेकोर अर्थ तुम्ही करूं नका. तो शब्द मीं अगदींच व्यापक अर्थानें वापरला आहे ! "—ना. राव.

अशा प्रकारची ना. राव यांची शाब्दिक घसरगुंडी वारंवार होत असतांनाच श्री. बाबासाहेब खापर्डे यांनीं पृच्छा केली कीं, " संघाची कोणती चळवळ अगर धोरण सरकारला आक्षेपार्ह वाटलें ? " या प्रश्नानंतर जो संवाद घडला, तो त्या दिवशींच्या वातावरणाची कल्पना आणून देण्यास पुरेसा आहे.

" अहो, या संघाच्या सूत्रधारांच्या भाषणांवरून असें दिसलें कीं, जर्मनींत हिटलरशाही किंवा नाझी राजसत्ता यांचीं जीं ध्येयें व कार्यपद्धति आहे, त्याचाच कित्ता या संघाच्या चालकांनीं आपल्यापुढें ठेवला आहे. "—ना. राव.

" या संघाचे चालक तरी कोण ? "

" एक चालक डॉ. हेडगेवार, व दुसरे मला वाटतें कीं, डॉ. मुंजे आहेत. "—ना. राव.

" बरें, संघाच्या चळवळीपैकीं कोणता भाग तुम्हांला आक्षेपणीय वाटला ? "

" अहो ! संघाचे चालक हिटलर व नाझी यांचें अनुकरण करूं पाहत आहेत, असें त्यांच्याच भाषणावरून दिसतें ना ! "—ना. राव.

" हा आरोप आपण त्यांच्या भाषणांवरून सिद्ध कराल काय ? "

" डॉ. हेडगेवार यांनीं नागपुरांत केलेल्या एका भाषणांतील उताऱ्यावरूनच मी तसें म्हणालों. "—ना. राव

" तो उतारा प्रत्यक्ष वाचून दाखवा पाहूं. "

या मागणीनें ना. राव गोंधळलेले पाहून अध्यक्ष म्हणाले, " हें पाहा, त्या विषयावर खुलासेवार चर्चा पुढें करतां येईल. " अर्थात् हा सरकारचा यशस्वी माघार घेण्याचा निष्फळ प्रयत्न होता.

इतक्यांत प्रश्न विचारला गेला कीं, " हा संघ निघाला तरी केव्हां ? "

" १९१८ सालीं ! "—ना. राव.

" मग सरकारला त्यावर बहिष्कार पुकारण्यास इतकीं वर्षे कां लागली ? "

" कारण, त्याच्या चळवळी आक्षेपार्ह आहेत असे नुकतेंच सरकारच्या लक्षांत आलें म्हणून ! "—ना. राव.

" हे परिपत्रक पाळण्याबद्दल सरकार स्थानिक स्वराज्य संस्थांवर दाब आणणार आहे काय ? "

" आम्हीं या परिपत्रकाने स्थानिक स्वराज्य संस्थाना सल्ला दिला आहे. ती काहीं आज्ञा नाहीं. "—ना. राव.

या प्रश्नोत्तरांच्या चकमकींतून परिपत्रक हा केवळ सल्ला आहे, आज्ञा नाही, एवढी गोष्ट सिद्ध झाली. त्याचप्रमाणें सरकारला संघ केव्हां निघाला व त्याचे नेमके चालक कोण, याचीहि धड माहिती नाहीं हे बाहेर आले व नाझीशाहीशीं साधर्म्य दाखविणारे डॉक्टर हेडगेवार याचे भाषण आपल्या पाहण्यांत आहे असे धादान्त खोटें विधान करून सरकारने आपलें हंसें करून घेतले ! या प्रश्नोत्तरात ना. राव यानीं डॉ. हेडगेवारांचा हिटलरशाहीशीं जो काल्पनिक संबध खोडसाळ-पणाने जोडला, तोच संबंध खरा मानून व त्या राईचा पर्वत करून, सत्य-अहिंसेचें नाम लावून मिरविणाऱ्या आधुनिक मंबाजींनी डॉ. हेडगेवार जर्मनींत गेले होते, त्यांचा व हिटलरचा घनिष्ठ संबंध होता व नाझी पक्षाला आदर्श ठेवूनच डॉक्टरांनी रा. स्व. संघ काढला, असले अलौकिक शोध लावल्याचे अनेकाच्या ध्यानांत असेल ! निर्भेळ असत्यपणासाठीं जर एखादें ' नोबेल ' पारि-तोषिक असते, तर तें प्रथमतः या महाभागाना देणेंच भाग पडले असते, यात शंका नाहीं ! अस्तु.

हीं सर्व प्रश्नोत्तरें चालू असतांना डॉक्टर स्वतः प्रेक्षकात बसून सभागृहातील हास्याच्या उसळणाऱ्या कल्लोळाची मौज लुटीत होते. त्या दिवसाचे कामकाज संपल्यावर तेथील चर्चेत सरकारचा खोडसाळपणा चव्हाट्यावर आणणाऱ्या सभासदांना भेटून त्याचें अभिनंदन करण्यास डॉक्टर विसरले नाहींत.

यानंतर दि. ७ मार्चला डॉ. हेडगेवारांचे एके काळचे शिक्षक भंडाऱ्याचे श्री. बाबासाहेब कोलते यानीं सरकारी परिपत्रकाच्या निषेधासाठीं ' काट ' (Cut motion) मांडला. त्या भाषणांत त्यांनीं ' जातीय ' म्हणजे काय, याची नेमकी कल्पना गृहमंत्री ना. राव यांना स्पष्ट करतां आली नाहीं, असें सागून काट मांडण्यामागील हेतु स्पष्ट केला. त्यांत ते म्हणाले, " (१) समाजाची सुस्थिति, ( २ ) तरुणाचा शारीरिक विकास व ( ३ ) अनुशासन या तीन हेतूंनीं राष्ट्रीय स्वयंसेवक संघ कार्य करीत आहे. हिंदुस्थानांतील सर्व निरनिराळ्या जाती अशा प्रकारें आपापल्या समाजाची उन्नति करीत असतां, हिंदूंच्या अशा प्रयत्नावरच

सरकारनें आघात कां करावा? तो तर प्रत्येक समाजाचा अगदीं जन्मसिद्ध अधिकार आहे. सरकारी नोकरांच्या हालचालींवर व स्वातंत्र्यावर प्रतिबंध लादून आपण त्यांना शुद्ध दास बनवीत आहोंत."

या 'काट' सूचनेला पाठिंबा देणारीं अनेकांचीं आवेशपूर्ण भाषणें झालीं. त्यांतील ॲडव्होकेट श्री. तु. ज. तथा नानासाहेब केदार, सौ. रमाबाई तांबे, बाबासाहेब खापर्डे, उमेदसिंग ठाकूर, मंगळमूर्ति, सी. बी. पारख, रहमान व फुले यांचीं भाषणें उल्लेखनीय होतीं. या सर्व भाषणांचें स्वरूप रोचक असलें तरी विस्तार-भयास्तव त्यांतील वेचक भाग तेवढाच येथें देत आहें. त्यावरून सरकारला विरोध करण्यासाठीं डॉक्टरांच्या प्रयत्नानें, परस्परविरोधी मतांच्या मंडळींनींहि आपलेपणानें कसे प्रयत्न केले, याची कल्पना येईल. त्याचप्रमाणें संघाचे पाठीराखे म्हणून उभे असलेल्यांनाहि संघाची नीटशी कल्पना कशी नव्हती; ते केवळ डॉक्टरांवरील लोभानें संघाचें समर्थन करावयास कसे उभे राहिले व त्यामुळें त्यांतून अभावितपणें विनोद निर्माण कसा झाला, तोहि पाहण्यासारखा आहे!

श्री. कोलते यांच्या भाषणानंतर मध्यप्रांत सरकारचे प्रमुख कार्यवाह (चीफ सेक्रेटरी) श्री. रफ्टन् यांनीं सरकारची भूमिका स्पष्ट करतांना "संघाचें ध्येय 'हिंदूंसाठीं हिंदुस्थान' असें कोतें व जातीय असल्याचा" उल्लेख केला होता. त्याला उत्तर देतांना श्री. नानासाहेब केदार म्हणाले कीं, "हिंदु धर्म हा सर्वांत अधिक सहिष्णु आहे. तेव्हां जर कोणी हिंदु 'हिंदुस्थान केवळ हिंदूंचाच आहे' असें म्हणत असेल तर तो लगेच टाकळीच्या चाळींजवळपास पाठविण्यास योग्य आहे असें मी म्हणेन!" ("...Hindu religion is pre-eminently tolerant. Surely if any Hindu were to say that India is for Hindus only, I would at once say he is fit to be sent somewhere near Takali line." ) नागपूरकडे टाकली-लाइन्सचा उल्लेख लगतच्या पागलखान्यामुळें त्याच अर्थानें केला जातो. अर्थात् या उद्गारांनीं सभागृहांत हास्याची खसखस पिकली होती, हें सांगावयास नकोच!

त्या वेळच्या सर्वसामान्य लोकांच्या दृष्टीनें श्री. केदार यांनीं केलेलें संघाचें समर्थन हें युक्तच होतें. कारण हिंदुस्थान हा त्यांत राहणाऱ्या हिंदु, मुसलमान, ख्रिश्चन आदि सर्वांचा आहे, ही इंग्रजांनीं गळीं उतरवलेली विकृत व राष्ट्रघातकी कल्पना जनहृदयांत इतकी दृढमूल झाली होती कीं, त्यांना 'हिंदूंचा हिंदुस्थान' ही कल्पना वेडगळ वाटणें स्वाभाविक होतें. केदारांनीं ही संघाची स्तुति नव्हे नालस्ती केली, हें त्या सभागृहांत असलेले प. पू. डॉक्टर व त्यांच्या तत्त्वज्ञानाची कल्पना असलेले त्यांचे कांहीं मित्र यांव्यतिरिक्त इतरांना जाणवली नाहीं. यावरून त्या वेळच्या निद्रित स्थितीची सहज कल्पना करतां येण्यासारखी

आहे'! ते उद्गार ऐकून इतरांबरोबर प्रेक्षकांत बसलेले डॉक्टरहि हंसले असतील. पण त्या दोन्ही हास्यात अंतर होतें ते मात्र दोन ध्रुवांइतकें !

श्री. रहमान यांनी पाठिंबा देतांना "......राजकीय संघटनांकडे लक्ष देणाऱ्यांनीं आपली संघटना आक्रमक व लष्करी वृत्तीची बनणार नाहीं अशी दक्षता घ्यावी," असा हितोपदेश केला होता ! श्री. फुले यांनी "प्रांतांतील ब्राह्मणेतर पक्ष व मुसलमानाच्या चळवळी याना हे परिपत्रक का लागू नाहीं ?" असा सवाल टाकून "असंघटित हिंदूंना संघटित होण्याला संधि मिळाली पाहिजे," अशी मागणी केली होती. श्री. बाबासाहेब खापर्डे यानी मात्र 'हिंदूंचा हिंदुस्थान' ही संघाची विचारधारा कशी विशुद्ध आहे, याची केलेली मांडणी अत्यंत नेटकी होती. विशेषतः डॉक्टर हेडगेवारांच्या संघाचा हिटलरच्या नाझी संघटनेशीं बादरायण संबंध जोडण्याचा सरकारने जो प्रयत्न केला, त्याचा उपहास त्यांनीं अत्यंत मार्मिकतेनें केला होता. ते म्हणाले कीं—

"डॉक्टर हेडगेवारांचा संघ आहे व हिटलरचीहि स्वयंसेवक-संघटना आहे. म्हणून डॉ. हेडगेवार हे हिटलर आहेत, असे म्हणणे हे मुलखावेगळे वा अजब तर्कशास्त्र आहे ! मला कटु शब्दप्रयोग करण्याची इच्छा नाहीं. पण डॉ. हेडगेवारांचा संघ आहे व खिलाफतवाल्यांचीहि स्वयंसेवक-पथके आहेत. मग खिलाफतवाल्यांनाच हेडगेवार व हिटलर कां म्हणूं नये ?"

("Dr Hedgewar has a volunteer corps. Herr Hitler has a volunteer corps Therefore Dr. Hedgewar is Herr Hitler This indeed is a bad logic. I do not wish to use a harsh expression. Dr. Hedgewar has a volunteer corps. The Khilafatists have a volunteer corps. Why should not Khilafatists be called Hedgewars and Hitlers ?")

नागपूरच्या 'महाराष्ट्रा'ने तर खापर्डे यांनीं केलेल्या उपहासाचें याहूनहि अधिक वृत्त दिले होते. त्यात सरकारच्या तर्कशास्त्राचा पोकळपणा दाखविण्यासाठीं खापर्डे म्हणाले होते कीं, "...... मी माझें तर्कशास्त्राचें ज्ञान विसरलों नाहीं, पण मला तेंच नडते ! हे सरकारचें तर्कशास्त्र कसे चुकीचे आहे पाहा. समजा, एक मनुष्य असें म्हणूं लागला कीं, 'तुझ्या बापाला लांब मिशा होत्या; मलाहि लांब मिशा आहेत. म्हणून मी तुझा .. !'"

शेवटीं दि. ७, ८ व ९ अशी चर्चा झाल्यावर श्री. बाबासाहेब कोलते यानीं मांडलेला 'काट' संमत होऊन सरकारचा दणदणीत पराभव झाला ! हें परिपत्रक निघाल्याचा विपरीत परिणाम प्रत्यक्ष दैनंदिन संघकार्यावर तर झाला नव्हताच; तरीहि सर्वसामान्य लोकात, संघाकडे सरकारची वक्रदृष्टि आहे, ही भीति निर्माण करणारी जाणीव अवश्य उत्पन्न झाली होती. त्या भीतिलाहि य.

सरकारच्या पराभवानें आतां जागा उरली नाहीं. या घटनेनंतर लवकरच तें ना. रावांचें मंत्रिमंडळ गडगडलें व त्याचाहि संघाच्या दृष्टीनें अनुकूल असाच परिणाम झाला.

या प्रकारानंतर प. पू. डॉक्टरांनीं, प्रांतापुरतें एक अरिष्ट टळलें असलें तरी देशांत सर्वत्र सरकारी नोकरांवर जातीय संघटनेंत प्रवेश न करण्याचें जें बंधन घातलें गेलें आहे, त्याचा प्रतिकार करतां येत नाहीं, याविषयीं पत्रांतून चिन्ता व्यक्त केली होती. त्यांत त्यांना दिसणारें देशपरिस्थितीचें भेसूर चित्र उमटलेलें होतें. ते लिहितात कीं, "...गेल्या कौन्सिलचे चर्चेचे वेळीं हा संघ 'कम्युनल' आहे हें विधानहि सरकारला सिद्ध करतां आलें नाहीं व पहिल्याच सर्क्युलरच्या विरुद्ध जो बजेटांत काट सुचविण्यांत आला, त्यांत सरकारचा पूर्ण पराभव होऊन ह्या सर्क्युलरांचें कंबरडें पुरेपूर मोडलें आहे. असल्या परिस्थितींत कोणींहि आपलीं मुलें संघांत पाठविण्याला भिण्याचें कारण आम्हांला दिसत नाहीं. याउपर लोकांनीं भितोंच म्हटलें तर त्याला तुम्ही व आम्ही काय करणार ?

"मध्यप्रांत सरकारनें कांहीं गडबड केली तर येथील कौन्सिलांत त्याचा समाचार घेण्याची व्यवस्था आपल्याला थोडीबहुत तरी करतां येते, परन्तु हिन्दुस्थान सरकारनें अखिल हिंदुस्थानांतील सरकारी नोकरांना उद्देशून जे नियम प्रसिद्ध केले आहेत, त्यांत आपण ढवळाढवळ कशी करणार ? व दिल्लीपर्यंत आपले हात कसे पोहोंचणार ? अखिल हिंदुस्थानांतील मोठमोठ्या पुढाऱ्यांचें याकडे लक्ष जाऊन त्यांनीं या गोष्टीला विरोध केला पाहिजे; परन्तु त्या सर्वांचें लक्ष तर आपापसांतल्या यादवींत गुंतलेलें. सरकारी नोकरांनीं एकत्रित येऊन या नियमांचा निषेध करावा तर त्यांना कशाचीच गरज दिसत नाहीं. आपलें टीचभर पोट भरलें म्हणजे मग जगांतील कोणत्याहि गोष्टीची त्यांना पर्वा नाहीं. नवरा मरो किंवा नवरी मरो, आपणांस पिंडाएवढा घास मिळाला म्हणजे झालें, अशी त्यांची वृत्ति आहे. आपण आपलेकडून, संघाचा व हिंदुस्थान सरकारच्या नियमांचा अर्थाअर्थीं कांहीं संबंध नाहीं, एवढें लोकांना स्पष्टपणें बजावून सांगितलें म्हणजे आपलें या बाबतींतलें कर्तव्य संपलें असें समजावें."

प. पू. डॉक्टरांनीं या परिस्थितींत स्वयंसेवकांना अधिक उत्साहित करण्यासाठीं बराच पत्रव्यवहार केलेला होता. त्याचप्रमाणें ठिकठिकाणच्या भाषणांतूनहि त्यांनीं सरकारवर कडाडून प्रहार करण्यास मागेंपुढें पाहिलें नव्हतें. या दृष्टीनें नागपूरच्या पाडव्याच्या उत्सवांत त्यांनीं केलेलें वक्तव्य वानगीदाखल देण्यासारखें आहे. ते म्हणाले कीं, "...श्री. कोलते यांनीं काट सुचविला तेव्हां गृहमंत्र्यांनीं उत्तरादाखल भाषण करतांना डॉ. मुंजे व सर मोरोपन्त जोशी यांनीं १९३३ मध्यें केलेलीं भाषणें १९३२ मध्यें काढलेल्या परिपत्रकाच्या समर्थनार्थ वाचून दाखविलीं ! जसें आक्षेपार्ह काय आहे व काय नाहीं, हें माजी गृहमंत्र्यांना

समजत नाहीं; तें मात्र हल्लींच्याच गृहमंत्र्यांना समजतें ! जणूं कांहीं १९३२ चें परिपत्रक काढण्याचे वेळी पुढें एक वर्षाने सर मोरोपंत जोशी अगर डॉ. मुंजे काय भाषणें करणार, हे सरकारला अंतर्ज्ञानानें कळले होते. त्याचप्रमाणे संघ १९२५ मध्यें स्थापन झाला असतां १९१८ सालीं झाल्याची नोंद आहे. त्या वेळीं नागपुरांत हिंदु-मुसलमानांत तेढ उत्पन्न झाली होती, असेहि सरकार म्हणते ! संघ १९१८ सालीं अस्तित्वात नव्हता व त्या साली नागपुरात हिंदु-मुसलमानाची तेढहि नव्हती ! या सर्व खेळखंडोबावरून मध्यप्रात सरकारच्या अक्कलेचें दिवाळे वाजले असावें असे दिसते ! संघाच्या चळवळीत व्यत्यय करण्याचा सरकारचा इरादा नाही, असे सांगण्यांत आले आहे. त्यावरून संघाची चळवळ बेकायदा नाही, हें सरकारच्याच तोंडाने प्रकट झाले आहे. तेव्हां सरकारने तीं परिपत्रके मागे कां घेऊं नयेत ?"

ह्या वादळांत मंत्रिमंडळ गडगडले तरी सरकारने आपल्या खोट्या प्रतिष्ठेच्या जपणुकीसाठी तीं परिपत्रके मागे घेतलीं नाहीत. पण या घटनेनंतर व्यवहारतः तीं परिपत्रके, दिवसां आकाशांत असूनहि सूर्यप्रकाशात निष्प्रभ झालेल्या चादण्या-प्रमाणे असूननसून सारखींच ठरलीं ! अर्थात् सरकारला आपल्या प्रतिष्ठेच्या कुंकवाला आधार उरला होता एवढे मात्र खरे !

* * *

## २२ : पूजनीय डॉक्टर व महात्माजी

परमपूजनीय डॉक्टर यांचें एकाच वेळीं चारी बाजूंना चालणाऱ्या घटनांकडे अवधान असे व त्यांतून कर्तव्य म्हणून जें करणें युक्त दिसेल तें करण्यासाठीं ते झटून पुढें येत. त्यांचे कलकत्त्यापासूनचे एक जिवलग स्नेही डॉ. स. नी मोहरीर हे १९२४ मधील आर्वी दंग्यापासून जन्मठेपेची शिक्षा नागपूर कारागृहांतच भोगीत होते. तेव्हांपासून आपल्या अनंत व्यापांतून वेळ काढून डॉक्टरांनीं कारागृहांतील नियमानुसार त्यांना आंत जाऊन भेटण्याचा व इतरांना भेटी घडवून देण्याचा क्रम अव्याहत चालविला होता. एकदां 'आपला' हा शब्द उच्चारल्यावर त्या शब्दाबरोबर येणारें कर्तव्य डॉक्टर कधींच चुकवीत नसत. अशा कर्तव्यदक्षतेमुळेंच, दि. २८ फेब्रुवारी १९३४ या दिवशीं जेव्हां त्यांची सुटका झाली, तेव्हां कारागृहाच्या बाहेर पडतां पडतांच डॉक्टरांनीं डॉ. मोहरीर यांच्या गळ्यांत पुष्पहार घालून उत्कट प्रेमानें त्यांना आलिंगन दिलें ! त्यानंतर त्यांना मोटारीनें घरीं नेऊन दुसऱ्या दिवशीं नागपुरांतील प्रतिष्ठित मंडळींना घरीं बोलावून त्यांनीं डॉ. मोहरीर यांचा यथोचित सत्कार केला. तसेंच अनेक शाखांतूनहि त्यांचा सत्कार घडवून आणण्यास डॉक्टर विसरले नव्हते. नागपूरच्या पाडव्याच्या समारंभांतहि त्यांचें स्वागत करून, सरकारनें त्यांना वेळींच सोडलें नाहीं म्हणून ठपका दिला होता. ते म्हणाले कीं, " ...... डॉ. मोहरीर यांनीं एकूण सव्वाआठ वर्षें शिक्षा भोगली व ते नुकतेच सुटून आलेले आहेत. तुरुंगाच्या नियमाप्रमाणें त्यांची सुटका यापेक्षांहि लवकर व्हावयास पाहिजे होती; परंतु आपल्या मध्यप्रांतांत सरकारचें चक्र अलीकडे कसें वक्रगतीनें फिरत असतें, हें सर्वांना माहीतच आहे !"

राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या दृष्टीनें एक महत्त्वाची व्यक्ति याच काळांत डॉक्टरांच्या सहवासांत येऊं लागली होती; ती म्हणजे सध्यांचे सरसंघचालक श्री. माधवराव गोळवलकर ! १९३३ च्या जूनमध्येंच ते काशीच्या हिंदु विश्वविद्यालयांतील प्राध्यापकपदावरून मोकळे झाले व त्यानंतर नागपूरला राहावयास आले. नागपूरला त्यांचे मामा श्री. बाळकृष्णपंत रायकर यांच्याकडे ते राहत असत व त्यांचे वडील व मातुःश्री यांचें वास्तव्य नागपूरपासून जवळच असलेल्या रामटेकला होतें. त्यामुळेंच नोकरींतून मुक्त झाल्यावर ते नागपूरला राहावयास आले.

काशीच्या हिंदु विश्वविद्यालयात असतांनाच डॉक्टरांच्या प्रेरणेने शिक्षणासाठीं तिकडे गेलेले संघ-कार्यकर्ते श्री. भय्याजी दाणी, बाबूराव तेलंग व तात्या तेलंग आदि मंडळींच्या प्रयत्नाने विद्यार्थीप्रिय असलेले प्राध्यापक श्री. माधवराव गोळवलकर यांचा संघाशीं संबंध आला व तो हलके हलके दृढ होत गेला. प्रा. गोळवलकर यांची कोणताहि विषय सुलभ करून शिकविण्याची हातोटी विलक्षण होती व त्यांच्या अध्यापनाला धनाभिलाषेचा संपर्क नव्हता. त्यामुळे अनेक विद्यार्थ्यांना त्याचा आधार वाटे. त्यांचा मनमोकळा स्वभाव हेहि मोठेंच आकर्षण होतें. त्यांतून काशीला असतानाच प्राध्यापक माधवराव गोळवलकर हे 'गुरुजी' म्हणून ओळखले जाऊं लागले. त्यांची कुशाग्र बुद्धि, निरलस वृत्ति, सेवाभाव व तरतरीतपणा यांचा ठसा पाहणाऱ्याच्या मनावर तेव्हांच उमटे. ते कोणत्याहि विषयात लक्ष घालावयाचे ते त्याचा अगदीं तळ पाहण्याची आकाक्षा ठेवूनच. या त्यांच्या मनोरचनेनुसार त्यानीं काशीला असतानाच संघाचे नेमके रहस्य आत्मसात् करून संघशाखेकडे विशेष लक्ष देण्यास प्रारभ केला होता. अशा वेळींच प. पू. डॉक्टरानीं त्याना नागपूरला बोलावून नागपूर, भंडारा, उमरेड व रामटेक वगैरे शाखा कशा दाखविल्या व त्यांना संघाची अधिक स्पष्ट कल्पना आणून देण्यासाठीं कसे प्रयत्न केले, याचा उल्लेख मागे आलाच आहे.

असा एम्. एस्सी. पर्यंत शिक्षण झालेला पचवीस-सव्वीस वर्षांचा तरुण कार्यकर्ता प्रत्यक्ष नागपुरात राहावयास आला, याचा अर्थातच डॉक्टराना आनद झाला. कारण समाजात पदवीधराची असलेली प्रतिष्ठा विचारात घेता जितके पदवीधर तरुण कार्यकर्ते संघाचा विचार आपल्या कृति-उक्तीतून समाजात प्रकट करू लागतील, तितक्या प्रमाणात संघाचे समाजातील वजन वाढून, संघाचा विस्तारहि द्रुतगतीने होऊं लागेल, अशी सबळ आशा त्यामागे होती. श्रीगुरुजी यानीं नागपूरला आल्यावर त्याच्या आई-वडिलाच्या व मित्रांच्या आग्रहावरून एल्एल्. बी. चा अभ्यास सुरू केला होता व थोड्याबहुत प्रमाणात प्रत्यक्ष संघाचे कामहि ते करीत. त्या निमितानें त्यांचें डॉक्टराच्या घरी जाणे-येणे घडे व अशा भेटींतून परस्पराचा परिचय वाढत जाऊन संघाच्या तत्त्वज्ञानाविषयीं चर्चाहि होई. १९३४ च्या जूनमध्ये प. पू. डॉक्टरानीं अकोला जिल्ह्याचे संघचालक श्री. बाबासाहेब चितळे व श्रीगुरुजी याना मुंबईमध्यें संघाच्या प्रचारार्थ पाठविलें. त्यांनीं त्या वेळीं साधारण एक महिनाभर मुंबईत राहून कामाला प्रारंभ करून दिला व तें सुरू केलेलें काम नीट चालावे, यासाठीं ते दोघे परतण्यापूर्वीं डॉक्टरांनीं श्री. गोपाळराव येरकुंटवार यांना मुंबईला प्रचारक म्हणून नियुक्त केलें. अकोला वर्ग व मुंबईतील प्रचार यांतून गुरुजींना संघाच्या कामाचा व समाजस्थितीचा जवळून परिचय झाला. यानंतर डॉक्टरानीं त्यांच्याकडे नागपुरांतील मुख्य शाखेचें कार्य सोपविलें.

या काळांत डॉक्टरांची प्रकृति त्यांना पुन्हा साथ देईनाशी झाली होती. त्यामुळें त्यांच्या डॉक्टरांनीं व सहकाऱ्यांनीं पुन्हा नेट धरून त्यांनीं कांहीं काळ विश्रांति घ्यावी, असा लकडा लावला. डॉक्टरांनीं कांहीं दिवस ऐकून न ऐकल्या-सारखें केलें व शेवटीं त्यांचा निरुपाय होऊन सहकाऱ्यांनीं केलेल्या योजनेनुसार त्यांना नागपूरच्या परिसरांत अंबाझरी रस्त्यावरील श्री. कृष्णराव पांडुरंग वैद्य यांच्या बंगल्यावर विश्रांतीसाठीं जावें लागलें. या ठिकाणीं अत्यंत मोकळी हवा व उत्तम व्यवस्था असूनहि त्यांच्या प्रकृतिमानांत सारखा चढउतार चालू होता. डॉक्टरांची विश्रांति ही कांहीं अंशीं नांवाचीच होती. कारण प्रवासाची धांवपळ थांबून औषधोपचार वेळेवर होत असले तरी त्यांच्या मनाला उसंत नव्हती. ठिकठिकाणांहून आलेलीं पत्रें वाचून घेऊन त्यांना उत्तरें पाठविणें व नागपुरांतून येणाऱ्या स्वयंसेवकांजवळ कार्यासंबंधीं बोलत बसणें हें सुरूच होतें. जवळजवळ दोन-तीन महिने त्यांचें वास्तव्य श्री. वैद्य यांच्या बंगल्यावर होतें व इतके दिवस अनेक कार्यकर्ते तेथवर येऊन ज्या गोष्टी प्रत्येक दिवशीं चालत त्या पाहून अनेकांना आश्चर्यच वाटे. केवळ डॉक्टरांना भेटावें व त्यांच्याजवळून चार शब्द ऐकावयास मिळावेत, या इच्छेनें इतक्या दूरवर स्वयंसेवक येतात ही गोष्ट त्या काळांत तरी विशेषच होती. पण डॉक्टरांचा सहवास हा इतका आकृष्ट करणारा असे यांत शंका नाहीं.

या बंगल्यांत तेव्हां किती गप्पागोष्टी चालत, हें ध्यानांत आणून देणारा एक प्रसंग देणें या ठिकाणीं युक्त दिसेल. एके दिवशीं रात्रीं जरा उशिरानें एक परगांवचा स्वयंसेवक विचारीत विचारीत डॉक्टरांना भेटण्यासाठीं तेथें आला व त्यानें बाहेरूनच ' येथें डॉक्टर आहेत काय ? ' असें विचारलें. वैद्यांच्या बंगल्याच्या दारावरील माणसाला वाटलें कीं, कोणीतरी रोगी अत्यवस्थ झाला असेल म्हणून हा मनुष्य इतक्या रात्रीं आला असावा; तेव्हां त्यानें उत्तर दिलें, " इथें एक डॉक्टर आहेत. पण ते औषध देणारे नसून लोकांना गोष्टी सांगणारे डॉक्टर आहेत ! " किती अचूक नि अपूर्व होतें हें वर्णन !

अशी विश्रांति चालू असतांनाच त्यांचें मन प्रगतीकडे कसें झेपावत होतें हें पाहण्यासारखें आहे. दि. १५ ऑगस्टच्या एका पत्रांत ते सहज लिहून जातात कीं, " ......संघाचें कार्य हें दिरंगाईनें करण्याचें कार्य नसून आपला अखिल महाराष्ट्र आपल्याला शक्य तितक्या लवकर संघटित करून व हा महाराष्ट्राचा नमुना इतर प्रांतांपुढें ठेवून पांच-दहा वर्षांत सबंध हिंदुस्थान संघटित करावयाचें आहे......" डॉक्टरांच्या मनाची अशी उभारी होती. त्याच वेळीं त्यांना अडथळे करणारे डोंगरहि रचले जात होते. संघाच्या वाढत्या कामानें ' हिंदूंचा हिंदुस्थान ' हा मंत्र जनमनाची पकड घेत होता व संघाच्या या मंत्राची मोहिनी कॉंग्रेस संस्थेतील अनेक कार्यकर्त्यांवरहि पडत चालली होती. ही गोष्ट अर्थातच

त्या संस्थेच्या अग्रणींना अस्वस्थ करणारी वाटली तर त्यांत नवल नव्हतें. त्यांनीं १९३४ च्या जूनमध्ये कॉंग्रेस सभासदांना, महासभा, लीग व रा. स्व. संघ अशा अन्य स्वयंसेवकसंस्थांत प्रवेश करण्यास प्रतिबंध केला. त्यानीं इंग्रजांकडून घेतलेलें ' हिंदी ' राष्ट्रीयत्वाचें बाळकडू हे त्यांना अशा आत्मघातकी व अवास्तव गोष्टी करण्याला अखंड प्रेरणा देत आलें आहे. ' हिंदु ' शब्द उच्चारल्याबरोबर त्यांच्या कपाळावर तिरस्कारदर्शक आठ्या उमटतात नि हिंदुत्व म्हणजे कूपमंडूकत्व असा भाव प्रकट होतो. त्यातूनच भविष्यकाळाकडे जाणाऱ्या मार्गावर झगझगीत प्रकाश टाकणाऱ्या इतिहासाकडे पाठ फिरविणे वा निर्बुद्धपणानें युगकर्त्या शिवाजी-महाराजाना ' वाट चुकलेले ' म्हणणे ही गोष्ट ते लीलया करून जातात ! अठरा धान्याच्या कडबोळ्याप्रमाणे कांही अलौकिक असे नवीन राष्ट्र निर्माण करण्याची त्याची भाषा असते व हे नवे राष्ट्रनिर्माते त्यासाठीं ' कोरा चेक ' म्हणजे कटीची लंगोटीहि सोडून देण्यामध्ये धन्यता मानतात ! जे पेरावे तेंच उगवते, हे त्रिकाला-बाधित सत्य आहे. हे ध्यानी घेता इग्रजानीं विकृत राष्ट्रीयत्वाचे पेरलेले बियाणे अशा असंख्य विकृत शाखोपशाखांनी भरारले असल्यास नवल काय ?

कॉंग्रेसकडून असा प्रतिबंध घातला गेला, याचे डॉक्टरांना आश्चर्य वाटले नाही. कारण असे काहीं शिजत आहे, याची कुणकुण त्याना पूर्वींच लागली होती. या वेळी एक गोष्ट सागणे आवश्यक आहे. ती अशी की, कॉंग्रेसने आपल्या सदस्याना अन्य संघटनात जाण्यास मज्जाव केला असला तरी त्यानें चिडून जाऊन आपणहि त्याना आपलीं दारे बंद केल्याचें घोषित करण्याचा विचार डॉक्टराना शिवला नाही. आपल्या हिंदु समाजात पारतंत्र्याच्या कुजट वातावरणांत आपल्या उज्ज्वल परंपरेला विसरून, काहीं जण परानुकरण करूं लागले आहेत व त्यातच त्याना कृतकृत्यता वाटत आहे, हे डॉक्टर अखंड पाहत आलेले होते. अशा आत्मविस्मृत लोकांचे आत्मघातकी चाळे पाहून डॉक्टरांना अत्यंत दुःख होई. पण त्याना उठल्या-सुटल्या दूषणें देऊन व व्यवहारात बाजूला लोटून एका बाजूने संघटनेची भाषा व दुसऱ्या बाजूने विघटनेची कृति, असा प्रकार डॉक्टराच्या हातून घडला नाहीं. कारण त्याच्या मनापुढे जो हिंदुराष्ट्रपुरुष उभा असे, त्या विराट् राष्ट्रपुरुषाचे सर्व हिंदु हे अंगभूत अवयव आहेत, अशी त्यांच्या मनाची ठाम धारणा होती. त्यामुळे हिंदु समाजातील घटक, आज कोणी कसाहि वागत असला तरी, आपण त्याला दूर न लोटता आपल्या संघटनेच्या निर्मल गंगा-प्रवाहात आज नाहीं उद्या, पण समाविष्ट करून घेणे हे आपले कर्तव्य आहे, अशी जाग त्यांच्या मनाला असे आणि त्यातूनच हिंदु समाजापुरती संपूर्ण निर्वैर वृत्ति डॉक्टरांच्या व्यवहारांतून सातत्याने प्रकट झालेली दिसते.

या वर्षी ऑक्टोबरमध्ये संघांत आणखी एक प्रवाह येऊन समाविष्ट झाला. तो म्हणजे संत पाचलेगांवकर महाराज याचे ' मुक्तेश्वर दल '. महाराष्ट्रांत संगमनेर

येथें रथाच्या मिरवणुकीवरून जी दंगल झाली, त्यांतून जागृत झालेल्या हिंदूंना संघटित करण्यासाठीं प्रथमतः हें दल १९२३-२४ मध्यें निघालें व पुढें यवतमाळ, खामगांव, वाशीम, जुन्नर, सिन्नर व नगर वगैरे भागांत त्याच्या पंचवीस-तीस शाखा वाढल्या. मुसलमानांच्या प्रत्यक्ष दंगलींचा तो काळ होता व त्या वेळीं हिंदूंना सावध करण्यासाठीं जी कांहीं मंडळी खटपट करीत होती, त्यांत श्री पाचलेगांवकर यांचा अवश्य उल्लेख करावा लागेल. त्यांचा त्या काळांत महाराष्ट्रांत सदैव संचार सुरू असे. त्यामुळें त्यांनीं स्वतःला घेतलेलें ' नरसिंह संचारेश्वर ' हें अभिधान सार्थ वाटे ! त्यांचें वक्तृत्व अत्यंत वेगवान् व आवेशपूर्ण असे व सर्वसामान्य जनतेला आकृष्ट करून घेणारे त्यांचे विस्तवावरून चालण्याचे व सर्प चाववून घेण्याचे प्रयोग हेहि सर्वत्र सुरू असत.

१९३१ मध्यें श्री. बाबाराव सावरकर यांनीं आपली तरुण हिंदुसभा संघांत विलीन करून टाकल्याचा वृत्तान्त आपण मागें पाहिलाच आहे. हिंदूंच्या संघटनेचे प्रयत्न एकमुखी असावेत, हीच त्यामागील प्रमुख कल्पना होती. त्याच कल्पनेनें श्री. बाबाराव सावरकर व श्री. बाबासाहेब चितळे या दोघांनीं श्री पाचलेगांवकर यांच्याजवळ बोलणें करून हें विलीनीकरण घडविलें होतें. ही घटना १९३४ च्या मे महिन्यांतील असली तरी प्रत्यक्ष ती कृतींत येण्यास ऑक्टोबर-नोव्हेंबर उजाडला होता.

या वर्षांत संघाचा प्रभाव कांहीं भागांत चांगलाच जाणवूं लागला व त्याच्या वार्ता अशाच तऱ्हेनें कॉंग्रेसची संघटना उभारणाऱ्या डॉ. ना. सु. हर्डीकर यांच्या कानांवर जाणें स्वाभाविक होतें. डॉ. हर्डीकर यांनीं १९२३ च्या कोकोनाडा कॉंग्रेसपासून ' हिंदुस्तानी सेवादल ' चालविलें होतें. त्यांना संघाच्या या प्रगतीचें मर्म समजून घेण्याची इच्छा झाली व त्यांनीं दि. १० डिसेंबरला त्या आशयाचें पत्र प. पू. डॉक्टरांना पाठविलें. तें पत्र उपलब्ध नसलें तरी त्यांना डॉक्टरांनीं पाठविलेल्या उत्तराची प्रत मात्र कागदपत्रांत आहे. डॉक्टर लिहितात, " ......आपलें दि. १०।१२।३४ चें पत्र आतांच माझे हातीं आलें व पत्र वाचून अत्यंत आनंद झाला. आपण स्वतः इकडे येऊन राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचें बारकाईनें निरीक्षण करूं इच्छितां, ही गोष्ट आम्हांला खरोखरच समाधानकारक वाटते. अकोला परिषदेनंतर मी स्वतः नागपूरला राहणार नसल्यामुळें अकोला परिषदेच्या पूर्वींच आपण संघ पहाण्याच्या व समजून घेण्याच्या दृष्टीनें नागपूरला येणें इष्ट व आवश्यक आहे. परमेश्वरी योगायोगानें याच वेळीं आपल्या संघाचे जिल्हानिहाय कॅम्प्स् होत असल्यामुळें आपल्याला अनायासेंच हे कॅम्प्स् पहाण्याची संधि मिळणार आहे. "

प. पू. डॉक्टरांनीं डॉ. हर्डीकर यांना अकोला अधिवेशनापूर्वीं आग्रहानें बोलाविलें होतें. पण त्याच वेळीं त्यांना कांहीं फुफ्फुसाचा विकार जडल्यानें ते

येऊं शकले नाहींत. दि. १८।१।३५ ला लिहिलेल्या पत्रांत ते लिहितात, " मी नागपूरला येऊं शकलो नाहीं. कारण मला फुफ्फुसाचा विकार जडला आहे. मात्र शक्य तितक्या लवकर मी नागपूरला येईन. " याच पत्राच्या शेवटीं त्यानीं ' नागपूरमध्यें राहावयास येणाऱ्या श्री. पै या तरुणाला संघाचे शिक्षण द्याल ना?' अशीहि विचारणा केलेली दिसते. प्रकृतीमुळें डॉ. हर्डीकर याना त्या काळांत नागपूरला जातां आलें नाहीं. मात्र त्यांनीं त्या वेळीं मुबईला असलेले संघप्रचारक श्री. गोपाळराव येरकुटवार यांच्याबरोबर दोन दिवस राहून तेथील संघकार्याचे जवळून परीक्षण केलें होतें.

डॉक्टरांनीं वरील पत्रात उल्लेख केलेलीं संघाचीं शिबिरे हीं नाताळच्या सुट्टींत घेण्याची पद्धत असे व तीच पद्धति जवळ जवळ अजूनहि चालू आहे. १९३४ मधील डिसेंबरांत वर्धा येथें झालेले शिबिर हे म. गाधींच्या भेटीमुळे चागलेंच गाजलें. त्या शिबिराची माडणी वर्ध्याहून शेगावकडे म्हणजे हल्लींच्या सेवाग्रामकडे जाणाऱ्या रस्त्याच्या उजव्या अंगाला शेठ जमनालालजी बजाज याची एक मोकळी जागा होती त्यावर केलेली होती. असे सैनिकी पद्धतीचे संघाचे तळ म्हणजे सामूहिक परिश्रम व शिस्त याच्या विकासाचें केंद्र असते. शेकडो ठिकाणचे स्वयंसेवक स्वतःच्या खर्चानें आपला गणवेष व अंथरूण-पाघरूण घेऊन एकत्रित येतात व ते उत्साहानें तीन-चार दिवस एकत्रित राहून, सैनिकाप्रमाणें अत्यंत काटेकोरपणाने संचलनाचे कार्यक्रम करतात. यासाठी लागणारा खर्च हा स्वयंसेवकांनीं दिलेल्या शुल्कांतून व धान्यातून होत असतो. अशा या छावण्या स्वयंपूर्ण असतात. १९३४ च्या डिसेंबरमधील सघाचे वर्ध्याचे शिबिर १५०० स्वयंसेवकांचे होतें व त्याच्या उभारणीसाठीं स्वयंसेवकाची पधरा-वीस दिवस त्या जागीं सारखी ये-जा सुरू होती.

या जागेजवळच महात्मा गाधींचा त्या काळात सत्याग्रहाश्रम होता व त्यांचें वास्तव्य त्याच ठिकाणीं एका दुमजली आटोपशीर बंगल्यांत असे. त्या शिबिराच्या उभारणीचें दिवसेंदिवस प्रगत होणारें काम ते सकाळीं फिरून परतताना पाहत असत व येथे कोणती परिषद होणार आहे व केव्हांपासून, अशी कुतूहलाने त्यांनीं चौकशीहि केली होती. दि. २२ ला शिबिर सुरू झालें. त्या वेळच्या उद्घाटन-समारंभाला नेहमींप्रमाणे वर्ध्यातील प्रतिष्ठित मंडळींना निमंत्रण दिलेलें होतें. अर्थात् शेजारींच असलेल्या महात्माजींना व आश्रमीय मंडळींना निमंत्रण होतें, हे सागावयास नकोच.

शिबिरांतील शेंकडों गणवेषधारी स्वयंसेवकांचे कार्यक्रम सुरू झाले व संघाचा घोषहि गर्जू लागला. महात्माजींना तें दृश्य बंगल्यांतून सहज दिसत होतें. त्यानें ते प्रभावित झाले व त्यांनीं श्री. महादेवभाई देसाई यांच्याजवळ शिबिर पाहण्यास जाण्याची इच्छा प्रदर्शित केली. तेव्हां महादेवभाईनीं वर्धा जिल्ह्याचे संघचालक

श्री. आप्पाजी जोशी यांना चिठ्ठी पाठविली कीं, " आपली छावणी आश्रमासमोर सुरू असल्यानें स्वाभाविकपणेंच महात्माजींचें लक्ष तिकडे वेधलें. ती पाहण्याची त्यांची इच्छा आहे. तरी कृपा करून आपणांला कोणती वेळ सोयीची आहे तें कळवावें. ते फारच कार्यमग्न आहेत. तरीहि ते वेळांत वेळ काढतील. तरी आपण येऊन वेळ ठरवून टाकलीत तर सोयीचें होईल. " या पत्रानंतर श्री. आप्पाजी आश्रमांत गेले व " आपणांस सोयीची वेळ सांगा, म्हणजे त्या वेळीं आम्ही आपलें हार्दिक स्वागत करूं, " असे ते म्हणाले. पण महात्माजींचें त्या दिवशीं मौन असल्यानें त्यांनीं लिहून दाखविलें कीं, " मी उद्यां दि. २५ ला सकाळीं ६ वाजतां छावणीला भेट देऊं शकेन. तेथें मला दीड तास राहतां येईल. " यावर श्री. आप्पाजींनीं " वेळ आम्हाला मान्य आहे, " असा होकार देऊन निरोप घेतला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं महात्माजी ठीक ६ वाजतां शिबिरांत आले. त्या वेळीं त्यांना सर्व स्वयंसेवकांनीं मोठ्या शिस्तीनें मानवंदना दिली. त्यांच्याबरोबर श्री. महादेवभाई देसाई, मीराबेन व इतर आश्रमीय मंडळी होती. तें भव्य दृश्य पाहून महात्माजींनीं आप्पाजींच्या खांद्यावर हात टाकून म्हटलें कीं, " मी खरोखरच प्रसन्न झालों आहें. उभ्या देशांत असें प्रभावी दृश्य अद्याप मीं पाहिलेलें नाहीं. " त्यानंतर त्यांनीं शिबिरांतील स्वयंपाकघराची पाहणी केली व पंधराशें जणांचें जेवण एका तासांत बिनबोभाट उरकतें, एक रुपया व थोडें धान्य घेऊन सर्वांना नऊ जेवणें दिलीं जातात, तसेंच येणारी तूट स्वयंसेवक भरून काढतात, इत्यादि माहिती ऐकून त्यांनीं आश्चर्य व्यक्त केलें.

त्यानंतर त्यांनीं रुग्णालय व स्वयंसेवकांच्या राहण्याच्या छपऱ्या यांचीहि पाहणी केली. रुग्णालयांत समाचार घेतांना खेडूत व मजूर वर्गांतील स्वयंसेवकहि संघांत असल्याचें त्यांच्या ध्यानीं आलें. राहण्याच्या तट्टयांच्या छपऱ्यांत ब्राह्मण, महार, मराठा असे सर्व स्वयंसेवक सरमिसळ राहतात आणि पंक्तींत एकत्रच भोजनास बसतात, हें ऐकून त्यांनीं तें पडताळून पाहण्यासाठीं कांहीं स्वयंसेवकांना चांचणीसाठीं प्रश्नहि विचारून पाहिले. तेव्हां " हा महार, हा ब्राह्मण, हा मराठा, हा शिंपी असले भेदाभेद आम्ही संघांत मानीत नाहीं; आपल्या शेजारीं कोणत्या जातीचा स्वयंसेवक आहे याची आम्हांस दादहि नसते; नव्हे तशी माहिती करून घेण्याची आम्हांस इच्छाहि होत नाहीं; आम्ही सर्व जण हिंदु आहोंत आणि म्हणून बंधु आहोंत; तेव्हां एकमेकांना व्यवहारांत उच्चनीच लेखण्याची आम्हांला कल्पनाच शिवत नाहीं, " अशा आशयाचे विचार त्यांना स्वयंसेवकांच्या उत्तरांत ऐकावयास मिळाले.

त्यावर महात्माजींनीं आप्पाजींना प्रश्न केला कीं, " तुम्हीं जातिभेदाची भावना कशी विसरावयास लावलीत ? यासाठीं आम्ही व इतर कांहीं संस्था

अविरत खटपट करीत आहोंत, पण लोक ते भेदभाव विसरत नाहींत. अस्पृश्यता नष्ट करणे किती अवघड आहे, हें आपण जाणतांच. असे असता या सघटनेच्या कक्षेत तरी तुम्ही ही अवघड गोष्ट कशी साधूं शकलात ? "

त्यावर उत्तर मिळालें की, " सर्व हिंदूंमध्ये भावाभावाचे नाते आहे, हा भाव जागृत करून सर्व भेदाभेद नष्ट झाले. भावाभावाचे नाते बोलून नव्हे, तर आचरल्याने ही किमया घडली. याचें सर्व श्रेय डॉ. हेडगेवार यांना आहे ! " इतके बोलणे झाल्यावर घोष-वादन सुरू होऊन सर्व स्वयंसेवक 'दक्ष' ( Attention ) मध्ये ताठ उभे राहिले व ध्वज वर चढू लागला. ध्वजारोपण पूर्ण झाल्यावर आप्पाजींबरोबरच महात्माजींनी भगव्या ध्वजाला संघाच्या पद्धतीने प्रणाम केला.

ध्वजप्रणामानंतर महात्माजी शिबिरात असलेल्या संघ वस्तु-भांडाराच्या जागीं गेले. त्या भाडाराच्या एका बाजूला म्हणी, छायाचित्रे, घोष-वाद्यें व आयुधें वगैरेंचे एक लहानसें प्रदर्शनच ठेवलेले होते. त्याच्या मध्यावर लक्ष वेधून घेणारें एक छायाचित्र आरास करून मांडलेलें होते. तें महात्माजींच्या पाहण्यांत आले व त्यांनीं तें नीट निरखून 'हे कोणाचें ?' अशी पृच्छा केली.

" हेच पूजनीय डॉ. केशवराव हेडगेवार ! "—आप्पाजी.

" अस्पृश्यता नष्ट करण्याच्या संबंधात आपण ज्याचा उल्लेख केलात ते डॉक्टर हेडगेवार हेंच काय ? याचा संघाशीं काय संबंध ? "—महात्माजी.

" हे सघाचे प्रमुख आहेत. याना आम्ही सरसंघचालक म्हणतो. यांच्या नेतृत्वाखालीं संघाचें सर्व काम चाललेलें असते. यानीं तर हा संघ सुरू केला. " —आप्पाजी.

" डॉ. हेडगेवार यांची भेट होऊं शकेल काय ? तशी भेट झाल्यास प्रत्यक्ष त्यांच्याकडूनच या संघटनेची माहिती करून घेण्याचा विचार आहे. "—महात्माजी.

" उद्यां या शिबिराला डॉ. हेडगेवार भेट देणार आहेत. आपली इच्छा असेल तर ते आपणास भेटतील. "

याप्रमाणे संवाद झाल्यानंतर महात्माजी आश्रमांत परत गेले. जातां जातां " हे काम केवळ हिंदूंपुरतेंच आहे; त्यांत सर्वांना मोकळीक असती तर अधिक बरें झाले असते, " असें अभिमत व्यक्त करण्यास ते विसरले नाहींत. अर्थात् त्यावर थोडी चर्चा झाली. तेव्हां त्यांनीं " इतरांचा द्वेष न करतां केवळ हिंदु-संघटन करणे हे राष्ट्रविघातक नाहीं, " ही गोष्ट मान्य केली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं प. पू. डॉक्टरांचें वर्ध्याला आगमन झालें. त्या वेळीं वर्धा स्थानकावर त्यांना सैनिकी पद्धतीनें मानवंदना देण्यांत आली व त्यानंतर सर्व स्वयंसेवक संचलन करीत शिबिरांत परत आले. डॉक्टर शिबिरांत पोहोंचल्यावर थोड्याच वेळानें स्वामी आनंदजी हे डॉक्टरांना भेटीचें निमंत्रण

देण्यासाठीं महात्माजींकडून येऊन गेले व त्यांनीं रात्रौ ८॥ ची वेळ निश्चित केली. त्या दिवशीं सायंकाळीं पुण्याचे धर्मवीर श्री. ल. ब. तथा अण्णासाहेब भोपटकर यांच्या अध्यक्षतेखालीं छावणीचा समारोप-समारंभ थाटामाटानें पार पडल्यावर प. पू. डॉक्टर, श्री. अण्णासाहेब भोपटकर व श्री. आप्पाजी जोशी आदि मंडळी महात्माजींना भेटण्यासाठीं आश्रमांत गेली. तेथें दुसऱ्या मजल्या-वरील खोलींत महात्माजींची बैठक असे. श्री. महादेवभाई देसाई यांनीं प्रवेश-द्वाराजवळ या सर्वांचें स्वागत केलें व त्यांना वरील बैठकीच्या जागीं नेलें. तेथें महात्माजींनींहि पुढें होऊन या सर्वांना आंत नेलें व गादीवर आपल्या शेजारीं बसविलें. यानंतर जवळजवळ तासभर डॉक्टर व महात्माजी यांमध्यें चर्चा चालू होती. श्री. अण्णासाहेब भोपटकर यांनींहि त्या चर्चेत थोडासा भाग घेतला होता. या वेळीं जें संभाषण झालें त्यांतील कांहीं ठळक भाग हा अत्यंत महत्त्वाचा असल्यानें पुढें देत आहें.

महात्माजी : काल मी छावणींत येऊन गेल्याचें कळलेंच असेल.

डॉक्टर : हो तर, आपण भेट दिलीत हें स्वयंसेवकांचें भाग्यच म्हणावयाचें ! मी त्या वेळीं नव्हतों याचें वाईट वाटतें. आपण भेट देण्याचें एकाएकीं ठरविलेलें दिसतें. मला जर याची आधीं कल्पना असती तर मीं त्या वेळीं येण्याचा निश्चित प्रयत्न केला असता.

महात्माजी : आपण नव्हतां तें एका दृष्टीनें बरें झालें. कारण आपल्या अनुप-स्थितीमुळें मला आपल्याविषयीं खरी माहिती मिळाली. डॉक्टर ! आपल्या कँपमधील संख्या, शिस्त, स्वयंसेवकांची वृत्ति व स्वच्छता वगैरे अनेक गोष्टी पाहून मला फारच समाधान झालें. सर्वांत मला आपला बँड फारच आवडला !

इतक्या प्रास्ताविकानंतर महात्माजींनीं " संघाला दोन-तीन आण्यांत जेवणें देणें कसें परवडतें व आम्हांला अधिक खर्च कां येतो; सामान पाठीवर घेऊन आपण कधीं स्वयंसेवकांना वीस मैल संचलन करीत नेलें आहे काय ? " वगैरे प्रश्न विचारले. या वेळीं महात्माजींशीं जिव्हाळ्याचे व सलगीचे संबंध असल्यानें श्री. अण्णासाहेब भोपटकर यांनीं, डॉक्टरांनीं पहिल्या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वींच थट्टेंत सांगितलें कीं, " तुम्हांला अधिक खर्च येतो तो तुम्ही सर्व मंडळी एकंदर ज्या पद्धतीनें वागतां त्यामुळें ! नांव देतां ' पर्णकुटी ', पण आंत असतो आपला राजेशाही थाट ! मी आतांच संघांत सर्वांबरोबर तूप-पोळी खाऊन आलों. तुमच्याप्रमाणें यांच्यांत Discrimination नाहीं. संघाच्या तत्त्वाप्रमाणें वागाल तर तुम्हांलाहि दोन-तीन आणेच खर्च येईल. त्याला डॉक्टर कशाला हवेत ? तुम्हांला थाट पाहिजे व खर्चहि कमी पाहिजे. या दोन्ही गोष्टी एकदम

कशा जमणार ? ” अर्थात् महात्माजी व अण्णासाहेब याच्यांतील ही खेळीमेळीची लटकी थट्टा सर्वांच्या मनमोकळ्या हास्यात तेव्हांच विरून गेली.

त्यानंतर महात्माजींनीं संघाची घटना, वृत्तपत्रीय प्रचार वगैरेंविषयीं माहिती विचारण्यास सुरुवात केली, तोंच मीराबेननें पुढे येऊन म. गाधींना घड्याळ दाखविले व ९ वाजले असल्याचा संकेत केला. तेव्हां “ आपली निजावयाची वेळ झालेली दिसते ? ” असे म्हणत डॉक्टर निरोप घेऊ लागले. त्यावर “ छे ! छे ! आपण आणखी थोडा वेळ बसूं शकतो ! आणखी अर्धा तास मी सहज जागा राहीन, ” असे म्हणत महात्माजीनी चर्चा सुरू ठेवली.

महात्माजी : डॉक्टर ! आपली संघटना चांगली आहे. मला असे समजलें आहे कीं, आपण दीर्घ काळपर्यंत कॉग्रेसचे कार्य करीत होतां. मग कॉग्रेससारख्या लोकप्रिय सस्थेच्या छायेखालीच अशी स्वयसेवक सघटना कां चालविली नाहींत ? निष्कारण निराळी संघटना का काढलीत ?

डॉक्टर : मीं प्रथमतः कॉग्रेसमध्येच हे कार्य सुरू केलें होते. १९२० च्या नागपूर कॉग्रेसमध्ये तर मी स्वयसेवक विभागाचा कार्यवाह होतो आणि माझे मित्र डॉ. पराजपे हे अध्यक्ष होते. त्यानंतरहि आम्ही दोघानीं कॉग्रेसमध्यें अशी संघटना असावी म्हणून प्रयत्न केले. पण यश मिळाले नाहीं, तेव्हा हा स्वतत्र प्रयत्न केला.

महात्माजी : कॉग्रेसमधील प्रयत्नाना कां यश आले नाहीं ? पुरेशा पैशाचे पाठबळ मिळाले नाहीं म्हणून ?

डॉक्टर : छे ! छे ! पैशांची अडचण नव्हती. पैशाने अनेक गोष्टी सुकर होत असतील. पण या जगात नुसत्या पैशावर काहीच यशदायी ठरूं शकत नाही ! येथे पैशाचा प्रश्न नसून अन्तःकरणाचा आहे.

महात्माजी : उदात्त अन्तःकरणाची माणसें कॉग्रेसमध्ये नव्हतीं वा नाहीत, असे आपणाला म्हणावयाचे आहे काय ?

डॉक्टर : माझ्या म्हणण्याचा तसा आशय नाही. कॉग्रेसमध्यें अनेक चांगलीं माणसे आहेत. आम्ही स्वतःहि कॉग्रेसमध्ये होतों. पण प्रश्न आहे तो मनोवृत्तीचा आहे. एक विवक्षित राजकीय कार्य सफल करण्याच्या दृष्टीने कॉग्रेसच्या मनोवृत्तीची घडण करण्यात आलेली आहे. त्यावर दृष्टि ठेवूनच कॉग्रेसचे कार्यक्रम आंखण्यात येतात व त्या कार्यक्रमांच्या पूर्ततेसाठीं तिला स्वयसेवक हवे असतात. स्वयंप्रेरणेने कार्य करणाऱ्यांच्या बलशाली संघटनेकडून राष्ट्रापुढील सर्व समस्या सुटूं शकतील, यावर कॉग्रेसचा विश्वास नाहीं. सभा-परिषदातून खुर्च्या-टेबले उचलण्यासारखी कामें पैहि न घेतां करणारे मजूर म्हणजे स्वयंसेवक, अशी कॉग्रेसमधील लोकाची धारणा

आहे. अशा धारणेंतून राष्ट्राची सर्वांगीण उन्नति करणारे स्वयंस्फूर्त कार्यकर्ते कसे उत्पन्न होणार ? त्यामुळें कॉंग्रेसमधील कार्य उभें राहूं शकलें नाहीं.

महात्माजी : मग स्वयंसेवकांसंबंधीं आपली कल्पना काय ?

डॉक्टर : देशाच्या सर्वांगीण विकासासाठीं जो आत्मीयतेनें आपलें सारसर्वस्व अर्पण करण्यास सिद्ध होतो, अशा नेत्याला आम्ही स्वयंसेवक समजतों आणि असे स्वयंसेवक घडविण्यावर संघाचें लक्ष आहे. या संघटनेंत स्वयंसेवक व पुढारी असा भेद नाहीं. आम्ही सर्व जण स्वयंसेवक आहोंत, अशी सदैव जाणीव ठेवून आम्ही परस्परांना समान समजतों व सर्वांवर सारखेंच प्रेम करतों. आम्ही कोणत्याच प्रकारच्या भेदाला थारा देत नाहीं. इतक्या अल्पावधींत, पैशांचें व इतर साधनांचें पाठबळ नसतांहि, संघकार्याचा जो विस्तार होऊं शकला, त्याचें रहस्य यांत आहे.

महात्माजी : छान ! आपल्या कामाच्या यशांत देशाचें हित खरोखरच सामावलेलें आहे. पण खरेंच डॉक्टरजी ! आपल्या संघटनेचा वर्धा जिल्ह्यांत चांगलाच जम बसला आहे असें ऐकतों. मला वाटतें, प्रामुख्यानें शेठ जममालाल बजाज यांच्या सर्व प्रकारच्या साहाय्यावरच हें घडलें असेल !

डॉक्टर : आम्ही कोणापासून आर्थिक साहाय्य घेत नाहीं.

महात्माजी : मग एवढ्या संघटनेचा खर्च कसा भागवितां ?

डॉक्टर : आपल्या खिशांतून गुरुदक्षिणेच्या रूपानें अधिकांत अधिक पैसे देऊन स्वतः स्वयंसेवक हा भार पेलीत असतात.

महात्माजी : खरेंच विलक्षण आहे ! पण आपण कोणाकडूनहि धन स्वीकारणार नाहीं ?

डॉक्टर : जेव्हां समाजाला हें कार्य त्याच्या विकासासाठीं आवश्यक वाटेल, तेव्हां धन अवश्य स्वीकारूं. अशी स्थिति झाल्यावर आम्हीं न मागतांच लोक पैशांच्या राशी आणून संघापुढें ओततील ! असें आर्थिक साहाय्य स्वीकारण्यास आमची आडकाठी नाहीं. पण संघाची पद्धति मात्र आम्हीं स्वावलंबी ठेवली आहे.

महात्माजी : तर मग आपणांला या कार्यासाठीं आयुष्याचा सर्व वेळ लावावा लागत असणार ! मग तुम्हांला आपला डॉक्टरी व्यवसाय करणें कसें जमतें ?

डॉक्टर : मी व्यवसाय करीतच नाहीं.

महात्माजी : मग आपल्या कुटुंबाचा निर्वाह कसा चालतो ?

डॉक्टर : मीं विवाहच केला नाहीं.

महात्माजी या उत्तरानें कांहींसे स्तंभित झालेले दिसले. त्या भरांत ते उद्गारले कीं, " अस्सं ! आपण विवाह केलेला नाहीं ! छान ! यामुळेंच इतक्या अल्प काळांत आपणांस असें यश मिळत आहे ! " यावर " मीं आपला फार वेळ

घेतला, आपले आशीर्वाद असले कीं सर्व मनाजोगें होईल. आतां रजा मागतो" असें म्हणत डॉक्टर जाण्यासाठीं उठले व महात्माजी त्यांना दारापर्यंत पोंचवावयास आले आणि निरोप देतांना म्हणाले कीं, "डॉक्टरजी, आपलें चारित्र्य व कार्यावरील अढळ निष्ठा यांच्या बळावर आपण आपल्या अंगीकृत कार्यांत निश्चित यशस्वी व्हाल !" यावर परमपूजनीय डॉक्टरांनी त्यांना नमस्कार केला व ते निघाले.

* * *

## २३ : धांवपळीचीं दोन वर्षें

परमपूजनीय डॉक्टरांच्या प्रयत्नानें आतां राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या कार्याची चांगलीच प्रगति होऊं लागली होती व ठिकठिकाणीं ‘संघकार्य हें आपलेंच कार्य आहे’ अशी आपुलकी प्रयत्नशील स्वयंसेवकांच्या जीवनांतून स्पष्टपणें उमटलेली दिसे. १९३५ च्या प्रारंभीं महाराष्ट्र व मध्यप्रांत यांतील कामांत नवचैतन्य खेळूं लागून नवीन नवीन ठिकाणीं संघशाखा निघाल्याचीं वृत्तें नागपूरला येऊन धडकत होतीं. याच वाढत्या कामांत संघाच्या दृष्टीनें दृढता आणण्यासाठीं ठिकठिकाणीं वारंवार जाऊन भेटी देण्याचा व नवीन नवीन लोकांवर कार्यभाग सोपवून तो त्यांच्याकडून यशस्वीपणें घडवून आणण्याचा प्रचंड उद्योग डॉक्टरांना करणें आवश्यक होतें. तें कर्तव्य त्यांनीं किती निरलसतेनें व स्वतःला विसरून चालविलें होतें, याची कल्पना त्यांचा त्या काळांतील पत्रव्यवहार एकदम डोळ्यांपुढें आणला कीं आल्यावांचून राहत नाहीं.

त्या वर्षींच्या फेब्रुवारीमध्यें त्यांनीं वऱ्हाडमधील अनेक शाखांना भेटी दिल्या. त्या दौऱ्यावरून परत आल्यावर ते लिहितात कीं, “......वऱ्हाडचा दौरा प्रकृतीला मानवला नाहीं असें दिसतें. कारण तेथून परत आल्यापासून दररोज थोडासा बारीक ताप यावयाला लागला व अशक्तता बरीच वाढली. खोकला मात्र मुळींच नाहीं. तरी पण फुप्फुसाची अशक्तता बरीच जाणवते. त्यामुळें आत्यंतिक इच्छा असूनहि निरुपायानें कानपूरचा दौरा रद्द करावा लागत आहे.” पण इतक्या स्थितींतहि त्यांच्या नागपुरांतील हालचाली सुरूच असत. ते सभांतून जातिनिर्णयाविरुद्ध भाषणेंहि देत, अखंड पत्रव्यवहारहि करीत व नागपुरांत बाहेरून येणारे लोकमान्य टिळकांचे स्नेही श्री. दादासाहेब करंदीकर यांच्यासारख्यांना निरनिराळ्या संघशाखाहि दाखवीत. एवढेंच नव्हे तर वरील पत्रानंतर अवघ्या एक महिन्यानें त्यांनीं महाराष्ट्रांतहि कांहीं शाखांना भेटी देण्याचा अत्यंत दगदगीचा कार्यक्रम पार पाडला, असें दिसतें.

नागपूरप्रमाणेंच या वर्षीं पुणें येथें अधिकारी शिक्षण वर्ग सुरू करण्यांत आला. त्यासाठीं दि. १६ एप्रिलला ते नागपुराहून निघाले व बरोबर एक महिना महाराष्ट्रांत राहून परत आले. एवढ्या अवधींत त्यांचे आठ-दहा दिवस प्रत्यक्ष वर्गांत गेले. उरलेल्या दिवसांत त्यांनीं नाशिक, ठाणें, मुंबई, सांगली वगैरे शाखांना

भेटी दिल्या. वास्तविक या वेळीं ते कोंकणपट्टीतहि जाणार होते; पण प्रकृतीमुळें अगतिक होऊन त्यांना परतावे लागले.

त्या वेळचे डॉक्टरांनीं स्वतःच लिहिलेले वर्णन त्यांच्या सहनशील स्वभावावर प्रकाश टाकणारें असून त्यांच्या लेखनांतील सहजता ध्यानीं आणून देणारे आहे. ते लिहितात की, "......आम्ही सांगलीला येण्याकरितां निघालों. आगगाडींत रात्रौ निजण्याला योग्य अशी भरपूर जागा मिळाली. पण ती जागा मिळविण्याचे धडपडीत माझे कमरेंत एकाएकी उसण भरली. आगगाडींत रात्रभर निजून प्रवास केल्यावरहि ती उसण कमी झाली नाही. सकाळी सांगलीचे स्टेशनवर सघातर्फे स्वागताचा समारंभ ठरला होता. मला तर उठून बसणे किंवा उभे राहणे हेहि अशक्य झाले होते. अशा परिस्थितीत सकाळी ६ वाजता सागली स्टेशनवर गाडी येऊन पोंचली. ज्या सागली सघशाखेची कीर्ति तुमचे कानावर आजपर्यंत येत होती, तीच ही शाखा! स्टेशनवर सुसज्ज गणवेषांत स्वयसेवक प्लॅटफॉर्मवर व्यवस्थित रागेने उभे असून गावातील सभ्य गृहस्थहि बरेचसे स्टेशनवर आले होते. कमरेची कळ सोसून जबरदस्तीने, लोकाना ओळखूं येणार नाहीं अशा स्थितीनें स्टेशनवर उतरून हारतुऱ्यादि स्वागत स्वीकारावे लागले. स्टेशनवरून लगेच संघस्थानी परेडचा कार्यक्रम ठरविला होता. तोहि कार्यक्रम कसाबसा वर लिहिलेल्या पद्धतीनेंच पार पाडून घ्यावा लागला. परतु या परिश्रमाने कमरेंतील दुःखाची तीव्रता अधिकच वाढत जाऊन दुपारपासून उठणें-बसणें पूर्णपणे अशक्य होऊन गेले व सायंकाळचा कार्यक्रम रद्द करावा लागला......

"कमरेच्या दुःखामुळे मी बिछान्यावर पडून असलो तरी अंगात ताप वगैरे मुळीच नसल्यामुळे संघचालक श्री. काशिनाथराव लिमये याचे घरीं स्वयंसेवकाच्या व गांवातील शिष्ट लोकांच्या बैठकी एकसारख्या चालू असून हा माझा आजार सांगलीकराच्या पथ्यावरच पडला. यामुळेच माझा सागलीला पाच-सात दिवस मुक्काम होऊ शकला. याबद्दल सांगलीकराना आनंद होत असून, माझ्या या आजाराला 'बोलका आजार' हे नाव मिळाले आहे!......"

या सांगलीच्या बोलक्या आजारांत त्यांनीं तेथील महाविद्यालयांतील दुसऱ्या वर्षीच्या (इंटरच्या) स्वयंसेवकाची एक बैठक घेतली होती. त्यांत स्वयंसेवकाच्या आयुष्यात आनंदपर घटना घडली तर त्या आनदाचे पर्यवसान संघाच्या वृद्धीत झाले पाहिजे, असा विचार त्यांनीं माडला होता. त्यानंतर त्यांनीं स्वयंसेवकांना प्रश्न केला कीं, "तुम्ही उत्तीर्ण झाल्यावर संघाला कोण कोण व काय देणार?" त्याच्या या प्रश्नाला प्रत्येकाने कांही रुपयाचा आकडा सांगून उत्तर दिलें. तेव्हां डॉक्टर हंसत म्हणाले कीं, "आनंदाप्रीत्यर्थ संघाला काय काय देण्याचे आश्वासन दिलेले आहे ते लक्षांत ठेवा. पण नापास झालात तर मात्र दंड द्यावा लागेल!"

अशा खोचदार बोलण्यानें त्यांच्या बैठकांची स्मृति अनेक जणांच्या मनांत गुंजारव करतांना दिसते.

उसण भरल्यामुळें सांगलीला प्रारंभीं ठरलेलें भाषण होऊं शकलें नाहीं. पण तेथून निघण्यापूर्वीं दि. २ मे या दिवशीं तो योग जुळून आला. त्या भाषणांत डॉक्टरांनीं संघाच्या १७५ शाखा चालू असल्याची माहिती दिली होती. तसेंच हिंदु समाजाची असंघटित स्थिति देशाला कसकशी मारक ठरत आहे, याचें सडेतोड विवेचन करून त्या वेळीं राजकीय वातावरणांत ऐकूं येणाऱ्या 'सत्य नि अहिंसा' या तत्त्वांचें खरें रक्षण कशानें होईल, याची कल्पना त्यांनीं मांडली होती. ते म्हणाले कीं, "...... आत्मसंरक्षण प्रत्येकानें केलेंच पाहिजे. दुसऱ्याची हिंसा न करणें हें तर उत्तमच; परंतु तेवढ्यासाठीं मात्र आत्मनाश करून घेणें इष्ट नाहीं. या तत्त्वानें हिंदु समाजाचें फार नुकसान होणार आहे तें आपण टाळलें पाहिजे. हिंदुस्थानांत पूर्वीं सर्व हिंदूच होते, परंतु आतां केवळ पंचवीस कोटि हिंदु राहिले असून बाकीचे दहा कोटी लोक परधर्मीय झाले आहेत! या लोकांचे रक्तबिंदु तपासून घेतले तर ते आपणांस बव्हंशीं हिंदूच असल्याचें आढळून येईल. यावरून आपल्या समाजाचा ऱ्हास कसकसा होत गेला, याची आपणांस कल्पना येईल. आपल्या समाजाकडे आपण अनास्थेनें न पाहतां बलसंवर्धन केल्यास सर्व जगाला आपण भारी होऊं व आपल्या मनगटांत जोर आल्यानंतर जगाच्या अंतःकरणांत व आचरणांत 'सत्य' व 'अहिंसा' हीं तत्त्वें बिंबविण्यास कितीसा वेळ लागेल?"

बलहीन व विसंघटित राहून केवळ 'सत्य नि अहिंसा' अशा अत्यंत उच्च तत्त्वांचा नुसता उद्घोष करीत राहिलों तर आत्मनाश अटळ आहे, याची जाणीव वरील शब्दांत डॉक्टर सदैव देत होते. पण त्या वेळच्या त्या उदात्त तत्त्वांच्या शाब्दिक कल्लोळांत डॉक्टरांच्या उद्गारांकडे समाजानें पुरेसें लक्ष दिलें नाहीं, हें सत्य मान्य करावेंच लागेल. गस्त घालणाऱ्या जागल्यानें कंठ फुटेतों ओरडून व निद्रितांचीं दारें आपल्या वज्रमुष्टीनें ठोठावून 'हुश्शार'च्या ललकारीनें जनतेला जागृत करण्याचें कर्तव्य दक्षतेनें पार पाडलें होतें. पण इतकें करूनहि जर जनतेच्या डोळ्यांवरील झोंप उडाली नसेल व त्यांतील कांहीं घरांवर लुटारूंनीं डल्ला मारून पोबारा केला असेल तर दोष कोणाचा?

याच सांगलीच्या कार्यक्रमाच्या दिवशीं प. पू. डॉक्टरांनीं संघाचा गणवेष चढविलेला असतांना छायाचित्र काढण्यांत आलें. त्यासाठीं श्री. काशिनाथपंत लिमये यांना हट्ट धरावा लागला होता व या छायाचित्राची कांच (निगेटिव्ह) फोडून टाकीन व काढलेली प्रत प्रसारित करणार नाहीं, अशीं आश्वासनेंहि द्यावीं लागलीं होतीं. पण त्यांतूनच प. पू. डॉक्टरांचें एक गणवेषांतील छायाचित्र निघूं शकलें!

महाराष्ट्रांतून परततांना प. पू. डॉक्टरानीं चांदूर येथे श्री मसूरकरमहाराज यांची भेट घेतली होती. हिंदु समाजांत बल व आत्मविश्वास यांचें रसरशीत प्रकटीकरण व्हावें, अशी आंतरिक तळमळ असलेल्या त्या दोघाच्या भेटींत तात्कालिक चिंताजनक देशपरिस्थितीसंबंधीं विचारविनिमय झाला असेल हें सागावयास नकोच. हिंदुत्वाच्या जागृतीसाठीं ज्या ज्या व्यक्ति वा संघटना आपापल्या कल्पनेने कार्य करीत असतील, त्या सर्वाच्या प्रयत्नात सहकार्य राहवे व त्यातून ते सर्व प्रवाह पुढें एकरूप व्हावेत, याच कल्पनेतून डॉक्टर अशा अनेकाना भेटत असत. चांदूरनंतर त्यांनीं अकोला येथील शिक्षणवर्गास भेट दिली. तेथील वर्गाचे नेतृत्व श्रीगुरुजी यांजकडे डॉक्टरांनी सोपविलें होते. गुरुजीनी तेथील वर्गात आपल्या दक्षतापूर्ण व्यवहाराने संस्काराच्या दृष्टीने अत्यंत प्रभावी असे वातावरण निर्माण केलेलें पाहून डॉक्टराना मनस्वी आनद झाला. हा वर्ग सुरू झाल्यावरच गुरुजीच्या परीक्षेचा समाधानकारक निर्णय लागून ते एल्‌एल्. बी. ची पहिली परीक्षा उत्तीर्ण झाले होते. स्वाभाविकच डॉक्टरांची गुरुजींसंबंधींची आशा वृद्धिंगत झाली असल्यास नवल नव्हते. नागपूरच्या कामात यापुढे कुशाग्र बुद्धीचा निरलस कार्यकर्ता लाभणार, या सुखद जाणिवेंत मात्र एक गोष्ट डॉक्टराना खटकत होती ती म्हणजे गुरुजींच्या वैराग्याची !

श्रीगुरुजी याचे नागपूरला वास्तव्य झाल्यापासून त्याचे तेथील श्रीरामकृष्ण आश्रमांत नेहमीं होणारें जाणें-येणें हें लपण्यासारखें नव्हतें. तसेच त्याचे चालणारें अध्यात्मिक ग्रंथाचें वाचन आणि ध्यानधारणा याची कल्पना डॉक्टराना आलेली होती. अशा स्थितींत एखाद्या वेळीं अशी व्यक्ति विरागी बनून "सुहृदा मज सदन कशाला। सामावुं शके का मजला, ते कदा। बघ पाखे वर आकाश। हिरवळ ही शय्या खास, मज असे।" असे म्हणत हिमालयाच्या एकान्ताकडे वळणार नाहीं कशावरून?—अशी शका डॉक्टराच्या मनात डोकावे. त्याना वैराग्याचे वावडें नव्हते. कारण डॉक्टराचे स्वतःचे जीवन म्हणजेच मुळी चालते-बोलतें वैराग्य होतें ! पण समाजापासून दूर जाऊन केवळ आत्मसुखसागरात निमग्न राहणारें वैराग्याचे जे एक रूप असतें, तें डॉक्टराना रुचणारे नव्हते. देशकालपरिस्थितीचा विचार करतां, त्याना त्याच्याप्रमाणें समाजांत राहून, कमलपत्रावरील जलबिंदूप्रमाणे पाण्यात असून नसल्याप्रमाणें प्रकट होणारे चालतें बोलतें कर्मयोगी वैराग्य हवे होते. कटीवर हात ठेवून विटेवर उभ्या असणाऱ्या विठ्ठलाला श्रीसमर्थांप्रमाणे त्यांनीं नमस्कार करता करता अवश्य विचारले असतें की—

"येथें उभा कां श्रीरामा।
मनमोहन मेघश्यामा ?॥
धनुष्यबाण काय केले ?।
कर कटावरी ठेविले॥"

असा देशकालपरिस्थितीचा विचार करूनच कर्तव्याकर्तव्यतेचा निर्णय हा करावा लागत असतो. त्यामुळेंच लोकमान्य टिळक यांनीं एकदां असे खणखणीत उद्गार काढले होते कीं, आपले हजारों देशबांधव विपन्नावस्थेंत असतांना जे नाक धरून घरांत बसतात ते ढोंगी आहेत. " ( सूक्तिसंग्रह, पान ९३ ) नि याच दृष्टीनें डॉक्टरांना श्रीगुरुजींची वृत्ति वनवासी न होतां जनवासी व्हावी, असें सारखें वाटत होतें.

डॉक्टर अकोल्याहून नागपूरला परत आल्यावर दि. २४ मेला मध्य-प्रांताच्या सचिवालयाला आग लागून त्यांत बहुतेक कागदपत्रांची अग्निनारायणाला आहुति मिळालेली होती. या घटनेनें डॉक्टरांना मनांतून आनंद झाला. कारण त्यामुळें विद्यार्थिदशेपासूनच्या त्यांच्या क्रांतिजीवनासंबंधींचीं परक्या सरकारच्या चोरवहींत असलेलीं टांचणें अनायासें नष्ट झालीं होतीं. त्यामुळें त्यांना हें वृत्त सांगणाऱ्या मित्राजवळ ते सहज बोलून गेले होते कीं, " बरें झालें कागदपत्र जळून गेले तें ! कारण आतां माझी स्लेट कोरी झाली ! "

या वेळीं उत्तर हिंदुस्थानांतील जाणत्या लोकांना भीषण भवितव्याची चाहूल लागावयास प्रारंभ झाला होता व त्यांना, प. पू. डॉक्टरांनीं चालविलेल्या प्रयत्नांतील भरीवपणा व चैतन्य, हाच तें भवितव्य टाळण्यासाठीं एकमेव उपाय असल्याचें प्रत्ययास येऊं लागलें होतें. हिंदु समाजावर कोठें आघात झाला तर निषेधाचा सणसणीत ठराव करून भावनातिरेकानें दणदणीत भाषणें देण्यापलीकडे सभा-परिषदांतून कांहींच निष्पन्न होत नाहीं, हें सत्य तेथील कांहीं लोकांना आकलन झालें होतें. तसेंच दिवसेंदिवस वाढत जाणारी मुसलमान व ख्रिश्चन यांची आक्रमकता अशा फुसक्या शब्दांच्या बुडबुड्यांनीं कशी थोपविली जाणार, असा प्रश्नहि त्यांच्या पुढ्यांत उग्रतेनें उभा राहिला. त्यांतूनच कलकत्त्याचे श्री. बाबू पद्मराज जैन यांनीं डॉक्टरांना पत्रावर पत्रें लिहून, " पंजाब व उत्तर प्रदेश यांत केव्हां दौऱ्यावर येतां तें कळवा, " असा लकडा लावला होता. लाहोरहून भाई परमा-नंदांचे जामात श्री. धर्मवीरजी यांच्या पत्रांतूनहि तिकडील समाजांतील निकड उमटलेली असे. ते दि. ३ ऑक्टोबर १९३५ मधील पत्रांत लिहितात कीं, " हिंदूंच्या दृष्टीनें परिस्थिति आणीबाणीची झाली आहे. तेव्हां सामुदायिक आत्म-संरक्षणाची कला अवगत करण्यासाठीं मी आपणांजवळ राहूं इच्छितों. मजबरोबर आणखीहि एक गृहस्थ येतील. " ( " Position of Hindus is critical. I want to stay with you for the art of collective self-defence. Another Gentleman would also accompany me. " )

या पत्रामागोमाग लाहोराहून भाई परमानंदजींच्या आदेशावरून श्री. इंद्र-प्रकाश यांनीं १९३६ च्या जानेवारींत होणाऱ्या अखिल भारतीय हिंदु युवक परिषदेला डॉक्टरांना येण्याचें आग्रहाचें निमंत्रण पाठविलें होतें. त्याच्या शेवटीं ते

विनंति करतात कीं, " आपण संघटना करण्यासाठीं आमच्या खर्चानें पंजाबमध्ये एक वर्षभर तरी येऊन राहा. " अशा आशयाची पत्रे येत होतीं. नागपूरच्या बाहेर अपेक्षित ठिकाणी शिक्षणासाठीं जातील असे स्वयसेवक निवडण्यासाठी डॉक्टर खटपटींत होते. पण अन्य प्रातात पाठवावयाचा स्वयंसेवक हा तेथील भाषा जाणणारा व अनोळख्या वातावरणात टिकून चिकाटीने काम करू शकणारा असा पाहिजे. यासाठीं त्यानीं ठिकठिकाणच्या संघशाखातील कार्यकर्त्याना आता हिंदी, तेलगू, बंगाली वगैरे भाषा शिकण्याचा आग्रह सुरू केला होता. सुदैवाने नागपूर हे मराठी व हिदी या प्रदेशाच्या जवळ जवळ सीमेवरच असल्याने दोन्ही भाषाचा सारखाच वापर त्या ठिकाणी होत असतो. त्यामुळे मराठी बोलणारा स्वयंसेवक थोड्या सरावाने मोडक्यातोडक्या हिदीतून आपल्या कल्पना सहज व्यक्तवू शकतो. पण अन्य प्रातात जाण्याचा आत्मविश्वास वाढविण्यासाठी हिदीचा अधिक सराव करण्यासाठीं काहीं जणाना डॉक्टरानी पद्धतशीर प्रोत्साहन दिले होते. त्यासाठीं ते स्वतः देखील केव्हा केव्हा नागपूरमध्ये असताना शाखावर हिदीतून विचार माडू लागले व मधून मधून थोड्या दिवसासाठी महाकोशल भागात स्वयसेवकाना विस्तारक म्हणून पाठविण्यास त्यानीं प्रारंभ केला. कोणी स्वयसेवक आम्हाला मराठी भागातच पाठवा असे म्हणू लागताच ते सागत, " भाषा येत नाही म्हणून भिऊन कसे चालेल ? त्या भागात जा म्हणजे भाषा आपसुख येईल ! पाण्यात पडल्यावाचून का कधी पोहता येते ! " अर्थात् या युक्तिवादापुढे काहीं बोलण्याची सोयच नव्हती.

या नव्या उपक्रमामुळे प्रारभीं खूपच करमणूक होई, विशेषतः मराठीला हिंदी प्रतिशब्द माहीत नसल्याने कशी तरी वेळ मारून नेताना जी वाक्यरचना होई तिनें हास्याच्या फैरी झडत. एका वर्गाच्या प्रसंगी 'ताकात आले घातले' असे सागण्यासाठीं 'तक्कामे अल्ला डाला !' असे अद्‌भुत वाक्य ऐकल्याचे काहींच्या अजूनहि ध्यानात आहे. पण त्या वेळच्या त्या आग्रहातून व प्रोत्साहनातून आज कोणत्याहि प्रातांत जाऊन प्रचार करण्यास सिद्ध असलेले शेंकडो कार्यकर्ते उभे राहिले आहेत, हें विसरून चालणार नाहीं. १९३५ मध्ये श्री. दादाराव परमार्थ, श्री. बाबासाहेब आपटे व श्री. गोपाळराव येरकुंटवार यांच्याप्रमाणेच काहीं नव्या कार्यकर्त्यांना डॉक्टरानी खानदेश व महाकोशल या भागात प्रचारार्थ पाठविलेले दिसते. दूरदूरच्या प्रातात स्वयसेवकाना पाठविण्याची ही जवळजवळ पूर्वसिद्धताच होती, असें म्हणणें युक्त दिसेल.

संघाचा व्याप वाढला होता व त्याला तोलून धरणारी शिस्त व निष्ठा दैनंदिन कामातून दृढ होत होती. इतर संस्थांच्या प्रारंभींच त्या संस्थेची घटना लिहून काढली जाते. पण संघाच्या प्रारंभीं डॉक्टरानीं काहींहि लिखित नियम न करता प्रत्यक्ष व्यवहारातूनच संघाला रेखीव असे स्वरूप आणून दिलें होतें. अर्थात्

संघांतील पदाधिकारी, त्यांच्या कामाचें स्वरूप, दैनंदिन संघशाखेवर स्वयंसेवकांनीं पाळावयाचे नियम वगैरे सर्व गोष्टी या हलके हलके निश्चित करून त्या डॉक्टरांनीं सर्व ठिकाणीं सारखेपणानें प्रसृत केल्या होत्या. संघांतील नियमांचा व संकेतांचा प्रसार कागद-शाईचा वापर न करतां करणें ही गोष्ट त्या काळांत व आजहि अलौकिकच म्हणावी लागेल. पण प्रत्येक उन्हाळ्यांत महिना सव्वा महिन्याचा अधिकारी शिक्षण वर्ग घेऊन डॉक्टरांनीं ही गोष्ट सातत्यानें होत राहील, अशी योजना करून ठेवलेली आहे. प्रथमतः १९२७ मध्यें असे संघाचे नियम व संकेत आपल्या कांहीं सहकाऱ्यांच्या विचारानें डॉक्टरांनीं निश्चित केले होते. पण त्यानंतरचे अनुभव ध्यानीं घेऊन त्यांत आवश्यक ते फेरफार करण्याच्या दृष्टीनें १९३५ च्या ऑक्टोबरमध्यें पुन्हा प्रयत्न केल्याचें दिसतें. या वेळीं सिंदी येथें श्रीमंत नानासाहेब टालाटुले यांच्याकडे डॉक्टरांनीं श्री. आप्पाजी जोशी, श्री. दादासाहेब देव व श्री. कृष्णराव मोहरीर यांना बोलावून घेऊन शारीरिक शिक्षण व कार्यपद्धति यांची पुनर्घटना केल्याचा उल्लेख एका पत्रांत आढळतो. या वेळीं सहासात दिवस एका दृष्टीनें डॉक्टरांना विश्रांति मिळाली होती व तेवढ्या अवधींत त्यांच्या दुखणाऱ्या पाठीला मालीश करण्याचीहि श्री. टालाटुले यांनीं व्यवस्था केली होती.

या वर्षीं संघाचे एक हितचिंतक साताराचे सुप्रसिद्ध कायदेपंडित श्री. दादासाहेब करंदीकर नागपूर येथें दिवंगत झाले. त्यांना प. पू. डॉक्टरांनीं नागपूरच्या त्यांच्या वास्तव्यांत नुकत्याच कांहीं संघशाखा दाखविल्या होत्या व त्या पाहून संघांतील स्वयंसेवकांना प्रोत्साहन देण्यासाठीं शंभर रुपयांची एक ढाल देण्याचा मानस त्यांनीं व्यक्तविला होता. अर्थात् त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचे चिरंजीव बॅ. विठ्ठलराव करंदीकर यांनीं १९३५ च्या ऑक्टोबरच्या प्रारंभीं ढालीसाठीं शंभर रुपये पाठवून दिले व त्यांतून कै. दादासाहेबांच्या इच्छेनुसार धनुर्विद्येंत प्रावीण्य दाखविणाऱ्यास ढाल देण्यांत यावी असें कळविलें. पण ज्या गोष्टीसाठीं कोणीं पैसा दिलेला असेल वा आपण उभारला असेल, तो नेमका त्या गोष्टीवर खर्च व्हावा असा डॉक्टरांचा कटाक्ष असे. एक कारण सांगून त्यांतून दुसरेंच कांहीं करणें त्यांना संमत नव्हतें. तेव्हां ते लिहितात, "आपले संघांत धनुर्विद्या शिकविली जात नाहीं. ती शिकविण्याचा विभाग उघडण्याचा आम्हीं विचार करून पाहिला. परंतु अगोदरच संघांत कार्यक्रमांची खेचाखेच झालेली आहे. त्यांत आतां हा नवीन विभाग बसविणें शक्य दिसत नाहीं. निशाणबाजीचें शिक्षण आम्ही एअरगनच्या साहाय्यानें देत असतों. अशा परिस्थितींत आपण पाठविलेले रुपये आपले उद्देशाप्रमाणें आम्हांला खर्च करतां येत नसल्यामुळें ते आम्हीं आमचेजवळ तसेच अनामत ठेवलेले आहेत. आपण कळवाल त्याप्रमाणें त्या रुपयांची व्यवस्था करण्यांत येईल. आपला उद्देश आम्हांला सिद्धीला नेतां येत नाहीं याबद्दल क्षमा असावी." अर्थात् त्याच पैशांतून पुढें सातारा शाखेच्या

कार्यालयासाठीं जागा विकत घेण्यांत आली. हा आर्थिक व्यवहारांतील चोखपणा बाहेर सर्वत्र दिसून येणाऱ्या पैशांच्या बजबजपुरींत उठून दिसणारा होता यांत शंका नाहीं. अस्तु !

या वर्षीची आणखी एक उल्लेखनीय घटना म्हणजे श्री. आबाजी हेडगेवार यांचा खानदेशातील संचार ही होय. ते रामपायलीहून नागपूरला प. पू. डॉक्टराकडे राहावयास आल्यापासूनच संघाच्या कामात लक्ष घालूं लागले होते व आवश्यकते-प्रमाणे ते केव्हां केव्हां प्रचारासाठीं बाहेरहि जात असत. त्यांचे वय या वेळीं सत्तरीच्या घरांत होतें. पण आबाजींची शरीयष्टि कणखर व वृत्ति कर्तव्यदक्ष आणि उत्साही असे. त्यांनीं या वेळीं भुसावळ, धुळें, पारोळा, एरंडोल, धरणगांव, यावल, पिंपळनेर, रनाळें, नंदूरबार, दौंडाईचें, शिरपूर, शहादे वगैरे प्रमुख गांवीं जाऊन संघशाखांच्या दृष्टीनें बोलणे केले होते.

या प्रवासावर जातांना वृद्ध आबाजीबरोबर कोणा तरी तरुण कार्यकर्त्याला पाठविणें आवश्यक होते. त्यासाठीं डॉक्टरानीं एक दिवस अचानकपणें श्री. कृष्णराव वडेकर यांच्याकडे जाऊन पृच्छा केली कीं, " आबाजी दौऱ्यावर जात आहेत तर तूं दोन महिन्यांसाठीं त्यांच्याबरोबर जाशील काय ? " अर्थात् त्यांचा होकार घेऊनच डॉक्टर परत आले होते. वास्तविक कृष्णराव हे त्या वेळीं नागपुरांतील प्राथमिक शाळेत शिक्षक होते. पण नोकरीवर पाणी सोडून जाण्यांत विशेष काहींच वाटूं नये इतकी होती डॉक्टरांच्या शब्दांची प्रतिष्ठा ! कोणाजवळ शब्द टाकला असतां तो वायां जाणार नाहीं याची अटकळ ते अचूक बांधीत व तेथेंच शब्द टाकीत. मात्र आपल्या शब्दाला होकार देणाऱ्याचा पाठपुरावा डॉक्टर सदैव करीत असत. त्यामुळें एकदां दोन महिन्यांसाठीं बाहेर पडलेल्या वडेकरानीं अनेक वर्षे कार्य तर केलेंच; पण त्याना आपले शिक्षण अपुरें आहे याची खत वाटत आहे हें ध्यानीं येतांच डॉक्टरानीं त्याच्या शिक्षणाला प्रोत्साहन व साहाय्य देऊन त्यांना पुढे आणले. आज त्याच एका प्राथमिक शिक्षकाचा नागपुरांत विधिज्ञ झालेला दिसत आहे.

पुणे येथें १९३५ च्या डिसेंबरमध्ये पं. मदनमोहन मालवीय यांच्या अध्यक्षते खालीं हिंदुसभेचे अधिवेशन व्हावयाचें होते. ज्या वेळीं देशाचा विचार करणार मंडळी एकत्रित येणार असतील, त्या वेळी संघाचा त्या लोकांना परिचय करून देण्याच्या दृष्टीने तो एक पर्वणीचा काळ आहे असे डॉक्टर मानीत. या वेळीहि पुण्याला त्या दृष्टीनें उत्कृष्ट प्रात्यक्षिके दाखविण्याची सिद्धता तेथील संघशाखेनें केली होती. पण नेमकी त्याच वेळीं डॉक्टरांची प्रकृति बिघडून त्यांच्या पायाल व्रण झाल्याने विशेष हालचाल करणेंहि अशक्य होऊन बसलें. पुण्याला संघाच्य प्रात्यक्षिकांच्या वेळीं डॉक्टरांनीं स्वतः उपस्थित असावें असा आग्रह सुरू केल होता व त्याला प्रथमतः ' आजारानें हालचाल अशक्य ' (Sickness prevent

movements ) अशी तार करून त्यांनीं नकार दिला होता. पण शेवटीं तशाहि स्थितींत त्यांनीं पुण्याला जाण्याचें ठरविलें व दि. २८ डिसेंबरला दुपारीं ते तेथें पोंहोचले.

महासभेच्या अधिवेशनाला आलेल्या मंडळींसाठीं दि. ३० डिसेंबरला सैनिकी थाटानें संचलन व मानवंदना असा कार्यक्रम पांचशें गणवेषधारी स्वयंसेवकांनीं करून दाखविला. त्यानंतर संघाची भूमिका स्पष्ट करण्यासाठीं डॉ. मुंजे व बाबू पद्मराज जैन यांचीं भाषणें झालीं. प्रकृतीमुळें डॉक्टर बोलूं शकले नाहींत. केवळ समारंभाच्या शेवटीं त्यांनीं सर्वांचे आभार मानले. या कार्यक्रमानें पाहुण्यांवर उत्तम परिणाम झाला. त्यासंबंधीं डॉक्टर लिहितात कीं, "......हा एकंदर कार्यक्रम फार परिणामकारी होऊन सर्व लोक मुक्तकंठानें संघाची प्रशंसा करूं लागले. बाबू पद्मराज जैन यांनीं तर सर्व ठिकाणीं एकसारखा स्तुतीचाच वर्षाव सुरू केला आहे......आतां ठिकठिकाणीं संघशाखा स्थापन करण्याकरितां बोलावणीं येत आहेत. या वाढत्या कार्याला मनुष्यबळ पुरविण्याचें कार्य तूर्त तरी नागपूरलाच करणें प्राप्त आहे......"

या अधिवेशनानंतर भोर, मुंबई व अकोला या गांवीं जाऊन डॉक्टर १९३६ च्या प्रारंभीं नागपूरला परत आले. या प्रवासांत त्यांना कराव्या लागलेल्या हालचालींमुळें पायाला ताण पडून व्रण बरा होण्याऐवजीं अधिकच चिघळत चालला. त्याच्या जोडीनें प्रवासांत असतांना निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या पद्धतीनें त्या व्रणावर जे उपचार झाले तेहि त्रासदायक ठरले होते. "चालण्याची मेहनत व डॉक्टर लोकांची निरनिराळ्या पद्धतीनें ड्रेसिंग करण्याची हातोटी यामुळें जखम बरी होण्यास वेळ लागत आहे." अशा खोचक शब्दांतून डॉक्टरांनीं तो त्रास व्यक्त केलेला दिसतो. पायाचा त्रास जवळजवळ दोन महिने चालूच राहिला.

या अवधींतच नागपुरांत डॉक्टरांना पैशांची टंचाई अत्यंत तीव्रतेनें जाणवूं लागल्यामुळें त्यांना कांहीं कार्यक्रमांना 'येतां येत नाहीं' अशीं उत्तरें पाठवून पैशांची जमवाजमव करण्यासाठीं पुन्हा तशाच पायानें पायपीट करावी लागली ! 'विश्रांति घेण्यासाठीं इकडे या' अशीं कांहीं मित्रांचीं पत्रांवर पत्रें येत होतीं. पण अशा पत्रांना त्यांच्याकडून उत्तरेंच गेलीं नाहींत. तेव्हां अकोल्याहून श्री. बाबा चितळे त्राग्यानें लिहितात कीं, "आमच्या एकाहि पत्राचा जबाब नाहीं आणि विश्रांतीसाठीं अकोल्यासहि येत नाहीं !" शेवटीं निरुपायानें डॉक्टरांनीं स्पष्ट शब्दांत स्वतःची स्थिति कळवून टाकली. त्यांत त्यांनीं म्हटलें होतें कीं, "......पैसे जमवून संघाजवळ दिल्याशिवाय मला नागपूर सोडतां येत नाहीं व विश्रांति घेण्यास बाहेर न गेल्यामुळें प्रकृति बिघडत चालली आहे. अशा परिस्थितींत काय करावें हें सुचत नाहीं." अर्थात् काय करावें हें सुचत

...२०...

नाहीं, असें जरी डॉक्टरांनीं लिहिलें असले तरी ढासळत्या प्रकृतीची क्षिति न बाळगतां त्यांनीं संघासाठीं पैसे गोळा करण्यालाच प्राधान्य दिलें होते, ही गोष्ट विसरून चालणार नाहीं.

या वर्षारंभींच पुण्याच्या अस्पृश्यता–निवारक मंडळाच्या वतीने शंभर भाषणें देण्याचा उपक्रम योजण्यात आला. त्यात 'आपण किती व्याख्यानें व कोणत्या टापूंत द्याल ?' अशी विचारणा करणारे पत्र डॉक्टराच्या हाती पडले. पण आजारामुळें त्याला नकार दिलेला असावा. तसेच संघ करीत असलेल्या प्रयत्नातून हिंदूंतील कृत्रिम भेद दूर होतील, अशा विश्वासामुळे स्वतंत्रपणें अस्पृश्यता-निवारणासाठीं प्रयत्न करण्याची त्याना आवश्यकता वाटली नसावी असें वाटतें.

याच काळांत कांहींनीं संघाच्या ध्वजाचा आकार बदलावा व त्यांत अभिनवता आणावी, अशी सूचना डॉक्टरांना केली होती. त्या वेळीं डॉक्टरांनीं त्यांना जे उत्तर पाठविलें, तें त्याच्या मनातील निश्चितता व्यक्त करणारें आहे. ते लिहितात कीं, "...... भगव्या ध्वजाचा इतिहास हा केवळ तीनशें वर्षांचा नसून त्यापेक्षां फार जुना आहे व निदान आद्य शंकराचार्योनीं तरी आपला दिग्विजय याच ध्वजाखालीं केला होता, याबद्दल कोणास शंका राहण्याचे कारण नाहीं. त्यापेक्षा या ध्वजाचा इतिहास किती मागे नेऊन पोचविता येईल, याचा विचार संशोधकांनीं जरूर करावा. हिंदुराष्ट्र हें पुरातन राष्ट्र असून हिंदुराष्ट्राचा भगवा ध्वज हाहि पुरातनच ध्वज आहे. हिंदुराष्ट्राची उत्पत्ति अभिनव नसल्यानें अभिनव ध्वजाचीहि हिंदुराष्ट्राला आवश्यकता नाहीं व निदान राष्ट्रीय स्वयंसेवक संघ तरी त्या पुरातन जयिष्णु भगव्या ध्वजाला सोडून हा अभिनव ध्वज आपणांसमोर ठेवणार नाहीं."

डॉक्टरांनीं चालविलेल्या संघाचे बाह्यदर्शन हें त्यातील गणवेष, संचलन व अनुशासन यांमुळे सैनिकी थाटाचेंच घडे, त्यामुळें ही राष्ट्रीय सेना आपल्या देशावरील पारतन्त्र्याचें निशाण, आज नाहीं उद्यां पण धुळीला मिळवून स्वत्त्वाचे व स्वातंत्र्याचे झेंडे सर्वत्र मिरवील, असा आशावाद जाणत्यांच्या मनांत अवश्य उदित होई व त्यांतूनच संघाला प्रोत्साहन देणाऱ्यांचें एक वलय संघाभोंवतीं उभें राहूं लागलें होतें. १९३६ च्या मे महिन्यांत वैशाख शु. ५ ला नासिकचे श्री-शंकराचार्य विद्याशंकरभारती स्वामी तथा डॉ. कुर्तकोटी ह्यांनीं जगद्गुरु आद्य श्रीशंकराचार्योंच्या जयंतीनिमित्तानें डॉक्टरांना 'राष्ट्रसेनापति' अशी पदवी घोषित केली. त्याचें वृत्त त्या वेळच्या वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होतांच डॉक्टरांच्या काहीं मित्रांनीं व अनुयायांनीं पत्रावरील पत्त्यावर ती पदवी लिहून डॉक्टरांचें अभिनंदन करणारीं पत्रे पाठविलीं. डॉक्टराना तें मुळींच रुचलें नाहीं. त्यांना हिंदुराष्ट्राच्या पुनरुद्धाराच्या कार्यांत यश हवें होतें व त्यासाठीं अखंड कार्यमग्न राहण्यातच

त्यांच्या मनाला संपूर्ण समाधान वाटत असे. लक्षावधि सहकारी उभे करण्यांतच त्यांचा आनंद सामावलेला होता. हिंदु समाजावर अखंड आघात होत असतांना व ते निवारण करण्याचें सामर्थ्य अजून कोठेंच दिसत नसतां आपल्या नांवामागें 'राष्ट्रसेनापति' ही पदवी मिरविणें हें डॉक्टरांना विसंगत वाटणें स्वाभाविक होतें. मिरवणें नव्हे तर हातीं घेतलेल्या कामांत रमणें हा त्यांचा स्वभाव होता. त्यामुळें त्यांनीं एका पत्रांत स्वच्छ कळवून टाकलें कीं," श्रीमत् शंकराचार्यांनीं दिलेली पदवी आपल्याला व्यवहारोपयोगी नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवून त्या पदवीचा उपयोग आपणांपैकीं कोणींहि व केव्हांहि करूं नये, अशी सूचना द्यावी. वर्तमानपत्रांतूनहि या पदवीचा जितका प्रचार कमी होईल तितका बरा. "

पुण्याच्या १९३६ च्या अधिकारी शिक्षण वर्गासाठीं प. पू. डॉक्टर एप्रिलच्या दुसऱ्या आठवड्यांत नागपुराहून निघाले. तत्पूर्वींच नागपूरचे एक स्वयंसेवक श्री. कृष्णराव वडेकर यांची त्यांनीं धुळें-जळगांव भागांत पाठवणी केली. त्या वेळीं त्या प्रचारकाला जातांना त्यांनीं दि. २४ मार्चला ' संघस्थापना-विधि ' या शीर्षकाखालीं एक छोटेंसें सूचनात्मक पत्रक लिहून दिलें. हें पत्रक अत्यंत त्रोटक पण स्वयंसेवकासंबंधींच्या कल्पना व अपेक्षा यांवर उत्तम प्रकाश टाकणारें आहे. त्यांतील चार-पांच परिच्छेद कल्पना येण्यासाठीं येथें उद्धृत केल्यावांचून राहवत नाहीं. ते लिहितात, " ( ९ ) शिवाजीचा प्रत्येक अधिकारी जसा लढवय्या असे, तसा संघाचा प्रत्येक अधिकारी संघाच्या सर्व शिक्षणांत तज्ज्ञ असावा. ( १० ) हिंदुहिताच्या अविरुद्ध, चालकांनीं अनुज्ञा दिल्यास, कोणत्याहि सार्वजनिक कार्यांत स्वयंसेवकाला स्वतःच्या जबाबदारीवर भाग घेतां येईल. ( १२ ) राष्ट्रीय वृत्तीनें स्वदेशी व्रताचें पालन करावें. ( १३ ) आचारशून्यता व कर्मठपणाचा अतिरेक हीं दोन्ही टोकें टाळून सामुदायिक बलसंपादनाचा सुवर्ण-मध्य संघाच्या कार्यक्रमांत साधावा. हंगामी उत्साह वाढविणाऱ्या व तात्कालिक वीरता प्रकट करणाऱ्या कार्यक्रमापासून संघानें अलिप्त राहावें. कारण संघटनेच्या एकंदर मजबुतीला त्यामुळें धोका येण्याचा संभव असतो. "

पुण्याच्या अधिकारी शिक्षण वर्गांत कांहीं दिवस राहून डॉक्टर नागपूरला परत आले. या परतीच्या प्रवासांत अतिशय गर्दीमुळें गाडींत त्यांना बराच वेळ उभें राहावें लागलें होतें; पण दारिद्र्यामुळें ते अशा गोष्टी हंसत सहन करीत. एवढेंच नव्हे तर पैसे वांचावेत म्हणून या काळांत आगगाडीचें ' झोन तिकीट ' काढून तेवढ्या काळांत गर्दींतूनहि ते अधिक गांवांना भेटी देण्यासाठीं घाईघाईनें प्रवास करतांना दिसत. पुण्याच्या या वर्गांत असतांनाच तेथील ' सोन्या मारुती 'च्या मंदिरावरून मुसलमानांनीं कुरबूर चालविली होती. त्या मंदिराजवळील मशिदींत चालणाऱ्या मुसलमानांच्या नमाजांत मारुतीपुढील बारक्याशा घंटेनें व्यत्यय येतो, हें कुरबुरीचें मूळ होतें. डॉक्टर पुण्यांत असतांनाच हें प्रकरण चिघळून प्रत्यक्ष

दंगा पेटला व त्यांत मुसलमानांचा अपेक्षाभंग होऊन त्यांना चांगलाच मार बसला. त्या प्रसंगीं सहज बोलतांना डॉक्टराची आकांक्षा व्यक्त झाली होती. ते म्हणाले होते कीं, " हिंदु समाजाविरुद्ध अन्याय्य उठाव करण्याला कोणीहि धजणार नाही, अशी स्थिति आपण निर्माण केली पाहिजे. घंटेसारख्या गोष्टीवरून भांडण उकरून काढण्याचे धारिष्ट्य येथील मुसलमानात अजून दिसते, याचा अर्थ अजून आपल्या समाजातील संघटनेचे बळ अत्यल्प आहे असा होतो. "

त्या सुमारास प. पू. डॉक्टरांना भेटण्यासाठी लोणावळ्याचे एक गृहस्थ आले होते व ते दंग्यासंबंधीं बोलता बोलतां म्हणाले कीं, " मुसलमान हे देशद्रोही आहेत, तेव्हां त्यांना त्याचे बक्षीस मिळालेच पाहिजे." त्यावर डॉक्टर म्हणाले कीं, " मुसलमानाना देशद्रोही म्हणणे साफ चूक आहे !" डॉक्टराच्या या बोलण्याचा उलगडा तेथे बैठकींत असलेल्याना झाला नाहीं, हे पाहून त्यानीं स्पष्टीकरण केले. त्यांनी सांगितले की, " मुसलमानाना देशद्रोही म्हटल्याने देश त्याचा आहे असा अर्थ ध्वनित होतो. तेव्हां त्याचे चाळे देशाला विघातक ठरत असतील तर त्याना देशाचे शत्रूच म्हणणे युक्त आहे. " देशद्रोही व देशाचे शत्रु या दोन दूषणातील अंतर वरवर पाहता ध्यानात येणारे नाहीं. पण गेल्या आठ-नऊशे वर्षांच्या प्रदीर्घ कालखंडात या देशाची मूळची दिव्य व सनातन हिंदु परंपरा उखडून टाकून, त्या ठिकाणीं परक्या परंपरेशीं या देशाला बलात्काराने जोडू इच्छिणारे मुसलमान हे या देशाचे धनी नसून, या देशावरील आक्रमक म्हणजे शत्रु आहेत, ही गोष्ट डॉक्टरानीं या शब्दयोजनेने स्पष्ट केली होती. जयचद, सूर्याजी पिसाळ व बाळाजीपंत नातू हे घरचेच असून घराचे वासे मोजणारे निघाले. त्यामुळे त्यांना ' देशद्रोही ' म्हणणे युक्त, पण जो बोलून चालून ' शत्रु ', त्यास त्या शब्दा-व्यतिरिक्त अन्य शब्दांचा अहेर करणें मूलतःच चुकीचे नाही काय ? मात्र ही आक्रमकता सोडून हे परके येथील राष्ट्रीय जीवनाशीं सुसंवादित्वाने व्यवहार करूं लागतील, तर त्याना देशात राहू देण्याला आडकाठी नसावी, असेहि डॉक्टर स्पष्टपणें सांगत असत. पण त्याच्या वृत्तींत जोवर असे परिवर्तन झाल्याची कोणतीच निशाणी दिसत नाहीं, तोवर त्याना नुसते ' देशद्रोही ' म्हणणें, हेहि वरील कारणाने डॉक्टरांना खटकत असे.

प. पू. डॉक्टरांचा ' राष्ट्रीय कोण ? ' यासंबंधींचा हा दृष्टिकोन संघ निघण्यापूर्वींच निश्चित झाला होता, हे आपण मागें पाहिलेच आहे. त्यानंतर राजकारणांत मुसलमानांचा ' सवता सुभा ' निर्माण करण्यासाठीं चाललेले सर्व प्रयत्न ते दक्षतेने पाहत आले होते व त्यांतून त्याच्या मतालाच दिवसेंदिवस पुष्टि मिळत होती. मुसलमान समाजांतील पुढाऱ्यांनीं उघड उघड केलेलीं पाकिस्तान-संबंधींचीं वक्तव्यें व प्रसिद्धिलेली पत्रकें त्यांच्या स्मरणांत असत व त्यांचा उल्लेख केव्हां केव्हां बैठकांतून ते करीत. जुलै १९३५ मध्ये केंब्रिजमधून ' पाकिस्तान

नॅशनल मुव्हमेंट ' चे अध्यक्ष श्री. सी. रहमतअली यांनीं काढलेलें पत्रकहि त्यांच्या संग्रहीं असे. एवढेंच नव्हे तर मुसलमानांनीं हिंदूंना कसें कसें गिळंकृत करावें, यासंबंधीं मार्गदर्शन करणारीं भडक गुप्त पत्रकेंहि त्यांच्या वाचनांत येत होतीं, असें त्यांच्या बैठकांतील बोलण्यावरून स्पष्ट दिसे.

याच काळांत डॉक्टरांकडे त्यांच्या चरित्राची माहिती व ठळक प्रसंगांचीं छायाचित्रें यांची मागणी करणारें पत्र मिरजेचे श्री. दामोदरपंत भट यांनीं पाठविलें होतें. पण कामाच्या घाईमुळें डॉक्टरांकडून उत्तर जाण्यास विलंब लागल्यानें त्यांचें आठवणी-साठीं पुन्हा पत्र आलें. स्वतःची चरित्ररूपानें प्रसिद्धि व्हावी, ही गोष्ट डॉक्टरांच्या स्वभावांत मुळींच बसणारी नव्हती. प्रसिद्धि व्हावी ती कार्याची नि तीहि त्याच्या चढत्या-वाढत्या शक्तींतून, असें त्यांना वाटे. त्यामुळें त्यांनीं नकारार्थी उत्तर पाठविलें. त्या उत्तरांत डॉक्टरांची प्रसिद्धिविन्मुखता तर स्पष्टच उमटली होती. त्याच्या जोडीनें नकार देतांनाहि दुसऱ्याचें मन दुखवूं नये यासाठीं त्यांच्या दक्ष लेखणींतून सहजतेनें जी शालीनता प्रकट झाली होती ती पाहण्यासारखी आहे. ते लिहितात कीं, “ ......आपले मनांत माझेविषयीं व राष्ट्रीय स्वयंसेवक संघा-विषयीं अत्युत्कट प्रेम व आदर वसत आहे याबद्दल मी आपला फार आभारी आहें. आपले इच्छेप्रमाणें माझें चरित्र छापलें जावें इतका मी थोर आहें किंवा त्यांत छापण्यासारखे कांहीं महत्त्वाचे प्रसंग आहेत, असें मला मुळींच वाटत नाहीं. आपणांला पाहिजेत तसे माझे किंवा माझ्या कार्याचे कोणत्याहि प्रकारचे फोटोहि नाहींत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे लिहूं इच्छितां तसल्या चरित्र-मालिकेंत माझें चारित्र मुळींच बसूं शकत नाहीं असें मला वाटतें. ” हें पत्र दि. १२ जुलैचें आहे.

याच काळांत म्हणजे ऑक्टोबर १९३६ मध्यें डॉक्टरांना एके दिवशीं अव-चित अशी वार्ता कळली कीं, ‘श्रीगुरुजी हे एकाएकीं घरांतून निघून गेले आहेत.’ डॉक्टरांना ही वार्ता अनपेक्षित नव्हती. पण ती ऐकून त्यांना अत्यंत दुःख झालें. देशांत आकाश फाटल्याप्रमाणें एकूण भयानक अवस्था झाली असतां कर्त्या व सुविद्य तरुणांनीं प्राण पणाला लावून व आपल्या सर्वस्वावर निखारे ठेवून गगनाला गवसणी घालण्याच्या आत्मविश्वासानें पुढें यावें, अशी डॉक्टरांची अपेक्षा होती. पण त्या जागीं एक कर्तृत्ववान् तरुण वकील आपल्या शक्तींचा वापर देशांतील संघटनेची उणीव भरून काढण्यासाठीं न करतां घरांतून अज्ञात स्थळीं निघून जातो, याचें डॉक्टरांना अतीव दुःख होणें स्वाभाविक होतें.

श्रीगुरुजींनीं जेमतेम दीड वर्ष वकिली केली. त्या व्यवसायांतील त्यांचे सहकारी श्री. दत्तोपंत देशपांडे हेहि संघाचे चांगले कार्यकर्ते व डॉक्टरांच्या चांगल्या लोभांतील होते. गुरुजी बंगालमध्यें सारगाछी येथें स्वामी अखंडानंद यांच्या आश्रमांत निघून गेल्यावर ते कोणत्या तरी आश्रमांत असल्याचें मोघम वृत्त डॉक्टरांना श्री. देशपांडे यांच्याकडून कळलें. त्यानंतर डॉक्टरांना ते

भेटल्यावर डॉक्टर नेमके विचारीत कीं, ' कां हो ! तुमचे मित्र केव्हां परत येणार ? ' तसेंच बैठकींत ओघाओघाने गुरुजींचा विषय निघाला कीं डॉक्टर यांच्या सद्‌गुणांची मुक्तकंठानें प्रशंसा करतांना दिसत.

अज्ञात स्थळीं गेलेल्या गुरुजीची त्यांचे वृद्ध आई-वडील रामटेकला आतुरतेने वाट पाहत होते, तर डॉक्टर व गुरुजींचे मित्र हेहि या घटनेनें अस्वस्थ होते. पण या वेळी गुरुजी मात्र त्यांच्या अनत जन्मीची पुण्याई फळाला येऊन श्रीरामकृष्ण परमहंस व श्रीविवेकानंद यांच्या कृपेला पात्र झालेले श्रीअखंडानंदजी यांच्या सेवेत निमग्न होते. ' आनंद आनदाशी घोटी । बोलतां परेसि पडे मिठी ।' असे ज्या समाधिसुखाचे वर्णन केले जाते, त्या सुखांत अखडानंदजी अनेकदा असत. अशा अधिकारी पुरुषाच्या सान्निध्यात राहावयास मिळणे हें खरोखर महाभाग्यच होते. त्यांतून गुरुजींनीं त्या ठिकाणीं तन्मयतेने जी निरलस सेवा केली, तीहि त्यांच्या आनंदांत भर घालीत होती. सेवेचे सामर्थ्य खरोखरच अद्‌भुत असतें. ती सेवकाच्या मनातील अहंकाराला निखंदून टाकते नि ज्याची सेवा करावी त्या महापुरुषाला कृपेचा सागर बनविते ! सारगाछी आश्रमात हेंच सेवेचे सामर्थ्य प्रकट होण्याच्या मार्गावर होते.

या वर्षीं पंजाबमधील मागणीनुसार डॉक्टरानीं श्री. जनार्दन चिंचाळकर, श्री. राजाभाऊ पातुरकर, श्री. नारायणराव पुराणिक आदि कार्यकर्त्यांना तिकडे पाठविले होते व त्यांनीं आपला अभ्यासक्रम नीट रीतीने चालू ठेवून लाहोर भागांत संघाचे जाळे विणण्यास प्रारंभ केला होता. श्री. परमार्थ व श्री. बाबासाहेब आपटे या दोघांना जेथें कोठे आवश्यकता पडेल, तेथे तेथे डॉक्टर पाठवीत होते. कधीं महाराष्ट्रांत, तर कधीं पंजाबात; कधी महाकोशलमध्ये तर कधीं उत्तर प्रदेशात, असा त्यांचा संचार चाले. या सर्वांना वारवार मार्गदर्शनपर पत्रे पाठवून डॉक्टर उत्साहित करीत असत. त्या बाहेर गेलेल्या कार्यकर्त्यांनीं कसें वागावे, या-संबंधीं डॉक्टरानी वेळोवेळीं जे सूत्रमय विचार प्रकट केलेले आहेत ते कोणी संग्रहित करील तर तो खरोखरच सघटनाशास्त्रावरील एक अपूर्व ग्रंथ ठरेल. या वर्षीं पंजाबमध्ये गेलेल्या कार्यकर्त्यांना त्यानीं कळविले होते की, " ......परप्रांतांत संघाचें कार्य करणे आहे. तरी सर्व परिस्थितीचे निरीक्षण करून, माणसें ओळखून चातुर्यानें व धिमेपणाने एक एक पाऊल पुढें टाकावे. कार्याची घाई करून आपले हातून कोणतीहि चूक होऊं देऊं नये. " असे सुटसुटीत अनुभवाचे बोल त्यांच्या पत्रांतून ठायीं ठायी उमटलेले दिसतात.

या वर्षातच डॉ. मुंजे यांनीं एक सैनिकी विद्यालय काढावयाची खटपट सुरू केली. फार वर्षांपासून त्यांची तरुणांना ' सैनिक ' बनविण्यासाठी खटपट सुरू होती. ती ध्यानीं घेऊन नामदार श्री. विठ्ठलभाई पटेल हे तर त्यांना ' कर्नल मुंजे ' किंवा ' जनरल मुंजे ' असें विनोदानें म्हणत असत. आज इंग्रज आहेत,

पण उद्यां ते येथून निघून जाण्याचा प्रसंग आला तर हिंदुस्थानांत हिंदु-मुसलमान असा संघर्ष अटळ आहे, हें त्या काळांत स्पष्ट दिसूं लागलें होतें. ही संभाव्य आपत्ति उभी राहील त्या वेळीं ठोशास ठोसा व गोळीस गोळी भिडवूं शकतील, असे सैनिकी बाण्याचे हिंदु तरुण देशांत असले पाहिजेत, हाच विचार त्यामागें होता. या विद्यालयाच्या कल्पनेला मूर्तरूप देण्यास प्रारंभ केल्यापासून डॉ. मुंजे यांनीं प. पू. डॉक्टरांना आपल्या संस्थेच्या नियंत्रक मंडळांत आग्रहानें समाविष्ट करून घेतलें होतें. कारण डॉक्टर हे विपरीत परिस्थितींतूनहि मार्ग कसा काढतात, याचें प्रात्यक्षिक संघाच्या रूपानें, डॉ. मुंजे यांच्यासमोर उभेंच होतें. १९३६ च्या ऑगस्टमध्यें नियंत्रक मंडळाची ( Governing body ) जी मुंबईला सभा झाली, त्या सभेला डॉक्टर उपस्थित होते. या बैठकीहून परततांना त्यांनीं ठाणें, पुणें वगैरे शाखांनाहि भेटी दिल्या होत्या. या वेळीं घसा बसलेला असूनहि त्यांचें पुण्यास हसबनीस बखळींत भाषण झालें. त्यांत त्यांनीं मांडलेला विचार तरुणांना मार्गदर्शक ठरणारा होता. ते म्हणाले कीं, "......आपण पूर्वजांविषयीं आपल्या मनांत सदैव अभिमान बाळगला पाहिजे. पण प्रत्यक्ष घरांत वागतांना जर आपण आपल्या वडिलांचा व आजोबांचा मान राखत नसूं, तर पूर्वजांचा मान कसा राखणार!" डॉक्टरांच्या प्रतिपादनांतील तत्त्व हें नेहमींच अशा रोकड्या व्यवहाराच्या हातांत हात घालून चालतांना दिसे.

पुण्याहून परततांना डॉक्टरांनीं नगर, जुन्नर, नासिक, भुसावळ, अकोला, मूर्तिजापूर, वर्धा या शाखांना भेटी दिल्या व दि. २ सप्टेंबर १९३६ ला ते नागपूरला येऊन पोहोंचले. नागपूरला नोव्हेंबरच्या मध्यापर्यंत त्यांचें वास्तव्य होतें. तेवढ्या अवधींत त्यांनीं तेथील अधिकारीवर्गासमोर संघाचें तत्त्वज्ञान व व्यवहार यांची उकल करणारीं लागोपाठ दहा भाषणें दिलीं. डॉक्टरांचीं हीं भाषणें चालू असतांना नवीनच संघांत आलेले बाहेरगांवचे एक वकील नागपूरला आलेले होते. त्यांनीं चौकशी केल्यावर डॉक्टरांची भेट भाषणाच्या ठिकाणीं होऊं शकेल असें त्यांना कळलें व ते एके दिवशीं भाषण चालू असतांनाच डॉक्टरांना भेटण्यासाठीं तेथें गेले. नागपुरांतील अधिकारीवर्गाचें कोठें काय चुकतें व तें वर्तन संघटनेच्या दृष्टीनें कसें सुधारलें पाहिजे, यावर डॉक्टरांनीं नुकतेंच विवरण करण्यास प्रारंभ केला होता. इतक्यांत ते दुरून येतांना डॉक्टरांना दिसले. लगेच नागपूर शाखेंतील गुणदोषांचें विवरण नुकत्याच संघांत प्रवेश केलेल्या स्वयंसेवकासमोर करणें युक्त नाहीं, असा विचार करून डॉक्टरांनीं एकाएकीं विषय बदलला व त्यांनीं नवीन व्यक्तीला संघाचा ध्येयवाद सहज समजेल अशा शब्दांत मांडण्यास सुरुवात केली. डॉक्टरांनीं आपल्या भाषणाचा ओघ एकदम कां पालटविला, हें जाणत्या स्वयंसेवकांच्या तेव्हांच लक्षांत येऊन त्यांना डॉक्टरांच्या जागरुकतेची धन्यता वाटली.

राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या शाखांतील प्रभावी हिंदुत्वाच्या संस्काराचे सादपडसाद हलके हलके घरीं-दारी उमटूं लागणें स्वाभाविक होते. त्या काळात मुसलमानांकडून हिंदु महिलांवर ओढवणाऱ्या प्रसंगांची संतापजनक वृत्ते वारंवार ऐकूं येत. अशा वेळीं संघाच्या रूपानें केवळ हिंदु तरुणांना संरक्षणक्षम बनवून भागणार नाही, स्त्रियानाहि ते शिक्षण दिले पाहिजे, असे विचार संघाचे काम पाहिलेल्या महिलांच्या मनांत प्रामुख्याने येत होतें. यासंबंधीं प. पू. डॉक्टरांनीं आपल्या समाजाची परंपरा, मनोरचना व सद्यःस्थिति ध्यानी घेऊन संघस्थापने-पूर्वींच केवळ पुरुषवर्गातच संघाचे कार्यक्षेत्र राहावे, असे निश्चित केले होते.

महिलांनाहि आत्मसंरक्षणाचें शिक्षण दिले पाहिजे, या कल्पनेने १९३६ च्या ऑगस्टमध्यें वर्धा येथील एका स्वयंसेवकाच्या मातोश्री श्रीमती लक्ष्मीबाई केळकर यांनीं डॉक्टरांची भेट घेतली. ही भेट वर्ध्याचे जिल्हा संघचालक व डॉक्टरांचे निकटवर्ती स्नेही श्री. आप्पाजी जोशी यांच्या घरीं झाली होती. त्या भेटीचे वृत्त लिहितांना श्रीमती केळकर म्हणतात, "...त्यांनीं (डॉक्टरानी) मला भेटीचे कारण विचारलें. मीं म्हटलें, 'आपण तरुणांना जे शिक्षण आणि ध्येयवाद शिकवीत आहांत, तसाच स्त्रीवर्गाला कां शिकवीत नाहीं?' त्यावर ते म्हणाले, 'सध्यां आम्हीं पुरुषवर्गासाठींच हा कार्यक्रम ठेवला आहे.' यावर मीं त्याना म्हटले, 'आपलें शिक्षण मला देण्यास माझ्या मुलाला अनुमति द्या. तो मला शिकवील व मी गांवातील स्त्रियाना शिकवीन.'" यालाहि डॉक्टरानीं नकार दिला. तेव्हा श्रीमती लक्ष्मीबाईनीं, "स्त्रिया कुटुंबाप्रमाणेच राष्ट्राचाहि मुख्य घटक असल्यामुळे तुमच्या संघटनेचे विचार घरात मातांपर्यंत पोचविलेत तर तें हिताचें होईल." अशा शब्दात आपली इच्छा पुन्हा बोलून दाखविली. तेव्हां डॉक्टर म्हणाले कीं, "या कार्याची सर्व जबाबदारी तुम्ही घेत असाल तर आप्पाजी जोशी तुम्हांला शक्य ती सर्व मदत देतील."

यानंतर दोन महिन्यांत त्यांनीं डॉक्टरांची चार-पाच वेळा भेट घेऊन सुरू करावयाच्या कामाची रूपरेषा निश्चित केली. त्यासंबंधीं त्या लिहितात की, "......त्यांनीं संस्थेचें नाव संघाच्या नांवापेक्षां वेगळे परंतु साधारणतः समानार्थी असावें, अशी इच्छा दर्शविली. तशाच या दोन संघटना गाडीच्या रुळांप्रमाणें समांतर आणि एक न होणाऱ्या राहतील, असेहि बोलून दाखविलें. तसेंच स्त्रियांच्या कार्यात उद्भवूं शकणाऱ्या निरनिराळ्या अडचणींची कल्पनाहि त्यांनीं दिली. दर भेटीला मी आपल्या विचारांशीं कितपत पक्की आहे याची ते चांचणी घेत. अर्थात् माझे विचार ठाम असल्यामुळें मी त्यांना म्हणे, 'आपला आशीर्वाद आणि ईश्वराची कृपा असल्यानंतर माझ्या प्रयत्नाना अपयश येईल असें मला वाटत नाहीं.' या चांचणींत मी उत्तीर्ण झालें असे मला वाटतें. कारण डॉक्टरांनीं शक्य ती मदत देण्याचें कबूल केलें आणि त्याच वर्षीं दि. २५

ऑक्टोबर १९३६ रोजीं विजयादशमीच्या सुमुहूर्तावर राष्ट्रसेविका समितीचा जन्म झाला. ''

नोव्हेंबरच्या प्रारंभीं डॉक्टरांची प्रकृति बिघडलेली होती. पण एकदां ठरविलेला कार्यक्रम बदलल्यानें अनेक जणांना त्रास होऊन अपेक्षाभंग होतो म्हणून ते दि. १३ नोव्हेंबरपासून २३ पर्यंत काटोल तालुक्यांत फिरतीवर गेले. अंगांत ताप होता, खोकलाहि मधून मधून उसळून येई. पण अशा स्थितींतहि कुरकूर न करतां त्यांनीं तो कार्यक्रम हंसतमुखानें पार पाडला.

त्या दौऱ्यांतील एक घटना डॉक्टरांना लोकसंग्रहासाठीं केवढी किंमत द्यावी लागली याची कल्पना आणून देणारी आहे. मुक्तापूरच्या एका तरुण स्वयंसेवकानें डॉक्टरांना जेवावयास बोलाविलें. कधीं नव्हेत ते डॉक्टर आपल्या घरीं येणार या आनंदांत त्यानें श्रीखंडपुरीचा बेत केला. पानें वाढून झालीं व श्रीखंडपुरी पाहून त्या तालुक्याचे संघचालक श्री. भाऊसाहेब घाटे यांनीं त्या स्वयंसेवकाला जरा रागांतच विचारलें कीं, " डॉक्टरांना त्रास होत असतांना हें कुपथ्यकर श्रीखंड केलेंस कशाला ? " स्वयंसेवक या प्रश्नानें स्वाभाविकच ओशाळला. तेव्हां डॉक्टर हंसत म्हणाले, " छे ! याचा मला कांहीं त्रास होणार नाहीं ! " एका तरुण कार्यकर्त्याचें मन राखण्यासाठीं डॉक्टरांनीं नेहमींप्रमाणें जेवण केलें व त्यामुळें वाढलेला त्रास पुढील प्रवासांत निमूटपणें सहन केला ! या दौऱ्यावरून परत आल्यावर ते अवघ्या दोनच दिवसांनीं दहा-बारा दिवसांच्या वऱ्हाड भागांतील संचारासाठीं निघून गेले. या मधल्या दोन दिवसांत लिहिलेल्या पत्रांत त्यांनीं ' रोज ताप येत असतो, डोकें दुखत असतें व अशक्तता भयंकर वाटते, ' असें श्री. आप्पाजी जोशी यांना लिहिलें होतें ! लोकसंग्रह म्हणजे फुकटच्या गोष्टी नाहींत ! स्वतःचें जीवन क्षणाक्षणानें व कणाकणानें झिजवावें तेव्हां लोकसंग्रह होऊन संघासारखी विकसनशील व अपूर्व संघटना उभी राहते.

काटोलनंतर वऱ्हाडांतील प्रवासांत तेरा दिवसांत एकवीस गांवीं जाऊन शेंकडों जणांजवळ त्यांनीं संघाचा विचार मांडला. या दौऱ्यासाठीं एक स्वतंत्र मोटार ठरविली होती व त्यांतून डॉक्टरांबरोबर श्री. गोपाळराव चितळे, तात्यासाहेब सोहोनी, श्रावणे मास्तर व दादा परमार्थ हे कार्यकर्तेहि हिंडत होते. त्यांतील कार्यक्रम कसा धांवपळीचा होता, याचें वर्णन करतांना श्री. तात्यासाहेब सोहोनी सांगतात कीं, " सायंकाळीं शाखा व रात्रीं बैठक होई, ही कार्यकर्त्यांची बैठक रात्रीं १२ ला संपे व त्यानंतर अनौपचारिक गप्पा सुरू होत. त्या तीन-तीन वाजेपर्यंत सहज चालत. डॉक्टरांच्या बैठकींत अत्यंत मोकळेपणा असे. प्रवासांत असतांना बसल्या-बसल्या डॉक्टर मोटारींत डुलकी घेतील तेवढीच झोंप ! बाकी सबंध दिवसभर निरनिराळ्या ठिकाणीं लोकांना भेटून सारखें संघाविषयीं बोलणें चालू होतें. " या दौऱ्यांतच सर्व जिल्ह्यांतील प्रतिष्ठित कार्यकर्त्यांतून जिल्हा-

संघचालक व जिल्हा-कार्यवाह या पदांवर डॉक्टरांनीं कांहीं जणाची योजना करून दिली. त्याचप्रमाणें सबंध वऱ्हाड प्रांतासाठीं अकोल्यांतील प्रथितयश वकील श्री. बापूसाहेब सोहोनी यांची संघचालक म्हणून नियुक्ति त्या वेळी केली होती.

या प्रवासानंतर डिसेंबर १९३६ च्या शेवटीं नागपूर व चादा येथे जीं शिबिरे झालीं, त्यांना डॉक्टरानी भेटी दिल्या होत्या. या दोन्ही ठिकाणच्या भाषणात संघाचे कार्य महाराष्ट्रापासून थेट कराची, लाहोर, दिल्ली येथपर्यंत झपाट्याने पसरत असल्याविषयींचा आनंद व्यक्त झाला होता. त्याचप्रमाणे अहिंसे-वर सर्वत्र चालणारीं प्रवचनें ऐकून आधीच दुर्बल व गलितधैर्य झालेल्या हिंदु समाजाचे काय होणार, अशी चिंताहि डॉक्टराच्या भाषणातून व्यक्त झाली होती. नागपूरच्या भाषणांत ते म्हणाले होते कीं, "...'अहिंसा परमो धर्मः' हे तत्त्व आपल्या हिंदु समाजाच्या अंगी पूर्णपणे भिनलेले असल्याकारणाने सर्वांना अहिंसेचे पाठ देण्याची जबाबदारी हिंदूंवरच येऊन पडते. पण आपला सदुपदेश दुसऱ्यानीं ऐकावा असे वाटत असेल, तर आपल्या अंगी सामर्थ्य पाहिजे. हिंदु समाज आज दुर्बळ आहे आणि हिंसक वृत्तीचे लोक दुबळ्या समाजाला भीक घालीत नसतात. म्हणून अहिंसेचे घुटके हिंसात्मक वृत्तीच्या लोकाना पाजावयाचे असल्यास आपल्या उपदेशाचा परिणाम होईल इतके सामर्थ्यशाली आपण बनलें पाहिजे. आपल्या हिंदुस्थानात हे अहिंसेचे साम्राज्य नांदावे अशी आपली इच्छा असल्यास आपलें हिंदु समाजाचे दौर्बल्य नाहीसे करून त्याला आपण बलशाली करणे आवश्यक आहे. पण ही गोष्ट संघटनेशिवाय साध्य होणें शक्य नाहीं. म्हणून या हिंदु समाजाला संघटित करून समर्थ बनविणे हें प्रत्येक हिंदूचे कर्तव्य आहे, आणि संघ नेमके हेंच करूं इच्छितो."

चाद्याच्या भाषणांत डॉक्टरांनीं राष्ट्रीय स्वयंसेवक संघाला अभिप्रेत असलेली 'धर्मरक्षणा' ची कल्पना विशद केली होती. अहिंसेचे पुरस्कर्ते संघाचें सैनिकी बाह्य रूप पाहून जसे त्याला 'हिंसक' म्हणत, त्याप्रमाणें संघांत 'संध्या' शिकवीत नाहींत, स्वयंसेवक 'गंध' लावीत नाहींत व संघाच्या शिबिरातून सर-मिसळ बसून ते भोजन करतात, म्हणून संघाची धर्मरक्षणाची भाषा फसवी व पोकळ आहे, अशीहि टीका समाजांतील काहीं कर्मठ बांधवाकडून केली गेली. अशा वेळीं संघ आपल्या प्रार्थनेत ध्वजापुढें उभे राहून 'धर्मरक्षक वीर व्रतधारी बने!' असें कोणत्या अर्थाने म्हणतो, हे स्पष्ट करणे आवश्यक होते. त्यासाठीं चांद्याच्या भाषणांत त्यांनीं स्पष्टपणे सांगितलें कीं, "आम्ही हिंदु लोक धर्मनिष्ठ आहोंत, याचा आम्हांस मोठा अभिमान वाटतो. पण आम्हास हे समजत नाहीं कीं, धर्मरक्षण व धर्मपालन यांमध्यें फरक आहे. स्नान-संध्यादि वैयक्तिक धार्मिक आचार यथासांग करणें म्हणजे धर्मरक्षण नव्हे. ज्यांना धर्म जगवावयाचा आहे, त्यांच्यांत धर्मावरील हल्ल्यांचा प्रतिकार करण्याची शक्ति असावयास पाहिजे.

आमच्या दीन स्थितीला आम्हीच जबाबदार आहोंत. हिंदुस्थानांत जर धर्मभ्रष्टता पसरली असेल तर त्याला आमची वडील पिढीच जबाबदार आहे. परकीयांचे हल्ले त्यांना दिसत नव्हते काय? आक्रमणाची पाशवी वृत्ति परकीयांत बळावत आहे, याची जाणीव ठेवा. हिंदुस्थानांत हिंदु समाज स्वतंत्र राहूं शकतो, तो मानानें जगूं शकतो, छाती पुढें व मान वर करून चालूं शकतो, हा संघाचा विश्वास आहे. यासाठीं लागणारीं शिस्त, शील आणि संघटन यांचें शिक्षण आज पंचवीस हजारांवर तरुण लोक घेत आहेत. संघाचें लोण खेडोपाडीं व प्रांतोप्रांतीं पोंचलें, समाजाचे ठिकाणीं शक्ति, आत्मविश्वास व स्वाभिमान उत्पन्न झाला, तर पंचवीस कोटि संघटित लोकांस स्वतःच्या देशांत मानाचें जिणें जगणें मुळींच अशक्य नाहीं. हा देश हिंदुस्थान म्हणून ओळखला जातो. हिंदुत्व हा या राष्ट्राचा प्राण आहे. म्हणून या देशाची, धर्माची व संस्कृतीची सर्वतोपरी जबाबदारी हिंदूंना पार पाडतां यावी, ही एकच संघाची इच्छा आहे. ''

आपापल्या कल्पनेप्रमाणें आचार पाळून ज्या त्या व्यक्तीनें धर्मपालन अवश्य करावें. पण धर्मरक्षणासाठीं मात्र सर्व समाजाची धारणा करणारे वीरव्रत-धारीच हवेत, हें डॉक्टरांनीं आवर्जून सांगितलें होतें.

* * *

## २४ : थोडें कडू—थोडें गोड !

नागपूरची छावणी संपताच प. पू. डॉक्टर दि. १ जानेवारी १९३७ ला पुण्याला आले व त्यांनीं तेथील छावणीत दोन दिवस वास्तव्य केले. महाराष्ट्रातील हे पहिलें शिबिर असल्याने आधींच अपूर्व उत्साह होता. डॉक्टरांच्या भेटीमुळे स्वाभाविकच त्यात भर पडली. या दोन दिवसांत झालेल्या कार्यक्रमांना डॉक्टर स्वतः गणवेशांत उपस्थित असत व सर्व गोष्टींची अगदीं बारकाईनें पाहणी करीत. त्या वेळीं रात्रीच्या प्रशांत वातावरणांत डॉक्टरांनीं स्वयंसेवकांना शंका विचारण्यास सांगून सर्वांच्या शंकाचें अत्यंत मार्मिकपणे निरसनहि केलें होते. त्या प्रश्नोत्तराच्या ओघांत त्यांनीं सांगितलेला स्वानुभव स्वयंसेवकांच्या विचारांना वेगाने चालना देणारा होता. तो अनुभव असा होता कीं, ते एकदां डॉ. मुंजे याच्याबरोबर औरंगाबादला झालेल्या शुक्लयजुर्वेदीय कण्वशाखेच्या ब्राह्मण परिषदेला गेले होते. तेथें डॉ. मुंजेंची थाटाची मिरवणूक निघाली असतां त्यात मुंजेच्या मोटारी-मागच्याच मोटारींत डॉक्टर स्वतः बसलेले होते. वाटेत सत्काराचा स्वीकार करण्यासाठी संथपणे जाणारी मिरवणूक मध्येच थबकत असे. अशा एका ठिकाणी एका गृहस्थाने शेजारीं उभ्या असलेल्या वृद्ध मुसलमानास विचारलें की, ‘ हे मोटारींतील दाढी असलेले वृद्ध गृहस्थ कोण आहेत ? ’ त्यावर त्या मुसलमानाने उत्तर दिले कीं, ‘ वे तो खटमलके बाबा हैं ! ’

ही घटना सांगून डॉक्टर म्हणाले कीं, “ आमच्या समाजातील एका प्रमुख व त्यागी पुढाऱ्याविषयीं अन्य समाजातील एखादा यःकश्चित् मनुष्य असे प्रलाप काढूं शकतो, याचाच अर्थ क्षुद्र ढेकणाप्रमाणे सहज चिरडतां येईल अशी आपल्या समाजाची दयनीय अवस्था झाली आहे असा आहे. तेव्हा आपण आपल्या हिंदु समाजाला त्याच्या या हिंदुस्थानांत प्रतिष्ठा प्राप्त करून देण्यासाठी संघटित होऊन प्रयत्न केले पाहिजेत.

या पुण्याच्या शिबिरानंतर डॉक्टर सोलापूर व पंढरपूर शाखांना भेटी देऊन सागलीला गेले. त्यानंतर त्यांनी महाराष्ट्र प्रांत संघचालक श्री. काशिनाथपंत लिमये यांच्यासमवेत मिरज, जयसिंगपूर, हरिपूर, कोल्हापूर, कागल, निपाणी, चिकोडी, सौदलगे, चिपळूण, गुहागर, दाभोळ, माखजन, कऱ्हाड, सातारा वगैरे सव्वीस गांवी जाऊन तेथील शाखांना भेटी दिल्या. या प्रत्येक ठिकाणचें

वृत्त देणें विस्तारभयास्तव अवघड असलें तरी कांहीं ठळक प्रसंगांचा उल्लेख करणें आवश्यक आहे.

डॉक्टर कोल्हापूरला गेले तेव्हां तेथील संघाचें कार्य ‘ राजाराम स्वयंसेवक संघ ’ या नांवाखालीं चालत होतें. कारण सरकारी दडपणामुळें तेथें संस्थानी अधिकाऱ्यांनीं राष्ट्रीय स्वयंसेवक संघाला बंदी घातली होती. त्या वेळीं तेथील सुप्रसिद्ध अंबाबाईच्या मंदिराच्या प्राकारांत डॉक्टरांचें भाषण ठरविण्यांत आलें. त्या सभेला अध्यक्ष म्हणून एक प्रतिष्ठित वकील योजलेले होते. सभेला लोक जमले. पण सरकारी भीतीमुळें अध्यक्ष आले नाहींत. शेवटीं डॉक्टरांच्या सांगण्यावरून अध्यक्षीय खुर्चीवर श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांची प्रतिमा ठेवण्यांत आली. दोन-तीन सहस्र श्रोत्यांसमोर बोलावयास प्रारंभ करतांना डॉक्टर म्हणाले कीं, “ कोल्हापूरसारख्या ठिकाणीं माझ्यासारख्याच्या भाषणाला प्रत्यक्ष छत्रपति असल्यावर इतर अध्यक्ष कशाला ? मला शिवाजीमहाराज अध्यक्ष लाभत आहेत, हें माझें केवढें भाग्य ! ” हें वाक्य पुरें होतांच श्रोत्यांनीं टाळ्या वाजवून डॉक्टरांच्या समयसूचकतेची प्रशंसा केली होती, हें सांगावयास नकोच.

या वेळींच महाराष्ट्रांतील चित्रपटसृष्टींतील एक प्रमुख लेखक आणि दिग्दर्शक श्री. भालजी पेंढारकर यांनीं डॉक्टरांची भेट घेतली. त्या भेटीचा परिणाम म्हणजे ते राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे घटक झाले. पुढें १९४० मध्यें पुण्याच्या एका प्रकट सभेंत भाषण करतांना डॉक्टरांच्या या भेटीचें त्यांनीं अति मोजक्या शब्दांत मार्मिक वर्णन केलें होतें. ते म्हणाले होते कीं, “ कोण नागपूरचे डॉ. हेडगेवार आले आहेत तें मजेंत बघून यावें म्हणून मी ॲडव्होकेट दाभोळ-करांच्याकडे गेलों व अर्ध्या-पाऊण तासानें त्यांना भेटून जो बाहेर पडलों तों त्यांचा कायमचा अनुयायी होऊनच ! ” काळ्यासांवळ्या व तोंडावर देवीचे वण असलेल्या डॉक्टरांच्या बैठकींतील साध्या गप्पागोष्टींतहि अशी विलक्षण जादू होती !

या वास्तव्यांतच कोल्हापुरांतील डॉक्टरांनीं आपल्या मंडळांत प. पू. डॉक्टरांचा सत्कार केला होता. संघाची कल्पना त्यांनीं त्या प्रसंगीं सर्वांना विशद करून सांगितल्यावर कांहीं वेळ मनमोकळी चर्चा झाली. त्यांत एका डॉक्टरांनीं तेथील एका निराश्रित हिंदु महिलेची करुण कहाणी सांगून ‘ तिच्यासाठीं संघ काय करील ? ’ असा प्रश्न केला. त्यावर डॉक्टर उत्तरले कीं, ‘ सध्यां संघ कांहींहि करूं शकत नाहीं. मात्र तुम्ही तें काम अंगावर घेत असाल तर मी व्यक्तिशः साहाय्य देण्यास तयार आहें. ’ ‘ मग काय करावयाचा तुमचा संघ ? ’ अशा शब्दांत त्या प्रश्न विचारणाऱ्या गृहस्थानें असमाधान व्यक्त केलें. त्यावर डॉक्टर हंसून म्हणाले, “ मला तुमची मोठी मौज वाटते ! समजा, एखादें मोठें घर पेटलेलें असून माडींतल्या लोकांना वांचविण्यासाठीं कांहीं लोक प्रयत्न करीत आहेत. त्या वेळीं जर कोणी म्हणूं लागला कीं, ‘ अहो, सोप्यावरची तुळई पण

पेटली आहे. त्यासाठीं तुम्ही कांहीं करीत नसाल तर काय उपयोग तुमचा ? ' तर तें ठीक होईल काय ? आपल्या देशाची आज अशीच स्थिति असून समाजांत जागृति करण्याचा प्रयत्न संघाने उचलला आहे. ज्यांना दुसरे भाग पेटलेले दिसतात व त्याबद्दल हळहळ वाटते त्यानीं तें कार्य अवश्य करावें. पण संघ म्हणजे संघटित समाज अशी स्थिति निर्माण होईपर्यंत संघच सर्व काही करील, अशी अपेक्षा कशी बाळगतां येईल बरे ? तशी स्थिति निर्माण करण्यासाठींच आमची खटपट असून तसें झाल्यावर मात्र ' संघ काय करील ? ' असा प्रश्न विचारावाच लागणार नाही. " त्यांनीं या उत्तराने सर्वांचें समाधान तर केलेंच, पण तेथून बाहेर पडतांना त्या मंडळाच्या कार्यासाठीं वर्गणी म्हणून एक रुपया स्थानिक डॉक्टराच्या हातीं दिला.

याच प्रवासात ते साताऱ्याला गेले. तेव्हांची घटना जाता जातां येथे सांगितली पाहिजे ! ते साताऱ्याला येणार, असें आधींच शहरभर झालें होते. ती कुणकूण लागतांच प. पू. डॉक्टराच्या मागील पिढींतील एक क्रांतिकारक श्री. दामोदर बळवंत भिडे हे डॉक्टर संघस्थानावर येण्यापूर्वींच तेथे येऊन बाजूला वाट पाहत बसले. काहीं वेळानें डॉक्टर तेथे येतांच त्यानीं बाजूला उभ्या असलेल्या भिडे भटजींना ओळखले आणि ध्वजाला प्रणाम करून होताच पुढे होऊन त्याच्या-समोर सर्वांच्या देखत अगदीं साष्टांग नमस्कार घातला ! त्याची आत्मीयता ही इतकी उत्कट असे.

इतर ठिकाणच्या दौऱ्याप्रमाणेच या वेळींहि डॉक्टराना विश्राति घेण्यास धांवपळीमुळे जवळजवळ अवसरच मिळाला नव्हता. त्या वेळच्या एका पत्रात या प्रवासाचे सुंदर वर्णन सापडते. डॉक्टर म्हणतात कीं, " निरनिराळी पुष्कळ मडळी मधून मधून आम्हाला भेटत होती व परत जात होती. दौरा अर्थातच अत्यत घाईचा होता. दररोज दुपारीं २ वाजतां जेवण व रात्री २ वाजेपर्यंत जागरण यात कुठेहि खंड पडला नाहीं. पण एकंदरींत सर्व दौरा उत्साहपूर्ण असाच झाला. प्रत्येक शाखेत—विशेषतः तरुण लोकांचे ठिकाणीं—संघकार्याबद्दल आत्यंतिक निष्ठा व कळकळ दृग्गोचर होत होती व सर्व ठिकाणीं एक प्रकारचे नवचैतन्य पसरलें होते.

महाराष्ट्रात या वेळीं त्यांना ' अधिक कांहीं शाखांना भेटी द्या ' असा आग्रह झाला होता. परंतु डॉक्टरानीं त्याच्या कै. ती. आई-वडिलांच्या श्राद्धाला उपस्थित राहता यावें म्हणून तीं निमंत्रणें स्वीकारलीं नाहींत. प्रत्येक वर्षीं श्राद्धाला घरीं असावयाचें, असा प. पू. डॉक्टरांचा कटाक्ष होता व त्यानुसार ते जानेवारीच्या शेवटीं नागपूरला परत गेले.

या वर्षीं दि. २२ फेब्रुवारीला शंभर रुपये देणगी देऊन दि सेंट्रल मिलिटरी एज्युकेशन सोसायटी या डॉ. मुंजे यांच्या संस्थेचे डॉक्टर रीतसर सदस्य झाले.

यानंतर त्याच संस्थेच्या कार्यकारी मंडळाच्या बैठकीसाठीं ते दि. २१ व २२ मार्च १९३७ ला नासिकला गेले होते. त्या वेळीं त्यांनीं तेथील संघशाखेला भेट दिली असतां घडलेला एक महत्त्वपूर्ण प्रसंग आहे.

ते एके दिवशीं शाखेनंतर श्री. राजाभाऊ साठे वकील यांना भेटण्यासाठीं जात असतां त्यांचें लक्ष ' हिंदु कॉलनी ' या पाटीकडे गेलें. नासिकमध्यें ती नवी वसति होत होती व तिला हें नांव दिलेलें डॉक्टरांना खटकलें. त्यांनीं राजाभाऊंकडे स्वाभाविकच त्या पाटीचा विषय काढला. ते म्हणाले, " आपल्या देशांत एखाद्या वसाहतीला ' हिंदु ' नांव देणें योग्य नाहीं. मी मध्यंतरीं मुंबईला गेलों होतों. तेव्हां दादरमध्यें ' हिंदु कॉलनी ' असल्याचें पाहिलें व मीं बाबाराव सावरकर व डॉ. सावरकर यांच्याजवळ म्हटलें कीं, मुंबईत ' पारशी कॉलनी ' असणें सयुक्तिक आहे. पण आपल्याच देशांत ' हिंदु कॉलनी ' नांव देऊन आपण जणूं येथें परके आहोंत, असेंच व्यक्त करण्यासारखें नाहीं काय ? आपण इंग्लंडसारख्या एखाद्या परक्या देशांत वसाहत केली तरच तिला हिंदु वसाहत म्हणणें युक्त दिसेल. " डॉक्टरांचा हा मूलग्राही विचार अर्थातच स्वीकारला गेला व ती पाटी काढण्यांत आली. नासिकमध्यें ' गोळे कॉलनी ' म्हणून सध्यां जी ओळखली जाते ती वसति हीच !

या वेळीं भोंसला सैनिकी शाळेसाठीं गंगापूर रस्त्यावर घेतलेली जागा पाहण्यासाठीं डॉ. मुंजे, श्रीमंत प्रतापशेठ व डॉक्टर असे तिघे जण दि. २१ ला जाऊन आले होते. या वेळच्या कार्यकारिणीच्या बैठकींत शुल्क ठरविणें, शिक्षण-क्रम निश्चित करणें वगैरे गोष्टींतहि डॉक्टरांनीं पुढाकार घेतलेला होता. या नासिकच्या बैठकीनंतर परत जातांना धुळें, अमळनेर, जळगांव वगैरे शाखांना भेटी देऊन ते वऱ्हाड प्रांतांतल्या प्रौढ कार्यकर्त्यांच्या मेळाव्यासाठीं अकोला येथें गेले.

या वेळीं नासिकला येण्यापूर्वींच प. पू. डॉक्टरांना एक कडू-गोड अशी संमिश्र घटना पत्रांतून कळली होती. १९३६ च्या डिसेंबरमध्यें फैजपूर येथें जें कॉंग्रेसचें अधिवेशन झालें, त्याच्या प्रारंभींच पं. नेहरू ध्वजारोपण करीत असतां तिरंगी झेंडा अर्ध्यावरच गुंतून पडला. अनेक जणांनीं त्या ऐंशी फुटी स्तंभावर चढून तो घोटाळा दूर करण्याचा प्रयत्न केला. पण जो तो अर्ध्यावरूनच खालीं परते. तेव्हां शिरपूर शाखेंतील एक स्वयंसेवक श्री. किसनसिंग परदेशी पुढें होऊन, बघतां बघतां स्तंभावर सरसर चढून गेला. तो वर चढतांच स्तंभाबरोबरच सहस्रावधि लोकांचें चित्त हेलकावे खात होतें. किसनसिंगनें वर चढून झेंडा मोकळा केला व अधिवेशनाच्या प्रारंभींच होऊं घातलेला गोंधळ टाळला. सर्वांनाच त्याची धन्यता वाटली. तो खालीं उतरतांच त्याला पुढाऱ्यांनीं खांद्यावर उतरून घेतलें व प्रेक्षकांतील अनेक जणांनीं अक्षरशः त्या स्वयंसेवकावर रुपये उधळून त्याचा गौरव केला !

या घटनेनंतर प्रकट अधिवेशनांत त्याचा सत्कार करण्याचेंहि ठरले. पण इतक्यांत तो संघाचा स्वयंसेवक आहे अशी कुणकूण लागली आणि मग गौरवाचा विचार विरून गेला! हें वृत्त डॉक्टरांना समजल्यानंतर त्यानीं नासिकहून परत जाताना दि. २३ मार्चला धुळें येथे त्याला बोलावून घेऊन तेथील देवपुऱ्यांतील शाखेवर त्याचा सत्कार केला व त्याला एक चादीचा पेला दिला. त्या वेळीं किसनसिगला त्यानीं आपल्या शेजारीं खुर्चीवर आग्रहानें बसवून घेतले होते. त्या प्रसंगीं बोलतांना प. पू. डॉक्टरानी प्रकट केलेला विचार अत्यत मननीय होता. त्याच्या बोलण्याचा आशय असा होता कीं, "कोठेहि देशाचे कार्य अडले व ते पुढें नेण्याची शक्यता आपणाला असेल तर पक्ष वगैरे न पाहता आपण पुढे सरले पाहिजे." हीच दक्षता किसनसिंगानें दाखविली म्हणून त्यानीं त्याची अशी पाठ थोपटली. सघाचें नाव निघताच कपाळाला खारकेप्रमाणे आठ्या पाडणारी इतरांची असहिष्णुता कुठें आणि प. पू. डॉक्टराच्या देशभक्तींतून उदित झालेली 'आम्ही आहोंत एकशें पाच' अशी उदात्तता कोठे! जणूं वृत्तीचे ते दोन ध्रुवच!

अकोला येथें सर्व प्रौढासमोर दि. २८ मार्चला त्यानीं संघस्थापनेचा इतिहास सविस्तरपणे माडला होता. तें अकोल्याचें भाषण वऱ्हाडातील सर्व कार्यकर्त्यांना प्रेरक ठरले. त्या भाषणाच्या शेवटीं डॉक्टर असें म्हणाले होते कीं, "......जर आपल्या हिंदुस्थानच्या कल्याणार्थ कोणत्याहि कल्पना या संघटनेच्या मनात आल्या तर त्या कृतीत उतरविताना आपली सघटना कोती आहे, दुर्बल आहे, म्हणून ती काही करू शकत नाही, असे म्हणण्याची पाळी येऊ देणार नाहीं, एवढीच पवित्र, स्वाभिमानी, उज्ज्वल व तेजस्वी भावना हृदयाशी बाळगून, ही संघटना जास्तींत जास्त प्रबल व प्रभावी कशी होईल, याकडेच लक्ष दिलें पाहिजे. आपल्याला ऐहिक जगात आपल्या हिंदुराष्ट्राकरिता स्वाभिमानाने व उजळ माथ्यानें जगण्याकरिता जें जें काहीं करावे लागेल तें ते सर्व करण्याचे या संघटनेने ठरविलें आहे. हे कार्य किती मोठे आहे व याकरिता किती झटले पाहिजे, हें मीं सांगावयास नको. सुज्ञ, विचारी व बुद्धिप्रधान हिंदु तरुण या कार्यार्थ स्वतःला वाहून घेईल, असा माझा आत्मविश्वास आहे."

प्रा. माधवरावजी गोळवलकर तथा श्रीगुरुजी हे बंगालमध्ये सारगाछी आश्रमांत गेल्याची व तेथें ते स्वामी श्रीअखंडानंदजी याच्या सेवेंत निमग्न असल्याची माहिती गेल्या प्रकरणात आलेलीच आहे. एका थोर पुरुषाच्या सान्निध्यांत श्रीगुरुजींची ही साधना चालू असतांनाच स्वामीजींची प्रकृति मधुमेह व हृदयविकार यांमुळे खालावत चालली होती. अशा वेळी गुरुजींनीं त्याची इतक्या मनापासून व निरलसतेनें सेवाशुश्रूषा केली कीं, कांहीं काहीं दिवस उभ्या दिवसांत त्यांना स्वतःला जेवण करण्यासहि सवड मिळत नसे. पण तहानभूक विसरून केलेली ती सेवा स्वामी अखंडानंदांच्या पूर्ण कृपेनें सफल झाल्यावांचून

राहिली नाहीं. एके दिवशीं सारगाछी आश्रमाच्या ‘ विनोद कुटी ’मध्यें त्यांनीं गुरुजींना दीक्षा देऊन, दिव्यानें दिवा लावावा त्याप्रमाणें आपल्या कर्मयोगी जीवनाचें संक्रमण केलें ! ही महत्त्वपूर्ण घटना झाल्यानंतर स्वामी अखंडानंदजींची प्रकृति फारच बिघडल्यानें त्यांना सारगाछीहून कलकत्त्याला आणावें लागलें. या वेळीं गुरुजी अगदीं सारखे त्यांच्याजवळ असत. कलकत्त्याला बेलूर मठांत अनेक अद्ययावत् उपचार करण्यांत येत होते. पण त्यांचा उपयोग न होऊन दि. ७ फेब्रुवारी १९३७ या दिवशीं दुपारीं स्वामी अखंडानंदांनीं देह ठेवला !

या घटनेनें गुरुजींची मनःस्थिति किती अस्वस्थ झाली असेल, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. यानंतर ते पंधरावडाभर बेलूर मठांत थांबले व कांहीं संत-महंतांच्या भेटीगांठी झाल्यावर १९३७ च्या मार्च महिन्याच्या शेवटीं ते नागपूरला येऊन दाखल झाले. त्यांचें अज्ञातवासांत जाणें जितकें धक्का देणारें, तितकेंच त्यांचें अचानक झालेलें आगमनहि ! गुरुजी परत आल्यानें त्यांच्या वृद्ध आई-वडिलांना आपला एकुलता एक मुलगा परत आल्यानें कोण आनंद झाला ! पण डॉक्टरांना झालेला आनंद कांहीं विशेष होता ! गुरुजी सारगाछीच्या आश्रमांत जाण्यापूर्वी वकिली करीत असतांनाच त्यांच्या आईवडिलांना, ते यापुढें संसारांत पडणार नाहींत, याची पूर्ण कल्पना आली होती. डॉक्टरांनींहि ती गोष्ट ओळखली होती. आश्रमांतून गुरुजी परत आल्यानंतर तर त्यांची मनःस्थिति संसारांत वळण्याजोगी मुळींच राहिली नव्हती. वैयक्तिक जीवनाच्या दृष्टीनें ते आतां विरागी झाले होते. ज्या व्यक्तीच्या अंगीं कर्तृत्व, बुद्धिमत्ता व वैराग्य आहे, अशी व्यक्तीच राष्ट्राचा संसार करूं शकते, हें माहीत असल्यानेंच गुरुजींचें आगमन हें डॉक्टरांना विशेष वाटलें असल्यास नवल नव्हतें.

निरनिराळ्या प्रांतांतून आतां संघाचें काम वाढत होतें व सबंध दिवस अपुरा वाटावा इतका कामाचा ताण डॉक्टरांवर पडला होता. पण इतकें असूनहि त्यांची उल्हसित व खेळकर वृत्ति मुळींच मंदावली नाहीं व त्यांच्या मुखावरील हास्य कधीं खळलें नाहीं. १९३७ च्या एप्रिलमध्यें नागपूरहून पुण्याच्या वर्गाला जातांना घडलेला गमतीचा प्रकार या दृष्टीनें उल्लेखनीय आहे. प. पू. डॉक्टर दूरच्या प्रवासावर निघत, तेव्हां त्या मार्गावरील प्रमुख स्थानकांवरील कार्यकर्त्यांना दिवस व गाडी आधीं कळविली जाई. अशाच सूचना डॉक्टर पुण्याला निघाले त्याआधीं सिंदी, वर्धा, अकोला आदि ठिकाणीं पोंचल्या होत्या. या वेळीं डॉक्टरांच्या बरोबर श्री. श्रीकृष्ण पुराणिक हे होते. सिंदी स्थानकावर गाडी थांबली व अपेक्षेप्रमाणें वर्धा तालुका संघचालक श्रीमंत नानासाहेब टालाटुले कांहीं स्वयंसेवकांसह डॉक्टरांना भेटण्यासाठीं तेथें आले. गाडी थांबतांच डॉक्टर व पुराणिक डब्यासमोरच फलाटावर उभे राहिले. इकडे या सर्वांनीं तिसऱ्या वर्गाचे डबे पाहण्याची धांवपळ केली; पण त्यांना समोर फलाटावर असूनहि डॉक्टर

दिसले नाहींत. डॉक्टर नेहमींच तिसऱ्या वर्गातून प्रवास करीत असत व त्यामुळे त्या डब्यांतून डॉक्टर न दिसल्याने या गाडीत डॉक्टर नाहींत, असे वाटून ती सर्व मंडळी फलाटावर एके ठिकाणीं उभी राहून गाडी जाण्याची वाट पाहू लागली. डॉक्टर हा सर्व प्रकार मजेत बघत होते. इतक्यांत शिट्टी होऊन गाडी सुरू होताच डॉक्टर वर चढून डब्याच्या दारांत उभे राहिले व कार्यकर्त्यांच्या समोरून डबा जाताना ‘ नमस्कार नानासाहेब ’ असे म्हणत त्यानीं अभिवादन केलें ! त्या सर्वांची दृष्टि चमकून त्याच्याकडे वळली व त्यांचा वेष पाहून सर्व जण मोठ्याने हंसू लागले ! असे होणे स्वाभाविकच होते. कारण आज त्याच्यासमोर पांढरा शुभ्र खादीचा सुतना व डोक्यावर पांढरी शुभ्र खादीची टोपी वाकडी बसवलेली, अशा थाटात डॉक्टरांची मूर्ति उभी होती ! पुराणिकानींहि तोच साज चढविला होता ! सिंदीप्रमाणेंच अन्य स्थानकांवरहि कार्यकर्त्यांची डॉक्टराना हुडकण्यासाठीं त्रेधातिरपिट उडाली होती व गाडी सुटता सुटतां डॉक्टरांच्या नमस्काराने लक्ष वेधून त्यांना मनमुराद हंसण्याची संधि लाभली होती. अशी थट्टा हा डॉक्टराच्या स्वभावाचा अविभाज्य घटक होता, असे म्हणणे वावगे होणार नाहीं.

या वेळी डॉक्टर काहीं काम योजून दि. २१ एप्रिलला मुंबईला आले, पण तेथें त्या वेळीं इन्फ्लुएन्झाची साथ चालू होती व त्यात डॉक्टरानाहि ताप आला. एवढेच नव्हे तर ते जेथें उतरले होते त्या संघचालक श्री. दादा नाईक याच्या-कडील बहुतेक मडळी पडूनच होती. डॉक्टरांना भेटण्यासाठीं श्री. काशिनाथपत लिमये तेथे आले. पण त्यानाहि तापाने गांठलें ! या सर्व प्रकारात एक आठवडा गेला. डॉक्टर लिहितात कीं, “ एकंदरींत मुंबईचा हा आठवडा उपयुक्त न ठरता ‘ इन्फ्लुएन्झा वीक ’च ठरला व ज्या कामाकरिता मुंबईला मुद्दाम आलों होतो ती सर्व कामें तशींच राहून गेलीं. ” या तापातून उठल्यावर एक-दोन दिवस ते पेयावरच होते. त्यानंतर त्यांनीं ‘ होमली क्लब ’मधून दोन-चार दिवस साध्या जेवणाचा डबा आणविला. एके दिवशीं डब्यात मीठ नाहीं असे पाहून दादा नाईक डबा आणणाऱ्या स्वयसेवकावर जरा रागावले. पण डॉक्टर दादाना शांत करीत म्हणाले, “ मीठ नसले तरी जेवण अडणार नाही. लक्षांत ठेवा कीं, काही जण जेवण्यासाठीं जगतात व काही जण जगण्यासाठीं जेवतात. आपणहि जगण्या-साठींच जेवलें पाहिजे.” या वेळी ताप उतरल्यावर डॉक्टरांनीं त्या ‘ होमली क्लब ’च्या चालकांचा परिचय करून घेतला होता. ते गृहस्थ गोव्यामधील होते. आज ना उद्या त्यांच्या परिचयाचा लाभ होईल, अशी त्यामागें कल्पना होती.

मुंबईनंतर प. पू. डॉक्टर पुण्याला आले. त्याच्यामागोमाग श्री. बाबाराव सावरकरहि पुण्यास आले व एका उपाहारगृहांत उतरले. त्या वेळीं त्यांच्या पायाचे दुखणें सुरू होतें व लघवीचाहि विकार बळावला होता. बाबाराव तेथें आल्याचें कळतांच डॉक्टर त्यांना तेथून हट्टानेंच वर्गाच्या वसतिगृहांत घेऊन आले. आपला

दुसऱ्याला उपद्रव नको म्हणून बाबारावांना वर्गात उतरण्याचा संकोच वाटत होता; तर आपले स्नेही आजारी असतांना त्यांना एकटें कण्हत पडूं देणें ही गोष्ट डॉक्टरांच्या स्वभावांत बसणारी नव्हती. त्यांनीं बाबारावांना भावे प्रशाळेंत आणून एका स्वतंत्र खोलींत त्यांची व्यवस्था केली व ते तेथें असेपर्यंत त्यांची स्वतः काळजी वाहिली. याचें नांव स्नेह !

डॉक्टर पुण्याला येण्यापूर्वींच सोन्या मारुतीच्या मंदिराजवळ पश्चिम, दक्षिण व उत्तरेस ९० फुटांपर्यंत रस्त्यांत अगर सार्वजनिक ठिकाणीं व पूर्वेस तांबोळी मशिदीपर्यंत लक्ष्मीपथावर कोणतेंहि वाद्य वाजवावयाचें नाहीं, असा दंडक दि. २४ एप्रिलपासून सरकारनें केला होता व तो दंडक दि. १४ मेपर्यंत चालावयाचा होता. चिमुकल्या घंटेच्या नादानें मुसलमानांच्या नमाजांत व्यत्यय येतो, हें दाखविलेलें कारण अगदींच हास्यास्पद होतें. गेल्या वर्षीप्रमाणें मुसलमानांनीं दंगा करूं नये, म्हणून त्यांच्यावर निर्बंध घालण्याऐवजीं हिंदूंवरच असा दंडुका उगारणें हें संपूर्ण अन्याय्य होतें. त्या वेळीं साहित्यसम्राट् श्री. न. चिं. केळकर यांनीं ' हा हुकूम मूर्खपणाचा आणि नामुष्कीचा आहे, ' असें स्पष्ट मत लिहिलें होतें.

अशा दंडुकेशाहीला व अरेरावीला ठोकरून लावण्यासाठीं दि. २५ ला श्रीहनुमान-जयंतीच्या मुहूर्तावरच त्या मंदिरांतील घंटा वाजवून सत्याग्रहाला सुरुवात झाली. दि. २३ पर्यंत एक सहस्राहून अधिक जणांनीं सत्याग्रह करून ती अन्याय्य आज्ञा धुळीस मिळविली. सत्याग्रहांत लहानांपासून थोरांपर्यंत अनेकांनीं भाग घेतला. स्वतः श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं सत्याग्रह करतांना काढलेल्या पत्रकांत त्या छोटयाशा घंटेला उद्देशून म्हटलें होतें कीं—

" बये चिमुकले घंटे, काढी मंजुळ अपुला ध्वनी ।
तुझ्या गुणें जाणार, जाउं तरि हुकुमशाहि उलथुनी ॥ "

अशा या सत्याग्रहानें पुण्यांतील वातावरण चांगलेंच उत्तेजित झालें होतें. त्या वेळीं पुण्यास संघाचा वर्ग चालू होता. त्यासाठीं महाराष्ट्रांतील शेंकडों तरुण एकत्रित झालेले असल्यानें डॉक्टरांचें सारें लक्ष त्यांतच गुंतलेलें असणें स्वाभाविक होतें. डॉक्टरांनीं कोणाला ' तूं या सत्याग्रहांत जा ' असा आदेश दिला नाहीं. कारण त्यांना असा विश्वास वाटे कीं, संघाचा जाणता व मुरलेला स्वयंसेवक त्याला संघ-शाखेच्या कामांतून मोकळीक मिळेल तर अशा धडधडीत अन्यायाचा प्रतिकार करण्याठीं स्वयंप्रेरणेनें पुढें आल्यावांचून राहणार नाहीं. अशी मोकळीक ज्यांना होऊं शकली असे अनेक स्वयंसेवक त्यांत संमीलित झाले होते व त्याची डॉक्टरांना कल्पना होती. तरीहि अधूनमधून कोणी येऊन विचारीच कीं, " या सत्याग्रहांत संघ काय करणार ? " त्यावर डॉक्टर शांतपणें उत्तर देत कीं, " हा सत्याग्रह सर्व नागरिकांचा आहे व स्वयंसेवक हेहि नागरिकच असल्यामुळें शेंकडों जणांनीं नागरिक या नात्यानें त्यांत भाग घेतलेलाच आहे. " या उत्तरानें कांहींचें

समाधान झाले नाही. त्यांनीं संघाने स्पष्ट शब्दात घोषित करून ' संघ ' म्हणून त्यात भाग घ्यावा, असा आग्रह धरला. संघाच्या अस्तित्वाने स्वाभाविकपणें समाजांत अनेक गोष्टी घडाव्यात, पण त्याचें श्रेय व कर्तृत्व संघाकडे आले पाहिजे, अशी अभिलाषा स्वयंसेवकांच्या मनात निर्माण करून, ' समाजापासून आपण कोणी निराळे आहोत ' अशी सप्रदाय निर्माण करणारी भावना उत्तेजित करण्याला डॉक्टराचा विरोध होता. एकदा असा आग्रह करणारी व्यक्ति डॉक्टराच्या चागल्या परिचयाचीच असल्यानें, डॉक्टरानी नागपूरला नेण्यासाठीं जीं भिंतीवर शोभेसाठी लावावयाचीं वनगाईचीं शिंगे आणली होतीं तीं हातात घेऊन ते थट्टेत म्हणाले की, " सत्याग्रह करताना स्वयंसेवक ओळखले जावेत, यासाठी आतां प्रत्येकाला अशी शिंगे लावतों ! "

पुण्याच्या वर्गांतील आपला कार्यभाग डॉक्टरांनी पूर्ण करीत आणल्यावर त्यानीं स्वतः सत्याग्रहात जाण्याचा विचार बोलून दाखविला. सत्याग्रहासारखे प्रसंग म्हणजे हिंदु समाजाला जडलेल्या रोगावरील रामबाण उपाय नसून वरवरच्या मलमपट्टीसारखेच त्याचे स्थान आहे, जाग्रत, स्वाभिमानी व अनुशासित जीवनाचा अंगीकार केलेल्या कोटयवधि लोकांची सामूहिक शक्ति हीच हिंदु समाजासमोर निर्माण होणाऱ्या सर्व कटकटी मिटविणारी आहे, अशी डॉक्टराची ठाम धारणा होती. अशी सामूहिक शक्ति उदित करण्यासाठींच त्यानी प्राणपणाने सघाची यंत्रणा उभारली होती. असे असले तरी सर्व शरीरातील दूषित रक्त शुद्ध करणारे औषध सिद्ध होऊन ते लागू पडेपर्यंत शरीरावर फोड हे उठणार व त्याचा तात्पुरता उपशम करण्यासाठीं मलमपट्टीहि लागणार, हा व्यवहार मात्र डॉक्टर कधींच विसरत नसत. अशी सत्याग्रहाच्या उपयुक्ततेची पायरी ओळखूनच त्यानीं दि. १३ मे या दिवशीं सायंकाळी ४ वाजता सत्याग्रह केला. त्याच्याबरोबर श्री. अण्णासाहेब लिमये, श्री. महादेवशास्त्री दिवेकर, डॉक्टरांचे यवतमाळच्या राष्ट्रीय पाठशाळेतील शिक्षक व प्रसिद्ध इतिहाससंशोधक श्री. दत्तोपंत आपटे आदि मंडळी होती.

सत्याग्रहानंतर आरक्षकानीं या सर्वांना अटक करून नेले. अर्थात् अर्ध्या तासाने माहिती घेऊन झाल्यावर अंतराअंतराने त्या सर्वांची तात्पुरती मुक्तता करण्यांत आली. डॉक्टर अर्ध्या तासातच बाहेर आले. दुसऱ्या दिवशी त्याच्यावरील खटला चालावयाचा होता. त्या वेळीं डॉक्टरांच्या वतीने श्री. न. गो. अभ्यंकर यांनीं वकीलपत्र घेऊन न्यायाधीशांना सागितले कीं, " प. पू. डॉक्टर हे आमचे धर्मगुरु आहेत. त्यांना येथे यावें लागणे हा त्याचा कमीपणा आहे, अशा परिस्थितीमध्यें मलाच त्यांच्या वतीनें त्यांची बाजू माडण्याची अनुमति असावी. " हे कारण दिल्यानें न्यायाधीश हा कट्टर मुसलमान असूनहि त्यानें मागणीला मान्यता दिली.

त्यानंतर दि. १७ ला खटला चालून प. पू. डॉक्टरांना २५ रुपये दंड झाला. या वेळीं डॉक्टरांनीं दिलेलें त्रोटक लेखी वक्तव्य ( जबानी ) वैशिष्ट्यपूर्ण होतें. त्यांत ते म्हणतात कीं, " श्रीसोन्या मारुतीचे देवळाबाबत पुण्याचे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांनीं काढलेल्या वाद्यबंदीच्या हुकुमाचा मीं काळजीपूर्वक विचार केला व मला असें वाटतें कीं, अशा स्थितींत दर्शनास जाऊन देवळांतील घंटा वाजविणें हें माझें कर्तव्य आहे व ही गोष्ट, माझ्या राष्ट्राचा या हुकुमानें जो अपमान झाला आहे, त्याचा निषेध करण्याचा हल्लींचे परिस्थितींत हा एकच मार्ग असल्यानें, मी करीत आहें. " राष्ट्रीय अपमानाचा निषेध करण्याचे शक्तिशाली समाजाचे अन्य मार्ग असतात, याची डॉक्टरांना पुरेपूर जाणीव होती व त्यामुळें ' हल्लींचे परिस्थितींत हा एकच मार्ग असल्यामुळें ' या शब्दांत त्यांनीं हा मुळमुळीत मार्ग अगतिकतेनें स्वीकारावा लागत आहे, याची खंत वा बोच या वक्तव्यांत प्रकट केली होती.

या काळांत पाठिंबा व विरोध अशा दोन्ही प्रकारचे अनुभव संघकार्यकर्त्यांना ठिकठिकाणीं येऊं लागले होतें. वणी व यवतमाळ या भागांत स्वयंसेवकांना काँग्रेसवाल्यांनीं मारहाण केल्याचीं वृत्तें जशीं पत्रांतून मिळालीं होतीं, तशींच ' संघशाखा सुरू करावयाची आहे; तरी नियमावलि पाठवा वा प्रचारक पाठवा, ' अशी मागणी करणारीं पत्रेंहि त्यांच्याकडे येत. कांहीं ठिकाणीं तर एखादी संघशाखा पाहून आपल्या गांवीं स्वयंप्रेरणेनें तशी शाखा सुरू केल्याचेहि प्रकार घडत होते. अशाच तऱ्हेच्या महाराष्ट्रांतील एका शाखेचें छायाचित्र १९३७ च्या दसऱ्यापूर्वीं ' केसरीं 'त प्रसिद्ध झालें होतें व त्यांत विशेष म्हणजे संघाच्या कांहीं स्त्री सभासद असल्याचेंहि त्यावरून दिसत होतें ! अर्थात् केवळ उत्साहाच्या भरांत व अपुऱ्या माहितीवर सुरू होणाऱ्या शाखांत अशी विचित्रता असली तरी आपल्याकडेहि संघ असावा, अशी ओढ लावणारें वातावरण संघाच्या प्रयत्नांतून निर्माण झालें होतें, ही गोष्ट विसरून चालणार नाहीं.

स्वातंत्र्यवीर सावरकर यांची रत्नागिरीच्या स्थानबद्धतेंतून नुकतीच मुक्तता होऊन १९३७ च्या जून-जुलैमध्यें महाराष्ट्रांत त्यांच्या सत्कारानें वातावरण प्रफुल्लित झालें होतें. ज्या हिंदुराष्ट्राच्या पुनरुद्धार साठीं डॉक्टरांनीं १९२५ पासून अखंड प्रयत्न चालविले होते, त्या प्रयत्नांना स्वातंत्र्यवीरांच्या मुक्ततेनें स्वाभाविकच चालना मिळणार होती. त्यामुळें डॉक्टरांना अत्यंत आनंद झाला. स्वातंत्र्यवीर सावरकर ही एकटी व्यक्ति नाहीं तर ती एक उद्दीपक शक्ति आहे, याची डॉक्टरांना कल्पना होती व त्यामुळें सावरकरांचे सत्कार पुण्याकडे चालू असतां डॉक्टरांचा आनंद एका पत्रांतून कसा प्रकट झाला होता, तें पाहण्यासारखें आहे. ते लिहितात कीं, "...... खरोखर आपण भाग्यवान् आहांत यांत शंका नाहीं ! बॅ. सावरकरांसारख्या अतुल स्वार्थत्यागी व निस्सीम देशभक्ताचा आपल्याला सहवास घडून

त्यांच्या अमूल्य वाक्सुधेचा आपल्याला आस्वाद घेतां आला. आम्हीहि त्या दिवसाची प्रतीक्षा करीत आहो...... ''

या वर्षी उत्तर हिंदुस्थानांत कांहीं जण शिक्षणासाठीं व कांहीं जण प्रचारक मिळून दहा कार्यकर्ते डॉक्टरांनीं पाठवून दिले व त्यांच्या प्रयत्नानें दिल्ली, पंजाब, उत्तर प्रदेश, मध्यभारत या भागात संघाचे जाळें विणले जाऊं लागलें. या नव्या कार्यकर्त्यांना प्रोत्साहन देण्यासाठी श्री. दादाराव परमार्थ व श्री. बाबासाहेब आपटे याचा सचार सुरू होता. त्यांच्या जोडीनेच डॉक्टरांनी स्वतः दिल्ली व बनारस येथें काहीं दिवस वास्तव्य केले व तेथील कामाला चालना देऊन ते परत आले. तत्पूर्वी त्यानीं महाकोशलमध्येहि प्रवास केला. दिल्लीच्या वास्तव्यांत प्रामुख्याने पंजाबमधील कार्याच्या दृष्टीने त्यांनीं प्रयत्न केले होते. तसेच शेठ जुगलकिशोर बिर्ला यांची भेट घेऊन त्याना एका समारंभाचे अध्यक्ष म्हणून त्यानीं पाचारण केले होते. या भेटीत संघाची तर्कशुद्ध विचारसरणी व कार्याचा विस्तार ऐकून घेतल्यावर जुगलकिशोरांनीं ५०० रुपयाची देणगी देण्याचा विचार बोलून दाखविला. तेव्हा प. पू. डॉक्टर म्हणाले, "संघाला आपली देणगी नको, आपणच पाहिजे आहांत!" त्यातील रोख ध्यानीं घेऊन शेठजींनीं उत्तर दिलें, "यह समर्पण है, दान नहीं!" हें हृद्गत ऐकल्यावर डॉक्टरानी अर्थातच त्या पैशाचा स्वीकार केला.

दिल्लीनंतर प. पू. डॉक्टर काशी येथे गेले. तेथे त्याचें जवळजवळ पाऊण महिना वास्तव्य झालें. १९३७ मध्ये काशीच्या संघाच्या कामांत चागलेच यश दिसूं लागल्याने काहीं समाजवादी म्हणविणाऱ्या विद्यार्थ्यांनी काशी हिंदु विश्वविद्यालयात त्याविरुद्ध काहूर उठविले. संघ हा जातीय आहे व हिटलरच्या नाझी सघटनेप्रमाणें हुकूमशाहीवर आधारलेला आहे, असा त्यानीं प्रचार सुरू केला. असा प्रचार सुरू असतानाच संघाचे संस्थापक स्वतः काशीमध्यें येणार, ही गोष्ट त्यांना विरोधी प्रचार करण्याच्या दृष्टीने एक मोठी पर्वणीच वाटली. विद्यार्थिजगतात संघाविषयीं आधींच अप्रीति निर्माण करून ठेवली तर संघाचे प्रमुख डॉ. हेडगेवार याच्या आगमनाच्या वेळीं त्याच्या प्रचाराकडे विद्यार्थि-वर्ग आकृष्ट होणार नाही, अशी त्यांची अटकळ होती. या धोरणानेच समाजवादी विद्यार्थ्यांनीं एक पत्रक काढून ते वाटले. त्यात संघ श्रीमताच्या व संस्थानिकांच्या साठीं निघालेला असून त्यांच्याच पैशावर पोसलेला आहे, असाहि अलौकिक शोध लावलेला होता. तसेंच, डॉ. हेडगेवारांचा उल्लेख 'संघाचे पैगंबर' अशा शब्दांत करून स्वयंसेवकांनाहि खिजविण्याचा प्रयत्न करण्यात आला होता.

प. पू. डॉक्टर काशीला आल्यानंतर या पत्रकाची प्रत अर्थात् त्यांच्याहि पाहण्यांत आली. पण असल्या पत्रकाकडे स्वयंसेवकांनीं दुर्लक्ष करावें, असें त्यांनीं सांगितलें; एवढेंच नव्हे तर पाऊण महिन्यांत स्वतः डॉक्टरांनीं व्याख्यानांत

नि चर्चेंत चुकूनहि त्या पत्रकाचा उल्लेख न केल्यानें विरोधी विद्यार्थ्यांचा हिरमोड झाला. डॉक्टरांचें वागणें व प्रतिपादन यांतील विशुद्धता व सुसंगति यांचा परिणाम होऊन त्या पत्रकाचा फेस केव्हांच मुरून गेला व उलट तें पत्रक संघाला उपकारक ठरलें. त्यासंबंधीं डॉक्टर लिहितात कीं, " ...... संघाचें तत्त्वज्ञान व विचारसरणी ऐकल्यावर लोकांनीं या पत्रकवाल्यांना मूर्खांत काढलें व या पत्रकापूर्वीं ज्या लोकांचें लक्ष संघाकडे वेधलें गेलें नव्हतें, तेहि आपोआप संघाकडे ओढले गेले ...या पत्रकामुळें आपला तोटा होण्याऐवजीं बराच फायदा झाला."

या घटनेनंतर एक महिन्यांतच प. पू. डॉक्टरांनीं संघ व त्याचे टीकाकार यासंबंधांत पत्राच्या ओघांत कांहीं विचार प्रकट केलेले दिसतात. त्यांतील एक पत्र पुण्याचे संघचालक श्री. विनायकराव आपटे यांना उद्देशून लिहिलेलें होतें व दुसरें पत्र महाराष्ट्र प्रांत संघचालक श्री. का. भा. लिमये यांना लिहिलें होतें. त्या वेळीं पुण्यांत एक संघाच्या विचारावर आधारलेलें मराठी साप्ताहिक सुरू करण्याचा विचार चालू होता. त्या विचाराला अनुमति देऊन डॉक्टरांनीं लिहिलें होतें कीं, "......या पत्रांत अर्थातच आपलीच विचारसरणी नेहमीं प्रतिपादन होणार यांत मुळीच शंका नाहीं. पण संघावर निरनिराळ्या लोकांकडून होणारे आघात व घेतले जाणारे आक्षेप यांच्याशीं उत्तरें-प्रत्युत्तरें करण्याचे भानगडींत मात्र आपण कधीं पडूं नये. आजकाल आपले बाजूचे वर्तमानपत्रांत संघावर अनंत खोटेनाटे आरोप केलेले आमचे वाचनांत येत आहेत. हे आरोप वर्तमानपत्रांतून केलेले असोत अगर सार्वजनिक रीतीनें सभेंत केलेले असोत, आपल्या लोकांनीं त्यांना मुळींच उत्तरें न देतां तिकडे पूर्ण दुर्लक्ष करावें."

प. पू. डॉक्टरांनीं उदित केलेल्या संघटनशास्त्रांतील अनुभवान्तीं अत्यंत यशस्वी ठरलेलें हें तंत्र होतें कीं, आपण हत्तीप्रमाणें आपल्या योजलेल्या मार्गानें शांतपणें जावें व भुंकणाऱ्यांना आपणांवर सुखेनैव भुंकूं द्यावें ! टीकाकारांकडे दुर्लक्ष करण्यानें आपला वेळ व श्रम हे तर वांचतातच, पण आपण अशा कोल्हे-कुईतहि न डगमगतां पुढें जाऊं लागलों म्हणजे आपल्या आत्मविश्वासाचा प्रत्यय येऊन, बिचारे टीकाकार खजील होत असतात. टीकाकारांचें म्हणणें डॉक्टर ऐकून घेत असत व वाचीतहि असत. एवढेंच नव्हे तर त्यांचीं उत्तरें देतां येतील इतकी स्वयंसेवकांची बौद्धिक पातळी उंचावली पाहिजे, यासाठींहि लक्षपूर्वक प्रयत्न करीत. पण आपणांजवळ अचूक आणि रोखठोक उत्तरें आहेत म्हणून सार्वजनिकपणें वादाच्या न संपणाऱ्या भोवऱ्यांत गुंतवून घेण्यांत मात्र कांहीं अर्थ नाहीं, असें त्यांना वाटे. ज्याला या संघर्षमय व अभिनिवेशानें युक्त अशा समाजांत प्रत्यक्ष घडण करून दाखवावयाची असेल, त्यानें 'तुटे वाद संवाद तो हीतकारी' ही समर्थांची उक्ति ध्यानीं घ्यावी; पण त्याचबरोबर एकानें आपली चूक मान्य करून असा वाद तोडला आहे असें सहसा कुठेंच दिसत नाहीं, हा सार्वत्रिक अनुभव

विसरूं नये. ' वादी तो न वळे, न वादहि खळे, होती खुळे आंधळे। ' हाच सर्वत्र येणारा अनुभव ध्यानीं घेऊन डॉक्टरांनीं वादंगात न पडण्याचे धोरण अत्यत कांटेकोरपणे पाळलेलें दिसते. त्यामुळे १९३७ मध्ये महाराष्ट्रांत संघविरोधकानी लेखण्या सरसावल्या, त्या वेळीं डॉक्टरांनीं श्री. का. भा. लिमये याना कळविले कीं, " ......आपले इकडील वर्तमानपत्रात संघाच्या विरुद्ध उठविण्यांत आलेलें काहूर वाचून आमची सर्वांची फारच करमणूक झाली. आमच्या मनावर असल्या गोष्टीचा कधींच परिणाम होत नाही. आपण त्यासंबधाने निर्धास्त असावे. आपण मात्र आपल्याइकडील संघकार्याला या उठलेल्या वावटळीपासून कोणताहि धक्का लागणार नाहीं, याची अवश्य काळजी घ्यावी. असल्या गोष्टींनीं आपल्या कार्याची भरभराट मात्र निश्चित होणार, यात मुळीच शका नाही. "

प. पू. डॉक्टर काशी येथील विश्वविद्यालयातील शाखेला भेट देण्यासाठीं गेले तेव्हा स्वाभाविकच प्रथमतः महामना पं. मदनमोहन मालवीय याच्या निवासावर गेले. वास्तविक ती त्याची भेटण्याची वेळ नव्हती. कारण ते आतील एका खोलींत नेहमीप्रमाणे अंगाला मालिश करून घेत होते. पण डॉक्टराच्या सांगण्यावरून बाहेरील नोकराने ते आल्याचे सागतांच त्यांनीं त्याना लगेच आत घेऊन येण्याची सूचना दिली. त्यानुसार डॉक्टर आत गेले तेव्हा केवळ काचा मारून बसलेल्या पंडितजींनीं खोलीच्या दाराजवळ येऊन मोठ्या प्रेमाने त्याचे स्वागत करून आपणांजवळ बसवून घेतले व त्यानतर बराच वेळपर्यंत त्याच्या मनमोकळ्या गोष्टी झाल्या. प. पू. डॉक्टरांच्या हिंदुराष्ट्रोद्धारासाठी चाललेल्या असामान्य खटपटीमुळेंच मोठ्यामोठ्यांच्या मनात त्याच्याविषयी अशी आदराची भावना निर्माण झाली होती.

दिल्ली-बनारसहून परत येताना प्रयाग, हुशंगाबाद, बैतूल वगैरे शाखाना भेटी देऊन डॉक्टर दसऱ्यापूर्वी नागपूरला आले. या वेळी दसऱ्याचे संचलन हे सारे नागपूर शहर दणाणून टाकणारें होत असे व त्या नुसत्या सचलनाच्या ताला-बरोबर सहस्रावधि नागरिकांच्या हृदयातील भावनाच्या ताराहि स्वाभिमानाने झंकृत होत. संचलनाला साथ देणाऱ्या संघाच्या तुतारीतून निघणाऱ्या आवाजाचे वर्णन करतांना ' सावधान ' साप्ताहिकानें म्हटलें होते कीं, " त्रयस्थाच्या हृदयात कौतुक, मित्रांच्या हृदयात अभिमान व शत्रूंच्या हृदयात भय उत्पन्न करणारा तो ध्वनि आहे. ती आशेची हांक आहे. तो पराक्रमाचा हुंकार आहे. तो विजिगीषेचा नाद आहे. उज्ज्वल भविष्यकालाच्या येत्या पावलांची ती चाहूल आहे व उज्ज्वल-तर परंपरेचें तें अमोल आशीर्वचनच आहे."

प. पू. डॉक्टरांच्या अखंड प्रयत्नांतून असा आवाज भरतखंडांत अनेक ठिकाणीं घुमूं लागला तरीहि डॉक्टरांच्या जवळपास राहणाऱ्या व त्यांच्याशीं चांगला परिचय असणाऱ्या अशा कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांच्या कानांपर्यंत तो आवाज

पोहोंचला नव्हता, ही गोष्ट आश्चर्यकारक दिसली तरी दुर्दैवानें खरी होती. मध्य-प्रांत काँग्रेसकडून दि. १० नोव्हेंबरला डॉक्टरांना एक पत्र आलें व त्यांत काँग्रेसला संघासंबंधीं धोरण निश्चित करावयाचें असल्यानें ' राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचा उद्देश, कार्यक्रम व धोरण याविषयीं अधिकृत माहिती पाठवा, ' अशी मागणी केली होती. वास्तविक नागपूरमध्यें संघ सुरू होण्यापूर्वींपासून डॉक्टरांचा काँग्रेस-कार्यकर्त्यांशीं किती घनिष्ठ संबंध होता, हें आपण पाहिलेंच आहे. अशा स्थितींत असली पत्ररूपानें औपचारिक विचारणा करण्याइतकें संघासंबंधींचें अज्ञान त्या कार्यकर्त्यांत असणें संभवनीय नव्हतें. त्यामुळें डॉक्टरांनीं काँग्रेसच्या कार्यवाहांना कळविलें कीं, "......आपण आमचे संबंधानें माहिती विचारल्याचें पाहून आश्चर्य वाटलें. वास्तविक राष्ट्रीय स्वयंसेवक संघाची स्थापना होऊन आज बारा वर्षें होऊन गेलेलीं आहेत व एवढ्या वेळांत प्रतिवर्षीं होणाऱ्या निरनिराळ्या उत्सवप्रसंगीं संघाच्या मुख्य मुख्य अधिकाऱ्यांनीं संघासंबंधींची अधिकृत माहिती जनतेसमोर मांडलेली आहे. त्याशिवाय आपणांला कांहीं सांगण्यासारखें उरलेलें आहे, असें आम्हांला वाटत नाहीं. तसदीची माफी असावी. "

या पत्रानंतर काटोल व अकोला भागांत डॉक्टर दौऱ्यावर गेले. तेवढ्या अवधींत काँग्रेस कार्यवाहांनीं तीन पत्रें पाठविलीं. त्यांत ' डॉक्टरांचें उत्तर असमाधानकारक व उडवाउडवीचें आहे, ' असें लिहून शिवाय एक लांबलचक प्रश्नपत्रिकाहि उत्तरें लिहून पाठविण्यासाठीं डॉक्टरांकडे धाडली होती. डॉक्टर प्रवासाहून परत येतांच त्यांना तीं पत्रें मिळालीं. तीं वाचून त्यांनीं त्या पत्रांतील रागरंग ओळखला व जाणूनबुजून अज्ञान पांघरून, खवचट प्रश्न विचारणाऱ्या परिचित कार्यवाहाला त्याच्या भाषेंतच उत्तर लिहिण्याचा विचार केला. या वेळीं हीं आलेलीं पत्रें प्रांतांतील वेचक अधिकाऱ्यांना त्यांनीं दाखविलीं होतीं व या संबंधांत काय धोरण स्वीकारावें, याचा कानोसा घेण्यास ते विसरले नव्हते. दि. १ डिसेंबरला पूर्ण विचारांतीं त्यांनीं जें उत्तर धाडलें, तें त्यांच्या स्वभावांतील अनेक पैलूंवर प्रकाश पाडणारें आहे. त्यांत कानउघाडणीहि आहे नि सद्भावनांची पेरणीहि आहे. तें पत्र म्हणजे त्यांच्या लेखणीच्या तिखटपणाचें व स्पष्टवक्तेपणाचें उत्तम उदाहरण म्हणून दाखवितां येईल.

ते लिहितात, " आपलीं कृपापत्रें पोहोंचलीं. मी काटोल तालुका दौऱ्यावरून परत येतांच ताबडतोब अकोला येथें अधिवेशनाला गेल्याकारणानें आपल्याला उत्तर पाठविण्यास विलंब लागला, याबद्दल क्षमा असावी.

" आपण आम्हीं पाठविलेल्या उत्तराला ' उडवाउडवीचें उत्तर ' असें सर्टिफिकेट दिलें. आपण आमचे संबंधानें लिहितांना यापेक्षां जरा चांगली भाषा वापरली असती तर बरें झालें असतें. आम्हांला मात्र आपल्या पद्धतीची भाषा वापरतां येत नाहीं, याला आमचा नाइलाज आहे. आपण आम्हांला परीक्षेला

बसणारा एक विद्यार्थी समजून पाठविलेली प्रश्नपत्रिका पोंचली. पण आतां आमचें वय परीक्षेला बसण्याचें राहिलें नसल्यानें आपल्या इच्छेला आम्हांला मान देतां येत नाही, याबद्दल आम्हांला दिलगिरी वाटते. वस्तुतः आपण याच प्रांतातील व याच शहरातील राहणारे आहांत. एवढेंच नव्हे तर गांवांत होणाऱ्या सर्व चळवळींकडे चौकस बुद्धीनें व सूक्ष्म दृष्टीने पाहत असतां, अशी आमची समजूत आहे. असे असतांना या शहरात इतक्या दीर्घ कालपर्यंत दणदणीतपणे जनतेसमोर वावरत असणाऱ्या संस्थेची व तिच्या कार्याची आपणांस माहिती नसावी, हे खरोखरच एक मोठें गूढ आहे. 'संघ हा कॉंग्रेसविरोधी आहे' असा जनतेच्या आड लपून आपण संघावर आरोप केला आहे. आम्ही आपल्या धाष्ट्याचें कौतुक करतो व आपणांस स्पष्टपणे सागू इच्छितों कीं, संघ हा कॉंग्रेसचा केव्हाहि विरोधी नव्हता व नाहीं ! कॉंग्रेसचे काहीं कार्यकर्ते व कॉंग्रेसचीं मुखपत्रे म्हणवून घेणारी काहीं वर्तमानपत्रे हीं उघड उघड शिव्या देऊन संघाला विरोध करतात व लोकांनी या संघांत जाऊं नये, पालकानीं या संघात मुले पाठवूं नयेत, असे प्रतिपादन करतात, ही गोष्ट आम्हांला माहीत आहे. परंतु या लोकानीं उत्पन्न केलेल्या चिखलांत आम्ही आजपर्यंत कधींहि उतरलों नाहीं, हेंहि आपणाला नम्रपणे कळवूं इच्छितो. वर निर्देशिलेलीं वर्तमानपत्रे व कार्यकर्ते म्हणजे कॉंग्रेस होय, असे आम्ही समजत नाही. आणि म्हणून त्यांनी जरी अशा प्रकारचा विरोध आरंभिला असला तरी कॉंग्रेस आमचा विरोध करते, असे आम्हांला मुळीच वाटत नाही. कॉंग्रेसने आमचा व आम्ही कॉंग्रेसचा विरोध केला असता तर आज कित्येक ठिकाणी सघाचे प्रमुख कार्यकर्ते कॉंग्रेसमध्यें व कॉंग्रेसचे प्रमुख कार्यकर्ते संघामध्यें कार्य करीत असताना मुळीच दिसले नसते. सारांश, सार्वजनिक कार्य करणाऱ्या लोकांनीं परस्पराचा द्वेष व विरोध न करता आपण आपल्या क्षेत्रामध्ये सात्विक अंतःकरणानें कार्य करण्यांतच मौज आहे, असें आमचें मत आहे. सुज्ञांस जास्त काय लिहावे ? "

संघटनेच्या अवाढव्य व्यापात असे खारटतुरट प्रसंग येत असतात; पण अशा कोणत्याहि वेळीं डॉक्टराच्या मनाचे सतुलन कधींच बिघडत नसे व क्वचित् थोडा भांड्याला भाडे लागण्याचा दुसऱ्यामुळे प्रसंग आला तर थोड्याच वेळांत भांड्याला हात लावून तो नाद थांबविण्याची दक्षता डॉक्टर घेत. अशा कोणत्याहि प्रसंगानें कायमचे रागद्वेष निर्माण होणें हे डॉक्टराच्या संबंधांत असंभाव्य होते, असेच म्हणणे युक्त दिसते.

डिसेंबर १९३७ मध्यें स्वातंत्र्यवीर तात्याराव सावरकर यांचा वऱ्हाड-मध्यप्रांतीय दौरा झाला. या दौऱ्यांत नागपूर, चांदा, वर्धा, भंडारा, अकोला, उमरेड वगैरे ठिकाणीं डॉक्टर स्वतः त्यांच्याबरोबर राहिले होते. या गाजलेल्या दौऱ्यांत दि. १२ ला त्याचा नागपूर शाखेवर थाटानें सत्कार करण्यांत आला. इतरहि प्रत्येक ठिकाणीं सावरकरांना शाखा दाखविण्यांत आल्या. संघाच्या रूपानें

डॉक्टरांनीं वऱ्हाड-मध्यप्रांतांत हिंदुत्वाचें खेळविलेलें जागतें चैतन्य पाहून स्वातंत्र्य-वीरांनीं धन्योद्गार काढून संघाला शुभाशीर्वाद दिले होते.

या दौऱ्यानंतर डिसेंबरच्या शेवटीं काटोल, नागपूर, वर्धा, चांदा व यवतमाळ इतक्या ठिकाणीं झालेल्या शिबिरांना डॉक्टरांनीं भेटी दिल्या. नागपूर येथें झालेल्या शिबिराचें उद्‌घाटन औंध संस्थानचे राजे पंतप्रतिनिधि यांचे हस्तें झालें. त्या वेळीं एक सहस्र बाल स्वयंसेवकांचा शिस्तपूर्ण मेळावा कौतुकानें पाहत असतां महाराजांनीं आपल्याबरोबर आणलेल्या छायाचित्रकाराला त्याचा चित्रपट घेण्याची सूचना दिली. अर्थात् कांहीं क्षणांचें चित्रण पूर्ण होतें न होतें तोंच डॉक्टरांची दृष्टि सहज तिकडे गेली व संघाच्या दृष्टीनें तो प्रकार अयोग्य असल्यानें चित्रण लगेच थांबविण्यांत आलें. त्या कांहीं मिनिटांच्या चित्रणांत सुदैवानें परम-पूजनीय डॉक्टर ध्वजारोपण करीत आहेत, ही घटना पूर्णपणें चित्रित झाली होती.

पवित्र भगवा ध्वज अखंड भारतावर चढविण्याची डॉक्टरांच्या मनांतील महन्मंगल आकांक्षा भावी पिढ्यांसाठीं अशी नेमकी चित्रित होण्याचा हा योगायोग हृद्य खराच !

* * *

# २५ : हिंदु युवक परिषद्

स्वातंत्र्यवीर बॅरिस्टर तात्याराव सावरकर याचा वऱ्हाड-मध्यप्रातातील संचार १९३७ च्या शेवटीं चांगलाच गाजला व रा. स्व. संघाने अखंडपणे चालविलेल्या हिंदुराष्ट्रवादाच्या प्रचाराला चालना मिळाली. त्या वेळच्या दौऱ्याची फलश्रुति लिहिताना प. पू. डॉक्टर म्हणतात की, " .. .. त्याच्या या दौऱ्याने या बाजूला समुद्रमंथनाच्या वेळीं जी परिस्थिति निर्माण झाली असेल तीच झालेली आहे. एकंदरीने लोकांत नवचैतन्य स्फुरण पावले आहे." अशा उल्हासाने फुललेल्या वातावरणात कॉंग्रेसमधील विचारवतानाहि संघाच्या दैनदिन कार्यामागील हेतूंचा विचार करावयास लावील, अशी पाकिस्तानी कल्पनेची राष्ट्रविनाशक वावटळ सभोवतीं जाणवूं लागली होती. 'हिदी राष्ट्र' ही कल्पना बोलली जात असली तरी केवळ बोलघेवड्या संस्थानी परिस्थितीला आटोक्यात आणून पाकिस्तानी कल्पनेला मूठमाती देता येणार नाही, ही गोष्ट दिवसेदिवस स्पष्ट होत जाणे स्वाभाविक होते. परिस्थितीचा एकूण रगच तसा होता. दि. १ जानेवारी १९३८ ला काटोल येथील नागपूर जिल्हा शिबिराचा समारोप करताना लोक-नायक बापूजी अणे यानीं काढलेले उद्गार त्या वेळी कॉंग्रेसमधील विचारी कार्य-कर्त्यांना सघाचे दर्शन कसे घडत होते, यावर प्रकाश टाकणारे होते. ते म्हणाले कीं, " एका बाजूने औदासीन्याचा खडक आणि दुसऱ्या बाजूने विरोधाची माती पोखरीत पोखरीत प्रभावी चळवळीची नदी वाहत असते. संघहि याच मार्गाने वाढला असून आज अगदी दृढमूल झालेला आहे. यापुढे देशातील सर्वांनी सघाशी मिळते घेऊनच काम केले पाहिजे." यापुढे जाऊन ते म्हणाले की, " ही संघटना म्हणजे राष्ट्राचें कवच होय. असले कवच डॉ. हेडगेवारानीं हिंदुराष्ट्राला मिळवून देण्याचा उपक्रम चालविला, याबद्दल मी त्याना धन्यवाद देतो. ही संघटना राष्ट्रांच्या काना-कोपऱ्यांतूनहि पसरली पाहिजे, अशी माझी इच्छा आहे."

अशा वेळी डॉक्टराचे लक्ष नवे नवे कार्यकर्ते उभे करून त्यांना नव्या क्षेत्रांत नेऊन उभे करण्यावर लागणे स्वाभाविक होतें. अन्य प्रातांतील मंडळींना या ना त्या निमित्ताने नागपूरला आणून संघकार्याचे शिस्तबद्ध व प्रोत्साहक स्वरूप जवळून दाखविण्याचा उपक्रमहि सुरूच होता. या वर्षारंभीं पंजाबमधून श्री. धर्मवीरजी नागपूरला येऊन गेले. त्या वेळीं डॉक्टरांनीं आपल्या सहवासांत त्यांना

किती उत्साहित केलें होतें, हें वानगी म्हणून पाहण्यासारखें आहे. श्री. धर्मवीरजी लिहितात, " मी नागपूरला येऊन गेलों त्याचा मला अतिशय आनंद होत आहे. जर आज मला मरण आलें तर मी समाधानानें मरेन. हा सर्व आपला प्रभाव !" ( " I am aufully glad that I visited Nagpur. If I die today, I will die with a satisfied heart. All credit to you, Sir. " )

या काळांतील पत्रांतून डॉक्टरांनीं आपल्या लेखणीनें ' आगे बढो ' 'आगे बढो ' चें प्रोत्साहन कार्यकर्त्यांना कसें दिलें होतें, तें पाहण्यासारखें आहे. दिल्लीला गेलेल्या कार्यकर्त्यांना ते लिहितात कीं, " ...... खरोखर परमेश्वरानें तुम्हांला अत्यंत उत्तम क्षेत्र दिग्विजय करण्याकरितां दिलें आहे आणि तुम्ही स्वपराक्रमानें या क्षेत्रांत विजयी होणारच, असा सर्वांचा विश्वास आहे. " नगरचे श्री. बाबुराव मोरे यांना ते लिहितात कीं, "...... आतां आपले संकटाचे दिवस संपले असून अनुकूल दिवस आले आहेत, असें समजावयास हरकत नाहीं. पण हें सर्व तुम्ही व तुमचे सहकारी यांनीं दाखविलेल्या चिकाटीचें फळ होय. "

जानेवारीमध्यें दि. १६ ला डॉक्टर भोंसला सैनिकी विद्यालयाच्या निमित्तानें नासिकला गेले होते. त्या वेळीं त्यांनीं डॉ. मुंजे यांच्या पत्रावरून तेथील विद्यार्थ्यांसाठीं नागपूरहून १०० लाठ्या नेल्या होत्या असें दिसतें. इतक्या लहान-सहान गोष्टींतहि त्यांना प्रारंभीं लक्ष घालावें लागलें होतें. नासिकहून परत जातांना धुळें, भुसावळ, अकोला आदि शाखांना भेटी देऊन ते दि. २१ ला नागपूरला पोहोंचले. फेब्रुवारी दि. १२ ला त्यांनीं नागपूर येथें निवडक अधिकारी व कार्यकर्ते यांची बैठक घेऊन त्या प्रांतासाठीं संघचालक म्हणून प्रसिद्ध वकील श्री. रामचंद्र नारायण तथा बाबासाहेब पाध्ये* यांची नियुक्ति केली. यानंतर अवघ्या पांचच दिवसांनीं महाराष्ट्र, वऱ्हाड व नागपूर अशा संघाच्या दृष्टीनें पाडलेल्या तीन प्रांतांच्या प्रांत-संघचालकांना नागपूरला एकत्रित आणून त्यांच्याजवळ डॉक्टरांनीं कार्यवाढीच्या दृष्टीनें विचारविनिमय केला. ह्या तीन प्रांतांत व्यवस्थित अधिकारी कार्यकर्ता-वर्ग उभा करण्यांत डॉक्टरांना चांगलेंच यश मिळालें होतें. कार्याचा विस्तार करतां करतां, तो विस्तार फापटपसारा न ठरावा यासाठीं एक बळकट अनुशासन-सूत्र निर्माण करावें लागतें, याची डॉक्टरांना परिपूर्ण कल्पना होती व त्यांतून त्यांनीं सर्व प्रांतांतील कार्याची गुंफण दक्षतेनें केलेली दिसते. मार्चच्या प्रारंभीं डॉक्टर महाकोशल प्रांतांत फिरून आले. त्या वेळीं त्यांनीं शिवनी, नरसिंगपूर, सागर, दमो आदि शाखांना भेटी दिलेल्या होत्या. याच वेळीं डॉक्टरांचे वयोवृद्ध चुलते श्री. आबाजी हेडगेवार हेहि खानदेश भागांतील प्रचारकार्य आटोपून नागपूरला येऊन पोहोंचले. डॉक्टरांना जिकडून तिकडून

** हेच पुढें मध्यप्रांताच्या वरिष्ठ न्यायालयांत न्यायमूर्तिपदावर होते.*

प्रगतीचीं वृत्ते ऐकावयास मिळत होती. विशेषतः पंजाबांत रावळपिंडी, मंडी, बहाउद्दीन, सियालकोट, लाहोर, जालंधर, अमृतसर, सुनाम, हिसार आदि ठिकाणी संघाचा ध्वज डोलूं लागला होता व पंजाबांतील अन्य ठिकाणाहून येणारे लोक शेंकडो तरुणाच्या कार्यक्रमानीं, प्रभावित होऊन जात होते. अशा उत्साहवर्धक वातावरणांत सारा भारतवर्ष सघमय केव्हां होईल, असा एकमेव ध्यास घेऊन डॉक्टराची धावपळ अखंड सुरू होती. त्यांतहि नागपूरमध्यें ' हिंदु पिंजारी ' नाहीं, ही उणीव भरून काढण्याकडे त्यानीं लक्ष दिलेलें दिसते. तसेंच संघ-प्रेमी लोकाकडे लग्न-मुंजीसाठी जाण्यासहि सवड काढताना ते आढळतात.

साधना, अखंड साधना, हेंच डॉक्टराचें जीवन होतें. हिंदु समाजाला जगांत अजिंक्य करण्यासाठीं लागणारा कळवळा त्यांच्या रूपानें प्रकट झाला होता व परिस्थितीचे डोंगर उल्लंघून जाण्यासाठीं लागणारे त्राण व पौरुष त्याच्या सर्व व्यवहारांतून डोकावत होते ! तरुण वर्ग कसा असावा, याचीं रेखीव व आकर्षक चित्रे आजवर शब्दानीं कागदावर व कल्पनेच्या शलाकांनीं मनःपटलावर अनेकांनीं व अनेकदां रेखाटलीं होतीं. पण त्या रेखाटलेल्या चित्राचे वास्तव-दर्शन क्वचितच घडे. पण डॉक्टरानी आपल्या परिश्रमाची पराकाष्ठा करून जे अशक्य तें शक्यतेच्या कोटींत आणून दाखविलें होते व असे तरुण संघाच्या शाखांतून उभे राहत असल्याचा प्रत्यय जाणत्याना ठायी ठायी येऊं लागला होता. कोणी डॉक्टराच्या या संघटनकौशल्याचे उघड उघड कौतुक केले असेल वा कांहीं जणांनीं केवळ मनाच्या गुहेतच असे शब्द घुमविले असतील, पण १९३८-च्या आगेमागें संघाच्या प्रगतीने समाजातील शत्रु-मित्र म्हणविणारे दोघेहि आश्चर्यचकित झाले होते, यात शंका नाहीं. संघटना मूर्त स्वरूपात आणून दाख-विण्यासाठीं डॉक्टरानीं दाखविलेल्या कुशलतेने विशेषतः महाराष्ट्रातील असंख्य तरुणाचीं मनें आकृष्ट केली होतीं व त्यांतूनच मे महिन्याच्या प्रारंभीं पुणे येथे झालेल्या अखिल महाराष्ट्र हिंदु युवक परिषदेचें अध्यक्षस्थान डॉक्टरांनीं मंडित करावें, ही कल्पना उदित झाली.

भोसला मिलिटरी स्कूलच्या उद्घाटनासाठी डॉक्टर दि. २५ मार्चेला नासिक येथे आले होते. या वेळची एक लहानशी घटना सांगितली पाहिजे. नासिकला जाण्यासाठी डॉक्टर जेव्हा नागपूर स्थानकावर आले, तेव्हा नियोजित गाडीमध्ये मनस्वी गर्दी असल्याने त्यांना निरोप देण्यासाठीं आलेल्या कार्य-कर्त्यांनीं त्याना ' नेहमीप्रमाणें तिसऱ्या वर्गानें जातां येत नाहीं, तेव्हां वरच्या वर्गानें प्रवास करा ' असा आग्रह केला. पण डॉक्टरानीं त्यांना नकार दिला व ती गाडी सोडून मागून जाणाऱ्या गाडीनें प्रवास केला. त्या काळात संघाचा आर्थिक व्यवहार अत्यंत तुटीचा व कटकटीचा होता व त्यामुळे इतरांना काटकसरीविषयीं डॉक्टरांना वारंवार सांगावें लागे. पण इतरांना जो नियम लागू, त्याला आपण प्रमुख

असलों तरी अपवाद होऊन चालणार नाहीं, हें साधें पण सहसा व सरसहा इतरत्र दुर्लक्षिलें जाणारें सूत्रच प. पू. डॉक्टरांनीं इतक्या कटाक्षानें पाळलें होतें. 'इतरां सांगे ब्रह्मज्ञान, पण आपण कोरडा पाषाण' हें करंटेपणाचें लक्षण संघकार्यकर्त्यांच्या व्यवहारांत दिसूं नये, यासाठीं डॉक्टरांनीं डोळ्यांत तेल घालून व्यवहार केला व त्यासाठीं केव्हां केव्हां तर तीन तीन तास उभ्यानें प्रवास करूनहि, सार्वजनिक पैशाचा वापर किती दक्षतेनें केला पाहिजे, याची कल्पना त्यांच्यासभोंवतीं रात्रं-दिवस वावरणाऱ्या कार्यकर्त्यांना आणून दिली.

नासिकहून डॉक्टर दि. २ एप्रिलला परत आले. तोंपर्यंत धर्मवीर श्री. ल. ब. भोपटकर यांचें डॉक्टरांना पत्र आलें होतें कीं, हिंदु युवक परिषदेच्या अध्यक्षस्थानीं आपली निवड झाली आहे. या दि. २८ मार्चच्या पत्रामागोमाग स्वातंत्र्यवीर सावरकरांची तार आली कीं,' अध्यक्षस्थान स्वीकाराच !' महाराष्ट्रांतील शेंकडों तरुणांना भेटण्याचा योग व त्यांतून सावरकरांसारख्यांचा आग्रह या गोष्टी विचारांत घेऊन डॉक्टरांनीं या गोष्टीला संमति दिली. एप्रिलच्या प्रारंभीं ते मुंबई व उपनगरें यांतील संघकार्याची पाहणी करून परत गेले व एप्रिलच्या शेवटीं हिंदु युवक परिषदेसाठीं महाराष्ट्रांत परत आले. या वेळीं पुण्याला जातांना त्यांनीं तळेगांव व लोणावळा येथील शाखांना भेटी दिल्या होत्या.

या वेळीं लोणावळ्यांतहि एक स्मरणीय घटना घडली. तेथें रात्रीं प. पू. डॉक्टरांच्या बैठकींत बरेच प्रतिष्ठित उपस्थित होते. त्यांतील कांहीं मंडळी तर डॉक्टरांशीं वाद करण्याच्या हेतूनेंच तेथें आली असावीत, असें प्रारंभापासूनच दिसूं लागलें. प्रश्नोत्तरें सुरू झालीं व त्यांत अगदीं बारके शब्दांचे श्लेष काढून प्रश्नां-मागून प्रश्न विचारले जाऊं लागले. अधूनमधून लागट व बोचरे शब्दहि वापरले जाऊन आतां बैठकीचा बेरंग होणार कीं काय, अशी शंका नवशिक्या स्वयंसेवकांच्या मनांत उभी राहिली. कांहीं जणांना तर या प्रश्न विचारणाऱ्यांचा रागहि आला. पण डॉक्टर एकेका प्रश्नाला अगदीं शांतपणें उत्तरें देत होते. त्यांच्या मनाचा समतोलपणा असल्या कांहीं जणांच्या चढाईच्या व बढाईच्या बोलण्यानेंहि ढळणारा नव्हता. त्यांच्या प्रतिपादनांत शब्द मोजके असत; पण त्यामागील आत्मविश्वास विलक्षण जाणवे. तास दीड तास असा प्रकार सुरू होता. शेवटीं प्रश्न संपले नि बैठक कांहींशा तंग स्थितींतच आटोपली. डॉक्टर मोटारींत बसण्यासाठीं सर्वांबरोबर बाहेर जाण्यास निघाले. तेव्हां डॉक्टरांनीं अत्यंत प्रसन्नतेनें हंसत उद्गार काढले, 'काय हो, लोणावळ्याची हवा काय थंड आहे !' या एका वाक्यांतील गर्भित अर्थ ध्यानीं घेऊन सर्व जण खदखदा हंसूं लागले व गरम वातावरणाचें एकदम खेळकर वातावरणांत रूपांतर झालें !

हिंदु युवक परिषदेसाठीं परमपूजनीय डॉक्टर दि. ३० एप्रिल या दिवशीं सकाळीं पुण्याला येऊन पोहोंचले. त्या वेळीं स्थानकावर त्यांचा प्रचंड सत्कार

झाला. श्री. गणपतराव नलावडे, ' केसरी 'चे संपादक श्री. ज. स. करंदीकर, श्री. ल. ब. भोपटकर, आचार्य प्र. के. अत्रे, श्री. रामभाऊ राजवाडे आदि प्रमुख मंडळी शेकडो तरुणाच्या अग्रस्थानीं दिसत होती. डॉक्टर खालीं उतरताच हिंदु धर्माच्या व डॉक्टराच्या जयजयकाराने वातावरण भरून गेले. शेकडो पुष्पहार त्यांना अर्पण करण्यात आले. त्यानंतर स्थानकावरून थोड्या विश्रातीसाठीं त्यांना आचार्य अत्रे याच्या निवासस्थानीं नेण्यात आले असता त्यांना डॉक्टराच्या व्यक्तिमत्त्वाचें जें दर्शन घडले, ते त्याच्याच शब्दांत देणे युक्त दिसेल. आचार्य अत्रे लिहितात कीं, " हिंदु युवक परिषदेचे अध्यक्ष म्हणून डॉक्टर पुण्याला आले होते, तेव्हा युवक परिषदेच्या चालकवर्गानें परिषदेचा नियोजित कार्यक्रम सुरू होण्यापूर्वी एक-दीड तास त्याना विश्राति मिळावी म्हणून माझ्याकडे व्यवस्था केली होती. एक प्रखर राष्ट्रीय वृत्तीचे कट्टर देशभक्त म्हणून मी त्यांचे केवळ नाव ऐकून होतों. त्या वेळीं संघाला विशेष प्रासिद्धि मिळाली नव्हती. परंतु डॉक्टरांसारखी एक महान् व्यक्ति आमच्याकडे येणार आहे, त्यामुळे अतःकरणात त्या वेळीं स्वाभाविकच एक अस्थिरता उत्पन्न झाली होती. कांहीं वेळा येणारी ' मोठी व्यक्ति ' ही आपल्या वागण्याने ह्या अस्थिरतेंत भरच घालते, असा अनेकदा अनुभव येतो.

" सकाळीं डॉक्टर आमच्याकडे आले. त्याचे व्यक्तित्व अति भव्य, गंभीर व शात होते; परतु ते घरात आल्यापासूनच आम्हाला असे वाटूं लागले कीं, जणूं आमच्या घरातीलच कोणी वडीलधारा मनुष्य बाहेरगावाहून आला आहे. त्याच्या बसण्या-बोलण्यात वा आचरणात यत्किंचित्सुद्धा अस्वस्थता किंवा अस्थिरता नव्हती. त्यांच्या बोलण्याची पद्धति अत्यंत सौम्य, परंतु आत्मविश्वास व निश्चय यानीं युक्त अशी होती. त्यात कोणत्याहि प्रकारच्या दंभाची वा प्रदर्शनाची छटा नव्हती. त्यांनीं सरळ व सहजपणे गप्पागोष्टींना प्रारंभ करताच वातावरणातील औपचारिकता तेव्हाच दूर होऊन प्रसन्नता वाटली. "

या चहापानानंतर सकाळीं ८ वाजता समर्थ व्यायाम मंदिरापासून प. पू. डॉक्टराची थाटामाटाने रथातून मिरवणूक काढण्यात आली. कोणत्याहि व्यक्तीचा स्वभाव हा त्याच्या नित्याच्या व्यवहारांतून प्रकट होत असतो. डॉक्टराची शालीनताहि या वेळीं रथात चढतांना दडून राहूं शकली नाहीं. स्वागताध्यक्ष व डॉक्टर रथापाशीं पोहोचताच डॉक्टर जरा बाजूला झाले व त्यांनीं आग्रहानें आधीं क्षात्रजगद्गुरु याना रथात चढवून मग ते स्वतः स्थानापन्न झाले. स्वागताध्यक्षाचेच असें स्वागत ही डॉक्टरांच्या स्वभावाची विशेषता होती !

या मिरवणुकींत दहा-बारा सहस्रांचा जनसंमर्द संमीलित झाला होता व अंतराअंतरानें आठ-दहा वृंदवादकाचीं पथकें त्या मिरवणुकींत दुमदुमत होतीं. मिरवणुकीच्या अग्रभागीं ध्वज डोलत होता व त्यामागून चौघडा व लेझीम घुमत

होती. पाऊण मैल लांबीच्या या मिरवणुकींतील शृंगारलेल्या रथांत मध्यें क्षात्रजगद्‌गुरु, उजव्या बाजूस डॉक्टर व डाव्या अंगास श्री. भोपटकर बसले होते. 'केसरी' लिहितो कीं, "रथाला दोन उमदे अश्व जोडलेले असून रथाच्या दोहों बाजूंना स्वयंसेवक डौलानें चौऱ्या ढाळीत होते. दुतर्फा इमारती प्रेक्षकांनीं फुलून गेल्या होत्या. 'स्वराज्याची तहान सुराज्यानें भागत नाहीं', 'जिनांच्या मागण्या अमान्य करा', वगैरे घोषणाहि तरुणांच्या कंठांतून निनादत होत्या. अशी मिरवणूक हारांचा, पंचारतींचा स्वीकार करीत थबकत थबकत पुढें सरकत होती."

पण इतक्या मिरवणुकीच्या गजरांतहि डॉक्टरांना त्यांच्या रथामागून अर्धांग झालेला एक तरुण एका हातानें काठीचा आधार घेऊन मोठ्या उत्कटतेनें व प्रेमानें टुण्टुण् उड्या मारीत व घोषणा करीत चालतांना दिसला. चौकांत हारांसाठीं मिरवणूक थबकतांच डॉक्टरांनीं त्या वामनमूर्तीला जवळ बोलाविलें व फुलाप्रमाणें त्याला उचलून घेऊन रथांत बसविलें! डॉक्टरांचें लक्ष फुलांकडे होतेंच कोठें? उपचार म्हणून ते हार स्वीकारीत होते. पण हार घालणारे हात हिंदुराष्ट्राच्या रक्षणार्थ कसे बळकट होतील नि त्यामागील हृदय देशभक्तीनें कसें फुलून जाईल, याच विचारांत ते निमग्न असावेत. फुलांच्या व हारांच्या वैभवशाली वृष्टीनें हुरळून जाणारी त्यांची वृत्ति असती तर लुळ्यापांगळ्याला रथांत बसविण्याचें भान राहतेंच ना!

पण त्यांची वृत्ति समाजाच्या हितांत रंगली होती. त्या एकाच लुळ्याच्या कष्टाकडे दृष्टि जाऊन त्यांचा ममतेचा हात पुढें सरला नव्हता; तर दुर्बल व परावलंबी हिंदु समाजाच्या स्थितीनें त्यांचें मन व्यथित झालेलें होतें व ती स्थिति दूर करून त्या समाजाला बलशाली, स्वावलंबी व विजयी बनविण्यासाठीं त्यांनीं आपले हात सरसावले होते. डॉक्टरांच्या गळ्यांत रुळणाऱ्या त्या मोहक व सुगंधी हारांच्या शीतलतेखालीं पारतंत्र्याला जाळूं पाहणाऱ्या आकांक्षेचा उसळता ज्वालामुखी धगधगत होता. त्यांना फुलें नको होतीं, तर मातृभूमीच्या पायावर आपलीं जीवन-पुष्पें भक्तिभावनेनें उधळणारीं मुलें हवीं होतीं! त्यांना स्वतःच्या मुखाभोंवतीं ओवाळल्या जाणाऱ्या मिणमिणत्या तूप-वातीच्या पंचारती नको होत्या, तर मातृभूमीचें यश उजळण्यासाठीं आपल्या पंचप्राणांच्या ज्योति, भीषण परिस्थितीच्या झंझावातांतहि धैर्याचें व तारुण्याचें तूप घालून तेवत ठेवणारे तरुण हवे होते!

पुणें शहरांतील प्रमुख रस्त्यांवरून ही मिरवणूक जात असतां डॉक्टरांना असंख्य जणांनीं हार अर्पण केले व ठिकठिकाणीं त्यांच्यावर पुष्पवृष्टि झाली. ज्या सोन्यामारुति-मंदिरांतील घंटा वाजवून त्यांनीं एक वर्षापूर्वीं सत्याग्रह केला, त्या मारुतीजवळ मिरवणूक येतांच डॉक्टर रथांतून खालीं उतरले व त्यांनीं मारुतिरायाला

पुष्पमाला घालून दर्शन घेतलें. मंडईसमोरून मिरवणूक जातांना लोकमान्य टिळक यांच्या पुतळ्यासहि खालीं उतरून हार घालण्यास ते विसरले नाहींत. पुणे नगरपालिकेजवळ नगराध्यक्षांनीं सर्व नगराच्या वतीनें डॉक्टरांचा सत्कार केला. तीन तास असा सोहळा चालू होता. शेवटीं ११ वाजतां लोकमान्य टिळक-स्मारक मंदिराच्या पटांगणांत मिरवणूक आल्यावर तेथे ध्वजवंदन झाले.

त्या दिवशीं दुपारीं ३ वाजतां टिळक-स्मारक मंदिराच्या पटांगणात उभारलेल्या प्रशस्त मंडपांत परिषदेला प्रारंभ झाला. साधारण सहाशें प्रतिनिधि व सात-आठ हजार श्रोते उपस्थित होते. मंदिराच्या चौथऱ्याला धरूनच उच्च व रेखीव व्यासपीठ दिसत होतें व त्यावर स्वातंत्र्यवीर सावरकर, सेनापति बापट, डॉ. मुंजे, तपस्वी बाबासाहेब परांजपे, बाबाराव सावरकर आदि प्रमुख मंडळी बसली होती. प. पू. डॉक्टरांनीं अध्यक्षस्थान मंडित करावें, अशी विनंति करणारी प्रारंभीं जीं भाषणे झालीं, त्यांतील एक-दोन गोष्टी उल्लेखनीय आहेत. एका वक्त्यानें सांगितलें कीं, " आजच्या अध्यक्षांना ' बोलशास्त्र ' माहीत नसून ते ' कृतिशास्त्र ' जाणतात ! " तर दुसऱ्यानें डॉक्टरांचे वर्णन अत्यंत मार्मिकतेने केलें होते. ते असें कीं, " ...... डॉ. हेडगेवार हे आइस्बर्गसारखे म्हणजे समुद्रावर तरंगणाऱ्या बर्फाच्या डोंगरासारखे असून ते त्याच्याप्रमाणें एक-अष्टमांश वर दिसतात व सात-अष्टमांश दिसत नाहींत ! "

या परिषदेपुढे प. पू. डॉक्टरांचें जे भाषण झाले ते नेहमींसारखेच अत्यंत साधें व सुलभ होतें. त्यांच्या जीवनांतील अनुभवाचे मथन करून त्यानी जे ' आत्मसमर्पणा 'चें नवनीत काढले, तेंच त्यांनीं तरुणांपुढे या भाषणाच्या रूपाने ठेवलें होते, यांत शंका नाहीं. भाषणाच्या प्रारंभीं त्यानी सागितले कीं, " स्टेशनवर पाय ठेवल्यापासून येथील मंडळीनीं माझा जो बडा सत्कार करण्यास सुरुवात केली आहे, त्यामुळे तर मी फारच गोंधळून गेलों आहें. " यानंतर आपल्या हिंदुराष्ट्राच्या अधःपाताची नेमकी कारणमीमांसा करून त्यावर काही उपाय-योजना सांपडते कीं काय, हे पाहण्यासाठीं आपण आज या ठिकाणीं जमलों आहोत, असें सांगून डॉक्टर म्हणाले कीं, " प्रत्येकाला हें माहीत असेल कीं, इंग्रजांनीं आपलें राज्य बळकावले. मुसलमानांनीं एकदां आपल्यापासून घेतलेलें राज्य आपण त्यांच्यापासून पुन्हा प्राप्त करून घेतलें. पण त्या वेळीं आपल्या अंतःकरणांत जी भावना वास करीत होती ती भावना पुढें राहिली नाहीं, म्हणून आपण पुन्हा परतंत्रच झालों. ती भावना किंवा तें तत्त्व म्हणजे राष्ट्रीयत्व व समाजभावना हें होय.

" माझ्या समाजाकरितां मी आहे ही भावना विसरून माझ्याकरितां समाज आहे, या भावनेला आम्हीं कवटाळलें आणि ही भावना आपल्या मनांत इतकी खोल रुजून बसली आहे कीं, जो मनुष्य स्वतःच्या मोक्षाकरितां

स्नानसंध्या, जपजाप्य करतो, जो कधीं कोणाशीं भांडत नाहीं, कोणाच्या अध्यामध्यांत नसतो, आपलें घर बरें कीं आपली नोकरी बरी, अशा संकुचित दृष्टीनें पाहतो व वागतों, अशा मनुष्याचीच आपण तोंडभर स्तुति करतों. ही आपली प्रशंसा आपलीं मुलेंबाळें ऐकतात व अशा स्वार्थी माणसालाच आदर्श पुरुष समजून त्याच्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न करूं लागतात! पण अशा तऱ्हेनें जोंपर्यंत आपली विचारसरणी आहे, तोंपर्यंत हिंदुराष्ट्राचा नाशच होत राहणार. समाज जिवंत राहील तरच मी जिवंत राहूं शकेन, ही कल्पनाच तरुण पिढीच्या मनांत येत नाहीं. याचें कारण आपणांस कौटुंबिक राहणीचा रोग जडला आहे. ज्याच्या अंतःकरणांत व्यक्तिमत्त्वाला अणुमात्र स्थान नाहीं, असे निर्मेळ देशभक्त किती सांपडतील? फारच थोडे! हिंदुराष्ट्राचा विचार करतांना व्यक्तीचा विचार मनांतून पार पुसून टाका. जो, मी व राष्ट्र हीं दोन्ही एकच, असें मानून राष्ट्र व समाज यांच्याशीं तन्मय होतो, तोच खरा राष्ट्रसेवक असतो. राष्ट्राकरितां मीं अमुक इतका स्वार्थत्याग केला, असें कांहीं लोक मोठ्या अभिमानानें सांगत असतात! पण हें सांगतांना त्यांच्या असें लक्षांत येत नाहीं कीं, असें म्हणण्यांत मी राष्ट्राहून निराळा आहें, माझा माझ्या राष्ट्राशीं संबंध नाहीं, असें दाखविण्यासारखें होत नाहीं का? याला दृष्टान्त देऊनच सांगावयाचें झालें तर असें म्हणतां येईल कीं, बापानें आपल्या मुलाची मुंज करावी व त्याकरितां त्यानें जो कांहीं खर्च केला असेल, तो त्यानें 'मीं माझ्या मुलाकरितां इतका स्वार्थत्याग केला' असें सांगावें! असें सांगणें आपल्या मनाला कितपत पटेल? कुटुंबाकरितां केलेला खर्च हा जसा स्वार्थत्याग होत नाहीं, त्याचप्रमाणें राष्ट्ररूपी कुटुंबाची सेवा करण्याकरितां केलेला खर्च हाहि स्वार्थत्याग होत नाहीं. राष्ट्राकरितां खर्च करणें, झीज सोसणें हें त्यांत राहणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचें पवित्र कर्तव्यच असतें. त्यांत स्वार्थत्याग कसला?"

यानंतर हिंदुस्थान ह हिंदुराष्ट्रच राहिलें पाहिजे, असें सांगतांना ते म्हणाले कीं, "आपल्या देशाचें नांव हिंदुस्थान आहे, हिंदीस्थान नाहीं. हिंदुस्थानचें हिंदीस्थान, इस्लामीस्थान न होईल, असा प्रयत्न केला पाहिजे. हिंदुस्थान हा हिंदूंचा आहे व पुढेंहि तो तसाच राहिला पाहिजे. ही कांहीं धर्मशाळा नव्हे कीं या ठिकाणीं कोणींहि यावें व आपला बिछाना पसरावा. ज्यांचा इतिहास, परंपरा, समाज, धर्म, संस्कृति, विचारसरणी व हितसंबंध एक आहे, त्यांचेंच राष्ट्र होत असतें. याच्या उलट परिस्थितींतले लोक एकत्र येऊन एक राष्ट्र होऊं शकत नाहीं. असें असूनहि तरुणांना असें खोटें सांगितलें जातें कीं, हिंदुस्थानचा विध्वंस करण्यासाठीं किंवा हिंदुस्थानची मैत्री संपादण्यासाठीं जे लोक येथें आले, त्या सर्वांना राष्ट्राचें घटक समजा. जे एकमेकांना नामोहरम करण्यासाठीं टपले व खपले, त्यांचें मित्रत्व होणेंच शक्य नाहीं. मांजर व उंदीर यांची

मैत्री अशक्य आहे. उंदीर मांजराच्या पोटांत समरस होईल, तेव्हांच त्यांचें मित्रत्व होईल ! "

अशी राष्ट्रीयत्वाची कल्पना विशद करून शेवटी डॉक्टरांनी तरुणांना कोणत्याहि व्यक्तीची भीड न ठेवता विशुद्ध बुद्धिवादाच्या कसोटीवर कोणत्याहि व्यक्तीचें म्हणणे पारखून घेण्याचा आदेश दिला. ते म्हणाले की, "......या बाबतींत कितीहि मोठ्या पुढाऱ्यानें काय वाटेल ते जरी सांगितले तरी प्रथम आपण त्याचे म्हणणे बुद्धिरूपी कसावर घासून पहात जा. मोठा पुढारी सांगतो आहे म्हणून त्याच्या पाठीमागून अंधश्रद्धेने जाऊं नका. लो. टिळकांनीं एक विशिष्ट विचारसरणी देशांत प्रसृत केली होती. ते विचार पटल्यामुळें त्याना अनुयायीहि पुष्कळ मिळाले. पण पुढे काय ? ३१ जुलै रोजी रात्री लोकमान्याचे देहावसान झाल्याबरोबर १ ऑगस्टला सर्व नूर एकदम पालटला ! जुनी विचार-सरणी जाऊन नवीन विचारसरणी पुढें आली व ती आपण बुद्धीच्या निकषावर घासून न बघता मेढरासारखी पतकरून तिच्या पाठीमागे जाऊ लागलो. अशा तऱ्हेनें प्रत्येक पुढाऱ्याच्या इच्छेप्रमाणे आपण जर हेलकावे खात बसलो, तर आपले स्वातंत्र्याचें ध्येय कधीं व कसे गांठणार ? "

असा बुद्धिवादी बनण्याचा उपदेश करून, काही पुढाऱ्यानी आपली व समाजाची कशी वंचना चालविली आहे, यावर डॉक्टरानीं प्रकाश टाकला. ते म्हणाले कीं, " मीं माझे विचार अनेक थोर थोर पुढाऱ्यांना सागितले. त्यांना ते पटलेहि. पण ते म्हणतात, ' काय करूं डॉक्टरसाहेब, तुमचे म्हणणें आम्हांला पटते हो, पण आम्ही दुसऱ्या एका पक्षात सध्या असल्यामुळें तुमच्या विचाराना आम्हांला उघड मान्यता देता येत नाहीं. तथापि खासगी रीतीने तुम्हाला आम्ही साहाय्य करूं ! ' अशा तऱ्हेचीं उत्तरें देऊन हे पुढारी आपली स्वतःची व त्याच-बरोबर दुसऱ्याचीहि फसवणूक करीत नाहींत काय ? असली फसवणूक आपण कधींहि करूं नका. आपणापैकीं प्रत्येकाला हिंदु समाजाचें हित करण्यात खरा आनंद वाटला पाहिजे. स्वतःला हिंदु म्हणवून घेण्यांत आनंद वाटला पाहिजे. आम्हाला कोणाचाहि हेवादावा करावयाचा नाही, कोणाशी लढाई करावयाची नाहीं, कोणाला ' अल्टिमेटम् ' द्यावयाचा नाहीं. आम्हाला आमचा समाज संघटित व अजिंक्य करावयाचा आहे. "

भाषणाच्या शेवटीं " ही परिषद् ' प्रांतिक ' नाहीं, तर पूर्ण ' राष्ट्रीय ' आहे व पुढेहि तशीच राहील," असा निर्वाळा त्यांनीं दिला.

या परिषदेत दुसऱ्या दिवशी १८ ठराव संमत झाले. त्यांत ' संपूर्ण स्वातंत्र्य ' हे प्रत्येकाचें आद्य कर्तव्य असलें पाहिजे, सैनिकी शिक्षणाचा प्रसार व पुरस्कार केला पाहिजे, जाति-निर्णय मोडून काढला पाहिजे, वगैरे अपेक्षा व्यक्त करणारे ठराव प्रमुख होते. या परिषदेंत भाषण करतांना स्वातंत्र्यवीर सावरकर

यांनीं " संघ भावी हिंदुराष्ट्राची आशा व भावी पिढी निर्माण होण्याचें ' एकमेव स्थान, असल्याचें " सांगितलें होतें.

दोन दिवस गाजलेल्या या परिषदेच्या समारोपाचें डॉक्टरांचें भाषण खरोखरच अविस्मरणीय असें झालें. त्यांत त्यांनीं ठरावाप्रमाणें वर्तन केलें पाहिजे, असें सांगून स्वातंत्र्यासाठीं संघटना ही कल्पना विशद केली. ते म्हणाले कीं, " स्वातंत्र्याशिवाय कोणतेंहि राष्ट्र जगूं शकत नाहीं. जोंपर्यंत आपलें राष्ट्र परतंत्र आहे, तोंपर्यंत आपण माणसें हीं मृतवत् आहोंत. पण स्वातंत्र्य ही चीजच अशी आहे कीं, ती जितकी गोड आहे, तितकीच महाग आहे. ती चीज प्राप्त करून घेण्यास आपणांस फार मोठी किंमत द्यावयाला पाहिजे. ही किंमत देण्याची धमक जेव्हां तुमच्यांत निर्माण होईल, त्याच वेळीं स्वातंत्र्य मागण्याचा अधिकार प्राप्त होईल...त्याकरितां आपण सर्वांनीं स्वतःचा, आपल्या धनाचा, शक्तीचा व पराक्रमाचा स्वाहाकार केला पाहिजे. स्वातंत्र्य नुसत्या पैशानें मिळणारें नाहीं. तें मिळविण्याचा एकच मार्ग आहे व तो म्हणजे संघटना व सामर्थ्य ! संघटना करण्याचा, सामर्थ्य वाढविण्याचा जो मार्ग आपणांस पटेल तो स्वीकारा. पण एकदां एक मार्ग स्वीकारल्यावर व त्या मार्गावर पाऊल टाकल्यावर मग मात्र पाय मागें घेण्याचा विचार मनांत देखील आणूं नका. एकसारखीं पुढें पावलें टाकीत जा. तुमच्यामध्यें भरपूर सामर्थ्य निर्माण झालें कीं, सर्व प्रश्न सुरळीतपणें आपोआप सुटतील." भाषणाच्या शेवटीं डॉक्टरांनीं आपल्या जीवनांत प्रत्येक तरुणानें छत्रपति शिवाजीमहाराजांना आदर्श ठेवावें, असा विचार मांडला होता.

परिषद् मोठ्या उत्साहांत पार पडली व. प. पू. डॉक्टर हे पुण्याला सुरू झालेल्या अधिकारी शिक्षण वर्गांत गढून गेले. परिषदेनंतर ' केसरी 'च्या वतीनें गायकवाडवाड्यांत स्वातंत्र्यवीर सावरकर, क्षात्रजगद्गुरु व डॉक्टर यांचा सत्कार करण्यांत आला होता. त्या वेळचें त्या तिघांचें एकत्र असें एक छायाचित्र उपलब्ध आहे. या सत्काराच्या वेळीं क्षात्रजगद्गुरु उत्तरादाखल बोलतांना म्हणाले कीं, " माझा जो आदरसत्कार आपण केलात त्याला मी पात्र नाहीं; कारण मी फक्त बोलूं शकतों व दे. भ. सावरकर व डॉ. हेडगेवार हे प्रत्यक्ष कृति करतात. "

या परिषदेसंबंधीं लिहितांना पुण्याच्या ' केसरी 'नें दि. ३ मेच्या अंकांत म्हटलें होतें कीं, " ...... परिषदेचे अध्यक्ष डॉ. हेडगेवार यांची गणना वयोमानानें युवकापेक्षां मध्यम वयाच्या गृहस्थांतच करावी लागते. असें असतांहि त्यांची योजना अध्यक्षस्थानीं झाली याचा अर्थच हा कीं, सदर परिषद् वयानें युवक असणाऱ्यांचीच नसून मनानें युवक असणाऱ्यांचीहि होती. डॉ. हेडगेवार यांनीं आपल्या कर्तृत्वानें महाराष्ट्रांत एक मोठी शक्ति निर्माण केली आहे. ते महाराष्ट्राचे खरेखुरे सेनापति आहेत. "

परिषदांसारख्या कार्यक्रमांनीं उत्साह निर्माण होतो; पण त्याच्यामागोमाग त्या उत्साहाला स्थायी रूप देण्यासाठीं ज्या स्वरूपाचे प्रयत्न आवश्यक असतात, तसे सहसा होत नाहींत. पण सुदैवाने डॉक्टरांसारख्या कुशल नेत्याच्या दक्षतेनें महाराष्ट्रांतील उत्साहाला संघाच्या रूपात उभे करण्याचा प्रयत्न झाला व त्या वर्षीच्या अधिकारी शिक्षण वर्गानंतर महाराष्ट्रांतील सर्व भागांत संघाच्या कामाची डोळ्यात भरण्यासारखी वाढ होऊं शकली. केवळ व्यक्तिगत प्रतिष्ठेसाठीं अशा परिषदेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्याची कल्पना डॉक्टराच्या सबंधात स्वप्नांतदेखील करतां येण्यासारखी नव्हती. ज्यातून संघाच्या स्थायी, मूलगामी, विधायक व अग्रगण्य कार्याला प्रत्यक्ष चालना मिळणार असेल, त्याच कार्यांत डॉक्टर संमीलित होत असत. या परिषदेला येऊन डॉक्टरानी नेमकी ही गोष्ट साधली होती. संघ, त्याचे प्रमुख आणि संघातून उदित होणारी वृत्ति याच्यासंबंधींचा आदर या परिषदेच्या वेळीं प्रांतांतून आलेल्या मंडळींच्या मनात प. पू. डॉक्टरांच्या व्यक्तिमत्त्वाच्या प्रभावाने उत्पन्न झाला व तोच जनमनांतील आदर पुढे संघशाखा ठिकठिकाणीं उभ्या करताना साहाय्यभूत ठरला. या परिषदेचे यश म्हणजे महाराष्ट्रातील संघकार्याचें आसन स्थिर झाल्याची ग्वाही व पुढील प्रगतीचे प्रसाद-चिन्ह होतें.

पुण्याच्या हिंदु युवक परिषदेनंतर नागपूरला जाण्यापूर्वीं परमपूजनीय डॉक्टर सातारा जिल्ह्यात औंध येथें गेले. तेथील अधिपति श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि यानी नागपूरची संघशाखा पाहिल्यापासून एकदां आपल्या संस्थानाला भेट देऊन तेथें संघाचें बीजारोपण करण्याचा त्याना आग्रह चालविला होता. त्याला मान देऊनच डॉक्टर तेथे गेले होते. त्याचे दोन-तीन दिवस तेथील राजवाड्यांत वास्तव्य होतें. एके दिवशीं राजवाड्याला लागून असलेल्या देवीच्या दर्शनासाठीं महाराज व डॉक्टर गेले होते. महाराजाच्या प्रतिभावान् कुचल्यानें रेखाटलेल्या रगीत भव्य चित्रानीं तें मंदिर सुशोभित करण्यात आलेलें आहे. देवदर्शन झाल्यावर ते दोघे त्या पौराणिक व ऐतिहासिक चित्रापैकी एकेका चित्रासमोर थबकत थबकत उभे राहून अवलोकन करीत होते. काहीं चित्रें पाहून डॉक्टर प्रसन्न झालेले दिसले. अधून मधून ते आपला आनंदहि व्यक्त करीत.

असें पाहत पाहत ते एका चित्रासमोर येऊन थाबले. त्या चित्रात राजमाता जिजाई हिचे डोहाळे चित्रित केलेले असून प्रत्यक्ष श्रीशंकर तिच्या उदरीं अवतार घेणार आहेत, ही कल्पना रेखाटण्यात आली होती. प. पू. डॉक्टर तें चित्र पाहून झाल्यावर एकदम श्रीमतांकडे वळून म्हणाले, "महाराज, या अवताराच्या कल्पनेनें आमच्या समाजाचा घात केला आहे! आपल्या असामान्य प्रयत्नानें व अतुलनीय पराक्रमानें समाजाला नवचैतन्य देणाऱ्या छत्रपति शिवाजीमहाराजावर हा देवत्वाचा शिक्का कां मारतां?"

हे उद्गार ऐकून कांहीं वेळ महाराज पाहतच राहिले ! थोडा वेळ थांबून ते म्हणाले, " डॉक्टर, आपण म्हणतां तें खरें आहे ! "

थोर पुरुषांच्या जीवनाकडे पाहण्याचा हा दृष्टिकोन डॉक्टर कोठेंहि असा सडेतोडपणें मांडीत असत.

* * *

## २६ : कार्यविस्तार

सारगाछीच्या आश्रमांतून काहींसे उदास होऊन श्रीगुरुजी नागपूरला परत आले व त्यांचा संबंध हलके हलके प. पू. डॉक्टरांशी येऊं लागला. या गोष्टीला आता वर्ष होऊन गेलें होते. एवढ्या अवधींत डॉक्टराच्या लोभस व्यक्तिमत्त्वाच्या प्रभावानें श्रीगुरुजी संघाच्या दैनंदिन कार्यात अधिकाधिक लक्ष घालू लागले. त्यांचें वास्तव्य या दिवसांत सारखें नागपूरला नसे. ते कधीं रामटेक येथे तेथील वनश्रीने विनटलेल्या टेकड्यांतील एकान्त अनुभविण्यासाठीं जात असत, तर कधीं नागपुरांत त्याच्या मामाकडे व मित्राकडे राहावयास येत. या दोहोंपैकी कोठेहि असले तरी शाखेशीं त्याचा घनिष्ठ संबंध येऊं लागला होता. श्रीगुरुजीचे आई-वडील श्री. भाऊजी व सौ. ताई याना आता कळून चुकले होते कीं, आपला मुलगा आता संसारांत पडणें शक्य नाहीं. त्यामुळे त्यांच्याहि जीवनावर एक प्रकारची औदासीन्याची छाया पसरूं पाहत होती. पण श्रीगुरुजी यांचा जसा जसा डॉक्टराशीं संबंध वाढत चालला व संघासाठीं कधीं स्वतंत्रपणे तर कधीं डॉक्टरांसमवेत ते प्रवासावर जाऊं लागले, त्यांच्या कर्तृत्वाचा एक एक पैलू झळकूं लागला, तसा तसा हा त्याच्या आईवडिलांच्या मनावरील औदासीन्याचा पगडा दूर होत चालला व पुढे पुढे तर श्रीगुरुजीचे संपूर्णपणे सघार्पित झालेले जीवन हे त्या दोघाच्या आनंदाचा व कौतुकाचा विषय होऊन बसले.

डॉक्टर पुण्याला हिंदु युवक परिषदेसाठीं गेले तत्पूर्वींच १९३८ च्या मे महिन्यांत होणाऱ्या नागपूरच्या अधिकारी शिक्षणवर्गाच्या नेतृत्वाची धुरा त्यानीं गुरुजींच्याकडे सोपविली होती. वर्गासाठीं येणाऱ्या शेंकडों स्वयसेवकांच्या वृत्तीला नेमकें संघाचे वळण लागावे, यासाठीं चोवीस तास होणाऱ्या सर्व कार्यक्रमात जिवंतपणा व अनुशासन असणे आवश्यक असते. ही गोष्ट साधण्यासाठीं वर्गाच्या सर्वाधिकाऱ्याला अविश्रात परिश्रम करावे लागतात व त्याच्या जोडीने योजल्या-प्रमाणें सर्व गोष्टी संस्कारांच्या दृष्टीनें प्रभावी ठराव्यात म्हणून सर्व कार्यकर्त्यांना उत्साहित ठेवून चालविण्याची नितान्त आवश्यकता असते. हे कौशल्याचे व कष्टाचें काम गुरुजींनीं अत्यंत नेटानें चालविलेलें पाहून डॉक्टरांना समाधान वाटले.

डॉक्टराचें वर्गातील नुसतें वास्तव्य, हे थंडींतील शेकोटीइतके प्रोत्साहक असे. डॉक्टर नागपूरला येईपर्यंत तेथील वर्गातील सर्व गोष्टी गुरुजी पाहत होते.

तरीहि डॉक्टरांची उणीव त्यांना किती जाणवत होती, हें त्या वेळच्या त्यांच्या एका पत्रावरून कळून येतें. ते अकोल्याच्या श्री. बापूसाहेब सोहोनी यांना दि. १ मेच्या पत्रांत लिहितात कीं, "......सरसंघचालक डॉ. हेडगेवार हे पुण्याला असल्यामुळें सदैव प्रोत्साहक असणाऱ्या त्यांच्या वास्तव्याची उणीव विलक्षण जाणवते." ( Sir-Sangh-Chalak Dr. Hedgewar is at Poona and the need of an ever approachable inspiring presence is very greatly felt.) डॉक्टरांची उणीव गुरुजींना भासत होती. पण डॉक्टरांनीं नागपूरला आल्यावर गुरुजींनीं किती दक्षतेनें वर्ग चालविला आहे, हें पाहून मात्र आपली उणीव पुढेंमागें भरून काढण्याची पात्रता त्यांच्यांत आहे, हें अवश्य ओळखलें होतें.

परमपूजनीय डॉक्टर पुण्याहून तेथील अधिकारी शिक्षण वर्गांत कांहीं दिवस राहून परत आले नि थोड्याच दिवसांत कॉँग्रेसचे अध्यक्ष श्री. सुभाषचंद्र बोस यांचें पुण्यांत आगमन झालें. दे. भ. सुभाषचंद्र हे कॉँग्रेसमध्यें असले तरी प. पू. डॉक्टरांविषयीं व राष्ट्रीय स्वयंसेवक संघटनेच्या शक्तीविषयीं त्यांना आस्था वाटे. शिस्तबद्धता, तरुणांची संख्या व डॉक्टरांसारख्या क्रांतिप्रवण देशभक्ताचें नेतृत्व याच गोष्टींचें आकर्षण त्या आस्थेमागें होतें. ही गोष्ट ध्यानीं घेऊन ते पुण्याला आले असतां, तेथील संघचालकांनीं त्यांना वर्गाला भेट देण्याची विनंति केली व त्या निमंत्रणाचा त्यांनीं सानंद स्वीकार केला. पण इतकें होऊनहि ते त्या वेळीं शाखेला भेट देऊं शकले नाहींत. त्या वेळच्या पत्रांत पुण्याचे संघचालक डॉक्टरांना लिहितात कीं, "......परंतु महाराष्ट्र प्रांतिक कॉँग्रेस कमिटीच्या संघद्वेषी पुढाऱ्यांनीं, त्यांनीं संघाखेरीज वाटेल तिकडे जावें, परंतु संघांत जाऊं नये, असें निक्षून सांगितल्यामुळें ते संघांत येऊं शकले नाहींत." डॉक्टरांना हें पत्र वाचून वाईट वाटलें, पण आश्चर्य वाटलें नाहीं. कारण गेल्या दोन-तीन वर्षांत संघाच्या संबंधांत कॉँग्रेस जनांकडून कशा प्रकारची असहिष्णुता जोपासली जात होती, याची डॉक्टरांना कल्पना होती.

या वर्षींच्या जुलै-ऑगस्टमध्यें गुजरात, बिहार, कर्नाटक या भागांत संघाचें पाऊल पुढें पडूं लागल्याचीं वृत्तें डॉक्टरांना मिळूं लागलीं होतीं. श्री. पद्मराज जैन यांनीं संघप्रसारासाठीं चंगच बांधलेला दिसून येत होता. वऱ्हाडमधील कार्यकर्त्यांना त्यांना लागून असलेल्या आंध्र प्रांतांत प्रवेश करण्याचा आग्रहहि डॉक्टरांनीं चालविलेला दिसतो. या काळांत अकोल्याहून त्यांना कळविण्यांत आलें कीं, गणेशोत्सवांत युवकांचीं व्याख्यानें करण्याचें योजलें आहे. डॉक्टरांचें लक्ष संघकार्यांतील अगदीं बारीकसारीक गोष्टींवरहि किती असे, हें त्यांनीं त्या पत्राला जें उत्तर पाठविलें, त्यावरून सहज कळण्यासारखें आहे. ते लिहितात कीं, " आपण ज्यांचीं व्याख्यानें करण्याचें योजिलें आहे, ते लोक अत्यंत तरुण आहेत.

त्यांना सार्वजनिक क्षेत्रांत भाषणे देण्याची चटक आतांपासून लागणें बरें नव्हे. तसें झाल्यास मनाच्या ठेवणींत आपल्याला नको असलेला फरक घडून येण्याचा संभव आहे. म्हणून या कामी प्रौढ, पोक्त व निर्ढावलेल्या लोकांचा उपयोग करणे कार्याच्या दृष्टीने इष्ट व फलदायी आहे." अवेळीं अधिक कौतुक झाल्यानें सामूहिक जीवनाला सुसंवादी स्वभाव राहणे अवघड असतें, हीच गोष्ट डॉक्टरानीं सूचित केली होती.

या वर्षी नेहमींप्रमाणे नागपूर व पुणे येथे तर उन्हाळ्यात वर्ग झालेच; पण त्याच्या जोडीनें पंजाब व उत्तर प्रदेश यातील वाढत्या कामाचा विचार करून लाहोर येथे एक वर्ग चालविण्यात आला. या वर्गात देवतास्वरूप भाई परमानंद यानीं भाषण करताना डॉक्टराच्या त्यागपूर्ण जीवनाची मुक्तकंठाने प्रशंसा केली होती. ते म्हणाले कीं, "माननीय डॉक्टर हेडगेवारजी पिछले कई वर्षो से घर की कोई चिंता न करके संघमय बने हुए है । वे चंदा नही मॉगते । उन्हे कोई जानता भी नहीं और न यही बाते लोग जानते हैं कि सी. पी. ( मध्य प्रांत ) मे संघ के ३५००० स्वयंसेवक है । ...... कोई संस्था बातों से नहीं चल सकती और नहीं प्रस्ताव पास करने से । जब कोई पुरुष सघटन करने के लिये अपना जीवन लगा देता है और अपने जैसे काफी लोग पैदा कर लेता है, तब वह संस्था चल सकती है ।"

हा लाहोरचा वर्ग ऑगस्टमध्ये चालू होता. या वेळपर्यंत तेथे सुरू झालेल्या संघशाखातील स्वयंसेवकाना प. पू. डॉक्टरांचें नाव केवळ ऐकूनच माहीत होते. त्यामुळेंच भाई परमानंदानीं 'त्याना कोणी ओळखत नाही' असा उल्लेख आपल्या भाषणात केला होता. पंजाबात संघशाखा सुरू करण्यासाठीं जे कार्यकर्ते गेले होते, त्यांना अशी प्रेरणा देणारे डॉक्टर हेडगेवार पंजाबात प्रत्यक्ष यावेत व आपणाला त्यांचे दर्शन घडून त्याच्या मुखाने संघाचे विचार ऐकावयास मिळावेत, अशी उत्कट इच्छा पत्रातून व्यक्त होत होती. अर्थात् पंजाबसारख्या उत्साहाचे व हिंदुत्वाच्या जागृतीचें स्थान असलेल्या प्रातात संघाच्या कामाची होणारी प्रगति समक्ष जाऊन पहावी व तेथे उभ्या राहिलेल्या कार्यकर्त्यांना भेटून प्रोत्साहन द्यावें, असें डॉक्टरानाहि वाटणे स्वाभाविक होतें. त्यातूनच लाहोरच्या वर्गाला भेट देण्याचा विचार निश्चित करून डॉक्टरानीं दि. १५ ऑगस्टला रात्रौ प्रस्थान ठेवले. या वेळीं त्याच्याबरोबर श्री. बाबासाहेब आपटे व श्रीगुरुजी हेहि गेले होते.

प्रथमतः ही मंडळी गोंदियामार्गे काशीला गेली. वाटेत गोंदिया, जबलपूर व मोगलसराई येथें डॉक्टराना भेटण्यासाठीं अनेक स्वयंसेवक स्थानकावर आले होते. विशेषतः मोगलसराई येथें तर रात्रीं ९॥ वाजतां काशीहून दहा-पंधरा मैल प्रवास करून स्वागतासाठीं सामोरे आलेल्या उत्साही स्वयंसेवकानीं डबा

गजबजून गेला. या स्वयंसेवकांत काशी विश्वविद्यालयांतील डॉ. फुलदेव सहाय, वर्मा, प्रा. कुलकर्णी आदि मंडळीहि होती. काशीला त्यांचें दि. १७ पासून तीन दिवस वास्तव्य झालें. या वेळीं काशी नगर शाखेंत प. पू. डॉक्टरांनीं स्वतः भाषण न करतां श्रीगुरुजी यांना बोलावयास लावलें. तसेंच विश्वविद्यालयांत डॉक्टरांनीं तेथील विद्यार्थ्यांची बैठक घेऊन प्रश्नोत्तररूपानें सर्वांच्या शंकांचें पूर्ण समाधान केलें. ही चर्चा हिंदींत झाल्यानें मद्रासकडील कांहीं जिज्ञासु विद्यार्थ्यांना मनांत असूनहि त्यांत भाग घेतां आला नाहीं. ही गोष्ट ध्यानीं येतांच डॉक्टरांनीं त्यांच्याजवळ इंग्रजींतून चर्चा करण्यासाठीं गुरुजींना त्यांना दुसऱ्या जागीं नेण्याची सूचना दिली. त्यानुसार त्या विद्यार्थ्यांजवळ गुरुजींनीं विचारविनिमय केला. या वेळीं डॉक्टरांची बैठक चालूच होती व ती उद्बोधक व उत्तेजक बैठक इतकी रंगली कीं, तीन तास केव्हां गेले, तें स्वयंसेवकांना समजलेंहि नाहीं. या दोन-तीन दिवसांत डॉक्टरांच्या निवासस्थानीं स्वयंसेवकांची सारखी ये-जा सुरू होती व डॉक्टरांजवळ मनसोक्त बोलण्याची व त्यांच्याकडून संघटनेचें तंत्र समजून घेण्याची सुसंधि लाभल्यानें स्वयंसेवकांत अपूर्व उत्साह दिसून येत होता.

या तीन दिवसांतच गोकुळ अष्टमीच्या दिवशीं तेथील संस्कृत महाविद्यालयाच्या छात्रालयांत झालेल्या श्रीकृष्णोत्सवांत श्री. बाबासाहेब आपटे व श्रीगुरुजी या दोघांचीं भाषणें झालीं. त्यासंबंधीं पुढें नागपूरला आल्यावर केंद्र-शाखेंत केलेल्या भाषणांत गुरुजींनीं सांगितलें होतें कीं, "...अनपेक्षित रीतीनें माझ्यावर बोलण्याची पाळी आली. कारण तिथले मुख्याध्यापक माझ्या जटा-दाढीवर मोठे प्रसन्न झाले व त्यांना वाटलें कीं, मला धर्माबद्दल पुष्कळ ज्ञान असेल. जवळ जवळ पंधरा मिनिटेंपर्यंत मी बोललों. 'आपण ब्राह्मण नाहीं तर चांडाळ आहोंत. कारण तीन दिवस म्लेच्छांच्या घरीं राहिल्यानें मनुष्य चांडाळ होतो, असें आपलें धर्मशास्त्र सांगतें. म्हणून सद्यःस्थितींत आपण क्षत्रिय धर्माचेंच पालन केलें पाहिजे' असा माझ्या बोलण्याचा मथितार्थ होता." प्रवासांत ठिक-ठिकाणीं गुरुजींचीं निरनिराळ्या निमित्तानें होणारीं अशीं भाषणें डॉक्टर नीट ऐकत होते. त्यांतील आत्मविश्वास पाहून त्यांना प्रसन्नता वाटे. पण त्यांच्या तारुण्यसुलभ स्वभावानुसार त्यांच्या शब्दाला येणारी धार व दाहकता ही डॉक्टरांच्या दृष्टींतून सुटली नव्हती.

काशीला डॉक्टरांच्या भाषणानंतर गुरुपौर्णिमेच्या दिवशीं, तेथील स्वयंसेवकांनीं ३५० रुपये जमवून प्रा. द. अ. कुलकर्णी यांच्या हस्तें त्यांना जागे-करितां अर्पण केले होते. काशीनंतर लाहोरला जातांना कानपूर व प्रयाग या स्थानकांवर अनेक स्वयंसेवकांनीं डॉक्टरांची भेट घेतली. दि. २१ ला दिल्ली शाखेंत त्यांचें भाषण झालें व मग सर्व जण लाहोरला जाऊन पोहोंचले. तेथील अधिकारी शिक्षण वर्गांत त्यांचें दि. २३ ला भाषण झालें. दुसऱ्या दिवशीं त्यांनीं

गुरुजींना बोलावयास सागितले. पुन्हा चौथ्या दिवशी डॉक्टरानी बोलावे, असे ठरले होते. पण एकाएकीं ते आजारी पडले. या वेळींहि डॉक्टरानी गुरुजींचीच वक्ता म्हणून योजना केली होती. दि. २७ ला वर्गामध्ये डॉक्टराना सैनिकी पद्धतीनें मानवंदना देण्याचा कार्यक्रम होता. त्या वेळीं झालेली प्रात्यक्षिके पाहून राजा नरेंद्रनाथ यानीं उत्स्फूर्त भाषण केले व ' संघाचे कार्य प्रातात पसरवावे आणि हिंदुस्थान सरकारने भारतीय जनतेत ' मिलिटरी ' व ' नॉन्‌मिलिटरी ट्राइब्ज ' हा पाडलेला भेद शुद्ध अज्ञानमूलक आहे, असे पटवून द्यावे ' असे सांगितले. यानंतर डॉक्टर प्रकृतीमुळे केवळ अर्धा तासच बोलले. पण त्याचे ते भाषण अत्यंत तर्कशुद्ध व ओजस्वी होते. श्रीगुरुजी त्या वेळच्या पत्रात म्हणतात की," इतक्या स्पष्ट व मुद्देसूद रीतीने संघाचे सर्वांगीण विवेचन क्वचितच ऐकावयास मिळते. तरी पण आणखी वेळ हवा होता. आणखी अर्धा-पाऊण तास भाषण चालूच रहावे, अशी इच्छा उत्पन्न होण्यासारखे मधुर व आकर्षक ते भाषण होतें. " दुर्दैवाने त्या भाषणाचे प्रतिवृत्त १९४७ साली देशविभाजनाच्या दुःखपूर्ण व खळबळजनक परिस्थितींत नष्ट झाले आहे !

या भाषणाहून परतल्यावर डॉक्टराच्या कबरेत एकाएकी उसण भरली व त्याना बराच त्रास होऊं लागला. पण तशाच स्थितींत दुसऱ्या दिवशी ती कळ सोसून डॉक्टरांनीं पंजाबचे एक अग्रगण्य पुढारी डॉ. गोकुळचद नारग याच्या घरी जाऊन त्यांची भेट घेतली व नागपूरला दसऱ्याच्या उत्सवाला अध्यक्ष म्हणून येण्याला त्याच्याकडून होकार मिळविला. दि. २९ ला त्यानी राजा नरेंद्रनाथ याचीहि भेट घेतली.

उसण भरली त्याच्या दुसऱ्या दिवशीं तेथील महाराष्ट्र मडळाच्या गणेशोत्सवांत प. पू. डॉक्टराचे भाषण होणार होते. पण त्याना त्या दिवशीं फारच त्रास होऊं लागल्याने डॉक्टरानीं त्या ठिकाणीं आपल्या जागी गुरुजीना पाठविले. त्यानीं तेथे जाऊन ' व्यक्ति व समाज याचे परस्पर सबंध ' या विषयावर भाषण दिले. त्यानंतर त्या मडळाचे कार्यवाह डॉक्टराना भेटून म्हणाले की, " आपण पाठविलेल्या वक्त्यानीं फारच ओजस्वी व सुंदर भाषण दिले ! " त्यावर त्यानीं हंसत विचारले कीं, " त्यानीं भाषणांत काय सागितले ? " अर्थात्‌ हा प्रश्न त्या गृहस्थाना अडचणीचा वाटला, असे त्यांच्या गोंधळलेल्या मुखावरून सहज दिसण्यासारखे होते. पण प्रश्नाला उत्तर हें काहीं ना काहीं दिलेच पाहिजे म्हणून ते म्हणाले, " काय सागितले ते नका विचारूं, पण उत्तम सागितले एवढे खरें ! " डॉक्टराच्या विनोदप्रिय स्वभावाला हे उत्तर बरेच दिवस पुरले. स्वयंसेवकानी केवळ करमणूक म्हणून भाषण न ऐकता त्यातील विचार नीट ध्यानांत ठेवून, मागाहून त्याचें मनन केले पाहिजे, असें सागताना ते हा स्वानुभव सागून मनमुराद हंसत असत व सर्वांना हंसवीत असत !

लाहोरला दि. २९ ला रात्रीं डॉक्टरांना निरोप देण्यांत आला. त्या वेळीं एका स्वयंसेवकानें डॉक्टरांच्या गौरवपर एक स्वरचित पद्य म्हटलें होतें. दि. ३० ला सकाळीं डॉक्टर दिल्लीला येऊन पोहोंचले. या प्रवासांतील हालचालीनें त्यांचा त्रास फारच वाढला होता. यानंतर डॉक्टरांना गुजरात व महाराष्ट्र इकडे जावयाचें होतें. वास्तविक गुजरातमध्यें संघाच्या कामाला सुरुवात होऊन वर्ष दीड वर्षच झालें होतें. अशा वेळीं तेथील मंडळींनीं आग्रह करून लाहोरनंतर बडोदें व कर्णावती ( अमदाबाद ) येथील गणेशोत्सवांत भाषणासाठीं येण्याचा डॉक्टरांकडून होकार घेतला होता. पण प्रकृति फारच बिघडल्यानें निरुपाय होऊन डॉक्टरांनीं तारेनें आपली असमर्थता कळविली व त्यामागोमाग श्रीगुरुजींनीं त्या दोन्ही ठिकाणीं, तसेंच मुंबई, पुणें, नगर व सांगली या संघ-शाखांनाहि, डॉक्टरांच्या प्रकृतीमुळें त्यांना त्या भागांत येणें कसें अशक्य झालें आहे, हें पत्रांतून सविस्तरपणें कळविलें. दि. ३१ ऑगस्टच्या दिल्लीहून लिहिलेल्या पत्रांत गुरुजी म्हणतात कीं, " ...... ठरलेले कार्यक्रम सोडावे लागले, ह्याचें प. पू. डॉक्टरांना अत्यंत दुःख झालें; पण ईश्वरेच्छा बलीयसी ! आल्यापासून मालिश, शेकणें व औषधोपचार नीट सुरू असून आतां किंचित् आराम वाटूं लागला आहे. पण अजून प्रकृति नियोजित दौऱ्याची दगदग सहन करण्यासारखी झालेली नाहीं व इतक्यांत म्हणजे फक्त आज-उद्यांतच तशी होईल असेंहि दिसत नाहीं. " रविवार दि. ४ सप्टेंबरला डॉक्टर आजारी स्थितींतच नागपूरला येऊन पोंचले. अर्थातच यानंतर बरेच दिवस अंथरुणांत पडल्यापडल्याच त्यांना कार्यावर लक्ष ठेवण्याचा प्रसंग आला.

या लाहोरकडील प्रवासाचें वर्णन श्रीगुरुजी यांनीं नागपूरच्या शाखेपुढें दि. ६ सप्टेंबर १९३८ या दिवशीं कथन केलें. त्यांत या प्रवासांत असतांना गुरुजींना जो अनुभव आला व डॉक्टरांवरील उत्कट भक्तिभावनेंतून त्यांना जें आत्मपरीक्षण करतां आलें, त्याचा निष्कर्ष त्यांनीं अगदीं मनमोकळेपणानें सर्वांसमोर ठेवला होता. ते म्हणाले कीं, " ...... ह्या संपूर्ण प्रवासामध्यें माझ्या मनावर एक गोष्ट पूर्णपणें ठसली व ती म्हणजे लोकसंग्रह करण्यासाठीं मनाचा समतोलपणा अगदीं अवश्य हवा. दुसऱ्याचें मन ओळखून एकाच वाक्यांत थोडक्यांत आपलें तत्त्व त्यांना पटवून देणें आणि भिन्न भिन्न व्यक्तींचा विरोध नाहींसा करून त्यांना एकाच सूत्रांत गुंफणें ही योजकता डॉक्टरांमध्यें पूर्णपणें वसत आहे. बाकीच्या आपल्यामध्यें ती दिसतच नाहीं. यासाठीं आपण आपल्या परमपूजनीय सरसंघ-चालकांचा आदर्श नेहमीं आपल्या डोळ्यांसमोर ठेवला पाहिजे. "

आतां प. पू. डॉक्टर प्रकृतीनें थकले होते. पण त्यांचा दिसणारा स्थूल देह व कोणत्याहि परिस्थितींत हंसतमुख राहण्याचा त्यांचा स्वभाव यांमुळें त्यांच्याजवळ वावरणाऱ्यांनाहि त्याची कल्पना आली नव्हती. कांहीं जणांना कल्पना आली

असली, तरी डॉक्टरांना विश्रांति घ्या, असे सुचविण्याचे धाडस त्यांच्यानें होण्यासारखे नव्हते. कारण बिघडलेल्या प्रकृतिमानांतहि डॉक्टरांची संघासाठीं होणारी हालचाल ही इतरांना लाजविणारी होती. कांहीं जणांनीं अनेक वर्षांच्या स्नेहाच्या पुण्याईवर डॉक्टरांना तसा आग्रह करून पाहिला. पण डॉक्टर त्या सूचना हंसतमुखाने, साबणाचे फुगे लहान मुलानीं आकाशात उधळावेत, त्याप्रमाणे लीलेने उधळून लावीत. स्तुति-निंदेच्या व अनुकूल-प्रतिकूलतेच्या वार्ता सारख्या ऐकू येत होत्या व दोन्हीचें स्वागत डॉक्टरांकडून अधिक प्रयत्न करण्याच्या संकल्पाने होत असे. कोल्हापूरला राजाराम स्वयंसेवक सघाला तेथील श्रीमंत छत्रपतीनीं पाचशे रुपयाची देणगी दिल्याची वार्ता ऑक्टोबर १९३८ मध्ये येऊन पोहोचली, त्याच्याआधींच कांहीं दिवस नासिकच्या जिल्हाधिकाऱ्याने सरकारी नोकरानीं संघाच्या कार्यक्रमांत भाग घेऊं नये वा त्याच्या उत्सवाना अध्यक्ष म्हणून जाऊं नये, अशी समज दिल्याचे वृत्तहि डॉक्टरानी वाचले होते. यासंबंधीं डॉक्टराची स्थितप्रज्ञ लेखणी सहज लिहून जाते कीं, " ...... एका बाजूला अशा तऱ्हेने संघकार्यावर प्रशस्तीचा व पुष्पाचा वर्षाव होत असताना दुसऱ्या बाजूला त्याच वेळीं या कार्याला विरोध उत्पन्न व्हावा, यात आश्चर्य वाटण्यासारखें काही नाहीं. कारण कोणत्याहि सत्कार्यांत अशाच गोष्टी घडत असतात, असा आजपर्यंतचा अनुभव आहे. परंतु स्वयसेवकाच्या निष्ठेवर उभा असलेला संघ अशा प्रकारच्या कोणत्याहि विरोधाला भीक न घालता उत्तरोत्तर आपली प्रगति करून घेत आहे व घेत राहील, हीहि गोष्ट याच वेळीं जनतेच्या निदर्शनाला येत आहे, ही समाधानाची गोष्ट आहे. "

या समाधानांतच स्वतःचा आजार विसरून डॉक्टरानी नागपूरमध्ये खटपट चालविली होती. त्याना उसणीचा त्रास सुरू झाल्यानतर इतरत्रहि ती गोष्ट कळली व कांहीं जणांनीं त्याच्या प्रकृतीविषयीं चिंता व्यक्त करणारी पत्रें पाठविली. पण त्यावर डॉक्टरानी मुंबईचे श्री. दादा नाईक याना जें उत्तर पाठविले आहे तें त्यांच्या त्या वेळच्या मनःस्थितीची परिपूर्ण कल्पना आणून देणारे आहे. ते लिहितात कीं, " आतापर्यंत पाहिजे तशी विश्राति घेता आली असती. परंतु संघकार्यांत उतरलेल्या माणसाला तशी विश्रांति मिळणें दुरापास्तच असतें. तरी माझे प्रकृतींत काळजी करण्यासारखे कांहींहि नाहीं हें समजून स्वस्थ राहावें. चिंता करूं नये. " असा हा चालता-बोलता कर्मयोगच संघाची चिंता वाहत होता !

याच परिस्थितींत निजामाच्या हिंदुद्वेषी व अरेरावी धोरणानें त्याच्या संस्थानातील लक्षावधि हिंदूंना अभिमानानें व निश्चिंतपणें जीवन जगणें असंभवनीय होऊन बसलें व त्यांतून 'भागानगर निःशस्त्र प्रतिकार मंडळ' स्थापन होऊन निजामाच्या धोरणाचा पाडाव करण्यासाठीं सत्याग्रहाचें आदोलन १९३८ च्या ऑक्टोबरमध्यें सुरू झालें. या आंदोलनांत स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या नेतृत्वाखालीं

हिंदुमहासभा व आर्यसमाज या दोन्ही संस्थांनीं प्रामुख्यानें उडी घेतली होती. निजामाचें संस्थान हें वऱ्हाड व महाराष्ट्र या दोन्ही प्रांतांना लागून होतें व निजामासंबंधींची चीड मराठी रक्तांत थेट पेशवे-काळापासून रसरसत असल्यानें, त्या त्या भागांत स्वाभाविकपणेंच सत्याग्रहासंबंधींची आस्था तरुण मनांत वसत होती. याच्या जोडीनें गेल्या पांच-सात वर्षांत वऱ्हाड व महाराष्ट्र यांमध्यें तरुण वर्गांत संघानें जी हिंदु समाजासंबंधींची कळकळ व कर्तव्यनिष्ठा निर्माण केली होती, ती देखील या आंदोलनाला पोषक ठरली असल्यास नवल नव्हतें.

असा आंदोलनाला प्रारंभ झाल्यानंतर प. पू. डॉक्टरांना संघांतील ज्या ज्या कार्यकर्त्यांनीं व स्वयंसेवकांनीं स्वयंप्रेरणेनें त्यांत भाग घेण्याची अनुमति विचारली, त्यांना त्यांनीं ती सहर्ष दिली होती. मात्र ज्यांच्यावर एखाद्या भागांतील संघकार्याची प्रगति संपूर्णतः निर्भर होती, त्यांना मात्र संघटनेच्या दृष्टीनें त्यांनीं बाहेरच राहावें, असें कटाक्षपूर्वक सांगितलें होतें. महाराष्ट्र प्रांत-संघचालकांच्या पत्राला उत्तर देतांना त्यांनीं यासंबंधींचें धोरण एका वाक्यांत कळविलें होतें. तें असें कीं, " सत्याग्रहांत ज्या लोकांना भाग घ्यावयाचा असेल त्यांना व्यक्ति या नात्यानें घेतां येईल. " अर्थात् डॉक्टरांनीं संघ सुरू केल्यापासून आपल्या व्यवहारांत प्रत्येक राजकीय आंदोलनासंबंधीं अगदीं सुसंगत असें एक धोरण ठेवलें होतें. तें असें कीं, संघाचे स्वयंसेवक हे जसे संघाचे घटक तसेच विशाल हिंदु समाजांतील एक जाणते व जागृत नागरिक असतात व त्यामुळें राजकीय आंदोलनांत त्यांनीं त्याच नात्यानें व्यक्तिशः भाग घ्यावा. १९३०-३१ च्या जंगल सत्याग्रहांत भाग घेण्यापूर्वीं डॉक्टरांनीं हें विचारसूत्र ध्यानीं घेऊनच स्वतः सरसंघचालकत्वाची धुरा डॉ. परांजपे यांच्याकडे सोंपविली होती व आपल्या सहकाऱ्यांनाहि तसेंच करावयास लावलें होतें. राजकीय आंदोलनाचें तात्कालिक, नैमित्तिक व संघर्षमय स्वरूप आणि संघाचें नित्य, अखंड व रचनात्मक स्वरूप, ही या दोहोंतील भिन्नता ध्यानीं घेऊन आंदोलन तर यशस्वी व्हावें, पण त्या आंदोलनांतहि चिरंतन संघकार्य अबाधित राहावें, या हेतूनेंच हें धोरण डॉक्टरांनीं दूरदर्शीपणानें व विचारपूर्वक आंखलें होतें. कांहीं जणांची तात्कालिक ओढवणारी अप्रसन्नता पत्करूनहि त्यांनीं त्या धोरणाचा पाठपुरावा दूरदर्शित्वानें केला होता, असें दिसून येतें.

संघ म्हणून भाग घेण्याला डॉक्टरांची अनुमति नव्हती; तरी संघाचे स्वयंसेवक नागरिक म्हणून त्यांत पुरेसा भाग घेतील, हा विश्वास त्यांना पुरेपूर वाटत होता. १९३८ मध्यें डॉक्टरांनीं आंदोलनाचे एक प्रमुख सूत्रधार श्री. गजाननराव केतकर यांनीं पत्र पाठवून आंदोलनाकडे लक्ष देण्याविषयीं कळविलें होतें. तेव्हां ते त्यांना लिहितात कीं, " ...... वरील कार्यासंबंधीं ( सत्याग्रहासंबंधीं ) मला जें करणें शक्य आहे तें मी करीत आहें. सत्याग्रहाकडे

कोणाचेंहि दुर्लक्ष होणें शक्य नाही. " तसेंच त्या काळांत डॉक्टर पुण्याला आले असता, श्री. शं. रा. तथा मामा दाते व सातारचे श्री. भाऊराव मोडक यांनीं डॉक्टरांची भेट घेतली होती. त्या भेटीसंबंधी श्री. मामा दाते लिहितात कीं, " ......आमच्या म्हणण्याचा आशय त्यांनीं तेव्हाच हेरून विश्वासाने असे उद्गार काढले की, ' पांचशे लोक सत्याग्रहात पाठवावयाचे एवढेच ना ? त्याची काळजी नको. बाकीचे तंत्र तुम्ही सांभाळा. ' हे सर्व ते ज्या आत्मविश्वासानें बोलले व त्यानीं जी संवेदना व्यक्त केली, तिचे स्मरण मला आजहि होते. "

पण पांचशेंच काय त्याच्या तिप्पट-चौपट स्वयंसेवकांनीं त्यांत भाग घेतला होता. त्यापैकीं कोणालाहि डॉक्टरांनीं स्वतः वा संघ-अधिकाऱ्याकडून ' तूं जा ' असा आदेश दिला नव्हता. ज्यांच्या हृदयातील हिंदुत्वाच्या जागत्या ज्योतीने तसा आदेश दिला ते गेले; पण ती जागती ज्योत म्हणजे संघाच्या सस्काराचे फलित होते, हे विसरून चालणार नाहीं. स्वतः डॉक्टराचा चुलतभाऊ श्री. वामन हेडगेवार हा असाच एक दिवस सत्याग्रहात संमीलित झाला. तो त्या वेळीं एक हूड शाळकरी विद्यार्थी होता. त्याने निजामाच्या कारागृहातून कांही दिवसानी प. पू. डॉक्टराना पत्र लिहून " अनुमति न घेतां भाग घेतला तरी क्षमा करावी, " अशा आशयाचें पत्र पाठविले. तेव्हा त्याला डॉक्टरांनीं कळविले कीं, " मी तुझ्या जागीं असतो तर तूं केलेस तसेंच मींहि केले असते. तरी सकोच न करता शिक्षा संपल्यावर घरीं निघून ये. " पुढें काहीं वर्षांनीं संघाचे सरकार्यवाह झालेले श्री. भय्याजी दाणी यांनीं सत्याग्रह करावयाचे निश्चित केल्यावर मग डॉक्टरांना तो विचार कळविला. नागपूरमध्ये त्याना निरोप देण्याचा समारभ झाला तेव्हा डॉक्टर स्वतः उपस्थित होते व भय्याजींनीं शेवटी त्याना नमस्कार करताच ते म्हणाले कीं, " तूं, ' जाऊं का ? ' असे विचारावयास पाहिजे होतें. आता स्वयंप्रेरणेनें निघाला आहेस तेव्हा अवश्य जा. माझा तुला आशीर्वाद आहेच ! " डॉक्टरानीं अशा स्निग्ध शब्दांत अनुशासनाची जाणीव दिली असली तरी कोणाच्या उत्साहावर त्यानीं कधीं चुकूनहि पाणी पाडलें नाहीं. त्यांची कोणतीहि गोष्ट अतिरेकी नसे. लोकसंग्रहाच्या मर्यादेंतच त्याचे भाव सदैव प्रकट व्हावयाचे.

अशा पद्धतीचें धोरण कांहीं बाहेरील हिंदुत्ववादी म्हणविणाऱ्यांना संमत नव्हते व त्यांनीं डॉक्टर व संघ यांच्यासंबंधीं टीकात्मक व खवचट लिखाण सुरू केलें; पण डॉक्टरांची शांतता त्यामुळे लवमात्र ढळली नाहीं.

अशा आदोलनाच्या वातावरणांत डॉक्टरांच्या प्रकृतीने अगदीं पाठ पुरविली होती. त्या वेळच्या एका पत्रांत ते सहज लिहून जातात कीं, " कंबरेंतील दुःखानें पाठींतील जुन्या दुःखाशीं आपलें सख्य जोडलेले आहे. " पण नागपूरच्या दसरा उत्सवाचे अध्यक्ष म्हणून पंजाबमधून डॉ. गोकुळचंद नारंग येणार होते,

म्हणून डॉक्टरांनीं फारच परिश्रम घेतले. कोणतीहि गोष्ट यशस्वी करावयाची असेल तर स्वतःला किती विसरावयास पाहिजे, याचा धडा म्हणजेच डॉक्टरांचे त्या काळांतील प्रयत्न होत, असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. हळदीघाटच्या रणसंग्रामानंतर राणा प्रतापाचे प्राण वांचविण्यासाठीं त्याच्या आवडत्या 'चेतक' अश्वानें स्वतःच्या प्राणांची क्षिति न बाळगतां ज्या भक्तीनें व त्वेषानें आपल्या शरीरांतील सर्व शक्ति गतिमान् केल्या होत्या, त्याचीच आठवण डॉक्टरांच्या त्या वेळच्या प्रयत्नांकडे पाहिल्यावर झाल्यावांचून राहत नाहीं! दसऱ्याच्या दिवशीं नागपुरांत तीन सहस्र गणवेषधारी स्वयंसेवकांचें संचलन झालें. त्यांत डॉक्टर स्वतः संमीलित होते व पंजाबमधून आलेले डॉ. नारंग यांची नीट व्यवस्था करण्यासाठींहि त्यांनीं बारीकसारीक गोष्टी अगदीं योजल्याप्रमाणें घडाव्यात म्हणून दक्षता घेतली. कामाची किती निकड आहे हें समाजाच्या कसें ध्यानांत आणून देऊं, असें त्यांना झालें होतें. इतर सहकारी संघासाठीं धांवपळ करीत होते; पण ती हालचाल काळाशीं बरोबरी करणारी देखील नाहीं, मग काळावर मात करणें दूरच राहिलें, असें त्यांना वाटत होतें यांत शंका नाहीं. त्यांच्या मनाची होणारी तगमग केव्हां केव्हां या दिवसांत शब्दरूप घेऊनहि कागदावर उमटणें स्वाभाविक होतें. दसरा महोत्सवासंबंधीं पुणें येथील संघचालकांना लिहिलेल्या पत्रांत ते म्हणतात कीं, "दसरा महोत्सवांत भाग घेण्यासारखी माझी प्रकृति चांगली नव्हती. तरी पण मीं तीन दिवसपर्यंत स्वतःला आजारी न समजतां साधारण मनुष्याप्रमाणें उत्साहांत पूर्णपणें भाग घेतला. सीमोल्लंघनाचे मिरवणुकीच्या वेळीं मी गणवेषांत होतों. हे इतके परिश्रम घेणें आवश्यक असल्यामुळें मीं ते घेतले. अर्थातच याचा परिणाम प्रकृतीवर झाल्याशिवाय राहिला नाहीं."

या काळांत डॉक्टरांच्या कौटुंबिक परिस्थितींत दारिद्र्याच्या जोडीनेंच आणखी चिंता निर्माण झाली. डॉक्टरांचा भाचा श्री. दिनकर सदाशिव पट्टलवार हा अनेक वर्षे महाविद्यालयीन शिक्षणासाठीं त्यांच्याकडेच राहत असे. त्याला एकाएकीं वेड लागून त्याचा घरांत फार उपद्रव होऊं लागला. वर्षभराच्या अवधींत तो पदवीधर होऊन मार्गीं लागेल व त्याच्या असहाय स्थितींत त्याला आपल्या पायावर उभें करण्याचें कर्तव्य आपण पार पाडूं, अशी डॉक्टरांना आशा होती. पण या घटनेनें त्यावर पाणी पडलें. डॉक्टरांचें घर हें रात्रंदिवस संघकार्यकर्त्यांनीं गजबजलेलें असे व अशा स्थितींत वेडाच्या लहरींत तो जे चाळे करी, ते अत्यंत त्रासदायक ठरत. डॉक्टरांच्या दिवसेंदिवस वाढत जाणाऱ्या अशक्ततेंत त्यांना हा मनस्ताप अधिकच जाचक ठरला व त्यांच्यासारख्या अत्यंत संयमी व सहनशील व्यक्तीच्या व्यवहारांतहि त्यामुळें केव्हां केव्हां चिडखोरपणाची छटा उमटूं लागली.

१९३८ च्या डिसेंबरमध्यें 'संघानेंच भागानगर आंदोलनांत संघ म्हणून जणूं भाग घेतला आहे,' असा अपसमज निर्माण करणारे उल्लेख नागपूरला त्या

सत्याग्रहाच्या कांहीं चालकांनीं काढलेल्या पत्रकांत येऊं लागले. त्या लोकांचा प्रयत्न संघाला राजकारणात गुंतविण्याचा होता. तेव्हा त्यांना एक पत्र पाठवून डॉक्टरांनीं असें स्पष्ट कळविलें कीं, “ रा. स्व. संघासंबंधीं लोकांत गैरसमज निर्माण करणारा मजकूर आपले पत्रकांतून येणें आपल्या कार्याच्या दृष्टीने केव्हाहि हितावह नाहीं आणि म्हणून रा. स्व. संघाचा उल्लेख यापुढें आपल्या पत्रकातून न करण्याबद्दलची सक्त ताकीद प्रसिद्धि-विभागाला ताबडतोब देण्यात यावी. ”

डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यांतील एक घटना उल्लेखनीय आहे. ती म्हणजे डॉक्टरांच्या लोभांतील एके काळचे संघकार्यकर्ते श्री. बाळाजी हुद्दार हे स्पेनमधील अंतर्गत लढाईतून मुक्त होऊन अनेक वर्षांनी नागपूरला परत आले ही होय. जनरल फ्रॅंकोविरुद्ध ज्या सेना लढत होत्या, त्यात भाग घेण्यासाठीं इंग्लंडमधून श्री. हुद्दार हे स्पेनमध्ये गेले असतां लढताना फ्रॅंकोच्या कारागृहात पडण्याचा प्रसंग त्याच्यावर आला होता. ते प्रथम इंग्लडमध्ये वृत्त-व्यवसायाच्या शिक्षणासाठी गेले. त्याचा सर्व दृष्टीने तो योग जमवून आणण्यात तेव्हा डॉक्टराचा पुढाकार होता. एके काळी सघात धडार्डाने कार्य करणारा बुद्धिमान् व तरुण कार्यकर्ता चार स्वतत्र देशातील जीवन पाहून परत येत आहे, या घटनेनें डॉक्टराना एक प्रकारची आशा वाटत होती. हुद्दाराजवळ व्यक्तित्वहि होते व वक्तृत्वहि. तेव्हा असा कार्यकर्ता पुन्हा येत असल्याचा आनंद डॉक्टराना होणें स्वाभाविक होते. दि. २४ डिसेंबरला ते नागपूरला आले, तेव्हा डॉक्टरानी स्थानकावर जाऊन त्यांचे स्वागत केले. त्यानतर स्वाभाविकच त्याच्या अनेकदा भेटी झाल्या व त्यांतून हुद्दाराचे मतातर झाल्याचे डॉक्टराच्या लक्षात आले ! पण त्यामुळे डॉक्टराच्या वागण्यात लवमात्रहि अंतर पडले नाही. त्यामुळे भारावलेल्या अंतःकरणाने सागताना श्री. हुद्दार म्हणाले कीं, “ उमदी मैत्री हे डॉक्टरांच्या यशाचें मर्म होते. ते कोणत्याहि थरातील व कोणत्याहि वयाच्या व्यक्तीशी खरोखर समरस होत. सदैव मैत्रीची मूल्ये साभाळणे ही डॉक्टराच्या स्वभावातील अपूर्वता होती. त्याचे व माझे तीव्र मतभेद असूनहि त्याच्याशीं भावनात्मक ताटातूट करण्याची इच्छा होत नसे, असे डॉक्टर होते ! ”

असे असल्याने श्री. हुद्दार याच्याकडून नागपूर जिल्ह्याच्या १९३८ च्या शिबिरात डॉक्टरांनीं परदेशातील अनुभव स्वयसेवकाना सागविले होते. त्यात त्यानीं प्रामुख्याने तिकडील शेतकरी-कामकरी वर्गातील संघटनाविषयीं व जागृती-विषयीं अनेक गोष्टी सागितल्या. त्यासंबंधीं मागाहून सहज बोलताना डॉक्टर म्हणाले कीं, “ कामगार-मजूर यांच्या उन्नतीसंबंधींचा विचार संघात बोललेला चालेल, पण ‘ श्रीमंत विरुद्ध मजूर ’ अशी विग्रहाची भाषा नको. ”

देशव्यापी संघटना उभारण्याचा संकल्प सोडतांना देशकालपरिस्थिति व समाजाची मनःस्थिति ध्यानीं घेऊन परमपूजनीय डॉक्टरांनीं कांही गोष्टी पथ्य म्हणून

पाळण्याचा मनोमन निश्चयच केला होता, असें या काळांतील एकदोन पत्रांवरून स्पष्ट दिसतें. परतंत्र देशांत व तन-मन-धनानें दुर्बल बनलेल्या समाजांत प्रचंड कार्याची उभारणी करावयाची म्हणजे पाण्यासारखा पैसा खर्च करण्याची पात्रता नेतृत्वांत असली पाहिजे. पण डॉक्टरांना दोन वेळच्या जेवणाची भ्रांत होती, तेथें त्यांच्याजवळ पैशाचा सुकाळ कोठून अपेक्षावा ? अर्थात् संघाचें हितचिंतन करणाऱ्या कांहीं जणांना ही चणचण फारच सतावत असे व त्यांतून सोडत (लॉटरी) सुरू करण्याची कल्पना उदित झाली. त्यांत डॉक्टरांचे स्नेही श्री. बाबाराव सावरकर हेहि होते. या सोडतीच्या पत्रकावर डॉक्टरांनीं स्वाक्षरी करावी, असें त्यांचें आग्रह करणारें पत्र आलें. तेव्हां ते लिहितात कीं, " ......पू. बाबाराव (सावरकर) यांचें पत्र पोंचल्याचें त्यांना कळवावें. विचारांतीं मीं पूर्वी ठरविलेलें माझें मत अजूनहि कायम आहे. लॉटरीच्या पत्रकावर सही करतां येत नाहीं." भोळ्या-भाबड्या समाजांत प्रयत्न करण्याची ईर्षा आधींच क्षीण असते व त्यांत सोडत व जुगार अशा मार्गानें कष्ट न करतां श्रीमंत होण्याचा लोभ बळावला कीं, प्रयत्नवाद मागें पडून समाज स्वतःच्या उत्थानाच्या दृष्टीनें अधिक पंगू बनतो. सोडतींतून संस्थेला पैसा मिळेल; पण ज्यासाठीं संस्था उभी राहिली, तो समाज मात्र दुबळा झाल्या-वांचून राहणार नाहीं. यासाठीं लोकांच्या हृदयांतील विशुद्ध देशभक्तींतून व समाजाविषयींच्या खऱ्याखुऱ्या आत्मीयतेंतून जो पैसा मिळेल, तो पैसा तुलनेनें एक वेळ कमी असला तरी, परिणामीं समाजाला व संघटनेला आरोग्य-दायक ठरेल, ही गोष्ट डॉक्टरांनीं निश्चित ओळखली होती. त्यांतूनच त्यांनीं आपद्धर्म म्हणूनहि समाजाच्या गळ्यांत एक प्रकारची जुगारी वृत्तीची ही नवी आपत्ति अडकविण्याला असा नकार दिला होता. पैशाचा मोह हा अनेकदां इतका अनावर होतो कीं, देशोद्धारासाठीं निघालेल्या कांहीं राजकीय संस्थांनीं उभारलेला पैसा स्वतः न वापरतां इंग्रज सरकारनें त्या काळीं काढलेल्या 'बॉण्ड्स्' मध्यें गुंतविल्याचें आढळून येतें !! आणखी दैवदुर्विलास तो कोणता ?

याच पत्रामागोमाग नोव्हेंबरच्या शेवटीं महाराष्ट्रांतील एक वक्ते आचार्य श्रीराम गोसावी यांनीं संघांत दिलेलीं आपलीं भाषणें, संघाचें नांव देऊन छापण्याचा विचार केला व त्या पुस्तकाला डॉक्टरांनीं प्रस्तावना लिहावी, अशी विनंति करणारें पत्र पाठविलें. या पत्राला पाठविलेल्या उत्तरांत ते म्हणतात कीं, "...आजपर्यंत ठरलेल्या संघाच्या धोरणाचे दृष्टीनें संघाचें नांव आपल्या पुस्तकाला देणें शक्य होणार नाहीं. त्याचप्रमाणें मी ज्या धोरणाने आजपर्यंत वागत आलों आहें, त्याला अनुसरून आपल्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याचें कार्य मला स्वीकारतां येत नाहीं."

डॉक्टरांनीं ठिकठिकाणच्या कार्यकर्त्यांना वेळोवेळीं जीं पत्रें लिहिलीं तीं सोडून त्यांनीं स्वतंत्रपणानें कोणतेंच लेखन केलें नाहीं. लेखनाचा थोडासा उपयोग

असतो, हें ' स्वातंत्र्य ' दैनिक चालविणाऱ्या डॉक्टरांना माहीत नव्हते, असें म्हणता येणार नाहीं. पण त्यांनीं प्रत्यक्ष लोकांच्या हृदयांवर लिहिण्याची कला हस्तगत करून, सहस्रावधि तरुणांना ध्येयनिष्ठ बनविण्यांत यश मिळवितां येईल, या आत्मविश्वासानेच प्रारंभापासून लेखणी कमी वापरली. यासंबंधीं ते केव्हां केव्हां सागत असत की, " पाढऱ्यावर काळें न करता हिंदूंची अभेद्य व अजिक्य संघटना उभारण्याची माझी इच्छा आहे. " प्रत्यक्ष जीवनाचा व चारित्र्याचा ठसा चालण्याबोलण्यातून तरुण मनांवर उमटविता येईल व त्यातून अनुशासनपूर्ण लोकसंग्रहहि साधेल, हा डॉक्टरांचा आत्मविश्वास किती यथार्थ होता, हे आतां काळानेच ध्यानीं आणून दिले असून, भविष्यकाळातील संघाचे यश हे याच आत्मविश्वासाचा गौरव करणारें असेल, यांत शंका नाही. देशापुढे उभ्या असणाऱ्या असंख्य आपत्तींना पराभूत करणारे निष्ठावंत व पराक्रमी तरुण प्रचंड संख्येंत सर्वच जणांना हवे आहेत. पण ही मागणी पुरी करण्याचे सामर्थ्य डॉक्टराच्या प्रतिभेतून उदित झालेल्या पद्धतीतूनच प्रकट होणार आहे, असा निर्वाळा द्यावा लागेल. डॉक्टरानीं उभ्या केलेल्या संघटनेचें दर्शन त्या संघाच्या बाल्यावस्थेतहि भल्याभल्याच्या हृदयात कशीं दृश्ये रंगवीत असे, हें पाहण्यासारखे आहे. त्या वेळच्या महासभेच्या अधिवेशनात संघाचा व प. पू. डॉक्टराचा उल्लेख करतांना डॉ. मुंजे म्हणाले की, " डॉ. हेडगेवार याच्या रा. स्व. संघाचे कार्य फार महत्त्वाचे आहे. अवघ्या एका तासांत केवळ त्याच्या हाकेबरोबर तीन हजार युवक धांवून येतात, अशी आज नागपुरात त्यांनी नमुनेदार सघटना केली आहे...डॉक्टरानी तयार केलेल्या या युवक संघाकडे पाहून मला हुरूप व आशा वाटते. " १९३८-च्या डिसेंबरांत नागपूरच्या स्वयंसेवक शिबिराचे उद्‌घाटन करण्यासाठीं स्वातंत्र्यवीर सावरकर उपस्थित होते. त्यांनीं तर तेथील दृश्य पाहून असे उद्गार काढले कीं, " अशा या एकजात राष्ट्रीय तरुणाचे हातीं शस्त्र असणे अवश्य आहे. मला निश्चित वाटते की, या संघाचें कार्य शीघ्रगतीने वाढेल व दोन वर्षांचे आंत तो इतका सामर्थ्यवान् होईल कीं, त्याच्या बळावर नागपूर जर्मनीलाहि हटवूं शकेल, हालवूं शकेल ! "

पण हें दृश्य कशांतून उभे राहिलें होते ? याचे उत्तर प. पू. डॉक्टरानीं त्या डिसेंबरांत लिहिलेल्या पत्रांतून सहज मिळण्यासारखे आहे. ते लिहितात, " पुणे येथें होणाऱ्या ( संघाच्या ) जिल्हाधिकाऱ्यांच्या बैठकीला माझी प्रकृति प्रवासालायक नसतांहि मीं तेथें येण्याचें निश्चित ठरविलें आहे. " अशा कठोर निश्चयातूनच संघ वाढत होता !

* * *

# २७ : दृढीकरण

संघटना वाढत होती व जागतिक वातावरणांतहि परतंत्र देशाला स्वतःची विमुक्तता करून घेण्यास अनुकूलता निर्माण होऊं पाहत होती. बलशाली जर्मनीचें आक्रमक धोरण व त्याला थोपविण्यासाठीं इंग्लंडची चाललेली पडखाऊ खटपट, ही उद्यांच्या जागतिक संघर्षाची नांदी आहे, असा सूर सर्वत्र उमटूं लागला होता. हिंदुराष्ट्र स्वतंत्र होऊन वैभवांत नांदत आहे, हें दृश्य ' याचि देहीं याचि डोळां ' पाहावयास मिळावें, अशी महन्मंगल आकांक्षा हृदयांत बाळगून डॉक्टरांनीं प्रयत्न चालविले असल्यानें, येणाऱ्या काळाची चाहूल त्यांना अत्यंत आशादायक वाटली असल्यास नवल नव्हतें. पण येणाऱ्या संधीचा लाभ करून घेण्याइतकी शक्ति अजून सर्व देशांत उभी नाहीं व दिवसेंदिवस स्वतःच्या गलित गात्रांतहि धडपड करण्याचें त्राण नाहीं, याची अत्यंत तीव्र जाणीव १९३९ च्या प्रारंभापासूनच त्यांना त्रस्त करीत होती असें दिसतें. सुवर्णसंधि म्हणजे परिस्थितीची अनुकूलता व त्या नेमक्या वेळीं आत्मविश्वासानें उठाव करण्याची पात्रता यांची गोळा बेरीज असते. यांतील परिस्थितीची अनुकूलता दृष्टीच्या टप्प्यांत येऊं पाहत होती, पण दुसऱ्या गोष्टीविषयीं मात्र डॉक्टरांना निश्चितता वाटणें अशक्य होतें. वऱ्हाड, मध्यप्रांत, महाराष्ट्र व पंजाब या प्रांतांत शाखांना कांहीं रूप आलें होतें. पण इतर प्रांतांतून कोठें केवळ चंचुप्रवेश तर कोठें अजून तोहि नाहीं, अशी स्थिति होती. या गोष्टीच्या जाणिवेनें डॉक्टर अत्यंत व्यथित होत. पण त्यांच्या नसानसांत कर्तव्यनिष्ठा व कर्मयोग खेळत असल्यानें ढासळलेल्या प्रकृतिमानांतहि त्यांच्या प्रयत्नांत ढिलाई वा औदासीन्य डोकावूं शकलें नाहीं. त्यांचे व्यवहार दक्षतेनें सुरू होते.

संघाच्या प्रारंभापासून दैनंदिन कार्यक्रमांत दिल्या जाणाऱ्या आज्ञा व म्हटली जाणारी प्रार्थना श्री. अण्णा सोहोनी यांनीं कशी सिद्ध केली, याचा उल्लेख मागें आलाच आहे. ज्या वेळीं संघ केवळ नागपूर व त्याच्या आसपासच रांगत होता, त्या वेळीं आज्ञांचें संस्कृत व मराठी असें मिश्रण आणि प्रार्थनेंत मराठी व हिंदी यांची युति खपून जात होती. पण आतां मराठी प्रांताच्या सीमा ओलांडून संघानें पंजाब, उत्तरप्रदेश, बिहार, गुजरात, कर्नाटक आदि प्रांतांत पदार्पण केल्यावर, हें आज्ञांचें व प्रार्थनेचें प्राकृत व प्रांतीय स्वरूप अपुरें व दुर्बोध ठरणें

स्वाभाविकच होते. त्याचप्रमाणें संघस्वयंसेवकाच्या हृदयात त्याचे ध्येय ठसठशीतपणाने उमटवील अशी प्रार्थनेची रचना करणें आवश्यक आहे, असे डॉक्टरानी ओळखलें व त्यासाठीं फेब्रुवारी १९३९ च्या तिसऱ्या आठवड्यात डॉक्टरांचे स्नेही श्री. नानासाहेब टालाटुले याच्या सिंदी या गावी त्यांनीं प्रमुख कार्यकर्त्यांची बैठक बोलाविली.

सिंदी येथील बैठकीसाठी तेथील स्थानकाजवळील श्री. बबनराव पंडित याचा बंगला घेण्यात आला आणि तेथेंच आचारी ठेवून कार्यकर्त्यांच्या जेवणाखाणाची वगैरे सर्व व्यवस्था उत्तम प्रकारची करण्यात आली. या बैठकीला प. पू. डॉक्टर, श्रीगुरुजी, श्री. आप्पाजी जोशी, बाळासाहेब देवरस, तात्या तेलंग, विठ्ठलराव पत्की, बाबाजी सालोडकर, नानासाहेब टालाटुले व कृष्णराव मोहरीर अशी मंडळी उपस्थित होती व श्री. बबनराव पंडित यानीं तेथील व्यवस्थेचे काम सांभाळले होते.

या बैठकींत संघाची घटना, आज्ञा, प्रार्थना, कार्यपद्धति व प्रतिज्ञा अशा सर्व गोष्टीवर मनमोकळी चर्चा होऊन, वाढत्या सघटनेच्या दृष्टीने कोणते फेरफार करणे आवश्यक आहे, याचा विचार झाला. या बैठकीतील चर्चेत झालेल्या विचारमथनातून, भारतांतील सर्व भागात निःशंकपणाने आदरणीय ठरेल अशा संस्कृत ह्या देववाणीत सघाच्या आज्ञा निश्चित करण्यात आल्या. तसेच या बैठकीत सस्कृत प्रार्थना रचून घेण्यासाठी प. पू. डॉक्टरानी काही विचार व कल्पना सर्वासमोर ठेवल्या आणि त्या ध्यानी घेऊन श्री. नानासाहेब टालाटुले यानी गद्यरूपात प्रार्थना लिहून काढली. तसेच या बैठकीत सघाची कार्यपद्धति व घटना यावरहि काळानुसार हात फिरला.

ही बैठक प्रतिदिनीं सकाळी ८ ते ११, दुपारी ३ ते ६ व रात्रीं ९ ते ११ अशी साधारणतः आठ तास चालू असे. असा क्रम दहा दिवस सुरू होता. एवढ्या वेळात अनेक विषयावर कडाक्याची चर्चा होई व त्यात निरनिराळ्या मंडळीच्या स्वभावानुसार केव्हा केव्हा रागाचा पारा बराच वर चढे! अशा वेळीं डॉक्टरानी सर्वांचे विचार ऐकून घेऊन शातपणाने निःपक्षपाती समन्वय करणारा समारोप केला कीं, मग चर्चा अन्य विषयाकडे वळे. या चर्चेच्या वेळीं एखाद्या विषयाच्या दोन्ही बाजू नीट समजावून घेऊन व त्यांतील बारकावे न्याहाळून प्रतिपादन करण्याची गुरुजींची हातोटी सर्वांच्याच ध्यानी येण्यासारखी होती. लाहोरकडील संचारात गुरुजींनीं डॉक्टराच्या ज्या समतोलपणाचे दर्शन घेतले होतें, तो समतोलपणा त्याच्याहि व्यवहारात प्रवेशूं लागला होता. भक्तिभावानें ज्या गोष्टीचे चिंतन करावें, तसे वळण आपोआपच व्यक्तीच्या वृत्तीला व व्यवहाराला येत असते यांत शंका नाहीं. गुरुजी प्रतिपादनाच्या व चर्चेच्या रगात अगदीं अभिनिवेशानें व आत्मविश्वासानें चढाई करीत. पण डॉक्टरानीं एकदां

आपलें अभिमत देऊन अन्य विषयाला सुरुवात झाली कीं, मागील विषयांतील खारटतुरट भाग हा पाण्यावरील रेघेप्रमाणें पुसला जाऊन, पुन्हा त्यांची मनःस्थिति शांत व प्रसन्न झालेली दिसे. वाद सुरू झाला म्हणजे श्री. ल. रा. पांगारकर यांनीं वर्णन केल्याप्रमाणें—

" वादें चित्त जळे, समत्व वितळे, संतोष सारा पळे।
दीर्घस्नेह गळे, अहंकृति बळे, पुण्यार्धि तीहि ढळे।
शांति क्षांति चळे, सुबुद्धिहि मळे, संक्षोभ वादानळें।
वादी तो न वळे, न वादहि खळे, होती खुळे आंधळे ॥ "

अशी अवस्था होत असते. शिमगा गेल्यावर जसें मागें कवित्व उरावें वा मोटार गेल्यावर जसा हवेंत धुरळा कोंदाटून जावा, तशी वाद करणाऱ्यांची सामान्यतः वादानंतर मनःस्थिति होत असते! गुरुजींची या बाबतींतली असामान्यता पाहून डॉक्टरांना प्रसन्नता वाटे व ती ते इतरांजवळ बोलूनहि दाखवीत. ही बैठक चालू असतांना डॉक्टरांनीं, त्यांचे उजवे हात म्हणून ओळखले जाणारे श्री. आप्पाजी जोशी यांना, " माझ्या जागीं गुरुजींना सरसंघचालक केलें तर कसें काय होईल ? " असा सूचक प्रश्नहि विचारला होता. या बैठकीच्या वेळचीं डॉक्टरांचीं दोन छायाचित्रें उपलब्ध आहेत.

या बैठकीहून परत आल्यावर प. पू. डॉक्टरांनीं श्रीगुरुजी व पतकी यांना कलकत्ता येथें संघाच्या कार्यासाठीं पाठवून दिलें. या वेळीं डॉक्टरांची व गुरुजींची नेमकी काय मनःस्थिति होती, हें पाहणें उद्‌बोधक ठरेल. डॉक्टरांना त्यांच्या स्वतःच्या जीवनाचा दुसरा किनारा आतां दिसूं लागला होता व आपल्या-मागून, तंतोतंत आपल्या कल्पनेप्रमाणें या देशव्यापी संघटनेची धुरा वाहूं शकेल असा कार्यकर्ता उभा करण्याची आतुरता होती. तसा सुसंवादी अनुयायी न मिळाल्यास मोठमोठीं उभारलेलीं कामेंहि त्या व्यक्तीनंतर कशीं धुळीला मिळतात, याचे अनुभव डॉक्टरांनीं घेतले होते. हिंदुत्व हा प्राण वाटणाऱ्या पिढ्यांमागून पिढ्या उभ्या राहूं शकतील अशीं टिकाऊ संस्कार करणारीं संस्कार-केंद्रें डॉक्टरांनीं आपल्या प्रतिभेनें दैनंदिन शाखांच्या रूपानें उभारलीं होतीं. पण या सर्व केंद्रांना कोणत्याहि भीषण परिस्थितीच्या झंझावातांतहि योग्य तें मार्गदर्शन करून कार्यक्षम व प्रगतिशील ठेवूं शकणारें नेतृत्व त्यांना गुरुजींच्या व्यक्तिमत्त्वांत दिसूं लागलें होतें. ' आपणांमागून काय ? ' हा प्रश्न रचनात्मक कार्य करणाऱ्या कोणत्याहि व्यक्तीच्या मनांत शरीर थकल्यावर स्वाभाविकपणेंच उभा राहतो व अनेकदां शोधाशोध करूनहि असा मनुष्य हेरून, त्याला पाहिजे तो घाट देण्याचें कौशल्य व शक्यता अनेकांत दिसून येत नाहीं. अशी चिंता डॉक्टरांना तीव्र स्वरूपांत नव्हती. कारण त्यांनीं आपल्यासभोंवतीं हिंदुराष्ट्रासाठीं आपलें जीवन समर्पण करण्यांत जीवनाचें सार्थक वा साफल्य मानणारे कार्यकर्ते अवश्य निर्माण

केले होते. त्यामुळे आपल्यानंतर कोणीं काम पहावें, हें सांगण्याला अवधि मिळाला नाहीं, तरीहि आपण लहानाचे मोठे केलेले तरुण स्वयंप्रेरणेनें पुढें येऊन, कलह न माजविता, काम वाढवीत आहेत, असेंच दृश्य डॉक्टरांच्या दूरदृष्टीला दिसले असेल, यांत लवमात्र शंका नाहीं. यामुळें डॉक्टर शोधांत होते, पण साशंक नव्हते. राष्ट्रीय स्वयंसेवक संघ अबाधितपणे चालण्याइतकी निःस्वार्थ व निर्लेप निष्ठा त्यानीं अनेक तरुणांत निर्माण केली होती व तीच निष्ठा संघटनेला प्रेरक व समाजाला परिणामीं उद्धारक ठरेल, असा त्यांचा विश्वास होता. ध्येयनिष्ठेची परंपरा निर्माण करणें, हीच डॉक्टरांनीं साधलेली किमया होती.

याच वेळीं परमपूजनीय डॉक्टरांच्या, एकदम भडक रंगात न दिसणाऱ्या, पण संथपणानें व्यक्तीच्या वृत्तींत पालट घडविणाऱ्या, असामान्य व्यक्तिमत्त्वाच्या प्रभावानें गुरुजींचें हृदय अंकित करण्यास प्रारंभ केला होता. हें त्यांच्या वृत्तींतील परिवर्तन कसे घडत होते, याचें वर्णन श्रीगुरुजी यांच्या समर्पक शब्दात देणेंच युक्त दिसेल. पुणें येथें दि. ६ डिसेंबर १९४२ या दिवशीं प्रांतिक बैठकीचा समारोप करताना ते म्हणाले कीं, " ......मी मोठा हुच्च, उडाणटप्पू! शाळेंत कधीं नीट वागलो नाहीं. सर्व मास्तरांच्या माझ्याविषयीं तक्रारी असत. पण अभ्यास चांगला असे. परीक्षेच्या आधीं थोडा अभ्यास करून चांगला उत्तीर्ण होत असे. कॉलेजमध्येंहि तोच प्रकार. मग माझ्यावर संस्कार कसा झाला? कांही एक सागता येत नाहीं. एका परमेश्वराला माहीत किंवा घडविणाराला ते माहीत! एकदा चुकून डॉक्टराचे भाषण ऐकलें. स्वतःचे बुद्धीबद्दल मोठा अभिमान बाळगणारा मी! मला त्यात कोठे Argument आढळलें नाहीं, ऐतिहासिक दाखले नव्हते, तत्त्वज्ञान नव्हते, मोठीं प्रमेये नव्हतीं. डॉक्टर काय बोलले? तर 'स्वयंसेवक बधूंनो! काम करा, निष्ठेनें काम करा, प्रेमाने काम करा.' मीं म्हटले, 'ही तर पोपटपंची! यात काय विशेष आहे? तर कांही नाहीं......मोल वाटलें नाहीं. विद्वान् होतो त्या वेळी! पण आतां मात्र तें सर्व विसरलों. आतां मात्र अगदीं ठणठणीत, कितीहि वरून पाणी गेले तरी परिणाम न होणारा नर्मदेतला गोटा आहे! त्या भाषणात मला विद्वत्ता दिसली नाहीं. त्यांतला ओलावा कोरड्या हृदयाला कसा कळणार? पण ते त्यांचें भाषण झिरपत गेले खरे. माझ्याभोंवतीं विद्वत्तेचें मोठे आवरण होते. त्या दगडांतूनहि तें झिरपलें. सहसा कोणाच्या आहारीं न जाणारा म्हणून मी प्रसिद्ध! वीस-पंचवीस हजार पुस्तकें वाचलेलीं! माझी अगाध विद्वत्ता व दाडगे वाचन! मी विद्वान्, तर डॉक्टरांचें भाषणांत तळमळ होती आणि ते झिरपले कसे? तर तत्त्वासंबंधीं विचार न करतांच. अधूनमधून ज्या कांही भेटी झाल्या, जो सहवास लाभला, त्यानें कांहीं तरी बदल घडला नि जीवनाला निश्चित वळण लागले!

" डॉक्टरांनीं माझ्या अभिमानाला धक्का दिला. मी त्याचेपुढे कसा नमलों? बी. ए. ला इंग्रजी व पॉलिटिक्स् (राजकारण), तर बी. एस्सी. ला

Zoology ( प्राणिशास्त्र ) शिकविणारा व अनेक लचांडें व उचापती करणारा मी. पण कशाचाहि उपयोग झाला नाहीं. सुरुवातीचा माझा विचार कां गेला, कसा गेला, याचें वर्णन करून सांगणें कठीण आहे. या मनांत संघाचा शिरकाव मात्र झाला. ज्ञानेश्वर म्हणतात तें खोटें नाहीं—

‘ हें अनुभवाचेंचि योगें । नोहे बोलाचिया ॥ ’

“ या गोष्टीचें अजून मला आश्चर्य वाटतें. आणि अशा प्रकारच्या Submission- ( शरणागति ) मध्यें मला दुःख नाहीं, राग नाहीं, ही सर्वांत विचित्र गोष्ट आहे. अभिमानी मनुष्यास नम्र करतांच तो किती तापतो ! पण या शल्याचें उलट बरें वाटतें. त्याचें कारण एकच कीं, ज्याच्याशीं गांठ पडली तें मन फारच विशाल होतें ! त्या विशालतेमुळें तें सहज घडलें. पेल्यांत घर बुडत नाहीं, पण महासागरांत काय बुडत नाहीं ? त्या अंतःकरणाच्या विशालतेंत शत्रु-मित्र अशा सर्वांनाच स्थान होतें......ह्या गुणामुळें प्रत्येक जण त्यांत सांपडावयाचा. त्यांच्या प्रत्येक गोष्टींत संघ भरलेला असे. अशा प्रकारची मनाची अत्युत्कट अवस्था असणाऱ्या त्या ज्ञानसंपन्नाच्या मौनांत देखील व्याख्यान असे. हवेंतून अंतःकरणांत ठोके बसतात कीं काय असें वाटे ! ”

अशा मनःस्थितींतच गुरुजी प्रचारासाठीं कलकत्ता तेथें गेले व त्यांनीं दि. २२ मार्चला वर्षप्रतिपदेच्या सुमुहूर्तावर तेथें संघशाखा सुरू करण्यांत यश मिळविलें. १९३८च्या शेवटींच गुरुजींनीं ‘We or Our Nationhood Defined’ हा छोटासा इंग्रजी निबंध रामटेकच्या वास्तव्यांत लिहून काढला व त्याला प. पू. डॉक्टरांच्या विनंतीवरून लोकनायक बापूजी अणे यांनीं दीर्घ प्रस्तावना लिहिली. संघ ज्या हिंदुराष्ट्राच्या पुनरुद्धारासाठीं बद्धपरिकर झाला आहे, त्या हिंदुराष्ट्राची कल्पना कशी शास्त्रशुद्ध आहे, याचें विवेचन त्यांनीं त्यांत अत्यंत आत्मविश्वासानें केलेलें दिसतें. गुरुजी कलकत्त्याला असतांनाच त्यांचा हा निबंध पुस्तकरूपानें पाडव्याच्या मुहूर्तावर नागपूरला प्रसिद्ध झाला. श्रीगुरुजी यांना भारतीय संस्कृतीच्या दिव्यत्वाचा साक्षात्कार ज्या श्रीरामकृष्ण परमहंसांच्या परंपरेंतून झाला होता, त्या परंपरेंत श्रीकालीमाता वा श्रीजगन्माता हेंच उपास्य दैवत म्हणून मानलें जातें. आतां श्रीगुरुजी यांचें उपास्य हें कोणत्याहि मृण्मय वा अन्य मूर्तीच्या रूपांत त्यांच्या डोळ्यासमोर उभें न राहतां, ‘ हिंदुराष्ट्र ’ या स्वरूपांतच त्यांना त्या ‘ दैवता’चें दर्शन घडूं लागलें होतें. ‘ We ’ या पुस्तकाच्या प्रास्ताविकांत ते लिहितात कीं, “ I offer this work to the public as an humble offering at the holy feet of the Divine Mother—the Hindu Nation ...... ” नराच्या सेवेंतच नारायणाची सेवा होते, या अत्यंत उदात्त धारणेंतूनच आतां प. पू. डॉक्टरांच्या नेतृत्वाखालीं गुरुजी वावरूं लागले होते. संघ हिंदुस्थानांत प्रांतोप्रांतीं विस्तारूं लागला असतां त्याची तात्त्विक बैठक

सर्व ठिकाणच्या शिक्षितांना समजून घेण्यास या इंग्रजी पुस्तकानें सुलभता निर्माण केली, याचा आनंद डॉक्टरांना झाल्यावाचून राहिला नाही.

या काळांतहि डॉक्टराचे लहान लहान दौरे सुरू होते व वाढत्या कामाचीं वृत्ते सर्व ठिकाणांहून येत होती. श्री. भाऊराव देवरस यांनीं उत्तर प्रदेशांत शिक्षणासाठीं जाऊन सघाचे जाळे विणण्यास प्रारंभ केला होता. दि. २८ एप्रिलच्या पत्रांत ते लिहितात की, "...... सर्व संयुक्त प्रातात ह्या वेळी सघाकरिता परिस्थिति फारच चांगली आहे." ठिकठिकाणाहून डॉक्टरांना पत्रे येत होती कीं, 'आमच्या येथे संघ सुरू करावयाचा आहे, तरी घटना व माहितीपत्रक पाठवा.' कराचींतहि श्री. बापूराव भिशीकर यानीं तेथील एका विद्यालयांत नोकरी करता करता, संघाच्या कार्याला चागले स्वरूप आणले होते. पंजाबात तर उत्साहाला पारावार नव्हता! रावळपिंडी, सियालकोट वगैरे ठिकाणी नागपुराहून गेलेल्या कार्यकर्त्यांच्या स्तुतिपर व त्याना आणखी पंजाबांतच ठेवा अशी आग्रहाची विनंति करणारीं पत्रे या काळात डॉक्टराच्या हातात वारवार पडत होतीं. अधून मधून श्रीमत प्रतापशेठ याच्यासारख्याकडून संघाचे उत्साहपूर्ण रूप पाहून डॉक्टराकडे देणग्याहि येत. बिहारमध्येंहि काहीं कार्यकर्ते या काळात जाऊन पोहोंचले होते.

अशा उत्साहपूर्ण वातावरणांत मे महिन्यात नेहमीप्रमाणे नागपूरला अधिकारी शिक्षण वर्ग सुरू झाला. या वर्षींहि सर्वाधिकारी म्हणून डॉक्टरानीं गुरुजींचीच योजना केली होती. नागपूरचा वर्ग सुरू झाला, तत्पूर्वींच डॉक्टर दि. २२ एप्रिलला पुण्याच्या वर्गासाठीं तेथे पोहोंचले होते व त्यानीं तेथे जाताना धुळे, चाळीसगाव, कल्याण, ठाणे व मुंबई वगैरे शाखाना धावत्या भेटी दिल्या होत्या. पुण्याहून त्यानीं गुरुजीना दि. ३० एप्रिलला एक पत्र लिहिले. त्यात प्रोत्साहन देण्याची त्याची पद्धति किती सहज होती, हे पाहण्यासारखे आहे. ते लिहितात की, "आपण आपले सर्व सहकाऱ्याचे साहाय्याने हा कॅप यशस्वी करण्याकरिता अविश्रात परिश्रम करीत आहात, याची मला कल्पना आहे. या वेळी मी आपणापासून दूर असलो तरी लौकरच मी आपणामध्यें येऊन पोहोंचेन व मनाने मी आजहि आपणामध्ये वावरत आहें."

प. पू. डॉक्टरांच्या मे १९३९ मधील पुण्याच्या वास्तव्यातील एक घटना येथे देणे अत्यावश्यक आहे. एखाद्याचे हृदय देशभक्तीनें ओथंबून गेलें कीं त्याचा व्यवहार कसा असतो, याची कल्पना डॉक्टराच्या सहवासात येणाऱ्या सहृदय व्यक्तीला तेव्हांच येई. ते आपल्या शरीराला प्रभावी मनाच्या हातांत देऊन कसे काम करून घेत आहेत, याची उमज पडल्यावर त्या व्यक्तीच्या हृदयांत कालवाकालव झाल्यावांचून राहत नसे. एके दिवशीं डॉक्टर आपल्या खोलींत एकटेच निवात बसले आहेत, असे पाहून पुण्याचे श्री. भाऊराव देशमुख वकील

आंत गेले. थोडया इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर भाऊरावांनीं हलकेंच विषय काढला. ते म्हणाले—

" डॉक्टर ! आपण आतां थकत चालला आहांत असें दिसतें. तेव्हां आपला ताण कमी करण्यासाठीं आम्हीं काय करावें ? " या प्रश्नावर प्रथम डॉक्टर केवळ हंसले. पण असाच प्रश्न त्यांनीं दोन-तीन वेळां विचारला तेव्हां डॉक्टरांनीं निग्रहानें उत्तर दिलें, " तुम्ही हा प्रश्न विचारतां याचा मला आनंद वाटतो. पण मी या प्रश्नाकडे लक्ष देऊं इच्छीत नाहीं. "

थोडा वेळ थांबून त्यांनीं प्रश्न केला कीं," तुम्ही माझ्यासाठीं काय करणार ?"

" आम्ही आपणांला दुपारीं दोन-तीन तास विश्रांति देणार ! "

" पण हें कसें जमणार ? "

" दारावर एक स्वयंसेवक ठेवूं व तो आपणांला भेटावयास येणाऱ्यांना आपण झोपल्याचें सांगून बाहेरूनच परतवील. "

यावर तो विषय येथेंच थांबला. पुन्हा रात्रीं भाऊरावांशीं संगनमत करून बाबाराव सावरकर येऊन बसले होते. तेव्हां डॉक्टरांनीं भाऊरावांना विचारलें कीं, " मला विचारलेला प्रश्न तुम्ही बाबांना विचारतां काय ? "

यांतील खोच ओळखून बाबाराव म्हणाले, " डॉक्टर, तुम्ही माझ्याकडे बोट दाखवून भागवूं नका. "

" भाऊराव प्रश्न विचारतात तो मला समजूं शकतो, पण बाबांनीं विश्रांतीचा विषय काढणें ही गोष्ट मला समजूं शकत नाहीं. प्रथम मी विचारतों त्या प्रश्नाचें उत्तर द्या कीं, तुम्हांला गुडघ्यासाठीं काशीला तीस-चाळीस दिवस थांबण्यासाठीं वैद्यानें सांगितलें असतांना विश्रांति घेतलीत का ? त्या वेळीं कामासाठीं निघून गेलांत ना ? मग कां ? तसेंच माझें आहे ! "

असें बाबारावांना निरुत्तर करून डॉक्टर सद्‌गदित होऊन म्हणाले, " आपली इच्छा मला समजते. पण माझ्यांत बळ नाहीं, मला वेळ नाहीं, असें म्हणून कोणाशीं बोलायचें नाहीं असें मी ठरवणार नाहीं. कारण विश्रांति घेऊन इष्ट परिणाम होणार नाहीं व मानसिक दृष्टीनें मला विश्रांति घेतां येणार नाहीं. मला जमते तेवढी काळजी मी घेतोंच आहें ! " अर्थात् हा प्रश्न येथेंच संपला.

या वेळीं पुण्याला असतांना वऱ्हाडमधील अकोल्याचे एक कार्यकर्ते श्री. हरिहरराव पुराड–उपाध्ये यांचें दुसऱ्यास आलेलें एक पत्र डॉक्टरांच्या वाचनांत आलें. त्यांत हरिहरराव यांचें दि. ७ मे या दिवशीं लग्न असल्याचें कळलें. घाईत ' लगीनघाई ' विशेष असते ! त्यामुळें डॉक्टरांना निमंत्रण पाठवावयाचें राहून गेलें होतें. त्यांचा नेमका त्याच वेळीं नागपूरला जाण्याचा दिवस येत होता व इतक्या निकटच्या स्वयंसेवकाच्या लग्नाला जाऊन त्याच्या आनंदांत भर

घालण्याचा विचार त्यांच्या मनांत उदित होणें स्वाभाविक होतें. आपला म्हटल्यावर औपचारिकपणा आपोआपच गळत असतो. तेव्हां त्यांनीं लिहिलें कीं, "तुझे लग्न आहे हें मला कां कळविलें नाहींस? मी दि. ७ ला सकाळी येत आहें." अर्थात् याप्रमाणे ते पहाटेच्या गाडीने तेथे जाऊन पोहोंचले व तो मंगल सोहळा पार पडल्यावर नागपूरला गेले. डॉक्टराच्या या अशा अकृत्रिम प्रेमानें अजूनहि अनेकाचे डोळे ओलावतात यांत नवल काय! याच वेळी अकोल्यानंतर थोड्या वेळासाठी वर्धा येथेहि थांबून त्यानीं श्री. राजाभाऊ देशमुख आदि तिघा स्वयंसेवकांच्या लग्नांत मंगलाक्षता टाकल्या होत्या.

या सुमारास एका पत्रांत ते लिहितात की, "माझी प्रकृति आजकाल इतकी नाजुक झाली आहे की, घटकेत मला कमालीचे डिप्रेशन येते व मग कोणतेंहि काम करणें व बोलणे अशक्य होऊन जातें." इतक्या अवस्थेतहि त्याचा कामाचा उरक दांडगा होता आणि मनाला व शरीराला आपल्या मुठीत ठेवण्याचे सामर्थ्य खरोखरच असामान्य होते. पुण्याहून परत येताच ते आपल्या एका नातलगाच्या विवाहासाठीं बिलासपूर येथे गेले. सायंकाळी लग्न, भोजन व वरात असा धांवपळीचा कार्यक्रम चालू असतानाच डॉक्टराना ताप भरला व तो वाढत वाढत १०४ अंशांवर पोचला! बिलासपूरला येतांच आपण उद्या नागपूरला परत जाणार असल्याचें ते बोलले होते. तेव्हा त्याचे अंग तापाने असे फणफणलेले पाहून त्याच्या नातलगानी 'ताप उतरल्यावर नागपूरला जा, तोंवर विश्राति घ्या,' असा परोपरीनें आग्रह करून पाहिला. तेव्हा ते म्हणाले की, "उद्या विश्वनाथराव केळकर हे एक पथक घेऊन भागानगरच्या सत्याग्रहाला जाणार असल्याने, त्याना निरोप देण्यासाठीं मला तिकडे गेलेच पाहिजे." त्यावर एकाने आपले व्यवहारी डोके लढवून तोडगा सुचविला की, "निरोपादाखल एक अभिनदनपर तार करा, म्हणजे आपल्याला निरोप दिल्याचें समाधान लाभेल व विश्रांतिहि मिळेल!" हे ऐकल्यावर डॉक्टर सहज बोलून गेले कीं, "मला हे गेलेच पाहिजे! विश्राति घेण्यासाठीं देवाने निराळी माणसे निर्माण केलीं आहेत!" अर्थात् डॉक्टर ताप असतानाहि नागपूरला आले व त्यांनीं निरोप-समारभात भाग घेतला.

या लग्नाहून परत आल्यावर परमपूजनीय डॉक्टर नागपूरच्या अधिकारी शिक्षण वर्गात निमग्न होते. या वर्षी उत्तर हिंदुस्थानांतील कांहीं प्रातांतून या वर्गासाठीं प्रथमच स्वयंसेवक आले असल्याने त्याची वास्तपुस्त त्यानीं स्वतः केली होती, हें सागावयास नकोच. हिदुस्थानातील सर्व लोकाच्या जेवणात भात, पोळी, भाकरी, भाजी व आमटी हेच पदार्थ सामान्यतः आढळतात. पण निरनिराळ्या प्रांतांत ते पदार्थ बनविण्याची व त्याचें वाढप करण्याची पद्धति ही भिन्न आहे. ही भिन्नता ध्यानीं घेऊन ज्या त्या प्रांताच्या अभिरुचीप्रमाणें निरनिराळा स्वयंपाक करण्याची योजना प. पू. डॉक्टरांनीं करविली होती.

हा वर्ग सुरू असतांना बंगालमधून आलेला श्री. शशिभूषण बरुआ हा स्वयंसेवक राष्ट्रीय गीतें अत्यंत भावपूर्ण पद्धतीनें म्हणतो, असें डॉक्टरांना कळलें. तेव्हां एके दिवशीं मोकळ्या वेळांत त्यांनीं त्याला आपल्या खोलींत बोलावून घेऊन गीत म्हणण्यास सांगितलें. 'आमार जन्मभूमि' हें बंगाली पद्य ऐकत असतां ते त्यांत इतके समरस होऊन गेले कीं, पद्याच्या शेवटच्या ओळी चालू असतां त्यांच्या डोळ्यांतून अश्रु ओघळूं लागले! देशभक्ति फुलविणारीं पद्यें लिहिलीं जावींत व गाइलीं जावींत असें त्यांना वाटे आणि कोणी अशा कविता रचणारा वा म्हणणारा आढळला कीं, ते त्याला प्रोत्साहन देत. त्या वर्षीं लंडनला शिक्षणासाठीं गेलेले कवि किरण यांनीं तिकडून डॉक्टरांना एक कविता पाठविली. त्यासंबंधीं ते लिहितात, "आपले पत्रांतील कविता वाचून ती सर्वांना फारच आवडली. अखिल हिंदु-राष्ट्राला व समाजाला उद्देशून आपण अवश्य काव्य रचीत जावें, अशी माझी आपणांला सूचना आहे."

भागानगर सत्याग्रहांत संघानें संघ म्हणून पूर्णांशानें उडी घेतली नाहीं, या गोष्टीनें कांहीं जण अप्रसन्न झाले होते, याचा उल्लेख मागील प्रकरणांत आलाच आहे. पण त्यांचें हें असमाधान आतां खाजगी संभाषणांतून बाहेर पडून वृत्तपत्राच्या स्तंभांतून नरसिंहाप्रमाणें कडकडत बाहेर पडण्याइतकें तीव्र झालें! मुंबईच्या 'वंदे मातरम्' या साप्ताहिकानें तर बारा लेखांक लिहून संघ आणि संघसंस्थापक यांच्यावर झोड उठविली! महाराष्ट्र व वऱ्हाड या भागांतून गेलेल्या सत्याग्रह्यांत वास्तविक पाहतां बहुसंख्य सत्याग्रही संघाचे स्वयंसेवक होते, ही गोष्ट कोणत्याहि डोळस व्यक्तीच्या ध्यानांत येणारी असल्यामुळें असा संघावर आघात होणें हें कांहीं जणांना रुचलें नाहीं. त्यांनीं परस्परच या टीकेचा खरपूस समाचार घेतला.

दि. २७ मेच्या अंकांत नागपूरचा 'सावधान' लिहितो कीं, "नित्य कार्यें व नैमित्तिक कार्यें यांतला विवेक जर श्री. गो. गो. अधिकारी यांनीं ओळखला असता, तर संघाविरुद्ध बारा विषारी फूत्कार त्यांनीं सोडलेच नसते. भागानगर आटो-पल्यानंतरहि राष्ट्रविमोचनाचें कार्य शिल्लक उरतेंच, हें भागानगरीय उत्साहाच्या उसंडत्या बालिश भरांत श्री. अधिकारी विसरलेले दिसतात. ज्या वेळीं राष्ट्र-विमोचनाकरितां अखेरचा एकच घाव घालायचा असतो त्या अंतिम समर-क्षणाच्या आगमनाची पूर्वतयारी हें राष्ट्रविमोचनाचें नित्य कार्य होय व भागानगर आंदोलनासारखीं आंदोलनें हीं राष्ट्रविमोचनाचीं नैमित्तिक कार्यें होत. हीं भिन्न कार्यें करणाऱ्या भिन्न संस्था परतंत्र राष्ट्रांत असतात—असाव्या लागतात—व यद्यपि हीं दोन्ही कार्यें समांतरतेनें चालू असलीं—चालू ठेवावीं लागलीं—तरी नित्य कार्यांत व्यत्यय उत्पन्न होईल अशा रीतीनें आपलें वैशिष्ट्य व शक्तिसर्वस्व नित्य संस्थेला नैमित्तिक कार्याला वाहतां येत नाहीं."

दे. भ. बाबाराव सावरकरांनीं एक लेख लिहून संघाच्या भूमिकेचें समर्थन केलें होतें. त्यांत त्यांनीं असा निर्वाळा दिला होता की, "......संघाच्या शिकवणुकीनें ज्यांचीं मनें खरोखरीच्या हिंदुत्वलोभानें नि अभिमानाने भारलीं गेलीं आहेत, त्या त्या व्यक्तीकडून हिंदुत्वाविषयींच्या कर्तव्यप्रसंगी कुचरपणा झाला नाहीं. त्यांनीं आपले कर्तव्य योग्य प्रकारे पार पाडलें आहे."

इतके होऊनहि 'वंदे मातरम्'ने दि. ७ जूनच्या अंकात डॉक्टराच्यावर ते अहंकारी असल्याचा आरोप करून अत्यंत लागट लेखन केले. त्यात म्हटले होते कीं, "......डॉ. हेडगेवार याना आम्ही नम्रपणाने सुचवितों कीं, अहंकाराचें विष हे सापाच्या विषापेक्षाहि भयंकर असतें. गाधीचा नाश या अहंकारामुळे होत असल्याचा आजचा ताजा इतिहास डोळ्याआड करूं नका. रा. स्व. सघ वाढवून तुम्हीं हिंदु समाजावर उपकार केले आहेत, यात शका तीं कसली? पण वाटसरूसाठी बाधलेल्या तलावात दात्याने स्वतःच क्रूर जलचरें सोडावी तशी कृति तुम्ही करता व ती जाणूनबुजून करीत आहात, तेवढे कृपा करून बंद करा. आणि असे कराल तर हिदु समाजाचे भावी इतिहासकार तुमच्या नावाचा बोटभर तरी चिरतन उल्लेख करतील."

हा लेख छापून आल्यावर डॉक्टराना काही जणानीं तो वाचून दाखविला. तेव्हा ते हसत म्हणाले की, "माझी इच्छा तीच आहे की, माझे नाव एक बोटभरहि न आले तरी चालेल, पण संघावर असा प्रहार करणाऱ्या लेखकाचे मात्र इतिहासात वीतभर नाव यावे!" हे असे वादंग बाहेर सुरू होते, तरी डॉक्टरानी त्याला उत्तरे देण्याचा मुळींच प्रयत्न केला नाहीं. प्रत्यक्ष वाढणारे कार्य हेच विनाकारण आघात करणाऱ्याना उत्तर असते, असे ते मानीत. आघात करणाऱ्या स्वकीयाला निरुत्तर केल्याने वा त्याचा उपहास केल्यानें तो खट्टू होतो व अनेकदा आपणापासून कायमचाच दुरावतो. पण परमपूजनीय डॉक्टराच्या या संयमपूर्ण व्यवहाराने ती गोष्ट खरोखरच टळत असे. उदाहरण धुंडण्यासाठी दूर जाण्याची आवश्यकता नाहीं. ज्या 'वंदे मातरम्'च्या संपादकानी अशा पद्धतीनें डॉक्टराच्या 'बोटभर' नावाचा उल्लेख केला होता, त्याच संपादकानी प. पू. डॉक्टराच्या निधनानंतर डॉक्टराचे गुणवर्णन करणाऱ्या लेखांचे संकलन करून ते पुस्तकरूपानें मराठी वाचकाच्या हातात दिले होते! परखड शब्दात एखाद्या टीकाकाराची प्रतिसंभावना करणे हें डॉक्टराना मुळींच अशक्य नव्हते. पण 'आपलेच दात व आपलेच ओठ' हा विवेक डॉक्टरांच्या तटस्थतेत वा मौनात वसत असे व तोच परिणामी संघटनेला हितकारक ठरला यात संदेह नाही.

असा कांहीं खारटतुरट प्रकार लेखनांतून झाला असला, तरी प्रत्यक्ष सत्याग्रहाला गेलेल्या शेकडो स्वयंसेवकांनीं कारागृहांत गेल्यावर तेथेच संघशाखा सुरू करून इतर अनेक सत्याग्रहींना संघाच्या प्रत्यक्ष कक्षेत आणण्यांत यश मिळविले.

त्यासंबधींच्ीं कांहीं पत्रें व निरोप डॉक्टरांना अधूनमधून मिळत होते. त्यांतून संघाचा स्वयंसेवक हा कोठेंहि असला तरी आपल्या ध्येयासाठीं जें जें करतां येणें शक्य असेल तें तें धिटाईनें व कौशल्यानें करीत असतो, असा अनुभव बळावत होता व डॉक्टरांची प्रसन्नता वाढत होती.

नागपूरचा वर्ग संपला व त्यानंतर थोड्याच दिवसांनीं ते ' भगवा झेंडा ' या चित्रपटाच्या उद्घाटनासाठीं पुण्याला गेले. श्रीगुरुजी हे सावलीप्रमाणें या वेळींहि त्यांच्याबरोबर होते. एक तर हा चित्रपट श्रीसमर्थ रामदासस्वामी यांच्या जीवन-कार्यावर आधारलेला होता व त्यांतून संघटनेचें तत्त्व कौशल्यानें पुढें मांडलेलें होतें. त्या कथानकांत मदांध मुसलमान अधिकाऱ्यांच्या हातून सुटका करून घेण्यासाठीं लोकांनीं ऐक्य साधलें पाहिजे, असा कानमंत्र चंद्रगडच्या गडकऱ्याच्या हाताखालील प्रदेशांत राहणाऱ्या खेडुतांना समर्थ कसा देतात व त्या जागृतींतून श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांचें कार्य कसें सुकर होतें, हें दाखविलेलें होतें. अर्थात् त्या काळांत ' संघटना ' व ' भगवा ध्वज ' हा विषय निघाला कीं महाराष्ट्रांत तरी सर्वांच्या मनासमोर चटकन् डॉक्टरांचें नांव उभें राही व त्यांतूनच या चित्रपटाचे उद्घाटक म्हणून त्यांना मोठ्या आग्रहानें पाचारण करण्यांत आलें होतें.

पुण्याच्या मिनर्व्हा चित्रपटगृहांत शनिवार दि. १७ जूनला दुपारीं हा समारंभ झाला. त्या वेळीं चित्रपटनिर्माते श्री. दादासाहेब तोरणे, तसेंच कथालेखक व दिग्दर्शक वगैरे मंडळी उपस्थित होती. दिग्दर्शकांनीं प्रारंभीं डॉक्टरांचा परिचय अगदीं मोजक्या शब्दांत पण नेमका असा करून दिला होता. तो असा कीं, " तीनशें वर्षांपूर्वीं श्रीरामदासस्वामींनीं जी शिकवण दिली, तशी शिकवण देण्याची कामगिरी आज डॉ. हेडगेवार हे बृहन्महाराष्ट्रांतच नव्हे तर अखिल हिंदुस्थानांत करीत आहेत. भगवा झेंडा हा पुन्हा ' राष्ट्रीय ' म्हणून कसा मान्यता पावेल, या प्रयत्नांत डॉक्टर आहेत. आज ते ' भगवा झेंडा ' बोलपटाच्या उद्घाटनाला लाभले, हें खरोखर आपलें महद्भाग्य होय."

त्यानंतर प. पू. डॉक्टरांचें भाषण झालें. भगव्या ध्वजाच्या लोभानेंच निमंत्रणाचा स्वीकार केला असें सांगून ते म्हणाले कीं, " आपण आपला पुरातन इतिहास लक्षांत घेतला तर हिंदुराष्ट्राचा एकमेव ध्वज ' भगवा ' हाच होय, हें आपणांला दिसून येईल. आतांपर्यंत हिंदुस्थानांत अनेक क्रान्त्या झाल्या. त्या क्रान्त्यांच्या प्रवर्तकांनीं याच ध्वजाखालीं राहून आपलें कार्य केलें आहे. श्रीशंकराचार्य व स्वामी विद्यारण्य यांचा ध्वज भगवाच होता. एवढेंच नव्हे तर रामायण-कालापासून भगवा हाच आपला एकमेव ध्वज मानला गेला आहे...बोलपट निर्माण होतात व त्यांत सामाजिक बोलपटहि पुष्कळ असतात. परंतु राष्ट्रोद्धारप्रवर्तक असे बोलपट फार थोडे दिसतात. प्रस्तुत बोलपटाच्या बुडाशीं ही महान् गोष्ट आहे म्हणून ज्या व्यक्तींनीं हा बोलपट तयार केला, त्यांचे मी आभार मानतों."

या समारंभाच्या दिवशीं सायंकाळीं श्री. न. गो. अभ्यंकर यांच्या घरीं डॉक्टरांना भेटण्यासाठीं त्या बोलपटाचे निर्माते श्री. दादासाहेब तोरणे आले होते. त्यांचा तेथें येण्याचा हेतु असा होता कीं, डॉक्टरांनी भगव्या ध्वजाचा गौरव करणारे भाषण करावें व त्या वेळी त्या भाषणाचे ध्वनिमुद्रण करण्याची त्यांनीं अनुमति द्यावी. त्या दिवसाचा तो प्रसंग अजूनहि डोळ्यापुढे उभा आहे. त्या वेळी डॉक्टर चित्रपटातील विविध प्रसगाचा पुन्हा पुन्हा विषय काढून, ती अप्रिय गोष्ट सफाईने टाळीत होते. अर्थात् त्यांत कोण हरले असेल हे सांगावयास नकोच. इतर चित्रपटांबरोबर सर्वत्र आपले भाषण जावे, ही गोष्ट डॉक्टराच्या प्रसिद्धि-विन्मुखतेला रुचणारी नसल्याने त्यानी तसे घडूं दिले नाहीं. मात्र दुसऱ्या दिवशी त्यानी सरस्वती सिनेटोनला भेट दिली. तेव्हाचे एक सुंदर छायाचित्र उपलब्ध असून त्यात डॉक्टर व गुरुजी शेजारी बसलेले आहेत. त्या वेळीं त्यानी त्या बोलपटासंबधीं जो अभिप्राय लिहून दिला त्यात ते म्हणतात कीं, "... केवळ प्रेमकथानीं बुजबुजलेल्या नाटय-चित्रपटसृष्टीत अशा प्रकारचे स्फूर्तिदायक इतिहास-प्रसंग डोळ्यासमोर आणून हरमार्गानें जनतेला खऱ्या राष्ट्रसेवेला उद्युक्त करण्याचा व राष्ट्राचें संपूर्ण लक्ष पुनरपि आपल्या उज्ज्वल ध्वजाकडे आकर्षिण्याचा हा उपक्रम अत्यंत स्तुत्य व त्या धंद्यातील सर्वांना अनुकरणीयच आहे."

त्या वेळच्या पुण्याच्या वास्तव्यात प. पू. डॉक्टरानी तेथील संघकार्य-कर्त्यांच्या बैठकींतून श्रीगुरुजींचा परिचय करून देऊन त्याच्या हिंदी भाषेंतील प्रावीण्याची प्रशंसा केली व त्याच्याकडून दोन हिंदी गोष्टी सागविल्या. या खेपेंतच टिळक स्मारक मंदिरात डॉक्टराच्या उपस्थितींत गुरुजीचे भाषण झाले होते. त्या भाषणात 'सरसंघचालक' या स्थानासबधीं व पर्यायाने प. पू. डॉक्टरांच्या असामान्य व्यक्तिमत्त्वासंबंधीं हृदयातील अत्यंत भक्तिपूर्ण भाव उत्कटतेने प्रकट झाले होते. त्यांनंतर दहापधरा मिनिटेंच डॉक्टराचें भाषण झालें. त्यात "संघाचा नाश यापुढे बाहेरील कोणीहि करूं शकणार नाहीं; त्यांतून कोणी संघावर आघात केलाच तर त्याच्या हाताना, लोखंडाच्या अभंग व कठीण गोळ्यावर प्रहार केल्यावर जो अनुभव येतो तसाच अनुभव येईल," अशा आशयाचे अत्यंत आत्मविश्वासपूर्ण उद्गार निघाले होते.

या काळात बाहेरील एकूण जागतिक परिस्थितीचा व अंतर्गत राजकारणाचा रंग कसा पालटत आहे, याकडे डॉक्टराचें बारकाईने लक्ष होते व त्यांतून त्यांना असें दिसूं लागलें होते कीं, परतंत्र लोकांच्या जीवनात सर्वांत भाग्यदायक ठरणारा उठाव करण्याजोगा अनुकूल काळ समीप येत आहे. जर्मनीचें वाढते आक्रमण व देशांतील सर्वांत मोठया अशा कॉंग्रेस पक्षामधून दे. भ. सुभाषचंद्र बोस यांच्या-सारख्या क्रातिसम्मुख नेत्यानें बाहेर पडून काढलेला नवा पक्ष, हीं सारीं त्याचींच प्रसादचिन्हें असल्याचें डॉक्टरांनीं हेरलें होतें. त्यामुळें आपली संघटना देशाच्या

चतुःसीमांत कांठोकांठ कशी वाढेल व त्यांतून आशांकित अशी प्रचंड शक्ति कशी सिद्ध होईल, याचा त्यांनीं आधींच रात्रंदिवस घेतलेला ध्यास अधिक तीव्र झाला असल्यास नवल नव्हतें. आपण ठिकठिकाणीं स्वयंसेवकांचीं जीं पथकें उभीं केलीं आहेत, तीं आपल्या अपेक्षेइतकीं प्रसंगाला तोंड देण्याइतकीं दक्ष व नित्यसिद्ध असतील, तरच पुढें अनुकूलता लाभेल तेव्हां तिचा लाभ करून घेतां येईल, हें क्रांतीच्या धकाधकींत एके काळीं वावरलेल्या डॉक्टरांना कोणीं सांगण्याची आवश्यकता नव्हती. या काळांत डॉक्टर जेथें जेथें जात, तेथें तेथें ते अचानकपणें तास-दोन तासांचा अवधि देऊन नगरांतील सर्व स्वयंसेवकांना नियोजित स्थानीं, पूर्ण गणवेशांत एकत्रित करण्याची आज्ञा तेथील संघचालकांना देत. नेहमींच्या दैनंदिन कार्यक्रमांत भाग घेणाऱ्या स्वयंसेवकांपैकीं किती जण अशा तांतडीच्या हांकेला ओ देऊन येतात, याची चांचणी घेण्याचा हेतु त्यामागें असे. १९३९ च्या मंगळवार दि. २० जूनला सकाळीं ८ वाजतां पुणें शहरांतील स्वयंसेवकांचा तांतडीचा मेळावा त्यांनीं घेतला होता. त्या वेळीं थोड्या अवधींत पुण्यांतील ९०० स्वयंसेवक श्रीशिवाजी मंदिराच्या पटांगणांत एकत्र झाले होते, ही गोष्ट उल्लेखनीय आहे.

हा मेळावा झाला त्याच्या आदल्या दिवशीं रात्रीं पुण्यांतील प्रमुख कार्यकर्त्यांची त्यांनीं बैठक घेतली होती. इतर कामाची चौकशी करतां करतां त्यांनीं सहज प्रश्न विचारला कीं, " कांहीं कामासाठीं तांतडीच्या सूचना देऊन स्वयंसेवकांना बोलाविलें, तर सर्वांना एकत्र करण्यास किती वेळ लागेल ? "

त्यावर कोणीं सहा तास, कोणीं चार तास, अशीं उत्तरें दिलीं. तेव्हां ते म्हणाले कीं, " घराला आग लागली म्हणून विझवावयास बोलावल्यावर जर चार नि सहा तास नुसते स्वयंसेवक जमायला लागणार असतील तर काय उपयोग ? " रात्रीं तो विषय तेथेंच संपला.

दुसऱ्या दिवशीं पहांटे ६ वाजतां डॉक्टरांनीं पुण्याचे संघचालक श्री. विनायकराव आपटे यांना बोलवून आज्ञा दिली कीं, " दोन तासांत पुण्यांतील सर्व स्वयंसेवक श्रीशिवाजी मंदिरांतील संघस्थानावर एकत्र करा. " या आदेशानुसार कार्यवाह, शिक्षक व गटनायक या क्रमानें ती आज्ञा पुण्यांत सर्वत्र पोंचली व ठीक ८ वाजतां नऊशें स्वयंसेवक तेथें उपस्थित झाले.

त्या वेळीं अशा मेळाव्यामागील कल्पना विशद करण्यासाठीं डॉक्टर उभे राहिले. त्या छोट्याशा भाषणांत त्यांनीं १९३१ मध्यें अकोल्याच्या कारागृहांत असतांना आलेला एक अनुभव सांगितला. ते म्हणाले, " कारागृहांतील प्रसंग आहे. दुपारीं जेवणाची वेळ होती. तोंच एकाएकीं ' डेंजर कॉल ' झाला, म्हणजेच भयसूचक संकेत देण्यांत आला. त्या संकेतामागोमाग चोहींकडून तेथील आरक्षक, पहारेकरी व इतर नोकर, होते त्याच स्थितींत बंदुका व दंडुके घेऊन समोरील

पटागणांत धांवत येऊन एकत्र झाले. कोणी जेवण टाकून आले, कोणी नुसत्या नेसलेल्या विजारीवर, तर कोणी आंघोळ अर्धवट सोडून ओलेत्या अंगानेच तेथे आले होते. पण जो तो हातीं असलेलें काम टाकून, क्षणाचाहि विलब न लावतां तेथें आला होता. ते दृश्य पाहून माझ्या मनांत विचार आला कीं, असे स्वतःचे काम सोडून हांकेला ओ देणारे लोक इग्रज सरकारजवळ आहेत म्हणूनच ते पांच हजार मैलावरून एवढ्या देशावर सत्ता गाजवतात. या नोकराना वेतन मिळते. पण अशी कशाचीहि अपेक्षा न करतां देशभक्तीने प्रेरित होऊन, आपले वैयक्तिक काम बाजूला सारून, संघाच्या हांकेला ओ देण्यासाठीं आपणहि सदैव सिद्ध झाल्यावांचून आपल्या देशाचे हे वाईट दिवस मुळींच संपणार नाहीत ! ”

अशा मौलिक विचारांनीं तरुण पिढीचीं मने संजीवित करून डॉक्टर हिंदु समाजाला कर्तव्याची जाग आणून देत होते. किती अचूक होते त्याचे मार्गदर्शन !

* * *

## २८ : जिवावरचें दुखणें

प. पू. डॉक्टरांची प्रकृति वारंवार बिघडूं लागली असल्यानें नागपूरचे श्रीमंत बाबासाहेब घटाटे यांनीं डॉक्टरांना पुण्याहून परततांना देवळाली येथें विश्रांतीसाठीं येण्याचा आग्रह केला. त्या गोष्टीला इतरांनींहि पुष्टि दिल्यानें आठदहा दिवसांसाठीं त्यांनीं तेथें जाण्याचें एकदांचें मान्य केलें.

त्या वर्षीं श्री. घटाटे यांनीं नासिकपासून आठ-नऊ मैलांवर असलेल्या देवळाली येथें एक बंगला कांहीं दिवसांसाठीं भाड्यानें घेतला होता व आपल्या कुटुंबियांसह ते नागपूरचा रखरखीत उन्हाळा टाळून तेथें येऊन राहिले होते. देवळालीला बंगला घेण्यांत एकान्त व आरोग्याच्या दृष्टीनें वायुमानाची अनुकूलता, अशा दोन्ही गोष्टी साधत होत्या. हा बैठा बंगला धोंडी रस्त्याच्या अगदीं पश्चिम टोकाकडे व दक्षिणाभिमुख असा आहे. याच्यासमोर मोकळें पटांगण दिसतें. त्याच्या कडेनें भर उन्हाळ्यांतहि लाल फुलांनीं मोहरून जाणारीं गुलमोहोराचीं झाडें असून आपल्या पांढऱ्या मोहक फुलांच्या मंद सुगंधानें वातावरण दरवळून सोडणारा कडुनिंबहि पटांगणांतील कारंजाशेजारीं उभा आहे.

आधींच नासिक व देवळाली येथील हवा ही प्रसन्न व त्यांत पावसाळ्याला नुकताच प्रारंभ झाला होता. त्यामुळें वायुमानांत प्रसन्नता वाढली होती. डॉक्टर, गुरुजी व तात्या तेलंग तेथें आल्यापासून त्यांची उत्तम व्यवस्था ठेवण्यांत आली होती, हें सांगावयास नकोच. तेथें आल्यावर दोन-तीन दिवसांतच डॉक्टरांना पाहिजे असलेलीं औषधें नागपूरहून त्यांच्या हातीं पडलीं. हा बंगला इतका दूर असूनहि देवळाली व नासिक या ठिकाणचे स्वयंसेवक त्यांना भेटण्यासाठीं तेथें जात व डॉक्टर बंगल्यापुढील कमानींत बसून त्यांच्याजवळ गप्पागोष्टी करीत. आतां प्रकृतींत किंचितशी सुधारणा जाणवूं लागली होती व त्या बळावर डॉक्टर दि. २३ जूनला नासिक शाखेला भेट देऊन आले. या वेळीं त्यांनीं तेथील कागदी चलनाचें (नोटांचें) मुद्रणालयहि जाऊन पाहिलें होतें.

इतरांच्या समाधानासाठीं ते देवळालीला राहिले होते, तरी तेथून पत्रव्यवहार सुरूच होता. नागपूरमधून कांहीं नवे कार्यकर्ते संघप्रचारासाठीं बाहेर जावयाचे होते. त्यांची श्री. बाबासाहेब आपटे व श्री. आप्पाजी जोशी यांनीं योग्य ठिकाणीं नियुक्ति करावी, असें पत्र डॉक्टरांनीं तेथूनच लिहविलें. या काळांत ते प्रामुख्यानें

श्रीगुरुजींकडूनच पत्रे लिहून घेत, असे दिसते. प्रकृतींत सुधारणा होत आहे असें डॉक्टर बोलत खरें, पण एके ठिकाणीं बसून वाढत्या कामावर लक्ष पुरवितां येत नाहीं, ही जाणीवच त्यांना नागपूरला जाण्यास उद्युक्त करीत होती व त्यासाठीच आता बरे वाटत आहे, प्रकृतींत सुधारणा आहे, असे डॉक्टर म्हणत होते. एवढेच नव्हे तर त्यांनीं जुलैच्या पहिल्या आठवड्यात देवळालीहून निघून चाळीसगांव, भुसावळ, अकोला, मूर्तिजापूर, वर्धा आदि शाखांना भेट देत देत दि. १० जुलै-पर्यंत नागपूरला येऊन पोंचण्याचा विचारहि पत्रांतून कळविला होता.

नागपूरला जाण्यापूर्वीं नासिकच्या कार्यकर्त्यांच्या आग्रहावरून तेथेंहि पुन्हा एकदा जाणे आवश्यक होते. यासाठीं दि. १ जुलैला त्यांच्या सूचनेवरून श्रीगुरुजी नासिकला गेले आणि दुसऱ्या दिवशीं प्रभात शाखेतील स्वयंसेवकाचे कार्यक्रम झाल्यावर त्यानीं पूर्वसंकेतानुसार तेथील अधिकाऱ्याना तातडीच्या मेळाव्याचा ( रॅलीचा ) निरोप सागितला. पुण्याप्रमाणेच त्या दिवशी सकाळीं ९ वाजता शिवाजी उद्यानात स्वयंसेवक एकत्रित झाले. त्या वेळी डॉक्टर देवळालीहून तेथे जाऊन पोहोचले व त्याचे तेथे मेळाव्याचे मर्म विशद करणारे भाषण झाले.

त्या दिवशीं दुपारीं श्री. केशव जगन्नाथ तथा काकाराव आकूत वकील, याच्याकडे डॉक्टराना भोजनासाठी निमत्रण होते. दहा-पंधरा जणासमवेत पंगत बसली. आबरसपुरीची योजना होती व जेवणावर स्वाभाविकपणेच गप्पा रगांत आल्या. पण पगतीच्या एका कडेला बसलेले डॉक्टर मधून मधून डावा हात भितीला टेकून दमल्याभागल्याप्रमाणे रेलून आधार घेत होते. तसेच गप्पातहि नेहमींप्रमाणे भाग घेताना दिसले नाहीत. वास्तविक त्याचे अग तापाने फणफणले होते. पण आपल्यामुळे इतक्या जणाचा विरस होऊं नये यासाठीं त्यांनीं आपला देह सयमपूर्वक पाटावर बसवला होता व जेवणात भाग घेतल्याचे समाधान ते इतरांना देत होते. इतके करूनहि त्याचे आजचे मौन व मदपणा शेवटीं इतराच्या लक्षात आला व जेवण झाल्यावर डॉ. गोविदराव दामले यानी त्यांच्या अंगाला हात लावून पाहता अंग चागलेच गरम लागले. तपमापक लावून पाहिल्यावर तो १०३° आहे हे ध्यानीं आले व त्याना तेथेच माजघरात अंथरूण घालून देऊन डॉ. दामले यांनी औषधयोजना केली. लोकसंग्रहाच्या स्वभावांतून डॉक्टरांना किती यातना भोगाव्या लागत होत्या, हें त्याचे तेंच जाणत !

सायंकाळीं त्याना देवळालीच्या बंगल्यावर नेण्यांत आले व तेव्हापासून ताप व अशक्तता वाढत चालली. त्या तापात डॉक्टराना 'डबल न्युमोनिया' झाला. त्याना औषधोचार करण्यासाठीं नासिकचे डॉ. गोविदराव दामले व डॉ. पाडुरंगराव चोभे हे दिवसांतून दोन-दोन वेळां देवळालीला जात असत. ह्या डॉक्टरद्वयानीं सांगितलेले अनुपान व औषध वेळच्या वेळीं व योग्य पद्धतीनें दिलें जावें, यासाठीं स्वतः गुरुजी व तेलंग तेथें होतेच. पण त्यांच्या साहाय्याला

पावसाळ्यांतील चिखलांतून दुचाकीनें नासिकचे स्वयंसेवकहि जात असत. इतकी दक्षता घेऊनहि डॉक्टरांचें दुखणें वाढत चाललें व एक दिवस तर सर्वांनींच सचिंत व्हावें, अशी अवस्था झाली. ताप मी म्हणत होता व डॉक्टर बेशुद्ध झाले होते ! नासिकच्या डॉक्टरांनीं गुरुजींना बाजूला घेऊन ' यांचे नातलग कोण आहेत ? त्यांना हे अत्यवस्थ असल्याचें कळवून ठेवलेलें बरें ! ' असें सांगितलें. तेव्हां गुरुजींनीं, नागपूरला ही गोष्ट कळविली तर किती जणांची धांवाधांव होईल, हें ध्यानीं घेऊन ' आम्ही त्यांचे नातलगच आहोंत ! ' असें म्हणत शुश्रूषेमध्यें त्यांनीं कोणतीहि उणीव उरूं दिली नाहीं. रात्रंदिवस–अष्टौप्रहर ते त्यांच्या पलंगाजवळ असत व इतर स्वयंसेवकांबरोबर पडेल तें काम करीत. पाणी तापवून देणें, औषध देऊन पाठ शेकणें, ताप पाहणें, कपडे बदलणें अशा कोणत्याहि कामासाठीं ते तत्परतेनें पुढें येत. कधीं त्यांना दोन-तीन तास झोप मिळे, तर कधीं तीहि नाहीं ! त्यांनीं या काळांत जी शुश्रूषा केली, तिच्यासंबंधीं बोलण्याच्या ओघांत नासिकचे एक वयोवृद्ध वकील म्हणाले कीं, " डॉक्टरांचीं कामें गुरुजी हे खरोखरच एखाद्या शाळकरी मुलाच्या तत्परतेनें करीत असत ! "

या आजारांत दोन-तीन दिवस अत्यंत चिंतेंत गेले. पण तेवढ्या अवकाशांत परमपूजनीय डॉक्टरांच्या अंतरंगाचें दर्शन गुरुजींना झाल्यावांचून राहिलें नाहीं. वात झाला असतांना डॉक्टर अधूनमधून बोलत व त्यांतहि संघाचें काम करण्यासाठीं त्यांच्या मनाला लागलेली आतुरता शब्दरूपानें प्रकट होई. " चला, मला वेळेवर गेलें पाहिजे !......गांवचें पत्र कसें आलें नाहीं ? " अशीं वाक्यें मध्येंच ऐकूं येत. अस्वस्थतेमुळें या कुशीवरून त्या कुशीवर ते सारखे वळत असत व तितक्या वेळा त्यांचें पांघरूण सांवरण्यासाठीं गुरुजी पुढें होत. डॉक्टरांनीं आपलें भर तारुण्य पहिल्या महा-युद्धाच्या काळांत दाहक क्रांतीच्या योजना सफल करण्यासाठीं अत्यंत गुप्तपणानें हालचाली करण्यांत घालविलें होतें. त्यांच्या त्या संकल्पित योजना जरी साकार होऊं शकल्या नाहींत तरी त्याच्या स्मृति अंतर्मनाच्या चोरकप्प्यांत दडवून ठेवलेल्या होत्या यांत शंकाच नाहीं. डॉक्टरांनीं चालविलेली संघटनाहि कांहीं न साधलेल्या गोष्टींच्या सफलतेसाठींच होती. पण वाताच्या गुंगींतहि, अंतर्मनावर डॉक्टरांनीं घातलेली संयमाची गवसणी ही बाजूला झाली नाहीं, ही गोष्ट असामान्यच होती. नाहीं तर, बरेच दिवसांपासून कोंडून ठेवलेल्या भावभावना अशा वेळीं मोकाट सुटणें मुळींच अशक्य नव्हतें. पण डॉक्टरांनीं अंगीं मुरविलेल्या सावधानतेच्या पगडींतून अंत-र्मनाला हालचाल करतां आली नाहीं हेंच खरें. त्याचप्रमाणें जगांत वागतांना केवळ धोरण म्हणून आपल्या समाजांतील कांहीं व्यक्तींजवळ वरकरणीं चांगुलपण दाखवून त्यांच्या नाशासाठीं आंतून जळत राहावें, असा व्यवहार सर्वत्र दिसतो. डॉक्टर अशा वृत्तीला ठळक अपवाद होते व त्यामुळें जीं तुटकीं वाक्यें ते गुंगींत बोलत, त्यांत कोणत्याहि व्यक्तीविषयीं अनुदारपणाची वा हेव्यादाव्याची छटाहि

कधीं उमटली नाही, यांत नवल ते काय ? डॉक्टराच्या मनाची दृढता व विशुद्धता ही अशी गुरुजींच्या प्रत्ययाला आली व त्यांतून गुरुजी डॉक्टरांचे अंकित झाले. या देवळालीच्या पंधरा-सोळा दिवसांच्या अनुभवांविषयीं बोलताना पुढे एके प्रसंगीं श्रीगुरुजींनीं सागितले की, "...माणसें पारखण्यात माझी वृत्ति चोखंदळ आहे. अगदी सुरुवातीला, एका वेगळ्या पद्धतीचे कार्य करणारे पुढारी यापलीकडे डॉक्टरांसंबंधी दुसरी भावना माझ्या मनात नव्हती. परंतु अवघ्या पंधरा-सोळा दिवसातच, पण सततचा सहवास घडून येतांच, सर्वसामान्य माणसाप्रमाणे वागणाऱ्या ह्या पुरुषात असामान्य असेंच कांही तरी आहे, असे मला दिसून आले."

प. पू. डॉक्टर 'डबल न्युमोनिया'ने चिंताजनक अवस्थेत पडून असतानाच मुंबईहून दे. भ. सुभाषचंद्र बोस यांच्याकडून डॉक्टराना भेटण्याचा दिवस निश्चित करण्यासाठीं श्री. बाळाजी हुद्दार देवळालीला आले. त्या वेळीं त्याच्याबरोबर सुभाषचंद्रांनीं मुंबईचे डॉ. वसंतराव रामराव सझगिरी यानाहि पाठविले होते. ते दोघे जण भेटावयास आले तेव्हां प. पू. डॉक्टराची प्रकृति काहीशी अत्यवस्थच होती. तरीहि त्यांनी त्याचे म्हणणे लक्षपूर्वक ऐकून घेतले. युद्धपरिस्थितीने उत्पन्न केलेल्या आणीबाणीचा लाभ घेऊन इंग्रजाविरुद्ध उठाव करण्याचा देशगौरव सुभाषचद्र बोस याचा मानस असून त्या सबंधात ते आपणाला भेटू इच्छितात, असा त्या दोघाच्या बोलण्यांतील आशय होता.

ते ऐकत असता डॉक्टरानी मध्येच पृच्छा केली की, "काळ अनुकूल होत आहे हे खरे. पण क्रातीसाठीं आपली सिद्धता किती ? प्रारंभी किमान ५० टक्के तरी सिद्धता हवी. तसे पाहता सुभाषबाबूजवळ सध्या किती माणसे आहेत ? आपली इतकीहि सिद्धता नसतां स्वातंत्र्यासाठी केवळ परक्यांच्या साहाय्यावर विसंबून चालणार नाहीं."

प. पू. डॉक्टराची प्रकृति त्या वेळी विचारनिनिमय करण्यासारखी नाही, हें कोणालाहि सहज दिसण्यासारखे होते. तेव्हा अवघ्या अर्ध्या तासांतच श्री. हुद्दार व डॉ. सझगिरी हे त्यांचा निरोप घेऊन जावयास निघाले. त्या वेळी डॉक्टरांनी 'आपण पुन्हा एकदा निवातपणें विचार करण्यासाठी नागपूरला या,' असे डॉ. संझगिरींना आग्रहाचे निमंत्रण दिले.

ही घटना दि. ८ किंवा ९ जुलैची असावी. कारण त्या वेळीं सुभाषबाबूंचे वास्तव्य मुंबईत होते असे दिसते. कॉंग्रेसमधून बाहेर पडल्यावर पुरोगामी गटाच्या रूपाने इंग्रजाशीं जरा चढाईचे राजकारण उभे करण्याच्या सिद्धतेत ते असतांना आशाकित तरुणांचे सामर्थ्य थोड्याबहुत प्रमाणांत ज्या परमपूजनीय डॉक्टरांच्या पाठीशीं उभे होतें, त्याची आठवण त्यांना होणे हे स्वाभाविकच होतें. तसेंच त्या दोघांहि देशभक्तांचा पिंड हा क्रांतिकारकाचाच असल्याने, असा 'समसमा संयोग' जुळवून आण्यासाठी प्रयत्न होणे यांत नवल करण्यासारखें कांहीच

नव्हतें. पण त्या दोघांच्या भेटीचा योग त्या वेळीं व त्यानंतर मनांत असूनहि प्रत्यक्ष साधला नाहीं, ही नियतीची एक चमत्कारिकच करणी म्हणावयाची !

श्री. बाळाजी हुद्दार व डॉ. संझगिरी परत गेल्यावर अवघ्या चारच दिवसांनीं डॉ. संझगिरी यांनीं प. पू. डॉक्टरांना पाठविलेलें एक महत्त्वाचें पत्र सुदैवानें उपलब्ध आहे. तें पत्र दि. १२ जुलैचें असूनहि तें दि. १८ ला नागपूरला पोंचलें असें दिसतें. त्यांत ते म्हणतात कीं, " आम्ही ज्या कामानिमित्तानें आपणांला भेटावयास आलों होतों त्यामागील तळमळ आपण सहज जाणूं शकाल. आपण नागपूरला भेटण्यास येण्याविषयीं आम्हांला जें आग्रहानें निमंत्रण केलेंत, त्यासाठीं आपला आभारी आहें. पण कांहीं अनपेक्षित अडचणींमुळें सध्यां तरी नागपूरला येण्याचा विचार सोडावा लागत आहे. तेव्हां दि. २० ला आपणच मुंबईला याल काय ? आपली येथें भेट व्हावी, अशी आमची तीव्र इच्छा असून यासंबंधांत आपण आमची निराशा करणार नाहीं, असा मला विश्वास वाटतो. ' अपेक्षित गृहस्थ ' हे दि. २० ला रात्रीं येथून जाणार आहेत. तेव्हां एक दिवसासाठीं तरी याच. ( त्या भेटींत ) सर्वांच्या हिताची अशी एखादी योजना आपण आंखूं शकूं, असा मला विश्वास वाटतो. " अर्थात् ' अपेक्षित गृहस्थ ' अशी मोघम शब्दयोजना देशगौरव सुभाषचंद्र बोस यांच्या संबंधांतच केलेली होती हें सांगावयास नकोच. ( "....You can well imagine the sincerity of our mission in coming up to meet you. We thank you for your kind invitation to meet you at Nagpur. Due to unforeseen circumstances the Nagpur programme is cancelled for the present. Will you, therefore, come over to Bombay on the 20th instant ? We do wish you meet us here. I am sure you will not disappoint us. The person concerned will leave on the 20th night. Come for one day's stay. I am sure we can evolve a plan for common good. " )

डॉक्टरांचा ताप हलके हलके कमी होऊं लागला तरी अशक्तता विलक्षण होती. इकडे तोंडचें पाणी पळविण्याइतकी त्यांची अवस्था झाली असतांहि नागपूरला गुरुजींनीं जीं पत्रें पाठविलेलीं दिसतात, त्यांत त्यांनीं आजारपणाची इतकी स्थिति असल्याचें मुळींच सूचित केलेलें दिसत नाहीं. कारण अत्यंत जिव्हाळा असलेल्या डॉक्टरद्वयांच्या मार्गदर्शनाखालीं सर्व उपचार व शुश्रूषा अगदीं नीटनेटकी चालू असल्यानें, त्यांतून डॉक्टर सुखरूप निभावून निघतील, असा विश्वास त्यांना वाटत होता व तो यथार्थहि होता. जरा ताप कमी झाल्यावर दि. १२ जुलैला सायंकाळीं डॉक्टरांना नासिकला हलविण्यांत आलें. त्यांतील प्रमुख हेतु असा होता कीं, डॉ. दामले व डॉ. चोभे यांना रोज आठ-दहा मैल येऊन जाण्याचा जो त्रास पडतो

तो वांचावा व त्याच्या जोडीने नासिकमधील स्वयंसेवकांनाहि डॉक्टरांच्या शुश्रूषेत लक्ष घालण्यास अधिक सुलभता मिळावी.

या वेळीं त्यांच्यासाठीं मुंबई-आग्रा राजरस्त्यावरील ' जय व्हिला ' या बंगल्यांतील तळमजल्याच्या तीन खोल्या घेण्यांत आल्या होत्या. ताप थांबल्यावर प्रकृति हलके हलके सुधारूं लागली व डॉक्टरांना कोणतीहि उणीव भासूं नये म्हणून स्वयंसेवकानींहि पुरेशी दक्षता घेतली. एक स्वयंसेवक त्यांची दुखणारी पाठ चोळण्यासाठी सकाळीं साधारण ९ वाजतां व सायंकाळीं ४॥ ला येई. पण वेळेवर येणें त्याच्या स्वभावात नव्हते. तो उशीर करून आला तरी ऐटींत घड्याळाकडे पाहत म्हणे कीं, ' प्रश्न नाहीं ! नऊ म्हणजे नऊ ! ' पुढे पुढे तर त्याची ही न्यारी पद्धति डॉक्टरांनी उचलली व तो बराच उशीर करून आला कीं, तेच त्याच्याकडे हास्यमुद्रेने पाहत ' नऊ म्हणजे नऊ ' असे म्हणून त्याचे स्वागत करीत ! प्रत्येक बारीकसारीक गोष्टींतहि अगदीं स्वच्छता व नीटनेटकेपणा पाहिजे, असा त्याचा कटाक्ष असे. आजारपणातहि त्याचे हातरुमाल एकदा तेथील स्वयंसेवकाने नीट धुतले नाहींत, तेव्हा ते वाळत घातलेले रुमाल त्यानी शेजारच्या खोलींतील न्हाणी-घरांत जाऊन स्वतः धुतले.

हलके हलके डॉक्टरांच्या खोलींत स्वयंसेवकाची ये-जा सुरू झाली व लवकरच त्याच्या निवासातील दिवे रात्रीं बारा बारा वाजेपर्यंत तेवताना दिसूं लागले. अर्थात् त्यांच्या प्रकृतीची काळजी घेणाऱ्या डॉक्टरद्वयाना ही गोष्ट कळताच त्यांनी गुरुजींना सांगितले कीं, " तुम्ही त्याना लवकर निजू द्या. त्याना जागरण घडणे इष्ट नाहीं." त्यावर त्यांनीं सागितले कीं, " ही गोष्ट करणे मला जमणार नाहीं. आपणच येऊन त्यांना सागाल तर ते ठीक होईल. " त्याप्रमाणे त्या रात्रीं प. पू. डॉक्टरांना ' जागरण करूं नका ! ' असे सागण्यासाठीं त्याचे डॉक्टर रात्रींचें जेवण उरकून तेथें आले. त्या वेळी डॉक्टराच्या सभोवतीं बरेच स्वयसेवक बसलेले असून, गप्पागोष्टी सुरू झाल्या होत्या. त्या दिवशी नेहमींप्रमाणेंच विषयातून विषय निघून गप्पा इतक्या रंगल्या कीं, त्याना ' जागरण करू नका ' म्हणून सांगण्यासाठी आलेले डॉक्टरहि त्यातच रंगून गेले व जेव्हां बाराचे टोले पडले तेव्हा आपण कोणत्या कामगिरीवर आलो होतो व हे काय झाले, असे आश्चर्य त्याच्या मुखावर उमटले ! त्यानंतर अर्ध्या-एक तासाने जेव्हा सर्व स्वयसेवक घरोघर जाण्यासाठीं उठले, तेव्हा त्या नासिकच्या डॉक्टराना गुरुजीनी विचारले, " काय डॉक्टर ! बैठक कशी काय झाली ? " अर्थात् या प्रश्नांतील खोच ओळखून त्यांनीं आपला पराभव झाल्याचा भाव प्रकट केला.

या काळात डॉक्टरांना नागपुराहून परावर्तित ( re-direct ) होऊन अनेक पत्रें येत होतीं. त्यांत त्याच्या प्रकृतीविषयीं चिंता व्यक्त करणारीं पत्रे असत, तशींच कार्यवाहीचीं वृत्तें देणारींहि. नरसोबाच्या वाडीच्या एका स्वयंसेवकानें

लिहिलें होतें कीं, " आपले प्राण हे उदयोन्मुख हिंदुराष्ट्राचें नवचैतन्य आहे. तरी त्या-विषयीं अधिक काळजी घ्यावी. " " श्रीगुरुजींना पंजाबांत दौऱ्यावर पाठवा व संघ सुरू करण्यासाठीं तज्ज्ञ पाठवा," अशींहि पत्रें त्यांत होतीं. तसेंच सुरत व मद्रास येथें कार्याला प्रारंभ झाल्याचें आनंददायक वृत्तहि याच अवधींत डॉक्टरांना समजलें होतें. इंग्लंडमध्यें शिक्षणासाठीं गेलेल्या स्वयंसेवकांजवळ गुरुदक्षिणेसंबंधीं झालेला पत्रव्यवहार प. पू. डॉक्टरांना कळविण्यांत आला होता, तर जबलपूरला निघणाऱ्या एका हिंदुत्ववादी नव्या मासिकाला संघांत स्थान द्यावें व त्या मासिकाला डॉक्टरांनीं नांव सुचवावें, अशीहि मागणी करणारें पत्र येऊन पोंचलें होतें.

हिंदुत्व व हिंदुराष्ट्र यांवरील श्रद्धेतून उभ्या राहणाऱ्या चळवळींना वा उपक्रमांना आतां डॉक्टर हे आधार वाटत होते, असेंच त्या वेळच्या पत्रव्यवहारा-वरून सहज दिसून येतें. हिंदुस्थानच्या सैन्यांतील अधिकाऱ्यांत भारतीयांचा भरणा व्हावा त्यासाठीं जी समिति सिमला येथें पुढाऱ्यांच्या मताचा कानोसा घेत होती, त्या समितीनेंहि डॉक्टरांना दि. ३ जुलै ते २१ जुलै १९३९ या काळांत सिमला येथें साक्ष देण्यासाठीं केव्हां येतां येईल, अशी विचारणा केली होती. कांहीं ठिकाणचीं स्थानिक दलें संघांत विलीन झाल्यासंबंधींच्या वार्ता त्यांत होत्या व ग्वाल्हेरसारख्या संस्थानी वातावरणांत ' राणोजी स्वयंसेवक संघ ' या नांवाखालीं संघ सुरू झाल्याचेंहि वृत्त त्यांत आलेलें दिसतें. कलकत्त्याची शाखा नुकतीच सुरू होऊनहि तेथील डॉ. संतोषकुमार मुखर्जी यांनीं डॉक्टरांना कळविलें होतें कीं, " आमचें पाऊल प्रगतिपर पडत असून बंगालमधील संघाचा भविष्यकाळ उज्ज्वल दिसतो. " ( We are making progress and the future of the R. S. S. in Bengal seems to be brighter. )

अशासारख्या येणाऱ्या पत्रांना डॉक्टरांच्या विचारानें गुरुजीच उत्तरें पाठवीत व तीं महत्त्वाचीं पत्रें टाकण्यासाठीं सर्वत्र निजानीज झाल्यावर निवांतपणें ते स्वतः बाहेर जात. या काळांत कांहीं वेळां डॉक्टरांच्या आवडीचा एखादा पदार्थ सुचविण्यासाठीं गुरुजी स्वतः ज्यांच्याकडून डबा आणला जाई, त्यांच्याकडे गेल्याचें दिसून येतें. आतां जीवनांतील मार्गाची निश्चिति झाल्यानें मनाला येणारी स्थिरता, वागणुकींत व व्यवहारांत येणारी तत्परता व वृत्तींत उसळणारा उत्साह या गोष्टी गुरुजींच्या ठिकाणीं एकवटूं लागल्या होत्या. श्रीगुरुजींच्या अंतरंगांत आतां डॉक्टर व संघ हे विराजमान झाले होते. त्या काळांत कोणाचा कोणत्या दिवशीं उपास असतो, असा एकदां सहज विषय निघाला असतां, कोणी दत्ताचा म्हणून गुरुवार वा मारुतीचा म्हणून शनिवार आपण करतों असें सांगतांच गुरुजींनीं सांगितलें कीं, ' माझाहि एक वार आहे.' ' तो कोणता ? ' असें विचारलें जातांच ते म्हणाले, ' हेडगेवार ! '

जुलैच्या शेवटीं डॉक्टरांची प्रकृति सुधारली असली तरी त्यांच्या प्रकृतीची मुंबईतील तज्ज्ञांकडून एकदां पाहणी करून घ्यावी असे ठरले व त्याप्रमाणे दि. १ ऑगस्टला त्यांना मुंबईस नेण्यात आले. तेथील डॉ. गिल्डर, डॉ. आठल्ये आदि तज्ज्ञांनीं त्यांची प्रकृति तपासली, पण त्यांतून त्यांना नेमकें निदान करतां आलें नाहीं, असे दिसते. कारण दि. २२ ऑगस्टच्या पत्रात डॉक्टर म्हणतात कीं, " माझे प्रकृतीसंबंधीं नागपूरच्या डॉक्टर लोकाचे जें म्हणणे होते तेच जवळ जवळ मुंबईच्या डॉक्टराचे मत आहे. X-Ray व Electro-Cardiograph घेतला. पण त्यात कोणताहि दोष आढळत नाहीं. " या पाहणीनंतर डॉक्टर दि. ५ ला नासिकला परत गेले व तेथे एक दिवस थांबून दि. ६ ला त्यानीं सर्वांचा निरोप घेतला. निघण्यापूर्वीं एवढ्या जिवावरच्या दुखण्यातून प. पू. डॉक्टर निभावले म्हणून डॉ. गोविंदराव दामले यानीं स्वयंस्फूर्तीने सर्वांना पेढे वाटले. त्या वेळीं ते उद्गारले, " ही हिंदुस्थानच्या हिऱ्याची जोखीम आमच्यावर दिली होतीत, ती स्वाधीन करीत आहे. तेव्हा नीट साभाळा ! " डॉक्टराचे जीवन हिऱ्याच्याच काय पण पृथ्वीमोलाचेच नव्हते काय ? अस्तु.

प. पू. डॉक्टर नासिकहून दि. ७ ऑगस्टला नागपूरला येऊन पोहोचले. पण वाटेंतच त्यांना व्यथित करणारी वार्ता ऐकण्याचा प्रसंग आला. त्यासंबधीं नागपूरला पोंचतांच लिहिलेल्या पत्रांत श्रीगुरुजी लिहितात कीं, " आम्ही नागपूरला सुखरूप येऊन पोहोचलो. प्रवासाने थोडाबहुत थकवा आला खरा, पण एकंदरींत प्रकृतीवर कांहीं परिणाम न होतां आम्ही घरीं येऊन पोहोचलो. श्रीमत नानासाहेब टालाटुले यांना दि. ३-८-३९ रोजीं देवाज्ञा झाली. ही हृदयद्रावक बातमी भुसावळ स्टेशनावर आम्हाला समजली. हे वृत्त ऐकून धक्का बसला. प. पू. डॉक्टरांना किती दुःख झालें व होत आहे ते वर्णन करून सागणें अशक्य आहे. "

नागपूरला आल्यावर थोड्याच दिवसानीं डॉक्टरानीं नासिकचे श्री. राजाभाऊ साठ्ये यांना पत्र लिहिले. त्यात ते म्हणतात कीं, " माझा व आपल्या सर्वांचा जो दीर्घकालीन सहवास घडून आला त्यायोगें मला नासिकसबंधाने काय वाटतें तें शब्दांत लिहून दाखविणें शक्य नाही. मनांतल्या भावना मनानेच समजावयाच्या असतात. " अशीच कृतज्ञता श्रीगुरुजी याच्या त्या वेळच्या पत्रांत उमटल्यावांचून राहिली नाही. ते लिहितात कीं, " डॉ. दामले व डॉ. चोभे यानीं प. पू. डॉक्टरांच्या प्रकृतीची जी काळजी घेतली, तींतून उतराई होणें अशक्य आहे. "

डॉक्टरांनीं नासिकच्या आजारानंतर परत आल्यावर अवघ्या सहाच दिवसानीं गुरुपौर्णिमेच्या उत्सवांत दि. १३ ऑगस्टला श्री. बाबासाहेब घटाटे यांना नागपूरचे संघचालक व श्रीगुरुजी यांना संघाचे सरकार्यवाह ( General Secretary ) नियुक्त केल्याचे घोषित केलें. त्यांनीं आपल्या प्रकृतीचा एकूण रंग

ओळखला होता व आपल्या अंगावरील अखिल भारतीय संघटनेचा भार श्रीगुरुजींकडे क्रमानें सोपविण्याला या नियुक्तीनें जणूं प्रारंभच केला होता म्हणावयाचा ! दूर-दर्शिता हीच डॉक्टरांची विशेषता !

या वेळच्या नागपुरांतील गुरुपूजनाच्या उत्सवाचें प्रतिवृत्त निरनिराळ्या प्रांतांतील प्रमुख वृत्तपत्रांतून सविस्तरपणें प्रसिद्ध करण्याची योजना करण्यांत आली होती. त्यांत ' ट्रिब्यून ' ( लाहोर ), ' हिंदु औटलुक ' ( दिल्ली ), ' लीडर ' ( प्रयाग ), 'अमृतबझार पत्रिका' व 'लोकमान्य' ( कलकत्ता ), 'सण्डे टाईम्स्' ( मद्रास ) व महाराष्ट्रांतील ' केसरी ', ' त्रिकाळ ', ' नागरिक ' आदि प्रमुख पत्रें यांचा उल्लेख प्रामुख्यानें करावा लागेल. प. पू. डॉक्टरांच्या विचारानेंच ही गोष्ट घडली होती. प्रसिद्धीच्या संबंधांत त्यांचा दृष्टिकोन प्रारंभापासूनच निश्चित होता. वृत्तपत्रें हीं वृत्ति घडविण्यास कांहीं थोड्या मर्यादेपर्यंत उपयुक्त ठरणारीं असलीं तरी प्रत्यक्ष आज्ञांकित व टिकाऊ संघटनेची उभारणी करण्याच्या दृष्टीनें त्यांचें त्यांना फारसें महत्त्व वाटत नव्हतें. त्यासाठीं दैनंदिन एकत्रित जमवून घेण्यांत येणारे स्वयंसेवकांचे लाठी-काठीचे, संचलनाचे, पद्य-प्रार्थनेचे व बौद्धिक वर्गांचे संस्कार करणारे कार्यक्रमच त्यांना अत्यंत प्रभावी वाटत. मात्र जगाचा ओढा जें घडत असेल तें लगेच छापण्याकडे आहे व त्यामुळें संघाचीं वृत्तें आपण नको म्हटलें तरी छापून येणार, हें त्यांनीं ओळखलें व एर्वीतेर्वी वृत्तें येणारच असतील तर तीं अवास्तव व विकृत तरी येऊं नयेत, म्हणून प्रत्यक्ष संघाकडून ' अधिकृत ' वृत्तें आवश्यकतेनुसार पाठविण्यास त्यांनीं सुरुवात केली. अर्थात् १९३९ मध्यें बऱ्याच प्रांतांतून संघाचें काम विस्तारलें असल्यानें वरीलप्रमाणें अनेक वृत्तपत्रांतून त्या वेळच्या गुरुपूजनोत्सवाचें वृत्त प्रसिद्ध होणें स्वाभाविक होतें. त्यांच्या व्यवहारांत हट्ट वा कडेलोट करणारा हेका कधींच नसे, तर परिस्थितीची योग्य समजूत व त्यांतून स्वीकारलेला प्रमाणबद्ध व हितकर लवचिकपणा हेंच त्यांच्या व्यवहाराचें मर्म होतें.

* * *

## २९ : राजगीरची विश्रांति

नासिक येथून परत आल्यावर, प. पू. डॉक्टराना प्रवास करणे हे अत्यन्त अवघड झालें. कारण प्रकृतीची अवस्था अत्यंत तोळामासा होऊन बसली. त्या दिवसांत, ' आमच्याकडे महिना-दोन महिने थारेपालट करण्यासाठी या, ' अशा आशयाचीं अनेक पत्रे डॉक्टराच्या हातीं पडत होतीं, पण विश्राति घेण्यासारखा काळ नाहीं, हें स्पष्ट दिसत होते. आपण आतां फार दिवसाचे सोबती नाहीं, अशी जाणीव त्यांना पूर्णपणे झाली होती व अशा वेळी उरली-सुरली सारी शक्ति संघटनेच्या वृद्धीसाठीं लावण्याचा उग्र निर्धार त्यांच्या व्यवहारांतून प्रतीत होई. अशा स्थितींतहि त्यानीं नवीन नियुक्त केलेले नागपूर-संघचालक श्री. बाबासाहेब घटाटे याना संघकार्याचा जवळून परिचय करून देण्यासाठीं त्याना रोज आपल्या-बरोबर निरनिराळ्या संघशाखा दाखविण्यासाठीं नेण्याचा क्रम सुरू केला. पत्रव्यवहार व गांठीभेटी थोड्याबहुत प्रमाणात सुरूच असल्या तरी त्याचा अधिक भार आता नव्या उत्साहाने श्रीगुरुजी यांनी स्वीकारला होता.

नासिकच्या आजारापूर्वीं डॉक्टराच्या मनांत क्वचित् अशी शंका डोकावे कीं, श्रीगुरुजी हे आज संघकार्यात प्रत्यक्ष हिरीरीने भाग घेत असले, तरी त्यांच्यांतील ' वैराग्य ' केव्हा उसळी मारून त्याना दूर नेईल' याचा नेम नाही. ती त्याच्या मनांतील रुखरुख केव्हा केव्हा प्रकट होत असे. एकदा निकटच्या कार्यकर्त्यांनीं गुरुजींच्या कामासंबंधी गौरवोद्गार काढले असता डॉक्टर सहज बोलून गेले कीं, " तो गडी अद्यापि ' रामकृष्ण ' आहे ! पहावे पुढें काय होतें तें ! " केव्हा केव्हा गुरुजीच्या देखतहि त्यानीं ' परमहसत्वा 'चा गमतीने उल्लेख केलेला आढळतो. एकदां श्री. रामभाऊ जामगडे, श्री. कृष्णराव मोहरीर व श्रीगुरुजी असे तिघे जण डॉक्टरांच्याकडे एकदम आले. त्या तिघाना एकत्र पाहून डॉक्टराची विनोदबुद्धि जागृत झाली व ते म्हणाले, " या रामकृष्ण परमहंस ! " यातील राम हा जामगडेच्या व कृष्ण हा मोहरीरांच्या नांवांतील शब्द उचलून, गुरुजींच्या उल्लेखासाठीं त्यांनीं ' परमहंस ' असा शब्द जोडला होता ! पण १९३९ मध्ये गुरुजींचे यापुढील जीवन संघमय व कर्मयोगी असेच राहील, असा विश्वास त्याना प्रकर्षाने वाटूं लागला आणि त्या विश्वासातूनच त्यांनीं गुरुजींना ' सरकार्यवाह ' नियुक्त केले.

श्रीगुरुजींनाहि डॉक्टरांच्या रूपानें वावरणाऱ्या हिंदुराष्ट्रपुरुषाच्या आकांक्षांचें दर्शन घडलें होतें व यापुढें त्या आकांक्षांच्याच पूर्तीसाठीं आपलें तनमनधन वेंचण्याचा निर्धार त्यांनीं मनोमन केला होता. प. पू. डॉक्टरांना मातृभूमीच्या सेवेसाठीं त्यांचें शरीर असमर्थ वाटूं लागलें होतें. अशा वेळीं आपलें मन डॉक्टरांशीं एकरूप करून आपलें तरुण शरीर त्यांनीं त्यांच्या पायांवर जणूं वाहिलें, असेंच म्हणणें युक्त दिसेल. अशा असामान्य विशुद्ध व अव्यभिचारी निष्ठेनें गुरुजींनीं संघकार्यार्थ निरनिराळ्या प्रांतांत संचार करून तेथील कामांत अधिक उत्साह आणण्यास प्रारंभ केला. १९३९ च्या ऑगस्टमध्यें ओ. टी. सी. वर्गाच्या निमित्तानें गुरुजी पंजाबांत गेले व ठिकठिकाणच्या शाखांना त्यांनीं भेटी दिल्या. या वेळीं लाहोरहून दि. २५ ऑगस्टला लिहिलेल्या पत्रांत पंजाबमध्यें कडव्या मुसलमानी वृत्तींतून सुरू झालेल्या आंदोलनासंबंधींचें वृत्त त्यांनीं डॉक्टरांना कळविलें होतें. खाकसार संघटनेची माहिती देऊन ते लिहितात, " खाकसारांमुळें Panic (घबराट) उत्पन्न होऊन भरमसाट दलांची उत्पत्ति होत आहे." हिंदु समाजाविरुद्ध उभ्या राहिलेल्या खाकसार संघटनेमुळें तेथील समाजांत असें विविध दलांचें पेव फुटलें तरी त्या सर्व दलांतून एकमेव देशव्यापी राष्ट्रीय संघटनाच साकार व्हावी, असें डॉक्टरांना वाटत होतें व त्या आशयाचे विचारहि त्यांनीं त्या काळांत बोलून दाखविले होते.

या वर्षाच्या मध्यावर प. पू. डॉक्टरांनीं कलकत्ता येथील कामाला नीट चालना मिळावी, यासाठीं श्री. विठ्ठलराव पतकी यांची प्रचारक म्हणून पाठवणी केली. त्यांना जाण्यापूर्वी एक धोक्याची सूचना देण्यास ते विसरले नाहींत. परके इंग्रज आधींच अत्यंत संशयित दृष्टीनें तरुणांच्या संघटनांकडे पाहत आहेत व विशेषतः बंगालमध्यें तर गुप्त क्रांतिकारकांच्या हालचाली विशेष सुरू असल्यानें तेथें तर त्यांचें लक्ष अधिक असणार. यासाठीं आपल्या संबंधांत येणाऱ्या व्यक्तीच्या चोवीस तासांतील सर्व हालचालींचा नीट कानोसा घेऊनच आपण व्यवहार केला पाहिजे, असें सांगून ते म्हणाले कीं, " प्रत्येक दगडाखालीं विंचू आहे असें समजून व्यवहार करा ! म्हणजे संघटनेच्या स्थायी कार्याला इतर गुप्त चळवळींचा संपर्क बाधणार नाहीं."

डॉक्टरांना कामाची किती निकड होती, हें त्यांच्या शब्दाशब्दांतून व्यक्त होई. ते गुरुजींना लाहोरच्या पत्त्यावर लिहितात कीं, "......शक्य तितक्या थोड्या वेळांत जास्तींत जास्त कार्य आटोपून कलकत्त्याकडे वळावें. या दृष्टीनें पंजाब, बनारस, दिल्ली येथें किती दिवस राहावें व बिहारला किती वेळ द्यावा, या सर्व गोष्टींचा विचार तुम्हींच करून काय तें ठरवावें व त्याप्रमाणें आम्हांला कळवावें." १९३९ च्या ऑगस्टमध्यें संघकार्याला सर्वत्र भरती येत होती. बहुतेक प्रमुख नगरांतील संघशाखांनीं गुरुदक्षिणांचे आंकडे सहस्रांच्या घरांत नेले होते व

शाखांतील एकूण वातावरणहि प्रभावी होत असल्याची अनुभूति येत होती. या प्रगतीचे पडसाद डॉक्टराच्या दि. ३१ ऑगस्टच्या एका पत्रात चांगलेच उमटले होते. ते श्री. दादा परमार्थ यांना लिहितात, "पंजाब, संयुक्त प्रात, बिहार, बंगाल व कराची येथूनहि उत्साहवर्धक बातम्या येत आहेत. लाहोरला O T. C. मध्यें एकंदर तीस ठिकाणांहून दीडशेपेक्षां जास्त मंडळी आलेली आहेत व या वर्षाला पंजाबमध्ये संघाचे वातावरण दुमदुमून टाकण्याचा त्याचा निश्चय आहे. अनायासे आर्यन लीगची बैठक नागपूरला झाली असता पंजाब व युक्त प्रांत येथील बहुतेक अखिल भारतीय पुढारी यांची व माझी भेट होण्याचा योगायोग आला. त्या वेळीं त्यानींहि तिकडील संघकार्य वाढविण्याचे कबूल केले व त्याचे मनावर राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचा चागलाच परिणाम झालेला दिसला. बिहारमध्ये आपले येथून चार कार्यकर्ते गेले असल्याचे तुला माहीत आहेच. त्यानीं अविरत श्रमपूर्वक तेथे कार्य चालविले असून लवकरच माधवरावजी गोळवलकर हे तिकडे जाणार आहेत. आतां तुमच्यावर मद्रास प्राताची असलेली जबाबदारी तुम्ही यशस्वी रीतीने पार पाडाल, असा मला पूर्ण विश्वास आहे."

हें प्रगतिपर पत्र लिहून झाले त्याच्या दुसऱ्याच दिवशीं दि. १ सप्टेंबरला जर्मनीनें पोलंडवर चढाई केली व त्यातून दुसऱ्या जागतिक महायुद्धाचा वणवा भडकला ! एवढेच नव्हे तर त्या युद्धांत प्रामुख्याने इंग्लंडहि गुंतले. शत्रु अडचणीत असणे ही परतंत्र राष्ट्राला पुनरुत्थान करून घेण्यास अनुकूल संधि ठरत असते. ह्या न्यायाने हिंदुस्थानातील देशभक्ताच्या आकाक्षाना स्वाभाविकपणेच उजळा चढला व त्यांतून परिस्थिति व आपली उठावाची शक्ति याचा नीट कानोसा घेऊन, आपले पुढील पाऊल कसें पडावें, याची चाळणा जो तो करूं लागला. पहिल्या महायुद्धाच्या वेळी अंदमानात काळ्या पाण्यावर असलेले स्वातंत्र्यवीर सावरकर े या वेळीं हिंदुमहासभेच्या अध्यक्षपदावर होते. त्यानी युद्धपरिस्थितीचा विचार करण्यासाठी दि. १० सप्टेबरला मुंबईच्या सरदार गृहात कार्यकारिणीची तातडीची बैठक बोलाविली. सध्यां तसे पाहतां डॉक्टर हे महासभेच्या प्रत्यक्ष कार्यांत लक्ष घालीत नव्हते. वाढत्या संघाच्या व्यापात व ढासळलेल्या प्रकृतिमानात त्यांना तिकडे लक्ष देण्यास अवधीच मिळत नव्हता. तरीहि स्वातंत्र्यवीरानीं त्यांना पत्र लिहून "...आपण प्रतिष्ठित पाहुणे म्हणून येऊन मार्गदर्शन करा," अशी विनंति केली होती. अर्थात् डॉक्टर जाऊं शकले नाहींत.

या मुंबईच्या बैठकींतच 'हिंदु मिलीशिया' या नांवाचें स्वयंसेवक दल उभारण्याचा कार्यकारिणीने संकल्प केला व ते काम प. पू. डॉक्टरांनीं स्वीकारावे, असा आग्रह सुरू झाला. या दलाच्या उभारणीचा विचार करण्यासाठीं रा. ब. भास्करराव जाधव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, सर गोविंदराव प्रधान, श्री. अण्णासाहेब भोपटकर आदि पुढाऱ्यांची दि. ८ ऑक्टोबरला पुण्यांत बैठक

ठरविण्यांत आली व त्याला ' तुम्ही याच ' असा आग्रह करणारीं डॉ. मुंजे यांचीं पत्रावर पत्रें येऊन नागपूरला धडकूं लागलीं. तेव्हां डॉक्टरांनीं, आपली हें काम करण्यांतील असमर्थता व्यक्त करणारें पत्र दि. ३० सप्टेंबरला पाठविलें. डॉ. मुंजे यांना ते लिहितात, " ......माझी प्रकृति प्रवास सहन करण्यासारखी नसल्यामुळें आपले आज्ञेप्रमाणें या वेळीं दि. ८-१०-३९ ला येऊं शकणार नाहीं. बरें, ही बैठक नागपूरला करतों म्हणाल तर त्याच दिवशीं रा. स्व. संघाच्या नागपूर जिल्ह्यांतील कार्यकर्त्यांची बैठकहि होणार आहे. माझी प्रकृति आजकाल मुळींच चांगली राहत नसून कोणतेंहि महत्त्वाचें कार्य अंगावर घेणें मला अशक्य झालें आहे. म्हणून ' हिंदु मिलीशिया 'चे बाबतींत आपण माझें नांव कोठेंहि टाकूं नये. नांव नसतांनासुद्धां मला या बाबतींत जें कांहीं साहाय्य करतां येईल तें अवश्य करीन. "

डॉक्टरांनीं इतक्या स्पष्ट शब्दांत आपली शक्याशक्यता कळवूनहि डॉ. मुंजे यांचा आग्रह सुरूच असलेला दिसतो. एका पत्रांत ते लिहितात कीं, "...... खरोखरच हें कार्य करण्यास दुसरा लायक मनुष्य महाराष्ट्रांत दिसत नाहीं व हें कार्य महाराष्ट्रांत अवश्य झालें पाहिजे असें सर्वांस वाटतें......" दुसऱ्या एका पत्रांत या आपल्या आग्रहाला बडोद्याचे जनरल नानासाहेब शिंदे यांनींहि पाठिंबा दिल्याचें त्यांनीं डॉक्टरांना कळविलें होतें. संघाचें प्राणापलीकडे जतन करून वाढविलेलें कार्य पेलण्याची शारीरिक शक्ति अंगांत उरली नाहीं म्हणून अस्वस्थ असणारे डॉक्टर, अशा आग्रहानें अधिक अस्वस्थ होत व निरुपाय म्हणून ' महत्त्वाचें कार्य अंगावर घेणें मला अशक्य झालें आहे ' असें कळवीत. पण इतकें कळवूनहि महाराष्ट्रांतील ' हिंदु मिलीशिया 'च्या समितीवर त्यांना घेण्यांत आले व तो निर्णय दि. १२ ऑक्टोबरच्या पत्रांत श्री. शं. रा. दाते यांनीं कळविलेला दिसतो.

हा आग्रह सुरू असतां आपल्यावांचून नवें दल उभारतां येत नाहीं, अशा आपल्या अपरिहार्य नेतृत्वानें डॉक्टरांना समाधान वा आनंद होणें शक्य नव्हतें. देशांतील विविध समस्यांची पूर्ति करण्यासाठीं असंख्य कर्त्या पुरुषांची फळी देशांत उभी राहावी, ही तर त्यांच्या मनाची एकमेव भूक होती. अशा वेळीं महाराष्ट्रांत आपल्यावांचून दुसरा कोणी कार्यकर्ता हें उभारणीचें काम करण्यासाठीं तडफेनें पुढें येत नाहीं, हें दारिद्र्य डॉक्टरांना अत्यंत व्यथित करणारें होतें. त्याचप्रमाणें संघाच्या विधायक व टिकाऊ कार्याची उभारणी पुरेशा प्रमाणांत करूं शकल्यास देशापुढील प्रश्न सोडविण्याची पात्रता संघटनेंत अवश्य येईल, असा विश्वास असल्यानेंच आपल्या शक्तीची अशी विभागणी करणें त्यांना युक्त दिसलें नाहीं, ही गोष्टहि तितकीच खरी होती. नुसतें प्रतिष्ठेपुरतें एखाद्या संस्थेच्या नियंत्रक मंडळांत आपलें नांव ठेवून, प्रत्यक्ष त्या कार्यासाठीं पोटांतील पाणीहि

ढळूं द्यावयाचे नाहीं, असा एक नेतृत्वाचा ‘ संभावित ’ प्रकार त्या वेळी व आजहि रूढ आहे ! पण अशा गोष्टीची घृणा वाटावी वा शिसारी यावी, अशी डॉक्टराची अनन्यसाधारण मनोरचना होती. देखावा वा नाटक न करता, ज्या गोष्टीचें उत्तर-दायित्व स्वीकारावयाचे, ती गोष्ट आपल्या सर्व शक्ति एकवटून अगदी अटीतटीनें साकार करण्यासाठीं झटावयाचे, ही वृत्तीची सचोटी त्याच्या व्यवहारात सदैव दिसे व त्यातूनच त्याना आदरणीय असणाऱ्या डॉ. मुंजे याच्या आग्रहालाहि त्यानीं सौजन्याची भूमिका न सोडतां नकार दिला होता.

परमपूजनीय डॉक्टरानीं कोणत्या स्वरूपाची निष्ठा त्या काळात अनेक तरुणाच्या मनात जागविली होती, हें सप्टेंबर १९३९ मधील एका घटनेवरून सहज कळण्यासारखे आहे. रायपूर शाखेतील एक तरुण कार्यकर्ता श्री. नारायण किरवई हा तापानें आजारी पडला व त्यातून आपण आता उठणार नाहीं असें दिसताच, त्याने एका चिठ्ठीवर एक वाक्य लिहून ठेवले. ते असे कीं, “ डॉक्टर-साहेबाना सागा कीं, मी संघासाठी, हिंदुत्वासाठीं आपला प्राण बळि न देतां, एका तापाला बळि पडलो ! ” देशासाठी बलिदान करता आले नाही म्हणून हळहळत असताना त्याने देह ठेवला ! ती त्याची चिठ्ठी प. पू. डॉक्टराना मागाहून मिळाली होती.

मार्च १९३९ मध्ये कलकत्त्याला श्रीगुरुजी व श्री. विठ्ठलराव पतकी यानीं कार्याला प्रारंभ केला. त्या सुरू झालेल्या कामाला चालना देण्यासाठीं प. पू. डॉक्टरानीं दि. १५ नोव्हेंबरला श्री. बाळाराव देवरस याना तिकडे पाठविले. या प्रारंभींच्या काळात कलकत्त्याच्या सघकार्याला हार्दिक पाठिंबा देण्यासाठी डॉक्टरा-वरील लोभाने जे लोक पुढे आले, त्यात वृद्ध पुलिनबिहारी हेहि होते. पुढे काहीं दिवस तर त्याच्या ‘ वंगीय हिंदु व्यायाम समिती ’च्या आखाड्यातच तेथील संघ-शाखा भरत असे. अनुशीलन समितींतील जुनी दीक्षाच या लोभामागे होती, हें सांगावयास नकोच. श्री. देवरस कलकत्त्याला गेल्यानंतर थोड्याच दिवसानीं डिसेंबरच्या प्रारंभीं गुरुजी व श्री. नानासाहेब तेलंग याना घेऊन डॉक्टर पुण्याच्या प्रातिक बैठकीला उपस्थित राहिले व त्याच महिन्यात त्यानीं कलकत्त्याच्या शाखेलाहि भेट दिली. या वेळी २५ ॲम्हर्स्ट रस्त्यावरील कार्यालयांत प. पू. डॉक्टराचें स्वयंसेवकांसमोर भाषण ठरले. पण प्रकृतीमुळें केवळ दोन-तीन मिनिटातच त्यानीं भाषण संपवून गुरुजींना भाषण करण्यास सुचविलें. या वेळीं झालेले गुरुजींचें इंग्रजी भाषण अजूनहि अनेक जणांच्या स्मरणात आहे.

या वेळीं कलकत्त्याला जातांना नागपूर-संघचालक श्री. बाबासाहेब घटाटे हेहि सहकुटुंब बरोबर होते. तेव्हां त्यांनीं ‘ दुसऱ्या वर्गाने प्रवास करू या, ’ असा प. पू. डॉक्टरांना नागपूरला खूप आग्रह करून पाहिला. पण त्यांनीं त्याला नकार दिला. त्या वेळीं ते म्हणाले कीं, “ इतकें काम कुठे वाढलें आहे ? अजून फारसा

प्रवास नाहीं करावा लागत!" अर्थात् त्यांच्याबरोबर जाण्याचा सुयोग लाभावा म्हणून शेवटीं घटाटे यांनीं सर्वांसह तिसऱ्या वर्गानें प्रवास केला, हें सांगावयास नकोच.

डॉक्टरांच्या जीवनाचा पैलतीर आतां त्यांच्या दृष्टिपथांत येऊं लागला होता व आपल्यानंतर संघटनेंतील प्रमुख कार्यकर्त्यांनीं कसा व्यवहार करावा, वगैरे गोष्टींचा ऊहापोह ते त्यांच्याकडे येणाऱ्या निवडक कार्यकर्त्यांजवळ मोठ्या कल्पकतेनें करूं लागले. कधीं बैठकींत ते सहज प्रश्न टाकीत कीं, "श्रीहनुमान व भरत यांतील कोणाची भक्ति आदर्श वाटते?" कोणी हनुमंताची भक्ति अत्युत्तम म्हणून सांगितलें, कीं ते हंसत म्हणत, "छे! छे! तो तर प्रभु रामचंद्राच्या दुसऱ्या रूपाला मानायला तयार नाहीं! त्याला डोळ्यापुढें ठेवून तुम्ही कदाचित् उद्यां 'आम्ही दुसरा सरसंघचालक ओळखत नाहीं' असें म्हणाल!" यांतील आशय अर्थातच कार्यकर्त्यांच्या तेव्हांच ध्यानांत येई. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत निरनिराळ्या लोकांनीं राष्ट्रोत्थानाचीं सुरू केलेलीं कार्यें त्या लोकांच्यामागून किती प्रमाणांत टिकलीं? व टिकलीं नसल्यास तीं कां टिकलीं नाहींत? असे प्रश्न उपस्थित करून कार्यकर्त्यांना आपल्या संघटनेच्या सातत्यासाठीं व अखंड परंपरेसाठीं कोणत्या स्वरूपाची निष्ठा व अनुशासन यांची जोपासना केली पाहिजे, हें ध्यानीं आणून देत. १९३९ च्या शेवटीं शेवटीं तर नागपुरांतील तरुण कार्यकर्त्यांपैकीं दोघातिघांना रोज आपल्या घरीं जेवावयास बोलावून, त्यांनीं संघटनेच्या भविष्यकालीन प्रगतीसंबंधीं मनमोकळें बोलणें केलें होतें. त्या बोलण्यांत श्रीगुरुजी, डॉ. परांजपे, बाबासाहेब आपटे, आप्पाजी जोशी ही मंडळी कशी वागतात व कशी बोलतात, याचा कानोसा घेऊन ते सहजतेनें प्रश्न करीत, "मी चार-पांच महिने आजारी पडलों तर यांपैकीं माझें काम कोणाला सांगावें?" अर्थात् या सूचक प्रश्नांतील खोच कांहीं कार्यकर्त्यांच्या लक्षांत येई व डॉक्टर कांहींसा निरवानिरवीचा विचार करण्याइतके थकले आहेत, ह्याची जाणीव होऊन ते दुःखी होत!

युद्धाच्या ज्वाला पसरत होत्या आणि इतर संस्थांपेक्षां राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या हालचाली व कार्य यांवर सरकारची आधींच असलेली वक्रदृष्टि जरा करडी होणें स्वाभाविक होतें. सर्व प्रांतांतून गणवेषधारी स्वयंसेवकांचे शिस्तबद्ध कार्यक्रम ही सरकारला सलणारीच गोष्ट होती. साधारणपणें डॉक्टरांचीं पत्रें हीं नेहमींच सरकारकडून वाटेंत अडविलीं जात व त्यांतील गोष्टींची नीट पाहणी व छाननी झाल्यावरच तीं पत्रें डॉक्टरांच्या हातीं पडत. त्या काळांत गणवेषांत वापरावयाचे काळे लांब बूट हे नागपूर येथें स्वस्तांत आणि मोठ्या प्रमाणांत बनवून प्रांतोप्रांतींच्या स्वयंसेवकांना पुरविले जात. त्यासाठीं डॉक्टरांना येणाऱ्या पत्रांतून अशा बुटांचीं ठिकठिकाणचीं मापेंहि बरींच येत असत. युद्धपरिस्थितीमुळें आपलीं ठिकठिकाणचीं पत्रें सरकारकडून वाटमारी होऊन फोडलीं जातात,

तेव्हा अधिक दक्षता घेतली पाहिजे, असा विषय एकाने डॉक्टरांजवळ काढला तेव्हा स्वयंसेवकाना, लेखनांत किती संयम ठेवला पाहिजे याची जाणीव आहे, असे सांगून डॉक्टर म्हणाले, " माझीं पत्रे फोडून सरकारला काय मिळणार ? नाहीं म्हणायला ' जोडे ' मात्र मिळतील ! "

संघाला एक मोठे कार्यालय पाहिजे, असा आग्रह केव्हा केव्हा डॉक्टरांना स्वयंसेवकांकडून केला जाई. त्या काळांतील ती एक संघटनेची आवश्यकताच होती. पण इंग्रज राज्यकर्ते युध्यमान असताना ते संघासारख्या संघटनेवर केव्हाहि गंडांतर आणू शकतील, याची डॉक्टराना कल्पना होती. अशा वेळी राजसत्तेला पुरून उरेल व वेळप्रसंगीं परकी राजसत्ता युद्धाच्या रगाड्यांत खिळखिळी झाली, तर तिचे निर्मूलन वा समूळ उच्चाटन करतां येईल, असे आपल्या संघटनेचे अत्यंत प्रभावी व अत्युग्र स्वरूप आपण निर्माण करण्यावर भर दिला पाहिजे, असा विचार सूचित करण्यासाठी ते म्हणत, " कार्य वाढवा, नाही तर तुम्ही टोलेजग कार्यालय बांधाल नि त्यात इंग्रज आपली कचेरी थाटून बसतील ! "

डॉक्टरांच्या कल्पनेप्रमाणे, संघटनेसंबंधी सरकारी सेवकवर्गात भीतीचें वातावरण निर्माण करण्यासाठी तुरळक तुरळक प्रयत्न सुरू झाल्याचे नोव्हेंबरमध्ये ध्यानीं येऊं लागले. मुंबई प्रांतिक सरकारनें, ' दुय्यम शाळातील कोणते शिक्षक संघात भाग घेतात, ' अशी चौकशी करणारें परिपत्रक सर्व शाळाकडे पाठवून दिले. यामागोमाग संघाला जखडून टाकण्यासाठीं सरकार आणखीहि काही पवित्रे घेईल, अशी शक्यता दिसूं लागली. संघाशी संबंध असणाऱ्या सरकारी नोकराना उपद्रव पोहोचणार, या भीतीने कांही व्यक्ति डॉक्टराना येऊन भेटत, पण स्वातंत्र्यप्राप्ति होईपर्यंत अनेक आपत्तींना तोड देत देतच धैर्याने पुढे जावे लागते, याची सम्यक् कल्पना असणाऱ्या डॉक्टरांनी त्याना सागावें, " आपल्या राष्ट्राच्या दृष्टीने आपले धोतर हिरावले गेलें असता उरलेले जानवे छिनावले जाणार म्हणून निराळी चिन्ता कसली करता ? जी परिस्थिति येईल तिला तोड देऊन त्यातूनच मार्ग काढला पाहिजे ! "

डॉक्टरांना या काळात मुंबई, सुरत, हुबळी, कराची व उत्तर हिंदुस्थानातील कांही ठिकाणांहून संघाच्या मराठी प्रार्थनेला व प्रतिज्ञेला विरोध होत आहे तरी लवकर पालट करा, अशा सूचना पत्रातून येऊं लागल्या होत्या. वास्तविक सिंदीच्या बैठकीतच याचा विचार होऊन त्या दिशेने डॉक्टरानी संस्कृत आज्ञा व प्रार्थना बनवून घेण्याचा प्रयत्न सुरू केला होता. त्यासाठीं त्यांनीं प्रार्थनेचा आशय गद्यात लिहून काढून तो ठिकठिकाणच्या संस्कृत पंडितांकडे पद्यात रूपांतरित करण्यासाठी पाठविला व कांहीं पद्य-प्रार्थना त्याच्या हातांत येऊन पडल्या. अशा निरनिराळ्या प्रार्थनातून उत्तम व अचूक शब्दयोजना असलेली व नेमका अर्थ व्यक्त करणारी प्रार्थना निवडण्यास अर्थातच १९४०चा मार्च-एप्रिल उजाडला. तोवर अशी कुरकूर

सुरूच होती. वृत्तपत्रांतूनहि त्याचे सादपडसाद उमटले असल्यास नवल नव्हतें. संयुक्त प्रान्तांतील एका ‘ संघाच्या चाहत्या ’नें ‘महाराष्ट्रां’तून अनावृत पत्र लिहून कळविलें होतें कीं, “ ......भाषा समजत नसल्यानें उच्चार करतां येत नाहीं, अतएव अपेक्षित शांतता, स्थैर्य नि गांभीर्य नष्ट होतें. याव्यतिरिक्त मराठी प्रार्थना समाविष्ट केल्यानें संघांत नवीनच प्रवेश केलेले लोक संघास महाराष्ट्रीयांचा समजून उदासीन होऊं लागतात......” अशीं पत्रें वाचत असतां डॉक्टरांना सार्वत्रिक भासणारी अडचण ध्यानीं येई, पण इतर भाषांसंबंधीं दिसून येणारी इतकी असहिष्णुता त्यांना समाजाच्या आत्मविस्मृतीचें आणि स्वाभिमानशून्यतेचें द्योतक वाटे. हा वृत्तींतील पालट घडवून, देशांतील विविध भाषा या भगिनींच्या नात्यानें परस्परांकडून सन्मानिल्या जाव्यात, अशी स्थिति निर्माण होण्यास बरेच संस्कार करावे लागतील असें त्यांना वाटे.

युद्धपरिस्थितीचा लाभ घेऊन भारतांत सार्वत्रिक क्रांतीचा उठाव करतां यावा, यासाठीं कांहीं जणांच्या हालचाली याच काळांत सुरू झाल्या होत्या. कलकत्त्यांत विद्यार्थी म्हणून राहत असतांना डॉक्टरांनीं श्री. पुलिनबिहारी दासांच्या ज्या ‘ अनुशीलन समितीं ’त प्रवेश करून प्रयत्न केले होते, त्याच समितींतील एक त्यागी व अग्रगण्य क्रांतिकारक श्री. त्रैलोक्यनाथ चक्रवर्ती हे याच हेतूनें प्रयत्नाला लागले. देशगौरव श्री. सुभाषचंद्र बोस यांच्याशीं विचारविनिमय करून पूर्वीच्या क्रांतिकारकांना अशा संभाव्य उठावाच्या दिशेनें चेतावणी देण्यासाठीं ते १९४०-च्या आरंभीं संचारार्थ निघाले. अकबरशहा, लाहोरचे इंद्रचंद्र नारंग व बाबा रूठासिंह, अमृतसरचे चौधरी बुग्गामल, हमीरपूर जिल्ह्यांतील राठ गांवचे पंडित परमानंद अशा अनुभवी क्रांतिकारकांच्या भेटी घेत घेत त्रैलोक्यनाथ नागपूरला आले व त्यांनीं आपले जुने सहकारी डॉक्टर हेडगेवार यांची भेट घेतली. डॉक्टर कलकत्त्याला असतांना भूमिगत स्थितींत वावरणारे त्रैलोक्यनाथ यांनीं एक-दोन वेळां त्यांच्या वसतिगृहाचाहि आश्रय घेतलेला होता. त्यानंतर पंचवीस-सव्वीस वर्षें लोटल्यावर त्या दोघांची ही भेट होत होती. जेव्हां एक दिवस अचानकपणें चक्रवर्ती डॉक्टरांच्या घरीं दत्त म्हणून उभे राहिले, तेव्हां डॉक्टरांनीं एकदम त्यांना ओळखलें नाहीं. तेव्हां चक्रवर्तींनीं प्रश्न केला कीं, “ कालिचरणदा हें नांव आठवतं कां ? ” नि या प्रश्नाचें उत्तर आपल्या मित्राला कडकडून मिठी मारूनच डॉक्टरां-कडून दिलें गेलें !

या त्यांच्या भेटींत देशपरिस्थितीचा विचार झाला व डॉक्टरांनीं आपल्या संघटनेसह भावी क्रांतीच्या उठावांत उडी घेणें नितांत आवश्यक आहे, असें चक्रवर्तींनीं आग्रहानें सांगितलें. संघाजवळ त्या वेळीं असलेली शक्ति अपुरी आहे, याची डॉक्टरांना पूर्ण व वास्तव जाणीव होती. त्यामुळें डॉक्टरांकडून त्यांना घसघशीत होकार मिळणें अवघड होतें. विशेषतः आपल्या संघटनेंत शिशु व बाल

याचाच भरणा अधिक असल्यानें अशा उठावासंबंधीं डॉक्टराना वाटणारी साशंकता त्यानी मित्राजवळ व्यक्त केली, तेव्हां " किमान पक्षी कांही निवडक सहकाऱ्यांना तरी उठावणीच्या दृष्टीने सिद्ध ठेवून एकदा त्यांच्यासह आपण क्रातीचे शिग फुंकलेत की, बाकीचे असंख्य अनुयायी आपण होऊन त्यांत समीलित होतील, " अशी अपेक्षा जाता जातां चक्रवर्तीनी व्यक्त केली. डॉक्टराना सर्व परिस्थिति स्पष्ट दिसत होती व संधि आली असूनहि तिचा लाभ घेण्याइतकी आज्ञाकित व अनुशासित शक्ति संघटनेंत नाहीं व संघटनेच्या उठावाला साथ देणारी जनतेतील जागृतिहि अपुरी आहे, या गोष्टीने डॉक्टराच्या मनात कोलाहल माजे. त्यात स्वतःचे शरीर रोगजर्जर झाल्याने, कळते ते वळविण्यासाठी त्राण अंगात नाही, या जाणिवेने तर त्याच्या मनोवेदना असंख्य पटीने वाढत.

डॉक्टराची प्रकृति दिवसेदिवस खालावत असता, त्यानीं आतां कोठे तरी विश्रांति घेण्यासाठी जावे, असा आग्रह सारखा सुरू होता व डॉक्टर ' पाहूं ! ' असे म्हणून तो विषय टाळीत होते. याच काळात डॉक्टरांचे स्नेही व 'महाराष्ट्रा'चे संपादक श्री. गोपाळराव ओगले हे अर्धांगानें आजारी पडले. तेव्हा डॉ. राजेद्र-प्रसादानीं त्यांना कळविले की, ' आपण राजगीरला अवश्य जा. ' त्याप्रमाणे नोव्हेंबरमध्ये श्री. ओगले तिकडे गेले. राजगीरच्या गरम पाण्याच्या झऱ्यात पाऊण महिना सकाळ–सध्याकाळ स्नान आणि खाण्यापिण्यासाठींहि त्याच ' सप्तधारा ' झऱ्याचें पाणी त्यानीं वापरलें व त्याना चागलाच गुण वाटू लागला. त्याची पचनक्रिया सुधारली व अर्धांगवायूच्या विकाराची तीव्रताहि मद झाली.

असा अनुभव घेऊन श्री. गोपाळराव परत आल्यावर त्यानीहि डॉक्टराच्या मागे तिकडे जाण्याचा आग्रह धरला व शेवटी होय-नाही होता होता, डॉक्टरानीं तिकडे जाण्यास होकार दिला. इतकी निश्चिति होईपर्यंत १९४० चा जानेवारी अर्धा निघून गेला. त्या वेळी बिहार प्रातात नागपूरचे श्री. बापूराव दिवाकर व श्री. नरहरपंत पारखी हे कार्यवाढीसाठीं गेलेले होते. त्याच्याशी पत्रव्यवहार होऊन डॉक्टराची राजगीरला सर्व प्रकारची व्यवस्था व्हावी म्हणून खटपट सुरू झाली. डॉक्टरानीं आपणाबरोबर श्रीगुरुजी व श्री. आप्पाजी जोशी यानी राजगीरला यावे, अशी इच्छा व्यक्त केली. त्याप्रमाणे श्री. आप्पाजी जोशी यांनी सर्व सिद्धता करून दि. ३० जानेवारीला नागपूरला येऊन डॉक्टराची गाठ घेतली. वाढत्या कार्यव्यापामुळे गुरुजीना इतकी सवड काढणे अशक्य झाल्याने ते तिकडे जाऊं शकले नाहींत.

बुधवार दि. ३१ जानेवारीला प. पू. डॉक्टर, श्री. आप्पाजी जोशी, बाबा इंदूरकर, तात्या तेलंग व बाबाजी कल्याणी अशा मंडळींनीं राजगीरसाठीं नागपूर सोडलें. दुसऱ्या दिवशीं रात्रीं ती सर्व मंडळी गयेला जाऊन पोंचली. या प्रवासांत भंडारा, गोंदिया, जबलपूर, चौकी, मोगलसराई व गया या सर्व स्थानकांवर

ठिकठिकाणच्या स्वयंसेवकांनीं येऊन प. पू. डॉक्टरांचें स्वागत केलें होतें. नागपुराहून निघतांना राजगीरसाठीं म्हणून फराळाचें बरेंचसें साहित्य त्यांच्याबरोबर देण्यांत आलें होतें. पण वाटेंतच भेटावयास येणाऱ्यांच्या हातावर लाडू, चिवडा आदि पदार्थ मोठ्या प्रेमानें ठेवून डॉक्टरांनीं तें ओझें हलकें करून टाकलें! गया येथें त्यांचें वास्तव्य कुमार कृष्णवल्लभ प्रसाद नारायणसिंह उपाख्य बबुआजी यांच्या बंगल्यावर होतें. दि. २ फेब्रुवारीला तेथील शाखेवर डॉक्टरांचें भाषण झालें. त्यानंतर ते सर्वांसह पाटणा येथें गेले. तेथील तीन दिवसांच्या वास्तव्यांत त्यांना मानवंदना देण्याचा कार्यक्रम झाला. तसेंच 'भाषण व एका नवीन संघ-शाखेचें उद्घाटन' असे कार्यक्रमहि पार पडले. मानवंदना देण्याच्या दिवशीं अचानक पाऊस पडल्यानें डॉक्टरांसह सर्व जण भिजून गेले. पण तशाहि स्थितींत प्रकृतीकडे न बघतां, डॉक्टर कार्यक्रम पार पडेपर्यंत सहजतेनें वावरत होते. दि. ६ ला सायंकाळीं गया-संघचालक श्री. बबुआजी यांच्या मोटारीनें ही मंडळी राजगीर येथें जाऊन पोहोंचली. तत्पूर्वीं त्यांनीं बुद्धगया, विष्णुपद, गयागदाधर, गायत्री, शंकराचार्य, फल्गु वगैरे धार्मिक व सांस्कृतिक स्थानांचें दर्शन घेतलें.

पाटणा येथें असतांना श्री. कृष्णदेव प्रसाद यांच्याजवळ सहज बोलण्याच्या ओघांत डॉक्टरांनीं 'राष्ट्रीय कोण?' याविषयीं मोठा मौलिक विचार मांडला होता. ते म्हणाले, "राष्ट्रीय व अराष्ट्रीय हें एखाद्याची वृत्ति भक्तिमय आहे कीं भोगवादी आहे हें पाहूनच ठरविलें पाहिजे." कवि इक्बाल हा हिंदुस्थानचें वर्णन करतांना 'हम बुलबुलें हैं उसकी, वह गुलिस्ताँ हमारा!' म्हणजे, 'तो आमचा बगीचा आहे नि आम्ही त्यांतील लहान लहान बुलबुल पक्षी आहोंत,' असें म्हणतो. या देशाला 'भारतमाता' मानणाऱ्या खऱ्या देशभक्तांच्या म्हणजे हिंदूंच्या मुखांतून अशी भाषा कधींच उमटणार नाहीं." इतकें सांगून झाल्यावर थोडें थांबून प. पू. डॉक्टर म्हणाले, "मात्र हे भोगवादी अराष्ट्रीय लोक देशाच्या हिताकडे लक्ष देत नाहींत म्हणून त्यांना दोष देऊन चालणार नाहीं. घराची भिंत धडकीपडकी कशीहि असली तरी त्याची चिंता पाहुणा करीत नाहीं, म्हणून त्याची निंदा करतां येणार नाहीं. कारण तो बोलूनचालून भोग घेण्या-साठींच आलेला असतो. तेव्हां घराकडे लक्ष देणें हें त्या घराच्या धन्याचेंच कर्तव्य असतें. यासाठीं हिंदूंनीं सुसंघटित होऊन आपलें हें कर्तव्य पार पाडण्यास समर्थ व्हावें, असें संघ सांगतो." याच वास्तव्यांत संघांत राष्ट्रीय दृष्टीनें हिंदूंचीं अन्तःकरणें घडविलीं जातात, असें सांगत असतांना ते म्हणाले होते कीं, "In our country there are so many colleges of arts, but there are no colleges of heart. मेरी आकांक्षा है कि संघ college of heart होगा!" संघ राष्ट्रीय वृत्ति घडविणारें एक महाविद्यालय आहे, असा विचार ते अनेकदां व्यक्त करीत असत. अस्तु.

राजगीर हे स्थान पाटण्यापासून साधारण बासष्ट मैल पडते. मोटार व लोहमार्ग असे दोन्ही मार्ग उपलब्ध असून कोणत्याहि रस्त्यानें गेले तरी अंतर सारखेच पडते. प्रत्यक्ष राजगीरचा इतिहास हा जरासंधाच्या काळाइतका पुरातन आहे. सध्यांचा राजगीर हा गाव साधारण तीन हजार वस्तीचा असून अजातशत्रूच्या काळातील ' राजधानी राजगीर 'चे अवशेष या गावाच्या दक्षिण अंगास मोठ्या प्रमाणात पसरलेले दिसतात. या अवशेषाच्या दक्षिणेस विपुलाचल, वैभारगिरि, रत्नाचल, उदयगिरि नि सोनगिरि अशा पाच डोंगराची वर्तुळाकृति राग आहे. या पहाडी भागातच जरासंधाची राजधानी वसलेली होती व या डोंगरातच भगवान् बुद्धदेवानींहि काही काळ तपश्चर्या केली होती. ज्या स्थानीं ते ध्यानस्थ बसत, ते ' गृध्रकूट ' शिखर अजूनहि दाखवितात.

प. पू. डॉक्टरासाठी राजगीरमधील श्री. रामलाल जैन यांचे घर भाड्याने घेण्यात आले होते. या बैठ्या तिघई घरात चार चांगल्या खोल्या आणि एक २५' × १२' अशी प्रशस्त बैठकीची खोली होती. समोरील पडवीचा दर्शनी भाग जोडीजोडीने उभ्या असलेल्या वर्तुळाकार खांबानी मोठा उठून दिसे. घरावरील गच्ची पण मोठी प्रशस्त होती. येथे आल्यावर पहाटे ४॥ वाजता उठून डॉक्टर व आप्पाजी टमटमीने ऊन पाण्याच्या झऱ्यावर स्नानासाठीं जात. इतर स्वयंसेवक त्याच्यापाठोपाठ पायींच जात असत. टमटम हे टांग्यासारखेच घोड्याने ओढले जाणारे एक वाहन त्या प्रांतात आहे. हीं उन्हाळीं डॉक्टराच्या निवासापासून साधारण एक मैलाच्या अंतरावर असूनहि टमटममधून होणाऱ्या एवढ्या प्रवासाचा त्रासहि डॉक्टराना काहीं वेळा जाणवत असे.

वैभारगिरीच्या पायथ्यापासून ३०-३५ फूट उंचीवर चढले कीं त्या ठिकाणीं उत्तम बाधीव असे ऊन पाण्याचे सात झरे, वाघ-सिंहासारख्या आकाराच्या दगडी मुखांतून सात-आठ फुटाच्या अंतराने अखंड वाहताना दिसतात. यातील दोन उत्तराभिमुख भितीतून पडत असून, बाकीचे पाच पूर्वाभिमुख असलेल्या कठड्यातून पुढे आलेले आहेत. हा सप्तर्षिकुंडाचा भाग साधारण चाळीस पावले लांब व सात पावले रुंद आहे. या भागाच्या पूर्वांगास सोळा पायऱ्या उतरून गेलें की पंधरा चौरस फुटाचे व चार-पांच फूट खोलीचे अति सुंदर कुंड लागते. तेथे धार पडत नाहीं. कारण त्याचा झरा जमिनींतून कारंजासारखा वर आलेला आहे.

या झऱ्याचे व कुंडाचें पाणी अंगाला अत्यंत आल्हाददायक वाटते व त्याला गंधकाचा वा अन्य कशाचाहि वास नसल्याने स्नान करता करतां ओंजळीने ऊन पाणी प्याले तरी त्रास होत नाही. विशेषतः थंडीचे दिवस हे अशा उन्हाळ्यातून स्नान करण्यास अत्यंत अनुकूल असतात. या पाण्याचा प्रथम स्पर्श होतांच अंगाला प्रथम थोडा चटका, बसतो व थोड्याच अवकाशात तेथून हलं

नये, इतकी प्रसन्नता वाटूं लागते. या पाण्यांत आमवात, संधिवात व इतर वेदना कमी करण्याचे व पचनशक्ति वाढविण्याचे गुण असल्यानें अगदीं पहाटेपासून रात्रीपर्यंत अशा रोगपीडित लोकांची या झऱ्यांपाशीं दाटी झालेली असते.

या झऱ्यांपैकीं तिसरा झरा हा मोठा व त्याखालीं नीट बसून आरामशीर स्नान करण्याजोगा असल्यानें ज्याची त्याची दृष्टि तेथें बसावयास मिळावें, अशी स्वाभाविकपणेंच असते. आपण स्नान करीत बसावें व इतरांनीं जवळ ताटकळत वाट पाहावी, ही गोष्ट डॉक्टरांच्या मनाला खटकूं लागली. त्यामुळें निःसंकोचपणें स्नान करतां यावें म्हणून कोंबडा आरवण्यापूर्वींच ते तेथें पोहोंचण्याची दक्षता घेत व वेगानें पडणाऱ्या ऊन पाण्याच्या झोताखालीं आपली ठणकणारी पाठ चांगली शेकीत. त्या झोताखालीं दहा-पंधरा मिनिटें बसलें कीं पाठीचें आपोआप मर्दन होई व त्यांतून सर्वांगांतील रुधिराभिसरणाला चालना मिळून तरतरी वाटे. केव्हां केव्हां तेथें पोहोंचण्यास उशीर होई. अशा वेळीं थोड्याच दिवसांच्या परिचयानेंहि डॉक्टरांचा तेथें नेहमीं येणाऱ्यांवर जो प्रभाव पडला होता, त्यामुळें ते त्यांना मनसोक्त स्नान करण्यासाठीं आपण होऊन जागा करून देऊं लागले. त्यांत बिहारमधील एक जमीनदार आपल्या आरक्षकांच्या पहाऱ्यांत स्नान करीत असत. पण डॉक्टर आले आहेत असें कळतांच ते बाजूला होऊन त्यांना प्रथम जागा करून देत. स्नान करतांनाहि कांहीं जणांवर डॉक्टरांनीं आपल्या सौजन्याचा इतका प्रभाव पाडला कीं, त्यांतील कांहींनीं डॉक्टरांना आपल्या निवासावर नेऊन त्यांचें आतिथ्य करण्यांत धन्यता मानली.

यथेच्छ स्नान झाल्यावर ब्रह्मकुंडाच्या उत्तरांगास असलेल्या श्रीलक्ष्मी-नारायणाच्या मंदिरांत आप्पाजी विष्णुसहस्रनाम वगैरे ग्रंथांचें पठण करीत. त्या वेळीं शेजारीं बसून डॉक्टर ते शांतपणें ऐकत असत. कुंडावरून परत येण्यास ७–८ वाजत व त्यानंतर थोडी विश्रांति घेऊन झाली कीं जेवण होई. पहिले कांहीं दिवस त्यांच्याबरोबर गेलेले स्वयंसेवक स्वयंपाक करीत. पण पुढें एक आचारी उपलब्ध झाला. दुपारीं जेवणानंतर डॉक्टर साधारण ३ वाजेपर्यंत विश्रांति घेण्याचा प्रयत्न करीत व त्यानंतर चहा झाला कीं रात्रीपर्यंत गप्पागोष्टी व पत्रव्यवहार चाले.

या राजगीरच्या वास्तव्यांत डॉक्टर पडल्या पडल्या आपल्या पूर्वायुष्यांतील गोष्टी गप्पांच्या ओघांत सांगत असत. कधीं कधीं 'दासबोधां'तील एखादी ओवी सांगून त्यांतील व्यावहारिक मर्महि ते विशद करीत. लक्षावधि लोकांची सुसंबद्ध अशी बांधणी करावयाला, श्रीसमर्थ रामदासांनीं ग्रथित केलेलीं संघटनेचीं सूत्रेंच अनेक जणांनीं व्यवहारांत आणलीं पाहिजेत, असें त्यांच्या बोलण्यांत येई. तेथें एकदां गप्पांच्या ओघांत त्यांना प्रश्न विचारण्यांत आला कीं, "क्रांतिकारक चळवळींत आपण अनेक उलाढाली केल्यात; पण त्याचा परिस्फोट होऊन सरकारी गुप्तचरांच्या जाळ्यांत अडकण्याचा आपणांवर केव्हांच प्रसंग आला नाहीं हें कसें

काय ? " त्यावर नांव पालटणें, वेषांतर करणें वगैरे गोष्टींच्या जोडीने त्यानी त्या काळांत घेतलेल्या दक्षतेची कल्पना दिली. ते म्हणाले कीं, " मीं केव्हांहि या संबंधांत पत्र म्हणून लिहिलें नाही. कांहीं काम निघाले कीं स्वतः भेटून यावयाचें किंवा मनुष्य पाठवून एखादा निरोप कळवावयाचा. संबंधित लोकाचे पत्तेहि मीं टिपून ठेवले नव्हते; तर ते पत्ते मला मुखोद्गत असत. " एवढे सागून झाल्यावर डॉक्टर थोडा वेळ थाबले व मग त्यांनीं पंजाब, उत्तर प्रदेश व बंगाल-मधील पाच-पंचवीस मित्रांच्या पत्त्याची एक मालिका घडाघड म्हणून दाखविली !

डॉक्टर केव्हां केव्हां अजातशत्रूच्या किल्ल्याकडे सायंकाळीं फिरावयास जात. एकदां जरासंधाच्या राजधानीचा म्हणून ओळखला जाणारा भाग पाहण्यासाठी ते गेले असतां पूर्वीच्या आखाड्याच्या ठिकाणीं मुसलमानानी पीर उभारून आपले प्रस्थ मांडलेले पाहून डॉक्टराना अत्यंत दुःख झाले. आपल्या झोपाळू वृत्तीने क्षणाक्षणाला होणारें आक्रमण हे शक्य तितक्या लवकर थाबविले पाहिजे, असे त्यांच्या बोलण्यांत येई. ते तेथें असतानाच बुद्धपंथीय व वैदिक अशा दोघानाहि पूज्य वाटणाऱ्या कांहीं पवित्र कुंडांवर आपली वहिवाट लादण्याचा प्रयत्न कांहीं मुसलमानांनीं दंडेलीनें केला होता. पण त्या दंडेलीचा परिहार व बीमोड करण्या-साठीं जपानी बुद्ध भिक्षूला खटपट करावी लागली, याचे डॉक्टराना नवल वाटले ! धडधडीत आपल्या डोळ्यांदेखत होणारे हे आघात कायमचे बंद पाडण्याचा विचार आमच्या समाजांत केव्हा बळावणार, एवढी एकच चिंता अशा गोष्टी ऐकताना त्याच्या मुखावर स्पष्टपणाने उमटे.

कांहीं दिवस सायंकाळीं देखील ते स्नानासाठी उन्हाळ्यावर जात व तेथून परत आल्यावर दुग्धाहार करीत. त्याना चालू असलेल्या औषधाच्या जोडीने त्यांनीं ओव्हल्टाईन वा हार्लिक्स घेणे हें पचनाच्या दृष्टीने युक्त असल्याचे सांगण्यांत आलें होते. पण शक्य तोंवर परदेशीचा विटाळ नको म्हणून त्यानी ती गोष्ट टाळली व कांहीं दिवस शेळीचे दूध पिण्याचा क्रम चालू ठेवला.

चालू परिस्थितींत संघाचे काम किती वाढलें तर स्वातंत्र्यासाठीं प्रत्यक्ष चढाई करतां येईल, यासंबंधींचे विचार त्यांच्या मनांत सारखे चालू असत. अशक्ततेमुळें व या विचारांच्या तीव्रतेने त्यांना गाढ झोप लागणें अशक्य होतें. तेथील वास्तव्यांत एकदा दुपारच्या जेवणानंतर निजले असता ते झोपेतच एकदम ओरडले, " अरेरे ! हें पहा १९४० साल चालले आहे ! आपण अजून काही करूं शकलो नाहीं. आज आपण परतंत्र आहोत पण आम्ही देश स्वतत्र करणारच ! " अशा आशयाचीं तुटक वाक्यें बोलून होतात तोंच शेजारी निजलेल्या आप्पाजींनीं ' तुम्हांला कांहीं स्वप्न पडलेले दिसतें, जागे झालांत का ? " असे विचारीत सावध केलें. मनीं असावे ते स्वप्नीं दिसावे, असाच हा प्रकार होता. त्याच्या मनाची स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं होणारी तगमगच अशी प्रकट झाली होती यांत शंका नाहीं.

प. पू. डॉक्टर तेथें गेल्यापासून त्यांच्या नांवावर येणाऱ्या पत्रांची संख्या त्या एवढ्याशा गांवाच्या मानानें डोळ्यांत भरणारीच होती. कांहीं दिवस 'डॉ. हेडगेवारांचीं पत्रें रोज इतकीं येतात, तर हे कोण आहेत?' अशी जिज्ञासा निर्माण होऊन, कांहीं जणांनीं त्यांची भेट घेतली व 'जी कांहीं आपणांला उणीव वा अडचण भासेल ती मोकळेपणानें आम्हांला सांगा,' अशी त्यांनीं विनंति केली. अशा जिज्ञासेंतूनच तेथील 'बडी संगत' चे तरुण, बुद्धिमान् व वेदांती महन्त श्रीहंसदेवमुनि यांचा डॉक्टरांशीं परिचय झाला. कुंडावर स्नानाला रोज जात असल्यानें तेथें उपाध्येपण करणाऱ्या पंडेवर्गाशींहि डॉक्टरांचा परिचय होण्यास वेळ लागला नाहीं. अशा झालेल्या परिचयांतून पुढेंमागें शाखा उभी करावयाचा विचार अर्थातच होता. ज्या परिचित ग्रामस्थांचें डॉक्टरांकडे जाणें-येणें सुरू झालें, त्यांच्याशीं डॉक्टर हे संघासंबंधीं हलके हलके बोलूं लागले. रात्रीं जेवण झाल्यावर त्यांच्या निवासांत स्वयंपाकासाठीं येणाऱ्या आचाऱ्याशींहि ते समाजस्थितीविषयीं व एकतेच्या आवश्यकतेविषयीं त्याला समजेल इतक्या सुलभतेनें बोलण्यांत केव्हां केव्हां गढलेले दिसत.

या काळांतच गांवांत वसंत पंचमीचा सण साजरा करण्यासाठीं शालेय विद्यार्थ्यांची खटपट सुरू झाली आणि कांहीं विद्यार्थी 'वर्गणी' मागण्यासाठीं डॉक्टरांच्या निवासावर आले. त्या वेळीं डॉक्टर नुकतेच कुंडावरून आंघोळ करून परतले होते व थोडा थकवा आल्यानें तक्क्याला टेकून विश्रांतीसाठीं नुकतेच कलंडले होते. विद्यार्थ्यांचा घोळका रस्त्यावर दिसतांच तात्या तेलंगांनीं पुढें होऊन 'मालक झोपले आहेत, तेव्हां पुन्हा या!' असें सांगून त्यांची बाहेरच्या बाहेरच बोळवण केली. डॉक्टर पांच-दहा मिनिटांतच जागे झाले आणि त्यांनीं, 'कोणी आतां माझ्याकडे येऊन गेलें काय?' अशी पृच्छा केली. तेव्हां तेलंगांनीं झालेला प्रकार सांगितला. तो ऐकून डॉक्टर जरासे रागावलेच. "आपण अशा अनोळख्या ठिकाणीं आलों असतां कांहीं निमित्तानें आपल्याकडे आपण होऊन आलेल्या विद्यार्थ्यांचा परिचय करून घेण्याऐवजीं, त्यांना असें विन्मुख पाठविणें योग्य नव्हतें. जा! अजून ते जवळपासच असतील. तेव्हां त्यांना बोलावून आणा!" असें डॉक्टरांनीं सांगितलें.

लवकरच ते सर्व तरुण विद्यार्थी प. पू. डॉक्टरांच्या बैठकींत येऊन बसलेले दिसले. त्यांनीं त्या सर्वांचा नीट परिचय करून घेतला व तो परिचय करून घेतां घेतां ते विद्यार्थी सायंकाळीं काय करतात, कोणते खेळ खेळतात, विद्यार्थिवर्गांत प्रिय असे शिक्षक कोण आहेत, वगैरे बऱ्याच गोष्टी त्यांनीं सहज माहीत करून घेतल्या. डॉक्टरांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्या विद्यार्थ्यांना एक रुपया वर्गणी देण्यासहि ते विसरले नाहींत. त्यांनीं करून घेतलेल्या ह्या परिचयांतून राजगीरला एक लहानशी संघशाखा पुढें उभी राहिली.

राजगीरला गेल्यावर अधूनमधून त्यांचे नागपूरला श्रीगुरुजींच्या नांवाने पत्र येई. त्यांतून प्रकृतींत विशेषशी सुधारणा झाली नाहीं, असाच सूर उमटलेला दिसतो. दि. १७ फेब्रुवारीला ते लिहितात की, " ......सर्वांचे प्रकृतीवर चांगला परिणाम दिसून येत आहे. माझे प्रकृतीचे संबंधाने मात्र मला आज निश्चितपणे काहीच सागतां येत नाहीं. सर्व व्यवस्था उत्तम आहे......" डॉक्टरांबरोबर गेलेले श्री. बाबा इंदूरकर दि. २३ फेब्रुवारीच्या पत्रात म्हणतात कीं, " ......प. पू. डॉक्टराच्या प्रकृतीवर येथील हवापाण्याचा अजून स्पष्ट दिसण्यासारखा परिणाम दिसत नाही. तसा परिणाम दिसून येण्याला अजून बरेच आठवडे लागतील, असा येथील स्थानिक मडळींचा अंदाज आहे. "

राजगीरला जाऊन एक महिना पूर्ण होण्यापूर्वींच प. पू. डॉक्टराच्या चिंतेत भर घालणारी एक वार्ता येऊन पोहोचली. पंजाब सरकारने त्या प्रांतात सैनिकी पद्धतीच्या सर्व हालचालीना प्रतिबंध करणारी आज्ञा काढली असून त्यामुळे संघाच्या प्रयत्नांना थोडा अडथळा पोचत आहे, असें तिचें स्वरूप होते. त्या आज्ञेत म्हटले होते की, " भारत सुरक्षा निर्बंधाच्या ५८ व्या परिच्छेदांतील पहिल्या पोटनियमाने दिलेल्या अधिकारानुसार पजाबचे प्रांताधिपति अशी आज्ञा काढीत आहेत कीं, पंजाब प्रांताच्या सीमेत कोणत्याहि व्यक्तीने हाती शस्त्र किंवा शस्त्राप्रमाणें वापरतां येण्याजोगें उपकरण ( साधन ) घेऊन किवा निःशस्त्र स्थितीत सैनिकी पद्धतीच्या अशा कोणत्याहि शिक्षणक्रमात, हालचालींत व कवायतींत भाग येऊं नये. " ( "... . In exercise of the powers conferred by sub–rule ( 1 ) of rule 58 of the Defence of India Rules, the Governor of the Punjab is pleased to direct that within the limits of the Province of the Punjab no person shall take part in any exercise movement, evolution or drill of a military nature, with or without arms, or articals capable of being used as arms " )

या आज्ञेचा फटकारा सरकारने अपवाद ठरविलेली बाल्वीर चळवळ सोडून इतर स्वयंसेवक दलांना चांगलाच जाणवेल अशी कल्पना होती. युद्धाच्या भाराखालीं दबून गेलेले परकीय सरकार अशी दंडुकेशाही गाजविणार, याची डॉक्टरांना कल्पना असल्याने त्यानीं कोणत्याहि परिस्थितीला भीक न घालतां, हिंदु समाजांत एकत्वाची जाणीव निर्माण करण्यासाठीं ' किमान एकत्र जमण्यावर ' भर देण्याचा विचार तिकडील कार्यकर्त्यांना कळविला होता. दि. ५ मार्चच्या पत्रांत तिकडील प्रचारकाला ते लिहितात कीं, " मी तूर्त एवढेच सुचवितों कीं, आपण निरनिराळे खेळ व प्रार्थना असे कार्यक्रम चालू ठेवावे. नांव वगैरे बदलण्याची कांहीं आवश्यकता आहे, असें मला वाटत नाहीं. कारण आपल्या नावाचा कुठेंहि व कसल्याहि प्रकारचा संबंध आलेला नाहीं. " अनुकूलता असेल

तरच काम करूं, अशी दुबळी आकांक्षा डॉक्टरांनीं उभ्या कलेल्या कार्यकर्त्यांत दिसून येणें शक्य नव्हतें. उग्र परिस्थितीला पायदळीं तुडवून पुढें जाण्याचें बाळकडूच त्यांनीं दिलें असल्यानें, असा सरकारी निर्बंध येऊनहि संघटनेचें पाऊल पंजाबांत पुढेंच पडल्यावांचून राहिलें नाहीं. हा स्वयंसेवकांच्या कठोर निष्ठेचा, चिकाटीचा व कौशल्याचा प्रभाव होता.

प. पू. डॉक्टर राजगीरला आले त्या वेळीं असा विचार ठरलेला होता कीं तेथें केवळ एक महिना राहून विश्रांति घ्यावी व मग मार्चच्या प्रारंभीं नागपूरचे संघचालक श्रीमंत बाबासाहेब घटाटे यांच्या मुलांच्या मुंजीसाठीं परत यावें. त्यानुसार मार्चच्या प्रारंभीं दि. ३ ला डॉक्टरांनीं बिहार प्रांतांतील संघ-कार्यकर्त्यांची आपल्या निवासस्थानीं बैठक घेतली. त्या दिवशीं या कार्यकर्त्यांच्या उपस्थितींतच राजगीर येथील श्रीचंदजीच्या मंदिरांत, तेथें नुकत्याच सुरू झालेल्या शाखेचें रीतसर उद्घाटन झालें. त्या दिवशींच्या प्रांतिक बैठकींत प. पू. डॉक्टरांनीं नागपूरला परत जाण्याचा विचार बोलून दाखविला. तेव्हां सर्व संघचालकांनीं त्याला विरोध केला. त्यासंबंधीं दि. ६ मार्चच्या पत्रांत डॉक्टर श्री. घटाटे यांना लिहितात कीं, "......सर्व संघचालकांचें मत असें पडलें कीं, मार्च महिन्यांत इकडील थंडी कमी होऊन हवा चांगली राहत असल्यानें आमच्या प्रकृतीला हा महिना चांगला मानवेल. तरी इतक्या दूर आलों असतांना इतक्यांत घाई करून आम्हीं राजगीर सोडूं नये व आणखी एक महिना येथें राहून येथील नैसर्गिक उपचाराचा पूर्ण लाभ व अनुभव घ्यावा. आम्हीं अनेक तऱ्हेनें आमचें नागपूरला जाण्याचें महत्त्व पटवून दिलें असतांना त्या सर्वांनीं या बाबतींत अत्यंत आग्रह धरून आम्हांला राजगीर सोडूं न देण्याचें ठरविलें व तें प्रत्यक्षांत घडवून आणण्याकरितां त्यांचेपैकीं कांहीं जणांनीं आमच्या येथेंच दोन दिवसपर्यंत मुक्काम केला... अशा परिस्थितींत आपले येथील या अत्यंत महनीय व मंगल प्रसंगीं प्रत्यक्ष उपस्थित राहतां येत नसल्यामुळें मन नागपुरांत व शरीर राजगिरांत, अशी आमची स्थिति झाली आहे. तरी याबद्दल आपण आम्हांला क्षमा करावी."

प. पू. डॉक्टरांनीं असें कळवूनहि पत्रावर पत्रें व तारावर तारा आल्यानें ते व श्री. आप्पाजी दि. ९ मार्चला नागपूरला परतले. त्या वेळीं श्रीगुरुजी स्वतंत्र मोटार घेऊन जबलपूरला गेले व तेथून पहांटे ४--४॥ ला प. पू. डॉक्टरांना घेऊन नागपूरला येऊन पोहोंचले. दि. ९ पासून दि. १६ पर्यंत मुंजीसाठीं त्यांचें तेथें राहणें झालें. एवढ्या अवधींत मध्यप्रांतांतून तेथें मुंजीसाठीं आलेल्या अनेक कार्यकर्त्यांजवळ डॉक्टरांनीं कार्यवाढीसंबंधीं विचारविनिमय केला. युद्धपरिस्थिति व सरकारी वक्रदृष्टि असूनहि, सर्व ठिकाणीं द्रुतगतीनें कार्य प्रगत होत आहे, हें दिसत असूनहि डॉक्टरांच्या मनांतील अस्वस्थता कमी झाली नाहीं. ज्या हिंदु समाजांत संघटनेच्या नांवानें पूज्य होतें, त्या ठिकाणीं सहस्रावधि स्वयंसेवक उभे

राहिले, ही गोष्ट निःसंशय अभिमानास्पद आणि आशादायक होती. पण ज्या परिस्थितींतून मार्ग काढावयाचा होता तिच्या उग्रतेचा विचार करतां, हें जमलेले सामर्थ्य म्हणजे ' दर्यामें खसखस ' असल्यासारखेच होतें ! ही जाणीवच डॉक्टराच्या चिंतेचें मूळ होती. या सहा-सात दिवसात त्यानीं कांहीं कार्यकर्त्यांना असा सूचक प्रश्न विचारला होता कीं, " स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं देशांत किती स्वयंसेवक उभे करावे लागतील ? "

अशी तगमग चालू असतानाच प. पू. डॉक्टर नागपुराहून निघून दि. १८ ला पुन्हा राजगीरला येऊन पोहोचले. वाटेत मनस्वी गर्दीमुळे डॉक्टराना प्रवासाचा बराच त्रास झाला. राजगीरला आल्यावर एक-दोन दिवसातच त्याच्या स्नानाचा क्रम पुन्हा सुरू झाला. या दिवसांत संघटना किती वाढविली तर कार्यभाग साधेल, यासंबंधीचे त्याचे आडाखे आता निश्चित होत आले होते. तेव्हा ते नागपूरच्या सहकाऱ्याना विदित करण्यासाठी त्यानी काहीं जणाना पत्रे लिहिलीं. त्यांतील एका पत्रांत ते लिहितात, " आपली ही सघटना प्रभावी करण्याच्या दृष्टीनें मी आपणासमोर या वेळीं एकच सूचना ठेवतो आणि ती म्हणजे येत्या तीन वर्षांत ( १९४०, १९४१ व १९४२ या सालात ) आपल्या प्रातांतील तरुण गणवेषयुक्त स्वयंसेवकाची संख्या लोकसंख्येच्या मानानें खेडेविभागांत ( Rural ) शेंकडा एक व शहर विभागात ( Urban ) शेकडा तीन होणें अत्यंत आवश्यक आहे.

" आपण सर्वांनीं हे कसे घडवून आणता येईल याचा पूर्ण विचार करून तें जोमाने अंगावर घेतल्यास येत्या तीन वर्षांत हां हा म्हणता हे कार्य घडून येईल, असा मला विश्वास आहे. परमेश्वरानें आपल्याला आपल्या अंगीकृत कार्यांत यश द्यावें, अशी त्याचेजवळ माझी प्रार्थना आहे. "

या डॉक्टरांच्या पत्राने सगळीकडील शाखांत हे स्वयंसेवकांचे प्रमाण गांठण्यासाठीं विचार सुरू झाला आणि त्यांतून नवीन नवीन कार्यकर्ते पुढें आले. डॉक्टरांचे असे विचार चालू असतानाच लाहोर येथे मुस्लीम लीगचें अधिवेशन झाले. त्यांतील ठराव व खाकसाराच्या बेलच्यांचा खणखणाट यामुळे ते चागलेच गाजले ! त्या लाहोरच्या अधिवेशनात अगदीं निःसंदिग्ध शब्दात हिंदुस्थानात स्वतंत्र मुसलमानी राज्य स्थापन करण्याचा संकल्प सोडण्यांत आला. तसेच सैनिकी संचलनासंबंधींचा निर्बंध धाब्यावर बसवून लाहोरमध्यें खाकसारानीं चढाईचे धोरण स्वीकारले. त्यांतून आरक्षक व खाकसार याच्या झटापटी होऊन तीस-चाळीस खाकसार मारले गेले व संचारबंदी करण्यात आली. पंजाबात घडणाऱ्या या घटनांकडे डॉक्टरांचें पूर्ण लक्ष होते व मुसलमानांच्या आक्रमणाला तोंड देण्याचे सामर्थ्य संघाच्या संस्कारातून उभे राहणारे तरुण अवश्य प्रकट करतील, असा विचार त्यांच्या बोलण्यातून उमटे. अर्थात् तो त्यांचा आत्मविश्वास तेथील भयानक परिस्थितींतहि कार्य वाढवून दाखवून स्वयंसेवकांनीं यथार्थ असल्याची ग्वाही दिली

होती. पंजाबमध्यें अशाहि स्थितींत तेथील कार्यकर्त्यांनीं धिटाईनें काम वाढविल्याचीं वृत्तें डॉक्टरांना कळलीं म्हणजे त्यांना समाधान वाटे. अशा प्रगतीचा अन्वयार्थ लावतांना त्या वेळीं श्रीगुरुजी एका पत्रांत म्हणतात, "बदललेल्या परिस्थितींत आपल्या कार्याची प्रगति झपाट्यानें होत आहे, याचा स्पष्ट अर्थ हा आहे कीं, आपलें कार्य कोणत्याहि विशिष्ट कार्यक्रमावर सर्वस्वीं अवलंबून नसून आपल्या उद्दिष्टाच्या व कार्यपद्धतीच्या आंत एवढी अंतर्गत शक्ति आहे कीं, सर्व प्रकारच्या परिस्थितींतून वाट काढीत तें यशस्वी होतच जाणार." ही या पत्रांतून त्या वेळीं प्रकट झालेली विजयाकांक्षा सर्व स्वयंसेवकांच्या अंतःकरणांत उसळत होती व ही किमया डॉक्टरांनीं स्वतःच्या जीवनाच्या अखंड चाललेल्या यज्ञांतून सिद्ध केली होती.

डॉक्टर दुसऱ्या वेळीं राजगीरला आले तेव्हां त्यांच्याबरोबर श्री. आप्पाजी जोशी आले नव्हते. ते चांदा येथील चार जिल्ह्यांचा प्रांतिक मेळावा आटोपून दि. ३१ ला तेथें येऊन पोहोंचले. या दुसऱ्या वास्तव्यांत डॉक्टरांची प्रकृति कांहींशी सुधारूं लागली. रात्रीच्या वेळीं त्यांचे पाय रुईच्या पानांनीं शेकण्यांत येत. नागपुराहून निघतांना डॉक्टरांनीं वाचण्यासाठीं 'गीता' बरोबर घेण्यास सांगितलें होतें व आप्पाजींना बंगाली शिकवावें या हेतूनें त्यांनीं कांहीं बांगला भाषेंतील प्राथमिक पुस्तकेंहि स्वतःबरोबर आणलीं होतीं. पण राजगीरला या दोन्ही गोष्टींना फारसा अवधि मिळालाच नाहीं. डॉक्टरांच्या प्रकृतींत थोडी सुधारणा दिसतांच ते अधिक वेळ गप्पागोष्टींत व पत्रव्यवहार पाहण्यांत घालवूं लागले.

डॉक्टरांनीं विवेकपूर्वक बनविलेला शांत स्वभाव आतां केव्हां केव्हां मूळ रूप घेऊं लागला. त्यांच्या वागण्यांत थोडा थोडा चिडखोरपणा उमटलेला दिसे. पण त्याचें स्वरूप दुसऱ्यावर संतापून रागीटपणानें तिखट बोलण्याइतकें उग्र कधींच होत नसे. मात्र त्यांच्या मनांतील अप्रसन्नता त्यांच्या निवासांत राहणाऱ्यांना जाणवल्यावांचून राहत नसे, एवढें मात्र खरें! राजगीरच्या वास्तव्यांत मध्येंच एखाद्या दिवशीं त्यांना थोडा ताप येई. पण आपणांसाठीं इतरांना त्रास देणें रुचत नसल्यानें, आपणांला लागणारी वस्तु शक्य तोंवर आपणच उठून घ्यावयाची, असा त्यांचा कटाक्ष दिसे. आप्पाजी हे डॉक्टरांचे जिवलग स्नेही. पण त्यांच्या स्वभावांत आग्रह आणि चोखंदळपणा अधिक असल्यानें त्यांच्या व्यवस्थेंत कोठेंहि उणें पडूं नये, याची दक्षता तेथें जर सर्वांत कोणीं अधिक घेतली असेल तर ती डॉक्टरांनीं! एवढेंच नव्हे तर तेथें असतांना आप्पाजी एकदां आमांशानें आजारी पडले असतां डॉक्टर स्वतः त्यांच्या उशाशीं बसून हवें-नको पाहत होते. असें करतांना डॉक्टरांचे डोळे ओलावलेले पाहून आप्पाजींनीं 'काय झालें?' असें विचारलें. तेव्हां ते म्हणाले, "मीं तुम्हांला आग्रह करून येथें आणलें नि हें काय आलें तुमच्या वांट्याला?"

अधूनमधून ठिकठिकाणचे स्वयंसेवक तेथे येऊन त्यांना भेटून जात होते. एके दिवशीं सकाळीं अंगात लाब कोट ( overcoat ), हातापायांत मोजे व लाब टोपी घालून डॉक्टर बाहेरील पडवीत फेऱ्या घालीत होते. इतक्यात गयेहून वीस-पंचवीस स्वयंसेवक दुचाकीने तेथे येऊन पोहोंचले. त्या निवासाच्या पायरीजवळ उभें राहून डॉक्टरानीं विचारले,

" कोठून आलांत? "

" गयेहून! "

" काय काम होते? "

" डॉ. हेडगेवाराना भेटायचे होते! "

" ठीक! ते आत लिहीत बसले आहेत! " असे म्हणत डॉक्टरानी आप्पाजींकडे बोट दाखविले. ते सर्व जण आत गेले व त्यानी आप्पाजींना आदरानें नमस्कार केला.

" मला कशाला नमस्कार? "

" आपल्या दर्शनासाठीं आलो होतो! "

" कोणाच्या? "

" डॉक्टराच्या! बाहेरच्या स्वयंसेवकाने आम्हाला आपणाकडे पाठविले! "

यावर मनमुराद हसत आप्पाजी म्हणाले, " छान! ते नुसते स्वयंसेवक नाहींत, तेच डॉक्टर हेडगेवार आहेत! " डॉक्टरानी केलेली थट्टा ध्यानी घेऊन सर्व जण बाहेर आले व मग हास्यविनोदाच्या कल्लोळात त्या सर्वानी डॉक्टराची भेट घेतली. असा थट्टेखोर स्वभाव हा त्याच्या जीवनाचा अविभाज्य घटक होता.

अशी ही विश्रांति सुरू असता मार्चच्या दि. १७ ला हिंदुमहासभेच्या वतीने नागपूरला ' रामसेना ' या नावाने स्वयंसेवक दल सुरू करण्यांत आले. त्यासंबंधीं निघालेल्या पत्रकात म्हटले होते की, "......रामसेना हे महासभेचे सैन्य राहील. मंडळाचे अध्यक्ष डॉ. मुंजे यांच्यामार्फत येणाऱ्या महासभेच्या सर्व आज्ञा रामसेनेस पाळाव्या लागतील......" या पत्रकात निराळी सेना का उभारावी लागत आहे, याचेहि स्पष्टीकरण सूचकतेने करण्यांत आले होते. ते असे कीं, " हिंदूंच्या सैनिकशिक्षणाचे द्रोणाचार्य पूज्य डॉ. हेडगेवार यानीं पक्षातीत हिंदु-संघटना या नागपुरात सुरू केली. "

दि. २७ ला तर रामसेनेचे पदाधिकारी घोषित करणारे पत्रक नागपुरातील ' महाराष्ट्र ' वृत्तपत्रातून प्रसिद्ध झाले. त्या विनंति-पत्रकावर डॉक्टरांचेहि नाव छापून आलें. अर्थात् त्यांना राजगीरला ही गोष्ट कळताच मोठे आश्चर्य वाटले व काहींसा रागहि आला! कारण संघ व रामसेना अशा भिन्न क्षेत्रात काम करू पाहणाऱ्या दोन संस्थांत एकाच वेळीं पदाधिकारी म्हणून राहणें, हें संघटनेच्या दृष्टीनें हिताचें नव्हते व त्यांच्या प्रकृतीचा विचार करतां ते त्याना शक्यहि

नव्हतें. एवढेंच नव्हे तर त्यांची ही असमर्थता त्यांनीं अगदीं निःसंदिग्ध शब्दांत रामसेनेच्या प्रवर्तकांना वारंवार कळविली होती. असें असतां त्यांचें नांव त्यांत गुंतविण्याचा प्रयत्न व्हावा, ही गोष्ट त्यांना युक्त वाटली नाहीं व त्यांनीं लगेच दि. ३ एप्रिलच्या 'महाराष्ट्रा'च्या अंकांत एक छोटेंसें संपादकीय स्पष्टीकरण प्रसिद्ध करविलें. त्यांत म्हटलें होतें कीं, "नागपूर नगर हिंदुसभेनें उभारलेली रामसेना यशस्वी करण्याबद्दल जी जाहीर विनंति दि. २७ मार्चच्या 'महाराष्ट्रां'त प्रसिद्ध केली आहे, त्याबाबत रा. स्व. संघाचे चालक डॉक्टर हेडगेवार राजगीर-हून कळवितात कीं, 'त्या पत्रकावर आपलें नांव आपल्याला नकळत व परवानगीशिवाय टाकण्यांत आलें आहे.' अर्थात् हें स्पष्टीकरण प्रसिद्ध झाल्यावर त्यांतून डॉ. मुंजे यांच्यासारख्या आदरणीय व्यक्तीला थोडेंसें वाईट वाटेल, याची डॉक्टरांना कल्पना होती व त्यामुळें ते स्वतःहि थोडेसे अस्वस्थच झाले होते. पण परतंत्र देशांत राष्ट्रीय जागृति करण्यासाठीं उभारलेल्या या संघटनेला युद्धाच्या तंग व आणीबाणीच्या परिस्थितींत सुरक्षित ठेवण्यासाठीं, संघाला राजकीय संस्थेपासून अलिप्त ठेवण्याचें कर्तव्य डॉक्टरांनीं, थोडासा वाईटपणा पत्करूनहि, पार पाडलें होतें. कर्तव्य हें अनेकदां असेंच कठोर असतें !

राजगीरच्या पहिल्या वास्तव्यांत स्नानासाठीं कुंडावर जातांना टमटम वापरली जाई, पण तिच्यांतून जातां येतां बसणारे हबके हे डॉक्टरांना त्रासदायक वाटत. ही गोष्ट ध्यानीं आल्यावर गयेचे संघचालक श्री. बबुआजी यांची मोटार दि. १ एप्रिलला तेथें आणण्यांत आली. तिनें डॉक्टरांचे श्रम बरेच कमी केले. ही मोटार आली त्याच दिवशीं डॉक्टर हे राजगीरपासून अवघ्या सात मैलांवर असणारे पुरातन नालंदा विश्वविद्यालयाचे अवशेष पाहण्यासाठीं जाऊन आले. सहस्रावधि विद्यार्थ्यांना एकाच वेळीं ज्या ठिकाणीं विद्या नि कला शिकविल्या जात, त्या पवित्र ठिकाणाची मुसलमानांनीं उडविलेली धूळधाण त्या उद्ध्वस्त विद्यानगरीच्या रूपानें पाहत असतां, तें शेंकडो वर्षांपूर्वींचें त्यांचें आक्रमण अजूनहि पूर्णपणें मोडून काढतां आलेलें नाहीं, या जाणिवेनें डॉक्टर दुःखित झाले. ते त्या पडक्या विहारांची पाहणी करतांना म्हणाले, "ह्या हृदय विदीर्ण करणाऱ्या दृश्याचा अन्वयार्थ सांगणारा जर एखादा डोळस व स्वाभिमानी मार्गदर्शक येथें ठेवतां आला, तर तो येथें येणाऱ्यांना इतिहासाकडे पाहण्याची नेमकी दृष्टि देऊं शकेल."

यानंतर दि. १५ एप्रिलपर्यंत डॉक्टर राजगीरला होते. तेवढ्या अवधींत तेथील वर्षप्रतिपदेचा उत्सव त्यांच्याच उपस्थितींत साजरा झाला. तेथून बसल्या बसल्या नागपूर, पुणें वगैरे ठिकाणच्या अधिकारी शिक्षण वर्गांची नीट आंखणी होत आहे कीं नाहीं, याकडेहि त्यांचें लक्ष होतें व दि. २० ला नागपूरला पोहोंचून दुसऱ्याच दिवशीं पुण्याच्या वर्गासाठीं शिक्षक पाठविण्याचा विचार त्यांनीं कळवून

ठेवला होता. त्याप्रमाणें प. पू. डॉक्टर दि. १५ ला राजगीरहून निघून गया, प्रयाग, काशी, जबलपूर या शाखांना भेटी देत देत दि. २० ला नागपूरला येऊन पोहोचले.

नागपूरला आल्यानंतर डॉक्टराना नेहमीं औषधोपचार करणाऱ्या डॉक्टरांनीं त्यांच्या प्रकृतीची पाहणी करून त्यांत कांहीं सुधारणा झाल्याचे अभिमत प्रकट केलें. त्यामुळे सर्वानाच मोठा आनद झाला. डॉक्टरांनीं कार्यविस्ताराची जी मर्यादा नुकतीच सर्वांसमोर ठेवली होती, ती प्रत्यक्ष गाठून दाखविण्याचा हुरूप तर सर्वांच्याच बोलण्याचालण्यांतून उमटूं लागला होता. या काळात श्रीगुरुजी याच्या लिहिण्याबोलण्यांतहि प. पू. डॉक्टरानीं आखून दिलेली योजना पार पाडण्यासाठीं सर्वांना उद्युक्त करणारेच विचार प्रकट होणें स्वाभाविक होतें. कलकत्त्याचे डॉ. संतोषकुमार मुखर्जी याना ते लिहितात कीं, ".........आपण या एकाच गोष्टीवर आपल्या सर्व शक्ति केंद्रित केल्या पाहिजेत. म्हणजे शक्य तितक्या थोड्या वेळांत संख्या व वृत्ति या दोन्ही दृष्टींनीं आपण पुरेसे समर्थ होऊ. वाटेल तो त्रास सहन करूनहि आपण ही गोष्ट सिद्ध करून दाखविलीच पाहिजे—" ("We must concentrate our energies on this one point, so that within a reasonably short time we may be sufficiently strong in number and intensity. Indeed this has to be done whatever strain it may cost us." )

सुरतेच्या प्रचारकाला पाठविलेल्या पत्रात तर श्रीगुरुजी लिहितात कीं, "......प. पू. डॉक्टर आपल्या कार्यास संपूर्ण यश मिळवून देतीलच, असा मला विश्वास वाटतो."

संघाचा मार्ग अचूक, उत्साह अपूर्व, काळ अनुकूल व नेतृत्वहि असामान्य होते. पण अशा वेळीं—अरेरे ! नियतीची लहर ! ती मात्र अतर्क्यच ठरली !

★ ★ ★

## ३० : मृत्यु

परमपूजनीय डॉक्टरांच्या आदेशानुसार दि. २३ एप्रिल १९४० या दिवशीं पुणें येथील अधिकारी शिक्षण वर्ग सुरू झाला. या वर्गाचा विशेष असा कीं, याच्या प्रारंभींच संघाची सर्वांगपरिपूर्ण अशी संस्कृत प्रार्थना व शारीरिक शिक्षणाच्या संस्कृत आज्ञा व संज्ञा प्रचलित करण्यांत आल्या. त्यापूर्वींची हिंदी व मराठी अशी संमिश्र प्रार्थना ही संघाच्या देशव्यापी संघटनेच्या दृष्टीनें अपुरी वाटूं लागली होती, याचा उल्लेख मागें आलाच आहे. १९२५ मध्यें केवळ नागपूरच्या कोपऱ्यांत एका पडक्या वाड्याच्या आश्रयानें सुरू झालेल्या संघाला आतां अखिल भारतीय स्वरूप येऊं लागलें होतें, याची संस्कृत प्रार्थना व आज्ञा ही निशाणीच होय. ज्या भाषेला सर्वांच्या हृदयांत ' देववाणी ' म्हणून एक अत्यंत आदराचें स्थान मिळतें आणि प्रांतिक भाषांचे भेद बुजवून टाकून जी भाषा हिंदुस्थानांतील सर्वांना आत्मीयतेच्या रसायनानें जवळ आणते, अशा संस्कृत भाषेंतील प्रार्थना नित्य नियमानें असंख्य जणांच्या कंठांतून भक्तिभावनेनें घुमूं लागली, ही राष्ट्रीय उत्थानाच्या दृष्टीनें महत्त्वपूर्ण घटना होती.

हा पुण्याचा वर्ग सुरू झाल्यावर त्या वर्गात पंधरा दिवस राहण्यासाठीं प. पू. डॉक्टर दि. २७ ला नागपूरहून निघाले. या वेळीं त्यांची प्रकृति एकदम बघणाऱ्याला बरी दिसे. त्यांच्या नेहमींच्या प्रसन्नतेचा हा परिणाम होता, असेंहि म्हणतां येणार नाहीं. कारण नागपूरनंतर एक दिवस अकोल्याला थांबून जेव्हां ते नासिकला येऊन पोहोंचले, तेव्हां १९३९ च्या आजारामुळें डॉक्टरांशीं चिर-परिचित झालेल्या डॉ. चोभे व डॉ. दामले यांनीं त्यांच्या प्रकृतीची पाहणी केली. त्या पाहणीचा निष्कर्ष ' रुपयांत १२ आणे सुधारणा झाली असेंच त्यांचें मत पडलें, ' अशा शब्दांत त्या वेळच्या पत्रांतून कळविलेला दिसतो. डॉक्टर नासिक-नंतर कल्याणमार्गें दि. २९ ला पुण्याला येऊन पोहोंचले. वाटेंत कल्याण येथें प्रांतसंघचालक श्री. का. भा. लिमये, मुंबई-संघचालक श्री. दादा नाईक, सातारा-संघचालक श्री. भाऊराव मोडक व अनेक स्वयंसेवक यांनीं त्यांची भेट घेतली. पुणें स्थानकावर तर शेंकडों स्वयंसेवकांनीं त्यांचें स्वागत केलें. डॉक्टरांची नुसती उपस्थिति ही देखील अपूर्व उत्साह निर्माण करणारी व अत्यंत आनंददायक असे. त्याचाच अनुभव ते पुण्यांत आल्यापासून येऊं लागला.

...२६...

प. पू. डॉक्टरांच्या दृष्टीसमोर वर्गातील शारीरिक व बौद्धिक कार्यक्रम सुरू होते. या वर्गाला महाराष्ट्रांतून १३२ गांवांहून आलेल्या जवळ जवळ ८०० स्वयंसेवकांनीं भव्य रूप आणून दिलें होतें. रोज दुपारीं डॉक्टरांनीं या स्वयं-सेवकांच्या जिल्हावार बैठका घेण्यास प्रारंभ केला. त्यांत चालू कामाचा आढावा घेऊन, पुढील वर्षांत किमान किती काम वाढविणार, याची योजना ते ऐकून घेत आणि बैठकीच्या शेवटी त्या जिल्ह्यापासून तरुण स्वयंसेवक व गुरुदक्षिणा या दृष्टीने ते स्वतः किती अपेक्षा करतात, ती सांगत असत. या बैठकांतून डॉक्टरांना असे दिसून आलें कीं, वर्गाला आलेले स्वयंसेवक संघाच्या वातावरणात रंगलेले असून महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांत थेटपर्यंत संघाच्या विचारांचे व कृतीचें लोण नेऊन पोंचविण्याचे कर्तृत्व व आत्मविश्वास त्याच्या ठिकाणीं आहे. या वर्षी जे स्वयसेवक पदवीधर होणार होते, त्यांच्याजवळहि प्रचारकार्यासाठी बाहेर पडण्याविषयीं त्यांनी स्वतंत्रपणें बोलणें सुरू केलें. दि. ७ मे या दिवशीं त्यांनीं श्रीगुरुजी याना पत्र लिहिले. त्यांत ते म्हणतात कीं, “ या वर्षाच्या येथील O. T. C. ने मागील O. T. C. ना मागे टाकलें आहे. संख्येच्या व इमारतीच्या अशा दोन्ही दृष्टींनीं या वर्षाची भव्यता पुष्कळच वाढली आहे. लोकांत उत्साह वाढलेला असून कार्यासंबंधींची तीव्रताहि विशेष दिसून येत आहे. ”

पुण्याला आल्यावर तेथील जिल्हा-सघचालक श्री. भाऊराव देशमुख याची गाठ होतांच प. पू. डॉक्टरांनीं आठवणीने आपणाजवळील एक जुनें वृत्तपत्र बाहेर काढले व लाल पेन्सिलीने अधोरेखित केलेला भाषणातील काहीं भाग त्यांच्यासमोर धरला. ते पाडव्याच्या उत्सवात केलेलें भाऊरावाचेच भाषण होते व त्यांतील खटकलेल्या भागाखाली डॉक्टरानी राजगीरला असतानाच खूण करून ठेवली होती. तो एका राजकीय संस्थेविषयीं बोचणारा उल्लेख भाऊरावाना दाखवून ते म्हणाले, “ या उद्गारांची प्रतिक्रिया काय होते ते मात्र नीट पहा ! ” प्रकृति नीट नसताहि त्याचे असे चोहींकडे अगदीं बारकाईने लक्ष असलेले दिसे.

आधींच गेलीं कांहीं वर्षे प. पू. डॉक्टरांच्या अगांतून सारखा घाम सुरू असे व त्यात उन्हाळा असल्याने तर त्याना त्याचा त्रास स्वाभाविकच अधिक होऊं लागला. त्या वर्षीं त्याच्या पाठींत डावीकडे अनेकदा ठणका असे व त्या बाजूच्या मानानें उजवी बाजू बरीच थंड लागे. थोड्याशा श्रमानंतर डॉक्टराना थकवा येई व त्यांच्याकडे जरा जवळून पाहणाऱ्याच्या तो ध्यानांतहि आल्यावांचून राहत नसे. पाठींतील हे दुःख वारा लागल्याने व थंड पेय घेतल्याने तेंव्हाच वाढे. त्यामुळें उन्हाळा असूनहि त्यानीं अंगांत खमीस व त्यावर जाडसर करड्या रंगाचा लोकरीचा सदरा घालण्यास सुरुवात केली होती. तसेच माठांतील पाणी ते मोठ्या कटाक्षाने टाळूं लागले होते. अलिकडे याच हेतूने त्याच्या अंगावर जाड लोकरीचा कोट दिसूं लागला होता. अशी स्थिति असतांनाहि पुण्यांतील प्रमुख

मंडळींना त्यांच्या घरीं जाऊन भेटण्याचा त्यांचा उपक्रम सुरूच होता व निरनिराळ्या कार्यकर्त्यांजवळ कामासंबंधीं बोलणें करण्याच्या ओघांत रात्रीं १-२ वाजले तरी त्याचें त्यांना भान असलेलें दिसेना. हा वर्ग पुण्याच्या सुप्रसिद्ध नूतन मराठी विद्यालयांत सुरू होता व त्या प्रासादतुल्य शाळेच्या मागील द्वाराच्या उजवीकडील तळमजल्यावरील खोलींत त्यांचें वास्तव्य होतें. डॉक्टर असले म्हणजे त्या खोलींत अनेक जणांची ये-जा सुरू असे व डॉक्टर त्यांच्याजवळ बोलण्यांत गर्क दिसत.

सकाळचा कार्यक्रम उरकला कीं, डॉक्टर शाळेमागील जोगेश्वरीच्या बोळांत राहणाऱ्या स्वयंसेवकाकडे स्नानास जात. स्नानापूर्वीं ते कपडे काढीत तेव्हां ते लगेच धुवावयास टाकावे लागत, इतके ते घामानें भिजलेले असावयाचे. त्या काळांत कापूर घातलेलें तेल अंगाला व विशेषतः दुखणाऱ्या पाठीच्या भागाला चोळण्याचा क्रम दिसे. पण ते स्वतःच ही गोष्ट करीत. कोणी स्वयंसेवक तेल चोळण्यासाठीं पुढें सरकला तर त्याला ते म्हणत कीं, " त्या दुखणाऱ्या भागावर किती बेतानें चोळलें पाहिजे, याची कल्पना तुला नीट येणार नाहीं. त्यासाठीं मलाच तेल लावूं दे. " वास्तविक यापूर्वीं आजारी असतांना व केव्हां केव्हां इतर वेळींहि ते तेल लावून अंगाचें मालीश करून घेत. ती गोष्ट वास्तविक त्यांना प्रिय अशी होती. पण या वर्षीं त्यांनीं ती टाळली होती ही गोष्ट खरी. अशा प्रकृतिमानांतहि त्यांची वागण्यांतील सहजता व मोकळेपणा कायम होता. ज्यांच्याकडे ते स्नानास जात, त्या श्री. नाना घाणेकर यांच्या पत्नीनें पहिल्याच दिवशीं स्नान होतांच त्यांना केशर व बदाममिश्रित दूध आणून दिलें. तेव्हां दूध घेतां घेतां ते म्हणाले, " यांनीं छानदार दूध दिलें हें खरें, पण माझ्या या भरघोस मिशा मागाहून धुवून काढण्यासाठीं पाणी देण्याचें राहून गेलें आहे ! "

अलिकडे त्यांना जेवण झाल्यावर कांहीं वेळ बोलतांना त्रास होई, पण त्यांतूनच त्यांनीं सर्व स्वयंसेवकांसमोर संघाची भूमिका स्पष्ट करणारीं चार भाषणें दिलीं होतीं. एवढेंच नव्हे तर त्या भाषणांतहि विचारांची सुसूत्रता, सहजता व ओजस्विता ठसठशीतपणानें उमटली होती. पाडाला आलेल्या फळाची रुचिरता त्यांच्या मांडणींत दिसून येणें स्वाभाविक होतें. चाळीस वर्षांच्या अखंड तपस्येचें बळ त्यांच्या शब्दाशब्दांतून उमटे व त्या प्रभावानें श्रोत्यांच्या मनांतील संशय फिटे.

पुण्याच्या या चारहि भाषणांतील अनेक विचार उल्लेखनीय आहेत. राष्ट्रीयत्वाची भावना नसल्यानें आपल्या समाजाला कसें पराभूत व्हावें लागलें, याचें चित्र त्यांनीं रेखाटलें व या अधःपतनांतून पुन्हा वर येण्यासाठीं, प्रत्येक व्यक्तीनें स्वतःला ' हिंदुराष्ट्रांगभूत ' मानून व्यवहार केला पाहिजे, याची जाणीव दिली. ते म्हणाले, " हिंदुस्थान हें एक राष्ट्र असून आपण त्येक जण त्याचे एक घटक आहों व हा प्रत्येक घटक राष्ट्रासाठीं आहे, असें आपणांला पटवून द्यावयाचें आहे. विराट् राष्ट्रपुरुषाच्या सर्व घटकांनीं त्या विराट् स्वरूपाच्या पूर्णतेसाठींच

खटपट केली पाहिजे. शरीराचा कोणताहि भाग, एखादे बोट समजा, शरीरापासून अलग राहून जिवंत राहण्याची महत्त्वाकांक्षा बाळगील तर ते अशक्य आहे. तीच स्थिति समाजघटकाची असते. " संघाला पंधरा वर्षांत इतराच्या मानानें जें डोळ्यांत भरण्याजोगें यश संघटन-क्षेत्रांत मिळाले, त्याचे मर्महि त्यानीं विशद केले होते. ते म्हणाले, " ......आपणाला जें यश मिळालें ते आपणा स्वयंसेवकांच्या चिकाटीच्या प्रयत्नामुळें मिळाले, वृत्तपत्रीय प्रसिद्धीने हे काम रेटले गेले नसतें. कोणतेंहि तत्त्वज्ञान सिद्ध करावयाचे असेल व ते सत्य आहे असे पटवून द्यावयाचे असेल, तर त्याला शक्तीचें अधिष्ठान पाहिजे. बळ नसेल तर न्यायहि दुबळा ठरतो, हें ध्यानांत ठेवा. " (Justice without force is impotent.) याचप्रमाणे संघटनेला अंतर्गत कलहाची कीड लागू नये म्हणून सर्वांनीं दक्षता घ्यावी, असेहि त्यानी अत्यत कळकळीने सागितले होते. ते म्हणाले, " रा. स्व. सघावर बाहेरून होणाऱ्या हल्ल्याला सघ भीत नाही. परंतु आत मात्र वादळ होता कामा नये. संघाचे सर्व कार्य प्रेमाने व्हावयास पाहिजे. आज आपणांला sanction नाहीं. आपणाजवळ फक्त नैतिक शक्ति आहे व तिच्याच जोरावर आपण आपले कार्य करीत आहोत. "

राष्ट्रीय स्वयसेवक संघाचे वाढते बळ पाहून अनेकाना या सघटनेकडून काहीं गोष्टी घडाव्यात, असे वाटूं लागले होते. या वर्षी महाबळेश्वरहून प्रा. भालचद्र पुंडलिक आडारकर, एम्. ए., यानीं डॉक्टराना पत्र लिहून देशापुढील समस्या व संघाचे ध्येयधोरण यासंबंधीं महत्त्वपूर्ण चर्चा करण्यासाठीं दोन दिवस पुण्याला येत असल्याविषयीं कळविले होतें. त्याप्रमाणे ते येऊन गेले. त्या अवधीत भाषणात त्यानी ज्या कल्पना माडल्या त्या संघकार्यकर्त्यांच्या विचारधारेशी सुसंवादी नव्हत्या. त्यामुळे भाषणानंतरच्या चहापानाच्या वेळीं कोणीं तरी आपला हा अभिप्राय बोलण्याच्या ओघात व्यक्त केला. ही गोष्ट प्राध्यापकाना लागली व त्यानी दुसऱ्या दिवशीं रात्रीं जाण्याऐवजीं त्याच दिवशीं रात्रीं जाण्याचा मानस डॉक्टराजवळ बोलून दाखविला. प्राध्यापक आपले वास्तव्य आखडते का घेत आहेत, हें डॉक्टरानीं तेव्हाच ताडलें आणि मग डॉक्टरांनी त्याच्याशीं अशी काही वागणूक केली कीं, त्यातून त्यांचा राग शमला व लवकर निघून जाण्याचा विचारहि पालटला. मतभेद हा राहणारच, पण त्यामुळे त्याच्याशी आपल्या होणाऱ्या उत्तम वागणुकीत यत्किंचितहि न्यूनता येणे युक्त नाही, असे विचार डॉक्टर त्या वेळीं प्रांत संघचालकांजवळ बोलले होते. त्या दिवशीं डॉक्टरांनीं जी वागणूक केली, तिचे वर्णन करतांना श्री. काशिनाथपंत लिमये लिहितात, "......जसा एखादा सासरा आपल्या जांवयाची मनधरणी करतो, तशी मनधरणी डॉक्टर करीत होते. " ' जातीसाठीं खावी माती ' याप्रमाणेंच संघटनेच्या हितासाठीं व अभिवृद्धीसाठीं डॉक्टर असा पडेल तो शारीरिक व मानसिक त्रास सहन करीत आले होते.

प. पू. डॉक्टरांचें पुण्यांत वास्तव्य असतांनाच गयेचे संघचालक श्री. बबुआजी हे श्री. आप्पाजी जोशींबरोबर दि. ५ मेला तेथें येऊन पोहोंचले. त्यानंतर दि. ११ ला महाराष्ट्र प्रांतांतील कार्यकर्त्यांची दोन दिवसांची बैठक झाली. या बैठकीला सरकार्यवाह श्रीगुरुजी हेहि आले होते. त्या बैठकीला महाराष्ट्रांतील सर्व जिल्ह्यांतील मंडळी तर उपस्थित होतीच; पण त्या जोडीनें धारवाड-बेळगांव-कडीलहि कार्यकर्ते व वऱ्हाडमधील कांहीं अधिकारी आले होते. प. पू. डॉक्टरांच्या उपस्थितींत बैठक सुरू होऊन सर्व जिल्ह्यांनीं आपल्या कामाचें वृत्त कथन केलें. अडीचशें संघशाखा व साधारण अठरा हजार स्वयंसेवक असें त्या वेळीं कार्याचें स्वरूप होतें. सर्वच जणांच्या कथनांतून कार्यवाढीचा आत्मविश्वास ओसंडत होता.

दुपारीं बैठक चालू असतांनाच अचानकपणें स्वातंत्र्यवीर सावरकरांचें तेथें आगमन झालें व प. पू. डॉक्टरांच्या आग्रहावरून त्यांनीं पांच मिनिटेंच भाषण केलें. त्यांत ते म्हणाले, "...आज हिंदुराष्ट्राची स्थिति अत्यंत खालावली आहे. अशा स्थितींत राष्ट्रीय स्वयंसेवक संघ हेंच आशेचें एकमेव स्थान आहे. आज जें संघ करीत आहे तेंच महान् राष्ट्रांनाहि करावें लागलें होतें...निर्बलतेंतून सबलतेंत येण्याचा संघटना हाच मार्ग आहे. म्हणून तुम्ही तुमच्या नेत्यावर पूर्ण विश्वास ठेवा. आम्हीं सर्व आयुष्यभर देशासाठीं अनेक चळवळी केल्या, पण एकहि पूर्णपणें यशस्वी ठरली नाहीं. म्हणून पुन्हा एकवार निक्षून सांगतों कीं, एवढी एकच एक संघटना हिंदुराष्ट्राचा उद्धार करूं शकेल !"

दुसऱ्या दिवशीं आप्पाजी जोशी व श्रीगुरुजी यांचींहि भाषणें या प्रांतिक बैठकीसमोर झालीं होतीं. त्यांत श्रीगुरुजी यांनीं "......आजचें आपलें कार्य समाधान मानून घेण्याइतकें मुळींच नाहीं. शिवाय समाधान व धन्यता मानण्याची वृत्ति प्रगतीला घातक होते व असमाधानी वृत्तीच प्रगतीला पोषक असते. म्हणून "Never be contented" असा आदेश दिला होता. रात्रीं १० नंतर दोन तासपर्यंत प. पू. डॉक्टरांचें बैठकीच्या समारोपात्मक असें भाषण झालें. या वेळीं नूतन मराठी विद्यालयाचें सभागृह कार्यकर्त्यांनीं फुलून गेलें होतें. प्रकृतीमुळें डॉक्टर खुर्चीवर बसूनच बोलले. पण त्या भाषणांत त्यांनीं संयमीपणानें व आत्मविश्वासानें, संघटनेच्या व्यवहाराची व कार्यपद्धतीची इतकी नेटकी मांडणी केली होती कीं, त्याचा अविस्मरणीय ठसा उमटल्यावांचून राहिला नाहीं.

भाषणाच्या प्रारंभींच, लेखन, भाषण व प्रसिद्धि यांवर आपला भर नसून, 'आपला सर्वच्या सर्व भर कार्य करण्यावर आहे' असा विचार त्यांनीं मांडला. त्यानंतर, समाजांत कार्यकर्त्यांनीं कसें वागावें, याचें विशदीकरण करतांना ते म्हणाले, "......लोकांशीं आत्यंतिक प्रेमानें वागा. कॉंग्रेस, सोशालिस्ट, हिंदुसभा वगैरे सस्थांतील लोक आपलेच आहेत. आपण त्यांच्याशीं शुद्ध मनानें वागा. खोटी वागणूक करूं नका व त्यांना फसवूं नका. कॉंग्रेसचा कोणताहि मनुष्य

माझा मुळींच द्वेष करूं शकत नाहीं. द्वेषाचे कारणच कोठे आहे ? तेव्हां पक्ष जरी भिन्न असले तरी मित्र म्हणून आपण व्यवहारांत मोकळेपणाने एकत्र यायला कांहींच हरकत नाहीं. आपणास आपल्या मताच्याच लोकांत काम करावयाचे नाहीं; तर विरोधी लोक आपलेसे करावयाचे आहेत. याकरिता संघाविषयीं त्याची भावना शुद्ध पाहिजे. आपला ध्वज व विचारसरणी ही त्याना मान्य नसली तरी आपण त्याचा द्वेष करता कामा नये. त्याना आपण विरोधास कारण देतां कामा नये......सर्व गोष्टी अगदीं व्यवस्थेशीर व्हाव्यात असें वाटत असेल तर प्रेमानेच वागले पाहिजे. प्रेमाशिवाय दुसरा मार्गच नाहीं. प्रेम व आदर वाढवीत वाढवीत आपली शक्ति वाढवीत राहिले पाहिजे. ''

संघाच्या प्रारंभापासून १० वर्षांखालील शिशु व ११ ते १४ या वर्षांचे बाल यांच्या विचारांचा सघाच्या दृष्टीनें योग्य परिपोष करण्यावर प. पू. डॉक्टरांनीं विशेष लक्ष दिले होते. त्या गोष्टीकडे, आज संघटना वाढलेली दिसली तरी मुळीच दुर्लक्ष करता कामा नये, असें सागतांना ते म्हणाले, '' शिशूंचा वर्गशिक्षक त्यागी असला पाहिजे. त्याना खेळवणे सोपे काम नसते. त्याना खेळवतांना कधीं कधीं नीरसपणा वाटतो, कंटाळा येतो. पण हीं कंटाळवाणीं कामें राष्ट्राकरितां करायलाच पाहिजेत. आज हीं कामें पुढारी करीत नाहींत. राष्ट्रीय सघटनेचे काम अत्यंत कष्टाचे व कटाळवाणे असते. पण त्यातूनच तेज निर्माण होते. नागपूरच्या संघशाखेत प्रथम जे शिशु होते, तेच आज उत्साही तरुण कार्यकर्ते म्हणून वावरत आहेत. तसेंच बाल स्वयंसेवक म्हणजे आपली पुढील शक्ति आहे. ''

त्यानंतर नगरातून शेंकडा तीन व खेड्यातून शेकडा एक या लोकसंख्येच्या प्रमाणात आपण काम वाढविलें पाहिजे, असे त्यानी सागितले. पण ती कार्याची उभारणी परके इंग्रज व मुसलमान आपणावर आघात करीत आहेत म्हणूनच केवळ करावयाची नाहीं, हीहि गोष्ट त्यानी स्पष्ट केली. ते म्हणाले, '' परकीय सत्ता आपणांवर आक्रमण करीत आहेत म्हणून हें कार्य करावयाचें, असा विचार बाजूला ठेवा. खाकसार वाढायला लागले म्हणूनच जर आपण वाढूं लागलों तर ते बद झाले म्हणजे आपणांसहि बंद व्हावे लागेल ! आपले कार्य प्रतिक्रियात्मक नाहीं. अत्याचाराकरिता व लढाईकरिता आपण संघटना करीत नाही. संकट उत्पन्न होते म्हणून सघटना वाढवूं नका, तर संकटे उत्पन्नच होऊं नयेत म्हणून खटपट करा. ''

तसेंच '' स्वयंसेवक वाढविण्याची कला आपण अवगत करून घेतली पाहिजे व कोणतीहि गोष्ट सरावाने साधते, '' असे सांगून त्यानीं संघटनेंतील घटक कसे व किती असावेत, याची कल्पना स्पष्ट केली. ते म्हणाले, '' जो जो कट्टर हिंदु असेल तो तो प्रथम मिळविलाच पाहिजे. शंभर लोकसंख्येत हिंदुत्वनिष्ठ, ध्येयनिष्ठ व संघाचेंच कार्य प्रधान कार्य मानणारा व त्यासाठीं सारे आयुष्य देणारा

एक तरी स्वयंसेवक असावा. मात्र तो अगदीं पक्का पाहिजे व त्यानें आयुष्यभर संघाचेंच कार्य केलें पाहिजे."

केवळ वानगी म्हणून उद्‌धृत केलेल्या ह्या वेचक विचारांवरून त्या वेळच्या भाषणाची सहज कल्पना येऊं शकेल. प्रांतिक बैठक आटोपली आणि लवकरच डॉक्टर नागपूरला जाणार म्हणून त्यांना देण्यासाठीं, वर्गांतील स्वयंसेवकांनीं थैली जमविण्यास प्रारंभ केला. याच अवधींत पुण्याच्या माधव आर्ट स्टुडिओचे श्री. देवधर यांनीं डॉक्टरांचीं नुकतींच काढलेलीं छायाचित्रें त्यांना दाखविण्यासाठीं वसतिगृहांत आणलीं. प. पू. डॉक्टर तीं छायाचित्रें हातीं घेऊन पाहत असतां सहज म्हणून गेले कीं, माझें शरीर आंतून पोखरलेलें आहे. तेव्हां याच्यापुढें माझे फोटोच तेवढे चांगले निघायचे ?"

पुण्याहून दि. १४ ला श्रीगुरुजी नागपूरला गेले व दुसऱ्या दिवशीं श्री. बबुआजी यांना घेऊन प. पू. डॉक्टर पुण्याहून निघणार होते. त्यासाठीं दि. १४ला रात्रीं त्यांना स्वयंसेवकांकडून, प्रेमानें निरोप देण्याचा कार्यक्रम नू. म. विद्यालयाच्या चौकांत थाटामाटानें पार पडला. त्या वेळीं प. पू. डॉक्टरांना पुष्पहार अर्पण करून स्वयंसेवकांच्या वतीनें थैली देण्यांत आली. त्या समारंभांत कांहीं स्वयं-सेवकांचींहि भाषणें झालीं. त्यांतील एकाकडून, "आपण आपल्या डॉक्टरांना हा 'शेवटचा' निरोप देत आहोंत," असें एक वाक्य नवशिकेपणामुळें चुकून निघून गेलें. त्याची चूकहि त्याच्या ध्यानांत आली व तो गोंधळून थोडासा थांबला ! त्याचें तें वाक्य सर्वांनाच जाणवलें. पण डॉक्टर मात्र त्याच्याकडे प्रसन्नतेनें पाहत हंसत होते ! त्या समारंभांत जें पद्य गाइलें गेलें, त्यांतील भावनाच त्या काळांत स्वयं-सेवकांच्या मनांत वसत असे. ती अशी कीं—

"तुम्हि असल्यावरति अम्हां काय हो उणें ।
तुम्हि असल्यावरति गमे गगन ठेंगणें ॥"

नि हीच भावना त्या समारंभांतील भाषणांतून प्रकट झाली होती.

दुसऱ्या दिवशीं पुणें स्थानकावर प. पू. डॉक्टरांना निरोप देण्यासाठीं आलेल्या स्वयंसेवकांनीं फलाट फुलून गेला होता. ते तेथें येतांच प्रांतच्या संघ-चालकांना म्हणाले, "प्रांत ! आपली फौज उभी करा !" त्यांच्या आदेशानुसार सर्वांना दोन ओळींत अंतर्मुख उभें करण्यांत आलें व मग ते त्यांच्यामधून पाहणी करीत व कांहीं जणांचा परिचय करून घेत डब्याजवळ गेले. डब्याच्या दाराजवळ उभे राहून डॉक्टर कार्यकर्त्यांजवळ हास्यविनोद करीत होते; तोंच गाडी सुटण्याची घंटा झाली. गाडी सुरू होतांच हातांतील वेताची छडी दोन्ही हातांनीं उंचावीत डॉक्टर सर्व स्वयंसेवकांना ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें म्हणाले, "हा मी चाललों !" शेंकडों स्वयंसेवकांच्या ओलावलेल्या डोळ्यांसमोरून परमपूजनीय डॉक्टरांची प्रसन्न मूर्ति सरकत होती.

दुसऱ्या दिवशीं परमपूजनीय डॉक्टर व गयेचे संघचालक श्री. बबुआजी हे नागपूर स्थानकावर येऊन पोहोंचले. त्या वेळीं नागपूरच्या अधिकारी शिक्षण वर्गाचे सर्वाधिकारी या नात्याने श्रीगुरुजी त्याना उतरून घेण्यासाठी काहीं अधिकाऱ्यासमवेत तेथें आले व डॉक्टर डब्यांतून खालीं उतरतांच त्यांनीं मोठ्या भक्तिभावनेने एक भरघोस सुवासिक पुष्पहार त्याना घालण्यासाठीं हात पुढे केले. पण 'मला हार घालतां ? तो नवीन आलेल्या बबुआजींना घाला !' इतका आशय प. पू. डॉक्टराच्या त्या वेळच्या तीव्र नेत्रकटाक्षांतून श्रीगुरुजींच्या ध्यानी आला आणि त्यांनीं तो हार गयेच्या संघचालकांना समर्पण केला. कठोर कर्मयोग आचरतांना स्वागत, सत्कार नि स्तुति याची लालसा त्याच्या मनांतून केव्हाच विरून गेली होती. त्यामुळे संघात नवीन येऊं लागलेल्या समाजातील कर्त्या पुरुषाला आपल्या सौजन्याच्या कृपावृष्टीने प्रसन्नता वाटून सघाचे अनुयायित्व सहर्ष स्वीकारण्यात ज्यांतून धन्यता वाटेल, तीच गोष्ट त्याना प्रिय वाटली असल्यास नवल नव्हतें.

नागपूरला आल्यावर पाहुण्यासह ते नील सिटी प्रशाळेत असणाऱ्या अधिकारी शिक्षण वर्गाच्या वसतिगृहांत गेले व त्या दिवशीं दुपारी झालेल्या बौद्धिक वर्गालाहि ते उपस्थित राहिले. पुण्यापासून झालेल्या प्रवासाचा शीण त्याच्या मुखावर उमटला होता. त्यात नागपुरातील रणरणत्या उन्हाळ्याच्या झळांनीं त्याच्या त्रासांत भरच घातली. ११५-११६ अशावर गेलेल्या उष्णता-मानानें सामान्य धडधाकट माणसाची स्थितिहि जेथे केविलवाणी होते, तेथे बऱ्याच दिवसाच्या कष्टानीं व आजारानी क्षीण आणि अशक्त झालेल्या प. पू. डॉक्टराची अवस्था काय सांगावी ? पुण्याचा उन्हाळा हा नागपूरच्या मानाने शीतलच म्हणावा लागेल व त्यामुळें पंधरा-वीस दिवस पुण्यांत राहून आल्यावर नागपूरचा रखरखाट त्याना अधिकच जाणवला असल्यास नवल नव्हते. या त्रासाने सायंकाळींच त्याना ताप जाणवूं लागला व तशाच स्थितींत ते त्या वर्गात वावरत होते.

निरनिराळ्या प्रांतांत संघाच्या कामाचे बीजारोपण होऊन तीन-चार वर्षे झालीं होतीं तरीहि या वर्षाइतके कार्यकर्ते संघाचें शिक्षण घेण्यासाठी संघाच्या केंद्रस्थानीं पूर्वी कधीच आले नव्हते. तेथील वर्गातील १४०० स्वयंसेवकात जवळ जवळ ६०० स्वयंसेवक सीमाप्रांत, पंजाब, उत्तर प्रदेश, बिहार, बंगाल, मद्रास, कर्नाटक, गुजरात व महाराष्ट्र या भागातून आले होते. ही प्रगति डॉक्टराना काहींशी आनंददायक वाटली असल्यास नवल नव्हते. अशा प्रांतोप्रांतींच्या कार्यकर्त्यांजवळ पुढील वीस-पंचवीस दिवसांत सघासंबधीं जवळून बोलणीं करतां येतील, अशी आशा बाळगून त्यानीं नागपुरांत पाऊल ठेवलें. पण नियतीची योजना कांहीं निराळीच होती !

प. पू. डॉक्टर नागपूरला पोहोंचले त्याच दिवशीं रात्रीं वर्गातील सर्व स्वयंसेवकांसाठीं संत तुकडोजी महाराज यांचें भजन योजलेलें होतें. त्या कार्यक्रमाला ताप असूनहि प. पू. डॉक्टर येऊन बसले. पण थोड्याच वेळांत तेथें बसणें त्यांना अशक्य वाटूं लागल्यानें, ते एकटेच तेथून उठून घरीं गेले. त्या वेळीं त्यांच्या घरांतील मंडळीहि भजनासाठीं गेलेली होती. त्यामुळें ते कसेबसे माडीवर जाऊन अंथरूण घालून पडले. रात्रीं मंडळी घरीं येऊन पाहतात तों डॉक्टरांच्या अंगांत १०४° ताप होता !

दुसऱ्या दिवसापासून औषधोपचार सुरू झाले. ताप व पाठींतील दुःख कधीं थोडें कमी होई पण त्यामागोमाग पुन्हा त्याची तीव्रता वाढे. डॉ. हरदास, डॉ. विंचुरे आदि डॉक्टरमंडळी वरचेवर येऊन पाहणी करून जात. पण उतार पडण्याचें चिन्ह दिसेना. उगवणारा प्रत्येक दिवस डॉक्टरांच्या अशक्ततेंत आणि सर्वांच्या चिंतेंत भरच घालीत होता. हिंदुस्थानांतील इतके तरुण कार्यकर्ते एकत्र आले असतां, त्यांच्याजवळ बोलणें करण्याची शक्ति उरली नाहीं, या गोष्टीचें डॉक्टरांना अतीव दुःख होई व त्यांची होणारी तगमग चांगलीच जाणवे. ते आजारी आहेत, हें कळल्यावर स्वाभाविक ओढीनें प्रांतोप्रांतींचे वर्गातील स्वयं-सेवक त्यांचें ओझरतें दर्शन तरी घडावें, यासाठीं घरीं येऊं लागले. पण त्यांच्या खोलींत कोणी आल्याची चाहूल लागतांच, ते प्रत्येक वेळीं उठून बसत व त्यामुळें त्यांची अशक्तता वाढूं लागली. शेवटीं त्यांना भेटण्यासाठीं कोणीहि घरीं जाऊं नये, अशी सूचना देणें भाग पडलें. इतकें करूनहि बाहेरगांवांहून त्यांना भेटा-वयास कोणी ना कोणी येतच होतें. अशा येणाऱ्यांना कोणी बाहेरच्या बाहेरच परतवून लावण्याचा प्रयत्न करीत आहे, अशी कुणकुण डॉक्टरांना तेव्हांच लागे व तेच त्यांना ‘ आंत पाठवा ’ असें आंतून सांगत.

डॉक्टर असे पडून असतांनाच मुंबईहून डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी यांचें पत्र आलें कीं, ते दि. २० ला नागपूरला येऊन व त्यांची भेट घेऊन दि. २१ मेला कलकत्त्याला जातील. या काळांत बंगालमध्यें श्री. फजलुल हक्क यांचें मंत्रिमंडळ होतें व त्यांच्या गुप्त प्रेरणेनेंच नोआखली भागांतील हिंदूंवर अनन्वित अत्याचार होण्यास सुरुवात झाली. मुस्लिम लीगमधील लोकांनीं चालविलेल्या हिंदूंच्या या ससे-होलपटीकडे जाणूनबुजूनच इंग्रज शासकांनीं दुर्लक्ष केलें. त्यांत हिंदूंना आपल्या-विरुद्ध उठाव करण्यास सवड मिळूं नये म्हणून परस्परच त्यांचा लीगकडून बींमोड करण्याचा हा इंग्रजांचा राजनैतिक कुटिल डाव होता. अशा बिकट परिस्थितींतून मार्ग काढण्यासाठीं डॉ. श्यामाप्रसादांनीं खटपट चालविली होती व त्यासाठींच ते प. पू. डॉक्टरांना भेटण्यास येत होते.

नागपूरला आल्यावर डॉ. शामापसाद मुखर्जींनीं संघाच्या वर्गाची पाहणी केली व रात्रीं ९ वाजतां ते प. पू. डॉक्टरांच्या घरीं येऊन पोहोंचले. डॉक्टरांनीं

पुढें होऊन त्यांचे सहर्ष स्वागत केलें. हस्तांदोलन करीत असतां श्यामाबाबूंनीं डॉक्टरांकडे निरखून पाहत विचारलें, " मीं तर ऐकलें होते कीं, आपली प्रकृति अत्यवस्थ असून आपण अंथरुणाला खिळून आहात !" त्यावर डॉक्टर हंसत म्हणाले, " आपल्यासारखा बडा डॉक्टर माझ्याकडे येणार असें कळताच माझा आजार भीतीने पळून गेला !" या वेळी डॉक्टरांच्या अंगांत १०३° ताप असतां ते इतकें अवसान कोठून आणीत असत, ते त्याचे तेच जाणत !

डॉक्टरानीं श्यामाबाबूंना सोप्यात आणून बसविले व एकमेकाचे कुशल विचारून बोलण्याला सुरुवात झाली. या वेळी श्रीगुरुजी, भंडाऱ्याचे श्री. दादासाहेब देव, श्री. आप्पाजी जोशी व नागपुरातील काही प्रमुख कार्यकर्ते तेथे उपस्थित होते. औपचारिक प्रश्नावरून थोड्याच वेळात श्यामाबाबूंनीं बंगालमधील हृदय-द्रावक घटना सागण्यास सुरुवात केली. त्याच्या शब्दाशब्दातून चीड व सताप व्यक्त होत होता नि सोप्यातील सर्वांचेच चित्त त्या कथनाने थरारून उठलें. डॉक्टर अगदीं लक्षपूर्वक ते बोलणे ऐकत होते. अनेक संतापजनक प्रकार सागून झाल्यावर श्यामाबाबू म्हणाले, " आता बंगालमध्ये एखादे हिंदुरक्षादल काढल्या-वाचून हिंदूंना तरणोपाय नाहीं !" हे शब्द उच्चारताना आत्यतिक कळवळ्यानें त्यांचा कंठ दाटून आला ! यावर डॉक्टरानी शका प्रदर्शित केली कीं, " आपण ' हिंदुरक्षा दल ' काढण्याचा विचार करीत आहात पण इंग्रज व लीगी मुसलमान आपल्या डोळ्यादेखत त्याच्या अस्तित्वाला आव्हान करणारे हे दल चालू देतील काय ?"

त्यावर डॉ. श्यामाप्रसाद जरा विचारात पडलेले दिसले. ते म्हणाले, " मग यांतून हिंदूंना नेमका असा मार्ग कोणता ?"

त्यावर अत्यंत गंभीर पण शांत स्वरांत डॉक्टरांनी आपली भूमिका विशद केली. त्यांत, " बंगाल वा पंजाबमध्ये उत्पन्न झालेल्या व ठिकठिकाणीं अधून मधून हिंदूंच्या दृष्टीने उत्पन्न होणाऱ्या बिकट परिस्थितीचें मूळ आपल्या समाजाच्या विसंघटित स्थितींत आहे व ही स्थिति कायमची दूर केल्यावांचून हा असा उपद्रव हिंदूंच्या वांट्याला कोठे ना कोठें तरी येत राहणारच. यावर तात्पुरते व जुजबी उपाय योजून विशेष लाभ नाहीं. त्याचप्रमाणे दुसऱ्याच्या द्वेषानें भडकून उठून प्रतिक्रियात्मक उपाय योजूनहि राष्ट्रीय दृष्टीने उत्पन्न झालेली आणीबाणीची परिस्थिति कायमची दूर करतां येणार नाहीं. त्यासाठीं देशांतील हिंदूंच्या मनांत समष्टिभाव निर्माण करणे व एकराष्ट्रीयत्वाच्या संस्कारांनीं हिंदूंचीं मने प्रभावी बनविणें अत्यावश्यक आहे. परस्परांतील प्रेम व राष्ट्र या दृष्टीने वैभवाच्या शिखरावर चढण्याची महत्त्वाकांक्षा हिंदु समाजात जागृत करणे हाच विधायक व टिकाऊ राष्ट्रोत्थानाचा मार्ग आहे व तोच संघ अनुसरत आहे," अशा आशयाचे विचार त्यांनीं व्यक्त केले.

ह्याच संभाषणांत श्यामाबाबूंनीं अशी एक सूचना केली कीं, 'यापुढें संघानें राजकारणांत पडावें.' त्यावर डॉक्टरांनीं क्षणाचाहि विलंब न लावतां उत्तर दिलें कीं, "चालू राजकारणांत संघ भाग घेत नाहीं." ( Sangh does not take part in day-to-day politics. )

तसेंच बंगालमध्यें नुकत्याच सुरू झालेल्या संघकार्याला आपल्यासारख्यांचा आशीर्वाद व पाठिंबा मिळाला कीं तेंच काम द्रुतगतीनें वाढेल, असा आशावादहि प. पू. डॉक्टरांनीं व्यक्त केला व आपण जें कार्य हिंदूंच्या रक्षणासाठीं उभें कराल त्याला होईल तें साहाय्य देण्याचें आश्वासन दिलें. प. पू. डॉक्टरांच्या आत्म-विश्वासपूर्ण व मूलगामी विचारसरणीनें भारावलेले श्यामाबाबू ज्या वेळीं डॉक्टरांचा निरोप घेण्यासाठीं उभे राहिले तेव्हां त्या दोघांनींहि परस्परांकडे इतक्या आत्मीयतेनें पाहिलें कीं, त्याचें वर्णन शब्दांत करणें अशक्य आहे.

वर्ग चालू होता आणि चौदाशें स्वयंसेवकांचे पहांटे ४ पासून रात्रीं १० वाजेपर्यंत चालणारे सर्व कार्यक्रम वेळच्या वेळीं, योजनेनुसार व परिणामकारक रीत्या पार पडावेत, यासाठीं श्रीगुरुजींची खटपट सुरू होती. या धांवपळींतूनच वेळ काढून ते अधूनमधून डॉक्टरांकडे येत व औषध नि अनुपान नीट रीतीनें चालू आहे कीं नाहीं, याची पाहणी करीत. डॉक्टरांच्या शुश्रूषेसाठीं त्यांच्या घरांतील मंडळी तर होतीच; त्यांच्या जोडीला योजनेनुसार कांहीं स्वयंसेवकहि त्यांच्याजवळ जाऊन बसत. श्री. यादवराव जोशी, कृष्णराव मोहरीर, श्रीकृष्ण पुराणिक, बाबासाहेब देशमुख, भाऊराव देवरस आदि तरुण त्यांत प्रामुख्यानें असत. अशा जवळ बसणाऱ्या स्ववंसेवकांजवळ पडल्या पडल्या डॉक्टर बोलणें करीत. त्यांनीं अधिकांत अधिक महाविद्यालयीन शिक्षण घेतलें पाहिजे व तरुणांनींच यापुढें एकेका प्रांताचें उत्तरदायित्व स्वीकारून उभें राहिलें पाहिजे, असे विषय त्यांच्या बोलण्यांत येत. एकदां काशीच्या हिंदु-विश्वविद्यालयांत शिकणारा एक तरुण स्वयंसेयक श्री. विश्वनाथ लिमये तेथें त्यांना म्हणाला, "माझ्या शिक्षणाचें हेंच शेवटचें वर्ष आहे. यापुढें शिक्षण देण्याचा माझ्या वडिलांचा विचार नाहीं. तेव्हां पुढल्या वर्षीं मी काशीला जाऊं शकेन असें दिसत नाहीं." त्यावर पडल्या-पडल्या डॉक्टर दुःखित होऊन म्हणाले, "काशीला सर्व जण शिक्षणासाठींच जातात. संघासाठीं तेथें कोणीच जात नाहीं, हें मला माहीत आहे. शिक्षणाच्या अनुषंगानेंच संघाची योजना केली जाते. पण यापुढें या गोष्टीचा जरा गंभीरपणेंच विचार केला पाहिजे !" डॉक्टरांनीं त्या आजारांत ही जी चिंता व्यक्त केली तिचें सामर्थ्य असें कीं, तो ऐकणारा स्वयंसेवक आतां संघाचाच व्यवहार चोवीस तास करणारा प्रचारक झाला आहे !

प. पू. डॉक्टरांना नागपूरला येऊन पंधरवडा उलटला तरी त्यांच्या प्रकृतींत कांहीं उतार दिसला नाहीं. तेव्हां आतां लवकरच वर्ग संपून सर्व जण गांवोगांव

परतणार व आपणांला स्वयंसेवकांची नीट भेटहि घेतां येणार नाहीं, याची त्यांना अत्यंत खत वाटूं लागली. त्यांनीं वर्गाच्या अधिकाऱ्यांना अगदीं गळ घातली कीं, एकदां मला वर्गात घेऊन चला व सर्वांना डोळे भरून पाहूं द्या. त्याप्रमाणे रविवार दि. २ जूनला सायंकाळच्या शात समयीं बौद्धिक वर्गाला त्यांना नेण्यात आलें. त्या दिवशीं, श्रीशिवछत्रपतींनीं मिर्झा राजे जयसिंह यांस लिहिलेल्या पत्रावर श्रीगुरुजी यांचे ओजस्वी आणि विचारप्रवर्तक भाषण झाले. त्या भाषणातील आत्मविश्वास व हिंदुराष्ट्राच्या उद्धारासबधीची ज्वलंत आकाक्षा डॉक्टराना उल्हसित करणारी होती. ते प्रसन्न होऊन घरीं परत आले. एवढेच नव्हे तर गुरुजीचे भाषण ' उत्कृष्ट ' झाले, अशी प्रशसा त्यानीं अनेक जणाजवळ केली. त्यानंतर वर्ग संपण्याचे वेध लागले व प. पू. डॉक्टराचे विचार येथे येऊनहि ऐकण्याचा योग येत नाहीं, अशी रुखरुख वर्गात हरघडीं व्यक्त होऊ लागली. संघाच्या दृष्टीने हा शिक्षण वर्ग म्हणजे एक पर्वणीच होती. अशा वेळीं आपण अंथरुणाला खिळून आहोत, या दुःखाचे चटके डॉक्टराना अखड जाणवत होते. अशा स्थितीत असताना दि. ८ जूनला त्या वर्गाचा प्रकट समारोप समारभ झाला. त्या वेळी स्वतःला जाता यावे, म्हणून डॉक्टरानीं आपल्या डॉक्टरापाशीं व गुरुजीपाशी समारंभाला नेण्याचा आग्रह धरला. पण त्याच्या प्रकृतीचे मान त्याना दूर उघड्या मैदानावर नेण्यासारखे नसल्याने निरुपाय होऊन डॉक्टराचे मन त्याना मोडावें लागलें. डॉक्टर त्या नकाराने अत्यंत विषण्ण होणें स्वाभाविक होते. त्याना वाटे कीं, एवीतेवी प्रकृति सुधारत नाहीं, मग निष्कारण स्वयंसेवकाना भेटण्याची सुसंधि हे का देत नाहींत ?

या समारोपाच्या कार्यक्रमाहून परत आल्यावर डॉक्टराच्या मनाची ही तडफड इतराना जाणवल्यावाचून राहिली नाहीं व त्यातूनच दुसऱ्या दिवशी सकाळीं वर्गाच्या होणाऱ्या खाजगी समारोपाला त्याच्या समाधानासाठी त्याना नेण्याचा विचार निश्चित करण्यात आला. डॉक्टराच्या मनाला या निर्णयाने स्वाभाविकच तरतरी आली. कारण त्याचे मन, संघाच्या कामाची प्रगति पाहून वाटणारें समाधान व्यक्त करावें व पुढील कार्यासंबंधीचे मार्गदर्शन करावे, यासाठी आसुसले होते.

त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्यांना वर्गाच्या ठिकाणी नेण्यांत आले. जवळजवळ दीड-दोन सहस्र लोकांना त्यांचे भाषण नीट ऐकूं जावे व भाषण करताना प. पू. डॉक्टराना त्रास कमींत कमी व्हावा, म्हणून ध्वनिक्षेपकाची योजना करण्यात आली होती व डॉक्टरांना बसण्यासाठीं ठेवलेल्या खुर्चीवर खाली व कडेनें मऊ उशा लावलेल्या होत्या. ठीक वेळेवर डॉक्टर तेथें आले व त्यांनीं तो उशांचा थाट पाहून, त्या स्वतःच खालीं काढून ठेवल्या. स्वतःच्या शरीराचे नसते चोजले जणूं त्याना पसंत नव्हते ! त्यानंतर प्रांतोप्रांतींच्या कांहीं निवडक

स्वयंसेवकांनीं वर्गांतून आपण काय घेऊन जात आहोंत व आपल्या कार्यक्षेत्रांत गेल्यावर संघकार्याची कशी उभारणी करणार, यासंबंधीं विचार मांडले. त्या सर्वांच्या बोलण्यांत चढाऊ आशावादच उमटला होता. त्यांचीं भाषणें झाल्यावर परमपूजनीय डॉक्टरांनीं अविस्मरणीय भाषण केलें. त्यांत ते म्हणाले—

"माननीय सर्वाधिकारी, प्रांतसंघचालक, अधिकारीवर्ग व स्वयंसेवक बंधुगण ! मला वाटत नाहीं, तुमच्यापुढें दोन शब्द तरी मी आज नीटपणें सांगूं शकेन. तुम्हांला माहीतच आहे कीं, गेल्या चोवीस दिवसांपासून मी अंथरुणावर पडून आहें. संघाच्या दृष्टीनें हें वर्ष अत्यंत सद्भाग्याचें आहे. आज माझ्यासमोर हिंदुराष्ट्राचें छोटें स्वरूप मी पाहत आहें. परंतु प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें इतके दिवस नागपुरांत राहूनहि आपला परिचय करून घेण्याची माझी इच्छा सफल होऊं शकली नाहीं. पुण्याच्या ओ. टी. सी. मध्यें मी पंधरा दिवस होतों व तेथील प्रत्येक स्वयंसेवकाचा मीं स्वतः परिचय करून घेतला. मला वाटलें होतें कीं, नागपूरच्या ओ. टी. सी. मध्यें देखील मी असेंच करूं शकेन. पण आपली सेवा मुळींच करतां आली नाहीं, म्हणून आज आपणां सर्वांच्या दर्शनाकरितां मी मुद्दाम आलों आहें.

"माझा व आपला यत्किंचितहि परिचय नसतांना अशी कोणती गोष्ट आहे कीं, जिच्यामुळें तुमचीं अंतःकरणें माझ्याकडे व माझें अंतःकरण तुमच्याकडे धांव घेतें ? राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचें तत्त्वज्ञानच असें प्रभावी आहे कीं, ज्या स्वयंसेवकांचा परस्परांशीं परिचय नाहीं त्यांना देखील पाहतां क्षणींच एकमेकां-विषयीं प्रेम वाटतें. बोलतां बोलतां क्षणभरांत ते एकमेकांचे मित्र होऊन जातात. नुसतें परस्परांना पाहून स्मित हास्य करतांच त्यांची एकमेकांना ओळख पटते. मागें पुण्याला असतांना मी व सांगलीचे श्री. काशिनाथराव लिमये एकदां लकडी पुलावरून जात होतों. इतक्यांत समोरून येणारीं नऊ-दहा वर्षांचीं दोन मुलें आमच्याजवळून जातांना किंचित् स्मित करून पुढें जाऊं लागलीं. तेव्हां मी काशिनाथरावांना म्हटलें, 'हीं मुलें संघाचीं आहेत !' माझ्या बोलण्याचें काशिनाथरावांना आश्चर्य वाटलें. अगदीं अपरिचित अशा या मुलांना मीं निर्धास्तपणें स्वयंसेवक ठरविलें तरी कसें, हा प्रश्न त्यांना पडल्यासारखा दिसला. त्यांनीं मला विचारलें, 'हे आपले स्वयंसेवक कशावरून म्हणतां ?' कारण त्या दोघांचे वेषांत स्वयंसेवकत्वाचें निदर्शक असें दृश्य चिन्ह कोणतेंहि नव्हतें. मीं म्हटलें, 'मी म्हणतों म्हणून. तुम्हांला प्रचीति पहावयाची आहे ?' थोडें दूर गेलेल्या त्या दोघांनाहि मीं जवळ बोलाविलें व 'तुम्ही आम्हांला ओळखतां काय ?' असें विचारलें. त्यांनीं ताबडतोब उत्तर दिलें, 'दोन वर्षांपूर्वी शिवाजी-मंदिरांतील बाल शाखेंत आपण आलां होतां. तुम्ही आमचे सरसंघचालक डॉ. हेडगेवार व हे सांगलीचे श्री. काशिनाथराव लिमये !' ही संघाची पुण्याई

आहे. कोणाहि एकट्या व्यक्तीचें हे कार्य नाहीं. आतांच येथे बोललेले आपले मद्रासचे श्री. सजीव कामथ अनोळखी म्हणून आले व चार दिवसांत बंधु होऊन गेले. हे कार्य माणसाचे नसून संघाचे आहे. भाषाभिन्नता व आचारभिन्नता असूनहि पंजाब, बंगाल, मद्रास, मुबई, सिध येथील स्वयंसेवकाचे परस्परावर इतके प्रेम का ? तर ते राष्ट्रीय स्वयसेवक सघाचे घटक आहेत म्हणून. आपल्या संघात प्रत्येक स्वयसेवक दुसऱ्या स्वयसेवकावर सख्ख्या भावापेक्षाहि जास्त प्रेम करतो. सख्खे भाऊसुद्धा प्रसगीं इस्टेटीकरिता भाडतात. पण तशी गोष्ट स्वयसेवकाची नाहीं. मी आज चोवीस दिवसपर्यंत घरीं होतो, पण माझे अंतःकरण तुमच्याजवळ होते. माझे शरीर घरात व मन मात्र तुमच्याबरोबर कॅपमध्ये वावरत होते. काल सायंकाळीं पाच मिनिटे प्रार्थनेपुरते तरी संघस्थानी यावे, अशी उत्कट इच्छा होती. पण डॉक्टर-लोकाच्या अत्याग्रहामुळे तो बेत रहीत करावा लागला.

" आज तुम्ही आपापल्या स्थानी परत जात आहात. मी तुम्हाला प्रेमाने निरोप देत आहे. हा वियोगाचा प्रसंग असला तरी दुःखाचा खास नव्हे. जे करण्याचा कृतनिश्चय करून तुम्ही सारे येथे आलात, त्या कार्याच्या पूर्तीस्तवच तुम्ही स्वस्थानीं जात आहात. जोपर्यंत शरीरात प्राण आहेत, तोपर्यंत संघाला विसरणार नाहीं, अशी प्रतिज्ञा करा. कोणत्याहि मोहाने आपण विचलित होऊ नका. ' मी पाच वर्षापूर्वी सघाचा सदस्य होतो ' असले वाक्य उच्चारण्याचा प्रसग आयुष्यात केव्हाहि येऊ देऊ नका. आपण आमरण स्वयसेवक आहोत. तनमनधन-पूर्वक सघकार्य करण्याचा केलेला निर्धार अखड जागृत राहूं द्या. ' आज मजकडून किती काम झाले ? ' याची रोज निजते वेळी आठवण करा. सघाचे कार्यक्रम बिनचूक करणे किवा रोज नियमाने सघस्थानी उपस्थित राहणे एवढ्यानेच सघकार्य सपत नाहीं, ही गोष्ट लक्षात ठेवा. आसेतुहिमाचल पसरलेल्या हिंदु समाजाला आपल्याला सघटित करावयाचे आहे. महत्त्वाचे कार्यक्षेत्र संघाबाहेरच आहे. सघ केवळ स्वयसेवकापुरता नाही. संघाबाहेरील लोकासाठींहि संघ आहे. राष्ट्रोद्धाराचा खरा मार्ग या लोकाना दाखवून देणे हे आपले कर्तव्य आहे. हिंदु जातीचे अंतिम कल्याण या सघटनेनेच होणार आहे. दुसरे कोणतेहि काम राष्ट्रीय स्वयंसेवक संघाला करावयाचे नाही. सघ पुढे काय करणार आहे, हा प्रश्न निरर्थक आहे. संघ, हेच सघटनेचे कार्य पुढेहि कितीतरी वेगाने करणार आहे. हा मार्ग आक्रमण करता करता असा एक सोन्याचा दिवस निश्चित उगवेल कीं, ज्या दिवशीं सर्व हिंदुस्थान संघमय झालेला दिसेल. मग हिंदु जातीकडे वाकड्या दृष्टीने पाहूं शकणारी कोणतीहि शक्ति उभ्या जगात राहणार नाही. आम्ही कोणावर आक्रमण करावयास निघालो नाही, पण आमच्यावर आक्रमण होणार नाही, अशी खबरदारी मात्र आम्हाला घेतलीच पाहिजे.

" मी आज आपणाला काहीं नवीन सागतो असे नाही. आपल्यापैकीं प्रत्येक

स्वयंसेवकानें संघाचें कार्य हें आयुष्यांतलें प्रधान कार्य समजलें पाहिजे. 'संघकार्य हेंच माझें जीवितकार्य' हा मंत्र हृदयावर कोरून घेऊन मगच आपण आपापले स्थानीं परत जाल, अशा दृढ विश्वासानें मी आपणांस निरोप देत आहें."

या भाषणानें हिंदुस्थानांतील दूरदूरच्या प्रांतांतून आलेल्या स्वयंसेवकांना नागपूरला आल्याचें सार्थक झालें, असें वाटल्यावांचून राहिलें नाहीं. खरोखरच सर्व जीवनपथ चालून जाईपर्यंत पुरणारें पाथेय आज त्यांना मिळालें होतें. पण प. पू. डॉक्टरांच्या मुखांतून उमटलेली पावनवाणी ऐकण्याचा सुयोग लाभला म्हणून स्वयंसेवक धन्यता मानीत होते, तर त्याच वेळीं भाषणामुळें अत्यंत थकलेले व तापानें जर्जर झालेले डॉक्टर वसतिगृहांतील सर्वाधिकाऱ्यांच्या खोलींत गलितगात्र होऊन पहुडले होते. थोडा वेळ तेथें त्यांना विश्रांति मिळाल्यावर घरीं नेण्यांत आलें. त्या दिवशीं गांवोगांव परतणाऱ्या स्वयंसेवकांची त्यांच्याकडे सारखी ये-जा सुरू होती. या काळांत त्यांचा बिछाना माजघरांत होता व तेथें सदैव मंद प्रकाश ठेवण्याची दक्षता घेतली जाई. असा निरोप घेण्यासाठीं येणाऱ्यांची प. पू. डॉक्टर मोठ्या आस्थेनें चौकशी करीत होते व त्या त्या ठिकाणच्या प्रौढ कार्यकर्त्यांना व संघचालकांना आठवणपूर्वक नमस्कार कळविण्यास सांगत होते. या काळांत त्यांना आलेल्या अनेक पत्रांना उत्तरें पाठविणें हें त्यांना अगदींच अशक्य होऊन बसल्यानें अशा जाणाऱ्या स्वयंसेवकांबरोबरच 'लौकरच आपणांला उत्तर पाठवितों; रागावूं नका,' असे तोंडी निरोपहि त्यांनीं पाठविले होते. असाच निरोप मुंबईचे श्री. बापुराव लेले यांच्याबरोबर श्री. बाबाराव सावरकर व श्री. दादा नाईक यांना पाठविलेला दिसतो.

हा वर्ग संपतांच प. पू. डॉक्टरांच्या हातांत डॉ. श्यामाप्रसादांचें पत्र येऊन पडलें. त्या पत्रांत दि. १८ जूनपासून कलकत्त्याजवळ सहा-सात आठवडे चालणारें एक शिक्षण-केन्द्र उघडण्याचा निश्चय कळविलेला होता व त्या केन्द्रांत येणाऱ्या शंभर तरुणांना शारीरिक, सैनिकी आणि हिंदुराष्ट्रोत्थानाच्या दृष्टीनें बौद्धिक शिक्षण देण्यासाठीं कांहीं निष्णात असे शिक्षक पाठविण्याची मागणी केलेली होती. या पत्रानुसार काय करतां येईल, याचा विचार मनांत घोळत असतांनाच वर्गासाठीं आलेले कलकत्त्याचे दहा-बारा स्वयंसेवक त्यांचा निरोप घेण्यासाठीं आले. रात्रीं ८ ची वेळ होती व श्रीगुरुजी डॉक्टरांची विचारपूस करून बाहेर निघाले होते. एवढा घोळका आलेला पाहून 'भेट लवकर आवरा' असा इशारा देऊनच ते बाहेर पडले. कलकत्त्याविषयीं डॉक्टरांना स्वाभाविकच अधिक चिंता होती. तेव्हां त्या स्वयंसेवकांना त्यांनीं प्रश्न केला कीं, "बॉंगला ए वार काज कि रॉकोम हॉबे ?" (बंगाल्यांत या वेळीं काम कसें होईल ?) थोडा वेळ ते बंगालींतच बोलले व त्यांत त्यांनीं त्यांना सांगितलें कीं, "डॉ. श्यामाप्रसाद प्रचारक पाठवा असें म्हणतात. तसे प्रचारक

पाठवूंहि. पण खरे काम असे प्रचारक पाठवून होत नाही. त्यासाठीं आपण स्थानिक मंडळींनींच मनावर घेतले पाहिजे ! ”

वर्ग संपला होता आणि श्रीगुरुजी व नागपूरमधील प्रमुख कार्यकर्ते त्या व्यापांतून मोकळे झाले. आता प. पू. डॉक्टराच्या प्रकृतीकडे स्वाभाविकच अधिक लक्ष देता येऊं लागले. पण दिवसेंदिवस चिंतेत भर पडावी अशीच स्थिति डॉक्टराच्या प्रकृतीची होऊन बसली. त्याना उपचार करणाऱ्या डॉक्टर मंडळींनाहि आजाराच्या स्वरूपाचा नीट उलगडा होईना. तेव्हा त्याच्या प्रकृतीची आधुनिक साधनानीं सर्वांगीण पाहणी करून घ्यावी, असा विचार निघाला. तोंवर मुंबईहून काही महत्त्वाचीं औषधें येऊन पोचली आणि लाहोरहून श्री. धर्मवीरजी याच्याकडून डॉक्टराना एक बंडी ( Waist-coat ) शिवण्यासाठी दोन उत्तम कमावलेली मऊ कातडीं आलीं. प. पू. डॉक्टराना पंजाबमध्ये थारेपालट करण्यासाठीं न्यावे, ह्या विचाराने तिकडील तज्ज्ञाच्या विचाराने हिस्सार जिल्ह्यातील सिरसा ( Sirsa ) व लाहोरपासून तीन मैलावर असलेले शहादारा ( Shahadara ) हीं दोन ठिकाणे योजून धर्मवीरजींनीं दि. ११ जूनला तसे नागपूरला कळविले. त्यामागोमाग प. पू डॉक्टराना पंजाबपर्यंतचा प्रवास झेपेल काय, यासबधींची विचारणा करणारे पत्र येऊन थडकले. पंजाबप्रमाणेच महाराष्ट्रातील कोरड्या आणि आरोग्यदायक अशा मिरजेहूनहि निमंत्रण आले व नागपूरचे सघचालक श्रीमंत बाबासाहेब घटाटे यानीहि त्याना ‘ छिंदवाड्याला चला ’ असा आग्रह चालविला.

या सर्व आग्रहामागील जिव्हाळा व प्रेम विलक्षण होते. पण निष्ठुर काळाचा विचार काही निराळाच चालला होता ! थारेपालट करावयास जाण्याची शक्यताच जवळजवळ उरली नव्हती. अखेर दि. १५ ला तज्ज्ञाच्या इच्छेनुसार डॉक्टराना नागपूरच्या ‘ मेयो रुग्णालया ’त नेण्यात आलें व विविध प्रकारची पाहणी सुरू झाली. ‘ क्ष ’ किरणानीं त्याच्या छातीचे चित्रण करण्यात आले. पण त्यातूनहि त्याच्या पाठींतील वेदनावर काहींच प्रकाश पडू शकला नाहीं. रुग्णालयातील वातावरणात गेल्यापासून प. पू. डॉक्टर अधिकच अस्वस्थ झालेले दिसू लागले. तेथे गेल्यावर त्यानीं त्याचे मित्र श्री. नानासाहेब तेलंग याना आणण्यासाठीं मोटार पाठविली. ते तेथे पलंगाजवळ येताच डॉक्टर त्याना म्हणाले, “ आपण आजारी आहात, हें मला कळलें होते. पण माझी ही अशी स्थिति असल्याने आपल्या समाचाराला मी येऊ शकलो नाही. आपण आलात हे चागले झाले. ”

त्याच दिवशीं शेजारीं बसलेल्या यादवराव जोशी याच्याजवळ त्यानीं विषय काढला कीं, “ संघाचे सर्वांत वरिष्ठ अधिकारी दिवंगत झाले तर तुम्ही त्याचा अत्यसंस्कार लष्करी थाटाने कराल काय ? ” हा अप्रिय विषय अर्थातच कोणाहि स्वयसेवकाला रुचणारा नव्हता. तेव्हा यादवरावांनीं त्या प्रश्नाकडे ऐकल्या-न ऐकल्यासारखे करून, औषध घेण्याची वेळ झाली आहे, अशी आठवण करून

दिली. पण त्यांनीं तिकडे दुर्लक्ष करून आपला विचार व्यक्त केला. त्याचा आशय असा होता कीं, " संघ हें एक मोठें कुटुंब आहे. ही कांहीं लष्करी संघटना नाहीं. त्यामुळें कुटुंबाचा चालक गेल्यावर जसा अंत्यसंस्कार करतात, तसेंच त्याचें साधें व नेहमींचें रूप असावें." अर्थात् डॉक्टरांनीं सहजतेनें दिलेली ही पूर्वसूचनाच होती !

मेयो रुग्णालयांतील पाहणी पुरी होण्यापूर्वींच डॉक्टरांचा सारखा लकडा चालू होता कीं, " मला घरीं न्या." त्यांना तेथील वातावरण अप्रसन्न वाटत होतें. मंगळवार दि. १८ ला पाहणी पुरी झाली व मग त्यांना समाधान वाटावें आणि शुश्रूषेच्या दृष्टीनें उत्तम व्यवस्था करतां यावी, म्हणून नागपूर संघचालक श्री. बाबासाहेब घटाटे यांनीं सिव्हिल लाइन्सवरील आपल्या बंगल्यावर दि. १८ ला त्यांना आग्रह करून नेलें. या बंगल्यांत शिरतांक्षणींच असलेल्या उजव्या बाजूला प्रशस्त दालनांत त्यांचा पलंग ठेवण्यांत आला. सर्व अद्ययावत् साधनें, प्रसन्न वातावरण, मोकळी हवा व त्यांची शुश्रूषा करण्यासाठीं श्रीगुरुजी, बाबासाहेब घटाटे व इतर त्यांच्या लोभांतील तरुण कार्यकर्ते अशी सर्व अनुकूलता त्या ठिकाणीं होती. डॉक्टरांच्या मनांतून वास्तविक त्यांना त्यांच्या घरीं न्यावें असें होतें. पण त्यांच्या घराच्या जवळील कोंदट वातावरण, अपुरी जागा, घरामागूनच वाहणारा कुबट नाला वगैरे गोष्टी ध्यानीं घेऊन तो विचार सोडून देण्यांत आला.

प. पू. डॉक्टर धरमपेठेंतील बंगल्यावर आले, त्या ठिकाणीं सर्व प्रकारची अनुकूलता होती, तरी ताप, अस्वस्थता व पाठींतील वेदना कमी होण्याचें लक्षण दिसेना. त्या अस्वस्थतेंत ते खोलींत येरझारा घालूं लागत व अधिक थकवा आल्यानें पुन्हा पलंगावर पडत. केव्हां केव्हां तर आजाराच्या भरांत ते बाहेर बंगल्या-समोरील उद्यानांत येऊन बसत. रात्रींहि त्यांना झोप जवळ जवळ लागत नव्हती व त्यामुळें त्या वेळींहि त्यांची अशी इकडे तिकडे हालचाल चाले. त्यांना यामुळें थकवा वाटूं लागतो, हें ध्यानीं घेऊन त्यांच्याजवळ शुश्रूषेसाठीं बसलेल्या स्वयंसेवकांना अनेकदां त्यांना ' दारांतून बाहेर जाऊं नका ' असें म्हणत अडवावें लागे व त्यांना आवरण्यासाठीं केव्हां केव्हां तेथें पाठशिवणीचा खेळ चाललेला दिसे. डॉक्टरांना ती होणारी अडवणूक त्या वेळीं जाणवत होती. एकदां श्रीगुरुजी बाहेरून तेथें येतांच डॉक्टरांनीं त्यांना हंसत थट्टेनें विचारलें कीं, " आपण माझ्याजवळ हे ' अटेण्डण्ट ' ठेवले आहेत कीं मला अडविण्यासाठीं पहिलवान आणले आहेत ? "

साधारण जूनच्या प्रारंभापासून डॉक्टर सकाळीं दोन-तीन तास तरतरीत दिसत. पण त्यानंतर मात्र नागपुरी प्रखर वातावरणांत त्यांचा ताप चढूं लागे व डॉक्टरांच्या मुखावर मलूलपणा उमटे. केव्हां केव्हां कोणत्या तरी विचाराच्या तंद्रींत कांहीं तुटक वाक्यें त्यांच्या मुखांतून निघून जात व त्यांत ' युद्ध सुरू झालें आहे नि आपण अजून काळाच्या मागें आहोंत ' अशा आशयाचे विचारहि त्यांच्या

मनात थैमान घालीत असावेत, याची चाहूल लागे. ते आजारी असतांना स्वतः-पेक्षांहि आपल्याबरोबर असणाऱ्याची अधिक काळजी घेण्याचा त्याचा स्वभाव लपणे शक्य नव्हतें. त्यांच्या शुश्रूषेसाठीं तेथें असणाऱ्या सर्वांनीं सकाळीं व दुपारीं त्यांच्या चहाच्या वेळीं त्यांच्याबरोबर चहा घ्यावा, असे त्याना घाटे. एके दिवशी रात्रींच्या जाग्रणामुळें स्वयंसेवक निजले होते आणि गुरुजी काहीं कामासाठीं बाहेर गेले होते. चहाची वेळ झालेली पाहून तेथें असलेल्या श्री. यादवराव जोशी यांनीं त्यांच्यासमोर चहाचा पेला ठेवला. तेव्हा अमका कुठे, तमका कुठे, अशी चौकशी त्यानी सुरू केली. तेव्हां यादवराव म्हणाले, "आपण चहा घ्या, तोंवर ते येतीलच !" त्यावर अप्रसन्न होऊन ते पांघरूण घेऊन निजले. थोड्या वेळाने श्रीगुरुजी तेथे आल्यावर त्यांना हा झालेला प्रकार समजला. तेव्हा त्यानी सर्व जण तेथें येतील अशी योजना केली व पुन्हा चहा करावयास सागितला. त्यानंतर सर्व जणासमवेत चहा घेतांना डॉक्टरांच्या मुखावर समाधान उमटलेलें दिसले !

अशी अवस्था असतांना दि. १९ जूनला सायंकाळीं ६-७ वाजण्याच्या सुमारास प. पू. डॉक्टराचा एक क्रातिकाळातील बगाली मित्र त्याना भेटावयास आला. बऱ्याच वर्षांनीं आलेल्या त्या स्नेह्याला त्यानीं अंथरुणावर बसून कडकडून मिठी मारली. हृदयाला थरारून सोडणाऱ्या जुन्या काळातील घटनाचे स्मरण होऊन, त्या दोघानाहि त्या भेटीनें विशेष समाधान झालेले दिसत होते. अंथरुणावर पडूनच डॉक्टरानीं पाच-दहा मिनिटे त्यांच्याशी बोलणे केले. त्यांत त्यानीं, त्याच्या जुन्या बंगाली क्रातिकारक मित्रानीं ह्यापुढे संघाचे अत्यत महत्त्वाचे कार्य हाती घेणे कसें आवश्यक आहे, हे पटवून देण्यासाठीं एकदा सवडीने बगालमध्ये येण्याचा मानस व्यक्त केला होता. ह्या भेटींतच त्याच्या मित्राने त्याना भेटण्यासाठी दुसऱ्या दिवशीं सकाळीं सुभाषचद्र बोस येणार आहेत, हें विदित केले. ते ऐकून डॉक्टर प्रसन्न झालेले दिसले !

अशा अवस्थेंत असतानाहि त्यानीं जवळील स्वयंसेवकाकडून एक पत्र टाकलेले दिसले. त्यात मुंबईच्या एका शस्त्रक्रिया झालेल्या स्वयसेवकाला शस्त्रक्रिया यशस्वी झाल्याबद्दल आनंद झाल्याचे लिहून शुभाशीर्वाद कळविले होते. हे पत्र दि. १९ जूनचे आहे, ही गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे.

मेयो रुग्णालयातील जाणते डॉक्टर आणि नागपुरातील तज्ज्ञ डॉ. डेव्हिड आदि मंडळींनीं केलेल्या पाहणीतून नेमकें असे निदान होऊं शकले नाहीं व तापाचे मानहि चढतेंच राहिले. दि. १८ व १९ च्या स्थितीवरून हे आजाराचे तारूं आता कोठे जाणार, याची कल्पना बहुतेक मंडळीना आली होती व त्यामुळें सर्वच जण मनातून खिन्न व चितामग्न होते. डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी याना अशा अस्थिरतेतच दि. १९ ला श्रीगुरुजींनीं जें पत्र लिहिले, त्यांत ही मनःस्थिति उमटल्यावांचून राहिली नव्हती. ते लिहितात, "Doctorsaheb's health is

steadily growing worse and he is now in a serious condition. Under these circumstances he can, in no way, pay attention to anything and for us too, it is not possible to give consideration to any important matter."

बुधवारची रात्रहि थोड्या चिंतेंतच गेली व गुरुवार दि. २० उजाडला. आदल्या रात्रीं डॉक्टरांचा डोळ्याला डोळा लागला नव्हता व त्यामुळें त्यांना अधिकच अशक्तता आली होती. अशा स्थितींत सकाळीं देशगौरव श्री. सुभाषचंद्र बोस व श्री. रामभाऊ रुईकर यांची मोटार श्री. घटाटेंच्या बंगल्यासमोर येऊन उभी राहण्यास व डॉक्टरांना थोडीशी डुलकी लागण्यास एकच गांठ पडली !

देशगौरव सुभाषचंद्र नागपूरला पुरोगामी गटाच्या एका अधिवेशनासाठीं दि. १८ ला आले होते व प. पू. डॉक्टरांची प्रकृति ठीक नाहीं असें कळतांच ते त्यांना भेटण्यासाठीं तांतडीनें तेथें आले. त्या वेळीं डॉक्टरांजवळ श्री. श्रीकृष्ण पुराणिक व यादवराव जोशी बसलेले होते. सुभाषबाबू खोलींत आल्यावर त्यांनीं प. पू. डॉक्टरांकडे न्याहाळून पाहिलें व जवळ बसलेल्या स्वयंसेवकांजवळ त्यांनीं आजाराविषयीं चौकशी केली. तेव्हां गेल्या महिन्याभरांतील वृत्त त्यांनीं त्यांना सांगितलें. त्यांत 'गेल्या दहा-पंधरा दिवसांत १०३°–१०४° च्या खालीं ताप उतरत नाहीं व त्यांना झोपहि लागत नाहीं, पण आतां एवढ्यांतच ते जरासे झोपल्यासारखे दिसत आहेत,' असें सांगून 'आपलें कांहीं महत्त्वाचें काम असल्यास त्यांना हांक मारून उठवितों,' असें स्वयंसेवक म्हणाले. त्यावर श्री. सुभाषबाबूंनीं सांगितलें कीं, "वास्तविक मी एका महत्त्वाच्या कामासाठींच आलों होतों. पण आतां ते आजारी असल्याचें कळल्यावरून आधीं मुद्दाम भेटीस आलों आहें. मी त्यांना पुन्हा येऊन भेटेनच." यानंतर त्यांनीं थोडा वेळ डॉक्टरांच्या मुखाकडे टक लावून पाहिलें व मग डोळे मिटून व दोन्ही हात जोडून त्यांनीं डॉक्टरांना प्रणाम केला ! त्यानंतर थोडा वेळ बाहेरच्या खोलींत थांबून सुभाषचंद्र निघून गेले. त्यांची मोटार घटाटे यांच्या बंगल्यासमोरील फाटकांतून बाहेर पडली असेल-नसेल तोंच डॉक्टर जागे झाले. तेव्हां स्वयंसेवकांनीं श्री. सुभाषचंद्र बोस येऊन गेल्याचें सांगितलें. त्यावर डॉक्टरांनीं औत्सुक्यानें प्रश्न केला कीं, "त्यांनीं काय सांगितलें ?" त्यावर 'आतां ते आपणांला पाहून गेले व पुन्हा येणार आहेत,' अशी माहिती सांगण्यांत आली. ही थोडक्यासाठीं झालेली चुकामूक डॉक्टरांना जाणवली व त्यांनीं सुभाषचंद्रांना म्हणून हात जोडून वंदन केलें ! गेल्या वर्षी नासिकच्या आजारामुळें त्या दोघांची भेट होऊं शकली नाहीं नि या वेळींहि अशी अकल्पित चुकामूक झाली ! "दैवं चैवात्र पञ्चमम्" म्हणतात तें हेंच !

गुरुवारीं सकाळीं डॉ. हरदास, डॉ. विंचुरे व डॉ. गोविंदलाल शर्मा यांनीं प. पू. डॉक्टरांची प्रकृति पाहिली; तों त्यांना ती अधिकच बिघडल्याचें दिसून

आलें. डॉक्टरांच्या रक्तदाबाच्या विकाराने बरीच उचल खाल्ल्यानें, डॉक्टर मंडळी सचित झाली व डॉ. शर्मानीं तर लगेच त्याच्या मणक्यातून पाणी काढावे, ( लंबर पंक्चर ) असे सुचविले. हा उपचार करावा लागणार आहे, ही गोष्ट प. पू. डॉक्टराना कळताच त्यांनीं आपल्या दुखण्याचा रागरंग तेव्हाच ओळखला व आता बहुतेक आपण थोड्या वेळाचे सोबती आहोत, याची त्याना कल्पना आली. त्यानीं आपल्या डॉक्टराना जवळ बोलावून सागितले की, ' आपण असे करण्यापूर्वी मला थोडा वेळ पाहिजे. ' या वेळी ते खोल विचारात गुंतलेले दिसत होते. बाहेरच्या खोलींत सर्व डॉक्टर मडळी, हा उपाय आताच करावा कीं काहीं वेळ वाट पाहून नंतर करावा, यासंबंधीं विचार करण्यात मग्न असताना प. पू. डॉक्टरांनी श्रीगुरुजी याना आपल्या खोलीत बोलावून घेतले. श्रीगुरुजी आत येताच सर्वांसमक्ष डॉक्टर त्याना म्हणाले, " आता लंबर पक्चर करण्यापर्यंत वेळ आली आहे. मी यातून राहिलो तर आहेच. नाही तर यापुढे हे सघाचे कार्य तुम्ही साभाळा ! " ही निरवानिरवीची भाषा ऐकून गुरुजी शोकविव्हल होऊन म्हणाले, " डॉक्टर, आपण हे काय सागता आहात ? यातून आपण लवकर बरे व्हाल. " डॉक्टर यावर किंचित्से हंसत म्हणाले, " ते खरे आहे, पण मीं सागितले आहे तें मात्र अवश्य ध्यानात ठेवा ! "

तोवर बाहेरील खोलींत चाललेल्या डॉक्टर मडळीच्या खलबतातून असें ठरले कीं, आताच मणक्यातून पाणी न काढता सायकाळपर्यंत वाट पाहवी. ती मंडळी निघून गेल्यावर प. पू. डॉक्टराची तगमग क्षणाक्षणाला वाढत होती. अशा चिंताजनक अवस्थेतच ती दुपार गेली. गेल्या अनेक दिवसात डॉक्टराचा डोळ्याला डोळा लागला नव्हता. आता तर त्याना आतून असह्य मनोवेदना होत असाव्यात, असे त्याच्या उग्र चर्येवरून स्पष्ट दिसू लागले. सभोवतींचे कार्यकर्ते तर मनातून चरकलेच होते. डॉक्टराची सुरू झालेली वाढती ऊठबस व त्याच्या खोलीं-तील अस्वस्थपणे चाललेल्या येरझारा या गोष्टींनीं त्याच्या हृदयाची कालवाकालव होत होती.

त्यानंतर सबंध दिवस चिंतेतच गेला. डॉ. हरदास, डॉ. चोळकर व डॉ. तत्त्ववादी बंगल्यावर आले. तोंवर तिन्हीसाजा झाल्या होत्या. त्यानीं डॉक्टराची प्रकृति पाहून आतां क्षणाचाहि विलब न लावता मणक्यातून पाणी काढले पाहिजे, असा निर्णय घेतला व तसें करूं लागताच त्यातून पाण्याची जोराची धारच लागली ! वास्तविक इतका स्राव सहसा होत नाहीं. त्यामुळें डॉक्टरमडळी मनांतून जरा चमकली ! या वेळीं प. पू. डॉक्टराना मनस्वी वेदना होत होत्या. पण त्या वेदनांचें असह्य दुःख इतरांस जाणवूं नये म्हणून त्यानीं दोन्ही हातानीं तोंड झाकून घेतले. त्याना शारीरिक यातना तर होत होत्याच, पण याच जन्मांत पद-दलित हिंदु समाजाला वैभवाचे दिवस आपल्या संघटनेच्या बळावर आणून देऊं,

हें उराशीं बाळगलेलें स्वप्न आपणांला साकार करतां आलें नाहीं, या जाणिवेचे क्लेश त्याहून असंख्य पटींनी त्यांना झाले असतील यांत शंकाच नाहीं ! असें पाणी काढूनहि रक्तदाबांत उताराचें चिन्ह दिसेना, म्हणून रात्रीं डॉ. हरदास यांनीं त्यांच्या अंगांतून कांहीं रक्त काढलें. तरी पण पुरेसें रक्त निघूं शकलें नाहीं. प्रकृतीचें लक्षण ठीक दिसेना, म्हणून डॉ. तत्त्ववादी, डॉ. विंचुरे वगैरे मंडळी रात्रीं तेथेंच राहिली.

दर तासाला प्रकृतीचें मान बिघडत आहे, असें दिसूं लागलें. रात्रीं ११-नंतर तर तापहि चढण्यास सुरुवात झाली व दर दोन-एक तासांनीं एकेक अंशानें ताप वाढूं लागला. मध्यरात्रीनंतर त्यांच्या मुखावरील गंभीरता व उग्रता विशेष दिसूं लागली. कोणत्या तरी गहन विचारांत ते गुंतलेले असावेत असें वाटे. रात्रीं अडीच वाजतां त्यांना मूर्च्छा आली व त्यानंतर शेवटपर्यंत ते बहुतेक बेशुद्ध स्थितींतच होते. बहुतेक म्हणण्याचें कारण मधूनच एखादा शब्द त्यांच्या मुखा-वाटे निघे. ते नाकासमोर स्थिर दृष्टीनें कांहीं तरी वस्तु निरखीत आहेत, असा भास होई. पहांटेच्या सुमारास मुखावरील उग्र गंभीर भाव नाहींसा होऊन तेथें एक प्रकारची शांतता हळूहळू पसरूं लागली व एकदां तर त्यांच्या मुखावर मंद स्मिताची लहर उसळून गेली. जवळ आलेल्या काळाचें त्यांनीं केलेलें हें सहर्ष स्वागत तर नसेल ?

पहाटे‡ पाहतात तों त्यांचा ताप १०६° पर्यंत चढलेला ! सभोंवतीं असलेल्या सर्वांच्याच तोंडचें पाणी पळालें ! श्रीमंत बाबासाहेब घटाटे यांनीं धांवपळ करून डॉ. हरदास व डॉ. ना. भा. खरे यांना बोलावून आणलें. पण त्यांनीं सर्व आशा सोडली नि अन्तिम समय जवळ आल्याचें सांगितलें ! झालें ! सर्वत्र एकच हाहाःकार उडाला ! लगेच दूरध्वनि करून नागपुरांतील सर्व प्रमुख संघाधिकारी, कार्यकर्ते व डॉक्टरांचे स्नेही यांना बंगल्यावर बोलावून घेण्यांत आलें. ती सर्व मंडळी येऊन पोहोंचतात तों डॉक्टरांना शेवटचा ऊर्ध्व लागलेला ! सर्वत्र मृत्यूची कृष्णछाया पसरली नि जो तो उदास नि खिन्न अंतःकरणानें डोळे पुशीत व हुंदके आवरण्याचा प्रयत्न करीत डॉक्टरांच्या मृत्युशय्येभोंवतीं घोटाळूं लागला. ऊर्ध्व चालू असतांना डॉक्टरांना आत्यंतिक वेदना होत असल्या पाहिजेत. त्या वेदना डोळ्यांनीं पाहवत नव्हत्या. बाहेरील मंडळींना देखील ऊर्ध्व जोरानें ऐकूं येई व प्रत्येकाच्या हृदयाचें पाणी पाणी होऊन जाई. निर्दय मृत्यूचें तें क्रूर कर्म डोळ्यांनीं पाहणें अशक्य होतें. जवळ जवळ तासभर ऊर्ध्व चालू होता. ९ वाजून २५ मिनिटें झालीं तेव्हां एकदम श्वासोच्छ्वास बंद होऊन डॉक्टरांनीं मान खालीं टाकली. 'झालें, डॉक्टर गेले !' असें वाटून एकदम रडारड सुरू

‡ शुक्रवार, ज्येष्ठ वद्य ९ शके १८६२, दि. २१ जून १९४०.

झाली ! पण तेवढ्यांत पुन्हा श्वासोच्छ्वास सुरू झालासा दिसला व ओठांची व पापण्यांची थोडीशी हालचाल झाली. प्राण गेलेला नव्हता. किंचित्शी धुगधुगी अजून उरली होती. पण–पण काय, त्यानंतर अवघ्या दोनच मिनिटानीं, बरोबर ९ वाजून २७ मिनिटांनीं डॉक्टरानी अंतिम श्वास सोडला ! आणि ज्येष्ठ वद्य द्वितीयेला अखंड पुण्यप्रदता अर्पण करीत त्यांच्या पंचप्राणानीं ऐहिकाची शीव ओलांडली !

* * *

## ३१ : शवयात्रा

परमपूजनीय डॉ. हेडगेवार निधन पावल्याचें वृत्त थोड्याच वेळांत सर्व नागपूर नगरांत जाऊन पोहोंचलें नि सर्व नगरावर दुःखाची दाट छाया पसरली. डॉक्टरांच्या अंत्य दर्शनासाठीं लोकांच्या झुंडीच्या झुंडी घटाटे यांच्या बंगल्याकडे जातांना दिसूं लागल्या. जणूं आज सर्व रस्त्यांचीं तोंडें धरमपेठेकडेच वळलीं होतीं ! विविध प्रांतांतील प्रमुख ठिकाणीं संघकार्यकर्त्यांना तारा करून हें दुःखद वृत्त कळविण्यांत आलें. जेथें तेथें एकच हाहाःकार उडाला ! प. पू. डॉक्टरांच्या आजारपणाची बहुतेकांना कल्पना होती. तरीहि त्या आजाराचें पर्यवसान इतकें भयंकर होईल, असें कोणाच्या स्वप्नांतहि नसेल. प. पू. डॉक्टर अत्यवस्थ असल्याचें स्वातंत्र्यवीर सावरकरांना कळविण्यांत आलें होतें. ती तार हातीं पडतांच त्यांनीं नागपूरला येण्याचा विचार चालविला. इतक्यांत त्यांच्या हातांत हा शोकसंदेश जाऊन पडला नि त्यांना मनस्वी दुःख झाले. त्यांनीं लगेच तार केली कीं, " डॉक्टर हेडगेवार गेले, हेडगेवार चिरायु होवोत. हेडगेवार गेले; संघ चिरायु होवो ! " वृद्ध डॉक्टर मुंजे त्या वेळीं नासिकला होते. त्यांचा प. पू. डॉक्टरांवर मुलाप्रमाणेंच लोभ होता. त्यांनीं तारेनें कळविलें, " त्यांच्या अकाली व अनपेक्षित मृत्यूनें जबर धक्का बसला. त्यांचा मृत्यु ही राष्ट्रीय आपत्ति आहे !"

नागपुरांत ' महाराष्ट्र ' व पुण्यांत ' काळ ' दैनिकानें स्वतंत्र अंक काढून हें हृदयभेदक वृत्त प्रसृत केलें. नागपूरापासून दूर असलेल्या सहस्रावधि स्वयंसेवकांनीं ज्या त्या ठिकाणीं एकत्र जमून प. पू. सरसंघचालकांच्या स्मृतीला भक्तीनें श्रद्धांजलि वाहिली. पण नागपुरापासून शें-दीडशें मैलांच्या परिसरांत असणाऱ्या शेंकडों गांवांच्या स्वयंसेवकांनीं डॉक्टरांच्या पार्थिव देहाचें दर्शन घडावें म्हणून मिळेल तें वाहन पकडलें. त्या दिवशीं ठिकठिकाणांहून आगगाड्या व मोटारी नागपूरकडे भरभरून येत होत्या. अकोला, अमरावती, चांदा, भंडारा, वर्धा, हिंगणघाट, आर्वी, काटोल, उमरेड, सावनेर अशा शेंकडों ठिकाणचे स्वयंसेवक तेथें जमले. नागपूरजवळच्या खेड्यांतून दुचाकीनें व पायीं आलेल्या स्वयंसेवकांची संख्याहि कांहीं कमी नव्हती.

दि. २१ ला दुपारभर प. पू. डॉक्टरांच्या अंत्य दर्शनासाठीं स्त्रीपुरुष नागरिकांची रीघ लागली होती. जो तो आपल्या स्मृतिमंजूषेंतून प. पू.

डॉक्टरांच्या सहवासांतील सुखद व स्फूर्तिप्रद प्रसंग काढून न्याहाळत होता नि असे अलौकिक प्रेम नि स्नेह याना आपण कायमचे अंतरलो म्हणून हळहळत होता ! अनेक शाळांच्या चालकानीं सुट्टी दिली व काहीं शाळाच्या विद्यार्थ्यानीं सुट्टी घेतली !

सायंकाळीं ५ वाजता शवयात्रा काढावयाचे ठरले होते आणि त्यासाठीं बंगल्यासमोर स्वयंसेवक व नागरिक जमूं लागले. ४ च्या सुमारास एकाएकी आकाश अधेरून आले आणि प्रथम झिमझिम नि नतर मुसळधार पाऊस पडू लागला. मेघानीं आपले भारावलेले अंतःकरण जणू मोकळे केले ! डॉक्टर आपले सारे ' जीवन ' इतक्या सहजतेने राष्ट्रार्पण करून मोकळे झाले, असेच जणूं ती मेघवृष्टि सूचित करीत असावी !

सायंकाळी ५ वाजण्याच्या सुमारास पावसाचा जोर कमी होऊन शवयात्रेची सिद्धता करण्यात आली. अनेक सस्थाच्या वतीने शवाला पुष्पमाला समर्पण करून झाल्यावर थोडा पाऊस असूनहि मिरवणूक वेळेवर सुरू झाली. ही धरमपेठेतून निघालेली मिरवणूक जवळ जवळ सव्वा मैल लाबीची होती व ती मंद गतीने पुढे सरकत असता, ठिकठिकाणी प. पू. डॉक्टराच्या पार्थिव देहाला पुष्पहार घालून व त्यावर मुक्त हस्ताने पुष्पवृष्टि करून लोक दर्शन घेत होते. त्यात पारशी मंडळींनींहि भाग घेतलेला दिसला. अजातशत्रुत्व व समाजाविषयींचे डॉक्टराचे ममत्व इतके विशुद्ध कीं, त्यांतून कॉग्रेस, हिंदुमहासभा, पुरोगामी गट, सोशॅलिस्ट पक्ष, मजूर वर्ग, हरिजन नि असंख्य सस्था त्यांत आत्मीयतेने समीलित झाल्या होत्या. शवयात्रेच्या आघाडीवर सायकलस्वाराची पथके व त्यामागून चाराचाराच्या रागानी चालणारे सहस्रावधि स्वयंसेवक दिसत होते. त्यानतर असंख्य नागरिक, मग शव आणि त्यामागोमाग प्रमुख नागरिक व पुढारी नि शेवटीं पुन्हा सायकलस्वाराचीं पथके अशा क्रमाने सर्व जण चालत होते. प. पू. डॉक्टराच्या पार्थिव देहामागोमाग त्याना प्राणाहून प्रिय वाटणारा भगवा ध्वज दिसत होता. ज्या ज्या भागातून मिरवणूक गेली, तेथील रस्ते व दोन्ही बाजूच्या घराच्या माड्या, खिडक्या व सज्जे उत्कठेने अंत्य दर्शनासाठी दाटीने उभ्या असलेल्या नागरिक स्त्रीपुरुषानीं गजबजून गेले असणे स्वाभाविक होते ! निस्त्राण व आत्मविश्वासहीन बनलेल्या समाजात डॉक्टरानीं स्वाभिमानाचे व वीरतेचे नवचैतन्य खेळविलें होते. त्यासबंधीची कृतज्ञता ओलावलेल्या असंख्य नेत्रातून आज व्यक्त होत होती, यात नवल ते कोणते ? ठिकठिकाणीं त्या मिरवणुकीचीं छायाचित्रे घेण्यात आलीं. साधारणपणे ९ वाजता नागपूरच्या दक्षिण भागास असलेल्या ' रेशीमबाग ' संघस्थानावर ही अभूतपूर्व शवयात्रा येऊन पोहोचली. नेहमीच्या स्मशानभूमीऐवजीं या खाजगी जागेत अत्यसंस्कार करण्यास सरकार-कडून आयत्या वेळी अनुमतिं मिळाली, ही गोष्ट उचितच होती. कारण त्याच

संघस्थानावर संघाची केन्द्र-शाखा चाले व त्याच पटांगणावर संघाच्या अधिकारी शिक्षण वर्गाचे कार्यक्रमहि होत. त्यामुळें डॉक्टर त्या भूमीला कौतुकानें ' तपोभूमि ' म्हणत. अशा त्या पवित्र भूमीवर, अनुमति मिळतांच स्वयंसेवकांनीं उंच मंडप उभारला व त्याखालीं चिता रचण्यांत आली. मग डॉक्टरांचे ज्येष्ठ बंधु तात्याजी यांच्या हस्तें शव यथाविधि चितेवर ठेवण्यांत आल्यावर सर्वांनीं उभें राहून संघाची नित्य प्रार्थना म्हटली आणि शेवटीं परमपूजनीय आद्य सरसंघचालकांच्या पार्थिव देहाला अंतिम प्रणाम देण्यांत आला.

झालें ! क्षणार्धांत मंत्राग्नि देण्यांत आला आणि चंदन नि कापूर यांचा सुगंध पसरवीत भगव्या ज्वाला धगधगूं लागल्या !

* * *

## ३२ : असामान्य व्यक्तिमत्त्व

संघाचा विकास करून हिंदुराष्ट्र आपल्या बलाने व वैभवाने पुन्हा एकदा जगाच्या अग्रभागीं विलसूं लागावें, या आकांक्षेने प्रेरित होऊन प. पू. डॉक्टरानीं परमेश्वराने दिलेल्या सर्व शक्ति एकवटून सारखे प्रयत्न चालविले होते. त्यासाठी त्यांचा अधूनमधून प्रवास सुरू असला तरी प्रत्येक प्रवासानंतर काही दिवस ते संघाच्या केंद्रस्थानीं म्हणजे नागपूरला अवश्य राहत. त्यांच्या दैनंदिन व्यवहारात एखादा अगदी कावळ्याच्या दृष्टीने जरी डोकावला असता तरी त्याला चोच मारण्यासाठीं स्वार्थीपणाचा अंशहि तेथे सापडला नसता. वास्तविक एखाद्या संन्याशाने जसे स्वतःचे श्राद्ध स्वतःच्या हातानेच उरकावें, तशाच मनःस्थितींत डॉक्टर वावरत होते. त्यांच्या अंगावर संन्याशाचीं वस्त्रें नव्हती वा समाजातील ऐहिक व्यवहारापासून ते अलिप्तहि राहिले नव्हते हे जरी खरें, तरी त्यांचें अंतरंग मात्र देह-गेह विसरून हिंदुराष्ट्राइतके व्यापक झाले होते, यात शंका नाही. ते ब्रह्मचारी होते, पण त्याचेहि त्यांनीं लोकांच्या डोळ्यासमोर आपण काहीं अलौकिक गोष्ट आचरीत आहोत, असे रूप मांडलें नाही. समाजात राहावयाचे व सर्वसामान्य नागरिकांप्रमाणेच त्यांच्या जीवनाशीं समरस होऊन त्यांच्या वृत्तीत पालट घडवावयाचा, अशी पद्धति अगदी प्रारंभापासून व विचारपूर्वक त्यांनीं अंगीकारली होती. बाह्य व्यवहारात—विशेषतः वेष आणि राहणी यांत—अलौकिकता आणली तर आर्थिक व शारीरिक दृष्टीने अगदीं दुर्बल बनलेले लोक भजनीं लागतात, हा इतरांचा अनुभव समाजात वावरतांना त्यांनीं हेरला होता आणि असे भजनीं लागणारे लोक त्यांच्या गुणांचे स्वतः अनुकरण करण्याचा अट्टाहास न करता दिवसेंदिवस मनाने परावलंबी व निःसत्त्व बनतात, हेंहि त्यांच्या दृष्टींतून सुटलें नव्हतें. परमपूजनीय डॉक्टराना हिंदुस्थानचें ऐहिक जीवन ऐश्वर्य-संपन्नतेने फुलवून टाकणारे बुद्धिमान् व कर्तृत्ववान् तरुण प्रचंड संख्येंत उभे करावयाचे होते व त्यामुळेच ज्या बाह्य संन्यासी वेषाने भोळेभाबडेच अधिक प्रमाणात सभोवतीं गोळा होतात, तो वेष त्यांनीं कटाक्षपूर्वक टाळला होता. निःस्वार्थता, विचारांची तर्कशुद्धता, स्वभावांतील गोडवा, चारित्र्याची निष्कलंकता, प्रयत्नांची पराकाष्ठा व सातत्य अशा गोष्टीच आपल्या व्यवहारांतून प्रकट झाल्या, तर आपल्या समाजाचें नेतृत्व करण्याची पात्रता असलेले तरुण हां हां म्हणता

सभोंवतीं उभे राहतील, अशा संपूर्ण आत्मविश्वासानेंच त्यांनीं चार जणांसारखेंच जीवनाचें बाह्य रूप ठेवलें होतें. नागपूर भागांत त्या वेळीं पांढरपेशा वर्गांत जो शिष्टसंमत वेष होता, तोच त्यांच्या अंगावर दिसे.

पायांत वहाणा वा जोडा ( बूट ), साधें धोतर, अंगांत सदरा व कॉलरचा कोट व आंतून पुठ्ठा असलेली कांहींशी उंच अशी काळी टोपी याच पोषाखांत ते असावयाचे. त्यांच्या हातांत बाहेर जातांना रुपेरी मुठीची वेताची छडी असे व त्या गोल मुठीवर उठावाचें सिंहाचें चित्र व त्याच्यावर डॉक्टरांच्या मनांतील पराक्रमाची आकांक्षा सूचित करणारें ' स्वयमेव मृगेन्द्रता ' हें ब्रीद उठून दिसे. १९३८–३९ नंतर त्यांच्या अंगावर लोकरीचे कपडे दिसूं लागले असले तरी ते प्रकृतीच्या दृष्टीनें अपरिहार्य झालें म्हणूनच. नाहीं तर तोंपर्यंत त्यांचे कपडे स्वच्छ व जाडयाभरडया सुती कापडाचेच असावयाचे. केव्हां केव्हां गरिबीमुळें कपडे फाटलेलेहि असत. कांहीं विशेष प्रसंगानें ते उपरणें वापरीत व घशाचा त्रास होऊं लागल्यापासून लोकरीचा स्कार्फहि दिसूं लागला. ते स्वतः साधे राहत व इतरां-जवळ कांहीं वेळां बोलण्याच्या ओघांत म्हणत कीं, " विलासाचीं साधनें उपलब्ध झालीं म्हणून तीं वापरूं नयेत. आपल्या साध्यासुध्या वस्तु वापरणें सदैव उत्तम असतें व त्यांतच मौज असते. " कपडयांच्या संबंधांत तर ते असें सांगत कीं, " बाह्यरूपांत आपण जगापुढें जाऊं नये, कारण आपण त्या अज्ञात क्षेत्रांत अत्युत्तम ठरूंच, असें कसें सांगतां येईल ? तसेंच फार मागें रेंगाळून बुरसट व जुनाट म्हणूनहि डोळयांत भरूं नये. आजच्याबरोबरहि राहण्यांत सुरक्षितता नाहीं. कारण आपणांला त्याचे गुणदोष पारखतां येणार नाहींत. म्हणून केवळ एक पाऊलच काळाच्यामागें आपण रहावें हें उत्तम ! "

ते जेथें जात तेथें त्यांचें वागणें किती सहज व आत्मीयतापूर्ण असे, याचा उल्लेख मागें आलाच आहे. त्यांच्या दृष्टीला तसें पाहतां हिंदुस्थानांतील कोणतेंच ठिकाण नागपूरपेक्षां आपुलकींत दूरचें वाटण्याची मुळींच शक्यता नव्हती. कारण हिंदुस्थान हेंच त्यांचें घर होऊन बसलें होतें व त्यांत राहणारा समाज हा त्यांना विशाल कुटुंबासारखा वाटे. असें असलें तरी त्यांच्या नागपूरमधील घरांत त्यांनीं हेडगेवार कुटुंबांतील एक घटक म्हणून जो व्यवहार चालविला होता, तो त्यांच्या-कडे दुरून पाहणाऱ्याला चार जणांसारखाच दिसणारा होता, यांत शंका नाहीं. लोकांचें कुतूहल जागृत होईल, अशी विलक्षणता आपल्या जीवनांत त्यांनीं प्रारंभा-पासूनच येऊं दिली नव्हती.

त्यांच्या घरांत माडीवरील पुढली खोली ही त्यांच्या बैठकीची असे व त्या ठिकाणीं एकहि सुरकुती उरूं न देतां सतरंजी अंथरलेली दिसे. कोणी भेटून निघून गेलें कीं, पुन्हा माडीवरील बैठक नीटनेटकी आहे कीं नाहीं, हें डॉक्टर कटाक्षपूर्वक पाहावयाचे. ह्या बैठकीच्या खोलींत लो. टिळक, हुतात्मा श्रद्धानंद

आणि डॉक्टरांचे स्नेही कै. भाऊजी कावरे यांचीं छायाचित्रे असत व एका छोट्याशा काचेच्या कपाटांत छत्रपति श्रीशिवाजी महाराज याचा अर्धपुतळा ठेवलेला असे. ही माडी १९२६ मध्ये बाधलेली खरी, पण तितकीशी बळकट म्हणतां येणार नाहीं. परमपूजनीय डॉक्टराचे वजन पावणेदोनशेच्या वर होते आणि त्याचे ते भव्य शरीर खालून माडीवर येऊं लागले, म्हणजे बिचारा जिना तर कंपायमान होईच, पण त्याबरोबरच माडीच्या भितीहि हादरत !

माडीवरील आतील खोलींत कोपऱ्यात डॉक्टराची एक आवडती जड काठी होती. वजन आणि जाडीचा विचार करता तिला ' मुसळ ' म्हटले तरी चालण्यासारखे होतें ! या काठीला तेल दिल्याने चागली तकाकी होती व तिला दोन्ही टोकांना लोखंडी वसव्या ( शेंबी ) बसविलेल्या होत्या. ताठ उभे राहून व हात अंगालगत ठेवलेला असताना या काठीचे निमुळते टोक हातात व दुसरे जमिनीवर ठेवावयाचे व त्यानतर दंड व मनगट न हालविता केवळ हातानें, त्या काठीचें दुसरे टोक जमिनीला समातर आणून दाखवावयाचे, ही गोष्ट अत्यत अवघड होती. पण डॉक्टर ती लीलेने करीत ! त्याच्याकडे बाहेरगावचे स्वयसेवक वारंवार येत. त्यातील काहीं तरुणाना ते या पद्धतीने काठी उचलून दाखविण्याचा मर्जेत आग्रह करीत. तरुणाने त्याच्या अपेक्षेप्रमाणे ती उचलून दाखविल्यास डॉक्टरांचा हात त्याच्या पाठीवर फिरे व डॉक्टराच्या मुखावर समाधान ओसंडे. तरुणाचे मनगट अगदीं दणकट अशा पोलादी कांबीसारखे पाहिजे, ही गोष्ट ध्यानी आणून देण्याचाच त्यामागे उद्देश असे. एकदा नासिकचे काहीं स्वयंसेवक तेथे गेले असता डॉक्टरानीं त्याना ती काठी उचलावयास सागितले. त्यातील काहीं जणाना ते जमले नाही. पण एकाने ती गोष्ट साधली. तेव्हा डॉक्टर म्हणाले, " ही गोष्ट वाटेल त्याला जमणार नाही. शक्ति-युक्तीची सागड घालील त्यालाच हे जमेल. "

घर लहान पण वस्तूंची मांडणी अगदीं आटोपशीर व जेथल्या तेथे असावयाची; कारण त्यावर डॉक्टराचे सदैव लक्ष असे. घरातील कोणतेंहि काम करताना त्याना कधीं कमीपणा वाटला नाहीं. रविवारीं सकाळचे साधिक कार्यक्रम झाल्यावर स्वतः घराची माडी, सोपा आणि माजघर सारविताना ते दिसत. तसेच प्रकृति बरी असली म्हणजे ते व त्याचे बंधु सीतारामबुवा ( तथा तात्याजी ) असे दोघे समोरील अंगणात लाकडे फोडीत. डॉक्टराकडे येणाऱ्या अनेक स्वयसेवकाना तर त्याच्या स्वतःच्या घरापेक्षा डॉक्टराचे घरच आपले वाटे व त्याच्याबरोबर काम करण्यात आपण काहींतरी विशेष करीत आहोत, अशी छटाहि त्याच्या मनात कधी उमटत नसे. ' त्वमेव माता, पिता त्वमेव, त्वमेव बंधुः सखा त्वमेव । ' इतकी ज्यांच्या मनाची डॉक्टरांशीं एकरूपता झाली होती, ते स्वतः कुऱ्हाड हातीं घेऊन डॉक्टरांच्या दारात लाकडे फोडताना अनेकानी पाहिलेले आहेत.

डॉक्टरांच्या घरगुती जीवनांत नव्या-जुन्याचा संगम झालेला होता. त्यांचे बंधु सीतारामबुवा हे पढिक भिक्षुक होते व त्यांचा पोशाख अगदीं साधा म्हणजे धोतर नि उपरणें इतकाच असे. त्यांच्या वागण्यांत स्वाभाविकपणेंच नवीन पिढीच्या दृष्टीनें पुरेपूर कडवी कर्मठता होती, तर डॉक्टरांच्या व्यवहारांत हिंदु समाजांतील कोणत्याहि प्रांताचा अथवा जातीचा मनुष्य हा मोकळेपणानें वावरूं शकत होता. सोवळें-ओवळें, स्पृश्यास्पृश्यता याचे नियम सीतारामबुवा अगदीं कांटेकोरपणें पालन करीत, तर डॉक्टरांच्या माडीवर त्या गोष्टींना फिरकण्यास यत्किंचित् अवसर नव्हता. वर वर पाहतां हे वृत्तीचे दोन ध्रुव भासले, तरी व्यवहारांत त्या दोघांचें प्रेम उत्कट असल्यानें त्यांच्या सहजीवनांत कधींच आडकाठी येऊं शकली नाहीं. ' केशव ' व ' सीताराम ' अशा एकेरी नांवानेंच ते परस्परांना हांक मारीत व कांहीं दिवस तर ते दोघे एकाच चष्म्यावर भागवीत होते ! त्या दोघांच्या आवाजांत तर इतकें साम्य होतें कीं, नवीन माणसाला त्या दोहोंतील कोण बोलत आहे, हें बाहेरून सांगणें अवघड होतें. त्यांचा दोघांचाहि आवाज कांहींसा घोगरा व भरीव असे.

या दोघां बंधूंच्या दोन तऱ्हा असत व त्या दोघांनाहि प्रसन्न ठेवण्याजोगें डॉक्टरांच्या वहिनींचें वागणें असे. ही गोष्ट तारेवरील कसरतीइतकी अवघड होती, यांत लवमात्र शंका नाहीं. डॉक्टरांकडे राहून आपलें महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण केलेले श्री. श्रीकृष्ण पुराणिक लिहितात कीं, " ...... अशा ओढाताणींत सौ. रमावहिनींची मात्र मोठी कुचंबणा होत असे. भाऊजींच्या ( डॉक्टरांच्या ) मनाप्रमाणें सर्व घरगुती गोष्टी करणें व पतीचें सोवळें-ओवळें व दैनंदिन आन्हिकाहि बिनचूक व्हावें अशी दक्षता घेणें, अशा परस्परविरोधी आचार-विचारांत वहिनींना घर चालवितांना अति कष्ट पडत. पण त्यांच्या मनाची शांति व निरागसता कधीं ढळली नाहीं. सर्वांच्या वेळा व भिन्न तऱ्हा सांभाळून त्या साध्वीनें डॉक्टरांना घरगुती कटकटीबद्दल निश्चिंत ठेवून पर्यायानें राष्ट्राची एक महान् सेवाच केली. "

त्या दोघां बंधूंच्या घरगुती जीवनांतील बारकावेहि उल्लेखनीय आहेत. डॉक्टरांच्या बैठकींत स्वतंत्र भांड्यांतून पिण्याचें पाणी ठेवलें जाई. तें पाणी पुन्हा स्वयंपाकगृहांत जावयाचें नाहीं, असा कटाक्ष असे. डॉक्टर १९३५ पासून वारंवार आजारी असत व त्यामुळें त्यांना कपडे घालूनच अनेकदां जेवावयास बसावें लागे. पण अशा वेळीं त्यांच्या पंक्तीला शास्त्रीबुवा चुकूनहि बसत नसत. घरांत केव्हां केव्हां त्या दोघां बंधूंचें अनेक सामाजिक व धार्मिक विषयांवर बोलणें होई. त्यांचें तें बोलणें इतकें मोठ्यानें चाले कीं, शेजाऱ्याला वाटावें कीं, दोघांचें भांडण चालू आहे ! डॉक्टरांना आपल्या घरीं चांगली दुभती गाय असावी असें वाटे व तसें ते क्वचित् बोलूनहि दाखवीत. पण ही डॉक्टरांची

इच्छा साकार होऊं शकली नाहीं. कारण काय ? तर गाय किंवा म्हैस अशा मुक्या जनावराला दाव्याने जखडून ठेवणे सीतारामबुवानीं निषिद्ध ठरविलें ! आपल्या बंधूच्यामुळेच आपणाला घरगुती व कौटुंबिक वातावरणात राहावयास मिळत आहे, याची जाणीव डॉक्टराना असे आणि सीतारामबुवाच्या कांहीं कल्पना स्वतःला पटत नसल्या तरी त्याचा आदर करण्यास बंधुप्रेम व ही जाणीव त्याना उद्युक्त करी. बंधूच्या मुलाना खेळवणे, वेळप्रसगी चहा व स्वयंपाक करणे व बंधु आजारी असताना त्याची रात्र रात्र जागून शुश्रुषा करणें वगैरे गोष्टी, इतकी मतभिन्नता असताहि, डॉक्टराच्या हातून सहज घडत. तसेच डॉक्टराच्या कार्यपद्धतीसंबंधी मतभेद असूनहि समाजसंघटनेचे एक महान् कार्य आपल्या केशवकडून होत आहे, एवढया एकाच विचारामुळे शास्त्रीबुवाहि त्याना न रुचणाऱ्या आचार-विचाराच्या अनेक गोष्टी डोळ्याआड करीत आले होते. शास्त्रीबुवाच्या माडीवर व्रण होऊन त्यावर एकदा शस्त्रक्रिया करावी लागली होती. पण त्या वेळीं त्या व्रणात चुकून एक कापसाचा लहानसा बोळा राहिल्यानें तो व्रण काही केल्या बरा होईना तेव्हा डॉक्टरानीं पुन्हा शस्त्रक्रिया करवून त्यातील कापूस काढून टाकला. या काळात त्याची शुश्रूषा करताना डॉक्टरानीं त्याच्या स्वभावानुसार अक्षरशः रात्रीचे दिवस करून त्याना जिवावरच्या दुखण्यातून वाचविले होते. सामाजिक कार्याचे व्याप साभाळूनहि डॉक्टराकडून हे जे उत्कट बंधुप्रेम शास्त्रीबुवाना लाभले, त्याची जाणीव त्याच्या मनात सदैव वसत असे व ही जाणीवहि शास्त्रीबुवाच्या सहिष्णुतेला बळकटी आणी.

डॉक्टराचे चुलते आबाजी हे वयाने बरेच मोठे व वृत्तीने हेडगेवाराच्या कुलपरंपरेला साजेसेच म्हणजे तापट होते. नागपूरला डॉक्टराबरोबर राहावयास आल्यावर, पहिले काहीं दिवस त्यानी संघाचे कार्य व डॉक्टराचे प्रयत्न दुरूनच कौतुकाने व तटस्थपणाने पाहिले. पण १९३२–३३ पासून हलके हलके डॉक्टराच्या कामाचे स्वरूप ओळखून, त्यानी त्यात भाग घेण्यास सुरुवात केली. चुलते म्हणून डॉक्टर त्याना फार मान देत. पण पुढे पुढे अशी स्थिति निर्माण झाली की, इतर स्वयंसेवकाइतकाच तेहि डॉक्टराचा आदर करीत. संघाच्या आय-व्ययाकडे तर त्यानी आपल्या व्यवहारी व चोख दृष्टीने लक्ष पुरविण्यास प्रारंभ केला व त्याच्या जोडीने ठिकठिकाणी संघशाखाची स्थापना करण्यासाठीहि ते महिना दोन महिने फिरतीवर जाऊ लागले.

डॉक्टर नागपुरात असले म्हणजे त्याच्याकडे अनेक जणाची सारखी ये-जा सुरू असे व या येणाऱ्या लोकाचे स्वागत डॉक्टर अत्यंत दक्षतेने करीत. बाहेरून येणाराची ते कोठे उतरले आहेत, जेवणाचे काय, वगैरे सर्व चौकशी आत्मीयतेनें करीत व तशी व्यवस्था नाहीं असें दिसताच, त्याना ते आपल्या येथेच ठेवून घेत. चहाचें आधण तर त्याच्या घरांत जवळ जवळ दिवसभर चुलीवर दिसे व

अनेकदां आयत्या वेळीं आलेल्या पाहुण्यांची ऊठ-बस करण्यांत डॉक्टर निमग्न असतांना, त्यांच्या वहिनींना, आतां घरांत आहेत एवढेच पदार्थ सर्वांना कसे पुरवावयाचे, असा प्रश्न पडे ! बोलूनचालून भिक्षुकाचें घर ! त्यामुळें बेगमीचें नांवच काढावयास नको. संसाराचा गाडा येणाऱ्या तुटपुंज्या दक्षिणेच्या पैशावर, तसेंच वाण आणि दान यांतून मिळणाऱ्या वस्तूंवर कसाबसा रेटला जाई. अनेक वेळीं शास्त्रीबुवा भोजनासाठीं बाहेर असत; पण डॉक्टरांमुळें पाहुण्यांचा रामरगाडा घरांत नेहमींचाच असे. डॉक्टरांची जेवणाची वेळ झाली आहे अशा वेळीं जे कोणी तेथें असतील त्यांना ' मी जेवून येतों, तोंवर जरा थांबा ! ' असे उद्गार डॉक्टरांच्या मुखांतून कधींच ऐकावयास मिळत नसत; तर त्यांनाहि आपल्या-बरोबर खालीं नेऊन, जी काय मीठभाकरी असेल, ती ते मोठ्या प्रेमानें जेवूं घालीत. कांहीं वेळां नेमका जेवणाच्याच वेळीं पाहुणा आलेला असला व घरांत अन्न थोडेंच उरलें असलें, तर ' माझें आतांच जेवण झालें, चला उठा ' असें म्हणत डॉक्टर त्यालाच जेवूं घालीत व त्याच्यासमोर पाटावर बसून गप्पागोष्टी करण्यांत गढून जात. दारिद्र्याच्या व्यथा त्यांच्या मुखावर कधीं उमटत नसत. अशा उपाशी पोटींहि ते आलेल्या पाहुण्याला फोडणीच्या मिरच्या वाढल्यावर हलकेच थट्टेनें विचारीत कीं, ' त्यांत जरा तिखट कमी पडलेलें दिसतें ! ' कांहीं वेळां असें आयत्या वेळीं होणारें पाहुण्यांचें आगमन म्हणजे डॉक्टरांची सत्त्व-परीक्षाच ठरे. पण अशा वेळींहि त्यांच्या मनाची समतोलता व उदारता कधीं लवमात्र ढळत नसे. एकदां तर रात्रीं पाहुणे आले व घरांत लाकडें संपलेलीं ! तेव्हां त्यांनीं आपल्या घरांतील एक-दोन खिळखिळे झालेले पाट फोडून ती वेळ निभावून नेली ! अखिल भारतीय संघटनेचा पाया रचण्यांत यशस्वी ठरलेल्या डॉक्टरांचें गृहजीवन हें असें होतें ! ' दारिद्र्याची अमुची दीक्षा ! सत्त्वाची प्रतिपदीं परीक्षा ' ह्याच ओळी तेथें अनुभवाला येत. डॉक्टरांना कोणत्याहि उपवासाचें व्रत नव्हतें; पण उपवासाचा सहवास मात्र त्यांना असा केव्हां केव्हां घडे !

डॉक्टरांच्या भर तारुण्यांत त्यांच्या अत्युग्र देशभक्तीमुळें ते चहा घेत नसत. पण १९२७ मध्यें चांदा येथें संघाचें काम सुरू झाल्यावर, एका प्रसंगानें त्यांनीं चहा घेण्यास प्रारंभ केला. ते एका गरीब कोमटी स्वयंसेवकाच्या घरीं गेले असतां त्यांच्यापुढें पोह्याची बशी व चहाचा पेला ठेवण्यांत आला. डॉक्टरांनीं पोहे तेवढे घेतले. पण डॉक्टर चहा घेत नाहींत, हें कळल्यावर त्याच्या घरांतील मंडळींना स्वाभाविकच थोडीशी चुटपूट लागली. चहा तर घेत नाहींत व देण्या-इतकें पुरेसें दूध नाहीं, अशी त्यांची स्थिति होती. हा त्या घरांतील मंडळींचा झालेला विरस डॉक्टरांच्या दृष्टींतून सुटला नव्हता. ते तेथून घरीं परत आले तरी दिवसभर त्यांचें मन त्या झोपडींतच रेंगाळत होतें. सायंकाळीं कार्य उरकून घरीं

आल्यावर थोड्या वेळाने एकदम उठून डॉक्टरानीं टोपी-कोट चढविला आणि 'आपण पुन्हा त्या स्वयंसेवकाकडे जाऊन चहा घेऊन येऊ' असे ते म्हणाले. 'चार माणसे जोडावयाचीं असतील तर चार जणासारखेच वागले पाहिजे,' ही गोष्ट त्यानी ओळखली होती व त्यातूनच त्यानीं चहा घेण्याला सुरुवात केली व मग त्याच्या घरीं येणाऱ्यानाहि चहा मिळू लागला. चहाची त्याना आवड होती असें मुळींच नाही. पण चहाच्या निमित्ताने एखाद्याला दहा-पाच मिनिटे आपणाकडे अधिक बसवून घेऊन संघासंबंधीं त्या वेळात सहजतेने गोष्टी करण्यास अवसर मिळावा, ही दृष्टि त्यामागे असे. आता त्याची अशी जी जी आवड दिसे, ती वास्तविक लोकसंग्रहाच्या निकषावरच टिकणारी असावयाची. त्यात वैयक्तिक अभिरुचीचा विचारच नसे. ते कोणाकडे गेले असता त्याना कोणीं चहा दिला, तर ते याच हेतूने, प्रकृतीला त्रासदायक ठरणार याची कल्पना असूनहि, त्याचा सहर्ष स्वीकार करीत. एका प्रसंगी एका गृहस्थाना भेटण्यासाठीं डॉक्टर गेले होते. थोड्याशा गप्पा झाल्यावर ते गृहस्थ म्हणाले की, "आता फर्मास चहा करावयास सागतो." पण डॉक्टराच्या बरोबर असणाऱ्या कार्यकर्त्याने खुर्चीवरून उठत "आज सकाळपासून जिथें तिथे चहाच चालला आहे!" असे म्हणत त्या गृहस्थाना रोखले. अर्थात् डॉक्टराना तेथून थोड्याच वेळात निघावे लागले. हा प्रकार डॉक्टराना रुचणें शक्य नव्हते. 'राखावी बहुताचीं अतरे,' हे त्याच्या स्वभावाचे सूत्र असल्याने ते बाहेर पडल्याबरोबर त्या कार्यकर्त्यावर काहींसे रागावलेच. ते म्हणाले, 'चहाचा खर्च झाला असता तर त्या गृहस्थाचा! नकार देऊन तू काय साधलेस? चहा होईपर्यंत आणखी काही वेळ आपणाला त्याच्याजवळ मनेमाकळ्या गोष्टी करता आल्या असत्या, त्या आज तुझ्या नकाराने झाल्या नाहींत!"

चहाचा सार्वत्रिक झालेला प्रचार ध्यानीं घेऊनच डॉक्टरांनी तो घेण्यास प्रारंभ केला. कारण त्याना उठल्याबसल्या सर्वत्र हिंडावें लागे व दिवसातून अक्षरशः शेकडों जणाना भेटण्याचा प्रसंग येई. अशा वेळीं कोणी चहा देऊ केल्यावर, त्याचें मन मोडून 'नकार' देणे, हें संघटनेच्या दृष्टीने हिताचे नाहीं, हे त्यांनीं ओळखलें व कोठेहि पुढे आलेल्या पेल्यातील 'घोटभर' तरी चहा घेऊन ते त्याच्या आतिथ्याचा स्वीकार करूं लागले. केव्हा केव्हा 'चहा हे संघटनेचे पेय आहे!' असे ते थट्टेत म्हणत. पण या चहामुळे त्याच्या वहिनी सौ. रमाबाई याना अत्यंत त्रास होई. पण त्या माउलीने भाऊजींचा खाली निरोप आल्यावर चुलीवर चहाचे आधण चढविण्यास कधींच कंटाळा केला नाहीं. त्याच्या रूपानें अबोलकी सेवाच जणूं डॉक्टरांच्या घरात वास करीत होती. पण केव्हा केव्हा वरून कांहीं पेले चहा करण्याचा निरोप येई व त्या वेळीं कधी चहाच्या डब्यांत तर कधीं साखरेच्या डब्यांत खडखडाट असे! अशा प्रसंगीं आयत्या वेळीं कोणा तरी

स्वयंसेवकाला बाजारांत पाठवून धांवपळीनें सर्व गोष्टी कराव्या लागत. एकदां डॉक्टरांकडे त्यांचे स्नेही श्री. विश्वनाथराव केळकर हे आले होते. त्यांच्यासाठीं चहा करण्याचा निरोप डॉक्टरांनीं पाठविला. पण पांच मिनिटें होऊनहि वरच्या माडींत चहा न आल्यानें, ते विश्वनाथरावांना ' जरा बसा, मी खालीं जाऊन आलोंच ! ' असें म्हणत उठले ! पण खालीं जाऊन पाहतात तों तेथें चहा नव्हता व पैसेहि नव्हते ! मित्राला तर चहासाठीं थांबवलेलें ! स्वयंपाकघरांत हा प्रकार ! तेव्हां डॉक्टरांनींच स्वतः जवळील दुकानांत जाऊन ती वेळ भागविली. अर्थात् ह्या वेळीं झालेल्या प्रसंगाचा अचूक अन्वयार्थ श्री. केळकरांच्या ध्यानांत आला. त्यानंतर श्रीगुरुजींची गांठ पडल्यावर त्यांनीं त्यांच्याजवळ डॉक्टरांच्या घरांतील आर्थिक स्थितीसंबंधीं व त्यांच्या प्रकृतीसंबंधीं बारकाईनें चौकशी करून ' तुम्ही त्यांच्या घरच्या अडचणींकडे लक्ष कां देत नाहीं ? त्यांची प्रकृति मला खालावलेली दिसते ! ' असे उद्गार काढले. प्रत्यक्ष दारिद्र्याचे चटके डॉक्टरांना सुसह्य वाटत, पण आपल्या अयाचित वृत्तीला मुरड घालण्याची नुसती कल्पनाहि त्यांना सहन होण्यासारखी नव्हती. ही गोष्ट पूर्ण परिचित असल्यानेंच डॉक्टरांइतक्याच अलिप्त वृत्तीनें ऐहिक अडचणींकडे पाहणाऱ्या निष्कांचन गुरुजींनीं उत्तर दिलें कीं, " अहो, एकादशीचें पोट शिवरात्र कशी भरणार ? " त्यावर श्री. विश्वनाथराव केळकर यांनीं " डॉक्टरांच्या घरीं देण्यासाठीं मी फूल ना फुलाची पाकळी म्हणून दर महिन्याला २५ रुपये तुमच्याजवळ देत जाईन, " अशी इच्छा बोलून दाखविली. पण त्यावर गुरुजींनीं त्यांना सांगितलें कीं, " आपण त्यांचे मित्र, तेव्हां ते पैसे आपण थेट त्यांच्याच हातीं दिलेत तर बरें होईल ! " अर्थात् डॉक्टरांचा स्वभाव चिरपरिचित असल्यानें विश्वनाथरावांना तसा विषय काढण्यास धैर्य झालें नसेल, अशीच शक्यता दिसते.

प. पू. डॉक्टरांशीं ज्यांचे अगदीं निकटचे संबंध होते, त्यांना त्यांची ही अवस्था माहीत होती. पण डॉक्टरांच्यापुढें त्यांचा उपाय चालेना. या परिस्थितींतून वाट काढण्यासाठीं श्री. आप्पाजी जोशी, श्री. नानासाहेब टालाटुले, श्री, नारायणराव देशपांडे आदि मित्रांनीं मे महिन्यांत होणाऱ्या अधिकारी शिक्षण वर्गाच्या निमित्तानें त्यांत भाग घेणाऱ्या स्वयंसेवकांकडून डॉक्टरांना एक ' थैली ' अर्पण करण्याचा उपक्रम क्रमानें सुरू करून दिला. अगदीं प्रारंभीं स्वयंसेवकांनीं वर्गणी करून केवळ हार व गुच्छ डॉक्टरांना अर्पण केला होता. त्यानंतर एका वर्षीं स्वयंसेवकांनीं त्यांना एक घड्याळ अर्पण केलें, तर एकदां एक झरणी व प्रवासी बिछाना ( होल्डॉल ) त्यांना आणून दिला. त्यांच्या जोडीनें यथाशक्ति थैली जमवून देण्यासहि सुरुवात होऊन १९३४–३५ पासून नागपूर येथें व पुढें पुणें येथील वर्गांत डॉक्टरांच्या हातांत पांच-सहाशें रुपये थैलीच्या रूपानें देण्यांत येऊं लागले. पण इतके करूनहि डॉक्टरांच्या घरांतील चणचण विशेष कमी झाली असें नाहीं. कारण डॉक्टर घरांत राहत होते खरे; पण हे पैसे घरचे व हे

पैसे संघाचे, असें द्वैत त्यांच्या मनांत नव्हतें. त्यामुळे ते अशा पैशांतून भरघोस गुरुदक्षिणा देऊं लागले व स्वयंसेवकांच्या अडीअडचणी भागविण्यासाठींहि त्याचा हात नेहमींपेक्षा स्वाभाविकपणेच अधिक सढळ झाला. त्याच जोडीनें प्रवासहि वाढला होता. स्वयंसेवकांची अडचण व घरातील अडचण यात पहिली अडचण त्याना प्रथम दिसे. एका वर्षी त्यांच्या राहत्या घराच्या माडीची भिंत कोसळली. त्या भिंतीची उभारणी करणे हे अत्यावश्यक होते हे कोणीहि मान्य करील. पण ती भिंत बरेच दिवस तशाच ढासळलेल्या अवस्थेंत ' आ वासून ' उभी होती ! डॉक्टरानी आपणाजवळ असलेले पैसे अडचणींत असलेल्या स्वयसेवकाना दिल्यानें हा विलंब लागला होता. पण त्याची चिंता डॉक्टराना होतीच कोठे ? साऱ्या राष्ट्राची अवस्था आकाश फाटल्याप्रमाणे छिन्नविछिन्न झाली असता मी माझ्या एवढ्याशा घराची चिता ती निराळी काय करावी, असेच त्यांना वाटे.

प्रौढ स्वयंसेवकाप्रमाणेच त्याच्या लोभाच्या शीतल छायेखालीं वावरणाऱ्या बाल व किशोर स्वयंसेवकांनाहि या दारिद्र्याची चाहूल परमपूजनीय डॉक्टराकडे लागत असे. एकदा नागपुरांतील एक प्रतिष्ठित गृहस्थ त्याना भेटावयास आले होते. त्यांच्याजवळ ते बोलत असता कांहीं बाल-स्वयंसेवक माडीवर बसलेले होते. थोड्या वेळाने बोलणे होऊन जेव्हा ते गृहस्थ जावयास उठले, तेव्हा डॉक्टरानी त्याना आग्रहानें थाबण्याची विनंति करून, ते लगबगीने खाली पानदान आणण्यासाठीं गेले. पण त्यातील सुपारी संपलेली ! तेव्हा त्यानीं त्याच्या बधूच्या भिक्षुकीतून आलेल्या सुपाऱ्या कोठें सापडतात का, हे पाहण्यासाठी इकडे तिकडे डबे उघडून पाहिले. तेव्हां कोठे एक फुटकी सुपारी हाती लागली ! ती पानदानात ठेवून त्यानीं त्या गृहस्थाचे आतिथ्य केले. नंतर त्या गृहस्थाना निरोप देऊन झाल्यावर डॉक्टर सहज म्हणाले कीं, " या गृहस्थाकडे गेल्यावर ते आपले किती थाटात स्वागत करतात नि ते माझ्याकडे आले असतां मला त्यांना देण्यासाठी अखंड सुपारीहि नाहीं ! "

हे उद्गार ऐकून तेथे बसलेल्या बालापैकीं काही जणाना डॉक्टराच्या गृहस्थितीची कल्पना येऊन त्याच्या हृदयात कालवाकालव झाली. त्यानंतर थोड्या दिवसानीं त्या बालानी आपापसात संगनमत करून डॉक्टराच्या वाढदिवशी त्याना मोठ्या प्रेमाने कांही भेट देण्याचे ठरविले व पाडव्याच्या दिवशी तशी भेट अर्पण केली. त्यांत धोतरजोडीसमवेतच बरड्या सुपारीचा एक मोठा पुडाहि देण्यास ते विसरले नव्हते ! ही भेट देण्यासाठी त्या बालानी यथाशक्ति पैसे जमविले होते व त्यातील एकाने तर डॉक्टरांवरील उत्कट भक्तीने अंगावरील एक सोन्याचा अलंकार विकला होता, असे मागाहून उमगून आले !

हिंदुत्वाचे चिन्ह असलेली शिखा स्वतः डॉक्टरांनीं ठेवली होती व सर्व स्वयंसेवकांना शेंडी असावी, अशी त्यांची अपेक्षा असे. त्यासाठीं त्यांनीं कोणालाहि

कधीं आग्रह केला नसला तरी स्वयंसेवकांच्या गणवेषाची पाहणी करतांना स्वच्छता, नेटकेपणा वगैरे गोष्टींना जसे गुण दिले जात, तसे त्या पाहणींत शेंडीसाठींहि पांच गुण ठेवलेले असत !

संघ निघण्यापूर्वी डॉक्टर स्नान झाल्यावर कटाक्षानें संध्या करीत. त्या वेळीं नेसलेल्या धोतराच्या निऱ्या ते अंगावर घेत असत. पुढील धांवपळीच्या जीवनांत त्यांना संध्येलाहि अवसर मिळेनासा झाला होता. एकदां त्यांचे मित्र श्री. प्रल्हादपंत फडणवीस यांनीं विचारलें कीं, " इतकें वय झालें नि तुम्ही संध्या, पूजा, नामस्मरण कांहीं करीत नाहीं ! " तेव्हां डॉक्टर लगेच म्हणाले कीं, " तुमचें म्हणणें खरें आहे. पण उद्यां यमाजीभास्करासमोर उभें केलें तर तो माझें काय करील ? कारण मीं माझ्या जन्मांत माझ्या स्वतःसाठीं कांहींच केलेलें नाहीं ! " स्नान झाल्यावर पिंजर घेऊन ते त्याचा टिळा लावीत आणि बाहेर प्रवासांत असतांना जेथें मिळेल तेथें आडवें गंधहि लावतांना ते आढळत. तसेंच बाहेर जाण्यासाठीं ते माडीवरून जिन्यानें खालीं आले कीं माजघरांतील देवांना नमस्कार करून बाहेर पडत. त्यांच्या ती. आईवडिलांचा श्राद्धदिन एकच होता व त्या वेळीं त्यांच्या पुण्यस्मृतीला वंदन करण्यासाठीं डॉक्टर न चुकतां घरीं राहत. तसेंच ते श्रावणीहि करीत असत व नागपुरांतील श्रीदक्षिणामूर्तीच्या मंदिरांतील अग्निहोत्री श्री. बाबूराव हरदास यांच्याकडील इष्टीच्या मिरवणुकींतहि संमीलित होत. आश्विन महिन्यांत गोवत्सद्वादशी* या दिवशीं डॉक्टरांच्या घरीं कुलपरंपरेनें एक

---

** या गुरुद्वादशीच्या मागें एका महत्त्वाच्या घटनेची स्मृति जागृत आहे असें दिसतें. हेडगेवार घराण्याचे 'वल्लभेश' हे मूळ पुरुष होत. त्यांच्यापासून परमपूजनीय डॉ. केशवराव हेडगेवार यांची पिढी नववी ठरते. या वल्लभेश यांच्या उत्कट भक्तीचें या दिवसाच्या निमित्तानें त्यांच्या घराण्यांत स्मरण केलें जातें.*

*श्रीवल्लभेश हे मोठे दत्तभक्त होते. ते उपजीविकेसाठीं व्यापार करीत असत. ते सुशील व आचारवंत असल्यानें लोकांत त्यांना प्रतिष्ठा होती. प्रतिवर्षीं श्रीदत्ताचें जागृत व पवित्र स्थान जें कुरवपूर तेथें ते भक्तिपूर्वक यात्रेला जात. एके वर्षीं ते व्यापारासाठीं बाहेर पडले. घरांतून निघतांना त्यांनीं संकल्प केला कीं, व्यापारांत चांगला लाभ झाला तर कुरवपूरच्या यात्रेला आल्यावर ब्राह्मणांना सहस्रभोजन घालीन. पुढें त्यांच्या अपेक्षेप्रमाणें व्यापार तेजीचा झाला व त्यामुळें संकल्पाला स्मरून ते भरपूर धन बरोबर घेऊन गुरु श्रीपाद यांचें पुण्यस्मरण करीत, यात्रेला निघाले. वाटेंत कांहीं धूर्त लोकांना त्यांच्याजवळ पुंजी असल्याचें ध्यानीं आलें व तेहि 'यात्रेला चाललों' असा बहाणा करून वल्लभेश यांच्याबरोबर मार्गक्रमणा करूं लागले. असा दोनतीन दिवस प्रवास सुरू होता. एके दिवशीं रात्रीं ते सर्व जण वाटचाल करीत असतां कुरवपूरमाहात्म्य परस्परांना सांगण्यांत निमग्न होते, तोंच*

कार्यक्रम होत असे. सकाळीं ब्राह्मण मंडळी जमून अभिषेक व वेदपठण करीत आणि मग इष्टमित्रासह डॉक्टराचे जेवण होई. भिक्षुक मडळी सोडून नागपुरातील व प्रातांतील त्याचे पंचवीस-तीस मित्र तरी या दिवशी त्याच्या पक्तींत असत व तो त्याचा सबंध दिवस मोठ्या गडबडीचा ठरत असे.

ते वृत्तीने सात्त्विक व आस्तिक होते. देवाच्या अधिष्ठानावर त्याची नितात श्रद्धा असे. श्री वा ॐ काढल्यावाचून त्यानीं पत्राला वा दैनंदिनीचे पान लिहिण्याला सुरुवात केलेली दिसत नाहीं. तसेच संघकार्य हे ईश्वरी कार्य आहे, अशी त्याची दृढ श्रद्धा त्याच्या बोलण्यातून व पत्रातून वारंवार उमटे. आपण परमेश्वराच्या हातातील एक बाहुले असून त्याच्या सूत्रचालकत्वाखालीच या सर्व गोष्टी आपल्या हातून घडत आहेत, अशी त्याची सदैव धारणा असे. सघकार्य हें ईश्वरी कार्य म्हणताना सज्जनाचे सरक्षण व दुष्टाचे निर्दालन करणारे ईश्वरी कार्यच संघ करीत आहे, हा अर्थहि त्याना अभिप्रेत असे. त्याचप्रमाणे दासबोधाचे हृद्गत जाणून घेऊन ते प्रयत्नपूर्वक अंगीं मुरविणाऱ्या डॉक्टराना ‘ यत्न तो देव जाणावा ’ व ‘ अचुक यत्न तो देवो । चुकणे दैत्य जाणिजे ’ या ओव्यातील अर्थ ‘ संघकार्य हे ईश्वरी कार्य ’ असे म्हणत असताना डोळ्यापुढें येणे सहज शक्य होते. संघाच्या प्रार्थनेतहि सर्वशक्तिमान् प्रभूला उद्देशून दोन कडवी योजण्यात हीच त्याची आस्तिकता प्रकट झाली आहे. प्रतिज्ञेच्या प्रारंभींहि

---

*त्या चोरानीं वल्लभेश याच्यावर तुटून पडून त्याचा शिरच्छेद केला व द्रव्य लुटलें. इतक्यात एक त्रिशूळ व खड्गधारी जटामंडित दिव्य पुरुष प्रकट झाला व त्यानें चोराना कठस्नान घालून वल्लभेश याना जिवत केले. तो दिवस कुरवपूरच्या यात्रेचा म्हणजे गुरुद्वादशीचा होय.*

*ही वल्लभेश याच्या भक्तीची अद्भुत कथा महाराष्ट्रात घरोघरीं पूजल्या जाणाऱ्या ‘ श्रीगुरुचरित्र ’ या ग्रथात दहाव्या अध्यायात दिलेली आहे. त्या कथेंतील वल्लभेश हेच ‘खऱ्या अर्थानें’ आपल्या घराण्याचे मूळ पुरुष आहेत, ही आठवण त्याच्या वशात परपरेने जागी आहे काळाच्या ओघात कंदकुर्तीचें हेडगेवार घराणें रजल, रुद्रूर, इंदूर ( निझामाबाद ) व नागपूर असे ठिकठिकाणी पागलें. पण या प्रत्येक ठिकाणीं ‘ गुरुद्वादशी ’चें टिकून राहिलेलें महत्त्व ध्यानीं घेता ‘ वल्लभेश ’ या नामसादृश्यावर कोणींतरी श्रीगुरुचरित्रांतील कथेशीं हा केवळ बादरायण सबध जोडला, असें एकदम म्हणवत नाहीं. तसेच श्रीगुरुचरित्रातील कथेंत वर्णन केलेले ‘ वल्लभेश ’ हे भक्तहि ‘ काश्यप ’ गोत्रीच आहेत, ही गोष्टहि उल्लेखनीय आहे. त्याचप्रमाणें त्याच्या घराण्यात परंपरेनुसार अजूनहि कांहीं प्रमाणात कुरवपूर, गाणगापूर येथील यात्रा करण्याची प्रथा चालू आहे, हेंहि विसरून चालणार नाहीं.*

परमेश्वर व पूर्वज यांचें पुण्यस्मरण करून हिंदुराष्ट्राच्या पुनरुद्धाराचा व त्याला वैभवसंपन्न करण्यासाठीं प्रयत्नरत राहण्याचा संकल्प केला जातो. हें डॉक्टरांच्याच अंतःकरणाचें प्रतिबिंब उमटलेलें आहे, यांत शंका नाहीं.

पण धार्मिकता असूनहि त्याचें प्रदर्शन त्यांनीं कधीं केलें नाहीं. केव्हां केव्हां ते पहांटे उठून ध्यानस्थ बसत असत, असें त्यांचे कांहीं निकटवर्ती मित्र सांगतात. रंजल्यागांजलेल्या समाजासाठीं रात्रंदिवस धडपडत राहण्याइतकें त्यांचें 'साधुत्व' उज्ज्वल होतें व कोणत्याहि प्रसंगांत मन अविचल राहण्याइतकी त्यांच्या मनाला उन्नतावस्था प्राप्त झालेली होती. "कडकडीत विजेचे कल्लोळ। तेणें गगनासि नसे खळबळ। तैसा नाना ऊर्मींमाजी निश्चळ। गांभीर्य केवळ या नांव॥" हें संत एकनाथांचें वचनच त्यांच्या वागण्यांतून साकार झालेलें दिसे. त्यांचें मन नेहमीं विवेकाच्या सिंहासनावरच आरूढ झालेलें असे व त्याचा प्रत्यय हरघडीं आल्यावांचून राहत नसे.

एकदां तिन्ही सांजेच्या वेळीं डॉक्टरांकडे त्यांचे कांहीं मित्र एकत्र जमले होते. खोलीच्या मध्यावर एक टांगदिवा होता व त्याच्या प्रकाशांतच त्या मित्रमंडळींच्या गप्पा अगदीं रंगांत आल्या. हास्यविनोदाच्या कल्लोळांत सर्व जण दंग असतांनाच, डॉक्टरांचा चुलतभाऊ वामन हा कांहीं कामासाठीं नेमका त्याच दिव्याखालून पळत गेला. त्याच्या डोक्याच्या धक्क्यानें कांच पडून फुटली व तेल डुचमळल्यानें दिवाहि भगभग करीत विझून गेला. या प्रकारानें सर्वांचा विरस होणार या जाणिवेनें दिव्याइतकेच वामनाचे वडील आबाजी हेहि भडकले! पण डॉक्टरांनीं त्यांना शांत करून खालीं बसविलें व जसें कांहीं घडलेंच नाहीं इतक्या सहजतेनें त्यांनीं चटकन् दुसरी कांच आणून थोड्याच वेळांत बसविली. असा संयम हाच त्यांचा आश्रित होता.

डॉक्टरांकडे अगदीं क्रांतिकाळापासून म्हणजे १९१५-१६ सालापासून आत्मीयतेनें व कौतुकानें पाहणारी वडीलधारी मंडळी नागपुरांत व त्या प्रांतांत सर्वत्र विखुरलेली होती. त्यांपैकीं अनेकांच्या घरांत डॉक्टरांचा, ते जणूं काय त्या कुटुंबांतीलच एक, इतका निकटचा संबंध असे. अशा ठिकाणीं गेल्यावर या घनिष्ठ स्नेहाला साजेसाच मनमोकळा व्यवहार त्यांच्या हातून घडत असे, हें सांगावयास नकोच. आर्वीला श्री. नारायणराव देशपांडे, वर्ध्याला श्री. आप्पाजी जोशी वगैरे अनेक जणांचीं नांवें या संबंधांत सांगावीं लागतील. डॉक्टर तरुण असतांना त्यांची धडधाकट भीमकाया, कृष्णवर्ण व सेवाभाव पाहून वडीलधाऱ्या मंडळींवर त्यांचा विलक्षण प्रभाव पडे. त्याचें वर्णन करतांना त्यांचे एक स्नेही सावनेरचे श्री. मामा हरकरे वकील सांगतात कीं, "ते मला भेटण्यासाठीं घरीं आले कीं, माझे आजोबा घरांत कांहीं तरी फराळाची पूर्वसूचना देण्यासाठीं म्हणायचे कीं, "अग ए! हनुमान आला आहे!" असा हा कौतुकानें योजलेला शब्दच

डॉक्टराचा आहार पाहिल्यानंतर कोणालाहि यथार्थ वाटला असता ! लग्नमुंजी-सारख्या प्रसंगानें त्यांच्या पानात चाळीस-पन्नास जिलब्या सहज घातल्या जात व त्या ते हंसतमुखाने संपवीत. १९३० च्या कारागृहापर्यंत त्याचे सारें मित्रमंडळच अशा आहाराचे होतें, असें दिसून येते. कधी कधीं हे मित्र एखाद्याकडे जेवावयास गेले म्हणजे एकदां भिजवलेली कणीक संपून पुन्हा कणीक भिजवावी लागे व पोळी-बरोबर घालावयाला भाजी उरली नाहीं म्हणून आयत्या वेळी साखरांबा वा गुळाबा काढावा तर त्या बरणीचा तळहि घरातील सुगरिणीला त्या पंक्तींत दिसावयाचा ! काही घरात तर डॉक्टराची इतकी सलगी असे की, ते तेथे गेल्यावर ' मला ओल्या नारळाच्या करंज्या करून घाल ' असें घरातील वृद्धेला प्रेमाने सागूं शकत व पाच-सहा नारळाचे पुरण तेव्हाच फस्त होई. डॉक्टराना भाकरीबरोबर तेल-तिखट आवडे; एवढेच नव्हे तर वडाभात, भजाभात, चकल्या, थालीपीठ, पुडाच्या वड्या, मुरमुरे घातलेला चिवडा असल्या ' राजस ' खाण्याचा भरणा त्याच्या आवडीच्या पदार्थांत फारच होता असें दिसून येते. १९३४ पर्यंत ही स्थिति होती. पण पुढे या अनुभवावरूनच डॉक्टराना जेवताना आग्रह होई व तो त्याच्या प्रकृतीला त्रासदायक ठरे.

वऱ्हाड-मध्यप्रातात हिंडताना अनेक जणाच्या मुखांतून डॉक्टराच्या आहारा-च्या गोष्टी ऐकावयास मिळतात, त्यात जो तो त्याच्याकडे डॉक्टरानी खाल्लेला पदार्थ हाच त्याना सर्वांत आवडता होता असे सागत असतो. पण अशा अनेक पदार्थांची नावे मला ऐकावयास मिळालीं व त्यात सर्वसामान्य लोकाच्या परिचयाचा कोणताच जिन्नस गळलेला नव्हता, एवढे सागितले म्हणजे पुरे आहे !

पण असा आहार असताना विहिरींत वा नदींत तास-तास माडी घालून पोहताना डॉक्टराना अनेकानीं पाहिले आहे. एकदा तर ते काशीला गेले असता त्यानीं तेथील गगेच्या विशाल पात्राचा पैलतीर पोहून गाठला होता. तसेच एखादे रिकामे भाडें उचलावे, त्याप्रमाणे सहज लीलेने अंगणातील फटफटी रस्त्यावर उचलून आणणाऱ्या श्री. गोविंदराव चोळकर याच्याबरोबर खूप दंगामस्ती त्यानी केल्याचे अजून अनेकाच्या ध्यानात आहे. त्याचे शरीर भव्य होते, त्याचा आहार उत्तम होता आणि त्याचा कामाचा उरक व कष्ट करण्याची सिद्धताहि विलक्षण होती ! जशी सुग्रास भोजनाच्या वेळीं प्रसन्नता असे, तशीच प्रसन्नता उपाशी असतानाहि त्यांच्या मुखावर दिसे, हीहि गोष्ट विसरून चालण्या-सारखी नाहीं. जगाच्या दृष्टीने डॉक्टर ' कधीं विलासी, कधीं वनवासी ' असे असले, तरी हिंदुराष्ट्राच्या उद्धारार्थ लक्षावधि बाधवाना एका संघटना-सूत्रात गुंफावयाचे आहे, ही त्यांची दृष्टि अविचल असे व त्यातूनच ते दोन्ही स्थितीत म्हणजे अनुकूलतेत व प्रतिकूलतेत सारखेच उत्साही व कार्यक्षम दिसत. प्रकृति उत्तम असेपर्यंत डॉक्टरांना आपल्या मित्रमंडळींशीं दंगामस्ती करण्याची अत्यंत हौस

असे. त्यांच्या त्या काळांत टेकावयाचे लोड एकमेकांवर फेकून हास्यविनोदांत सर्व माडीच डोक्यावर घेतल्याचा प्रकार अनेकदां घडे ! इतकेंच नव्हे तर या मऊ लोडांनीं खरपूस समाचार घेतां येत नाहीं म्हणून तुरीची डाळ भरून केलेले जड व भरीव लोड बनवून त्यांचा वापर केला जाई ! पुढें संघाच्या स्वयंसेवकांतहि याची आवृत्ति निघूं लागली कीं डॉक्टरांना अत्यंत आनंद होई व क्वचित् तेहि त्या तारुण्यसुलभ धिंगाण्यांत भाग घेत !

समाजसंघटनेसाठीं हिंदु समाजांतील सर्वांनीं एकत्र येऊन एकत्वाचे व स्नेहाचे संबंध वाढविले पाहिजेत, यासाठीं डॉक्टरांचे प्रयत्न चालू होते. पण ही गोष्ट साधण्यासाठीं समाजांतील जातींचें समूळ उच्चाटन केलें पाहिजे किंवा सामाजिक ऐक्यासाठीं कुलपरंपरेनुसार चालत आलेल्या कांहीं सत्संस्कारांचा त्याग केला पाहिजे, असें त्यांना मुळींच वाटत नव्हतें. डॉक्टर हिंदु समाजांतील कोणाकडेहि निःसंकोचपणें जेवून येत व त्यांत आपण कांहीं विशेष करीत आहोंत अशी लवमात्र भावना नसे. पण त्याचबरोबर कुलपरंपरेनें चालत आलेली शाकाहाराची मर्यादा मात्र त्यांनीं केव्हांच उल्लंघन केली नाहीं. वास्तविक नागपूरला त्यांचें सर्वांत अधिक येणें-जाणें डॉ. मुंजे यांच्याकडे असे व त्यांना तर शाकाहार हा सदैव मुळमुळीत वाटावयाचा ! राष्ट्रांत पराक्रमाची भावना जागविण्यासाठीं मांसाशन अत्यावश्यक आहे, असें त्यांचें प्रतिपादन असे. पण अशा डॉ. मुंजे यांच्याशीं अगदीं आत्मीयतेचे संबंध असूनहि त्यांनीं त्या गोष्टीचें कधींच अनुकरण केलें नाहीं. कोणत्याहि व्यक्तीमध्यें उत्तम व आदरणीय गुण असतील तर त्यांचें अनुकरण करावें, पण एखाद्याच्या उत्कट गुणावर भाळून जाऊन विवेकाला दूर सारण्याइतकी विकार-वशता बळावूं देणें व त्या गुणांबरोबर अंधपणानें एखाद्या व्यक्तीचें सर्व गोष्टींत अनुकरण करूं लागणें, हें डॉक्टरांना मुळींच संमत नव्हतें. त्यांचा विवेक सदैव जागृत असावयाचा.

त्यांच्या मैत्रीचा व्याप मोठा होता व त्याचा कसहि असामान्यच म्हणावा लागेल. त्यांच्या प्रत्यक्ष संबंधांत आलेला मनुष्य हा सहसा त्यांच्यापासून दूर गेला असें होत नसे व त्यांतूनहि मनुष्यस्वभावानुसार तो दूर गेला तरी पृथ्वीपासून दूर गेलेला चंद्र जसा दुरून पण तिच्याचसभोंवतीं प्रदक्षिणा घालतो, त्याप्रमाणें डॉक्टरांच्या असामान्य गुरुत्वाकर्षणाच्या कक्षेंतच तो गुंगत राही. राजकीय वा तात्त्विक मतभेद हे त्यांच्या स्नेहाचे संबंध तोडण्यास असमर्थ असत. त्यांच्या पत्रांचा प्रारंभ ' परम मित्र ' अशा शब्दानें होई. पण हा परम मित्र शब्द केवळ एक ' पद्धति ' म्हणून वापरला जात नव्हता. श्रीसंत एकनाथांनीं भागवतांत वर्णिल्या-प्रमाणें अत्यंत उदात्त व उच्च कोटीचें हृदय व व्यवहार यांची पुण्याई त्या शब्दांत एकवटलेली असे. " मनें धनें कर्तव्यता । ज्याची अनन्य अवंचकता । त्या नांव परममित्रता । हे खूण तत्त्वता जाणावी ॥ " ही ओवी पूर्णांशानें डॉक्टरांच्या

अकृत्रिम स्नेहांतून सार्थ झालेली दिसे. या अलौकिक व अभिजात प्रेमामुळेच मतभेद असूनहि नागपूरच्या बॅरिस्टर मोरूभाऊ अभ्यंकर याच्यासारख्या-कडून अडचणीच्या वेळी डॉक्टराना ५०० रुपये त्याच्याकडे रात्री जाताच उसने मिळालेले होते. त्या वेळी डॉक्टरांनीं 'कागद' करून देण्याचा विषय काढताच "मला डॉ. हेडगेवाराकडून कागद करून घ्यायला काही वेड लागलेलें नाहीं !" असे जे सहजोद्गार त्याच्या मुखातून निघाले, ते डॉक्टराच्या स्नेहाची पकड ध्यानीं आणून देण्यास समर्थ आहेत. प. पू. डॉक्टराच्या बरोबर १९२१-मध्ये नागपूर कारागृहात असलेले कर्मवीर श्री. पाठक यानीं तर मला असे सांगितले कीं, "मतभिन्नतेमुळे मी डॉक्टराशीं तटस्थपणाचे संबध ठेवले. पण त्यांनीं मात्र माझ्याशीं स्नेहाचे संबंध कायम राखले !" ते मैत्री तुटण्याइतके मतभेद कधींच तीव्र होऊ देत नसत. त्याच्या या वैशिष्टयाचे वर्णन करताना 'तरुण भारत'चे संपादक श्री. ग. त्र्यं माडखोलकर सहज बोलून गेले की, "त्याची लोकशाहीला इतकी अनुकूल वृत्ति होती की, त्याच्या व्यवहारात प्रत्यक्ष विरोधकांशींहि सौजन्य दिसे." कॉंग्रेसमध्ये काम करणारी असंख्य मडळी, रा. स्व. सघ निघाल्यानंतरहि डॉक्टराशीं वागताना विरोध विसरत असत, अशी असंख्य उदाहरणें आढळात येतात. डॉक्टराच्या स्नेहासंबधीं बोलताना कॉंग्रेसचे एक कार्यकर्ते श्री. मामा हरकरे वकील हे तर असे म्हणाले की, "डॉक्टराच्या संघातील प्रतिष्ठित स्वयंसेवक जे कार्य करतात, ते कार्य केवळ डॉक्टरावरील प्रेमामुळे अजूनहि करण्याची माझी सिद्धता आहे." डॉक्टराशी राजकीय मतभेद असलेल्याची जर ही स्थिति, तर डॉक्टराशी सर्व क्षेत्रात एकरस झालेल्या मित्राच्या अनुभवातील गोडवा किती असेल !

जुन्या शुक्रवारींत डॉक्टराच्याबरोबर त्याच्या शैशवात चेंडू आपटण्याची चढाओढ खेळणारे व शाळेत जाता जाता आबट बोरे घेऊन त्याचा आस्वाद घेणारे श्री. रामभाऊ पाटणकर शास्त्री म्हणून त्याचे एक बालमित्र पुण्याला आहेत. ते अनेक वर्षांनीं नागपूरला गेले असता स्वाभाविक ओढीने डॉक्टराकडे गेले व अंगणात उभे राहून 'केशव आहे काय ?' अशी त्यानीं घरात विचारणा केली. पचवीस-तीस वर्षांत वास्तविक डॉक्टरानीं त्याना पाहिलेले नव्हते. तरीहि हा प्रश्न कानी पडताच डॉक्टरानीं बालमित्राचा हा आवाज ओळखला व त्यानी "रामा, तू इकडे केव्हा आलास ?" असे म्हणत पुढें येऊन त्याना कडकडून मिठी मारली ! एकदा आपला म्हटला कीं, त्याचे डॉक्टरांच्या हृदयातील स्थान खरोखरच अढळ असे. अशा स्नेहातून अनेकाच्या आजारात शुश्रूषा करण्यासाठीं डॉक्टराकडून रात्रीचा दिवस केला जाई व स्वतःचा संसार नसतानाहि परिचिताची व मित्राच्या मुलामुलींचीं लग्नें जमविण्यासाठीं डॉक्टर खटपट करताना दिसत. स्वयसेवकांच्या पालकांना तर आपल्यापेक्षां आपलीं मुलें डॉक्टराचेच अधिक

ऐकतात असें वाटे व त्यांचाहि " माझ्या मुलाला आतां लग्न कर असें तुम्हीच सांगून बघा " असा ससेमिरा त्यांच्यामागें लागे. प्रसिद्ध कादंबरीकार व वृत्त-पत्रकार श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांचा प्रेमविवाह साकार होण्यांतहि प. पू. डॉक्टरांचीच मध्यस्थी कशी कारणीभूत झाली, याचें सुंदर वर्णन त्यांनीं ' जीवन-साहित्य ' या पुस्तकांत केलेलें अवश्य पाहावें. ते लिहितात, " माझ्या कर्जाचे अद्याप दोन हप्ते फिटावयाचे होते. नागपुरांत त्या वेळीं इतका कांहीं नवखा होतों कीं, माझ्यासारख्या घरदार नसलेल्या अनोळखी उपऱ्या तरुणाला मुलगी देणें हें अंधारांत उडी घेण्यासारखेंच एक साहस होतें. त्यांतून मीं पाहिलेली मुलगी तर आपल्या वडिलांचें एकुलतें एक अपत्य होती. " पण इतक्यांतूनहि डॉक्टरांच्या प्रयत्नानें मार्ग निघाला व गजाननराव ' मीरा के प्रभु ' झाले !

त्यांची मैत्रीची भावना अत्यंत उत्कट होती व तिचा प्रत्यय ठायीं ठायीं आल्यावांचून राहत नसे. प्रसिद्ध सर्वोदयवादी कार्यकर्ते कै. तात्याजी वझलवार यांचा अनुभव या दृष्टीनें उल्लेखनीय आहे. उन्हाळ्यांत नागपुरांत वर्ग चालू असतांना वेळ वांचावा या हेतूनें डॉक्टर तात्याजींकडे स्नानाला जात. तेथें त्या दोघांचें एकेरी शब्दांत संभाषण होई. एकदां डॉक्टरांबरोबर गेलेल्या स्वयंसेवकानें त्यांचा उल्लेख तात्याजी वझलवारांनीं ' केशव ' असा केलेला ऐकला. डॉक्टर स्नानासाठीं आंत गेल्यावर त्या स्वयंसेवकानें तात्याजींना सांगितलें कीं, " आपली मैत्री आहे हें खरें. पण डॉक्टरांना आपण ' केशव ' न म्हणतां ' केशवराव ' म्हणावें असें मला वाटतें. " थोड्या वेळानें डॉक्टर बाहेर आले तेव्हां गमतीनें ही सूचना तात्याजींनीं त्यांच्या कानांवर घातली. पण ते क्षणांत गंभीर झालेले दिसले. थोड्याच वेळांत स्वयंसेवकाकडे वळून ते म्हणाले, " मला ' केशव ' अशी आपुलकीनें हांक मारणारीं नागपुरांत आतां चार-दोनच मंडळी राहिली आहेत. त्यांनाहि तुम्ही ' अहो जाहो ' म्हणायला लावणार काय ? " हें बोलतांना डॉक्टरांचे व तात्याजींचे डोळे पाणावले होते !

त्यांच्या मैत्रीची उत्कटता व्यक्त करणारी आणखी एक घटना संस्मरणीय आहे. एखादा मनुष्य मित्रत्वांतून आपणांवर एखादें काम सोपवीत असेल वा आपणांकडून कांहीं अपेक्षा करीत असेल, तर त्या कामाच्या किंवा अपेक्षेच्या पूर्तीसाठीं किती खटपट केली पाहिजे, याचें उत्तर डॉक्टरांच्या व्यवहारांतून सदैव मिळे. एकदां वर्ध्याचे जिल्हा संघचालक श्री. आप्पाजी जोशी हे निवडणुकीसाठीं उभे होते व त्यांनीं मतदानाच्या दिवसासाठीं एक भाड्याची मोटार पाठवा, असा निरोप डॉक्टरांकडे पाठविला. त्या निरोपानुसार सकाळीं ६–७ वाजेपर्यंत ती मोटार वर्ध्यास पोंचणें आवश्यक होतें. सायंकाळीं डॉक्टरांना हा निरोप कळला तेव्हां ते तापानें पडून होते. तरीहि त्यांनीं मोटार ठरविण्यास जाण्या-साठीं टांगा आणा, असें जवळ बसलेल्या स्वयंसेवकांना सुचविलें. आजारी स्थितींत

त्यांनीं बाहेर जाणें इष्ट नाहीं, हें ओळखून तेथील एका स्वयंसेवकानें 'हें काम मी करून येतों' असे सांगितलें आणि तो वर्ध्याहून निरोप घेऊन आलेल्या माणसाला बरोबर घेऊन बाहेर पडला. त्याने तीन-चार ठिकाणी जाऊन परोपरीनें निकड लावून पाहिली, पण कोणीहि मोटारवाला वर्ध्यास इतक्या लवकर जाण्यास होकार देईना. शेवटीं काम न झाल्याने, केवळ हात हालवीत डॉक्टराकडे जाणें अवघड वाटूं लागल्याने 'मोटार मिळत नाहीं' असा निष्कर्ष वर्ध्याहून आलेल्या निरोप्याबरोबर त्यानें डॉक्टराना कळविला व स्वतः कार्यालयात जाऊन निजला. डॉक्टर लोकरीचा मफलर व शाल पांघरून शांतपणे बाहेर पडले व त्यानीं रात्रीं एक वाजता श्री. केशवराव ब्रह्मे याचे घर ठोठावले. त्यानीं दार उघडून पाहिले तों समोर डॉक्टर उभे ! डॉक्टराना इतका त्रास पडलेला पाहून, ब्रह्मे ओशाळले व त्यानीं 'येथून लवकर निघतो, निश्चित असा,' असा होकार दिला.

असा होकार मिळाल्यावर डॉक्टर कार्यालयात गेले व त्यानीं तेथील स्वयंसेवकाला दार खडखडावून उठविले. तापाने फणफणलेल्या डॉक्टराना रात्री ३ ला तेथें पाहून 'आपण का आला? मोटार मिळत नाहीं हा निरोप पोचला नाहीं काय?' असा त्याने प्रश्न केला. तेव्हा डॉक्टर उद्गारले, "तुला मोटार मिळाली नाहीं म्हणून चिंता वाटायला नको म्हणून मुद्दाम सागायला आलों की, ब्रह्मे अगदीं वेळेत मोटार घेऊन जाणार आहेत." यानतर घरीं जाऊन त्यानीं वर्ध्याला देण्यासाठीं पत्र लिहिले व पहांटे मोटारीची पाठवणी केल्यावरच अंथरुणाला पाठ लावली !

अशा उत्कट प्रेमानेच डॉक्टरानीं सहस्रावधि लोकाना आत्मसात् केलें होतें. त्याच्या सहवासात केवळ एक-दोन दिवसच राहावयास मिळालेल्या कोल्हापुरातील एका इंग्रजी शाळेच्या संचालकाला डॉक्टराच्या अशा टिकाऊ मैत्रीचा कसा आधार वाटला होता, हे पाहण्यासारखे आहे. ते संचालक डॉक्टराना लिहितात की, "आपली मदत टाकोटाक उलट टपालीं येणें जरूर आहे. तशी वाट पाहीन. आवश्यक झाले तर आपण करीत असलेल्या त्यागात रात्रीचें जेवण सोडण्याच्या त्यागाची भर घाला व त्याबाबत येणारा खर्च मदत म्हणून अगदीं विनंतिअन्वयें उलट टपाली पाठवा." डॉक्टरांचें गृहजीवन व आर्थिक स्थिति ज्याना अवगत आहे, त्याना हे पत्र अति विचित्रच वाटेल यात शंका नाहीं. पण या विचित्रपणाच्या मागून डॉक्टरच संकटात उपयोगी पडतील हा जो विश्वास प्रकट झालेला आहे, तो लपण्यासारखा नाहीं. नव्या व्यक्तीलाहि असा विश्वास वाटेल, मग चिरपरिचिताना त्यांचा किती आधार वाटावा ! अनेकाना डॉक्टर हेच जीव कीं प्राण झालेले होते, असे म्हणणे मुळींच अतिशयोक्तीचें ठरणार नाहीं. डॉक्टरांचे स्नेही सिदीचे श्री. नानासाहेब टालाटुले आजारांत अत्यवस्थ

झाले व त्यांची त्यांनाच आशा वाटेनाशी झाली. तेव्हां त्यांनीं प. पू. डॉक्टरांची प्रतिमा आपणांसमोर सहज दिसेल अशी ठेवून देण्यास सांगितलें व आपल्या डोळ्यांतील प्रेमाश्रूंनीं मनोमन डॉक्टरांवर भक्तीनें अभिषेक करून मगच देह ठेवला ! खरोखरच डॉक्टरांच्या स्नेहाची ओढ अशी दिव्य होती !

डॉक्टरांचा स्वभाव अत्यंत खेळकर व विनोदी होता व बरोबरच्या मित्र-मंडळींत त्याला खोडकरपणाचें रूप येई. एकदां नागपूरचे सुप्रसिद्ध मजूर पुढारी श्री. रामभाऊ रुईकर हे श्री. सकलातवाला यांच्या सत्कारासाठीं डॉक्टरांजवळ निधि मागूं लागले. रुईकरांची कौटुंबिक स्थितीहि बरी होती व डॉक्टरांकडे अठरा विश्वें दारिद्र्य असे. पण इतर मजूर पुढाऱ्यांप्रमाणेंच रुईकरांच्या दृष्टीनें डॉक्टर हे समाजवादी नसल्यानें पुंजीपतींच्याच वर्गांत मोडणारे होते. तेव्हां त्यांनीं निधि मागतांच डॉक्टरांनीं हंसत उत्तर दिलें कीं, " तुम्ही श्रीमंत मजूर आहांत व मी पडलों गरीब भांडवलदार ! तेव्हां निधि कोठून देऊं ? " दुसऱ्या एका मित्राची तर डॉक्टरांनीं थट्टेनें गाळणच उडविली होती. नागपुरांत डॉक्टरांचा विद्यार्थीदशेपासून ज्यांच्याकडे घरोबा होता, ते प्रल्हादपंत फडणवीस हे अंगणांत पलंगडीवर लोडाशीं टेकून डॉ. मुंजे यांच्या पराक्रमाविषयीं व धैर्याविषयीं रसभरित वर्णन करण्यांत तल्लीन होत. पण त्यांचा भित्रा स्वभाव डॉक्टरांच्या चांगलाच परिचयाचा होता. तेव्हां एके दिवशीं त्यांच्या गप्पा अगदीं रंगांत आल्या असतां व भोंवतींच्या श्रोत्यांत डॉक्टरहि बसले असतां एक आरक्षकाधिकारी आंत आला. त्याच्या येण्यानेंच प्रल्हादपंत घाबरले. इतक्यांत त्यानें करड्या आवाजांत पृच्छा केली कीं, " यहाँ प्रल्हादपंत फडणवीस कौन है ? " या प्रश्नानें वीररसाच्या गोष्टी संपून तेथें करुणरसाला सुरुवात झाली ! प्रल्हादपंत अतिशय घाबरले व त्यांच्या मुखावरील भाव भराभरा पालटत असतां त्यांची जवळ जवळ बोबडी वळली ! सभोंवतीं बसलेल्या मंडळींना डॉक्टरांनीं, आपल्या परिचयाचा एक अधिकारी आज येथें येऊन गंमत करणार आहे, याची पूर्वसूचना दिलेली होती. त्यामुळें प्रल्हादपंतांची बोबडी वळतांच त्या आलेल्या अधिकाऱ्यांसकट तेथें असलेल्या सर्वांचीं हंसतां हंसतां अगदीं मुरकुंडी वळली ! ' युद्धस्य कथा रम्या ' हें तर खरेंच ! पण युक्तीनें प्रत्यक्ष समरप्रसंग भासवून त्याहूनहि रम्य असा करुण व हास्यरस उसळविणारा डॉक्टरांचा थट्टेखोर स्वभाव हा अधिक हृद्य असे.

फुलाबरोबर सुगंध व सूर्याबरोबर किरण, तसेंच डॉक्टरांच्या संगतींत हास्य सदैव दिसे. त्यांच्या विशाल मिशांतून ते हसूं लागले म्हणजे निंबोणीच्या झाडा-आडून रजतकणांची स्वच्छंद उधळण करणाऱ्या चंद्राच्या प्रसन्नतेचीच आठवण होई. हास्य हें निर्मळ अंतःकरणाचें प्रतिबिंब असतें. द्वेष, असूया अंतःकरणांत थैमान घालीत असतां वरकरणीं हास्याचा देखावा निर्माण करतां येतो. पण तो

कचकडीच्या फुलांप्रमाणेच निर्जीव व हिणकस भासतो, यात शंका नाही. हास्यातील गोडवा हा त्यामागील विशुद्ध व निकोप अशा सात्त्विकतेचा प्रभाव असतो व तो प्रभाव डॉक्टराच्या मनमोकळ्या हास्यांतून प्रतीत होई.

डॉक्टरांची बैठक म्हणजे एक अद्‌भुत संस्कारकेंद्र होते. व्यक्तिगत जीवनाच्या कोषात राहून उदासवाणे सूर घुमविणाऱ्या मनाला त्यातून बाहेर पडण्याचे आणि सामाजिक जीवनाच्या अनंत अवकाशात आणून आकाशाच्या पंखानी उंच भरारी मारण्याचे स्फुरण त्याच्या बैठकीत अवश्य मिळे. पाच-पंचवीस तरुण सभोवतीं बसले आहेत व मध्यावर बसून डॉक्टर गप्पागोष्टी करीत आहेत, असे दृश्य त्यांचे नाव निघताच डोळ्यापुढे उभे राहते. डॉक्टर हे संघाचे एकमेव प्रमुख असल्याने त्याची भेट घेणे सर्वसामान्य व्यक्तीला कठीण झाले असते तरी कोणाला नवल वाटले नसते. कारण पुढारी म्हटला म्हणजे त्याने कामापुरते समाजात यावे व इतर वेळीं त्याची मनमोकळी भेट घेणे, हेहि इतराना दुर्मिळ होऊन बसावे, असाच सार्वत्रिक अनुभव म्हणून सागता येईल. पण डॉक्टराकडे ' आव जाव घर तुम्हारा ' असाच अनुभव येत असे.

डॉक्टर स्वतः कोणत्याहि कामात कितीहि निमग्न असले तरी त्याना भेटावयास येणाऱ्याची नीट विचारपूस झाली नाहीं व त्याला योग्य ते मार्गदर्शन व प्रोत्साहन मिळाले नाही, असे एकदाहि घडले नसेल. आबराईच्या शीतल छायेंतील पाणपोईचीच उदारता तेथे प्रत्ययास येई. कामात अपेक्षित यश न मिळाल्याने वा मार्गात अचानक अडचणी उभ्या राहिल्याने हतबुद्ध व उदास होऊन आलेला कार्यकर्ता त्याच्या बैठकीत बसून गेला की, त्याला परिस्थितीशी नेटाने झुंज देण्याची उभारी मिळे.

डॉक्टराच्या बैठकीतील गप्पागोष्टीत राजकारणापासून तो धर्मकारणापर्यंत प्रसंगाप्रसंगाने कोणतेहि विषय येत व त्यातून डॉक्टर जे सहजगत्या व हसतखेळत स्वानुभव सागत ते अत्यंत मोलाचे असत. त्याचे हे कथन इतके रसाळ, वास्तव व आकर्षक असे की, पाच-दहा मिनिटातच नवागत त्या बैठकीत रगून जाई. घरीं वा अन्यत्र कोठे निकडीच्या कामासाठी जाण्याची आठवण अनेकदा तेथे आलेला मनुष्य विसरून गेल्याचे अनुभव येत. केव्हां मनुष्याच्या अहकारीपणाचा विषय निघे, तर केव्हा अनुयायी कसा असावा यावर बोलणे चाले. केव्हा खरी धार्मिकता कोणती, याची उकल तेथे केली जाई, तर कधीं मनुष्याच्या मनाच्या सामर्थ्याचे गुणगान डॉक्टरांच्या मुखांतून ऐकावयास मिळे. त्या गप्पातून प्रवास-वर्णनेहि असत व समाजात हरघडी जाणवणाऱ्या असख्य आपत्तींचे व हृदयाला व्याकुळ करणाऱ्या दैन्याचे चटकेहि बसत. कार्यकर्त्याने आत्मनिरीक्षण करून आपली पात्रता व स्वभाव कार्यानुकूल करण्याची इच्छा ते अशा बोलण्यातून उत्पन्न करीत व नेमके आपले काम कोणते व ते कसे केले पाहिजे, याची उमजहि

ते कार्यकर्त्यांना पाहून देत. त्यांच्या बोलण्यांत कृत्रिमतेला स्थानच नव्हतें नि अहंकाराचा दर्पहि नव्हता. त्या बोलण्यांत शोभेचे डोळे असणाऱ्या मोरपिसांप्रमाणें दिखाऊ शाब्दिक पसारा नसे; तर प्रत्यक्ष डोळस व्यवहारांतून आलेल्या अनुभवांची वास्तवता त्यांतून प्रकट होई. तेथें थट्टाहि चाले, पण त्यांत बोचरा कुत्सितपणा डोकावणें हें असंभवनीय होतें. डॉक्टरांच्याबरोबर सावलीप्रमाणें वावरलेले श्री. कृष्णराव मोहरीर सांगतात कीं, "......डॉक्टरांची बैठक म्हणजे स्वयंसेवकांच्या दृष्टीनें सर्वस्वच होतें. त्यांत बसून स्वयंसेवक स्वर्गीय वातावरणाचा अनुभव घेत असत. संघस्थानावरील कार्यक्रमांत अपूर्ण राहिलेला स्वयंसेवक डॉक्टरांच्या बैठकींतील उत्साही वातावरणांत पूर्णता पावत असे. त्यांच्या बैठकींतील वातावरणाचें यथार्थ वर्णन करणें हें प्रायः अशक्य आहे." बारीक बारीक गोष्टी सांगून डॉक्टर एखादा अवघड विषय देखील अगदीं सोपा करून सोडीत. चपखल दृष्टान्त व रूपक हें त्यांच्या बोलण्यांतील सुलभतेचें वाहन होतें.

स्वयंसेवकाला त्याच्या कार्यक्षेत्रांत जें वातावरण अनुभवाला येत असेल, त्यावरून एकूण देशांतील वातावरणाचा अर्थ त्यानें लावूं नये, असें प्रतिपादन डॉक्टर एकदां करीत होते. त्या ओघांत त्यांनीं जी गोष्ट सांगितली ती त्यांच्या मार्मिकतेची कल्पना आणून देण्यास समर्थ आहे. ती गोष्ट अशी—

एक राजा होता. त्याची हजामत करण्यासाठीं येणारा न्हावी नेहमींपेक्षां जरा अधिक प्रसन्न असलेला पाहून राजानें प्रश्न केला, "नाम्या! आपल्या राज्यांतील जनतेची एकूण आर्थिक स्थिति आजकाल कशी आहे?"

त्या न्हाव्यानें आपल्या धंद्यांतून पै-पैसा मागें टाकून नुकतेंच चार-आठ तोळे सोनें खरेदी केलें होतें. तेव्हां त्यानें उत्तर दिलें, "महाराज, लोक खाऊन-पिऊन सुखी आहेत! शिवाय प्रत्येक जण किमान चार-आठ तोळे सोनें तरी जवळ बाळगून आहेच!" त्यावर 'खरेंच?' असें म्हणत राजानें समाधान व्यक्त केलें. वास्तविक राज्यांत अधूनमधून पडणाऱ्या दुष्काळामुळें लोकांची स्थिति तितकीशी चांगली नाहीं, हें राजा जाणून होता. असें असतां नाम्यानें स्वतःप्रमाणेंच सर्वांची स्थिति आहे, हें केलेलें वर्णन त्याला पटलें नाहीं. नाम्याची चूक ध्यानीं आणून देण्यासाठीं राजानें जरा गंमत करण्याचें ठरविलें व प्रधानाला बोलावून त्यानें आज्ञा केली कीं, "राजवाड्यांत येणाऱ्या न्हाव्याच्या घरीं चार-आठ तोळे सोनें आहे, तें सर्व मोठ्या कौशल्यानें त्याला नकळत काढून आणण्याची व्यवस्था करा." या राजाज्ञेनुसार न्हाव्याकडील सोनें एका हेरानें शिताफीनें काढून आणलें. घरांत चोरी झाली म्हणून न्हावी दुःखित झाला.

त्यानंतर दोन-चार दिवसांत राजाची श्मश्रु करण्यासाठीं नाम्या राजवाड्यांत आला. तेव्हां तो उतरलेला व चिंताग्रस्त झालेला असणें स्वाभाविक होतें. तो असा कष्टी कां, याचें इंगित माहीत असल्यानें राजा मनांतल्या मनांत हंसला व

नाम्याला बोलण्याच्या ओघांत त्यानें प्रश्न केला कीं, " गांवांतील एकूण वातावरण आजकाल कसें आहे ? "

एक दीर्घ उसासा सोडीत नाम्यानें उत्तर दिलें, " काय सांगूं महाराज ! चोरांनीं लोकांना अगदीं नकोसे करून सोडलें आहे ! "

कोणत्याहि वेळीं अशा छोट्याशा गोष्टीने मोठा आशय ते स्वयंसेवकांच्या ध्यानीं आणून देत. स्वयंसेवकानीं आपले कर्तव्य अंतःकरणपूर्वक पार पाडण्याचा प्रयत्न करावा; तसें करतांना त्याने स्वतःच्या प्रतिष्ठेच्या मागें लागूं नये; एवढेंच नव्हे तर प्रतिष्ठा तिच्या स्वभावानुसार आपल्यामागे लागली तरी तिच्याकडे पाहूं नये, असें प्रतिपादन ते करीत. त्या ओघांत जगांत 'प्रतिष्ठे'संबंधींच्या कशा खोट्या कल्पना लोक बाळगतात, याचे विदारक चित्रण करण्यास ते विसरत नसत. त्यासाठीं ते आपल्या लहानपणचा एक अनुभव सागत. डॉक्टराकडे कुलपरंपरेनुसार गोवत्स द्वादशी ( आश्विन वद्य १२ ) साजरी केली जाई. त्यात अभिषेक व वेदपठण करण्यासाठी नागपुरातील पट्टीच्या विद्वानाना निमत्रण असे. पण त्यांचा खाक्या असा की, ठरलेल्या वेळी हे दूर राहणारे ब्राह्मण येत नसत आणि त्यामुळे डॉक्टर व तात्याजी यांना त्याना बोलावण्यासाठीं खेपा घालाव्या लागत. त्या विद्वानातील श्री. कृष्णशास्त्री तेलंग हे तर असे प्रसिद्ध होते कीं, तीन-चार हेलपाटे घातल्याशिवाय ते पागोटे चढवीत नसत ! डॉक्टराना या चेंगटपणाचा संताप येणे स्वाभाविक होते. त्यानी जरा धिटाई करून एकदां त्याना विचारले की, " मी हा आपणाला बोलावण्यासाठी चौथ्यादा आलो ! आपण उशीर का करतां ? आम्हाला कोण त्रास होतो ! " त्यावर त्या महाभागानीं उत्तर दिलें कीं, " आम्ही सर्वांच्या बरोबर आलो तर प्रतिष्ठा कशी राहील ? मी लवकर गेलो नाहीं म्हणजे सर्वांना माझी मार्गप्रतीक्षा करावी लागेल व मी तेथे जाताच सर्व जण 'या कृष्णशास्त्री !' अशा शब्दांत स्वागत करतील ! "

अशा रजक व भेदक गोष्टी सांगून स्वयंसेवकांना सहजतेने विचारशील बनविण्याची डॉक्टराची हातोटी असामान्य होती. अशा गोष्टींतून बैठकीत बसणाऱ्या स्वयंसेवकाला नेमकी टोपी बसे ! पण त्यामुळें आपल्या वर्मावर घाव घातला गेला, असा संताप जागृत होण्याऐवजीं आत्मनिरीक्षण करण्याची सात्त्विक विवेकशीलता तेथें जागृत होई. डॉक्टरांचा लोभ व प्रेम या गोष्टी इतक्या प्रभावी होत्या कीं, क्वचित् अशा थट्टेतून वा बोलण्यांतून कोणाच्या मनाची कांही काळ चलबिचल झाली तरी त्यांच्या गुरुत्वाकर्षणाच्या कक्षेतून कायमचें बाहेर जाण्याची इच्छा मात्र कधींच होत नसे. त्यांच्या बैठकींतून सहसा शब्दांच्या चकमकी झडत नसत. दुसऱ्याने लागट विधानें केलीं तरी प. पू. डॉक्टर अत्यंत संयम दाखवीत. पण कांहीं वेळां मात्र ते उसळून उठत. अशा वेळीं " मीं कोठून विधान केलें, " असें वाटून त्या समोर बसलेल्या व्यक्तीचा अक्षरशः थरकांप उडे ! एकदां

ामरावतीचा एक तरुण, स्वयंसेवकांबरोबर त्यांच्या बैठकींत येऊन बसला व यानें संघावर आक्षेप घेतांना ' जगांतील सर्वांत नीच व अधःपतित समाज म्हणजे ापला हिंदु समाज आहे, याची कसली संघटना करतां ? ' असें विधान केलें. वतः निष्क्रिय राहून केवळ वटवट करणाऱ्या तरुणाचे ते उद्गार ऐकून डॉक्टर ंतापानें उभे राहिले व एकदम गरजले कीं, " समाज जर अधःपतित असेल ार त्याच्यासाठीं कांहींहि खटपट न करतां त्यावर असा बेछूटपणें प्रहार करणारा ;, त्या समाजाचा सर्वांत हीन घटक आहेस ! " प. पू. डॉक्टरांचा त्या वेळचा ो रुद्रावतार पाहून त्या बिचाऱ्याची बोबडीच वळली ! अर्थात् असे प्रसंग केव्हां ेव्हां घडत. पण ' हें बरें झालें नाहीं ! ' अशी रुखरुख मात्र त्यानंतर कांहीं देवस त्यांच्या बोलण्यांतून व्यक्त होई.

डॉक्टरांच्या माडीवरील खोलींत त्यांनीं एकदां दोन पंखे आणून ठेवले. यांतील एकावर छत्रपति श्रीशिवाजी महाराजांचें व दुसऱ्यावर बालगंधर्वांचें स्त्री- ाषांतील चित्र होतें. त्यांच्याकडे शिवाजी महाराजांचें चित्र असलेला पंखा असणें ; कोणालाहि सुसंगत दिसे; पण दुसरें चित्र डॉक्टरांनीं कसें पसंत केलें, अशी ंका ते दोन्ही पंखे पाहून स्वाभाविकच उभी राही ! एकदां त्यांच्या बैठकींत ह्या ंकेला वाचा फुटतांच प. पू. डॉक्टर म्हणाले, " मीं परवां प्रवासांत असतां, हे ंखे नीट पाहूनच पसंत केले आहेत. कोणीं चुकून माझ्या गळ्यांत ते बांधलेले ाहींत. मला व माझ्याकडे येणाऱ्या सर्वांना ३०० वर्षांपूर्वीं समाज कसा पराक्रमी नि वाभिमानी होता नि आजचा समाज कसा स्त्रैण बनला आहे, याची कल्पना हे ंखे सहज देतील ! " त्यांच्या कोणत्याहि बारीकसारीक गोष्टींत अशी राष्ट्रीय दृष्टि ावश्य दिसे.

प. पू. डॉक्टरांच्या स्वभावांत ' टोपणनांवें ' ठेवण्याची लकब होती. त्यांचा ांतिकार्यांतील एक अनुयायी ठाकूर नरहरसिंग रजपूत यांचें त्यांच्याकडे केव्हां ेव्हां येणें होई. त्यांचा देहहि भव्य व आहारहि राक्षसी ! ते डॉक्टरांकडे ाले म्हणजे त्यांच्यापुढें पोळ्यांची ही भली मोठी चवड रचावी लागे ! त्यांना ॉक्टर ' अगडबंब ' या नांवानें हांक मारीत व तेहि आपलें नांव सांगतांना ाकूर नरहरसिंग अगडबंब असें केव्हां केव्हां थट्टेनें सांगत ! एकदां तर या ाकूरजींनीं हें नांव तेथील जिल्हाधिकाऱ्याला सांगितलें तेव्हां ' अगडबंब ' ाब्दाचा उलगडा न होऊन त्यानें त्याचा अर्थ विचारला. त्यावर ठाकूरजी हंसत हणाले, " अगडबंब यह डॉक्टर हेडगेवारजीने दी हुई टायटल है ! " डॉक्टर ागपुरांत कोठेंहि जाऊं लागले तरी बहुतेक वेळां त्यांच्याबरोबर श्री. कृष्णराव ोहरीर हे असावयाचे. डॉक्टर कृष्णवर्ण व त्यांच्या सावलीप्रमाणें वावरणारे ोहरीर हे त्यांच्या नांवाप्रमाणेंच सावलीसारखे काळे ! त्या दोघांकडे पाहिल्यावर ंघाव्यतिरिक्त दुसरी कल्पनाच मनांत उत्पन्न होणें शक्य नव्हतें. त्यामुळें कृष्णरावांचे

मामा श्री. आप्पाजी तिजारे डॉक्टरांकडे आले म्हणजे डॉक्टर म्हणत, हे पहा 'संघाचे मामा' आले. असेंच कोणाला 'वैशाखनंदन', कोणाला 'अजमिरी लोटा' अशीं टोपणनांवे देऊन ते थट्टा करीत. अर्थात् अशा टोपणनावामागोमाग ते कधीं गोष्टहि सांगत. एकदां वयाच्या मानाने जरा गलेलठ्ठ अशा किशोर स्वयंसेवकाला त्यांनीं 'वैशाखनंदन' म्हणून हाक मारली व त्या शब्दाचे इंगित सागतांना ते म्हणाले, "गाढव हिंवाळ्यात चरतांना मागें पाहते तेव्हां आपण काहींच खाल्लें नाहीं, असें वाटून रोडावते व वैशाखातील रखरखीत उन्हाळ्यात तें मागें पाहून किती खाल्लें या आनंदाने लठ्ठ होतें! वास्तविक हिवाळ्यात गवत खूप उंच असते व भरपूर खाऊनहि ते संपत नाहीं व उन्हाळ्यांत कुरण खलासच झालेले असतें व तेव्हा गाढवाला विशेष खायलाच कांहीं उरत नाहीं. पण जेव्हा ते अधिक गवत खाते तेव्हा रोडावते व कमी खातें तेव्हा लठ्ठ होते! याचे नाव वैशाखनंदन!"

समाज-संघटकाचा व्यवहार किती काटेकोर असला पाहिजे, याची कल्पना त्याच्या प्रत्येक व्यवहारातून आल्यावांचून राहत नसे. त्याच्या जीवनात त्यानीं कृति-उक्तीची कावड समतोल ठेवूनच प्रत्येक पाऊल टाकले. मुखातून वावगा शब्द कधीं गेला नाहीं नि कृतींतहि संयम सुटला नाहीं. बाजारात भेंड्या, वांगीं, मिरच्या आदि वस्तु तोलतांना चार-दोन भेंड्या वा वांगीं अधिक टाकण्याची उदारता माळी दाखवूं शकतो. पण हिरे-मोतीं जोखणाऱ्या तराजूचा एक बाजूला किंचित् तोल किंवा झोक गेला तर तो जवाहिऱ्याला खपत नसतो. डॉक्टराची शब्दरचना वा व्यवहार असा सराफाइतका दक्षतेचा व बारकाव्याचा असे. त्यानीं योजलेला शब्द हा असा नेमका व घडीव असावयाचा. संघाचा कार्यक्रम अगदीं ठरीव व वेळेवर व्हावा, असा दंडक त्यानीं रूढ केला व त्यासाठीं 'ठीक' अमुक वाजतां कार्यक्रम होईल, अशी शब्दयोजना त्यांनीं प्रचलित केली. नागपुरात संघाच्या प्रारंभींच्या काळात एकदा आपल्या सहकाऱ्याला उत्सवाच्या निमंत्रणाची कच्ची प्रत लिहून काढण्यास डॉक्टरानी सांगितलें. त्यांनीं त्या वेळच्या बाहेरील पद्धतीप्रमाणे 'आमच्या राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचा उत्सव' अशी सुरुवात करून पत्रिका लिहून काढली. डॉक्टरांनीं ती वाचली व 'आमच्या' या शब्दाच्या जागीं त्यानीं 'आपल्या' हा शब्द घालण्यास सुचविलें. संघ हा समाजापासून निराळा राहूं नये, तर समाजाला तो आपला वाटावा आणि कालान्तरानें संघ व हिंदु समाज हे समानार्थी शब्द ठरावेत, हीच डॉक्टरांची आकांक्षा होती. तीच आकाक्षा 'आपला संघ' या अचूक शब्दयोजनेतून त्यानीं व्यक्तविली होती. स्वयंसेवकांनीं नेमकें बोलावें, त्याच्या बोलण्यात वायफळ शब्दांची उधळमाधळ नसावी, अशी कल्पना ते वारंवार मांडीत. एकदां भाषणाच्या ओघांत ज्या राजपूत कन्यांनीं धर्म व शील यांच्या रक्षणासाठीं धगधगत्या ज्वालांत उड्या

झोंकून ' जोहार ' केला, त्याचा उल्लेख करतांना वक्त्यानें ' राजपूत रमणी ' असा शब्दप्रयोग केला. डॉक्टरांना तो शब्द लगेच खटकला व भाषणानंतर जेव्हां त्यांच्याकडे कांहीं कार्यकर्ते जमले, तेव्हां डॉक्टर म्हणाले कीं, ' शीलासाठीं पंचप्राणांची हंसतमुखानें कुरवंडी करणाऱ्या राजपूत कन्यकांचा उल्लेख राजपूत रमणी अशा तऱ्हेनें करणें हें अगदींच अप्रस्तुत आहे. त्यांच्या उज्ज्वल चारित्र्याच्या गौरवार्थ त्यांना ' राजपूत देवी ' म्हणणेंच युक्त ठरेल. असे शब्द तोलून डॉक्टर व्यवहार करीत म्हणूनच ' मी असें बोललों नव्हतों ! ' ' माझ्या म्हणण्याचा तसा आशय नव्हता ! ' अशी आपल्या तोल सुटलेल्या शब्दांची मागाहून निस्तरणी करण्याचा प्रसंग त्यांच्यावर कधीं येत नसे.

डॉक्टरांचें भाषण साधें-सोपें व तळमळीचें आणि जनमनाची पकड घेणारें असे. तरुणपणांत त्यांच्या वक्तृत्वांत स्तंभ फोडून प्रकट होणाऱ्या नृसिंहाचा कडकडाट दिसे. पण पुढें पुढें त्यांचा वाक्प्रवाह उत्तरप्रदेश व बिहारमधून जाणाऱ्या गंगेप्रमाणें भव्य, गंभीर व शांत झाला होता. त्यांत भावनांचा उठाव असे, पण त्या उठावांतहि विवेकाचें व वास्तवाचें अनुसंधान सुटत नसे. जें स्वतःला करतां येईल, तेंच त्यांच्या मुखांतून प्रकट होई व त्यांच्या अनुभूतीचा आशीर्वाद घेऊनच एक एक शब्द उमटे. डॉक्टरांच्या धांवपळीच्या जीवनांत त्यांना फारसें वाचन करण्यास सवड मिळाली नव्हती. त्यामुळें मोठमोठया ग्रंथकारांचे उतारे, अवतरणें व संदर्भ यांचा वापर त्यांनीं सहसा केलेला दिसत नसे. त्यांनीं वाचन केलें होतें तें जनमनाचें व त्यांनीं अध्ययन केलें होतें तें देशकालपरिस्थितीचें ! तें वाचन वा अध्ययन करण्यासाठीं त्यांनीं आपला सारा जन्म समाजसेवेंत गुंतविला होता व पाणबुड्याच्या धडाडीनें चालू परिस्थितीच्या वादळी लाटांच्या वरवरच्या तांडवाची क्षिति न बाळगतां, त्यांनीं देशोद्धारासाठीं लागणाऱ्या अचूक सिद्धान्तांचीं मौलिक रत्नें वेचून आणलीं होतीं. तुकोबाच्या अभंगांच्या मराठमोळ्या वाणींतील जिव्हाळा नि आत्मविश्वास डॉक्टरांच्या शब्दांतून प्रकट होई. सहजता हा त्यांच्या वक्तृत्वाचा प्राण. हिंदुराष्ट्राची सध्यांची दैन्यावस्था वर्णन करतांना त्यांचा कंठ दाटून येई नि हिंदुराष्ट्राची पुनः-प्रस्थापना करणाऱ्या छत्रपति श्रीशिवाजीमहाराजांच्या यशाचें गुणगान करतांना, त्यांचें हृदय अभिमानानें फुलून जाई. अशा वेळीं त्यांचे ते भक्तिपूर्ण उद्गार ऐकतांना वसंत ऋतूंत उद्यानांतील बहाव्याची ( एका जातीचा वृक्ष ) मोहक गुलाबी फुलांनीं लगडून व ओथंबून गेलेली डहाळीच डोळ्यापुढें नाचूं लागे. पाठीकडील वारा मिळाल्यावर जशी शिडाची छाती फुगावी, तशी स्थिति शिवरायांचा गौरव करतांना डॉक्टरांच्या वक्तृत्वाला प्राप्त होई ! त्या वेळच्या शब्दरचनेचा डौल कांहीं न्याराच असे ! प्रत्यक्ष क्रियाशीलतेला चालना देणारें व नैराश्याचीं पटलें दूर सारणारें डॉक्टरांचें वक्तृत्व हें त्यांच्या जीवनाचें प्रतिबिंब

होतें. कृति नि उक्ति ह्या जीवनाच्या नाण्याच्या दोन बाजू असतात. डॉक्टराच्या जीवनात या दोन्ही बाजू चांगल्या ठसठशीत उठून दिसत, यात शंका नाहीं.

डॉक्टरांनी त्याच्या फावल्या वेळात जें काहीं वाचन केलें त्यात समर्थ रामदासाचा ' दासबोध ' व लोकमान्य टिळकाचे ' गीतारहस्य ' या ग्रंथातील विचाराचा त्यांच्यावर विलक्षण प्रभाव पडलेला होता. ते वृत्तपत्राचे वाचनहि लक्षपूर्वक करीत. संघाच्या प्रारंभीच्या काळांत ते केव्हा केव्हां निजण्यापूर्वीं एका वहींत टांचणे करीत असत. त्यात वाचलेले उत्तम विचार व सुचलेले विचार या दोहोंचाहि अंतर्भाव केलेला आढळतो. समर्थ रामदासाच्या दासबोधांतील काही वेंचे त्याच्या वहींत सांपडतात. त्याचें वैशिष्टयच असे कीं, संघटनेला आवश्यक तेवढींच नेमकीं वचनें त्यात असून त्या वचनावर डॉक्टरानीं खूपच मनन केलेलें असले पाहिजे, असें त्याच्या संघटनकौशल्यावरून दिसून येतें. " बोलण्यासारखे चालणे । स्वयें करूनि बोलणे ।" "क्रियेवीण शब्दज्ञान । तेंचि श्वानाचे वमन ।" "ठायीं ठायीं शोध घ्यावा । मग ग्रामीं प्रवेश करावा ।" " कष्टेविण फळ नाहीं । कष्टेविण राज्य नाहीं । केल्याविण होत नाहीं । साध्य जनीं ।" "स्वये आपण कष्टावे । बहुतांचे सोशीत जावें ।" अशासारखीं अनेक वचने त्यांत आहेत. हे वेंचे लिहून काढण्यापूर्वीं डॉक्टरांनीं दि. ४ मार्च १९२९ च्या पानावर समर्थांविषयीं जीं दोन वाक्ये लिहिली आहेत, तींच नेमकीं त्यानाहि पूर्णांशानें लागू पडणारीं आहेत. ते लिहितात, " समर्थांना स्वतःकरितां काहीं मिळवावयाचें नव्हते. आपल्या कृतीचा आपल्या ठिकाणीं अहंकार जडूं नये, अशी दक्षता घेऊन सर्व आयुष्य स्वधर्मीयाच्या स्थितीचे चिंतन व आत्मोन्नतीचे उपाय शोधण्यात घालविले. "

डॉक्टरांनीं वाचन थोडें केलें असले तरी ज्यासाठीं वाचन करावयाचे तो हेतु मात्र त्यांच्याइतका थोड्यानाच उमजला असेल. रामदासांनीं म्हटल्या-प्रमाणें ' उगीच करिती बडबड । परि करूनि दाखविणें हें अवघड । ' हे तत्त्व डॉक्टरानीं ओळखलें होते व वाचलेल्या गोष्टी कृतींत उतरविण्याचा हव्यास त्यानीं अखंड बाळगला होता. नुसते वाचन करून पाडित्याची पगडीशाल मिरविण्याचा हिणकस विचार त्याना शिवला नाहीं. ते ' यः क्रियावान् स पंडितः ' या कोटींत अग्रगण्य ठरणारे होते.

त्यांच्या पत्रलेखनांत नेमकेपणा व संयम विशेष असे. क्रांतिकाळांत हरघडी जी सावधानता ठेवावी लागे, त्यातून डॉक्टरांच्या स्वभावाला कायमचेच तसे वळण लागलें होतें. देशव्यापी संघटना उभारतांना जें काय बोलावयाचें ते प्रत्यक्ष भेटीत बोलणेच हिताचे असतें, हे ओळखून त्यांचा व्यवहार चाले. स्वयंसेवकांनीं पत्रे कशीं लिहावीत, हें सांगतांना ते म्हणत कीं, " आपले पत्र चुकून चौकांतील खांबावर डकविलें गेलें तरी आपणाला संकोच वा भीति वाटणार नाहीं, असें त्याचे स्वरूप असावें. " त्यांचीं पत्रें अशींच सोज्ज्वळ असत. त्यामुळेंच त्यांना एका

गृहस्थानें ' तुमचा माझा पत्रव्यवहार प्रसिद्ध करतों ' अशी धमकावणी देतांच, त्यांनीं कळविलें होतें कीं, " माझी या गोष्टीला मुळींच ना नाहीं. मात्र त्यामुळें तुमचीच फटफजिती होईल. तेव्हां पुन्हा नीट विचार करून मगच निर्णय ठरवाल तर बरें होईल. " कांहीं वेळां संतापजनक असें एखादें पत्र डॉक्टरांच्या हातीं पडे. संघटनेंत भांड्याला भांडें लागण्याचेहि प्रसंग येतात आणि खारटतुरट प्रकारहि घडतात व त्यांतून अशीं पत्रें येत. एकदां असें पत्र हातीं पडतांच डॉक्टरांनीं भावनेच्या भरांत तसेंच झणझणीत पत्र लिहिलें. पण डॉक्टर महत्त्वाचीं पत्रें चार-दोन जणांना दाखविल्यावांचून पेटींत टाकीत नसत व केव्हां केव्हां अशीं पत्रें लिहून झाल्यावर दोन-तीन दिवस विचार करून मगच त्याची पक्की प्रत सिद्ध होई. वरील प्रसंगीं त्यांनीं आपण होऊनच तें पत्र बाजूस ठेवून देण्यास सांगितलें आणि एक-दोन दिवसांनीं भावनेचा आवेग कमी झाल्यावर त्यांच्या लेखणींतून नवीनच पत्र लिहिलें गेलें. केव्हां केव्हां एकेका शब्दासाठीं पत्र अडून पडे व योग्य शब्द सुचला कीं पत्रलेखन पुन्हा सुरू होई. डॉक्टरांना पत्रांत खाडाखोड चालत नसे. पत्रांतील कांहीं भाग लिहून तो मागाहून बदलला गेला, ही गोष्ट संशय निर्माण करणारी व आपल्या विचारांतील अनिश्चितता दर्शविणारी असल्यानें संघटनेच्या दृष्टीनें खाडाखोड केलेलीं पत्रें त्यांनीं कधींच टाकलीं नाहींत. खोडण्याचा प्रसंग आला तर तो कागद दूर ठेवून त्या पत्राची दुसरी प्रत करण्यास ते विसरत नसत. येणाऱ्या प्रत्येक पत्राला वेळच्या वेळीं उत्तर जाणें, यावर त्यांचा कटाक्ष दिसे व पत्राची घडी व त्यावरील पत्ता अशा सर्वच गोष्टींत नेटकेपणा व स्वच्छता दिसून येई. डॉक्टर स्वतःच्या संबंधांत अत्यंत काटकसरी होते. पण नको त्या ठिकाणीं ती गोष्ट ते येऊं देत नसत. दुसऱ्याच्या हातीं पडावयाचा पत्राचा कागद मोठा, स्वच्छ व गुळगुळीत असा वापरीत व त्याच्या अग्रस्थानीं ' दया तिचें नांव । भूतांचें पाळण । आणिक निर्दाळण कंटकांचें ॥ ' हें सुभाषित झळकतांना दिसे. संघटनेच्या वाढत्या व्यापाबरोबर त्यांनीं असंख्य जणांना पत्रें लिहिली व त्यांतून संघाच्या कार्यपद्धतीची कल्पना विशद करून कोणत्याहि परिस्थितींत अभंग टिकणारी ध्येयनिष्ठा स्वयंसेवकांच्या हृदयांत जागृत करण्याचा यशस्वी प्रयत्न केला. त्यांच्या पत्रांचें कोणीं संकलन केल्यास खरोखरीच संघटनाशास्त्रावरील तो एक आधारभूत ग्रंथ ठरेल.

कोणी स्वयंसेवक बाहेरगांवीं शाखा असलेल्या ठिकाणीं जाऊं लागला किंवा बाहेरगांवचा स्वयंसेवक त्यांना भेटून निघाला कीं, त्याच्याजवळ तेथील अधिकाऱ्यांना ते आवर्जून पत्र देत. असें पत्र देतांना तें कधीं चिकटवून बंद करावयाचें नाहीं, असा त्यांचा कटाक्ष असे.

डॉक्टर नागपूरमध्यें असोत वा हिंदुस्थानांतील अन्य कोणत्याहि ठिकाणीं जावोत, तेथील त्यांच्या कार्यक्रमांत अनेक प्रतिष्ठित नागरिकांना जाऊन भेटण्याचा

अंतर्भाव प्रामुख्याने होत असे. संघाची प्रगति कोठें कशी होत आहे, अडचणी कोणत्या आहेत, वगैरे गोष्टी कानावर घालून, ' या समाजसंघटनेच्या कामाला आपला आशीर्वाद असावा, ' अशी विनंति ते अशा प्रतिष्ठिताना करीत असत. माझे काम बरें कीं मी बरा, अशी संघापुरती केवळ संस्थेला बिलगलेली त्याची वृत्ति नसे. कर्तृत्ववान् हिंदु असेल तो तो क्रमाने संघाच्या कक्षेंत यावा यासाठीं कोणत्याहि पक्षांतील व कोणत्याहि मताच्या हिंदूला जाऊन भेटावे व त्याच्या मनात संघाच्या कामाची उमज पाडण्याच्या दृष्टीनें बोलणे करावे, असा त्यांचा क्रम सुरू असे. जे कट्टर विरोधी आहेत व क्वचित् ज्यांचा संघाला प्रत्यक्ष उपद्रवहि पोंहोचत असेल, त्यांच्याशींहि डॉक्टर संबंध ठेवीत, याचे आश्चर्य वाटतें. पण डॉक्टरांच्या सौजन्यपूर्ण वागण्याचा, अकृत्रिम स्नेहाचा व चारित्र्यपूर्ण कर्मयोगी जीवनाचा परिणाम होऊन असे विरोध करणारेहि शेवटीं वृत्तीने बोथट होत असत असाच, अनुभव येई. अशीं प्रतिष्ठित माणसें हीं कदाचित् संघासाठीं प्रत्यक्ष प्रयत्न करूं लागलीं नाहींत तरी त्याच्या मनात संघासंबंधींची आस्था उत्पन्न झाली तर समाजात अनुकूलता निर्माण होऊं शकेल, हें डॉक्टरांनीं ओळखलें होतें. त्यामुळेंच एकदां समाजात कर्तृत्वाने प्रतिष्ठा मिळविलेल्या व आतां प्रत्यक्ष कार्य करीत नसलेल्या अशा लोकाना भेटून आल्यावर ते ' मी देवदर्शन करून आलो ' असें म्हणत. देव जागचा हालत नाहीं, पण त्याच्या कृपेनें हेतु साध्य होतात, असाच अर्थ ' देवदर्शन ' या शब्दाने डॉक्टर जणूं ध्वनित करीत. अशा देवदर्शनांत अत्यंत सहजता असे व त्यामुळे अशा भक्ताच्या भेटीने देवहि प्रसन्न झाले तर नवल नव्हते. एकदां सकाळींच डॉक्टर श्री. रामभाऊ रुईकर यांच्याकडे चहाला गेले व ' सूर्यवंशी, उठा ' अशा शब्दांतच त्यांनीं सुरुवात केली. डॉक्टराना आलेले पाहून रामभाऊंनीं हंसतच ' या बसा ' म्हटले. तेव्हां ते म्हणाले कीं, ' तिढें उत्तर देणार नसाल तर एक प्रश्न विचारतो ! ' त्यावर रामभाऊंनीं होकार देतांच डॉक्टर म्हणाले, " अद्‌भुत घटना घडून काल रात्रीं छत्रपति शिवाजी महाराज समाधींतून बाहेर आले व त्यांचे राज्य सुरू झाले, अशी वार्ता मीं आपणांला सांगितली तर आपणांला काय वाटेल ? " श्री. रुईकर लगेच उत्तरले, " काय वाटेल हें काय विचारतां ? मी तर आनंदानें पेढे वांटीन ! "

हे अपेक्षित उत्तर मिळतांच डॉक्टर म्हणाले, " असे आहे तर उठल्या-सुटल्या आम्हाला कां नांवें ठेवतां ? वास्तविक दोघांच्याहि इच्छा एकच आहेत. पण आम्हाला जें वाटते तें छातीठोकपणें बोलून दाखविण्याची धमक आमच्यांत आहे. तशी ती तुमच्यांत नाहीं, असाच याचा सरळ सरळ अर्थ आहे ! "

समाजांत मतभिन्नता असणाऱ्यांशींहि इतकी सलगी ठेवूं शकणारे डॉक्टर आपल्या भेटण्यानें नवपरिचितांचें वा संघाशीं सहमत असणाऱ्या व्यक्तींचें मन कसें जिंकीत असतील, याची सहज कल्पना करतां येईल.

हातांत काठी वा छत्री घेऊन अशा देवदर्शनाला डॉक्टर पायींच बाहेर पडत. त्या वेळीं त्यांच्याबरोबर कांहीं कार्यकर्तेहि जात असत. पुढें प्रकृतीनें फारच थकल्यावर खिशांत पैसा असेल तर ते टांगा करीत. १९३७-३८ या काळांत तर डॉक्टरांची प्रकृति इतकी खालावली कीं, ताप, खोकला, घाम, पाठींतील वेदना या गोष्टी पाहुण्याप्रमाणें अधूनमधून येण्याऐवजीं घरजांवयाच्या चिकाटीनें त्यांच्या शरीरांत जणूं ठाण मांडून बसल्या ! त्या वेळींहि उन्हातान्हांतून अशी अथक पायपीट त्यांनीं सुरूच ठेवली होती. पण आतां त्यांनीं आपल्या आजाराचा होणारा त्रास त्यांच्या स्वभावानुसार कितीहि लपविण्याचा प्रयत्न केला तरी तो लपणें शक्य नव्हतें. त्यांचें शरीर वातामुळें अत्यंत स्थूल झालें होतें व तासातासानें अंगांतील घामानें भिजलेले कपडे बदलण्यावांचून गत्यंतर उरलें नव्हतें. ही कपड्यांची सारखी होणारी काढघाल सर्वांना दिसे व डॉक्टरांनीं आतां उन्हांतून चालण्याचा असा त्रास घेऊं नये म्हणून त्यांच्या नागपूरमधील मित्रांनीं त्यांना पाहिजे तेव्हां आपली मोटार पाठविण्यास सुरुवात केली. पण डॉक्टरांना त्याचाहि संकोच वाटे. तेव्हां डॉक्टरांनीं एक मोटार खरेदी केली. ती त्यांच्या राहत्या घरासमोरील मोकळ्या जागेंत तबेला उभारून तेथें ठेवण्यांत येऊं लागली. डॉक्टरांची ती मोटार ‘ जुन्या घाटा ’ची ( ओल्ड मॉडेल ) व अजब थाटाची होती ! ती रस्त्यानें जाऊं लागली म्हणजे स्वतंत्रपणें पोंगा वाजविण्याची आवश्यकता नसे ! कारण, तिचीं दारें, खिडक्या आदि सांगाडा असा कांहीं खडखडाट करी कीं, दुरूनच डॉक्टरांची गाडी आल्याची अचूक चाहूल लागे ! डॉक्टर हे घरांतून एकटे बाहेर पडले, असें कधींच होत नसे व त्यामुळें त्यांची गाडी नेहमीं फुललेली असे. केव्हां केव्हां वाटेंतहि त्यांत नवीन उतारूंचा भरणा होई व एकमेकांच्या मांडीवर दत्तक गेल्याप्रमाणें दाटीवाटीनें बसण्याइतकी खेचाखेच झालेली दिसे ! पण ही जुनी गाडी म्हाताऱ्याप्रमाणें वाटेंतच थकून टेकीला आली आहे, असें मात्र सहसा घडत नसे. हास्यविनोदानें गप्पा करीत नागपुरांतून जाणाऱ्या डॉक्टरांच्या या गाडीला ‘ स्टेट कार ’ असें गमतीनें संबोधिलें जाई. पण त्या गाडीनें १९३८ नंतर डॉक्टरांचे कष्ट कांहीं प्रमाणांत तरी कमी केले होते एवढें मात्र खरें !

डॉक्टरांचा नागपुरांत एक दबदबा होता. त्यांचें बालपणापासूनचें देश-भक्तीनें रसरसलेलें चढतें-वाढतें व फुलतें जीवन लोकांच्या डोळ्यांसमोरच घडलें होतें व त्यांच्या चारित्र्याच्या निर्मळपणाची ग्वाही त्यांच्याशीं मतभेद असणाऱ्यांचेंहि हृदय देत असे. एखाद्या सार्वजनिक सभेंत डॉक्टर गेले तर नागपुरी वळणाचे सभाभंजक मनांतल्या मनांत चुळबूळ करीत स्वस्थ बसत. नागपुरांत काँग्रेसमध्यें फूट पडून डॉ. मुंजे व बॅ. अभ्यंकर या दोघांचे दोन तट राजकारणांत वावरूं लागले. त्या काळांत डॉक्टर हे डॉ. मुंजेंच्या गटांतील म्हणून ओळखले जात.

तरीहि डॉक्टरांसंबंधी काही वेडेवाकडे उद्गार, शिवराळपणांत अग्रगण्य ठरलेल्या बॅ. अभ्यंकर यांच्या मुखांतूनहि निघत नसत, ही गोष्ट उल्लेखनीय आहे. या ठिकाणी एक गोष्ट सांगितली पाहिजे की, त्या वेळच्या मध्यप्रांतातील अनेक कार्यकर्त्यांच्या जीवनातील बिंगे व गुह्य गोष्टी डॉक्टराना माहीत होत्या व डॉक्टरांसबंधी त्याच्या व्यक्तिगत वा सार्वजनिक जीवनांत बोट ठेवता येईल, असे वैगुण्य कोणाला शोधूनहि दिसले नसते. भरीव कार्य व उज्ज्वल चारित्र्य यातून डॉक्टराच्या प्रतिष्ठेचा व प्रभावाचा उदय झाला होता व त्यातूनच त्याच्यासंबधींचा सार्वत्रिक आदर प्रत्ययास येई.

कोणाला एखाद्या पैचीहि सूट न देणारा पांडोबा बापट याच्यासारखा एखादा उपाहारगृहाचा चालक डॉक्टर समोरून जाऊं लागले की, त्याना आग्रहानें आत आणून आटीव दूध मनसोक्त पिऊं घाली व डॉक्टरांचे पाय आपल्या वास्तूला लागले म्हणून धन्यता मानी ! नागपुरात असले म्हणजे डॉक्टर विविध मित्रमंडळांत सवडीने जाऊन बसत आणि मनमोकळ्या गप्पा करतांना आवडत्या रोठा सुपारीचाहि आस्वाद घेत. ते कोठेहि जावोत, ते सर्वांना आपल्यांतीलच एक वाटत व म्हणून हवेसे असत. आखाड्यातून झुलत बाहेर पडणाऱ्या पहिलवानाचाहि हात डॉक्टराना पाहिल्यावर ' राम राम ' करण्यासाठीं वर उठे व टांगेवालेहि स्मित करून डॉक्टरांना अभिवादन करीत. सहस्रावधि स्वयंसेवकाचा पालकवर्ग हाहि, डॉक्टरानी तरुणाच्या मनावर पाडलेल्या प्रभावाने मुग्ध होऊन, डॉक्टरांकडे आदरानें पाहत असल्यास नवल नव्हते. संघातील सर्व स्वयंसेवकानीं मात्र रस्त्यांत भेटल्यावर परस्पराना नमस्कार न करता केवळ एकमेकाकडे पाहून मंद स्मित करावें, असे डॉक्टर सांगत. संघातील व्यवहारांत अनौपचारिकता असावी, याच दृष्टीने त्यानीं ही सूचना केलेली होती. अक्षरशः असंख्य तरुणांच्या हृदयसिंहासनावर डॉक्टर विराजमान झाले होते लग्न-मुंजी, सत्यनारायण या निमित्ताने डॉक्टराचे येणे-जाणे नागपुरात असंख्य जणांकडे होत असे. इतक्या आठवणीने निमंत्रण देणाऱ्याच्या आस्थेचा डॉक्टरानीं केव्हाच अव्हेर केला नाही. ते कामातून सवड काढून अशा प्रसगी उपस्थित राहत व असलेले स्नेहाचे संबंध दृढ करीत. आजारी स्वयंसेवकांना व परिचिताना भेटावयास जाणे, कोणी दिवगत झाल्यास समाचारास जाणे, असल्या व्यवहारात डॉक्टर कधीच चुकत नसत. कोणी सत्याग्रहाला निघो, कोणी परिचित विलायतेला जात असो, कोणी परीक्षेंत मोठे यश संपादन करो, डॉक्टर त्या त्या वेळीं उपस्थित राहून आपल्या प्रेमाचा व अभिनंदनाचा वर्षाव करण्यास कधीच विसरत नसत. बाहेरील व्यवहारात आपण पाहतो की, केवळ आपल्याच तोऱ्यांत समाजांत वावरणारे व केवळ उपचार म्हणून इतरांचा परिचय करून घेणारे व देखल्या देवास दंडवत घालणारे अनेक आहेत. पण परमपूजनीय डॉक्टरांना

आपल्या संबंधांत येणाऱ्या व्यक्तीविषयींची वाटणारी आस्था ही आंतरिक व उत्कट असे. या दृष्टीनें अकोल्यांतील एक प्रसंग मोठा मननीय आहे. एकदां डॉक्टर व श्री. बापूसाहेब सोहोनी हे मोटारीनें शहरांतून जात असतां एका गृहस्थानें मोठ्या आदरानें डॉक्टरांना म्हणून नमस्कार केला. पण त्या वेळीं डॉक्टरांचें बाहेर लक्ष नव्हतें. धांवत्या गाडींत जेव्हां बापूसाहेबांनीं या नमस्काराचा उल्लेख केला, तेव्हां डॉक्टरांना आपणांला प्रतिनमस्कार करतां आला नाहीं याची चुटपूट लागली व त्यांनीं बापूसाहेबांजवळून त्या गृहस्थांचें नांव व पत्ता काढून घेतला व ते त्यांच्या घरीं जाऊन भेटून आले.

लोकसंग्रह हा डॉक्टरांचा स्वभाव होता व त्यांतून त्यांच्या अशा सहज गोष्टी घडत. एखाद्या विक्रेत्याप्रमाणें त्यांच्या व्यवहारांत उसनेपणाचा वा वरपांगीपणाचा अंश नसे. ' How to win friends and influence the people ' असे व्यवहार शिकविणारे ग्रंथ हे डॉक्टरांवरून ओवाळून टाकावेत, असेंच त्यांचें ' लोकांशीं सलगी देणें ' असे ! त्यांत अशी अपूर्वता, सहजता व आकर्षकता होती. ज्या हिंदु समाजांत चार जणांचीं तोंडें एका दिशेला झालीं तर तीं अंत्य यात्रेच्याच वेळीं काय तीं होतात, असें म्हणण्याची पाळी आली होती, त्याच समाजांत सहस्रावधि तरुणांची हिंदुराष्ट्रोत्थानासाठीं एक देशव्यापी संघटना डॉक्टरांनीं पंधरा वर्षांत साकार करून दाखविली, हें त्यांचें असामान्यत्वच होय !

डॉक्टर शिस्तीचे भोक्ते होते व त्यांनीं स्वतःपासून त्या शिस्तीला प्रारंभ केला होता. संघटनेंत एखादी गोष्ट योजली कीं, तंतोतंत तशीच आणि तेव्हांच घडली पाहिजे, असा त्यांचा कटाक्ष असे. नागपूरला एका कार्यक्रमासाठीं वेळेवर पोंचावें, यासाठीं त्यांनीं एकदां अडेगांव या साधारण वीस मैल अंतरावर असलेल्या गांवाहून अपरात्रींच चालण्यास सुरुवात केली. शिस्तींत ते असे कठोर होते व इतरांनाहि असेंच वळण लागावें, यासाठीं संघस्थानावरील सर्व शारीरिक कार्यक्रम व सैनिकी संचलन ह्या गोष्टी सर्वत्र कांटेकोरपणानें व्हाव्यात, असें ते सांगत. प्रत्येक ठिकाणीं नेमकेपणा आणि नेटकेपणा त्यांना हवासा वाटे. एकदां पुण्याच्या गणवेशधारी स्वयंसेवकांची पाहणी करून झाल्यावर त्यांनीं जें भाषण केलें, त्यांत त्यांनीं सांगितलें होतें कीं, " अनेक जणांनीं गणवेश केला आहे, ही समाधानाची गोष्ट आहे. पण त्यांत अजूनहि लष्करी थाट दिसत नाहीं. तुमचा गणवेश ब्राह्मणी वाटतो ! " गुळगुळीत व मुळमुळीत बोलणेंहि त्यांना रुचत नसे व कोणी असें बोलूं लागला कीं, ते ' म्हटलं तर आहे, म्हटलं तर नाहीं ! ' असें म्हणून त्याची थट्टा करीत. एकदां नागपूरच्या सैनिकी शिबिरांत रात्रीं १० ला ठरल्याप्रमाणें दिवे मालवले जाऊन निजानीज सुरू झाली. सर्व जण व्यवस्थित निजले आहेत कीं नाहींत आणि कोठें कोणाला अडचण आहे कीं काय, हें पाहण्यासाठीं प. पू. डॉक्टर व शिबिराचे सर्वाधिकारी हे कंदील घेऊन बाहेर

पडले. एका तंबूंत शिरतांच तेथील अधिकाऱ्यानें पुढें होऊन डॉक्टरांना प्रणाम केला तेव्हां त्यांनीं विचारलें, ' तुमच्या तंबूंत किती स्वयंसेवक आहेत ? " तेव्हां त्याने ' आहेत सत्तावीस-अठ्ठावीस ' असें मोघम उत्तर दिलें ! त्यावर डॉक्टरांनी रागावून प्रश्न केला कीं, " हे काय आबे आहेत सत्तावीस-अठ्ठावीस सांगायला ? सत्तावीस सांग, नाहीं तर अठ्ठावीस सांग ! "

संघांतल्याप्रमाणेंच बाहेरहि कोणी अनुशासन उल्लंघून मनगटाच्या बळावर अरेरावी करूं लागला कीं डॉक्टरांच्या तळपायाची आग मस्तकाला जाई व काहीं वेळां तेहि जशास तसे वागत. एकदां नागपूरच्या ' टाउन हॉल 'मध्यें डॉ. मुंजे यांच्या अध्यक्षतेखालीं सभा होती. तेव्हां संघशाखेवरून घरीं परत जातांना कांहीं स्वयंसेवकांबरोबर डॉक्टर सहज डोकावून जावे म्हणून तिकडे गेले. तेथे जातात तों तेथे श्री. रामभाऊ रुईकर व बॅ. अभ्यंकर यांमध्ये, आधीं कोणीं बोलावयाचे, यावरून बखेडा सुरू होता. अध्यक्षानीं रुईकरांच्या बाजूनें कौल दिलेला असूनहि अभ्यंकर आधीं बोलण्याचा हट्ट सोडीनात. सामोपचार संपलेला पाहून डॉक्टरानीं अध्यक्षांकडे चिठ्ठी पाठविली कीं, या दोघांच्या आधीं मला बोलावयाचे आहे. त्यांना अनुमति मिळतांच डॉक्टर व्यासपीठासाठीं मांडलेल्या मेजावर चढूं लागले. बॅ. अभ्यंकरहि लगेच वर चढले व ते दोघे परस्परांना खालीं उतरण्याचा आग्रह करूं लागले ! अर्थात् 'घटासी घट' नि ' उद्धटासी उद्धट ' असा बाणा असल्याने डॉक्टर खालीं उतरणें शक्य नव्हतें व अभ्यंकरांचाहि पीळ काहीं कमी नव्हता ! हे दोघेहि शरीरानें धिप्पाड असल्याने त्यांच्या लठ्ठालठ्ठींत मेज डळमळूं लागलें ! हा झगडा थांबविण्यासाठीं अभ्यंकरांचे काहीं अनुयायी डॉक्टरांना खालीं ओढण्यासाठीं पुढे येत आहेत, असें पाहतांच डॉक्टरानी बॅरिस्टराच्या कमरेला घट्ट मिठी मारली. इतक्यांत तेथील बत्ती विझविण्यात येऊन सभागृहांत एकच गोंधळ झाला. अर्थात् सभा येथेच संपली ! दोघेहि मेजावर चढण्यापूर्वीं डॉक्टरानीं आपल्या घोगऱ्या व खणखणीत आवाजांत अभ्यंकराना बजावलें होते की, " बऱ्या बोलानें नियमाप्रमाणें रुईकरांना बोलूं द्या व ते मान्य नसेल व बळी तो कानपिळी हाच न्याय ठरणार असेल, तर मात्र आधीं मीच बोलणार ! "

अशा प्रसंगानें व्यक्त होणारा डॉक्टरांचा संताप हा तात्पुरता व सात्त्विक असे व त्यांतून कायमची तेढ निर्माण होण्याची सुतराम् शक्यता नव्हती. काहीं प्रसंगीं त्यांच्या निकटवर्तीयांकडूनहि त्यांचा विश्वासघात केला गेला. पण अशा प्रसंगींहि त्यांच्या मनाचा थोरपणा ढळूं शकला नाहीं. एका अशा मित्राला १९३४-मध्यें त्यानीं लिहिलें कीं, " ......यापेक्षां समोरासमोर उभे राहून व आपल्या हेतूची पूर्ण जाणीव देऊन जर आपण हाच खंजीर आमचे हृदयात खुपसला असता तर आम्हांला अधिक बरें वाटलें असतें व आम्हीं आपणांला मुळीच विरोध केला नसता. यापेक्षां सुज्ञांस अधिक काय लिहावें ? कळावें. पूर्वींप्रमाणेंच

प्रेम असूं द्यावें ही विनंति. " अशा मनाच्या विशालतेचें वर्णन करतांना श्रीगुरुजी सांगतात कीं, " युधिष्ठिराइतकी विश्वसनीय व दुर्योधनालाहि सुयोधन म्हणण्या-इतकी डॉक्टरांच्या वाणींत मधुरता होती." ही मधुरता आणि डॉक्टरांच्या मनाची व व्यवहाराची एकूण ठेवण पाहिल्यावर समर्थ रामदासांनीं सत्त्वगुणाचें जें वर्णन केलें आहे, तें उलगडूं लागतें—

" सकळ जनासी आर्जव । नाहीं विरोधाचा ठाव ।
परोपकारी वेंची जीव । तो सत्त्वगुण ।।
पराव्याचे दोषगुण । दृष्टीस देखे आपण ।
समुद्राऐसी सांठवण । तो सत्त्वगुण ।। "

डॉक्टरांच्या मनानें अशीच समुद्रासारखी मानापमानाची सारख्याच अलिप्तपणें सांठवण केली होती, यांत संदेह नाहीं.

हिंदु समाजांतील कोणाचेहि दोष वा अपराध पाहतांना डॉक्टरांचा संताप उसळे आणि लवकरच तो शमून जाई. पण पारतंत्र्याच्या वा हिंदूंवरील अत्याचारांच्या गोष्टी कानावर पडल्या म्हणजे मात्र त्यांच्या संयमाचे लगाम वेळप्रसंगीं तोडूनहि त्यांच्या संतापाचा वारू अनावर झालेला दिसे. अर्थात् असे प्रसंग दिसूं नयेत, अशी दक्षता ते घेत असत. नागपूरमधील ' सावधान ' साप्ताहिकांत सिंध-पंजाबमधील मुसलमानांनीं चालविलेल्या पाशवी अत्याचारांचीं रोमांचकारी व संतापजनक वृत्तें सविस्तर येऊं लागलीं. तेव्हां एकदां ' सावधान 'चे संपादक त्यांच्याकडे आले असतां डॉक्टर त्यांना म्हणाले, " कोणत्याहि अत्याचाराचीं वृत्तें माझ्याच्यानें वाचवत देखील नाहींत नि तुमच्यानें इतकीं लिहवतात तरी कशीं ? तुमचीं अन्तःकरणें मेलेलीं आहेत काय ? " एकदां पुण्याच्या त्यांच्या वास्तव्यांत त्यांच्या खोलींत धर्मवीर संभाजी महाराजांच्या वधाचें चित्र लावण्यांत आलें. वेदीवर उभ्या असलेल्या छत्रपतींवर चोहींकडून भाले, तापलेले सांडस, तरवारी यांचा मारा होत असून रक्तानें थबथबलेले छत्रपति निर्भयतेनें व निर्धारानें उभे आहेत, असें चित्रण त्यांत केलेलें होतें. डॉक्टर बाहेरून खोलींत येतांच त्यांची दृष्टि त्या चित्राकडे वळली व त्यांचा चेहरा संतप्त झाला व त्यांनीं एका कार्य-कर्त्याला हांक मारून ' माझ्यानें हा अपमान पाहवत नाहीं ! ' असें म्हणत त्यांनीं तें चित्र काढून टाकावयास सांगितलें. त्यांची मुद्रा अत्यंत गंभीर झाली होती व चित्र काढून टाकल्यावरहि ते कांहीं वेळ अस्वस्थच होते. एक स्वयंसेवक ' फर 'ची टोपी घालून एकदां त्यांच्याकडे येतांच त्यांनीं त्याला " आजच्या आज टोपी जाळून टाक, दुसऱ्याला ती देऊन परदेशी वस्तु वापरण्याचें पातक आणखी त्याच्या शिरावर लादूं नकोस ! " असें खडसावलें होतें. कोणाशींहि विचारविनिमय करतांना अगदीं संथ व शांत असणारे डॉक्टर, कोणी हिंदु समाजाचा व धर्माचा अपमान करणारें विधान करूं लागला म्हणजे उसळून उठत. एकदां ' संघ रजिस्टर

करून घ्या म्हणजे संघाला आर्थिक साहाय्य द्यावेसे वाटेल,' अशा आशयाचे विधान एकानें करतांच डॉक्टरांनीं त्याला विचारले, "याचा अर्थ परक्या इंग्रजांवर आपला विश्वास आहे, स्वकीयांवर नाहीं ! आतां आमच्यावर कोणाचा विश्वास नसेल, तर तो आम्ही निरपेक्ष सेवेतून निर्माण करूं की, ज्यातून पैसेच काय पण समाज आम्हांला हंसतमुखाने सर्वस्व देईल !"

आगगाडींत इंग्रज वा अर्धांग्ल ( युरेशियन ) याच्यासाठी राखीव डबे असलेले त्याना खपत नसत व केव्हा केव्हा दोन हात करूनहि ते अशा डब्यांतून प्रवास करीत. अशा राखीव डब्यात एकदां, इतर डब्यात चढण्याइतकीहि जागा नसल्याने, ते खिडकींतून घुसले आणि आपल्यामागोमाग इतरानाहि दार उघडून त्यांनीं आत घेतलें. या प्रकारानें राखीव डब्याची सवय असलेले इंग्रज प्रवासी चिडले व त्यानीं खूप मोठ्याने आकाडताडव केले. पण डॉक्टराची उग्रताहि त्याना पुरून उरणारी होती. त्यामुळे ते प्रकरण रेल्वे अधिकाऱ्यांना बोलावण्यापर्यंत गेले. त्याप्रमाणे राज्यकर्त्या गोऱ्याचा कैवार घेण्यासाठीं स्थानकाचा प्रमुख तेथे आला व तो ' खालीं उतरा !' असे सर्वांकडे बघून ओरडला ! त्या गुरकावण्याने डॉक्टरानीं आंत आणून बसविलेल्या प्रवाशात उठण्यासाठी चुळबूळ सुरू झाली. ती पाहतांच अधिकाऱ्याच्या आवाजाहूनहि खडया, उग्र व निग्रही स्वरात डॉक्टर गरजले कीं, "जाता कोठे ? बसा !" ही निश्चयी वाणी ऐकून सर्व जण मटकन् खालीं बसले ! या घनगंभीर गडगडाटांत इंग्रज प्रवाशाचाहि आवाज विरला व सर्वांना त्याच डब्यातून प्रवास करतां आला ! हा स्वानुभव सांगून डॉक्टर केव्हा केव्हां गमतीने म्हणत की, " याला म्हणतात जनमत ! "

परकीयाच्या प्रभुत्वाच्या खाणाखुणा त्याना सलत व त्यांतूनच अल्लीपूरचे नांव शिवपूर व ' मंगळूरपीर ' गावाचे नांव त्याच्या प्रेरणेने ' मंगळूरनाथ ' झालें. ' मंगळूरदस्तगीर ' गाव ' मंगळूरदत्त ' म्हणून ओळखलें जाऊं लागलें नि ' दावलभक्त ' आडनांव लावणारे स्वयंसेवक ' गौतम ' उपनांव लावूं लागले ! संघात त्यांनीं देशी खेळांना स्थान दिलें व संस्कृत आज्ञा, प्रार्थना व संज्ञा प्रचलित केल्या. त्यानीं भाषाशुद्धीचा असा स्वतंत्र प्रचार केला नसला तरी पुढेमागें स्वकीय शब्दांचाच वापर करण्यात धन्यता मानतील अशा वृत्तीचे तरुण उभे करण्यांत मात्र त्यानीं अग्रेसरत्व मिळविले होते. त्यांच्या रोमरोमांत स्वदेश व स्वधर्म याचा अभिमान ओतप्रोत भरलेला असे नि त्यांतूनच स्वदेशी चकाकी ( पॉलिश ) उपलब्ध होईपर्यंत त्यांनीं आपल्या पट्ट्याचा पितळी दर्शनी भाग ( बकल ) विटकराच्या भुकटीनें उजळ करण्याचा क्रम ठेवला होता. त्याना टोपी-मध्यें घातलेले कातडे रुचेना. म्हणून त्यानीं संघात कातडें नसलेल्या स्वदेशी लोकरीच्या टोप्या रूढ केल्या. स्वत्वाने त्यांची प्रत्येक गोष्ट अशी रसरसलेली असे व त्याचा ठसा त्यांच्या संबधांत येणाऱ्यांच्या मनावर उमटल्यावांचून राहत नसे.

आपल्या समाजाचा अभ्युदय करण्यासाठीं असंख्य माणसें उभीं करावींत, या दिशेनेंच त्यांचा सारा व्यवहार चाले. त्यांत त्यांची व्यक्तिगत अशी कोणतीच अभिलाषा गुंतलेली नसे. त्याग, आत्मसमर्पण, स्वार्थाचें होमहवन असे शब्द वापरावयाला मुळांत ' मी '-पणा जिवंत पाहिजे. पण डॉक्टरांनीं हिंदु समाजाच्या जीवनाशीं इतकें तादात्म्य करून घेतलें होतें कीं, त्यांत मी-तूंपणाची बोळवणच झाली होती ! उगवत्या पिढीला हातीं घेऊन व त्यांना हिंदुराष्ट्राच्या आकांक्षेनें प्रेरित करून उद्यांचा इतिहास घडविणारें कर्तृत्व डॉक्टरांनीं उदित केलें. असें करतांना ' या पोरासोरांच्या कामानें काय होणार ? ' असा प्रश्न केव्हां केव्हां विचारला जाई. पण डॉक्टरांचा आत्मविश्वास अढळ होता. या नि केवळ याच मार्गानें राष्ट्र सचेतन होईल, असा निर्वाळा त्यांचें मन त्यांना देत असे. संघांतील स्वयंसेवकांच्या उसळत्या उत्साहांतून त्यांना भावी काळाचीं दिव्य स्वप्नें दिसत होतीं आणि त्या विश्वासांतूनच ते असल्या शंका बाळगणाऱ्यांना डॉ. मुंजे यांच्या तोंडच्या दोन काव्यपंक्ति सांगत असत. त्या अशा—

" जहाँ बालोंका संग वहाँ बाजे मृदंग ।
जहाँ बुड्ढोंका संघ वहाँ खर्चोसे तंग ॥ "

अशा कार्यांत ते जसे निमग्न झाले होते तसें इतरांनीं रंगून जावें, अशी त्यांची स्वाभाविकच इच्छा होती. त्यासाठीं ते अनेकदां विचारीत कीं, ' तुमच्या मानेवर संघाचें भूत बसलें आहे काय ? ' एखादा भुतानें झपाटलेला मनुष्य जसा स्वतःच्या कल्पना व आवडीनिवडी विसरून मानेवर बसलेल्या अतृप्त आत्म्याच्या इच्छा बोलूं लागतो व त्याच्या तंत्रानेंच आपले सर्व व्यवहार करतो, तशी आपल्या मनाची अवस्था संघासंबंधांत झाली आहे काय ?—असें विचारण्याचा डॉक्टरांचा उद्देश असे.

प. पू. डॉक्टरांच्या जीवनाचे असे असंख्य पैलू मांडीत असतांना या शब्दांच्या आवाक्यांत त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें सर्व दिव्यत्व येऊं शकलेलें नाहीं, याची तीव्र जाणीव होत आहे. डॉक्टरांच्या, वरून शांत पण आंतून ज्वलंत असणाऱ्या जीवनाचा अनुभव सांगण्यापेक्षां जाणण्यासारखा व प्रत्यक्ष अनुभवण्यासारखाच होता, असें म्हणावें लागेल. त्यांच्या सहकाऱ्यांनीं प्रयत्नाचा वेग कितीहि वाढविला तरी कामाचा उरक, प्रयत्नांतील अचूकपणा व धडाडी यांत डॉक्टर त्यांना नेहमींच चार पावलें पुढें असलेले दिसत. पण त्यांच्याबरोबर आपणांला चालतां येणार नाहीं, असें वाटून मधूनच मागें फिरण्याची वा कपाळाला हात लावून वाटेंतच मटकन् खालीं बसण्याची कोणावर पाळी येईल, अशी एकांडे शिलेदारासारखी चालहि डॉक्टरांनीं कधीं ठेवली नाहीं. पुढें जावयाचें आहे तें गतीनें व धडाडीनें, याची जाणीव जशी त्यांना सदैव दिसे, तशीच असंख्य जणांना आपणांबरोबर न्यावयाचें आहे या गोष्टीचीहि ! ते सदैव जागे राहिले नि त्यांनीं

असंख्य जणांना जागविलें. समाजांतील कोणाहि व्यक्तीला त्यांनीं टाकाऊ मानलें नाहीं नि समाजांतील वैगुण्यें व दोष हे जणूं आपलेच आहेत, अशा भावनेने ते दूर करण्यासाठीं अहर्निश प्रयत्न केले. डॉक्टरांच्या व्यक्तिमत्त्वाची विशेषता अशी कीं, त्यांच्यापेक्षां वयाने, धनाने, सामाजिक प्रतिष्ठेनें, पुस्तकी ज्ञानाने व शक्तीनें श्रेष्ठ असलेली मंडळीहि त्यांचे अनुयायित्व स्वीकारण्यांत अक्षरशः धन्यता मानीत आली होती. त्यांच्या सान्निध्यांत येणाऱ्याला वाटे कीं, डॉक्टरांचें सर्वांवर प्रेम आहे व त्यांतल्या त्यांत आपणावर अधिक आहे ! अशा अलौकिक प्रेमामुळेंच त्यांच्या नुसत्या स्मरणानें असंख्य जणांच्या हृदयांत कालवाकालव होई नि त्याच्या डोळ्यांतून डॉक्टराच्या दिव्यत्वावर प्रेमाश्रूंचा अभिषेक होत असतांना त्याच्या मुखांतून असे आत्मविश्वासपूर्ण शब्द उमटत कीं—

> " तुझे तेज अंगीं शतांशें जरीही,
> उजाळूनि देऊं दिशा दाहि दाही ! "

★ ★ ★

## परिशिष्ट १

## प. पू. डॉ. केशव बळिराम हेडगेवार यांची जन्म-पत्रिका

॥ श्रीगजाननः प्रसन्नः ॥

॥ श्रीगणेशाय नमः ॥ स जयति० ॥

आदित्यादिग्रहाः सर्वे सनक्षत्राः सराशयः ।
कुर्वन्तु मङ्गलं तस्य यस्यैषा जन्मपत्रिका ॥ १ ॥
जननी जन्मसौख्यानां वर्धिनी सर्वसंपदाम् ।
पदवी पूर्वपुण्यानां लिख्यते जन्मपत्रिका ॥ २ ॥

स्वस्ति श्रीमन्नृपविक्रमार्कसमयातीतसंवत् १९४५ तथा च श्रीमद्भूपति-शालिवाहनशके १८१० सर्वधारीनाम संवत्सरे उदगयने वसंततौ माङ्गल्यप्रद-शुभकारिणि फाल्गुनमासे कृष्णपक्षे अमावास्यायां तिथौ घ० २५ प० २९ परं चैत्र-शुक्ल १ रविवासरे शके १८११ विरोधिनाम संवत्सरे उत्तराभाद्रपदानक्षत्रे घ० १४ प० ५७ ब्रह्मायोगे घ० ६ प० २७ परं ऐंद्रयोगे तात्कालिके किंस्तुघ्न-करणे एवमादिपंचांगशुद्धावत्रदिने श्रीमन्मार्तण्डमण्डलोदयादिष्ट घ० ४७ प० ३० तत्समये सकलधैर्यादिगुणसम्पन्नराजमान्यराजश्री बळिरामपंत हेडगेवार तस्य भार्या कुलद्वयानंददायिनी सौभाग्यवती रेवती—तथा यमुना—नाम्नी पुत्ररत्नं प्रासूत ॥ असौ देवद्विजप्रसादाद्दीर्घायुर्भूयात् ॥ तस्य अवकहडाचक्रानुसारेण रेवतीजन्मनक्षत्रस्य द्वितीयचरणानुगं दोमदेव इति जन्मनाम सुप्रतिष्ठितम् ॥ देवगणः ॥ गजयोनिः ॥ अन्त्यनाडिः ॥ मीनराशिः ॥ वर्ज्यवारः शुक्रवारः ॥ मङ्गलमाहेश्वरी शुभं भवतु ॥

॥ इयं जन्मलग्नकुंडलिः ॥




शुभं भवतु ।

जन्मस्थल—नागपूर, दिनांक ३१ मार्च १८८९ मध्यरात्रीनंतर १ वाजून १३ मिनिटें, म्हणून जन्मदिनांक १ एप्रिल १८८९ व जन्मतिथि चैत्र शुक्ल १ शके १८११.

## परिशिष्ट २

## डॉ. हेडगेवार यांचें हस्ताक्षर*

श्री [illegible] मुक्काम पुणे
ता ८-५-३६

तीर्थस्वरूप
श्री. आबाजी यांस
कृतानेक सा. न. वि. वि. —

कालचे रोजी श्री. हरु भाऊंबरोबर पाठविलेले ते पत्र पोचले असेलच. आज आपले ता ६-५-३६ चे श्री. कृष्णरावचे मोहरीरीचे पत्र मिळाले. वाचून आनंद झाला. इकडील सर्व काम ठीक चालले असून सर्वलोक पूर्णपणे आनंदात आहेत.

मी उद्याला ता ९ रोजी नागपूर मेलने निघून मध्ये-ही कोठेही न थांबता ता. [illegible] रोजी सकाळी नागपूरला येऊन पोचेन. प्रत्यक्ष भेटीत सर्व गोष्टी होतीलच कळावे

आपला — के. ब. हेडगेवार

---

* प. पू. डॉक्टरांनी आपले चुलते आबाजी हेडगेवार ह्यांना पाठविलेल्या एका पत्राच्या दोन्ही अंगांचीं हीं छायाचित्रें आहेत. ह्यांतील प्रत्यक्ष पत्रांत त्यांचें मराठी हस्ताक्षर व स्वाक्षरी असून पत्राच्या पत्त्यावर त्यांनीं स्वत:चेंच नांव लिहिलेलें




असल्यानें त्यांच्या इंग्रजी स्वाक्षरीचें वळणहि सहज लक्षांत येईल. पत्रांतील ‘ तीर्थस्वरूप ’ शब्दांतील ‘ र्थ ’ व ‘ मध्यंतरीं ’ शब्दांतील ‘ त ’ हीं अक्षरें, तें पत्र धारिकेंत ( फाइलमध्यें ) टाचून ठेवण्यासाठीं पाडलेल्या छिद्रांमुळें गेलीं आहेत.

## परिशिष्ट ३

# हेडगेवार वंशवृक्ष



## परिशिष्ट ४

# सूची

* * *

## परिशिष्ट ५

# चित्र-सूची

पृ ष्ठ ३२ स मो र

*वरील चित्र*

**नॅशनल मेडिकल कॉलेज, कलकत्ता**

*खालील चित्र*

खुर्चीवर बसलेले (डावीकडून):—(१) डॉ. सालपेकर, छिंदवाडा (२) डॉ. नाईक, मूर्तिजापूर (३) डॉ. लुले, उमरेड (४) डॉ. केळापुरे यवतमाळ. उभे (मध्यावर):— डॉ. हेडगेवार.

+

पृ ष्ठ ३३ स मो र

*वरील चित्र*

खुर्चीवर बसलेले (डावीकडून):— सीतारामपंत हेडगेवार व कुटुंबीय मंडळी. उभे (उजवीकडे):— डॉ. हेडगेवार.

*खालील चित्र*

**श्री. ना. गो. देशपांडे, आरवी यांजकडील दत्तविधान समारंभ**

बसलेले (डावीकडून):— सीतारामपंत हेडगेवार. (मध्यावर):— श्री. ना. गो. देशपांडे व सौ. देशपांडे दत्तक-पुत्रासह. (कोट-टोपी घालून बसलेले) डॉ. हेडगेवार.

+

पृ ष्ठ ४९ स मो र

**डॉ. हेडगेवार यांचें राहतें घर**

+

पृ ष्ठ ३२० स मो र

*वरील चित्र*

**शुद्धि-समारंभ**

बसलेले ( डावीकडून ):— ( २ ) दाजीसाहेब बुटी ( ४ ) डॉ. हेडगेवार ( ७ ) डॉ. कुर्तकोटी ( ९ ) राजे लक्ष्मणराव भोंसले (११) डॉ. मुंजे.

*खालील चित्र*

**दि आयडियल डेमॉक्रॅटिक इन्शुअरन्स कंपनी लि., नागपूर**

बसलेले ( डावीकडून ):— ( १ ) दत्तोपंत परांजपे ( २ ) दामुपंत देशमुख ( ३ ) शेषराव पांढरीपांडे ( ४ ) दादासाहेब खापर्डे ( ५ ) नानासाहेब तेलंग ( ६ ) डॉ. हेडगेवार ( ७ ) डी. डी. देशपांडे.

+

पृ ष्ठ ३२१ स मो र

*वरील चित्र*

**जंगल सत्याग्रह**

खुर्चीवर बसलेले ( डावीकडून ):— ( १ ) विठ्ठलराव देव ( २ ) दादाराव परमार्थ ( ३ ) डॉ. हेडगेवार ( ४ ) भैय्याजी कुंबलवार ( ५ ) आप्पाजी जोशी.

*खालील चित्र*

उभे ( डावीकडून ):— ( १ ) डॉ. चोळकर ( २ ) डॉ. हेडगेवार ( ३ ) मार्तंडराव जोग ( ४ ) दाजीशास्त्री चांदेकर ( ५ ) डॉ. मुंजे ( ६ ) भाऊसाहेब टालाटुले ( ७ ) डॉ. परांजपे ( ८ ) विश्वनाथराव नवाथे. बसलेले ( डावीकडून ):— ( १ ) गोविंदराव लाखे ( २ ) दादाजी लांबे.

+

पृ ष्ठ ३३६ स मो र

*वरील चित्र*

**हिन्दु युवक परिषद, पुणें स्थानकावरील स्वागत**

*खालील चित्र*

**मिरवणुकीचें एक दृश्य**

+

पुढें चालू

*वरील चित्र*

**पुणें स्थानकावरील सत्कार**

उभे ( डावीकडून ):— ( १ ) गणपतराव नलावडे ( २ ) डॉ. हेडगेवार ( ३ ) क्षात्रजगद्‌गुरु ( ४ ) अण्णासाहेब भोपटकर ( ५ ) तात्यासाहेब करंदीकर.

*खालील चित्र*

**मिरवणुकींतील दृश्य**

रथात बसलेले ( डावीकडून ):— ( १ ) गणपतराव नलावडे ( २ ) डॉ. हेडगेवार ( ३ ) अण्णासाहेब भोपटकर.

+

पुढें चालू

*वरील चित्र*

**मिरवणुकींतील दृश्य**

रथांत बसलेले ( डावीकडून ):— ( १ ) गणपतराव नलावडे ( २ ) डॉ. हेडगेवार ( ३ ) क्षात्रजगद्‌गुरु.

*खालील चित्र*

**टिळक स्मारक मंदिरांत येतांना**

उभे ( डावीकडून ):— ( १ ) बाबाराव सावरकर ( २ ) डॉ. बा. शि. मुंजे ( ३ ) क्षात्रजगद्‌गुरु ( ४ ) डॉ. हेडगेवार ( ५ ) गणपतराव नलावडे ( ६ ) तात्याराव सावरकर.

+

पृष्ठ ३३७ समोर

**म. फुले मंडईसमोरील लो. टिळकांच्या पुतळ्यास हार घातल्यावरील दृश्य.**

+

पृ ष्ठ ३५२ स मो र

*वरील चित्र*

**हिंदु युवक परिषदेच्या अध्यक्षस्थानीं**

बसलेले ( डावीकडून ):— ( १ ) अण्णासाहेब भोपटकर ( २ ) डॉ. हेडगेवार ( ३ ) गणपतराव नलावडे.

*खालील चित्र*

**डॉ. हेडगेवार अध्यक्षीय भाषण करतांना**

✦

पृ ष्ठ ३५३ स मो र

*वरील चित्र*

( डावीकडून ):— ( १ ) क्षात्रजद्गुरु ( २ ) डॉ. हेडगेवार.

*खालील चित्र*

**' केसरी ' कार्यालयांतील ग्रंथशाळा**

खुर्चीवर बसलेले ( डावीकडून ):— ( १ ) क्षात्रजगद्गुरु ( २ ) तात्याराव सावरकर ( ३ ) डॉ. हेडगेवार.

✦

पृ ष्ठ ३६८ स मो र

**सरस्वती सिनेटोन, पुणें येथील भेट**

खुर्चीवर बसलेले ( डावीकडून ):— ( १ ) भाऊराव अभ्यंकर ( २ ) दादासाहेब तोरणे ( ३ ) डॉ. हेडगेवार ( ४ ) माधवराव गोळवलकर ( ५ ) नानासाहेब तेलंग.

✦

पृ ष्ठ ४३२ स मो र

**परमपूजनीय डॉ. हेडगेवार यांची समाधि**

रेशीमबाग संघस्थान, नागपूर

✦

पृ ष्ठ ४३३ स मो र

**डॉ. हेडगेवार भवन**

रा. स्व. संघाचें हल्लींचें केन्द्र-कार्यालय

✦

पुढील पृष्ठांसमोर परमपूजनीय डॉ. हेडगेवार यांचीं वैयक्तिक चित्रें निरनिराळ्या ठिकाणचीं व सामान्यतः कालक्रमानुसार आलेलीं आहेत.

पृष्ठ : ४८, ९६, ९७, ११२, ११३, १७६, १७७, १९२, १९३, २७२, २७३, २८८, २८९, ३६९, ३८४, ३८५, ४१६, ४१७.

* * *

# परिशिष्ट ६

## शुद्धि-पत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४ | ३ | शुभ | शुभं |
| ५ | ३३ | भ ग | भांग |
| ६ | ३४ | कायमच्य | कायमच्या |
| १९ | ५ | करात | करीत |
| २४ | १ | घरींघरीं | घरोघरीं |
| ४८ | १९ | reveal | revel |
| ५७ | १० | देऊन | देतांना |
| ६२ | २० | ठळ | ठळक |
| ६५ | २० | लागवण | लागण |
| ६७ | २२ | क्रांतगटांना | क्रांतिगटांना |
| ९४ | २२ | Satement | Statement |
| १११ | १४ | सेवादलाल | सेवादलाला |
| ११२ | २६ | तर | पण |
| ११८ | १० | मासुरास | सुमारास |
| १२३ | १५ | चांदकर | चांदेकर |
| १३१ | १ | दर | दूर |
| १४७ | ७ | सुसघटित | सुसंघटित |
| १४८ | २३ | हिंदूच्य | हिंदूंच्या |
| १५० | २ | नाहींत. | नाहींत, |
| १६७ | ११ | केष्टिपुन्यांतील | कोष्टीपुन्यांतील |
| १६८ | ३३ | फुटीरपणची | फुटीरपणाची |
| १७३ | २ | w th | with |
| १७४ | ३ | वाढत | वाटत |
| १७४ | ६ | झटापटींतचा | झटापटींतच |
| १७४ | ७ | वचप | वचपा |
| १७५ | ७ | सहसंवेदना | समसंवेदना |
| १८४ | १३ | मूठभर्र | मूठभर |
| १८४ | १४ | कविवय | कविवर्य |
| १८६ | ३ | व्यासपूजनासांठीं | व्यासपूजनासाठीं |
| १८७ | २९ | राज्यकर्योच्या | राज्यकर्त्यांच्या |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १९३ | १६ | लंगड | लंगडत |
| २०७ | ३४ | करित | करिता |
| २१८ | २९ | कल्यावाचून | केल्यावांचून |
| २२३ | ३० | ह | हे |
| २२९ | २२ | त्यावेळी | एके वेळीं |
| २३० | ९ | प्रातिकचे चिटणीस | प्रातिकचे माजी चिटणीस |
| २४३ | ३४ | विचारलेलें | विचारलेले |
| २५० | ३४ | पत्येक | प्रत्येक |
| २७० | १७ | डॉक्टरानीं | डॉक्टरानीं |
| २८४ | ११ | भागें | मागे |
| २८५ | १ | चालणाऱ्य | चालणाऱ्या |
| २८५ | ४ | १९२४ | १९२६ |
| २८९ | ३१ | पहाण्याची | पाहण्याची |
| ३०४ | ८ | शरीयष्टि | शरीरयष्टि |
| ३१० | २५ | संघटनाशा वरील | संघटनाशास्त्रावरील |
| ३२५ | २७ | पुनरुद्धारसाठीं | पुनरुद्धारासाठीं |
| ३५१ | ३१ | डॉक्टरांनीं | डॉक्टरांना |
| ३६९ | १ | आज्ञाकित | आज्ञाकित |
| ३७३ | २९ | पगडींतून | पकडीतून |
| ३९५ | १ | कलल्यो | केलेल्या |
| ४०३ | ३२ | त्येक | प्रत्येक |

* * *